# THE KRISHNAVIJAYA

OF

# MOROPANT.

(THE GREAT MARÂTHÎ POET OF THE MAHÂRÂSHTRA.)



## PART I.



*EDITED WITH*

CRITICAL AND EXPLANATORY NOTES

BY

JANARDAN BALAJI MODAK, B.A.

AND

VAMAN DAJI OKA.



**PRINTED AND PUBLISHED**

BY

THE PROPRIETOR

OF

THE "NIRNAYA-SÂGAR" PRESS,

BOMBAY.



1891.



Price 14 Annas.

महाराष्ट्रकविवर्यमोरोपंतकृत

# कृष्णविजय.

पूर्वार्ध. व उत्तरार्ध

हें ८४८४८

जनार्दन बाळाजी मोडक, बी. ए.

व

वामन दाजी ओक

यांनीं अर्थनिर्णायक व अवांतर माहितीच्या टीपा देऊन शुद्ध केलें.

आणि

मुंबईंत निर्णयसागर छापखान्याचे मालक यांनीं आपल्या

छापखान्यांत छापून प्रसिद्ध केलें.

१८९१.

किंमत १४ आणे.

उत्तरार्ध — १-१२-

२-१०-

# विषयानुक्रमणिका.

# मोरोपंतकृत [1]कृष्णविजय.

## पूर्वार्ध.

(आर्यागीतिवृत्त.)

### अध्याय पहिला.

'हरिपद [2]भवसंतमसीं भास्कर,' हें गुह्य बोलिले संत [3]मसी. ।
गंगेच्या उगमातें [4]त्यातें वंदन असो [5]प्रणतिसुगमातें. ॥ १
करि जी प्रतियुग लीला, त्या नमन [6]शरण्य वि[7]ष्णुपदयुगलीला, ।
[8]मुनिमानसशिबिकेला, जीणें निज[9]कीर्तिलेशजित [10]शिबि केला. ॥ २

---

१. पंतांनीं या कृष्णविजयग्रंथांत यमकचमत्कार व अर्थगौरव हे दोन गुण विलक्षण रीतीनें प्रकट केलेले आहेत. या ग्रंथांत त्यांनीं श्रीमद्भागवतांतील दशमस्कंधाचें सार अध्यायवार वर्णिलें आहे; ह्मणून मूलग्रंथाप्रमाणें याचेही पूर्वार्ध व उत्तरार्ध असे दोन भाग केलेले आहेत. याच्या पूर्वार्धात ४९ अध्याय व उत्तरार्धात ४१ अध्याय मिळून एकंदर सर्व ग्रंथांत ९० अध्याय आहेत. त्यांपैकीं पूर्वार्धांतील सर्व अध्याय व उत्तरार्धांतील आरंभींचे ५ अध्याय मिळून एकंदर ५४ अध्याय आर्यागीतिवृत्तांत रचिलेले आहेत. पुढें ५५ पासून ७९ पर्यंत २५ अध्याय नानातऱ्हेच्या श्लोकवृत्तांत रचिलेले आहेत. बाकीचे ८० पासून ९० पर्यंत ११ अध्याय गीतिवृत्तांत रचिले आहेत. पूर्वार्धाच्या अखेरीस षट्पद्यात्मक सज्जनप्रार्थना आहे, व उत्तरार्धाच्या अखेरीस उपसंहारात्मक पांच श्लोक आहेत. या ग्रंथाचें दुसरें नाव 'बृहद्दशम' असें आहे. बृहद्दशम म्हटलें म्हणजे लघुदशम या नांवाची कल्पना मनांत येतेच. तो लघुदशम पंतांच्या मंत्रभागवतांत आहे. त्यांत फक्त ११८८ गीति आहेत. बृहद्दशमांत १९४९ आर्यागीति, ८२१ श्लोक आणि ८८८ गीति, मिळून एकंदर ३६५८ पद्यें आहेत. म्हणून यास मिळालेलें 'बृहद्दशम' हें नांवही योग्य आहे यांत संशय नाहीं. आर्यागीतीचें लक्षण वृत्तदर्पणांत 'पहिल्या चरणीं बारा मात्रा; दुसऱ्यांत सात आणी तेरा; । उभयदळीं हे रीती जीस, तिला ह्मणति सुज्ञ **आर्यागीती** ॥' असें दिलें आहे. म्हणजे याच्या पहिल्या पादांत बारा मात्रा व दुसऱ्यांत वीस, मिळून एकंदर पहिल्या अर्धांत ३२ मात्रा असतात. दुसऱ्या अर्धांतही तितक्याच मात्रा असतात. आर्यागीतींत पूर्वार्धाचा प्रथम पाद व द्वितीय पाद यांच्या शेवटीं यमक आहे; तसेंच द्वितीय अर्धाचा प्रथम पाद व द्वितीय पाद यांचे शेवटीं यमक आहे.
२. संसाररूपी महान् अंधारीं. ३. मजपासीं. ४. हरिपदातें. ५. प्रणति, नमस्कार, तेणेंकरूनच सुलभ अशातें. ६. शरण जाण्यास योग्य अशा. ७. विष्णूच्या दोन्ही पदांस. ८. मुनिजनांच्या मनांस शिबिका म्ह० पालखी अशी जी तीतें. ९. आपल्या कीर्तीच्या किंचित् अंशानेंच जिंकिलेला. १०. राजविशेष. (हा दानशूर होता.)

म्हणती संत, '[१]तगाळ्या चित्तीं हरिच्या कथाचि; संतत गाळ्या.' ।
या उपदेशासम न प्रिय [२]इतर; [३]वरि [४]प्रमोददेशास मन. ॥ ३
[५]शुकमुखशुचिसमजनता देऊ [६]हरिगुणसुधैकरुचिस मज [७]नता. ।
करुत कृपा बहु सुकवी. भाव [८]प्रणतीं स्वपादपूज्य न चुकवी. ॥ ४
[९]वृत्तीं आर्धीं आर्या [१०]श्राव्या, [११]सेव्याचि फार, साधी, [१२]आर्या, ।
[१३]युक्ता [१४]सद्यमकांनीं; प्यावी रसिकीं करूनि [१५]उद्यम कानीं. ॥ ५
म्हणति भलीला आर्या तैशीच '[१६]सरोजनाभलीला आर्या; ।
[१७]संगत हें दोघींतें जैसें '[१८]रविहरिपदोत्थसरिदोघीं तें. ॥ ६
कृष्णकथा शुक राया [१९]अभिमन्युसुतास, मुक्त [२०]आशु कराया, ।
वदला स्पष्टा [२१]दशमीं; त्या गाइन [२२]एकतीसअष्टादश मी. ॥ ७
[२३]निजसुखराशि [२४]शुकाचा बोल वदे; किति [२५]मयूर हा शिशु काचा? ।
तांडव उचितचि हें [२६]यां; कौतुक मानुनि रसज्ञ म्हणति न [२७]हेयां. ॥ ८
सादर हो[२८] मन नामीं; हरिचरिताच्या करीन हो मनना मी. ।
म्हणती संत, 'तमातें हें चिंतन रवि घडेल संतत,' मातें. ॥ ९
आपुलिया [२९]संतोंनीं पूर्ण करावी दया सदा संतांनीं. ।
श्रोत्र निवे, कीरमती बोधिति, बोलविति सद्विवेकी, रमती. ॥ १०
धरि गिरि, वन, पुर; साहे न [३०]दुरितकरअसुरभर परंतु, [३१]रसा हे. ।
स्वत्रास कळवि [३२]धात्या, गोरूपातें धरूनि, सकळविधात्यां[३३]. ॥ ११
'आलें बा! [३४]धामातें सांगों, झाली असह्य बाधा मातें. ।

---

१. राहाव्या. २ दुसरा. (उपदेश.) ३. स्वीकारितें. ४. आनंदाचें स्थळच अशा (उपदेशास.) ५. शुकादि शुद्ध व निष्पक्षपाती जनांचा समूह. ६. हरिगुणरूप अमृताची जी श्रेष्ठ रुचि तीतें. ७. नम्रास. ('मज' याचें विशेषण.) ८. शरण आलेल्यांच्या ठायीं. ९. छंदांमध्यें. १०. श्रवण करण्यास योग्य. ११. सेवन करण्यास योग्य. १२. श्रेष्ठ. १३. भरलेली. १४. चांगल्या यमकांनीं. १५. उद्योग, श्रम. १६. कमलनाभाची म्ह० विष्णूची लीला. १७. संबंध. १८. सूर्य आणि विष्णु यांच्या पायांपासून निर्माण झालेल्या नद्यांच्या म्ह० गंगेच्या आणि यमुनेच्या प्रवाहीं. १९. परीक्षितीस. २०. लवकर. २१. भागवताच्या दशमस्कंधीं. २२. एकुणपन्नास. (कृष्णविजयाच्या पूर्वार्धांत ४९ अध्याय आहेत.) २३. आत्मसुखाचा राशी. २४. शुकमुनी चा; (पक्षी) पोपटाचा. २५. मयूरकवी; (पक्षी) मोर. २६. या मोराला. २७. त्याज्य. 'मला मोरास तांडव नृत्य योग्य; तशांत मी गायन केलें असतां सज्जन कौतुक मानितील' असा भावार्थ. ('हेया' हें 'कथां'चें विशेषण.) २८. होवो. २९. लेंकराचे ठिकाणीं. ३०. पापी. ३१. पृथ्वी. ३२. ब्रह्मदेवास. ३३. उत्पन्न करणाऱ्यास. ३४. घरास.

सांपडलें गाय वनीं, दैत्यजनीं फार पीडिलें गा! यवनीं.' ॥ १२
संतत [1]नव्य [2]नतिचें परिसे प्रभु [3]अश्रुवर्धन [4]व्यसन तिचें. ।
'हें हरिल [5]विभू; मी तें करिन विदित सकल,' विधि म्हणे भूमीतें. ॥ १३
[6]द्रुहिण [7]भवास, [8]वसुमतिश्रेयोर्थें, वे, [9]सदेव वासव, सुमती. ।
जाय, कृपा दावि नवी जो, त्या [10]दुग्धाब्धिशायिपादा विनवी. ॥ १४
त्या सगुणब्रह्माची घे अभयोक्ति [11]समाहित ब्रह्मा ची. ।
हें विदित [12]वृषाकपिला प्रथमचि; कां न हरि हो शिशुतृषा [13]कपिला? ॥ १५
तापातें [14]हरि, चव दे अमृताहुनि, अभय जें मुखें हरिच वदे. ।
तें [15]सभवां [16]परिसविता झाला विधि [17]तन्मुखांबुजां परिसविता. ॥ १६
'शीघ्र यदुकुळीं [18]अमर स्वांशें जन्मोत [19]हरिपदाब्जभ्रमर. ।
[20]भगवत्पदबंधुरता सेवा, जा, अर्जवा [21]भजकबंधुरता. ॥ १७
भूश्रम हा जननी ती हरिल, जिची वर्णिती महाजन नीती. ।
वसुदेवाची सुतता स्वीकारुनि, करिल कीर्ति लोकीं [22]सुतता. ॥ १८
म्हणवुनि, सत्वर [23]महिला जाव्या, भगवत्प्रियार्थ, निर्जर[24]महिला; ।
प्रकटेल प्रथमहि [25]मा; मग शेषहि दाखवील [26]अवितथ महिमा. ॥ १९
प्रभुची माया देवी, तेही जन्मेल; जे भ्रमा या दे, वी ।
विश्वाला, सहजगती भुवनें [27]यदनुग्रहेंचि [28]मत्सह जगती.' ॥ २०
एवंविध आज्ञापी; [29]सुरसेना ही सुधा तशी आज्ञा पी. ।
केलें गमनहि, महितें समजावुनियां, निजालया [30]मुनिमहितें. ॥ २१
पूर्वी यदुपति होता [31]शरदहनीं रणमखीं [32]पराहुतिहोता; ।
नृपनीतिप्रिय; [33]शरणीं प्रकृतीच्या पटु; जयासि येचि यश रणीं. ॥ २२

---

१. नवें. २. नमन करणारीचें. ३. अश्रूंतें वाढविणारें. ४. संकट. ५. विष्णु. ६. ब्रह्मा. ७. शिवास. ८. पृथ्वीच्या कल्याणार्थ. ९. देवांसहित. १०. विष्णुपदास. ११. समाधिस्थ, ध्यानस्थ. १२. विष्णूला. १३. गाई. १४. हरण करी. १५. शिवासकट (देवांस). १६. ऐकविता. १७. त्यांच्या वदनरूपी कमलांस सूर्यासारिखा असा जो (ब्रह्मा). १८. देव. १९. हरीच्या पदरूपी कमलांचे भ्रमर. २०. भगवत्पदीं लीनता, नम्रता. २१. भक्तरूपी बंधूचे ठायीं रत अशा (ईश्वरास). २२. प्रसिद्ध. २३. पृथ्वीवर. २४. देवस्त्रिया. २५. लक्ष्मी. २६. सत्य. २७. ज्याच्या प्रसादानें. २८. माझ्या सुद्धां. २९. देवसमूह. ३०. मुनिपूजितें. ३१. बाणरूपी अग्नींत. ३२. शत्रुरूपी आहुतीचें हवन करणारा, ३३ रक्षणीं.

प्रेमें साधुजनपदा, तो माथुर[1] शूरसेननामजनपदा[2] ।
वीर्यें सेवि, प्रकृतिप्रिय[3], गुरु तो, शूरसेन[4], मंतविप्र[5], कृती[6]. ॥ २३
मूर्तानंदथु[7] राहे प्रभु जींत सदा, पुरीश्वरी मथुरा हे. ।
त्यापासुनि नृपधानी वर्णिलि यदुभूपहरिगुहाचि[8] बुधांनीं[9]. ॥ २४
तेथें देवक[10] रीति[11] प्रकटी; आश्चर्य फार देव करीती. ।
जैसा शिवगौरीचा[12], केला उद्वाह[13] देवकीशौरीचा[14]. ॥ २५
भगिनिस्नेहें भुलता झाला खळ कंस, उग्रसेनहि चुलता; ।
आंदण दिधलें, कीं तें उचितचि, बुध देति नैक[15]विध लेंकींतें. ॥ २६
घेउनि आंदण गेहीं[16] शौरि[17] निघे; कंस करि महा दणगे[18] हा. ।
कनकरथीं[19] बैसविता झाला; शोभे सदारवर[20] तैं सविता[21]. ॥ २७
त्या कंसविभू[22] मिरवी राजपथीं; शौरिही गमे भूमिरवी[23]. ।
सारथि तो भाउ दया [24]प्रेमोत्सव करि; अपार शोभा उदया[25]. ॥ २८
या स्नेहहर[26]समयांत स्वजनाच्या दृष्टिचित्तहर समयांत ।
कंस श्रवणीं अशनी[27] गगनोक्ति[28] पडे, जसें हळाहळ[29] अशनीं[30]. ॥ २९
'रे कंसा वेडसरा ! लालन करितां हि नाग चावे डसरा; ।
होउनि सूत[31] वहासी तूं, कन्यानिर्विशेष[32] जीस पहासी, ॥ ३०
अष्टम गर्भ, कराया त्वद्वध[33], होणार ईस अर्भक[34] राया ! ।
न चुके भावि[35]; लयातें जाशिल, जरि चित्त अनृत भाविल यातें.' ॥ ३१
हें ऐकुनि, पापरती[36] कंस करी, मानसांतुनि, कृपा परती. ।
तो घाली कर वालीं[37] भगिनीच्या वाम[38]; दक्ष[39] ही करवालीं[40]. ॥ ३२
भगिनीचा वध मतिला रुचला. उठला वधावया अधम तिला. ।

---

१. मथुरेचा. २. शूरसेन नामक देशास. ३. प्रजेस प्रिय. ४. शूरसेन नांवाचा राजा. ५. मान्य आहेत विप्र ज्यास. ६. चतुर. ७. मूर्तिमान् आनंद. ८. यादवराजा हाच सिंह त्याची गुहा. ९. बुद्धिमंतांनीं. १०. देवक नांवाचा राजा. ११. परिपाठ, शिष्टसांप्रदाय. १२. शिवपार्वतीचा. १३. विवाह. १४. देवकी आणि वसुदेव यांचा. १५. अनेक प्रकारचें. १६. घरीं. १७. वसुदेव. १८. कडकडाट. १९. सुवर्णरथीं. २०. बायकोसहित नवरा. २१. सूर्य. २२. कंसराजा. २३. भूमीवरचा सूर्य. २४. प्रीतियुक्त आनंद. २५. वसुदेवरूपी सूर्याच्या उदयास म्ह० देखाव्यास. २६. 'समयांत' याचें विशेषण. २७. वज्र. २८. आकाशवाणी. २९. विष. ३०. अन्नांत. ३१. सारथी. ३२. कन्येसारखीच. ३३. तुझा वध. ३४. मुलगा. ३५. भविष्य. ३६. पापांत प्रीति आहे ज्यास. ३७. केशीं. ३८. डावा. ३९. उजवा. ४०. तरवारीस.

जों तो [1]बालिश हाणी, शौरीची [2]नीति जाहली शाहाणी. ॥ ३३
बोध सकळ [3]सा मास ब्रह्मा करु. नायकेल खळ [4]सामास. ।
जरि [5]साश्रु [6]दरिद्र वदे, तें [7]कुधनिकमानसास न परि द्रव दे. ॥ ३४
स्त्री [8]आतंकाकुळ ती देखुनि, करि फार शौरि तो काकुळती. ।
परि तो उग्र न वळला. उदकें न शमेचि [9]तैलवह्नि [10]खवळला. ॥ ३५
केलें यद्यपि कानीं [11]बधिराच्या [12]गान नित्य [13]हृद्य [14]पिकांनीं, ।
फळ [15]नुभवि. [16]तथा, यास ज्ञान कथुनि, शौरि होय [17]वितथायास. ॥ ३६
न धरि द्रवलेश [18]शिला; [19]विधुमणि पाहुनि, रस प्रसवले, [20]शशिला. ।
खळ बहु मळके वळते उपदेशा, तरि भले कुशल केवळ ते! ॥ ३७
भाव [21]विमळ कळवीला, [22]पुत्रार्पणनिश्चयेंचि खळ वळवीला. ।
कथि [23]सानंद, 'नसे जें [24]त्वदधिक मज, दे समस्त [25]नंदनें [26]सेजें.' ॥ ३८
या वचनें तो [27]शमला कंस. म्हणे, 'जाहला परम तोष मला.' ।
भगिनीच्या [28]क्षणनींच [29]प्रोद्यत होता, न लावितां क्षण, नीच ॥ ३९
सोडी [30]कचनिचय महा खळ. [31]विश्वासे तदीय वचनिंच यम हा. ।
[32]श्येनगुरु विधी; टपणें [33]त्याचें अवितर्क्य; न समजे धीटपणें. ॥ ४०
स्थिर करुनि मन, [34]स्वीयागारा गेला, निवारुनि, [35]मनस्वी, या. ।
रिपुसि [36]यशोवसु, [37]देवस्तुत्य, [38]प्रथमज समर्पि तो वसुदेव. ॥ ४१
सत्याला जतनेला ठेवूनि, प्रथम सुत न लाजत नेला. ।
स्ववचनचि सदा कुलजें रक्षावें, न [39]तनुजादि [40]विपदाकुल जें. ॥ ४२
कंस [41]तदर्पणसमयामाजि गणी [42]शुद्धरत्नदर्पणसम या; ।

---

१. पोर, मूर्ख. २. कौशल्य, युक्ति. ३. सहा. ४. पुनर्मित्रभावास. ५. अश्रुयुक्त. ६. गरीब. ७. वाईट धनवानाच्या मनास. ८. दुःखानें व्याकुळ. ९. तेलानें युक्त. १०. खवळलेला. ११. बहिऱ्याच्या. १२. गायन. १३. रमणीय. १४. कोकिलपक्ष्यांनीं. १५. उत्पन्न न करी. १६. तसा. १७. व्यर्थ आहेत श्रम ज्याचे. १८. साधारण दगड. १९. चंद्रकांत. २०. चंद्राला. २१. निर्मळ. २२. पुत्र देईन या निश्चयानेंच. २३. आनंदानें. २४. तुझ्यापेक्षां जास्त. २५. मुलगे. २६. क्रमानें. २७. शांत झाला. २८. मारणींच. २९. अतिउद्युक्त. ३०. केशसमूह. ३१. विश्वास ठेवी. ३२. नशीब. ३३. 'विधीचें नशीब श्येनपक्ष्याहून जास्त; कारण श्येनाचें टपणें धीटपणानें समजे, परंतु विधीचें न समजे; अतएव विधी जास्त होय' असा भावार्थ. ३४. आपल्या घरास. ३५. मनाच्या स्वाधीन. ३६. यशच आहे वसु म्ह० धन ज्याचें. ३७. देवांला स्तुत्य. ३८. पहिला मुलगा. ३९. मुलगा इत्यादि. ४०. विपदेचें स्थान. ४१. त्यास देतेवेळीं. ४२. निर्मळ आरश्यासारखा.

बोले, ‘रिपु अष्टम. हा न्या, भावोजी ! नको करूं कष्ट[१] महा’. ॥ ४३
शौरि गृहा जाय; जिणें[२] पुत्राचें परि गमे मना जायजिणें[३]. ।
कीं खळनृपविश्वास व्यर्थ. निर्घो दे पडोनि न पवि[४] श्वास. ॥ ४४
शौरिवरी फार दया कंस करी, तों रहस्य[५] कथि नारद या[६]; ।
कीं, ‘नरतनुखोळ[७], खरे त्वदहित[८] सुरें[९] नंदयदुकुळीं ओळख रे. ॥ ४५
हे सहसा माराया दितिदनुजां[१०] जपति; न करिं सामा राया ! ।
अहित[११] नृपा ! ते. जावें आप्तपणा वरि न; पळ न आप्ततेजावें[१२].’ ॥ ४६
सोष्णें[१३] सदर्प श्वासा सोडी, वृकव्याघ्रकृष्णसर्पश्वासा[१४] ।
धांवे. यद्यपि साळे[१५] वाक्पतिच्या[१६] पढुनिही अवद्य[१७] पिसाळे. ॥ ४७
पातकराशि शुनकसा[१८] धांवे खळ कंस; ये करा शिशु न कसा ? ।
शौरिनग[१९] न हा लवला शोकभरें, न भयमारुतें[२०] हालवला. ॥ ४८
मारी वृक पोतातें[२१] हरिणीच्या, श्येन ज्यापरि कपोतातें[२२], ।
तैसा वधिला भाचा कंसें; तो मानिला दिवस लाभाचा. ॥ ४९
जो सत्कारावा सस्त्रीक[२३], तया शौरिलाहि कारावास[२४], ।
बद्ध करुनि, दिधला हो, कीं निजरिपुजनक[२५] दुःख बहुविध[२६] लाहो. ॥ ५०
नेले विलया सहसा कंसें ऐसेचि शौरिसुत यासह सा[२७]; ।
श्रम दे निरवधि[२८]; कारावास पित्यासहि, हरूनियां अधिकारा. ॥ ५१

---

## अध्याय दुसरा.

क्षय[२९] खवळी व्याधींतें, कीं श्वगणा[३०] मृगयु[३१], जें गदी[३२], व्याधीं, तें ।
कंस, ससचिव[३३], क्रौर्य प्रकट करी, यादवप्रमथनीं[३४] शौर्य. ॥ १

---

१. श्रम, दुःख. २. जगणें. ३. जायजणें म्ह० अनिश्चित. ४. वज्र. ५. गुह्य. ६. या कंसास
७. मनुष्य देहाची खोळ म्ह० आच्छादन घेतलें आहे ज्यांनीं असे तुझे शत्रु जे सुर म्ह० देव ते नंद
व यदु यांचे कुळीं आहेत ते ओळख. ८. तुझे शत्रु. ९. देव. १०. दितिजां व दनुजां, दैत्य व दानव
यांस. ११. शत्रु. १२. विश्वासभरंवसा ठेवणें. १३. उष्ण व गर्विष्ठ असा उच्छ्वास. १४. लांडगा,
वाघ, काळा सर्प, किंवा श्वा म्ह० कुत्रा यांसारखा. १५. विद्यालयांत, शाळेंत. १६. बृहस्पतीच्या.
१७. मूर्ख, अज्ञानी, निंद्य. १८. कुत्र्यासारखा. १९. वसुदेवरूपी पर्वत. २०. भय हेंच वारा तेणें.
२१. मुलाला. २२. पक्षिविशेष (कवडा.) २३. बायकोसहित. २४. बंदिखान्यांत वास. २५. आ-
पल्या शत्रूचा बाप. २६. बहुत प्रकारचें. २७. सहा. २८. अत्यंत. २९. क्षयरोग. ३०. कुत्र्यांस.
३१. पारधी. ३२. रोगाच्या ठायीं. ३३. प्रधानांसह. ३४. यादवांच्या नाशीं.

[1]अतिदुष्ट समस्त बकप्रलंबमुख गरळवल्लिकुसुमस्तबक, ।
चित्तांत शिरोनि हितछद्में, जे होति तापद [2]शिरोनिहितें. ॥ २
करि विलया [3]दवसा; हे तृण [4]त्यातें; दुःख कोण यादव साहे? ।
न लवुनियां मग पळ, ती [5]मथुरावनिका त्यजूनि, [6]यदुमृग पळती. ॥ ३
त्यजिले ठाव कितेकीं. ज्यांला [7]धृति, रीति, नीति ठावकि, ते कीं ।
भजती त्यासचि वाचे; स्थिति त्यांची जे विधेय [8]त्या सचिवांचे. ॥ ४
ऐसा [9]शोकंद, नातें न गणुनि, करि कुमति कंस तो [10]कंदनातें. ।
देती ताप [11]सहाय क्रूर, म्हणति सर्व साधु, [12]तापस, ‘[13]हाय!’ ॥ ५
यमसम देखे [14]पतिला मथुरेच्या; सातवी न दे [15]खेप तिला ।
सुख; जीचे बालक [16]सा वधि जो, तो नाठवेल खळ काळ कसा? ॥ ६
‘सप्तम गर्भ कसा’ हे ‘वांचेल?’ म्हणे; न कंस अर्भक साहे. ।
[17]कुनृपतिचें [18]निधिला [19]भें, दुःख असें मनिं [20]अनंतसुखनिधिलाभें. ॥ ७
[21]कंसकृतोपद्रव ते यदु झाले, त्यजुनि [22]अशन, झोंप, [23]द्रवते; ।
हें कळतां अगदीं न प्रभु साहे; कीं [24]स्वशासनीं [25]जगदीन. ॥ ८
‘सर्वहि [26]यादं, [27]वनाश, [28]व्यसु, [29]निरुदक, [30]मीन, तेविं यादव नाश ।
मजविण पावतिल; पती मी रक्षिन; किति [31]भयार्त धांवति, लपती!’ ॥ ९
ऐसें चिंतुनि, [32]माया करि हरि, निजदास दुःख किंतु निमाया. ।
आज्ञापी [33]परे माया देवी ते, जे [34]अनुव्रता [35]परमा या. ॥ १०
‘रक्षूं लोकां माये! देवि! [36]संदिष्टार्थ सिद्ध हो, कामा ये; ।
जा गे! [37]गोपावासा. समयचि हा लाभ त्यास ओपावासा; ॥ ११
व्रजपति नंद [38]नयातें जाणे; करि शौरि साधु वंदन यातें; ।

---

१. बक आणि प्रलंब इत्यादि राक्षस जसे कांहीं विषवल्लीच्या फुलांचे गुच्छ. २. डोईवर धारण केलेले. ३. दावाग्नीसारखा. ४. ‘कंसातें हे यादव कंसरूपी दावाग्नीपुढें तृण झाले’ असा भावार्थ. ५. मथुरा हेंच अरण्य. ६. यादवरूपी सावजें. ७. धैर्य. ८. आज्ञापरिपालक. ९. शोक देणारा. १०. मर्दनातें. ११. मित्र. १२. तपस्वी. १३. हायहाय. म्हणती, खेद करिती. १४. कंसाला. १५. सातव्या गर्भाची खेप. (हा ‘दे’ या क्रियापदाचा कर्ता.) १६. सहा. १७. कोणत्याही वाईट राजाचें. १८. (त्यांच्या प्रजेंतून कोणत्याही मनुष्यास सांपडलेल्या गुप्त द्रव्याला. १९. भय. २०. विष्णुलाभें. २१. कंसानें केला आहे उपद्रव ज्यांस. २२. खाणें. २३. पळते. २४. आपल्याआज्ञे-विषयीं. २५. जगाचा स्वामी. २६. जलचर. २७. उदकेच्छु. २८. प्राणरहित. २९. उदकरहित. ३०. मत्स्य. ३१. भयानें आर्त म्ह० पीडित. ३२. लाघव, कपट. ३३. श्रेष्ठ. ३४. अनुसरणारी. ३५. ईश्वरास. ३६. साधूंचें इष्ट करण्यासाठीं. ३७. गोकुळास. ३८. नीतीतें.

कीं करवुनि दे विवरें [1]कंसभयार्तस्वयोषितां, देवि! [2]वरें; ॥ १२
[3]रोहिण्याह्वा [4]यांची स्त्री आहे [5]शेषजन्मदा न्हायाची; ।
[6]तज्जठरीं [7]तेजातें ने; धरिते देवकी सती ते ज्यातें. ॥ १३
मग मी [8]देवकजा या तेजा जननी करीन, [9]सेवकजाया. ।
दुग्धाब्धि [10]यदुदरातें स्तवि, त्या जावुनि, विनाशिन [11]यदुदरातें. ॥ १४
नंद [12]सुकृतमय; [13]दुहिता हो त्याची तूं, करूनि काम, [14]यदुहिता; ।
योग्याचि यशोदा त्या त्वन्मातृत्वा, [15]समुज्ज्वलयशोदात्या. ॥ १५
वरितिल वर मानव, सप्रेम भजुनि, तूज; तूंहि [16]परमा नवस ।
सद्भाव पुरविशील, [17]स्वजनाघतमीं धरूनि वपु '[18]रविशील.' ॥ १६
माया, [19]श्रीशास [20]नती करूनि, करि शीघ्र सर्वही [21]शासन ती; ।
हें किति? जड जग वीते, [22]अघटितघटनापटीयसी, जगवीते. ॥ १७
निंदिति पातक सारे; ‘झाला,’ जन म्हणति, ‘गर्भपात कसा रे?’ ।
[23]विधिचें लिहिलें कां तें न घडे? कर्मेंचि पावलि हि लेंकांतें. ॥ १८
[24]समेधिष्ठी [25]अवदाता [26]देवक्युदरा मुकुंद [27]उत्सवदाता; ।
देवांच्या जशि [28]तरुची वसति, [29]पयोधींत [30]हरिदिशेंत [31]सितरुची. ॥ १९
पळ न चुके [32]वेळेसा, जे [33]आनकदुंदुभिवधू न केवळ साजे, ।
पावुनिहि [34]अमरमणि कीं [35]कारासदनांत; शिखि[36]शिखा जशि [37]मणिकीं. ॥ २०
कीं म्हणती कविराजे [38]ज्ञानखळीं जशि सरस्वती न [39]विराजे, ।
कीं जरि सुंदर, साजे कविता न [40]तदाननीं, भजति न रसा जे. ॥ २१

---

१. कंसाच्या भयानें आर्त अशा आपल्या (वसुदेवाच्या) बायकांस. २. श्रेष्ठ. (हें ‘विवरें’ याचें विशेषण.) ३. रोहिणी नांवाची. ४. नंदाची. ५. शेषाला म्ह० बलरामाला जन्म देणारी. ६. तिच्या पोटीं. ७. तेजस्वी गर्भातें. ८. देवकाची कन्या म्ह० देवकी. या तेजा म्ह० मला. ९. माझा सेवक जो वसुदेव त्याची स्त्री व देवकाची कन्या. १०. जीच्या (देवकीच्या) उदरातें. ११. यादवांच्या भयातें. १२. पुण्यमय. १३. मुलगी. १४. यादवांच्या हितासाठीं. १५. उत्तम यश देणाऱ्या. (हें त्वन्मातृत्वा’. याचें विशेषण.) १६. श्रेष्ठा. १७. स्वजनाच्या पातकरूपी अंधारीं. १८. सूर्यासारखी तेजस्वी. १९. लक्ष्मीपति विष्णूस. २०. नमन. २१. शासन करी म्ह० आज्ञेप्रमाणे वर्ते, असा भावार्थ. २२. अघटित जी घटना ती करण्याविषयीं अतिकुशल. २३. ब्रह्मदेवाचें. २४. आंत उत्पन्न होय. २५. शुद्ध. २६. देवकीच्या पोटास. २७. आनंद देणारा. २८. कल्पतरूची. २९. क्षीरसागरीं. ३०. पूर्वेस. ३१. शुभ्र म्ह० स्वच्छ कांति. ३२. घेरा. ३३. वसुदेवस्त्री देवकी. ३४. देवश्रेष्ठ विष्णु. ३५. बंदीखान्यांत. ३६. अग्निज्वाला. ३७. डेन्यांत. ३८. ज्ञानाविषयीं दुष्ट. ३९. शोभे. ४०. त्यांच्या तोंडीं.

शिशुवधकाम[1] सतीतें जेव्हां अवलोकि कंस तामस तीतें, ।
अत्यद्भुत[2] शोभा जे, तीणें नयनीं मनीं हि खळ तो भाजे. ॥ २२
स्पष्ट नवी हे रीती जाणे, ते अद्भुत छवी हेरी[3] ती. ।
जरि तो खळ, कर्कश, तें तेज न साहे; गमे हरिच तर्कशतें. ॥ २३
न घडे घात; नवा हे[4] दावी तेजःप्रकार; हात न वाहे[5]. ।
पाहे प्रसवावधि[6] तो. न असमयीं तक्षकादि डसवा[7] वधितो. ॥ २४
न चले अशनीं[8] शय[9]; न स्थिर मति, सिंहासनीं हि भवनीं[10]; शयन[11] ।
न घडे धड; कीनाशें[12] बद्ध तसा भी; मनांत धडकी नाशें. ॥ २५
कीं हरिमय[13] जग ज्याला होय भयद उग्रसेनतनुजगजाला[14]. ।
न दिसे नीज, नसे जे चिंतेंत; रुचे न कामिनीजन सेजे. ॥ २६
सदनीं वसुदेवाच्या विधि[15] भव[16] मुनि शक्र[17] सिद्ध वसु[18]; देवाच्या ।
करिति दयास्तवना, कीं केला वर सत्य; जय जयास्तव[19] नाकीं[20]. ॥ २७
'माते देवकि! तव हा आला पोटासि देवदेव कितवहा[21]. ।
कंसांतक यदुप कृती[22] होइल, गातील सुरतरुहि[23] यदुपकृती[24]. ॥ २८
नाशिल रिपुसह कारावासा; जपे[25] अस्मदादिपिकसहकारा[26]; ।
सुरतरुदेवा[27] तनया तुझिया विघ्नाख्य[28] कंप दे वात न या.' ॥ २९
प्रभुचरण स्तवुनि, सुर स्वपदा गेले मनांत होउनि निसुर[29]; ।
कीं विश्वनिकाय[30] जना उद्धरिल मुकुंद रक्षक निका यजना[31]. ॥ ३०

---

## अध्याय तिसरा.

जगदिष्टोत्तमसमयामाजि[32] निशीथीं हरी सुधाकरसम[33] या ।
देवकसुप्रियदुहिताप्राचींतुनि[34] उदय करि चकोरयदुहिता[35]. ॥ १

---

१. मुलांचा वध करण्याविषयीं इच्छा आहे ज्यास. २. आश्चर्यकारक. ३. पाहे. ४. देवकी. ५. उठे, उभारी. कंस हात न उभारी, असा भावार्थ. ६. प्रसवसमय. ७. सर्प. ८. अन्नीं. ९. हस्त. १०. घरीं. ११. निद्रा. १२. यमानें. १३. कृष्णरूप; (पक्षीं) सिंहमय. १४. उग्रसेनसुत(कंस)-रूप हत्तीस जग हरिमय व भयद झालें, असा अर्थ. १५. ब्रह्मा. १६. शिव. १७. इंद्र. १८. अष्ट वसु. १९. ज्या वरामुळें. २०. स्वर्गीं. २१. दुष्टांचा संहार करणारा. २२. कृतकृत्य. २३. कल्पवृक्षही. २४. ज्याचा उपकार. २५. सांभाळ कर. २६. आम्ही आदिकरून जे पिक (कोकिल) यांचा पिकलेला आंब्याचा वृक्ष (कृष्ण) त्यास. २७. कल्पवृक्षांच्या राजास. २८. विघ्ननामक वारा. २९. निष्काळजी. ३०. विश्वस्थान. ३१. यज्ञास. ३२. जगांत असंत उत्तम अशा समयीं. ३३. चंद्रसम. ३४. देवकीरूपी पूर्वेहून. ३५. चकोरांसारख्या यादवांच्या कल्याणार्थ.

पाहे माय तनय, न प्रतिनिधि ज्या, पंकजछदायतनयन[1]. ।
भुज चारि निजदरारी[2] शोभति, जेथें गदासरोजदरारी[3]. ॥ २
श्रीवत्सें उर विलसे[4]; दृक्काम[5] न कंठ कौस्तुभहि उरविलसे. ।
विद्युत्पीतांबर वा घननीळ विलोचनांसि[6] पीतां बरवा. ॥ ३
कर्णीं लोल[7], समानें, मकराकृति, रत्नकुंडलें लसमानें[8]; ।
जरि दिसतिहि मकरांचीं रूपें, बिंबेंचि भास्करहिमकरांचीं. ॥ ४
ज्यांत मणींद्र[9] तपनसे[10], मुकुट शिरीं तो स्तवावयासि तप नसे. ।
कुंतळ ते मधुपाळी, पाजूनि जिला मुखाब्ज निजमधु पाळी. ॥ ५
मणिखचिता दाब[11] रविद्युति, घंटापंक्ति, रम्यनादा[12], बरवी. ।
कंकण[13] अंगद यांला धरणें भक्तार्थ, जेविं अंग दयाला. ॥ ६
द्युतिभाजन[14] कारा[15] हे झाली; भीति न मुकुंदजनका[16] राहे. ।
पाहुनि अद्भुत तनया, होय मनें अयुतधेनुदान ततनया[17]. ॥ ७
जाणे पुरुष परं[18]; महा[19] वरुनी, वसुदेव हृष्ट[20] होय परम हा. ।
स्मरला वास्तव नातें; करि जोडुनि हस्त, तेधवां स्तवनातें. ॥ ८
'धरणीला अव, तारीं दीनजना या सुखप्रदा[21] अवतारीं; ।
झाला सुदिवस मजला; भक्तीं तूझा प्रसाद पूर्ण समजला. ॥ ९
मद्गेहिं[22] जनन[23] भावी[24] ऐकूनि, तुझें स्वभद्र[25] कुजन[26] न भावी. ।
वधिले भवदग्रजनी[27]; या खळ कंसा असा नसे उग्र जनीं. ॥ १०
आजुनि न निवे दावा; कैसा वृत्तांत तूज न निवेदावा? ।
प्रसव वदावे; दारा उपासिती दूत, कथिति दावेदारा. ॥ ११
कळतां, घातक साप त्वरितचि धांवेल; करिल घात कसाप. ।
केले सहसा वध हो; यास्तव म्हणतों विभो! तुला, सावध हो.' ॥ १२
स्तवुनि, धरुनि जननीती, कंसभयव्याकुळा वदे जननी ती, ।
'हे आकृति कमनीया[28] आच्छादीं शीघ्र; फार धाक मनीं या.' ॥ १३

---

१. कमलपत्रवत् विस्तृत नयनें ज्याचीं. २. आपल्या भयाचे शत्रु. ३. गदा, कमल, शंख आणि चक्र. ४. शोभे. ५. दृष्टीची इच्छा. ६. नयनांस. ७. चंचल. ८. शोभायमान. ९. मणिश्रेष्ठ. १०. सूर्यासारिखे. ११. कंबरपट्टा. १२. मधुर आहे नाद जीचा. १३. कडें. १४. कांतीचें पात्र. १५. बंदीखाना. १६. वसुदेवास. १७. प्रसिद्ध आहे नय म्ह० न्याय ज्याचा. १८. कृष्ण. १९. आनंदास. २०. खुष. २१. सुख देणाऱ्या. २२. माझ्या घरीं. २३. जन्म. २४. होणार. २५. कल्याण. २६. दुष्ट. (कंस). २७. तुझे वडील बंधु. २८. सुंदरा.

'झालों सुत वरदानें[1];' पूर्वकथा सर्व कथियली वरदानें[2]. ।
सांगे तो; कन्या या नंदाची घेउनी, स्वतोक[3] न्याया. ॥ १४
प्राकृत शिशुसम, जावी शंका म्हणवूनि, होय; हित समजावी. ।
आज्ञावश्या मनिं घे; ऊचलुनी शौरि तो घनश्याम, निघे. ॥ १५
पूर्वींच अजन[4] माया, जे प्रोक्ता नंदमंदिरीं[5] जनमाया, ।
त्या समयीं जनिं[6] लाहे शुद्ध यशोदोदरांतुनी जनिला[7] हे. ॥ १६
ज्यासाठीं 'जनमो हे' देव म्हणे, तो तिणें सकळ जन मोहे. ।
जनतेला[8] निजलीला[9] मायापतिची कशी कळे निजलीला[10]? ॥ १७
कांडकटाहा न खरा भेदी लावूनि धाकटा हा नखरा. ।
बद्धद्वारां जवळी ये, तीं नुघडति कशीं महाराज बळी? ॥ १८
गळिजेलें कुलपांनीं; द्वारप[11] निजले जसे मदाकुल[12] पानीं[13]; ।
बहु तम; घन[14] तीव्र जनीं; केवळ हीना गमे वसुमती[15] व्रजनीं[16]. ॥ १९
छत्र अनंत[17] रमेनावरि[18] होय; त्यजुनियां अनंत[19] रमेना. ।
सद्भक्ताला भजनीं आवडि मोठी; नसे दुजा लाभ जनीं. ॥ २०
मिति नाहीं आवर्ती[20]; बहु मोठा पूर; जो नये आवर्ती[21]. ।
परम[22] कराला टाकी तीराबाहेरि समकरा[23] लाटा कीं. ॥ २१
परि ते यमुना सरिता[24] मार्ग करुनि दे व्रजाभिगमनास[25] रिता[26]; ।
सागरसेतूसरणी[27] जैसा दे दशमुखांतहेतूस[28] रणीं. ॥ २२
शौरि महानंदाच्या[29] कंदा ने, मग सुखें गृहा नंदाच्या. ।
करुनी तीव्र जवासी[30] गेला, पाहे न जागती व्रजवासी[31]. ॥ २३
नंदाची महिला[32] हे मायामुग्धा[33] श्रम प्रकाम[34] हि लाहे[35]; ।
प्रसवे; हो! तीस, 'मज प्राप्त सुता सुत,' असे न होती समज. ॥ २४
तच्छयनीं[36] निजलीलानरतनु[37] सुत ठेवि, न कळतां निजलीला, ।

---

१. वरदान दिल्यामुळें. २. कृष्णानें. ३ आपला मुलगा. ४. जन्मरहित. ५. नंदाच्या घरीं. ६. लोकीं. ७. जन्माला. ८. जनसमूहाला. ९. निजलेल्या. १०. आपली लीला. ११. द्वारपाळ. १२. मदानें व्याकुळ. १३. मद्यपानांनीं. १४. मेघ. १५. भूमि. १६. गमनीं. १७. शेष. १८. कृष्णावर. १९. कृष्ण. २०. वृष्टीला. २१. वारायास. २२. अलंत. २३. मगरांसहित. २४. नदी. २५. गोकुळास जाण्याकरितां. २६. मोकळा, २७. सागरांत सेतुरूपी मार्ग. २८. रामास. २९. महा आनंदाच्या. ३०. वेगासी. ३१. गोकुळवासी. ३२. स्त्री. ३३. भ्रमिष्ट. ३४. फार. ३५. लाभे, पावे. (याचा कर्ता 'नंदाची माया मुग्धा महिला.') ३६. तिच्या (नंदस्त्रीच्या) बिछान्यावर. ३७. आपुल्या लीलेनें नराची तनु (शरीर) धरिली ज्यानें असा.

तो दृढचित्त यदुहिता[1]; तीची ने निजगृहास निर्भय दुहिता[2]. ॥ २५
पूर्वस्थिति न बिघडली; जाणों होतीच ते, न हे नवि घडली; ।
चलन नसे कुलपाला, चरणयुगीं[3] शृंखळाहि यदुकुलपाला[4]. ॥ २६

---

## अध्याय चवथा.

ते नेल्या उपरि, सती[5] बाळध्वनि करि, तयास पाळ[6] परिसती. ।
ते कथिति निजवरा[7], ज्या गर्भजनिध्यास[8], त्या, करुनि जव[9], राजा. ॥ १
गर्भ दुराशय[10] नाशी, तैसा हा ही गणी; त्यजी शयनासी[11]. ।
धांवे मृगराज[12] वनेद्विपकलभावरि[13], जसाचि वारा जवन[14]. ॥ २
तो येतां माराया, बोले कंसासि शौरिरामा[15], 'राया!' ।
बहुदीनापरि, 'सून प्रभुजी! तुझि; कीं द्रवेल हें परिसून. ॥ ३
करुणा आचर; माझे बहु सुत वधिले; दिजे सुता चरमा[16] जे. ।
स्त्रीचा वध न बरा हो! वांचो. त्वत्पुत्र, तो इचा नवरा हो.' ॥ ४
तन्मन अशुभ द्रवलें न तदुक्तें[17]; तत्सुतेसि गतभद्र[18] वळे. ।
चरणीं धरुनी, चपळ क्रोधें ओढी; न राहुं दे नीच पळ. ॥ ५
ते पसरुनि 'आ' रडली भगिनी, जरि धाय[19] मोकलुनि आरडली, ।
न धरी पींड[20]; सखा तो व्याघ्र वृकाचाचि काय पोंडस[21] खातो! ॥ ६
येइल कां[22] पां याला करुणा? ते धरुनि कन्यका पायांला, ।
ऊचलुनी पात[23] शिलापृष्ठीं[24] करि कंस दिव्यरूपा[25] तशिला, ॥ ७
तों जाय नभा[26], उसळे; तेव्हां स्वमनांत देवकीभाउ[27] सळे[28]. ।
करुनि संभाजन[29] माये गाय[30], नमी, गगनिं सुरसमाज न माये[31]. ॥ ८
'स्वपदाला शिवला हो! तरि, दर्शनपात्र खळहि हा शिव[32] लाहो.' ।
हें माया भावी; जे दावी, ते दुःसहा निजा[33] भा[34] वीजे. ॥ ९

---

१. यादवांच्या हितासाठीं. २. मुलगी. ३. दोहों पायांत. ४. वसुदेवाला. ५. माया. ६. द्वारपाळ. ७. आपल्या स्वामीस. ८. गर्भाच्या जन्माचा ध्यास. ९. वेग. १०. द्वाड आहे अभिप्राय म्ह० मन ज्याचें. ११. निजेला. १२. सिंह. १३. वनांतील हत्तीच्या छाव्यावर. १४. वेगवान. १५. वसुदेवाची स्त्री. १६. शेवटची सुता म्ह० कन्या. १७. तिच्या बोलण्यानें. १८. हतभाग्य. १९. ओरडाओरड. २०. विशाद. २१ पिलें. २२. कां बरें? २३. पतन. २४. दगडावर. २५. दिव्य आहे रूप जीचें. २६. आकाशांत. २७. कंस. २८. रागावे. २९. पूजा. ३०. याचा कर्ता 'सुरसमाज' म्ह० देवांचा समूह. ३१. मावे. ३२. कल्याण. ३३. आपली. ३४. प्रभा. (कांति.)

[1]दिव्यशरीरा, [2]हेतिप्रवराष्टभुजा, [3]नभोंतरीं राहे ती. ।
[4]सद्रत्नकलाप तिचे भासति घडिले [5]दिवाकरकलापतिंचे. ॥ १०
बोले ते [6]असुरा या, '[7]कृपणांचे हरिसि कां वृथा [8]असु? राया! ।
जेणें तुज नाश, मला ठावा तो; वाढतो; न कुजना! शमला.' ॥ ११
बोलुनि [9]सहसाम [10]हितां, देवी तेथूनि जाय [11]सहसा [12]महिता. ।
राहे [13]नैकनिकेतीं, धरि नामें बहुत, देति लोक [14]निके तीं. ॥ १२
विस्मित कंस हि परते; समजावी [15]स्वस्वसा [16]सुदेवनपर ते. ।
'गमली सत्य [17]नभोगी; चुकलों; मन्मनहि काय ताप न भोगी? ॥ १३
नरचि न बोलति लटिकें हें कळतें, तरि मनीं न बोल [18]तिळें टिके; ।
सत्य म्हणति संत [19]तिळां, यास्तव संहारिलें तुझ्या संततिला. ॥ १४
[20]हां [21]शिशुसा भावो जी! मना; तुम्ही पितर; न स्वसा भावोजी. ।
[22]संततिघातकरासी रक्षा; मी [23]सर्वथैव पातकराशी.' ॥ १५
करि सांत्वन; बुधरीती, जे कविशोकाग्नि[24]शमकांबु, धरी ती. ।
त्या दोघांला विनवी, बंध निवारूनि; आवडी लावि नवी. ॥ १६
नमुनि शिरीं पद, 'राशी अपराधांचा' म्हणे, पसरि पदरासी; ।
द्वेष मनांतिल सरला; वृत्ति तयाची विलोकिली बहु [25]सरला. ॥ १७
[26]आनकदुंदुभि याला समजावी, कीं [27]स्वकर्मविदु भियाला ।
हा; '[28]विधिनेमें; उगे हा' म्हणतां तो जाय होउनी मउ [29]गेहीं. ॥ १८
मग कंस, सखे मंत्री जे [30]सुररिपु मूढ खळ, तयां [31]आमंत्री. ।
त्यांला सांगे व्यथित [32]स्वांतें तें सर्व [33]योगनिद्राकथित. ॥ १९
ऐकुनि, सर्व [34]कुकवि ते झाले त्या कुमतिला कुमंत्र शिकविते. ।
पूर्णाचि [35]अमा त्यांहीं करिजेत्ये अंधभूपति[36]अमात्यांहीं. ॥ २०

---

१. दिव्य (देवांसारिखें) आहे शरीर जीचें. २. श्रेष्ठशस्त्रीं युक्त आहेत अष्टभुज जीचे. ३. आकाशीं. ४. चांगल्या रत्नांचे दागिने. ५. सूर्यचंद्रांचें. ६. कंसाला. ७. गरीबांचे. ८. जीव. ९. सामासह. १०. हिताला. ११. एकदम. १२. पूज्य. १३. अनेक स्थळीं. १४. चांगले. १५. आपली बहीण. १६. शोकांत गुंतलेली. १७. आकाशवाणी. १८. तिलमात्रहि. १९. आकाशवाणीला. २०. मी. २१. मुलासारिखा. २२. संततीचा घात करणारास. २३. सर्वप्रकारें. २४. शांत करणारें उदक. २५. सरळ. २६. वसुदेव. २७. आपलें कर्म जाणणारा. २८. प्रारब्धाचा नियम. २९. घरीं. ३०. देवांचे शत्रु. ३१. बोलावी. ३२. दुःखित अंतःकरणानें. ३३. मायेनें सांगितलेलें. ३४. कुज्ञानी. ३५. अमावास्या. ३६. प्रधानांनीं.

'बाहिर आंत [1]दशाहा, ते [2]शिशु मारूं; नभोजि[3]तत्रिदशा ! हा ।
प्रथमोपाय सुनय; न व्यभिचार फळीं, पहा तुम्ही हि [4]सुनयन. ॥ २१
हरि, हर, शक्र, [5]शतधृती यद्यपि तुझिया भयें सदा [6]विगतधृती, ।
करिती [7]रिपुगद हानी [8]समुपेक्षित,' निवडिलें असेंच दहांनीं. ॥ २२
'देवाचें मूळ हरी तेथें धर्म हि; न भिन्न सिंधूलहरी; ।
त्या धर्माचें [9]प्रसवस्थान [10]तपःश्रुतिसमूह, गो,[11] विप्र, [12]सवे. ॥ २३
राहें स्वस्थ [13]नयज्ञा ! जे करिती [14]सविधि [15]धर्मजीवन यज्ञा, ।
गोवेद[16]तपोनिलय ब्राह्मण, त्यांचा बळेंचि साधूनि [17]लय, ॥ २४
तप, दम, गो, विप्र, शम, [18]श्रद्धा, [19]क्रतु, सत्य, सुर, दया, [20]रुट्प्रशम, ।
हरिच्या तनु अकरा या, आज्ञा दे यांचिया क्षयास कराया. ॥ २५
हरि [21]सर्वगुहाशयन; ग्रहणीं त्याच्या बळी तुझा हा [22]शय न. ।
करणें [23]तन्नाश मनीं; आज्ञा आम्हांसि दे ऋषींच्या [24]शमनीं.' ॥ २६
ऐकुनि दानवनि[25]करा, कंस म्हणे, 'जा, [26]गतद्विजा [27]अवनि करा.' ।
मग तो गोविप्रांसी, विस्तारुनि कपटपाश, गोवि,[28] [29]प्राशी. ॥ २७
ते दानव [30]अहितमती, जनपीडक, भीति[31]दाकृती, [32]अहि तम ती ।
वधुनि [33]सदध्व जनास, प्रेक्षिति[34] साधावया [35]खगध्वजनास. ॥ २८
धरुनी [36]सदसद्वेष छळिती दाटूनि साधु सदसद्द्वेषे[37] ।
जोडिति [38]अघ [39]पृथु; कां तें कल्याण करील मारितां [40]पृथुकांतें ? ॥ २९

## अध्याय पांचवा.

[41]साधूत्तम हा नंद [42]स्वात्मजजन्मीं धरूनि [43]सुमहानंद, ।
मग बोलावुन मुनितें, करवि सविधि जातकर्म त्यास नमुनि तें. ॥ १

१. दहा दिवसांचे. २. मुलगे. ३. जिंकिलें आहे देवांस ज्यानें. ४. चांगले आहेत डोळे ज्याचे. ५. ब्रह्मा. ६. धैर्यहीन. ७. शत्रु आणि रोग. ८. उपेक्षिलेले. ९. जन्मस्थल. १०. तप आणि वेदसमूह. ११. गाई. १२. यज्ञ. १३. राजनीति जाणणाऱ्या. १४. विधीनें. १५. धर्माचें संरक्षण. १६. गाई, वेद, आणि तप यांचें स्थान. १७. नाश. १८. विश्वास. १९. यज्ञ. २०. क्रोधशांति. २१. सर्व हृदयांत आहे शयन ज्यास. २२. हात. २३. त्याचा (हरीचा) नाश. २४. मर्दनीं. २५. समूहास. २६. नष्ट झाले आहेत ब्राह्मण जिजमधून. २७. पृथ्वी. २८. बांधी. २९. भक्षी. ३०. दुष्टवासनेचे. ३१. भयंकर आहे आकृति ज्यांची. ३२. सर्प. ३३. सन्मार्गी. ३४. पाहती. ३५. गरुडध्वज हरीचा नाश. ३६. साधूंचा आणि असाधूंचा वेष. ३७. द्वेषी. ३८. पातक. ३९. मोठें. ४०. मुलांस. ४१. साधूंत उत्तम. ४२. आपल्या मुलाच्या जन्मकालीं. ४३. उत्तम व मोठा आनंद.

विप्रांतें मोदानें[१] दे सालंकार[२] लक्षयुग[३] गोदानें[४]. ।
गाती गायक तानें[५], जनमनधन जें[६] हरूनि, आयकतां, नेः ॥ २
दुंदुभिच्या[७] ध्वानांहीं[८] गणिला[९] पृथुकुक्षि[१०] तो सुराध्वा[११] नाहीं. ।
वाल्मीक्यादि[१२] कवि नयें स्तविती ते; सूत, बंदि, मागध विनयें. ॥ ३
विप्रमुखीं स्वस्ति[१३]; मितप्रद[१४] सुरतरु[१५] धरुनि राहिले स्वः[१६] स्तिमित[१७]. ।
न लजति कामितदाते[१८] ब्राह्मणवृंदा[१९] समस्त कां मितदाते ? ॥ ४
त्या उत्सव वहल[२०] दिनीं; कीं माखिति निज पशूहि तेलहळदिंनीं ।
व्रजजन; नंद नवनवा करि हर्ष; तसा न नाक[२१], नंदन वन वा[२२]. ॥ ५
व्रज पशुपालांस[२३] मुदावह[२४] वैकुंठापरीस झाला समुदा[२५]; ।
गोकुळशोभारतिचें[२६] वर्णन मन लाजवील हो भारतिचें[२७]. ॥ ६
येतांचि रमानवरा, व्रज पावे त्रिभुवनांत चिरें[२८] मान वरा[२९]. ।
जनजननवासर[३०] हा सकळर्धींतें[३१] म्हणे, 'करा वास, रहा.' ॥ ७
नोहे सोपा यजना[३२] योगा, घोषांत[३३] दावि तो पाय जना; ।
संसृतिच्या[३४] जो पारा नेता, गवळ्यांस जाहला सोपारा. ॥ ८
व्रजपालाजिर[३५], वाणें आणुनि, जैं भरिति युवति[३६], लाजिरवाणें ।
तैं मुख करि नाकवर[३७]; त्रिजगांतहि गोपजातिचें नाक वर ! ॥ ९
मानुनियां परम हिता, गोपी आल्या प्रहर्षतत्पर महिता[३८]. ।
दृष्टि हरिति विश्वाची; लाजति रंभा[३९] तिलोत्तमा[३९] विश्वाची[३९]. ॥ १०
देति हरिस परमाशी[४०]; दृष्टि जडे तेथ जशि सितापर[४१] माशी. ।
त्या कोकिलगल सकला[४२] गाती नंदात्मजासि मंगल सकला. ॥ ११

---

१. आनंदानें. २. अलंकारांसहित. ३. चार लक्ष. ४. गाईंचीं दानें. ५. गाण्यांतील सूर. ६. गायन. ७. नगाऱ्याच्या. ८. नादांनीं. ९. मानिला. १०. मोठें आहे पोट ज्याचें. ११. आकाश. १२. वाल्मीकि इत्यादि कवी. १३. कल्याण. १४. थोडकें देणारे. १५. कल्पतरु. १६. स्वर्ग. १७. निश्चल. १८. इच्छित देणारे. १९. ब्राह्मणसमूहास. २०. फार. २१. स्वर्ग. २२. अथवा. २३. गवळ्यांस. २४. आनंददायक. २५. सगळा (समुदा=समदा हा कुळवाडशब्द आहे). २६. गोकुळांतील शोभारूपी रतीचें. २७. सरस्वतीचें. २८. नेहमीं. २९. बरा. (संस्कृतांत 'ब' आणि 'व' यांत भेद मानीत नाहींत.) ३०. कृष्णजन्मदिवस. ३१. सर्वसमृद्धींतें. ३२. यज्ञास. ३३. गोकुळांत. ३४. संसाराच्या. ३५. नंदाचें अंगण. ३६. बायका. ३७. इंद्र. ३८. पूज्या. ३९. देवांगनाविशेष. ४०. मोठमोठे आशीर्वाद. ४१. साखरेवरची. ४२. कलायुक्त.

बहुतचि कुतूहल[1] दिनें त्या, गोपी स्नेह[2]सद्रसार्द्र[3] हळदिनें ।
सिंचिति गोप समुदया, पावलिया अतुळहर्ष भाग्य समुदया[4]. ॥ १२
सिंचिति गोप समुदित प्रेमें अन्योन्य भूरि[5] गोरस मुदित[6]. ।
दधिदुग्धघृतोदानीं व्रज कीं आलिंगिला महा मोदांनीं. ॥ १३
अभिमत दान वितरणीं अदेय कां? हीं यशें तदा नवि तरणीं. ।
वर्णें गौर वियाला नंद; सकळ साधुलोक गौरवि याला. ॥ १४
वार्षिककरवसु[7] देवा[8] कंसा दे नंद, भेटही वसुदेवा. ।
क्षणमात्र सखे दमन क्लेशाचें करिति, बोधुनि सखेद मन. ॥ १५
शौरि वदे, 'स्थविरतमीं[9] तुझिया ठायीं प्रजा[10]! सुखी अविरत[11] मी. ।
सुत सुखहेतु, जतन या करिं; भाग्यें करुनि गांठि हे तुज तनया.' ॥ १६
नंद म्हणे, 'अहितांनीं[12] तूं तप्त सख्या! नृपाळ हा अहि[13]; तानीं ।
बाळें वधि; मग तनया आठवि; या न भय, न त्रपा विगतनया[14].' ॥ १७
सुखदुःखें विधिजनितें जाणे जो, कीं विवेकनीरधि[15] जनिं तें ।
दैव न तन्मन मोही, न दुज्या[16], करुं त्यासि सप्त जन्म नमो ही. ॥ १८
मग सहसा, 'गेहातें जा,' ऐसें यासि शौरि सांगे; हा तें ।
समजुनि नंद निघाला, कीं भावी[17] सुचविला स्वनंदनिं घाला. ॥ १९

---

## अध्याय सहावा.

हरिसि म्हणे कातर[18] तो, 'देवा! त्वच्छरण[19] दुःखशोका तरतो. ।
भजकसुगमसंताना[20]! विघ्न न बाधो व्रजांत मम संताना.' ॥ १
साधाया क्षिप्र[21] हिता, कंसानें बाळघातिनी जी प्रहिता[22], ।
ते पूतनिका[23] सखि[24], ती राष्ट्रांत फिरे, छळे, मुलांला वधिती. ॥ २
ते मृत्यूची आली[25] शिशुमारी एकदा व्रजाला आली. ।
शोणित[26]रुचिरत नुसती, धरि मायेनें वरीच रुचिर[27] तनुस ती. ॥ ३

---

१. कौतुक. २. तेल; (पक्षीं) प्रीति. ३. भिजलेलें. ४. अनुपम हर्ष आहे ज्यांत अशा भाग्याचा उत्कर्ष. ५. पुष्कळ. ६. आनंदित. ७. द्रव्य. ८. राजाला. ९. वृद्धतमीं. १०. संतति. ११. निरंतर. १२. कंसाच्या प्रतिकूळ कृत्यांनीं. १३. सर्प. १४. न्यायभ्रष्टास. १५. समुद्र. १६. 'दुजा' असाही पाठ आहे. १७. होणारा. १८. भ्यालेला. १९. तुला शरण आलेला. २०. हे भक्तांस सुलभ अशा कल्पतरो! २१. लवकर. २२. पाठविलेली. २३. पूतना. २४. पटकी. २५. सखी. २६. रक्ताच्या गोडींत मग्न. २७. सुंदर.

[1]उल्लसमानवपु सती देखुनि, चकित स्त्रिया, न मानव पुसती. ।
मानिति कीं, अमरमणी [2]हरि, शोधी त्यासि हे [3]तदुत्तमरमणी. ॥ ४
लावण्याचे [4]सरिते, माय यशोदा हि रोहिणी दूसरि ते, ।
वारूं न शकति कोणी. चकितमनें त्या उग्याचि बैसति [5]कोणीं. ॥ ५
निजगुण [6]खरतर [7]वारी, सौंदर्यें [8]कोशगत जशी तरवारी. ।
पावे श्रीहरि, [9]पाशीं बांधुनि नेली मृगी जशी [10]हरिपाशीं. ॥ ६
[11]भस्मच्छन्न [12]अनलसा शिशु तनु पाहे निजात्मघाति [13]अनलसा. ।
घे अंकीं[14] [15]कितवमती; स्तन जीचे [16]गरळ कुंकुमांकित वमती. ॥ ७
द्याया हा रस, मतिनें गणिला [17]शिशुकाळसर्प हारसम तिनें. ।
जेणें क्षणहि न तगती प्राण, [18]विषस्तन्य तें हि घे [19]विनतगति. ॥ ८
दे विष यद्यपि याला, हरि तें, मानूनि अमृत[20]हृद्य, पियाला. ।
घे गरळाच्या रुचितें; जननीवेषें [21]सुमंगला [22]चारुचि तें. ॥ ९
दे जरि उग्र विष, महा सदय मुकुंद स्वयें न होय विषम हा. ।
वदनीं मारक थानें धरिलीं [23]श्रुतिगीतपूतसारकथानें. ॥ १०
मुखिं धरुनि कुचघट, [24]घटात्मजसा तज्जीवनासि सेवि घटघटा; ।
वरुनी भू नितळ [25]मळप्रकृति करि 'पुरे ! पुरे !' म्हणोनि तळमळ. ॥ ११
करि बहुपरि [26]देवन, 'हा !' म्हणत रडे, [27]स्तन्यतृप्त परि देव न हा. ।
वर्णें अभ्र, मुरडतां प्रकृतिकडे, भासली हि अभ्रमु रडतां. ॥ १२
झाली ते [28]असुरहिता, बालग्रह, कुमति, पूतना [29]असुरहिता. ।
पसरे [30]वपु सा [31]क्रोशीं; व्रज होय भयें करूनि बहु [32]साक्रोश. ॥ १३
पडतां, तीव्र [33]जवासी वारुनि, रक्षी जगत्पति [34]व्रजवासी. ।
लोक सकळ कांपविला; तनु गिरिला लाजवी; प्रभु न कां [35]पविला ? ॥ १४

---

१. सुंदर आहे शरीर जीचें. २. विष्णु. ३. लक्ष्मी. ४. नदीस. ५. कोपऱ्यांत. ६. फार तीक्ष्ण. ७. लपवी. ८. म्यानांत झांकलेली. ९. पाशांत, जाळ्यांत. १०. सिंहाजवळ. ११. राखेंत झांकलेला. १२. अग्नीसारिखा. १३. आळस नाहीं अशी. १४. मांडीवर. १५. दुर्मति, दुष्ट बुद्धि आहे जीची. १६. विष. १७. लहान काळा सर्प. १८. विषयुक्त दूध. १९. नम्राची (शरणागताची, गतिच असा. (कृष्ण). २०. मधुर. २१. कृष्णास. २२. सुंदरच. २३. वेदांनीं गायिल्या आहेत पवित्रसार (पवित्र आहे सार ज्यांचें) कथा ज्याच्या अशानें. (कृष्णानें). २४. अगस्तीसारिखा. २५. मलिन आहे प्रकृति म्ह० स्वभाव जीचा. २६. शोक. २७. स्तनांतील दुधानें तृप्त. २८. असुरांचें हित करणारी. २९. प्राणरहित. ३०. शरीर. ३१. कोश. ३२. आक्रोशासहित. ३३. वेगासी. ३४. गोकुळांतील लोक. ३५. वज्राला.

प्रथम व्रज हा केला मृतबधिरसमान[1], मारुनी हाकेला. ।
वर्णुनि काय कराल[2] क्रूरेचा, त्यजुनि देव, काय कराल? ॥ १५
होउनि सावध, जाया गोपांच्या कृष्णलालसा[3], वध ज्या या ।
दुष्टेचा सुकर[4], तिच्या उरिं देखति त्या निधीसि कौतुकरतिच्या. ॥ १६
स्वमनापरिस त्वरती[5] गोपी; सुखमूर्ति[6] काढिती सत्वर ती; ।
देती तज्जननिकरीं[7]; झाला आनंद बहुत सज्जननिकरीं[8]. ॥ १७
जें विघ्नमशकचवरी[9], फिरविति गोपुच्छ अंगवदाकृतिच[10] वरी. ।
शिंपुनि गोमूत्रा, त्या न्हाणिति भवभंजना[11], सुरेचमूत्राल्या[12]. ॥ १८
जो भगवान् कृत्स्नपिता[13], तत्तनु ते गोरजःसमूहस्नपिता[14], ।
गोमय गोधूलीला धरि; तीची या मनासि शोधूं[15] लीला. ॥ १९
स्त्री म्हणति, 'सुरक्षण हो[16],' विसरति ज्या स्वकवचास न सुर क्षण हो ! ।
ज्यांहीं बहु भव तरले, चरणप्लव[17] ते न जाणती अवतरले. ॥ २०
व्रजदेवीजन्यास[18] स्वस्ति[19] घडाया, अजादिबीजन्यास[20] ।
अंगीं सविधि करीती; चित्त हरी गोपयुवतिकौतुकरीती[21]. ॥ २१
त्या कौतुकजनकवचा[22] स्त्री गोपांच्या, स्वयें महाजनकवचा[23] ।
तन्नामें जगरा[24] या लेवविती, हांसविति मनीं जगराया. ॥ २२
त्या गोपीकृतकवचा[25], स्तन पाजुनि, नंदगेहिनी[26] धृतकवचा[27] ।
निजवी सप्रेम; निजे, ब्रह्मादिक सत्वमूर्ति चिंतिति मनिं जें. ॥ २३
नंदहि येतां पाहे, तों मार्गीं तन्मनासि दे तापा हे.[28] ।
विस्मय होय समस्तां; म्हणती, 'कशि पावली अशीहि समस्ता[29] !' ॥ २४
'शौरि तपस्वी, ज्ञानी, पूर्वीं आम्हीं न जाणिला अज्ञांनीं[30]; ।
तत्कथितोत्पात[31] खरा झाला; वसुदेवबुद्धि मोठी प्रखरा[32].' ॥ २५

१. मेलेला आणि बहिरा असा. २. विक्राळ. ३. कृष्णाविषयीं उत्कंठा आहे ज्यांस. ४. सोपा. ५. त्वरा करती. ६. कृष्ण. ७. यशोदेच्या हातीं. ८. सज्जनांच्या समूहीं. ९. विघ्नरूपी माशा हांकून देण्यासाठीं चवरी. १०. कृष्णशरीरावर. ११. संसारनाशकास. १२. देवांच्या समूहास तारणाऱ्या. १३. सर्वांचा बाप. १४. गोरज:समूहें न्हाणलेली. १५. शुद्ध करूं. १६. होवो. १७. चरणरूपी नौका. १८. यशोदेच्या मुलास. १९. कल्याण. २०. अनादि नामाचा न्यास. २१. गोपींची कौतुकाची रीति. २२. कौतुक उत्पन्न करणारें वचन आहे ज्यांचें. २३. महा जनांचें कवच अशास. (कृष्णास). २४. कवच. २५. गोपींनीं केलें आहे कवच ज्याला. २६. यशोदा. २७. धरिलें आहे कवच ज्याणें अशास. २८. ही पूतना. २९. मृत्यूस. ३०. अज्ञान्यांनीं. ३१. त्यानें सांगितलेला उत्पात (धोका). ३२. तीक्ष्ण.

भिन्नाकार[1], पर शुनी[2] कर्मे रक्ताशिनी[3]; सुधार[4] परशुंनीं[5] ।
छेदुनि अवयव, रचिती बळशाली[6] गोप जाळिती प्रवर[7] चिती. ॥ २६
धूमीं सौरभ[8] अगुरुस्मयहर[9]; आश्चर्य काय? जो तीर्थगुरु[10], ।
तो हृदयीं बाळकसा अंतीं होता; न होय अघकाळ[11] कसा? ॥ २७
अतिदुष्टा पूतनिका; हरिनें दिधला स्वलोक परि पूतें[12] निका. ।
मानियली जननी ती; प्रभुची गाती म्हणोनी सज्जन नीति. ॥ २८
जे बाळकतिलघाणी[13], तीची जळतांहि कोण घेतिल घाणी? ।
जो तो सुरभि[14] मधु पसा घ्राण पसरि, पी; गमेची गोप मधुपसा[15]. ॥ २९
म्हणति, ‘नसे परिमल यासम, यद्यपि चंदनप्रभव[16], परि मलया[17]; ।
विस्मित, घेउनि वासा, नंदादिक गोप येति आत्मनिवासा[18]. ॥ ३०
येतां वसतिस, मस्तीं[19] नमुनि, पतिसि कळविलें स्ववृत्त समस्तीं. ।
सुतकुशळसमोदमना[20], विस्मितही, परिसतां तिच्या[21] तो दमना. ॥ ३१
पाहुनि तोक, मनीं या प्रोष्यागत[22] मानि नंद तो कमनीया[23]. ।
माथा हुंगुनि, बाला आलिंगुनि, पुण्यसिंधु फार निवाला. ॥ ३२

---

## अध्याय सातवा.

वधुनि बकी[24] कुशीला[25], प्रथमचि वळला जयीं मुकुंद कुशीला, ।
जन्मर्क्षयोगहि[26], तदा ते तिथि झाली व्रजास केवळ हितदा. ॥ १
उत्सवपरमानस[27] ती माता बाहे गृहा सबहुमान सती[28]. ।
न्हाणी स्वांगज[29]; रानें गाजति वाद्यांचिया महा गजरानें. ॥ २
ज्याची बरवी प्रकृती, मंगळ करिती मुलास वरं[30], विप्र, कृती[31]. ।
तो नेत्रांत निजेहा[32] दावी; जो पूरवी सुरद्रु[33] निजेहीं[34]. ॥ ३

---

१. आकार(शरीर)मात्र भिन्न. २. कुत्री. ३. रक्त खाणारी. ४. चांगल्या धारेच्या. ५. कुऱ्हाडींनीं. ६. फार बलिष्ट. ७. मोठ्या. ८. सुवास. ९. चंदनाचा गर्व हरण करणारा. १०. तीर्थपिता हरि. ११. पातकाचा नाश. १२. पवित्र; चांगला. १३. बाळकें हेच कोणी तीळ त्यांचा घाणा अशी. १४. सुवास. १५. भ्रमरासारिखा. १६. चंदनास उत्पन्न करणाऱ्या. १७. मलयपर्वतास. १८. आपल्या घरीं. १९. मस्तकांनीं. २०. मुलगा कुशल आहे म्हणून आनंद आहे मनास ज्याच्या. २१. पूतनेच्या. २२. पुनः (मृत्यूपासून) आलेला. २३. सुंदरास. २४. पूतना. २५. दुष्ट आहे स्वभाव जीचा. २६. जन्माचें नक्षत्र आणि योग. २७. उत्सवी आहे मानस जीचें. २८. स्त्रिया. २९. निजपुत्र. ३०. श्रेष्ठ. ३१. चतुर. ३२. निजेची इच्छा. ३३. कल्पतरु. ३४. निजजनांची इच्छा.

[1]शकटाखालें काला बकीचिया, मूर्तनिजसुखा, लेंकाला ।
[2]प्रेंखीं [3]मृदुलास्तरणीं निजवुनि, माता निघे [4]जनेष्ट [5]वितरणीं. ॥ ४
स्वकरें [6]सांगोपचिती करि, सुखवी विप्र [7]बल्लवी, गोपचि ती. ।
सकळां गौरवि; सरली न सुहृज्जनमंडळी; न पुत्र विसरली? ॥ ५
तों उठला [8]विभु; केला त्याग निजेचा; प्रसू बलावि [9]भुकेला. ।
करि बहु रोदन; पर ते ऐकेना गडबडींत माय; न परते. ॥ ६
रडतां [10]पदयुगलीला झाडी तो, तीहि दावि [11]संयुगलीला, ।
ध्वंसेना शकट कसें? [12]तत्पविचक्रीं रणीं [13]पलाशकटकसें. ॥ ७
शकटध्वंसें नवल व्रज करि, कीं ठावुकें शिशूचें न बल. ।
बाळक [14]तन्निकटग, ती कथिती नंदादिकांप्रती प्रकट गती. ॥ ८
'करचरणाला रडतां, झाडित असतां, कुमार बहु आरडतां, ।
शकटास उघड घडला [15]पदनखरस्पर्श, तोंचि हा घडघडला.' ॥ ९
वाणी विश्वा [16]साची त्या बाळांची, जशी शुकाव्यासाची; ।
[17]वाणी विश्वासाची घोषीं[18]; मायाचि हे [19]रमावासाची. ॥ १०
जननी धरि [20]तोकास खउरीं; ज्याची [21]मुमुक्षु धरितो कांस. ।
मुनि, 'सर्वस्व उरो जें,' म्हणति तयालागिं तोषवी स्व[22]उरोजें! ॥ ११
[23]स्वस्त्ययनादि करीती ज्ञाते, [24]सद्विप्र, शुद्ध, वैदिकरीती. ।
[25]स्वकुशलसंजननमुनींप्रति दे व्रजपाळ वस्त्र, गो, धन, नमुनी. ॥ १२
निजसुखदा, या [26]दासस्वस्तरुस, [27]व्रजपदार [28]दायादास ।
अंकावरि खेळवि ती एकाकाळीं, [29]यदंघ्रि बहु खेळ विती. ॥ १३

---

१. गाड्याखालीं. २. पाळण्यांत. ३. बिछान्यावर. ४. जनांस इष्ट. ५. दानीं. ६. सर्वविध पूजा. ७. गोपी. ८. कृष्ण. ९. भूक लागली आहे ज्यास. 'बलावी' याचा कर्ता 'विभु.' १०. दोन्ही पायांला. ११. युद्धलीला. १२. त्याच्या वज्रानें व चक्रानें. १३. मांसभक्षकांच्या (राक्षसांच्या) सैन्यासारिखें. १४. त्याच्या (कृष्णाच्या) जवळ होतीं तीं. १५. पायांच्या नखाचा स्पर्श. १६. खरोखर, सत्य. १७. कमताई. १८. गोकुळीं. १९. कृष्णाची. २०. मुलास. २१. मुक्तीची इच्छा करणारा. २२. स्तनानें. २३. कल्याणाचें प्रकरण इत्यादि. २४. उत्तम विप्र. २५. आपल्या कुशलाची उत्पत्ति आहे ज्यांपासून. २६. भक्तांच्या कल्पतरूस. २७. यशोदा. (व्रज-प-दार म्ह० नंदाचे दार (स्त्री); 'दार' हा शब्द पुल्लिंगी असून अनेकवचनी आहे, असें असतांही, अर्थ 'एक स्त्री' असा होतो.) २८. मुलास. २९. ज्याचे पाय.

तों सुगुरुवपु[1] त्रासप्रद[2] होतां, उतरि भूमिवरि पुत्रास ।
नंदवधू; करि हरिचें[3] चिंतन भीत्युपशमार्थ[4] भवकरिहरिचें[5]. ॥ १४
इंदीवरदामनिभें[6] उपजविलें तनुभरें[7] यशोदामनिं भें[8]; ।
कीं येतां सदराती[9], पावेल, विलोकितांचि त्यास, दरा[10] ती. ॥ १५
सुचवी गृहकृत्य जिला, तीणें तेथेंचि तो रमेश त्यजिला. ।
तों ये ते वाहुटळे, नयन न झांकी, न हा महाबहु टळे. ॥ १६
दैत्य महामायावी, हरिवधकीर्ति स्वकीयधामा[11] यावी, ।
म्हणवूनि, तृणावर्ता[12] दवसा[13], ये; जय गमे मनिं तृणावर्ता. ॥ १७
बहु पीडा दे वात्यारूपें[14] खळ तो व्रजास; मग देवा त्या ।
हरुनी गगनिं पळाला, जैसा घेऊनि जाय गृध्र पळाला[15]. ॥ १८
गोपवधू लीना, कीं भरली नेत्रीं, मुखींहि, धूली नाकीं. ।
त्यांत म्हणे ‘ओ,’ वाळू; या समया प्रळयकाळही ओवाळू. ॥ १९
होय दिवस रजनि[16]; पटप्रावृत[17] झाल्या दिशा, असें रज[18] निपट[19]; ।
न स्मरवि स्ववपुस ती वेळा; कोणासि कोण बांधव पुसती? ॥ २०
कल्पान्तचि केवळसा, एक मुहूर्त व्रजांत ठाके वळसा[20]. ।
जनता[21] स्वस्थितिला[22], हे नंदाची परि सुतास न युवति लाहे. ॥ २१
निजसुतशोकाकुळ[23] ती नंदवधू बहु रडे, करी काकुळती; ।
कीं स्थानींच नग[24] वसे, कृपणा दे ताप; चोरि नीच, न गवसे. ॥ २२
न पडे जननीस कळ; व्रजयुवती मिळति नंदसदनीं सकळ. ।
रडति जशा कुररी[25], ती वदवेना शोकविषनगांकुररीती[26]. ॥ २३
तो केवळ वळसाची; ते झष[27] जीवनविहीन[28]; वळवळ साची. ।
गोपी बहु तळमळती, लोळति धूळींत, रम्य कुंतळ[29] मळती. ॥ २४

---

१. बहु जड असें शरीर. २. त्रास देणारें. ३. ईश्वराचें. ४. भयाच्या नाशासाठीं. ५. संसाररूपगजाविषयीं सिंहच अशा (हरीचें). ६. इंदीवराच्या (कमलाच्या) माळेसारिखा असा जो कृष्ण त्याणें. ७. शरीराच्या जडत्वानें. ८. भय. ९. सद्द्वेष्टा. (तृणावर्त). १०. भयास. ११. आपल्या घरीं. १२. गवतावर. १३. पेटलेल्या अग्नीसारिखा. १४. वावटळेच्या रूपानें. १५. मांसास. १६. रात्र. १७. वस्त्रानें झांकलेल्या. १८. धुळीचे कण. १९. दाट. २०. वावटळेचें भ्रमण. २१. लोक. २२. ‘लाहे’ हें क्रियापद अध्याहृत घेतलें पाहिजे. २३. सुतशोकानें व्याकुळ. २४. दागिना. २५. पक्षीविशेष. २६. शोकरूप विषवृक्षाच्या अंकुराची तऱ्हा. २७. मासे. २८. पाण्याशिवाय. २९. केश.

क्रमितां गगनपथ, कला वेगाची क्षीण होय; निष्कृप[1] थकला. ।
नुचले धृतगरिमा[2]; या मूढाची काय वीर्यसागरिं[3] माया? ॥ २५
त्या कृतकपटा[4] काया न वहावे, योजितो अकूप टाकाया; ।
भुवनपरिवृढ[5] गळाला धरि, तों सहनयन देह सदृढ गळाला. ॥ २६
कां करिल असत्य जुनी निज प्रतिज्ञा प्रभू? तयास त्यजुनी. ।
आंवळिलें खळनरडें; कीं व्रज पावेल भीति पुष्कळ, 'न रडें.' ॥ २७
तो निश्चेष्टवपु[6] रसा[7] वरि, हरशरदीर्ण[8] वेदशात्रव[9] पुरसा. ।
पातकरूपा, डिखळापरि, दैत्यांतक[10] शिळातळीं पाडि खळा. ॥ २८
हृदयावरि हरि खचला; खळनाशें धरुनि गोपिका हरिख[11], 'चला, ।
पाहों,' म्हणवुनि जवना[12] धांवति, चिंतीत चित्तमीन[13]निजवना. ॥ २९
तों दैत्यकलेवर[14] तें पडलें, धरुनि स्व[15]जीवनकले वरतें. ।
पायांचा उर लाहो घे, म्हणवुनि तोहि कंठही उरला, हो. ॥ ३०
व्रजयुवति सकळ वळल्या, तदुरीं[16] पाहोनियां हरिस, कळवळल्या. ।
उचलुनि शवावरुनी[17] घेति, न योगादिकीं अनिश[18] वावरुनी. ॥ ३१
देती त्या जननीला[19]; ती घेवुनि पोटिशीं धरी घननीला. ।
जगदीशा नंद नमी, म्हणे, 'पुनर्जात लाधलों नंदन मीं.' ॥ ३२
इष्टयजनतपदानें[20], भूतदयातोषितें[21], सुरनतपदानें[22] ।
निज जननिपरिच याला रक्षियलें, स्मरुनि पूर्विल परिचयाला. ॥ ३३
'दैत्यशिशू लपवीला; या संरक्षेपुढें[23], त्रिशूलपवीला ।
विष्णो! त्वज्जन न भिये; त्वत्पदता सत्य वदति सज्जन नभि ये. ॥ ३४
जन हिंसापापरता हिंसक न दुजा तदीय पापापरता. ।
स्वसमत्वें हानि भला पावे न कधीं, तसाच शिशु हा निभला[24].' ॥ ३५
बहुत बृहद्वन[25]वसतीमाजि अशीं अद्भुतें जयीं जयिं दिसती, ।

---

१. निर्दय तृणावर्त. २. धारण केला आहे जडपणा ज्याणें असा. (कृष्ण.) ३. बळसागरीं. ४. केलें आहे कपट ज्याणें. ५. भुवनाचा प्रभु. ६. निचेष्ट आहे शरीर ज्याचें. ७. पृथ्वी. ८. सांबाच्या शरानें चूर्ण. ९. वेदशत्रु. १०. दैत्यनाशक कृष्ण. ११. आनंद. १२. वेगवती. १३. चित्तरूपी माशाच्या पाण्यास. (कृष्णास.) १४. दैत्याचें शरीर. १५. कृष्णास. १६. तृणावर्ताचे उरीं. १७. मढ्यावरून. १८. नेहमी. १९. आईला. २०. यज्ञ, कर्म, तप, दान हीं इष्ट म्ह० आवडतात ज्याला. २१. भूतदयेनें तोषित (तृप्त) अशानें. २२. देवांनीं नमिलें आहे पद ज्याचें. २३ संरक्षण २४. वांचला. २५. बृहद्वनांत राहत असतां.

मानी वसुदेवाचे, विस्मित होऊनि, नंद तो मनिं वाचे. ॥ ३६
पाजियलें कुरवाळी एकासमयीं स्वतोक लेंकुरवाळी, ।
पाहे [1]मुखराजीवा, ज्याचा दे सुख अनंत [2]मुखरा जीवा. ॥ ३७
पी सादर मूल कुच; प्राशी [3]मुखरुचिस [4]गोपपतिवधू; [5]लेंकुच ।
अमृतरस; न दे वमनीं चित्त रसिक पद रुचे तिस तदेव मनीं. ॥ ३८
'[6]विधु! तुझि हे तुच्छ, विरे न [7]जड, [8]निशाल्पद्रवैकहेतु [9]छवि रे! ।
जितुनि तिसहि पळवि रवी; '[10]हरिमुखविधु अजित, [11]कठिनहृदुपळ विरवी!' ॥
ये [12]जृंभा, मुख [13]विकसे, [14]ब्रजदेवीपुण्यदृष्टिला सुखवि; [15]कसे ।
ते [16]उत्सवदालोक, [17]प्रतिकूल प्रगट होति चवदा लोक. ॥ ४०
झांकि न मग कां पदरीं [18]पक्ष्मीं नयनें? तनु प्रकटि कांप [19]दरीं. ।
परि तत्काळ विसरली; माया स्नेहीं स्मृतीस कालवि; सरली. ॥ ४१

## अध्याय आठवा.

वसुदेवोक्तें [20]भर्गप्रतिम, ज्ञानी, विवेकें[21]जितषड्वर्ग, ।
प्रेमभरें, [22]अपवर्गप्रदपद देखावया, ब्रजा ये [23]गर्ग. ॥ १
विप्रोत्तम हा नंदें पूजियला सविधि, नमुनि [24]महानंदें; ।
[25]नामकरण त्याकरवीं पुत्राचें गुप्त [26]उक्तरीत्या करवी. ॥ २
भूतभविष्यत्कथन प्रकट करी; परि न तो [27]रहस्यविमथन; ।
जें प्रभुला संमत न, व्यक्त न बोलोनि, तत्व केलें जतन. ॥ ३
'संकर्षण, राम, बळ, [28]ज्येष्ठाख्या; हा [29]द्विषज्जनविरामबळ. ।
दुसऱ्यास [30]सुखनिधानें कृष्ण, तथा वासुदेव, हीं [31]अभिधानें. ॥ ४
[32]शुचिगुणकृत्यनुरूपें तव पुत्राचीं अनंत नामें; रूपें ।
मज, इतरांसहि [33]अकळें; हा सुत देइल तुम्हांसि कुशळें सकळें. ॥ ५

---

१. मुखकमळास. २. चेहरा. ३. मुखशोभेस. ४. यशोदा. ५. लिंबू. ६. हे चंद्रा ! (हें बोलणें यशोदेचें आहे ). ७. दगड. ८. रात्रीच्या वेळीं मात्र किंचित् द्रव उत्पन्न करणारी. ९. कांति. १० कृष्णमुखरूपी चंद्रमा. ११. कठीण अशा अंतःकरणरूपी दगडास. १२. जांभई. १३. उघडे. १४. यशोदेच्या पवित्र दृष्टीस. १५. ब्रह्मदेवासारिखे. १६. आनंद देणारी अशी कांति आहे ज्यांत. १७. भिन्न भिन्न. १८. पापण्यांनीं. १९. भयांनीं. २०. सांबासारिखा. २१. विवेकानें जिंकिलें आहे कामक्रोधादि सहा वैऱ्यांच्या समूहास ज्याणें. २२. मोक्ष देणाऱ्याचें (कृष्णाचें) पद. २३. गर्गऋषी. २४. मोठ्या आनंदानें. २५. नांव ठेवणें. २६. (शास्त्रांत) सांगितलेल्या रीतीनें. २७. गुह्याचें फोडणें. २८. वडिलाचीं नामें. २९. शत्रूंच्या बळाचा नाश करणारा. ३०. सुखठेवा. ३१. नांवें. ३२. शुद्ध गुण व कृति या अन्वयें. ३३. अपूर्व.

हा, साधुजनें त्रास त्यजिला, जोडुनि; तुझ्याहि निजनेत्रास ।
निववील; तोका [१]मखरा [२]श्रीच्या जप; [३]हो [४]अभीष्ट तो काम खरा. ॥ ६
सुत नारायणसम हा, [५]श्रीकीर्त्यनुभावसद्गुणावास महा. ।
हे भाग्यखनि, जतन या नंदा ! जीवापरीस करिं निज तनया.' ॥ ७
[६]भावुकहेतु कवि खरी वाणी बोले अशी सकौतुक; [७]विखरी ।
आशीर्वचनेंसुमनें जातां [८]सापत्यगोपतीवरि [९]सुमनें. ॥ ८
लागति रांगायाला, करिति चरित्रें कवीश्वरां गायाला, ।
ते दोघे भाउ; [१०]रंति व्रजनयनां देति, [११]नान्यशोभा उरति. ॥ ९
करिति उदार, [१२]कलीला नाशाया, [१३]प्रेक्षणीय [१४]दारक लीला. ।
हरिति मदभ्रम [१५]हेलामात्रें; सुख पावती [१६]अदभ्र [१७]महेला. ॥ १०
हळुहळु रांगति; लाजे श्री मनिं; देते मुनीश्वरां गतिला जे, ।
ते [१८]सदुदार करीती लीला गो[१९]ष्ठांत गोप[२०]दारकरीती. ॥ ११
लघु, मंजुलशीं जितकीं लेववीलीं भूषणें; मधुर [२१]शिंजितें कीं ।
ऐकुनि कुतुक मनीं या जननीच्या, देति करुनि गति [२२]कमनीया. ॥ १२
गमन [२३]त्रिचतुरपद, कीं भूषवितो भूमिनवरि सुचतुर पदकीं. ।
लघु गति करित [२४]मुरडणें जननिकडे, जनभयें सुचकित मुरडणें. ॥ १३
तनु भरिती [२५]जंबालें; गळां बळें घालिती मिठी, जैं बाळें, ।
दाटे पान्हा थानीं, सेवावा आग्रहें जगन्नाथांनीं. ॥ १४
घेउनियां [२६]उत्संगीं स्तन पाजी सांवरूनि या हृत्संगीं; ।
मंदस्मितरदनश्रीवदन विलोकील तीहि सुखसदनश्री. ॥ १५
हर्षविति जननि, करीं [२७]अवलंबुनि [२८]वत्सपुच्छ ते [२९]जननिकरीं. ।
चालति, बहु खेळ, गडी गोपांचे, दाविती; असे खेळगडी. ॥ १६
माता देखतिच पळ, [३०]व्यग्रत्वें पळति [३१]केलिपर अतिचपळ. ।
निजगृह, सुतरक्षण, हीं न शकति दोन्ही; न दोंत इतर क्षण ही. ॥ १७

---

१. रमणस्थानास. २. लक्ष्मीच्या ३. होवो. ४. इच्छित. ५. लक्ष्मी, कीर्ति, प्रभाव, सद्गुण, यांस मोठें स्थान. ६. कल्याण आहे हेतु जिजमध्यें. ७. पसरी. ८. मुलासहित नंदावर. ९. प्रसन्न मानसें. १०. प्रीति. ११. न अन्य शोभा. १२. कलिमहात्म्यास. १३. पाहण्यास योग्य. १४. मुलगे. १५. लीलेनेंच. १६. फार. १७. स्त्रिया. १८. उत्तम उदार. १९. गोठ्यांत. २०. गौळ्यांच्या मुलांसारिखे. २१. नाद. २२. सुंदर. २३. तीन किंवा चार पावलें. २४. (अंग) पिळवटणें. २५. चिखलानें. २६. मांडीवर. २७. धरून. २८. वासराचें शेपूट. २९. जनसमूहांत. ३०. चपलत्वें. ३१. क्रीडापर.

मन बहुधा लेंकांहीं जननीचें सुखविलें; न धालें कांहीं ? ।
बहु आवडि रुचि राहे; अमृतीं लाधे तयांहुनी [1]रुचिरा हे. ॥ १८
हरिलीला [2]आबाळ व्रज पाहे नित्यकृत्यही, [3]आबाळ. ।
संस्कारें करि कामें तनु; कृष्णीं मन सुखी विशोक रिकामें. ॥ १९
हरिलीलारसिक थवे गोपींचे; प्रेमरीति मज कशि कथवे ? ।
न पळ भजे मन शयन; प्रीतिपुरःसर [4]अगार जेमन [5][6]शय न. ॥ २०
[7]गीतें ये मृग वळणी, लीलेनें मोहिल्या तशाचि गवळणी. ।
प्रथम समान सत्यांचें नकळत हरिलेंचि सरस मानस त्यांचें. ॥ २१
जो त्रिभुवनराजपती [8]ब्रह्मेशानादि ज्या [9]सुरवरा जपती, ।
[10]गोपकिशोरसखा तो होउनि, चोरूनि कृष्ण गोरस खातो ! ॥ २२
चोरुनि गोरस खातो, परि दे गोपींस तोष थोर सखा तो. ।
गोपवधूजननिकडे गाऱ्हाणें येति घेउनी जन [11]निकडे. ॥ २३
गाऱ्हाणींहि [12]परिसती, कोप करीना तरी सुताउपरि सती. ।
[13]अविनय [14]अनय न वाटे; ये स्मित वदनीं; दयामृत नयनवाटे. ॥ २४
[15]विश्वोदर तो [16]भाटश्रुति केला गोपबाळकीं बोभाट; ।
हा [17]मृदशन करितो कीं; हें परिसुनि, कोप माय ते करि तोकीं. ॥ २५
मन शीतळ मउ गारेपरि; हरिवरि कर न कोपपरम उगारे. ।
न सजो खोडि कराया पुनरपि, म्हणवुनि दटावि खोडिकरा या. ॥ २६
फार यशोदा [18]दर्पी; '[19]पयं नलगे,' जरि म्हणे, 'शिशो ! दादा ! पी;' ।
'लुते साय नखांसी;' 'भरविलिया मानुनी रसायन खासी ?' ॥ २७
सुखकर कर धरुनि करें हरिवरि वरिवरि बरीच कोपे [20]निकरें. ।
ओढी राम कड, कडे दयाब्धिच्या उतरली अशीच कडकडे. ॥ २८
गोपीमुख [21]शीतकर क्षणमात्रें भासला मना [22]तापकर. ।
[23]हरिनयनाब्जें कुमुदें विपरीतचि कोपभीतियोगें [24]समुदें. ॥ २९

---

१. मधुर. २. बाळांपासून वृद्धांपर्यंत. ३. विपत्ति. ४. घर. ५. जेवण. ६. हात. ७. गायनानें. ८. ब्रह्माईशानादि. ९. देवश्रेष्ठास. १०. गवळ्यांच्या मुलांचा सखा. ११. निकडीनें. १२. ऐकिते. १३. दांडगेपणा. १४. अपराध. १५. विश्व आहे उदर ज्याचें. १६. वेद आहेत स्तुतिपाठक ज्याचे. १७. मृत्तिकाभक्षण. १८. दटावी. १९. दूध. २०. कडाक्यानें. २१. चंद्र. २२. सूर्य. २३. कृष्णाचे डोळे हींच कमळें. २४. सर्व.

चित्तीं बहु धाक मनें **श्री**च्या धरिलाचि काय बहुधा [1]कमनें ! ।
माय म्हणे, '[2]कातरते दाविसि; माती [3]निसेविली कां तर ते? ॥ ३०
तूं [4]अरवाळ कसा रे? **राम** भला; आणिखीहि बाळक सारे. ।
मन धाके, [5]बळपृथुकीं कथिलें; होईल उदर केवळ [6]पृथु कीं.' ॥ ३१
कृष्ण म्हणे, 'जननि! [7]बळप्रमुखांचे बोल [8]अनृतभाजन निवळ. ।
सारे वाचाळ टिका लाविति या दोषसंभवाचा लटिका. ॥ ३२
म्यां केलें न [9]मृददन; [10]स्वांतीं गणिशील वचन सत्यास्पद न. ।
साच म्हणुनि तव [11]लोकप्रोक्तीं विश्वास, तरि वदन अवलोक.' ॥ ३३
माय वदे, 'बा, पाहूं;' लागे **वि**[12]धिच्या म्हणावया बापा 'हूं!' ।
ब्रह्मांडें सुखवासी ज्यामाजि, **प्र**भु अनंत तो मुख [13]वासी. ॥ ३४
त्या [14]सुकृतनदिस लेंकीं विश्व, मुखीं, अर्पितां नयन, दिसलें कीं. ।
करि तो **प्र**भु, 'आ,' ज्याला श्रुति विश्व म्हणे शिवाचिया आज्याला. ॥ ३५
ब्रह्मांडाच्या रचने पाहे; तों ते[15] मनासि साचारच ने. ।
गेलींच अनादि [16]सलें; व्रज आपण सुतहि दिव्यनयना दिसलें. ॥ ३६
विश्वात्मा [17]अटकळला, चित्तंतुचि पुत्र तेथ जगपट कळला. ।
पाहुनि सुखमुख वळली; तों माया **वै**ष्णवी क्षणांत कवळली. ॥ ३७
श्रुतिशास्त्रें [18]पर महिमा गाती यत्कीर्ति, ताप हरि, परम [19]हिमा; ।
ज्यास्तव वनीं जतन यति योग करिति, मानि त्यासहि निज तनय ती! ॥ ३८
**द्रो**[20]णाभिध [21]वसु देव **ब्रह्म**वरें **नं**द पावला **व**सुदेव ।
जनक; न **ह**रिलीला जे पावे जिस मुक्ति तीहि वरिली लाजे. ॥ ३९

---

## अध्याय नववा.

**नं**दवधू लोकार्या, दासीजन सर्व गुंतला गृहकार्या, ।
यास्तव दधिमथन सती करि आपण एकदा [22]विमळगुणवसती. ॥ १

---

१. सुंदरें. २. भित्रेपणास. ३. भक्षिली. ४. अचाट. ५. बळराम व मुलगे यांहीं. ६. मोठें. ७. बळरामादिकांचें. ८. असत्यपात्र. ९. मृत्तिकाभक्षण. १०. आपल्या मनांत. ११. लोकांनीं सांगितलेल्यांत. १२. ब्रह्मदेवाच्या. १३. पसरी. १४. पुण्यनदीस (यशोदेस.) १५. रचना. १६. महद्दुःखें. १७. समजला. १८. श्रेष्ठ. १९. शीतल. २०. द्रोण या नांवाचा. २१. देवांची एक जात. २२. निर्मळ गुणांचें स्थान.

सु[१]वसन रु[२]चिर मणी या सु[३]भगेवरि; सहज दे[४]हरुचि रमणीया; ।
तेजें अगदी शा[५]ला भरली; नादें हि गाय ज[६]गदीशाला. ॥ २
न गणी श्रम हो दधिला मथितां, कीं गाय स[७]द्गुणमहोदधिला. ।
सुतचरितीं बहुत र[८]ती ज्याच्या लेशें भवासि जन बहु तरती. ॥ ३
आपण र[९]विगुण ओढी, हृदया [१०]संसारतिमिररविगुणओढी. ।
गाय मुखें हरिलीला, तीणें न रुचती दुजीं सुखें हरिलीला. ॥ ४
सुतमूर्ति ह[११]दयसदनीं, नयनीं प्रेमाश्रु, [१२]घर्मकण गुण वदनीं. ।
पान्हा थानीं, गौ[१३]नीं रुचि, दधिमथनीं गृहीं प्रकाश न[१४]गांनीं. ॥ ५
तो येऊनि रवीला धरि, सुज्ञीं सर्व अर्थ ज्या निरवीला. ।
तृप्त उदार कथांनीं ज्याच्या जन, तो सतृष्ण दा[१५]रक थानीं ! ॥ ६
घे उ[१६]त्संगावरि ती, ह[१७]रविधि यच्चरणधूलिसंगा वरिती. ।
पी स्ने[१८]हस्तन्यासी, नमिति जया जोडुनि स्वहस्त न्या[१९]सी. ॥ ७
तृप्त न होतां पा[२०]नें सुत टाकी, प[२१]य उते अहो ता[२२]पानें. ।
म्हणवुनि जाय लवकरी; परम सुखामाजि विघ्न अ[२३]र्थलव करी ! ॥ ८
तु[२४]च्छार्थपरागमनीं स्वत्यागें धरि रमेश बहु राग मनीं. ।
दधिपात्र शि[२५]लापुत्रें फोडी. करिजेल काय तशिला पुत्रें ? ॥ ९
कोप करी सु[२६]रमणि, कीं तृप्ति न होतां त्यजी धरेवरि; [२७]मणिकीं ।
म्हणवुनि हा उ[२८]पळाला घालुनि स[२९]दनांत रामभाउ पळाला. ॥ १०
जाउनि भ[२९]वनीं तातें विधि[३०]च्या भक्षूनियां हि नवनीतातें, ।
वांटियलें प्ल[३१]वगांतें; चरित मना ! भ[३२]वपयोनिधिप्लव गा तें. ॥ ११
माय न धरि आ[३३]ग मनीं, पाहे दधिपात्रभंग जरि आगमनीं; ।
परम सकृप, डेरा हे देखुनि, हांसे; सुखांतचि पडे, राहे. ॥ १२

---

१. उत्तम वस्त्र. २. सुंदर. ३. सौभाग्यवतीवर. ४. शरीराची शोभा. ५. गृह. ६. कृष्णाला. ७. सद्गुणसमुद्रास. ८. प्रीति. ९. रवीची दोरी. १०. संसाररूपी अंधाराविषयीं सूर्याचा गुण आहे ज्याच्या ठिकाणीं त्याची ओढी (आकर्षण). ११. हृदयस्थानीं. १२. घामाचे बिंदु. १३. गायनीं. १४. अलंकारांनीं. १५. मुलगा. १६. मांडीवर. १७. शिव आणि ब्रह्मा. १८. स्नेहयुक्त दुधास. १९. न्यास करणारे. (संन्यासी इत्यादि). २०. पिण्यानें. २१. दूध. २२. फार विस्तव झाल्यानें. २३. थोडा अर्थ. २४. किंचित् फायद्यासाठीं गेल्यावरून. २५. लहान दगडानें. २६. देवश्रेष्ठ. २७. मडक्यावर. २८. दगडास. २९. घरांत. ३०. ब्रह्मदेवाच्या. ३१. वानरांस. ३२. संसाररूपी सागरामधील नौका. ३३. अपराध.

देखे जरि खापरिया डेऱ्याच्या, पावलीच हरिखा[1], परि या ।
स्वसुता खोडिकराला पाहे, सद्वृंद[2] ज्यासि जोडि कराला. ॥ १३
शोधी जों सुतपा[3] हे सदनांत, उलूखलांघ्रिवरि[4] सुत पाहे. ।
गेली देखायासी, तों गोरस मर्कटांसि दे खायासी. ॥ १४
'धरिन,' म्हणे सहसा धी, ज्या नबळें करुनि तपहि दुःसह साधी; ।
देव हठा केवि वळे प्रणतिविणें[5]? श्रमसमूह[6] ठाके विवळे. ॥ १५
मागुनि मंदगति शयें[7] यष्टि[8] धरुनि ये विलोकितीच अतिशयें. ।
दृष्टि करुनि विभु तरला[9], उखळापासूनि चौर्यभीत उतरला. ॥ १६
कृष्ण पळे, तों पाठी माता धांवे, धरूनि हातीं काठी. ।
मंथरगति[10] परि गांठी; होतें तीच्याचि पुण्य पुष्कळ गांठी. ॥ १७
प्रेमें मति विनटावी[11] ज्याच्या चरणीं, तयासि माय दटावी! ।
ज्यासि यमादिक भीती, मातेपासूनि तो धरि प्रभु भीति! ॥ १८
पावे सुततनु कंपा; वारी गोपीस तत्क्षणीं अनुकंपा[12]. ।
पुत्र न हो[13] बहु कष्टी, म्हणवुनियां टाकिली करींची यष्टी. ॥ १९
जीव म्हणति, 'बा! धांवें,' त्यासि म्हणे ते, 'उलूखलीं बांधावें'. ।
बहुवश दासां; गावें हरिचरित, प्रेमळां सदा सांगावें. ॥ २०
मुनि नमिति सदा मानें, उखळीं बांधी जगत्पतिस दामानें[14]. ।
परि तें न पुरे दावें. अनंतरूपीं विचित्र काय वदावें? ॥ २१
दुसरें गोवी दामीं; 'बांधीन,' म्हणे बळेंचि गोविंदा मी. ।
तेंही झालें ऊन[15] द्व्यंगुल[16], मग तीसरेंहि ये घेऊन. ॥ २२
तिसरें प्रथमाचिपरी स्पष्ट दिसे द्व्यंगुलोन[17]; नुमजेचि परी. ।
देखुनि हांसति गोपी, माया दिसतांहि तत्व तें संगोपी[18]. ॥ २३
करितां आग्रह, ठकवी, निष्फळचि करी तिचा समग्र हठ, केवी[19]; ।
कीं 'बळ दावी सारी मज;' तो पहिल्यासमान दावीं सारी. ॥ २४
निजसूनुस[20] भागे या गृहदामीं बांधितां सुरसभागेया[21]. ।
चरिता दावुनि, दामीं गुंते; कीं 'भक्त्यधीन[22] मात्र सदा मी.' ॥ २५

---

१. आनंदास. २. साधुसमूह. ३. चांगलें आहे तप जीचें. ४. उखळाच्या मूळावर. ५. नमनाशिवाय. ६. फारच श्रम झाले आहेत जीस. ७. हातानें. ८. काठी. ९. चपळ. १०. मंदगति. ११. तल्लीन व्हावी. १२. दया. १३. होवो. १४. दाव्यानें. १५. उणें. १६. दोन आंगळें. १७. दोन बोटें उणें. १८. गुप्त ठेवी. १९. चतुर. (कृष्ण). २०. मुलास, पुत्रास. २१. देवांच्या सभेनें गाण्यास योग्य अशा ('निजसूनुस'). २२. भक्तीच्या स्वाधीन.

दामें त्या बांधावें यमपाशेंही न यन्नतां[1] बांधावें. ।
प्रभु निर्जतंत्र[2], परि हरी भक्ताधीन; स्वगौरवासि[3] परिहरी[4]. ॥ २६
पुत्र स्वात्मा जाया चतुरास्य[5] महेश[6] दुग्धसागरजा[7] या ।
गोपीला लज्जित, कीं त्यांला गमलीं उणीं स्वभाग्यें जितकीं. ॥ २७
क्षीरविचा जामाता बांधुनि गुंते स्वगेहकाजा[8] माता; ।
असतां बद्धचि उखळीं यमलार्जुन[9] अंतरीं रिघोनी उखळी. ॥ २८
नारदशापें नगते[10] शत वर्षें पावले धनदसुत[11]; मग ते ।
पाठविले अलकेला[12] सदनुग्रह[13] दिव्यविग्रहासह[14] केला. ॥ २९

## अध्याय दहावा.

नगपतनरव[15] नितांत[16] व्याकुळ करि तो व्रजस्थ नरवनितांत[17]. ।
क्षितिसहि[18] कांपवि; पति[19] गोपांचा मानि तेधवां पविपाता[20]. ॥ १
यमलार्जुनतरु पडले, पाहुनि म्हणती, 'कसे नगेंद्र[21] उपडले?' ।
गोप सनंद[22] भ्रमती; जवळि पतनहेतु नेणती दभ्रमती[23]. ॥ २
तों शिशु वदति शयातें[24] दावुनि, पाहोनि भीति तदतिशयातें[25]; ।
'न पहा कां पतनाचा हेतु, खरा कृष्ण, काय कांपत नाचा? ॥ ३
शिरला या दोंमाजी, उखळ अडकलें निबद्ध जें हो मौंजीं[26]. ।
ओढी तोंचि निखळले मूळासह वृक्ष हे, क्षणांत उखळले. ॥ ४
दिव्य पुरुष तंव दोनी यांतूनि प्रकटलेहि मुदित[27]; वदोनी ।
यासी वंदुनि वडिलापरि गेले;' हा मुलीं उदंत[28] निवडिला. ॥ ५
तार्किक जन तो, 'लटिके बाळ,' म्हणे; तन्मनीं कसा बोल टिके? ।
संदिग्ध कितिक यास त्यजिति, न घेति न करीतिहि किति कयास[29]. ॥ ६
करुनि भजन कवि मुक्त प्राज्य[30] जयाचें, तयास जनक विमुक्त ।
क्षिप्र[31] करी; हरितात[32] प्रमाण, कीं विश्वबंध कर हरितात[33]. ॥ ७

१. ज्याच्या भक्तांस. २. स्वतंत्र. ३. आपल्या जडपणास. ४. हरण करी, आवरी. ५. ब्रह्मदेव. ६. शिव. ७. लक्ष्मी. ८. घरांतील कामास. ९. यमल, अर्जुन, दोन वृक्षविशेष. १०. वृक्षपणास. ११. कुबेरपुत्र. १२. अलकापुरीस. १३. सत्कृपा. १४. देवांच्या सारखा देह अशासह. १५. वृक्षपतनाचा नाद. १६. अत्यंत. १७. स्त्रीपुरुषांत. १८. पृथ्वीस. १९. स्वामी. २०. वज्रपतनास. २१. वृक्षेंद्र. २२. नंदासहित. २३. अल्पमती. २४. हातास. २५. त्याच्या विपुलत्वातें. २६. कंबरेंत. २७. आनंदित. २८. वृत्तांत. २९. अनुमान. ३०. पुष्कळ. ३१. लवकर. ३२. हरीचा बाप. ३३. हरण करितात.

नयना काना चवि[1] ती बहु; गावविती हि गोपिका नाचविती. ।
बहुमत आज्ञा पितया विधिच्या जे, स्त्री जसेचि आज्ञापि तया. ॥ ८
गोपींची प्रेमलता[2] फळली कैवल्य; धन्य ती प्रेमलता. ।
तें वस्तु महा गायी गोपीला सुलभ फुकट, न महागायी. ॥ ९
व्रजवीथी[3] सुरसरितें हांसति; सत्यादिलोक जरि सुरस, रितें; ।
श्रीशं[4]भुललामहित प्रभु जेथें प्रेमळासि भुलला मेहित[5]! ॥ १०
कृष्ण बृहद्वनवासी, चरितांसी वाढतां सदैव नवासी, ।
बल्लव[6] लोकांसि, कवी उपनंद स्थविर[7], बुद्धि ऐशी शिकवी, ॥ ११
'येथें शिशुनाशक[8] ते झाले उत्पात सर्व निधना[9] शकते; ।
केलें दीनसंमवन[10], श्रीशें भय भंगुनि स्वलोकसम[11] वन. ॥ १२
न दिसे जों नयनाशी उत्पात दुजा, न आमुचा नय[12] नाशी, ।
वृंदावन आटोपा[13]; दुष्ट भयें पावतें स्वमन आटोपा.[14]' ॥ १३
या बोधीं आवडिला धरुनी, नंदादि मानिती त्या वडिला. ।
श्रीवृंदावनवसती केली; होती करीत भूमि नवस ती! ॥ १४
तेथें चित्त मग वसे बळकृष्णाचें; प्रमोद[15] उत्तम गवसे[16]. ।
खेळति नानारीती; देखति लीला समुन्मना[17] नारी ती. ॥ १५
चारी तोकांसहित प्रभु वत्सें, यत्पद त्रिलोकांस हित; ।
करि ती शुद्ध वसुमती[18], चुंबी चरणांबुजीं[19] सुहृद्धव[20] सुमती. ॥ १६
देखुनि सर्वमुनिधना[21], वत्साकृति[22] धरुनि, तेथ ये रिपु, निधना[23]. ।
तें हरि बंधुस कळवी, माया येदनुग्रहेंचि[24] विश्व सकळ वी. ॥ १७
त्यांस[25] किती पाठ कला? सावध असतांहि गोपरूपा ठकला. ।
मग करिल कसें? पडिला प्रभुहस्तीं; धरि पदासहित शेपडिला. ॥ १८

---

१. गोडी. २. प्रेमरूप वल्ली. ३. गोकुळांतील गल्ल्या. ४. सांवाळ्या तिलकास हित. ५. पूज्य. ६. गौळ्यांस. ७. वृद्ध. ८. बाळघातक. ९. मरणास. १०. दीनांचें उत्तम रक्षण. ११. वैकुंठासारिखें ('स्वलोकसम वन केलें' असा अर्थ). १२. न्याय, नीति, यश. १३. व्यापा; त्यांत जाऊन रहा. १४. शोभा. १५. आनंद. १६. सांपडे. १७. आनंदित आहेत मनें ज्यांचीं. १८. भूमी १९. चरणकमलांनीं. २०. प्रसन्न नवरा. २१. कृष्णास. २२. वासराचें रूप. २३. मारावें म्हणून; किंवा मरावें म्हणून. २४. ज्याच्या कृपेनें. २५. रिपु.

फिरवि तया [1]आनिधन; स्वतनुवरुनि उतरि निजहिता [2]ज्ञानिधन. ।
[3]कंसहितकृदनुगारी [4]व्यसुस [5]कपित्थीं फळार्थ [6]अजित झुगारी. ॥ १९
असुर कपित्थांसहित व्यसु [7]वसुधेवरि गळे पळें कंसहित; ।
[8]दैत्यजिघांसुमनातें हर्षवि; सुर वर्षती तदा सुमनांतें. ॥ २०
[9]विश्वप वत्सप गवळी झाला हो ! वासुरें रमारंग वळी ! ।
चारी गवता रानीं, तारी लोकांसि जो [10]सदवतारांनीं. ॥ २१
[11]उदकप्रांता नेलीं [12]बळकृष्णीं वासुरें उनीं [13]तानेलीं, ।
इतरांही गोपांनीं; कीं वत्सांमाजि तृप्ति जागो [14]पानीं. ॥ २२
पाजुनियां वत्स, पसे भरुनि पिती [15]पय [16]परप्रभू [17]वत्सपसे; ।
तों नामें बक, साच [18]त्रिदशारी, तेथ देखिला [19]बकसाच. ॥ २३
न गमे बाळांशि खरा, मनिं मानिति [20]वज्रकृत पर्वतशिखरा. ।
तो झडपि समग्रांसी, कृष्णा, [21]अहिला [22]खगेश्वरसम, ग्रासी. ॥ २४
मूर्ति गळां ते [23]जाची, जे खनि [24]अनलादिकाखिलातेजाची. ।
गिळितां [25]बळभाउ जळे कंठीं, तों तत्क्षणीं प्रबळ [26]भा उजळे. ॥ २५
शीघ्र [27]बकीभाउ, गळीं जाळी म्हणवूनि, [28]पद्मनाभा उगळी. ।
ये हनना तुंडानें; धरिला चंचूसि [29]शूरनातुंडानें. ॥ २६
वत्सप अद्भुत करणी पाहति ती सहज मारितां [30]हतक रणीं. ।
चिरि हरि जेवि [31]लव्हा या; काम सफळ साधुजनमनांतिल व्हाया. ॥ २७
करिती देव स्तुतिला, वंदुनि जीला श्रुती वदे वस्तु तिला. ।
मूर्ति मन नयन मोही; स्तव करि बळ मानसीं सविनय, 'नमो,' ही. ॥ २८
स्फुरणें आलीं गाया, गुणमित्रें कडकडोनि आलिंगाया ।
रामादि; कळेवर तें चाले कीं याचि [32]जीवनकळेवरतें. ॥ २९

१. मरेपर्यंत. २. ज्ञानी जनांचें धन (कृष्ण). ३. कंसाचें हित करणाऱ्या चाकराचा शत्रु. ४. प्राणरहित. ५. वृक्षविशेष, कंवठ. ६. कृष्ण. ७. जमिनीवर. ८. दैत्यघातकाच्या (कृष्णाच्या) मनातें. ९. विश्वाचा स्वामी. १०. उत्तम अवतारांनीं. ११. उदकस्थळीं. १२. बळराम व कृष्ण यांहीं. १३. ताहानेलेलीं. १४. पिण्यांनीं. १५. पाणी. १६. श्रेष्ठ प्रभु. १७. वासरें पाळणाऱ्या (गोपां)सारिखे. १८. देवशत्रु. १९. बकपक्ष्यासारिखा. २०. वज्रानें फोडलेल्या पर्वताचें शिखर. २१. सर्पास. २२. गरुडासारिखा. २३. जाच करी. २४. अनल (अग्नि) इत्यादिकांच्या सारिख्या अखिल तेजाची. २५. कृष्ण. २६. प्रभा, कांति. २७. बकासुर. २८. कृष्णास. २९. कृष्णानें. (शूर हा कृष्णाचा आजा.) 'शूराच्या धरिलि चंचु नातुंडानें' असाही पाठ आहे. ३०. दुर्दैवी. ३१. तृणविशेष. ३२. जीव चालविणारी कळा कृष्ण त्यावर.

जाति, नमुनि पद, काया ओवाळुनि वरुनि साधुहृत्पदका[1] या, ।
गातचि सुर निजलोकां; चित्तीं कीं म्हणति, 'आजवरि निजलों कां?'॥ ३०
निजजीवन दासां जे हरिलीला, कथिति ते जननदा[2] सांजे. ।
'पावविला पैर[3] मसणा' म्हणति, 'व्रजहीं महेश्वरें[4] परम सणा.' ॥ ३१
'न भुकेजा गा; ताने, हरुनि भवा, हरियश व्रजा गातां ने. ।
करितां उच्चाराशी वाढति हर्षांचियाचि उच्चा राशी. ॥ ३२
याचे घात कितेकीं केले, मेले परंतु घातकि ते कीं. ।
जोडुनि पापा, मरते झाले त्यजुनि त्रपा कृपा पामर[5] ते. ॥ ३३
प्रतिहतिस[6] द्विजवाचा[7] न पवे, जैसा विरोध सद्वि[8] जवाचा[9]. ।
गर्ग मनुष्यतनु[10] भव[11] स्पष्टचि; आला तदुक्तिचा[12] सदनुभव[13].' ॥ ३४
नंदादिक कृष्ण मुखें गाती, जाती स्वयें भयें कृष्णमुखें[14]. ।
हरिलीलाभिनवसुधा[15] पीती; त्यांला न विष्णुलोक न वसुधा[16]. ॥ ३५

---

## अध्याय अकरावा.

हरि शिशु शृंगारांनीं भूषिततनु[17], वाजवूनि शृंगा, रानीं ।
जाया, चरित निज सुरीं गाया, मित्रें खुणावि सर्व निर्जसुरीं[18]. ॥ १
करिती अर्भक[19] लीला, ज्या गातां हरिति पापगर्भकलीला[20]. ।
शुक गातो रसिकांनीं सेवावा योग्य सुरस तो रसिं कानीं. ॥ २
करुनि तप रमा नंदासम न सुखी; हाचि पात्र परमानंदा. ।
नाथ सुरांचा करितो, चारुनि रानांत वासुरां, चाकरि तो! ॥ ३
नंद पिताचि; परि जनीं गोपांचें भाग्य हें न विष्णुपरिजनीं[21]; ।
कीं करितो रवि हरण प्रणततमाचें[22], तयासवेंचि विहरण[23]. ॥ ४
तों आला अजगरसा रूपानें असुर, कीं करिल अजग[24] रसा[25]. ।
अघ[26] अघभाजन[27], 'घास[28] ज्वलना मज,' हा म्हणे 'तसा जन घास.' ॥ ५

---

१. साधूंच्या हृदयांवरील पदकास. २. जन्म देणारास. (नंदास.) ३. शत्रु. ४. कृष्णानें. ५. मूर्ख. ६. हननास. ७. ब्राह्मणाचें वचन. ८. उत्तमपक्षी. (गरुड.) ९. वेगाचा. १०. मनुष्याचें शरीर आहे ज्यास. ११. सांब. १२. त्याच्या वचनाचा. १३. उत्तमअनुभव. १४. काळतोंडीं. १५. हरिची लीला हेंच कोणीएक अभिनव (नूतन) अमृत. १६. त्यांला वसुधा विष्णुलोक नाहीं असें नाहीं म्ह० त्यांला वसुधा विष्णुलोक होय. १७. भूषित आहे तनु ज्याची. १८. आपल्या सुरांनीं किंवा निद्रित. १९. मुलें. २०. पापाचा गर्भ आहे ज्यांत अशा कलीला. २१. विष्णुसेवकीं. २२. भक्तांच्या अज्ञानरूपी अंधाराचें. २३. क्रीडा. २४. निर्मनुष्य. २५. पृथ्वी. २६. अघासुर. २७. पापपात्र. २८. गवत.

धरुनि क्षोभा, उसणें घ्याया, तर्पावया बकीभाउ सणें, ।
पसरी अघ, सारा हे गिळितां व्यापुनि नभा[1]सहि, घसा, राहे. ॥ ६
त्या हरिदासां परवा काय? न जाणोनि, जाणुनी साप, रवा[2] ।
करुनी, शिरति परगडी[3]; हरि न शिरे तों रदीं[4], न निष्कृप[5] रगडी. ॥ ७
जाणें अज गरजावें जों कीं, 'न पुढें, विशाळ अजगर! जावें,' ।
तों शिरलें जग, राया, ल्यालें जें विश्वरक्षका अगरा[6] या. ॥ ८
स्मरतां अज, गरल[7] टिके काळव्याळीं[8] न; तेथ अजगर लटिके. ।
संकल्प अनिश[9] मायाबळें धरुनि ये पतंग दहनिं[10] शमाया[11]. ॥ ९
करुणेचा उदराशी[12] स्वमनिं म्हणे, 'अजगराच्चिया उदराशी[13] ।
वश झाले दास गडी; जाळिल कीं या पतंगवृंदा[14] सगडी. ॥ १०
वत्स किशोर, तदशन[15] क्रूरें केलेंचि, उग्रमुख शितदशन[16]; ।
हे[17] जशिं पर्वतशिखरें अग्रें दिसती विशाळ सर्व तशिं, खरें. ॥ ११
माझ्या हे मज नामीं गाती; या माय बाप हेम[18] जना मी.।
'त्यजुं, निजजीवा, तूतें परि,' म्हणति, 'न पळभरि स्वजीवातूतें[19],' ॥ १२
माराया अहि तातें विधिच्या मनिं युक्ति धरिलि जे अहितातें; ।
हरिमय हा भुजग तिला नेणे, कीं न फिरवी महाभुज[20] गतिला. ॥ १३
जाय तशा दरदांत[21] द्विषदास्यांत[22]चि सुरक्तशादरदांत[23]. ।
असुरघनीं रवि लपला देखुनि सुरगण उदश्रुनीर[24] विलपला[25]. ॥ १४
कोंडे वायु; गळाला हरि; धरि झष गुंतला गतायु[26] गळाला. ।
करि बहु तळमळ; काय प्रयत्न? कांपवि धरित्रितळ[27] मळकाय[28]. ॥ १५
दाटे बहु वायु गळां, रोधी, तों पतन जाहलें दृग्युगळा[29]. ।
भक्ताच्या अज[30] गरजे गुंते, दे मुक्ति, लाधला अजगर जे. ॥ १६
मेले पशु गोप वनज्वलनीं[31] मृगसे क्षणांत; मग तो पवन ।
राहेल कसा उगला? व्याळगळां[32] काळकाळबाळक[33] फुगला. ॥ १७

---

१. आकाशास. २. नादास. ३. कृष्णगडी. ४. दांतीं. ५. निर्दय. ६. चंदना म्ह० कृष्णा. ७. विष. ८. काळसर्पी. ९. नेहमीं. १०. अग्नीवर. ११. मराया, शांत व्हाया. १२. सागर. १३. पोटास. १४. पतंगसमूहास. १५. त्यांचें जेवण. १६. तीक्ष्ण आहेत दांत ज्याचे. १७. दांत. १८. सुवर्ण. १९. आपली सजीव करणारी वल्ली. २०. कृष्ण. २१. भयंकरांत. २२. शत्रूच्या तोंडांत. २३. फार तांबडे व हिरवे असे दांत आहेत ज्यांस अशा (द्विषदास्यांत.) २४. आसवें गाळणारा. २५. रडला, आक्रंदला. २६. आयुष्यहीन. २७. पृथ्वीचा तळ. २८. मलीन आहे काय (शरीर) ज्याचा. २९. दोनी नेत्रांस. ३०. कृष्ण. ३१. दावाग्नींत. ३२. सर्पाच्या गळ्यांत. ३३. काळाचाहि काळ असें बाळक.

भ्याला कीं हरिस रणीं भेदुनियां ब्रह्मरंध्र तो करि सरणी; ।
झाला ही असुरहित [1]त्रिदशमुनिजनेष्ट पावला असुर हित. ॥ १८
मारुनि असुर, हितातें करि, उठवी दृष्टिनेंचि [2]असुरहितातें; ।
त्या सकळां सह, साची करुनि कृपा, घे मुखांतुनी [3]सहसाची. ॥ १९
अहिच्या जें तेज निघे देहांतुनि शुद्धसत्वमय तें जनिं घे ।
[4]मोक्षदपद सुखसदन [5]त्रिभुवनतापोपशांतिकर [6]शशिवदन. ॥ २०
स्तुति करिती सुर; सकळा अर्पिति ते गायनादिका सुरस कळा; ।
बहु [7]मीनलिं नभवाद्यें, भरिति [8]रवें हें सनाथ [9]नलिनभवाद्यें. ॥ २१
तो [10]बकिसोदर तरला जीणें, ते हरिदया नसो दर [11]तरला. ।
[12]पशुपशुपावन [13]चारू स्वयश करू वत्स [14]विश्वपावन चारू. ॥ २२
तरले पतित रजाचे [15]रतिनें, पद [16]पूत सदय अतितर जाचे, ।
धरुनि कृपा, वनचरसा हिंडे; केली समस्त पावनच [17]रसा. ॥ २३
[18]ब्रह्मभवेनभगा जे गाती, [19]तद्वाक्यसद्रवें नभ गाजे. ।
माधवमधु पिकला हो; [20]महिमामाकंद, मोद कविपिक लाहो. ॥ २४
दाऊं महिमा नेला वाद्यरवांहीं; सुरोत्तमहि मानेला ।
लववी, विस्मित जनिं त्या चरितें होवूनि दूरुनी निज [21]जनित्या. ॥ २५
[22]भजदघपरिहार पती श्रीचा करि; [23]भय उदग्र परि हारपती. ।
सिंह कसा [24]कलभांहीं जिंकावा ? [25]प्रलयवन्हि वा [26]शलभांहीं ? ॥ २६
[27]वृंदाविपिनीं सुकलें जें अजगरचर्म, जीवनातें सुकलें, ।
[28]क्रीडोचित [29]गव्हरसें; खेळति गोपाळ [30]हरिपदप्रव्हरसें. ॥ २७
अघ मारुनि वांचवि या पशुपशुपां कृष्ण वत्सरीं पांचविया; ।
कथिती [31]हायन सावा, तैं व्रजिं कीं अहि, जनांत [32]हाय नसावा. ॥ २८

---

१. देव आणि मुनी यांना इष्ट. (कृष्ण). २. मेलेल्यांस. ३. एकाएकीं. ४. मोक्ष देणारे आहेत पद ज्याचे. ५. त्रिभुवनाच्या तापाची उपशांति करणारा. ६. चंद्रासारिखें आहे तोंड ज्याचें. ७. एकत्र जहाली. ८. गोंगाटानें. ९. कमलोद्भवाच्या म्ह० ब्रह्मदेवाच्या आग्रानें. (कृष्णानें.) १०. पूतनेचा बंधु. ११. कांपणारी. १२. पशु व गोप यांचें संरक्षण. (कृष्ण.) १३. सुंदर. १४. विश्वाची मुक्ति. (कृष्ण.) १५. प्रीतीनें. १६. पवित्र. १७. पृथ्वी. १८. ब्रह्मा व शिव यांच्या स्वामीच्या म्ह० कृष्णाच्या भाग्यास. १९. त्यांच्या भाषणाच्या उत्तम नादानें. २०. महिमारूपी आंबा. २१. कृष्णा. २२. भक्तांच्या पातकाचा नाश. २३. 'भव' असाही पाठ आहे. २४. छाव्यांनीं. २५. प्रलयकालचा अग्नि. २६. टोळांनीं. २७. वृंदावनीं. २८. क्रीडा करण्यास उचित. २९. गुहेसारिखें. ३०. हरिपदीं नम्र. ३१. वर्षे. ३२ शोकदर्शक.

'निर्दयमानस; हाय ! व्याळ न तो; काळ तत्समान सहाय[1]; ।
न तया गिरि पृथु[2] कवळ;' प्रकट करिति नंदसूनुचें[3] पृथुक[4] बळ. ॥ २९
अर्थ न वत्सर हा या विदित जना, नित्य बाळ वत्स रहाया ।
येती परि; बोभाट व्रजिं नाहीं ते अघारिचे[5] तों भाट[6]. ॥ ३०
हा संशयपरिहार प्रकटीं[7], प्रेमाश्रुबिंदुचे परि हार; ।
तेंचि बरें वद, नामीं कारें हरिच्या रंग, विनवितों वदना ! मी. ॥ ३१

## अध्याय बारावा.

केली भजदरिरक्षा[8]; कासाराला[9], करूनियां बरि रक्षा[10], ।
ने वत्सप वत्स, लता[11] देवांची, जे शरीरिणी वत्सलता. ॥ १
कृष्ण म्हणे, 'जळ पाजा आपुलिया वासुरांचिया कळपा, जा; ।
चरतिल कोमल यवसा[12], हें स्थान म्हणे, 'स्मरों नको मलय, वसा.' ॥ २
रमलें माझें मन, या पुलिनीं बैसों सुखें करूं जेमन[13], या. ।
मृदु सिकतेवरि[14] केली[15] मांडूं,' आज्ञा अशी तयां बरि केली. ॥ ३
पाहुनियां पुलिनगणीं[16] बाळांच्या सुख; तृषाहि आपुलि न गणी; ।
पाजुनि जळ नव, यवसीं सोडिति, जीं वासुरें प्रियें अवयवसीं[17]. ॥ ४
सोडुनियां दधिभक्त[18]प्रभृति[19] सदन्नें दयासुखोदधिभक्त[20] ।
जेविति त्या पुलिनींच; त्रिदशां[21] वाटे सुधाहि आपली नीच. ॥ ५
मध्यें अहिपतिशयनें[22] बसतां, तीं लेंकुरें सुविकसितनयनें[23] ।
हर्षप्रहसितवदनें[24] बसति, जशीं पद्मकर्णिकेचीं[25] छदनें[26]. ॥ ६
त्यांच्या सरसा लीला; किति करिती पात्र पत्रकरसालीला[27], ।
किति जेविति वरदगडी[28] कुसुमफळीं[29] शिक्थ[30]पल्लवांकुरदगडीं. ॥ ७

---

१. बरोबरीचा. २. मोठा. ३. कृष्णाचें. ४. मुलें. ५. कृष्णाचे. ६. स्तुतिपाठक. ७ प्रकट करितों. ८. भक्तांच्या शत्रूची म्ह० अघासुराची राख. ९. सरोवराला. १०. संरक्षण. ११. देवांची वल्ली (कल्पवल्ली) शरीरिणी वत्सलता, म्ह० साकार वत्सलता. (कृष्ण.) १२. गवतास. १३. जेवण. १४. वाळूवर. १५. क्रीडा. १६. वाळवंट. १७. अवयवांसारिखीं. १८. दह्यानें युक्त असा भात. १९. इत्यादि. २०. कृष्णाचे भक्त. २१. देवां. २२. शेषशायीनें. (कृष्णानें.) २३. प्रफुल्ल आहेत नयनें ज्यांचीं. २४. हर्षानें हास्ययुक्त आहेत वदनें ज्यांचीं. २५. कमलांतील वर्तुलाचीं. २६. पत्रें, पाकळ्या. २७. पानें, हात, साली, यांस. २८. कृष्णसखे. २९. फुलें व फळें, यांवर. ३०. शिक्थ म्ह० मधाची पोळी, पल्लव, अंकुर, दगड, यांवर.

कृष्णसखे [1]रुचिरमती, दाविति [2]अन्योन्यभोज्यगत रुचि; रमती. ।
सेचिति[3] अन्नरस हित प्रिय हासति हासविति [4]सुरेश्वरसहित. ॥ ८
देखति ते सुर लीला, खोवी [5]उदरांबरामधें मुरलीला. ।
डाव्या तो काखेला धरि शृंग [6]सवेत्र, दावि तोकां खेला. ॥ ९
[7]वामीं [8]विधिर्जनक [9]बळभ्राता घे करिं [10]दधिप्लुतोदनकवळ. ।
ठाव [11]लवणशाकेला [12]अंगुलिसंधी करांतचि तशा केला. ॥ १०
[13]श्रुतिशास्त्रनययज्ञाचा गुरु, भोक्ता मुख्य साधुजनयज्ञाचा, ।
जेवी; शिशु हांसवितो, जो ब्रह्मांडाचिया समूहास वितो ! ॥ ११
त्या बाळचरित्रास [14]प्रेक्षुनि, सुर तोष धरिति, [15]तदरि त्रास; ।
गाति; [16]वनेचरविभवां लाभ, न हा [17]शक्रमुनिविरिंचिरविभवां. ॥ १२
जेविति शिशु हरिसहित [18]स्वादु शिळें अन्नही सुधेपरिस हित. ।
धरुनी तृणलोभ वनीं पशु शिरति, भयेंहि [19]वत्सपमनोभवनीं. ॥ १३
गोप [20]ससाध्वस, खाया विसरति; जाणे भया [21]असाध्वसखा या. ।
सांगे कीं, '[22]सहे सारे बैसा, मी वत्स आणितों [23]सहसा रे.' ॥ १४
त्या गोपकिशोरांसी अभय असें दे [24]दयाबळयशोरासी. ।
ध्यावा जो धीरांनीं, [25]सकवळकर तो स्ववत्स शोधी रानीं. ॥ १५
[26]महिमांतरदोहद या विधिला; कीं [27]वत्सगोपसंदोह, दया ।
करुनी, वांचविला जे [28]अघहरलीला, तिला सुधाचवि लाजे. ॥ १६
व्रजगोरसचोर [29]हरी जनक; सुत [30]विधीहि वत्स [31]सकिशोर हरी. ।
या पहिल्या चालीला चालवि. संसार हरि भल्याचा लीला. ॥ १७
वत्स वनांत न दिसती, मागें मुरडे [32]दयासुधांबुनदिसती. ।
[33]शिशुवृंदहि विधि हरि; तें दिसलें ज्ञानाचिया महानिधि हरितें. ॥ १८

---

१. उत्तम आहे मति ज्यांची. २. एकमेकाच्या अन्नांत असलेली. ३. शिंपिती. ४. कृष्ण. ५. पोटावरचें वस्त्र. ६. वेताच्या काठीसहित. ७. डाव्या (हातीं.) ८. ब्रह्मपिता. ९. बळरामाचा बंधु. १०. दह्यानें भिजलेल्या भाताचा घांस. ११. लोणच्याला. १२. दोन बोटांमधील जागा. १३. वेद, शास्त्र आणि न्याय, हीं जाणणारा. १४. पाहून. १५. देवांचे शत्रु म्ह० दैत्य त्रास म्ह० भय धरिती. १६. वन्य मनुष्यास झालेले. (गोप.) १७. इंद्र, मुनि, ब्रह्मा, सूर्य, आणि शिव यांस. १८. गोड. १९. गोपांच्या मनोरूपी घरीं. २०. सभय. २१. दुर्जनाचा शत्रु. (कृष्ण.) २२. एकत्र. २३. लागलाच. २४. दया, बळ आणि यश यांचा राशी. (कृष्ण.) २५. घास आहे हातीं ज्याच्या. २६. महिम्याचा अंतराविषयीं डोहळा. २७. वासरें व गोप यांचा समूह. २८. पातकाचा नाश करणारी लीला. २९. कृष्ण. ३०. ब्रह्मा. ३१. मुलांसकट. ३२. दयारूपी उदकनदीरूप. (कृष्ण.) ३३. मुलांचा समूह.

योजी साक्षी[1]; प्रमद स्वसुता; जेणें शमेलहि क्षिप्र मद; ।
शोकेंही न करपती गो गोपी, करि असें सुरप्रकरपती[2]. ॥ १९
स्वपदींचि, विभु, लवाया विधिला आश्चर्य दाखवुनि भुलवाया, ।
भगवान् स्वप्रद विष्णु क्षणमात्रें सर्व जाहला प्रभविष्णु[4]. ॥ २०
आपण वत्स पहा, कीं, आपण होऊनि त्यांसि वत्सप[5] हाकी. ।
वर्णिल कोण शहाणा? आपण काठी करीं पदीं हि वहाणा! ॥ २१
सारी पहिलीच परी[6]; ईश्वर न करील काय? हें मात्र परी ।
वारूं न शके तो, कीं जननीची स्नेहवृद्धि, मोह न तोकीं[7]. ॥ २२
जाय रमावर सांजे; व्रज भावी, भेट ते शतावरसां जे. ।
तोष न तो कां माता मनिं? जरि भेटति जुन्याचि तोकां माता. ॥ २३
गो गोपी गोप रमावरगुरु सम; सिद्धि काय सांगो परमा? ।
आला वत्सर हाता, झाला होऊनि गोप वत्स रहाता! ॥ २४

---

## अध्याय तेरावा.

हें झाल्यावर, साच्या न्यून निशा[9] असति पांच सा वरसांच्या. ।
वत्स सबळबाळक[10] हा चारी व्रजनिकट[11], सर्वखळपाळकहा[12]. ॥ १
तेव्हां धेनू चरती, गोवर्धनपर्वतावरी संचरती; ।
तेथुनि दृष्टिस त्यांच्या वत्स दिसति, सुकृत बहु अदृष्टि सत्यांच्या. ॥ २
चावूं विसरति घांसा[13], चाविलियाही गळां न उतरति घांसा; ।
हंबरती, दयमाना पाहति वत्सांसि ऊचलुनि वर माना. ॥ ३
एकिपुढें एकि, कडे लंघिति, धांवति, करूनि भय एकिकडे; ।
पाहुनि, आटोपाया गोप न झाले समर्थ, आटोपा[14] या. ॥ ४
वत्सांच्या मनिं ओढीं[15], न दिसे दृष्टीस दगड, तरु वनिं ओढा; ।
गोवर्धनगिरिमधुनी जाती सुखसिंधुलागिं त्या प्रेमधुनी[16]. ॥ ५
आल्या कळपापाशीं, क्षय ज्याच्या पदरजें सकळ पापासी. ।
बहु वत्सावर माया करिती, त्या दुग्धसिंधुचा वरमाया[17]. ॥ ६

---

१. [सर्व]साक्षी म्ह० कृष्ण. २. देवसमूहपति. (कृष्ण.) ३. स्वतंत्र, तेजस्वी. ४. वाढणारा. (बहुरूपी.) ५. गोप. ६. तऱ्हा. ७. पूर्वीपेक्षां आतां आपआपल्या बाळकांवर स्नेहवृद्धि व मोह हीं आयांच्या ठायीं ज्यास्त जहालीं हें मात्र तो वारूं न शके, असा अर्थ. ८. कृष्ण. ९. रात्रि. १०. बळराम व बालकें यांसहित. ११. गोकुळाजवळ. १२. सर्व खळपाळकांचें हनन करणारा. (कृष्ण.) १३. गवतास. १४. आवेशास. १५. ओढ. १६. प्रेमाच्या नद्या. १७. विहिणी.

हंबरती प्रेमानें, चाटिति वत्सांसि, पाजिती बहुमानें, ।
वत्सवती; परि माया बहु त्या प्रेमा, नसे जनीं उपमा या. ॥ ७
न तिळमृदू राग मनीं, गोप तिहीं श्रमविले विदूरागमनीं[1]. ।
लेश नुरे, परि तो या प्रेमानें वर्षती सुतोपरि तोया[3]. ॥ ८
प्रेमभरें बाहूनी, ऊचलुनी धरिति पोटेंशीं[4] बाहूंनीं. ।
हुंगिति बाळकटाळू[2]; म्हणती, 'त्वदरिष्ट[5] विश्वपाळक टाळू.' ॥ ९
करिती माये तात; प्रेक्षाया वदनचंद्रमा येतात; ।
जाउनि दूर, मुरडती; न शकति पुत्रांविण क्षण क्रमुं, रडती. ॥ १०
हे आधीं रामा या कळली नाहींच वर्ष[6] वीरा माया. ।
प्रेमा लक्षि प्रबळ व्रजतोकीं निज मनांतिला क्षिप्र बळ[7]. ॥ ११
'जो प्रेमा जातो कीं हरिविण कोठें न तोहि माझा तोकीं;' ।
'न दुजी रामा यावी माया, मायेश[8] हा खरा मायावी;' ॥ १२
चिंतुनि हें राम घडीभरि, हृदयीं ज्ञानदृष्टिला मग उघडी. ।
पाहे पशु पशुप रमापति; पावे प्रीति तेधवां बळ परमा. ॥ १३
पुसतां, हरि, हेतूतें कथि, 'लीला जाहली विदित हे तूतें.' ।
हा अभिनव देवाचा प्रश्नोत्तरवाद एक न वदे वाचा. ॥ १४
वर्षें स्वत्रुटिकाळें[9] आला विधि[10] नेउनी सवत्सें बाळें. ।
पहिल्यापरि विभुला या देखुनि, तत्काळ लागलाचि भुलाया. ॥ १५
द्रुहिण[11] म्हणे मनिं, 'हरिला नकळत पशुतोकसंघ[12] म्यां वनिं हरिला. ।
माया जनिं जे माझी, त्या तल्पीं[13] असति सर्वहि निजेमाजी. ॥ १६
उरवुनि अमृततनु[14], रवी एकहि भगणांतरीं[15] प्रकाशित नुरवी; ।
त्यापरि वर्जुनि हरिला म्यां शिशुपशुगण, विमोह सर्जुनि[16], हरिला. ॥ १७
एथें हा तो[17] कांहीं अर्थ नसे; वेष्टिलाचि हा[18] तोकांहीं. ।
करितो रानीं केली[19], पहिली जशि गोपवासुरांनीं केली.' ॥ १८

---

१. दूर येऊन. २. बाळकांवर. ३. पाण्यास. ४. पोटाशीं. ५. तुझें संकट. ६. एक वर्षपर्यंत. ७. बळराम. ८. मायेचा पति. ९. आपल्या त्रुटिकाळें. (त्रुटिकाळ ह्मणजे ऱ्हस्व स्वर उच्चारण्यास जो वेळ लागतो त्याचा एक चतुर्थांश.) १०. ब्रह्मा. ११. ब्रह्मा. १२. पशु व मुलें यांचा समूह. १३. बिछान्यावर. १४. चंद्र. १५. नक्षत्रीं. १६. उत्पन्न करून. १७. तर. १८. कृष्ण. १९. क्रीडा.

नेणोनि, असा ध्याया बैसे; परि गति कळेचि न असाध्या या. ।
झाला शोध न; वेधा लागे मन; पावलाचि बोध न वेधा[1]. ॥ १९
दिसती हीं सत्य जुनी, कीं नव? न कळेचि हें, भ्रमास त्यजुनी. ।
कुतुकें[2] अन्यायाला करुनि, भुले; गति सुचे न अन्या याला. ॥ २०
करि नियम, 'नमो;' हा यापरि मायेश्वर तदीय मन मोहाया, ।
माया दावि; भुले कीं स्वकृतें; निर्दय कदा न हा विभु[3] लेकीं. ॥ २१
श्रेष्ठीं जो कां मायें[4] योजी, तो तोष त्याचिया कामा ये. ।
रवितेजा जन अर्ची[5]; न पावे[6] खद्योतगत[7] संभाजन[8] अर्ची[9]. ॥ २२
सकळविभुललामा[10] तें कळलें कीं, 'ठकवितांचि भुलला मातें.' ।
निजरूपीं निजवि, भवा वारुनि, दासासि दावि तो निज विभवा[11]. ॥ २३
विधि पाहे सहसा जे पशु शिशु जो ज्या विभूषणासह साजे. ।
ते ते प्रभुहरिसारे सर्वगुणें भक्तमोहकरिहरि[12] सारे. ॥ २४
तो अद्भुत महिमा, यां[13] निश्चळ करि; देखवे न धामहि; माया ।
हरि हरि, कीं नभिं याला मूर्छा आलीच; शक्तिहीन भियाला. ॥ २५
श्रुतिभाजन[14], कवि, मानी हा सावध होय विश्वजनक विमानीं. ।
नेत्र उघडि आठ; विना[15] स्वदुरित[16] मोहासि बीज तो आठविना. ॥ २६
तो न शके कवळाया निजमाया ज्या कराब्जधृतकवळा[17] या. ।
देखे भव्य यशोधी जो शिशु पशु त्या वनांत अव्यय[18] शोधी. ॥ २७
शीघ्र जसा रवि, माना सोडुनि, उतरे नभींच सार विमाना; ।
कांचनदंडासम हा पडला; समजे दयाचि दंडास महा. ॥ २८
वाहे स्वशिरःकमळें चरणीं, अभिषेकुनी स्वलोचनकमळें[19]; ।
करि सत्यप[20] दीनमनें वारंवार स्वजन्मदपदीं[21] नमनें. ॥ २९

---

## अध्याय चवदावा.

माथां पादरजातें घे, स्मरती साधुसंघ[22] सादर[23] ज्यातें; ।
जोडुनियां हस्त, वनप्रभवोद्भव[24] करि दयांबुवाहस्तवन[25]. ॥ १

---

१. ब्रह्मा. २. कौतुकानें. ३. कृष्ण. ४. कपटास. ५. पूजी. ६. पावे, लावे. ७. खद्योताचें आंगचें. ८. पूजन. ९. तेज. १०. सर्व प्रभूंच्या तिलकास. (कृष्णास.) ११. पराक्रमास. १२. भक्तांच्या मोहरूपी गजाविषयीं सिंह. १३. ब्रह्मयास. १४. वेदपूज्य. १५. परंतु. १६. आपलें पातक. १७. करकमळीं भाताचा कवळ घेतला आहे ज्याणें. १८. निर्नाश. (कृष्ण). १९. निजनेत्रोदकें. २०. ब्रह्मा. २१. कृष्णपदीं. २२. साधुसमूह. २३. आदरपूर्वक. २४. कमलज. (ब्रह्मा.) २५. दयारूपी पाण्याच्या मेघाची (कृष्णाची) स्तुति.

'[1]तनुरुचिजितजलदघटा! [2]गुंजाशिखिपिच्छभूषणा! कनकपटा! ।
स्तविन तुला वनमालाशृंगकवलवेणुवेत्रधर! गोपाला! ॥ २
नमन तुला [3]**भवशमना**खंडलमुखदेववंदिता! [4]भवशमना! ।
[5]स्वचरणनिरतमुनिधना! [6]लीलाकृतविश्वसंभवावननिधना! ॥ ३
धन्य म्हणे वर देशा या श्री**वृं**दावना किती [7]**व**रदेशा, ।
हिंडति पद [8]कमनीयाकृति जेथें! [9]यद्रजोंश पदक मनीं या. ॥ ४
[10]होयें, सकृप यो जननी, या; [11]तवनाभ्यमृतसध्रदपयोजननी ।
मी जरि, तरि यवसाचें या वनिंच्या भाग्य हें सदवयव साचें. ॥ ५
श्रुतिशास्त्रनयज्ञांहीं रचितांही तृप्ति बा! तुज न यज्ञांहीं. ।
गोगोपीस्तनपानें त्वां धरिली तृप्ति तत्सुतें [12]जनपानें. ॥ ६
करुणेचा उदधी न त्वत्सम, सर्वेश तूं [13]स्वजनहृदधीन. ।
हा कामहि मागाया दे मति जन्मांतरीं हि महिमा गाया.' ॥ ७
[14]विगतमदाज्ञान मनें विनवुनि, घेऊनि गुरुपदाज्ञा नमनें ।
करुनि पिता, [15]महें सत्य [16]स्वांतीं धरि, मग वरी **पि**तामह **स**त्य. ॥ ८
होय[17] पिता [18]महनदिला; [19]तृप्तिकरीं परि मनें **पि**तामह न दिला. ।
गेला [20]**स**त्यप दास, श्री**ह**रिच्या मनिं धरूनि सत्य पदास. ॥ ९
तें कुतुक मज न कथवे; वत्सांचे तो स्वयें जगज्जनक थवे, ।
पुलिनीं [21]दारक थारे तेथें ने; करि अशी उदार कथा रे! ॥ १०
शिशु म्हणति सकळ, 'पहा! न विलंब, करूनियां गतिस, काळपा हा ।
घेउनि आला, [22]हरिला धाक. अहो! आमुची दया बहु **ह**रिला. ॥ ११
ये हरि; [23]सहित पहात, ग्रास धरुनि, बैसलों; करिति तप हात. ।
चिंति तुझें मन वाटे; तुजवांचुनि विषसमान [24]जेमनें वाटे. ॥ १२

---

१. शरीराच्या कांतीनें जिंकिलें आहे मेघसमूहांस ज्याच्या. २. गुंजा आणि मयूरपिच्छें हीं भूषणें आहेत ज्याचीं. ३. शिव, यम, इंद्र इत्यादि देवांहीं वंदिलें आहे ज्यांस. ४. संसारनाशका. ५. तुझ्या चरणीं रत असलेल्या मुनीच्या धना. ६. लीलेनेंच केली आहे विश्वाची उत्पत्ति, रक्षण, आणि नाश हीं ज्याणें. ७. वरद ईश. ८. सुंदराकृति. ९. ज्याच्या रजाचा अंश. १०. होई. ११. तुझी नाभीच अमृताचा चांगला डोह, त्यांतील उदकांत जन्म जहालें ज्यास. १२. लोकप्रभूनें. १३. स्वजनहृत्‌अधीन. १४. गेला आहे मद आणि अज्ञान ज्यापासून. १५. उत्सव. १६. अंतः-करणीं. 'स्वांतें देहें हि वरि पितामह सत्य' असाही पाठ आहे. (सत्य म्ह० सत्यलोक.) १७. होय पिता म्ह० प्याला. १८. उत्सवनदीला. १९. तृप्तीच्या हातीं. २०. ब्रह्मा. २१. बाळ. (गोप.) २२. हरण केला. २३. एकत्र. २४. जेवण.

शीघ्र प्रत्यागमनें[1] केला त्वद्विरहसंज्वरत्याग[2] मनें. ।
एक कवलभक्षण ही घडलें न; विलंबला धेनाभ[3] क्षणही. ॥ १३
ये जेवूं, स्वस्थानीं बैस;' असा प्रार्थिला तिहीं स्वस्थांनीं. ।
हांसे मनिं हरि, खाया लागे दधिभक्त[4], तन्मनें हरिखाया[5]. ॥ १४
करुनी भोजनपानें[6], वत्सासह बाळसंघ तो जनपानें, ।
अजगर दावुनि, सांजे नेला वसतीस[7], लब्ध बहुदिवसां जे. ॥ १५
'अजगर खाऊं[8] ग्रासी आम्हां; मग त्या हरी सखा उग्रासी ।
आजि वधी;' तोकांनीं कथिलें हें वृत्त; लोक घे तो कानीं. ॥ १६

---

## अध्याय पंधरावा.

या चरितोपरि साव्या वर्षींच्या कृष्णसत्कथा परिसाव्या. ।
येथें नित्य नवि रती[9]; याविण विषयांत होय सत्य न विरती[10]. ॥ १
हरिबळसह[11] शिशु वृंदाविपिनीं चारिति महासुखें पशुवृंदा. ।
यांची शोभा नमना योग्य, तुरवि मन्मथाचिया भान मना. ॥ २
रक्षिति हें वन माळी ऋतु सादर सर्वही; धणी वनमाळी[12]. ।
पाहुनि पदवि[13], भुलावी कां न श्री, जीस[14] नित्य पद विभु लावी? ॥ ३
जेथें वेणुपिकाचा[15] ध्वनि, दोहद[16] कृष्णपादरेणुपिकाचा[17], ।
त्या वृंदावनमहिला[18] वाखाणिति आदरें त्रिदशजनमहिला[19]. ॥ ४
त्या सुभगा अवनितळीं[20], गुंजन्मधुपांबुजें[21] उदंड वनिं तळीं, ।
तेथिल गंध[22] वहाया पदिं ये, हरि दे निदेश[23] गंधवहा[24] या. ॥ ५
वैकुंठांत रमे न, क्रीडा करि या वनीं नितांत[25] रमेन[26]. ।
देव समग्र जपाया सादर ज्या, तो स्तवी निजाग्रजपाया[27]. ॥ ६

---

१. परत येण्यानें. २. तुझा विरह हाच कोणी एक मोठा ज्वर त्याचा त्याग. 'सद्विरहसंज्वरत्याग' असाही पाठ आहे. ३. मेघासारिखा. ४. दहींभात. ५. आनंदण्यास. (एथें 'लागती' हें क्रियापद अध्याहृत घ्यावयाचें.) ६. खाणींपिणीं. ७. घरीं. ८. खाण्यासाठीं. ९. प्रेमा. १०. विरक्तता. ११. कृष्ण आणि बळराम यांसह. १२. कृष्ण ऋतुरूपी माळी आदरपूर्वक सर्व वन रक्षिती, असा अन्वय. १३. मार्ग. १४. ज्या पदवीस म्ह० मार्गास. १५. वेणुरूपी कोकिळेचा. १६. डोहाळा. १७. कृष्णपदाच्या रजःकणाच्या समृद्धीचा. १८. वृंदावनभूमीला. १९. देवांगना. २०. पृथ्वीवर. २१. गुंजारव करणारे मधुप आहेत ज्यांत अशीं कमळें. २२. सुवास. २३. आज्ञा. २४. वाऱ्यास. २५. अत्यंत. २६. कृष्ण. २७. बळरामाच्या पायांस.

‘[1]आर्या! [2]सुरनुतपद, या [3]क्षितिवरि आलासि करुनि बहु न तप, दया. ।
अर्चिति [4]पादप, दास, प्रणत, [5]फळसुमीं [6]सुधाप्रपादपदास. ॥ ७
होउनियां भ्रमरहित, [7]त्वद्यश [8]शमलघ्न गाति हे भ्रमर हित. ।
[9]धृतनरतनु [10]वरदास त्यजिति न [11]पदपद्मनिरत मुनिवर, दास. ॥ ८
नाचति मयूर; सकळा अर्पिति तुझिया पदीं स्वनृत्यरसकळा. ।
[12]त्वद्दर्शनमोदास स्वांत दिलें; करिति तूज न ‘नमो’ दास? ॥ ९
करिती न [13]व्याहारा, स्मरति न पति, सुत, तनूहि, [14]नव्याहारा; ।
पाहति गोपींसम या सादर हरिणी तुला त्यजुनि [15]दरसमया. ॥ १०
त्वत्प्रिय दक्ष करीती [16]सूक्तें पिक; हेचि [17]धर्मरक्षकरीती. ।
[18]स्वगृहागतपूज्य, कृती हर्षविती [19]विद्यमान अर्थें [20]सुकृती. ॥ ११
हे पद मुनिराजगतिप्रद, जीव समस्त जीवनें या जगती. ।
[21]खग, मृग, [22]अग, [23]नग, [24]जगती, धन्यचि कीं सकळ दावितातिं गजगती.’॥ १२
वर्णित आला पाया ऐसा, वेदांसि उचित आलापाया; ।
यद्गुण बळ [25]भद्राचें, जो तो यश गाय देवबळभद्राचें. ॥ १३
[26]श्रुतिविश्रमदा त्याली [27]पद्मपरागांगराग [28]समदाल्याली, ।
सेवुनि [29]सुमनमधु रानीं, गाय; हरिहि तीसवें स्वरीं [30]मधुरांनीं. ॥ १४
गति, [31]कूजित हंसहि तें नेणे, जें दाविलें स्वयें [32]हंसें हितें. ।
वनिं ठकला पिक, लाजे नृत्य करुनि दाखवी [33]कलापि कला जे. ॥ १५
जातां दूर चराया, [34]वनगंभीर स्वयेंचि [35]दूरचरा या ।
पशुकळपा पाचारी; तृणचरहि द्रवति, न खळ पापाचारी. ॥ १६
प्राकृत जन भागतसे, भागति खेळोनि बहु [36]महाभाग तसे. ।

१. हे श्रेष्ठा. २. देवांनीं नमिलें आहे पदाला ज्याच्या. ३. पृथ्वीवर. ४. वृक्ष. ५. फल-पुष्पांनीं. ६. अमृताच्या पोईतें देणाऱ्या. ७. तुझें यश. ८. पापनाशक. ९. धरिलें आहे नराचें शरीर ज्याणें. १०. वर देणाऱ्याला. ११. पदकमलीं रत. १२. तुझ्या दर्शनापासून झालेल्या आनंदास. १३. क्रीडेला. १४. नव्या आहारास. १५. भयसमया. १६. उत्तम ध्वनि. १७. आपआपलें कर्तव्य करणाराची रीति. १८. आपल्या घरीं आलेले (अतिथि) पूज्य आहेत ज्यांस. १९. असलेल्या द्रव्यें म्ह० सामग्रीनें. २०. सु (चांगली) कृति आहे ज्यांची. २१. पक्षी. २२. वृक्ष. २३. पर्वत. २४. जग. २५. कल्याणाचें. २६. कानांस विश्रांति देणारी. २७. कमलांतील भुशाची उटी. २८. मदानें युक्त अशी भ्रमरांची पंक्ति. २९. फुलांतील मध. ३०. गोड अशा (स्वरीं). ३१. शब्द. ३२. कृष्णें. ३३. मयूर. ३४. वनासारिखा गंभीर. ३५. दूर जाणाऱ्या. ३६. कृष्ण आणि बळराम.

श्रीपति बळपद रगडी; हरिचे सेविति [1]गतत्रितापदर गडी. ॥ १७
[2]श्रुतिनुतपादप हा; यास्तव, छाये योग्य [3]वरदपाद पहाया ? ।
श्रुतिमूर्ति [4]सदाननिं जे ते मूळीं श्रीकुचांतहि सदा न निजे. ॥ १८
[5]विश्वाच्या नगरा जे पल्लव [6]शयनार्थ देति ते नग राजे, ।
जे गोप शयनरचिते योगिमनोरथ विशुद्ध मूर्त नरचि ते. ॥ १९
गोप सुशीला मांडी, निजतां [7]सुकृतांबुधी, उशीला [8]मांडी; ।
किति सेविति [9]भव्यजनी [10]नवविटपांच्या [11]सरोजनाभ [12]व्यजनीं. ॥ २०
किति गाती चरितगति; प्रेमाश्रु न तद्विलोचनांतरिं तगती. ।
सुखसारसमधुपानीं देहस्मृति सोडिलीचि शिशुमधुपांनीं. ॥ २१
त्या [13]मोक्षश्रीदा [14]मानाथा [15]सबळास तत्सखा श्रीदामा ।
विनवि [16]स्मितसुभगमुख, प्रार्थितिही तोक [17]कृष्णसुबळप्रमुख. ॥ २२
'येथुनि जातां, लव न श्रम कीं, आहे समीप बहु [18]तालवन. ।
तेथ फळें [19]बहुसुरभी; हो येतो गंध, दे परंतु असुर [20]भी. ॥ २३
धेनुक [21]अभिधान [22]खरस्वरूप तज्ज्ञातिवर्गहि समान [23]खर. ।
[24]खगपशुगणमनुजगती तेथ नसे; जाति ते कदापि न जगती. ॥ २४
फळगंधें [25]दरवळतें वन, मन हें आमुचेंहि [26]सादर वळतें. ।
झाले लोभित [27]दशन, घ्राण, [28]रसज्ञा करावयासि [29]तद्दशन.' ॥ २५
अमृतफळासि फळे हा [30]सुरवृक्ष अनंत; नुरवि [31]तुच्छफळेहा. ।
नेले [32]कांतारा हे शिशु, जेथें असुर [33]धार्मिकांता राहे. ॥ २६
जेंवि [34]करी, [35]तालागा बळ कांपवि; असुर ये करीता लागा; ।
वीर्यें गाढ; वधावे शिशु या कामें सकोप गाढव धांवे. ॥ २७

---

१. तीनही तापांचें भय गेलें आहे ज्यापासून. २. वेदांनीं स्तविलेला वृक्ष. ३. कृष्णचरण. ४. साधूंच्या मुखीं. ५. कृष्णास. ६. बिछान्यासाठीं. ७. कृष्ण. ८. ठेवी. ९. महाजन्मे. १०. वनवृक्षांच्या. ११. कृष्ण. १२. विंझण्यांनीं. १३. मोक्ष आणि लक्ष्मी यांस देणारा. १४. लक्ष्मी-नाथास. १५. बळराम आहे संगतीं ज्याच्या. १६. हास्यानें सुशोभित आहे मुख ज्याचें. १७. कृष्ण (नंदसुत नव्हे, पण दुसरा एक गोप;) आणि सुबळ हे आहेत मुख्य ज्यांत. १८. तालवृक्षांचें वन. १९. फार आहे सुवास ज्यांस. २०. भय. २१. नांव. २२. गाढवाची आकृति. २३. तीव्र. २४. पक्षी, जनावरें किंवा माणूस यांची गति. २५. भरून जातें. २६. आदरपूर्वक. २७. दांत. २८. जिव्हा. २९. त्यांचें भक्षण. ३०. कल्पतरु. ३१. हलक्या फळाची इच्छा. ३२. अरण्यास. ३३. धार्मिकांचा अंत करण्यासाठीं. ३४. हत्ती. ३५. तालवृक्षास.

कोपें कांपत, नर वा सुर नेणत, ऐकतांचि फळपतनरवा[1], ।
येउनि[2]; वीरास भया लातेच्या दुष्ट दाखवी रासभ[3] या. ॥ २८
कोप धरीला तालें बळभुजकरिकंपितें[4]; करी लातालें; ।
कीं गर्दभ रानींचा. काय अमृतपात्र पातकभरा नीचा? ॥ २९
जो हा गाढव यातें, दुर्मतिवारांगनानुगा[5] ढवयातें, ।
बळ सज्जनपदक बळी चरणीं, सुखवावयासि जनपद[6], कवळी. ॥ ३०
तो अतिउग्र गरगर[7] प्रभुनें खळ फिरविला धरूनि गरगर. ।
त्यजिला लौकर ताळीं; नभ गर्जे हृष्ट देवकृतकरताळीं[8]. ॥ ३१
गर्दभतृण राजानें विश्वाच्या क्षेपितांचि, तृणराजानें[9], ।
पडतां ताळ जवळिला कांपविला; त्या द्रुमेंहि अन्य कवळिला. ॥ ३२
तोही चुरला तालद्रुम[10]; एवं[11] त्या वनीं न उरला ताल[12]. ।
वृक्ष न जगती, पवन क्षोभें भंगी, तसेंचि जगतीप[13] वन. ॥ ३३
तों तज्ज्ञाति[14] मिरासी आले भांडावयासि; त्या तिमिरासी ।
बळ हरि हिमभानु[15] रवी स्वजनकुमुदनलिनसुखदकरभा[16] हुरवी. ॥ ३४
करुनि खर परासु[17], मनीं सुखविति सुर; तेहि करिति मुदिरा[18] सुमनीं. ।
वाद्यें बहु वाजविती, जयजयशब्दें करूनि नभ गाजविती. ॥ ३५
करुनि परासु खरासी[19], देति जना भक्ति; तत्परा सुखरासी[20]. ।
व्रजिं नमितां पद, वडिलां लोकां जो निजवियोगताप[21], दवडिला. ॥ ३६
एके दिवशीं वृंदाविपिनीं[22] रामाविणें[23] हरी गोवृंदें[24] ।
चारि; निदाघातप[25] या सकळां करि तृषित; पीति यमुनेंत पयां[26]. ॥ ३७
विषजल पशुपांनीं[27] या सेवियलें, पीति त्याचि पशु पानीया[26]. ।
प्राणी जो जो धाला, झाला तो प्रेत, पावतां रोधाला[28]. ॥ ३८

---

१. फळ पडलें त्याच्या शब्दास. २. 'ये दावी रासभ या अतुलाखिलबल बलप्रवीरास भया' असाही पाठ आहे. ३. गाढव. ४. बळरामाच्या भुजरूपी गजानें कांपविलेला अशानें. ५. वारांगनेच्या (कलावंतिनीच्या) चाकरास. ६. देश. ७. विषालाहि विष अशा. ८. देवांनीं पिटलेल्या हातांच्या टाळ्यांनीं हृष्ट म्ह० संतुष्ट. ९. वृक्षविशेषें. १०. तालवृक्ष. ११. याप्रकारें. १२. वेत. १३. जगत्पति. १४. त्याच्या जातीचे लोक. १५. शीतकिरण, चंद्र. १६. आपल्या भक्तरूपी कुमुदांस आणि नलिनांस सुख देणारी अशी प्रभा आहे ज्यांच्या किरणांची. 'कुमुदें' हीं चंद्रविकसितें, व 'नलिनें' हीं सूर्यविकसितें कमळें होत. १७. प्राणरहित. १८. मेघास. १९. गाढवास. २०. सुखाचा राशी. २१. आपल्या विरहापासून झालेला ताप. २२. वनीं. २३. बळरामाखेरीज. २४. गाईंच्या समुदायास. २५. ग्रीष्मऋतूंतील सूर्य. २६. पाण्यास. २७. गौळ्यांनीं. २८. तीराला.

पाहुनि मृत सकळ, वळे करुणामृतघन **जग**न्निवास कळवळे. ।
[1]दृष्टिसुधावृष्टि **ह**री करि, [2]जे पाळी करूनियां सृष्टि, हरी. ॥ ३९
उठती जेंवि सकाळीं; **ह**रि दासांचें हरीच [3]साध्वस काळीं. ।
कोण विषास विचारी? पावे आपणचि नाश तें अविचारी. ॥ ४०
दुसरा वांचविता न, प्रेमा; [4]हरिनयनअमृतवर्षवितान ।
शिरिं, म्हणुनि असु परतले; हें जाणुनि **वि**भुपदांतचि पशुप रतले. ॥ ४१

---

## अध्याय सोळावा.

[5]**मु**निसर्वस्वा दुहिता [6]रविची वाटे करावि [7]सुस्वादु हिता, ।
कीं **का**ळिय सापानें दे दूषित जन मरों न सहसा [8]पानें. ॥ १
[9]ऱ्हद विषसागर [10]लाला अहिच्या धरि, भी [11]कृशानु ज्या [12]गरलाला. ।
जळविष सरमिसळ सळे, जन पाहुनि जें कढे सदैव सळसळे. ॥ २
जरि गेला खग [13]वरुणें मरणाची [14]सरणि तत्क्षणीं मग वरणें. ।
जरि जव थोर पळतिल [15]द्विज, तरि वाफेकरूनि होरपळतिल. ॥ ३
[16]मारुत डोहावरिला स्थिर चर त्याला न सांपडो; 'हा!' वरिला. ।
त्यांतिल सविषवनलवीं प्राणासि हरावया उशिर लव न लवी. ॥ ४
भीति [17]खेचर वाफांस, **[18]ब्र**ध्नसुताचा गळां न बरवा फांस. ।
झाली इच्छा पीडाहरणीं **श्री**मन्[19]मयूरपिच्छापीडा. ॥ ५
ऱ्हदहृदयांत निखारा **य**मुनेच्या त्या सुदुःसहा [20]कुविखारा. ।
काढाया कास [21]केशी; दावि पहा सदयता स्वलोकांस कशी! ॥ ६
भवताप कविस [22]दाही न, तसा जरिही [23]कदंब निकट सदाही, ।
तरि विष भय दावीना, अमृतकराला शिरोनि[24]लयदा वीना. ॥ ७

---

१. दृष्टिरूपी अमृताचावर्षाव. २. दृष्टि. ३. भय. ४. कृष्णाचे डोळे हेंच अमृताचा वर्षाव करणारें एक छत्र. ५. मुनिजनाचें सर्वस्व असा जो कृष्ण त्याला. ६. यमुना. ७. गोड. 'सापानें' ही करणी तृतीया आहे. ८. पिऊन. ९. डोह. १०. लाळ, फेंस. ११. अग्नि. १२. विषाला. १३. वरून. १४. मार्ग. १५. पक्षी. १६. वायु. 'लावी' याचा कर्ता 'काळिया' अध्याहृत. १७. पक्षी. १८. यमाचा. १९. मयूरपिच्छाचा तुरा आहे ज्यास. २०. दुष्टसर्पास. २१. घाली. २२. दाह करी. २३. वृक्षविशेष. २४. शिर दिलें होतें स्थान ज्याणें 'अमृतकरा' (अमृत होतें हातीं ज्याच्या) 'वीना' (गरुडास). पूर्वी समुद्रमंथनानंतर गरुड अमृताचा घट घेऊन जात असतां कदंबवृक्षावर बसल्याची कथा आहे, तिजकडे याचा संबंध आहे असें दिसतें.

लावी पद झाडा या हरि, त्या अहिचा समूळ मद झाडाया. ।
चढला प्रभु तरुशिखरीं; घडलीं होतीं महातपें तरुशि खरीं. ॥ ८
जेथें सकुतुक रतलें श्रीमन, त्या विजयि विश्ववर्ण्य करतलें ।
ताडि भुज विभु जगाचा; टाकि उडी, [1]मद हरावया [2]भुजगाचा.॥ ९
जळ धांवे शतधनु तें, त्या डोहीं टाकितां उडी [3]विबुधनुतें. ।
प्रकटति वहुतर लहरी; करि करिवरसा ऱ्हदासि बहु [4]तरल हरी. ॥ १०
'गोगोप [5]पिपासू न [6]व्यसु केले म्यां, न दोष मजपासून,' ।
[7]प्रभुभुजदंडाहत तें जळ ऐसें विनवि काय शब्दें वितते ! ॥ ११
नाग अदांत रवासी ऐकुनि या, धांवला [8]ऱ्हदांतरवासी; ।
[9]भवनाभिभवा [10]मानी, प्रकट करी कोप, [11]गरलविभवा, [12]मानी. ॥ १२
[13]नीरदनिभ, सुकुमार, श्रीवत्सांकित, [14]सुवर्णवसन, कुमार, ।
मृदुपद, [15]सुस्मितवदन [16]प्रेक्षाया योग्य; [17]अतुळसद्गुणसदन. ॥ १३
मूर्तीलाहि अशीला पाहे, [18]तत्केलि या रुचे न [19]अशीला. ।
मर्मी चावे दांतीं, वेष्टी; महिमा कळे जिचा वेदांतीं ! ॥ १४
न दिसे नयनीं [20]चेष्टीं; हरिची भासे दशा जशी [21]नीचेष्टी. ।
नाहिं [22]समानसहाय, प्रियसख म्हणती [23]सशोकमानस 'हाय !' ॥ १५
वेष्टी कृष्णा गुरुला स्वशरीरें सर्प, जेंवि [24]कृष्णागुरुला. ।
[25]शोकह्रदीं [26]मोहाहि कवळी श्रीकांतमित्र[27]संदोहाहि. ॥ १६
प्रिय आत्मा, वत्स, तरी न स्मरती धेनु; सर्व वृष [28]वत्सतरी ।
फोडिति हंबरडा; या हरिचा लागे [29]सुहृत्कदंब रडाया. ॥ १७
[30]नीरजनाभ यदा ते स्थिति दावी तेधवां जना [31]भयदाते, ।
[32]त्रिविधोत्पात प्रकट क्षणमात्रें होति; नाश कळविति [33]निकट. ॥ १८

---

१. गर्व. २. काळियासर्पाचा. ३. देवपूजितें श्रीकृष्णें. ४. चंचल. ५. तृषित. ६. गतप्राण. ७. कृष्णहस्तानें पसरलेलें 'काय' (जसें काय.) ८. डोहवासी. ९. आपल्या घरावर हल्ला झाला असें मानी. १०. मनांत आणी. ११. विषाच्या पराक्रमास. १२. गर्विष्ठ. १३. मेघासारिखा. १४. पीतांबरधारी. १५. हास्यवदन. १६ पहाण्यास. १७. अतुल सद्गुणाचें स्थान. १८. त्याचें चरित्र म्ह० खेळ. १९. दुष्टाला. २०. चांचल्य. २१. नीच कालियाचे इच्छेप्रमाणें. २२. बरोबरीचा मित्र. (बळराम.) २३. खेदयुक्त आहेत मनें ज्यांचीं. २४. चंदनाला. २५. शोकरूपी डोहांत. २६. मोहसर्प. २७. समूहास सुद्धां. २८ पाड्या. २९. मित्रसमुदाय. ३०. कमळनाभ. ३१. भयंकर. ३२. तीन प्रकारचीं दुश्चिन्हें. ३३. जवळ.

नंदादिक बहु धाकीं[1] पडले हरिनाश भाविती बहुधा कीं. ।
‘रामावांचुनि दावा[2] गेला; करिती सुरारि[3] यासह दावा[4]. ॥ १९
यमलोक गमे व्रज हा;’ तेथ म्हणे बाळगोपगोपीव्रज[5] ‘हा!’ ।
न पहाती ओकासी[6], त्यजिति जसे लोक ओकिल्या ओकासी. ॥ २०
जाती शोधित रानीं; भय धरिलें बहु बळाहुनी[7] इतरांनीं. ।
वारीना वनगमनीं; जाणे अनुजप्रभाव[8], हांसे स्वमनीं. ॥ २१
धैर्यें सहसा ढळलीं; शोधित जातां, पथीं पदें आढळलीं. ।
जीं सेवि अनादिसती, चिन्हें पद्मांकुशादि नयना दिसती. ॥ २२
जें हरिचें पद वीतें[9] अर्थचतुष्टय, तदंकिता[10] पदवीतें[11] ।
धरुनी, यामुनतट ते पावुनियां, जाहले सकळ जन तटेंतें[12]. ॥ २३
जाउनि देखति अहितें, जेणें हरि वेष्टिला ऱ्हदीं अति अहितें[13]. ।
गोपहि पडले शवसे[14]; कोणाच्या मनिं न धीर धड लेश वसे. ॥ २४
बुडवी शोकनदीन[15] व्यालावृतदेहहरिविलोकनदीन[16] ।
व्याकुळ जन थोर; पळे स्मृति; शोकाग्नीकरूनि बहु होरपळे. ॥ २५
करुनि विलापा रडती गाईपरि, धाय मोकलुनि, आरडती. ।
दुःख अनंत यशोदे; म्हणे, ‘परिष्वंग[17] अमृतशीत[18] शिशो! दे.’ ॥ २६
गोपी स्मरती हसित, प्रेक्षण[19], सौहृद, विनोद, वाक्य, विलसित. ।
देह परम रसरसित, प्रियशोकाग्नी करील जाणो भसित. ॥ २७
त्या डोहांत शिराया, झाले नंदादि सर्व सिद्ध मराया; ।
परि ते सकळ बळानें[20] वारियले सांत्वनादियुक्तिबळानें. ॥ २८
कृष्णास सकळ कळलें कीं, ‘गोकुळ मन्निमित्त बहु कळकळलें.’ ।
तेथ घटिद्वय उगला होता, मग भुजगभोगबंधनिं[21] फुगला. ॥ २९
प्रभु वपु जों जों फुगवी, तों तों तो नाग भोगवेढे उगवी. ।
वाढे गोपकुलगडी; तनुभंगभयें भुजंग बंध उलगडी. ॥ ३०

१. भयांत. २. वनाला. ३. राक्षस. ‘यासह’ म्ह० पाशीं. ४. द्वेष. ५. समुदाय. ६. घराला. ७. बळरामाहून. ८. धाकटा भाऊ कृष्ण याचा पराक्रम. ९. प्राप्त करितें, देतें. १०. त्या चिन्हानें युक्त. ११. मार्गाला. १२. थांबते. १३. दुष्टानें, शत्रूनें. १४. प्रेतासारिखे. १५. शोकसमुद्र. १६. सर्पानें वेष्टित आहे शरीर ज्याचें अशा हरीच्या अवलोकनानें दीन. ‘जन’ हें ‘बुडवी’ याचें कर्म. १७. आलिंगन. १८. अमृताप्रमाणें शीतल. १९. पाहणें. २०. बलरामानें. २१. सर्पदेहाचे बंध आपल्या आंगासभोंवती होते त्याच्या आंत.

सोडी म्हणुनि न उलला परि नेणे हरिस. गरळमद्यें भुलला. ।
ऊचलुनी स्वफण[1] फणी[2] कोपे, विषवन्हिला[3] वमोनि, फणफणी. ॥
उपमा तन्नयना[4], कीं मंडकभाजन[5]; गळे गरळ बहु नाकीं. ।
फूत्कार करि उदंड; व्याळ न तो, काय कोपला यमदंड! ॥
ओष्ठप्रांत[6] जिभांनीं चाटी, विषवन्हिकीलखड्गनिभांनीं[7]. ।
हरि दाखवि धीटपणें, गरुडाचें जेंवि पन्नगवधीं[8], टपणें. ॥
अन्योन्यवधीं टपती; भ्रमणक्षतशक्तिनागशिरिं[9] धीटपती ।
चढला बहु लवलाहें; बसतां गुरुरूप मस्तकीं लवला हें[10]. ॥
मृदु रक्त[11] सहज चरण; व्याळशिरोमणिखड्यावरी[12] संचरण[13]; ।
धरिति अरुणता[14] तळवे ज्या श्रीकरपल्लवासि बहु नातळवे. ॥
स्वामी भवनाचा, या अहिशिरिं लागे कळाप्रभव नाचाया. ।
सहजचि सुर साहित्या नृत्याच्या करिति सर्व सुरसांहीं[15] त्या. ॥
घेउनि आतोद्या[16], या प्रभुपायीं देवगण गुणा तो द्याया, ।
कांतांसह[17] आला, पी स्मितकांत्यमृतासि[18], वाजवी, आलापी. ॥
म्हणती, 'कुजना, चावें निजांधरां[19]; हे समर्थ भुज, नाचावें.' ।
वर्षति कुसुमें अमर, श्रीपतिचरणांबुजीं स्वयें जे भ्रमर. ॥
कृष्ण महानट नाशी विषबळ, करि विश्वंधाम[20] हा नटनाशी[21] ।
हरि, जैसा शफटांचा[22] हाणोनि करी मदप्रणाश[23] फटांचा. ॥
तो यदुकुळजनु[24] ठेंची, 'शिरतों वरि,' जों म्हणे; फिरोन नुठेची.
पूर वमे रुधिराचा[25]; पदवज्रा काय होय मेरु धिराचा? ॥
नागशिरें शंभरही ठेंची; करि नम्र पंक्ति विश्वंभर ही. ।
मूर्छेस्तव अचळ, बळक्षीण; शरीरीं उरों दिली न चळबळ. ॥

---

१. फणा. २. सर्प. ३. विषाग्नीस. ४. त्याच्या नयना. ५. मांडे भाजण्याचें पा[illegible]
ठावरची जागा. ७. विषाग्नीच्या ज्वाला आणि खड्गें यांसारिख्यांनीं. ८. सर्पवधीं. [illegible]
क्षीण आहे शक्ति ज्याची अशा सर्पाच्या शिरीं. १०. 'हें' हें 'गुरुरूप' याचें दर्शक. [illegible]
१२. सर्पश्रेष्ठाचे मस्तकांतील जो खडा त्यावर. १३. चालणें. १४. तांबडेपणा. [illegible]
रसांनीं. १६. वाद्यांस. १७. वायकांसह. १८. हास्यशोभेच्या अमृतास. १९. आप[illegible]
२०. कृष्ण. २१. नृत्यासी. २२. खुरांच्या टांचा. 'जैसा' म्ह० जेव्हां. २३. गर्वनाश. फ[illegible]
फडांचा. २४. यदुकुळीं आहे ज्यास असा कृष्ण. २५. रक्ताचा.

प्रभुवर नागवि; सरला मदसंचय; सर्व गर्व नाग विसरला. ।
होउनि विमद, मनें हा जाय शरण माधवा [1]अधमदमनेहा. ॥ ४२
पाहुनि सापदरातें, पाहुनियां विकळमानसा, पदरातें ।
[2]तद्वनिता पसरीती. शरणागतिमाजि शुद्ध तापसरीती. ॥ ४३
स्त्रीजन सापत्य [3]वनप्रभवाक्षा सदयमानसा [4]पल्यवन ।
प्रार्थी, वंदुनि भावस्तवनें, जेणें घडे भयांत निभाव. ॥ ४४
'खळदमना! [5]सकळेना! तूं प्रभु हें प्राकृता जनास कळेना. ।
न धरा जी! [6]आग मनीं; केलें दीनासि धन्य या आगमनीं. ॥ ४५
केली शिक्षा; माया दीनावरी बहु तुझी अशि; [7]क्षमा या ।
द्या जी! [8]असुदान; मन प्रसन्न हो, करुं सदा तव पदा नमन.' ॥ ४६
स्त्रीजन बहु विनवि, लया कीं पति पावोनि कांति जावि न विलया. ।
आपुलि हा वर दासी मागति, आली दया महावरदासी. ॥ ४७
त्यजुनि [9]मृतनिभा, उतरे हरि; वासुकिचाहि मोहजळ [10]भांउ तरे. ।
जाणोनि [11]हरादीना स्तवि अहि, 'मज रक्ष [12]मृतिजनिहरा दीना. ॥ ४८
अतिदुःसह [13]जात्या गा! अहि, या कोपा अधीन [14]सहजा; त्यागा ।
मी तों न क्षम, जनका विश्वाच्या, सापराध मानु मज नका.' ॥ ४९
कृष्ण स्वस्था नागा सांगे, 'सकुटुंब जा निजस्थाना गा; ।
खगपतिभय [15]आगामीं तूज न; केली क्षमा तुझ्या आगा मीं. ॥ ५०
परमाप्त गणिल [16]विनतानंदन [17]मत्पादलांछिता तुज [18]विनता. ।
वस निःशंक [19]रमणकीं, [20]मत्पादांभोजभृंग [21]पक्षिरमण कीं. ॥ ५१
जा ऱ्हदओकामधुनी; पुरवू [22]गोमर्त्यखगमनःकाम [23]धुनी. ।
पळ न लवि [24]प्रस्थाना; सोडीं या देवधेनुविप्रस्थाना. ॥ ५२
जें शासन तुज, गाया [25]संध्यायुगळीं स्मरेल जो, भुजगा, या ।

---

१. अधमाचें दमन करण्याविषयीं ईहा म्ह० इच्छा आहे ज्यास, अशा कृष्णास. २. त्याच्या बायका. ३. कमलनेत्रास. ४. नवऱ्याचें संरक्षण. ५. हे सर्वांच्या प्रभो. ६. अपराध. ७. अशक्तास. ८. प्राणदान. ९. प्रेतवतास. १०. वासुकीचा बंधु काळिया. ११. सांबादिकांच्या प्रभूस. १२. जन्ममरण हरण करणाऱ्या. १३. जातीनें. 'जात्या' ही संस्कृताप्रमाणें तृतीया होय. 'त्यागा' म्ह० त्यागाला. (त्याग करण्याला.) १४. बरोबर उत्पन्न झालेल्या. 'सहजा' हें 'कोपा याचें विशेषण. १५. यापुढें. १६. गरुड. १७. माझ्या पायांच्या चिन्हानें युक्त. १८. नम्रास. १९. रमणक नांवाच्या द्वीपांत. २०. माझ्या चरणकमलींचे भ्रमर. २१. गरुड. २२. गाई, माणसें, पक्षी, यांच्या मनाची इच्छा. २३. नदी. २४. निघण्यास. २५ सूर्योदय आणि अस्तमान या दोन्ही वेळीं.

माझ्या दासा दर हो न तुम्हांपासूनि; मत्पदा सादर हो.' ॥ ९३
आज्ञापि **विभु** जगाचा ऐसा, भ्रम मद हरूनि या भुजगाचा. ।
त्या शुभकाळिं यशोधी **प्रभु** पूजुनि, निजमनासि **काळिय** [1]शोधी. ॥ ९४
शुचिमानस [2]मुद्राशी, **प्रभु**सि नमुनि, जाय सहजन समुद्राशी; ।
अमृतनिभा **सवित्याची** होय सुता; कीर्ति विश्वभासवित्याची! ॥ ९५

## अध्याय सतरावा.

नागांतक **गरुड** बळी, त्याला निजरक्षणार्थ देति अहि बळी. ।
**काळिय** त्यास न मानी, भक्षि बळी अन्यदत्तही अभिमानी. ॥ १
[3]जंगम विषतरु डांसी युद्धीं हा **काळिय** प्रबळ **गरुडासी**. ।
नाग भगवदंशा या चुकला नाहींच उग्रजव दंशाया. ॥ २
झडपोनि उडवि [4]पक्षानिळवेगें त्या, खगेंद्र **गरुड**, [5]विपक्षा. ।
वातानें तृण सुकलें, तेंवि पडे येथ; मरण म्हणवुनि चुकलें. ॥ ३
मृत्यु कदा न घडो, हा म्हणवुनि ये शरण, करुनियां [6]अघ, डोहा. ।
अहिस तशा, [7]पतगा या जो मुनिचा कळवि दैव शाप तगाया. ॥ ४
पूर्वीं एथिल मीनां [8]हरि; **सौभरि** मुनि निवारि, परि सोडीना; ।
[9]पतिशोकाकुलदीनां [10]वारिचरां अभय, शापही दे **वीनां**[11]. ॥ ५
'मृतचि पडो हा, (माजी वाचा हे सत्य), [12]**खगप** डोहामाजी, ।
येउनि [13]जरि दाविल यावरिही [14]अत्रत्य जळचराच्या विलया.' ॥ ६
अपराधीही जगला **गरुडापासोनि** नाग यास्तव तगला; ।
[15]हरिपदसारसमुद्राश्री होतां जाय सपरिवार समुद्रा. ॥ ७
जैसाचि [16]किरणमाळी, डोहांतुनियां निघे तसा [17]वनमाळी. ।
[18]जनलोचननलिनातें विकसित करि [19]शोकघनतमोमलिनांतें. ॥ ८

---

१. शुद्ध करी. २. आनंदाचा राशि. ३. चालणारा. 'जंगम विषतरु' हें 'काळिय' याचें विशेषण. ४. पंखांच्या वाऱ्याच्या वेगानें. ५. शत्रूस. ६. पातक. ७. पक्ष्यास, गरुडास. ८. हरण करी. ('मीन' म्ह० मत्स्य). ९. पतीच्या शोकानें व्याकुळ व दीन. १०. जलचरांस. ११. पक्षिपतीस म्ह० गरुडास. १२. गरुड. १३. जर. १४. एथील. १५. हरीच्या चरण-कमलाच्या मुद्रेची शोभा. 'हरिपदसारसमुद्राश्रिरिं' असाही पाठ आहे; तो वर लिहिलेल्या पाठापेक्षां बरा दिसतो. १६. सूर्य. १७. कृष्ण. १८. जनांचे डोळे हींच कमळें. १९. शोकरूपी मेघासंबंधी अंधकारानें मलीन अशांस.

उरवी शोक न कांहीं दि[1]व्यस्रग्गंधवस्त्रमणिकनकांहीं. ।
मंडित [2]रामानुजनी तापतमोहर शशी खरा मानुं जनीं. ॥ ९
कृष्णाची प्रिय मित्रें प्रथम गळां घालिती मिठी सुपवित्रें; ।
धरिति कडकडोनि भुजीं. यांच्या भाग्यांअशीं त्रिलोकीं न दुजीं. ॥ १०
धरि हृदयींच यशोदा [3]सुरवरदा नंद, रोहिणीहि, यशोदा. ।
गोपी सर्व [4]संदिष्टा आलिंगिति या [5]स्तनोपपीडसंदिष्टा. ॥ ११
भेटे भावास बळ प्रेमानें जाणता [6]प्रभावा सबळ. ।
हांसे सानंद मनें, कीं केला धन्य बंधु [7]कालिय दमनें. ॥ १२
व्रजलोकां सकळांतें [8]मूर्तप्राणात्मलाभ हा विकळांतें. ।
गो वृष वत्स द्रुमही [9]सुखनिर्भर; सर्व पावली मोद मही. ॥ १३
द्विज वदति, 'तुला नंदा, झाला सुतलाभ पात्र [10]अतुलानंदा. ।
तूं [11]कांचनगोदानें तीर्थी पुत्रोदयार्थ दे मोदानें.' ॥ १४
सविधि तयां तो दानें दे गोस्वर्णादि पूजुनी मोदानें. ।
नमि किंकरसा नंद द्विजवृंदा जोडुनि स्वकर सानंद. ॥ १५
पुरुषोत्तम हा भागा आला जिस सुतपणें अशि [12]महाभागा, ।
आलिंगी सूनुस ती [13]करुणा [14]तन्मुखसुधापिपासू नुसती. ॥ १६
अंकीं बैसवि मोक्षप्रद हा, करि तच्छिरींचि [15]अश्रुविमोक्ष; ।
[16]सुपयोवाहस्तन यावरि सोडिति, सुखद लागतां हस्त, [17]नया. ॥ १७
झाली होती रजनी; धरिलें तें वसतिला नदीतीर जनीं; ।
तों पेटे शुष्कवनीं वन्हि, जसा दोष तापकर दुष्कवनीं. ॥ १८
प्रळयाग्निसम ग्रासी वन, दे लोकांसि त्या भय समग्रांसी; ।
करि दव भस्म यदा, वी ज्वाला [18]स्वाहासुवल्लभ [19]स्मय दावी. ॥ १९

---

१. दिव्यस्रक् (मालिका म्ह० तुरा), गंध, वस्त्र, मणि, सुवर्ण (अलंकार) यांहीं. २. रामाचा धाकटा बंधु म्ह० कृष्ण. ३. देवांस वर देणाऱ्यास. ४. चांगलें आहे इच्छिलें ज्यांणीं. ५. स्तनांला उपपीडा (उत्तेजन) देणाऱ्या सन्मित्रास. ६. पराक्रमास. ७. बलराम हा शेषाचा अवतार म्हणून. ८. मूर्तिमान् प्राणलाभ. ९. सुखानें भरलेले. १०. अतुल आनंदा. ११. सुवर्ण आणि गाई यांचीं दानें. १२. महाभाग्यवान्. १३. सदय. १४. त्याचें मुख हेंच अमृत तद्विषयीं तृषित. १५. अश्रु सांडणें. १६. चांगलें दूध आहे ज्यांत असे स्तन. १७. नद्या. १८. स्वाहेचा नवरा. (अग्नि). १९. गर्व.

ज्याचें स्मरण हरीतें भवभय, गेले तयाचि शरण हरीतें. ।
पाहुनि लोकविकळतें, [1]जनरक्षेची तयांत दाखवि कळ ते. ॥ २०
जाळिल सर्वां सहित; प्रभुकृष्णदया[2]पयोद सर्वांस हित, ।
निज जन रक्षायास, ज्वलना पी; दे करूं न रक्षा यास. ॥ २१
ऐसा तो [3]जयशाली वनमाली [4]सद्धृदंबुरुहकोशाली ।
ये सदनास सकाळीं घालुनियां सर्व आप्तवर्ग सुकाळीं. ॥ २२

---

## अध्याय अठरावा.

गुण हरिबळदेवांचे वर्णाया, तद्याचि बळ दे वाचे. ।
करिती बाळक लीला वृंदावनिं, त्याचि होति काळ कलीला. ॥ १
वाजविती मुरलीला, गाती, नाचति; विलोकिती सुर लीला. ।
गडि होउनि [5]निर्वाणप्रददेवांस [6]प्रशंसिती [7]गीर्वाण. ॥ २
त्या [8]शुद्धसुकृतजलधिप्रभुमित्रांत प्रलंबनामक [9]मळधी ।
ये [10]गोपछद्मानें; खळ ओळखिला मनीं [11]रमासद्मानें; ॥ ३
द्वेष मनीं पर वाहे, जगदीश्वर हा धरीच ना परवा हे. ।
मांडी खेळा; याला वंचाया लागलाचि खेळायाला. ॥ ४
कृष्ण म्हणे, 'परिसा रे! दो ठायीं होउनी अशापरि सारे ।
खेळों येथूनि वडापर्यंत. [12]पराजितें वहावें [13]निर्वडा.' ॥ ५
झाले शिशु दो भागीं, प्रभु केले राम कृष्ण सुमहाभागीं. ।
होउनि घोडा, [14]वाला वाहे त्या, लावि यास जो डावाला. ॥ ६
ऐशी करिती क्रीडा, तें सुख पाहोनि मुक्तिहि धरी [15]व्रीडा. ।
[16]भवगदविपदगदगदाधरबळ हांसोनि हसवितीहि गदगदा. ॥ ७
श्रीदामा, वृषभ, असे संवगडि तिकडे, गणांत ज्या राम असे. ।
हे विजयासि लहाती, तैं पृष्ठीं माधवादि त्यांसि वहाती. ॥ ८

---

१. जनरक्षणाची. २. मेघ. ३. यशस्वी. ४. साधूंचें हृदय हेंच कोणी एक कमल त्यांतील कोशांतील अलि म्ह० भ्रमर. ५. मोक्ष देणाऱ्या देवांस (बलराम आणि कृष्ण.) ६. स्तविती. ७. देव. ८. शुद्ध सुकृताचे समुद्रच असे जे प्रभूचे मित्र त्यांत. ९. मलबुद्धि. १०. गोपवेषें. ११. लक्ष्मीसदनें (कृष्णें). १२. पराजय जाहलेल्यानें. १३. जिंकणारास. १४. वाला. १५. लज्जा. १६. संसाररूपी रोगास आणि विपत्तीस औषध असे कृष्ण आणि बळराम.

त्या बाळांपरि [1]भूतप्रभवही खेळांत जाहला [2]परिभूत. ।
लागे त्या [3]श्रीदामानाथा पृष्ठींच वाहणें श्रीदामा. ॥ ९
जो प्रिय [4]सात्वतऋषभा वाहे तो भद्रसेन पृष्ठीं वृषभा. ।
असुर सबळ देवातें घे जनिं पृष्ठीं प्रलंब बळदेवातें. ॥ १०
असुर पराजित वाहे रामा, नेणति हरीविणें कितवा हे. ।
आला बळ हातातें स्वांतांत म्हणे, 'करीन' खळ, 'घातातें.' ॥ ११
क्षुधित [5]श्वा [6]चिरं [7]सरसक्रव्येच्छू लोहगोळकाचि रसरस ।
[8]करिल्या घे तो कवळ [9]स्वांत; तसा यास रोहिणीतोक[10]बळ. ॥ १२
त्या [11]सुरवर्या देहिध्येयीं[12] घेउनि, [13]वटागमर्यादेही ।
लंघुन, घोट[14]करीन क्षिप्र पळे कीं, '[15]तदस्र घोट[16] करीन.' ॥ १३
खमतें नकळत हरिला, चोरें निधिसा, बळ प्रलंबें [17]हरिला. ।
जरि काढि पळ, वेची [18]बळभर [19]बळभर; खळा न बहु पळवेची. ॥ १४
प्रकटि खरा रूपा, पी जें गगनाला, असें [20]शरीरारू पापी. ।
लाजे काजळ [21]काया; गिरि उपमा मूर्तपातका जळका या ॥ १५
जेंवि [22]तमोनग नीच स्वर्णालंकारधर भरे गगनींच, ।
[23]सतडिन्मेघाउपरी चंद्र जसा, राम शोभला त्याचिपरी. ॥ १६
ऐसें [24]जगदभिरामा उडवुनि जेव्हां प्रलंब ने नभि रामा; ।
करुनि [25]निरीक्षणें [26]कायक्रौर्यातें, बळहि भय धरी क्षण [27]काय! ॥ १७
बळ त्या शत्रुशिरासी निज मुष्टीनें, न लाविता उशिरासी, ।
फोडि, जसा [28]शिखरीला वज्रें [29]हरि; काय भूतळीं [30]विखरीला. ॥ १८
मारुनि खळ, देवांतें, गोपांतें, सुखवि; तोहि बळदेवातें. ।

---

१. भूतांची (जगाची) उत्पत्ति आहे ज्यापासून. २. पराजित. ३. संपत्ति देणाऱ्या (लक्ष्मीपतीस). ४. यादवपतीस. ५. कुत्रा. ६. फार दिवस. ७. मधुर मांसाविषयीं इच्छा आहे ज्यास. ८. रसरस करणारास. (अतितप्तास.) ९. आपला मृत्यु. १०. बळराम. ११. सुरश्रेष्ठास. १२ मानवांनीं ध्यान करण्यास योग्य. १३. वटवृक्षमर्यादेस. १४. अश्व आणि हत्ती यांत श्रेष्ठ (वेगाविषयीं व शक्तीविषयीं). १५. त्याचें रक्त. १६. पिऊन टाकीन. १७. नेला. १८. त्याचें सर्व बळ. हें 'वेची' याचें कर्म. १९. बळरामाचें वजन. २०. दुष्ट. २१. शरीराला. २२. अंधाराचा पर्वत. २३. विजेसकट जो मेघ त्यावर. २४. जगाचा मूर्तिमंत हर्ष. २५. अवलोकन. २६. शरीराच्या क्रूरपणाला. २७. जसा कांहीं धरितोच असा भासला. २८. पर्वताला. २९. इंद्र. ३०. विदारून पाडिला.

गाजविति समस्त वनें जयजयनादें पयोधरसम[1] स्तवनें. ॥ १९
देवनिवह[2] रामाला दिव्य सुमाच्या निजाहितहरा[3] माला ।
अर्पिति, कीं हरसाच द्युति[4]कीर्तिबळें अमर्त्यरिपुहर[5] साच. ॥ २०
आलिंगुनि बळभद्र प्रियसख वदती, 'तुझ्या भुजीं बळ भद्र[6] ।
वर्धिष्णु[7] महाबाहो[8]! राहो; ऐसाचि विजय सुमहा[9] बाहो.[10]' ॥ २१

---

## अध्याय एकोणिसावा.

गोपशिशूंचा त्रिसर[11] क्रीडा करि, तों पडे पशूंचा विसर; ।
नव यवसीं[12] ज्यांसि रती[13], मुंजारण्यांत[14] गोधनें त्या शिरती. ॥ १
भ्याले बाळक सारे म्हणती, 'आला स्वघातकाळ कसा रे!' ।
हुडकिति, धांवति मागें कष्टें, निजगोधनासि पावति मागें[15]. ॥ २
तृषितशिशुमुखें सुकलीं, वळलीं निज गोधनें वनीं जीं चुकलीं. ।
हरिशब्दें हंबरती, गोधनसेना स्वरें भरी अंबरें[16] ती. ॥ ३
कठिन फिराया गहन[17]; ग्रास[18] कराया अशांत आला दहन[19]; ।
त्या पवमान[20] सहाय; त्रस्त पशुप[21] म्हणति मृदुलमानस, 'हाय[22]!' ॥ ४
म्हणती गोप, 'हरि! लया[23] पावतसों; तुजविणें दुजा न हरिल या. ।
आला कीं अंत[24], रतिप्रद[25] पद रामा, तुझे अहा अंतरती! ॥ ५
हीं[26] आज न रक्षा[27] हो[28] शरणागत दीनदासजन; रक्षा हो. ।
वांचेल कवण बा? हा! कल्पांताग्नीस पाडि ठक वणवा हा.' ॥ ६
मुंजवनानलदर[29] हा जाणोनि म्हणे, 'उगे', दयाजलद[30], रहा; ।
झांका रे! नयनां; हीं रक्षितसें गोधनें, तुम्हां भय नाहीं.' ॥ ७
झांकी जन नेत्रास; क्षणमात्रें तो लया अजन[31] ने त्रास[32]. ।
पी भगवान् कृष्णपथा[33]; न विनाशति लागले[34] भले कृष्णपथा[35]. ॥ ८

---

१. मेघासारिखे. २. समुदाय. ३. स्वशत्रुनाशकास; किंवा 'निज' म्ह० आपल्या (देवांच्या.) ४. तेज. ५. अमर्त्य म्ह० देव. रिपुहर म्ह० दैत्यहर. ६. कल्याण. ७. वृद्धिंगत. ८. हे पराक्रमी. ९. उत्तम आनंदाला. १०. बोलावो. ११. समुदाय. १२. गवतांत. १३. प्रीति. १४. मुंजगवताच्या रानांत. १५. माग लावून. १६. आकाश. १७. अरण्य. १८. खाण्यास. १९. वणवा. २०. वारा. २१. गोप. २२. खेददर्शक. २३. नाशाला. २४. मरण. २५. प्रियकर. २६. हे आम्ही दासजन. २७. राख. २८. होवो. २९. मुंजवनांतील वणव्याचें भय. ३०. कृष्ण. ३१. जन्मरहित. (कृष्ण.) ३२. भय. ३३. अग्नीला. ३४. लागलेले. ३५. भगवद्भक्तीला.

काळ भयानक दापी[1] न हरिजना; विषय दे भया न कदापी. ।
घे घनवात कवि तुळे[2], हरिच्या स्मरणीं भवादि घातक वितुळे. ॥ ९
उघडुनियां नयनातें भांडीरवटाप्रती[3] निजानयनातें[4] ।
जाणुनि, हासति चित्रें[5] मित्रें; झालीं तटस्थ; भासति चित्रें. ॥ १०
ताप हरि[6] अमृतगुरुचि[7] क्षणभरि; तापघ्न तरि हरि अमृतगुरुचि[8]. ।
त्याचा, तत्पा[9], दास प्राप्त कसा होय, सेविता पादास? ॥ ११
रक्षुनियां हा निकर[10], स्वविरहताप व्रजाबळाहानिकर[11], ।
जाउनि सांजे, हरिला जीवनदत्वें[12] घनत्व[13] साजे[14] हरिला. ॥ १२
सांगति तों शिशु[15] भवनीं[16], 'बळकृष्णीं आजि नाशिलें अशुभ[17] वनीं; ।
न तसा यम, रावण वा[18], एक असा असुर, आणि दुसरा वणवा. ॥ १३
हा निरवधिबळ[19] देवप्रवर[20] पळामाजि असुर वधि बळदेव. ।
कृष्णें जीवनदानें वांचविले दहनिं सर्व जीव नदानें.' ॥ १४
ऐसा निज तोकांनीं कथिला वृत्तांत; ऐकुनी तो कानीं, ।
देवप्रवर वसुमतीवरि[21], हें समजति सदार[22] बल्लव[23] सुमती[24]. ॥ १५

---

## अध्याय विसावा.

बळकृष्ण उदारमती घनकाळींही वनांतचि सदा रमती. ।
होतां वृष्टि उभविती वृक्षक्रोडीं[25]; गुहांत सुख अनुभविति. ॥ १
हरिनें धेनु वळाव्या शब्दें, त्या जवळुनी न दूर ढळाव्या. ।
त्या स्रवती बृहदूधें[26] ऐकुनियां वेणुरव सुखावह दूधें. ॥ २
वदनीं शशिरुचिरांनीं[27] प्रभु घेती कंदमूळफळरुचि रानीं. ।
सेविति दधिभात शिळा, गोपांसह तें करूनियां ताट शिळा. ॥ ३

---

१. दटावी. २. उपमेला. ३. वटविशेष. जेथें पूर्वी खेळत होते तेथें. ४. आपल्या आणण्याला. ५. चमत्कारिक. ६. हरण करी. ७. अमृतवर्षाव करणारीं किरणें ज्याचीं, त्या चंद्राची प्रभा. ८. मोक्षप्रद. ९. त्या किरणांच्या स्वामीस म्ह० चंद्रास. १०. समुदाय. ११. गोकुळांतील स्त्रियांस हानि करणारा असा (विरहताप.) १२. जीवरूपी जीवन (पाणी) देई म्हणून. १३. मेघता. १४. शोभे. १५. मुलगे. १६. घरांत. १७. भय. १८. अथवा. १९. अमर्याद बळ ज्याचें. २०. देवश्रेष्ठ. २१. पृथ्वीवर. २२. सकलत्र. २३ गौळी. २४. सुमती म्ह० सुबुद्धि. २५. वृक्षांच्या डहाळ्या. २६. मोठ्या कासेनें. २७. चंद्रवत् सुंदर मुखांनीं.

## अध्याय एकविसावा.

होतां शरदागम[1], जे दावि वनश्री[2] नटोनि वरदा[3] गमजे[4], ।
ते कां पाहे नाकाधीशवनीं[5] ? वर्णितांहि वाहे[6] नाका. ॥ १
जो[7] बहु दे कुतुक; मळेंरहित जळें[8], विकसितें करी ऋतु कमळें; ।
तीं चषकेंचि[9] मधुरसें[10] भरि; सेवुनि गाति मधुप[11] फार मधुरसें[12]. ॥ २
शीतसुरभिसुख[13] रानीं मारुत[14], अलिनीं[15] विनोदितीं[16] मुखरांनीं[17]. ।
फळदळकुसुमें[18] ऋतु जीं सजि[19] विपिनें[20] म्हणति, 'लघु[21] वनें मेरु ! तुजीं.' ३
अद्भुत परिमल[22] याचा; विभव[23] उणा चंदनाढ्य[24] परि मलयाचा[25]. ।
कीं तेथें अहि[26] तेंगती[27]; एथें नाहींच सर्वथा अहितगति[28]. ॥ ४
कुसुमितवनमधुपांनीं[29] मदमत्तांनीं अनेकखगमधुपांनीं ।
अद्रि[30], सरोवर, सरिता[31], नादित. राखे न ठाव[32] गीतरस[33] रिता[34]. ॥ ५
सबळ[35] कमळनाभ[36] वनीं त्या रत; लीलोत्क[37] गोपललना भवनीं. ।
ने चाराया सुरभी[38], जो भगवान् विश्वपावन[39] यशें सुरभी[40]. ॥ ६
वाजवि माधव मुरली, विश्वमनोवृत्ति ऐकतां रवें[41] मुरली[42]. ।
व्रजयुवति भुलति, काया स्तंभ पडे; कल्पवृक्ष विभु[43], लतिका[44] या. ॥ ७
नटपतिसम जगदर्ह[45] श्रुतियुगलीं[46] कर्णिकार, धरि शिरिं बर्ह[47], ।
स्वर्णवसन[48], वनमाला; वाजवि वेणू; सवें सख्यांचा पाळा. ॥ ८
हृद्यविलोकन[49], कपटप्राकृत[50], कृतिमृग्य[51], विधिगुरु[52], कनकपट[53], ।
तो व्रजराज नटपती देखाया सर्व गोपिकाजन टपती. ॥ ९

---

१. शरदृतुचें येणें. २. अरण्यशोभा. ३. कृष्णाला. ४. डौल, हावभाव. ५. नंदनवनांत. ६. मुरडी. ७. ऋतु. ८. पाण्यें. ९. पात्रें. १०. मधुरसानें. ११. मधु पिणारे, भ्रमर. १२. गोड. १३. शीतळ सुवासापासून सुख आहे ज्याच्या असा (मारुत). १४. वायु. १५. भ्रमरांनीं. १६. नाद भरितीं. हें 'रानीं' याचें विशेषण. १७. शब्दकरांनीं. १८. फळें; पत्रें आणि पुष्पें इहींकरून. १९. शोभवी. २० अरण्यें. 'म्हणती' याचा कर्ता 'तीं' (अध्याहृत). २१. लहान. २२. सुगंध. २३. भाग्य. २४. चंदनानें भरलेला. २५. मलयाद्रीचा. २६. सर्प. २७. वसतात. २८. अहिताची (शत्रूची) गति. २९. प्रफुल्लवनांतील मधुपान करून मदमत्त झालेले जे अनेक आकाशांत गमन करणारे भ्रमर यांहींकरून. ३०. पर्वत. ३१. नदी. ३२. ठिकाण. ३३. गायनरस. ३४. रिकामा. ३५. बळरामासहित. ३६. कृष्ण. ३७. लीलेविषयीं उत्कंठित. ३८. गाई. ३९. विश्वपवित्र. ४०. कामधेनु, कल्पवृक्ष. ४१. शब्द. ४२. थाली. ४३. प्रभु. ४४. वल्लि. ४५. जगत्पूज्य. ४६. दोन्ही कानांत. 'कर्णिकार' अलंकारविशेष; कणियार. ४७. मयूरपुच्छ. ४८. सुवर्णकांतीचें आहे वस्त्र ज्याला किंवा पीतांबर, 'धरि' याचें कर्म. ४९. मनोहर पाहणें. ५०. कपटानें प्राकृत म्ह० सगुण. ५१. चतुरांनीं शोधण्यास योग्य. ५२. ब्रह्मदेवाचा बाप. ५३. पीतवासा.

वेणु मधुरतर[1] वाजे वनिं; मोहे युवति, पी तदमृतरवा[2] जे. ।
हृदयसरीं[3] मदनकरी[4] धृतिनलिनोद्धृतिस[5] उशिर उन्मद[6] न करी. ॥ १०
वृंदावनिं तारी ती वर्णिति हरि वेणुचीच वनिता रीती. ।
गाउनि देवास, 'रहा विरहा,' म्हणती, 'उगा;' क्रमिति वासर हा. ॥ ११

---

## अध्याय बाविसावा.

हेमंतीं सुकुमारी[7] कात्यायन्यर्चनव्रतासि[8] कुमारी ।
करिती, 'कृष्ण निजपती हो[9]' या कामें[10]; सतीस[11] पूजुनि, जपती[12]. ॥ १
यमुनेच्याचि शुभवनीं[13] न्हाती, जों सुप्त[14] गोप गो शिशु भवनीं[15]. ।
मूर्ति रुचिर[16] सिकतेची[17] अर्चिति[18]; मनिं हरिचिया रुचि[19] रसिकतेची[20]. ॥ २
त्या सुनियमपर[21] मास व्रत करिती, चिंतुनी सतत परमास[22]. ।
म्हणती, 'अभिनव[23] राहो प्रेम जननि! हरि यशःसुरभि[24] नवरा हो[25].' ॥ ३
त्या युवतिजनिं[26], सकाळीं स्नानें करितां, क्रमूनि[27] रजनिस, काळीं[28] ।
जाणुनि भक्ति, वरद[22] ये ससख[29]; तयांवरि करी विमुक्तिवर[22] दये. ॥ ४
खेळति जळिं; हरिसिच या गाति; अशांतचि तटींचिया हरि[30] सिचया[31]. ।
समधिष्ठुनि[32] नीपं[33], गडी हांसवि; हांसे स्वयें फिरवुनी पगडी. ॥ ५
हरि तद्धृदया[34]; गेया[35] लीला[36] करि; त्यां म्हणे, वरद, 'या गे! या; ।
घ्या सुमुखि! सपदि[37] वसन[38]; प्रकटी जों रूप नाम रसप[39] दिवस न. ॥ ६
यमुनेचा सहवास त्यागा, घ्या एकएक वा[40] सह[41] वास[42]. ।
नर्म[43] न हें, अनृतहि[44] मी न वदें, व्रतकर्शिता[45] तुम्ही प्रसृत[46] हिमीं[47].' ॥ ७

---

१. फार मधुर. २. त्याच्या (वेणूच्या) अमृततुल्य ध्वनीस. ३. हृदयरूपी सरोवरीं. ४. मदनरूपी हत्ती. ५. धैर्यरूपी कमळणीला वर उपडून काढण्यास. ६. मदोन्मत्त. ७. अत्यंत नाजूक. ८. पार्वतीच्या पूजेच्या व्रताला. ९. होवो. १०. इच्छेनें. ११. पार्वतीस. १२. जप करिती. १३. पवित्र उदकांत. १४. निद्रित. १५. घरीं. १६. सुंदर. १७. वाळूची. १८. पूजिती. १९. आवड. २०. शृंगाराची. २१. नियमाविषयीं तत्पर. २२. कृष्णास. २३. नूतन म्हणून फार. २४. कीर्तीविषयीं सुरभि म्ह० कामधेनु. २५. होवो. २६. स्त्रीलोकांत. २७. घालवून. २८. योग्यकाळीं. २९. गड्यांसहित. ३०. हरण करी. ३१. वस्त्रांस. ३२. चढून. ३३. कदंबवृक्ष. ३४. त्यांच्या हृदया. ३५. गाण्यास योग्य. ३६. क्रीडा. ३७. लौकर. ३८. वस्त्र. ३९. रस म्ह० पाणी आकर्षण करून घेणारा. (सूर्य). ४०. अथवा. ४१. एकत्र. ४२. वस्त्र. ४३. थट्टा. ४४. खोटें. ४५. व्रतानें कृश झालेल्या. ४६. पसरलेल्या. ४७. थंडींत.

ऐकुनि यापरि [1]हासप्रेमव्रीडाकुळाबळा परिहास, ।
निघति, न वसति; [2]हिंवाळा बहु; त्या उठती, जळीं न बसतिहि [3]बाळा.॥८
प्रभुसि म्हणति धन्या या, 'न करीं, वसनें हरूनि, हरि ! अन्याया, ।
जाणों, तुज, [4]सानंद व्रज मानी; [5]श्लाघ्य तूं बहु जसा नंद. ॥ ९
तूं प्रिय, सदयहि, मानें श्रेष्ठहि; कांपे जळांत हृदय हिमानें. ।
अबळांस वसनदानें रक्षावें त्वां [6]दयामृतरसनदानें. ॥ १०
हे श्यामा! रमणीया! [7]त्वदुदित करुं, दासिका तुझ्या [8]रमणी या. ।
धर्मज्ञा ! दे [9]वास; स्पष्ट, न देतां, कथूं [10]नंदादेवास.' ॥ ११
देव वदे [11]प्रमदांसी, 'वचनातें करितसां जरी मम दासी ! ।
सत्वर [12]कूलासिच या; मागुनियां घ्या [13]मनोनुकूला सिचया.' ॥ १२
वेधी[14] हरिहि मन; दिला वचनाला मान, धैर्य [15]हरि हिम; नदिला ।
सोडिति; कांपति; लाजे त्यजिति; नको ते धरावि कां [16]पतिला जे?॥ १३
नुरवि मनीं पापासी जो हरि, [17]तत्पादपूतनीपापासीं ।
येती [18]सुदति, [19]शयांनीं स्मरगृह झांकुनि, तटासि [20]मुदतिशयांनीं. ॥ १४
निर्मळ भाव सतींचा देखे हरि [21]सुकृतसुगुणभावसतींचा; ।
प्रीत परात्पर [22]महित [23]स्कंधनिहितवस्त्र तो वदे परम [24]हितें. ॥ १५
वदतो सस्मित [25]लपनें, 'तीर्थीं[26] केलीं व्रतीं [27]विवसन [28]स्नपनें; ।
करुनि अशा [29]परमागा देवाच्या, मागतीं कशा वर [30]मागा? ॥ १६
हो[31] व्याकुळ न मन; [32]करा जोडुनि, अंजलि शिरीं धरा; नमन करा. ।
येणें पाप सरेल, व्रतफळसंसिद्धिची कृपा पसरेल.' ॥ १७
'चुकलों वाटेला,' जे [33]व्रतविच्युति ते खरीच वाटे; लाजे ।
विसरुनि, नमिति हरिस; त्या जाणति कीं [34]हाचि सर्व दोष [35]हरि [36]सत्या. ॥ १८

---

१ हास्यप्रेमाच्या लज्जेनें व्याकुळ अशा बायका. परिहास म्ह० थट्टा. २. थंडी. ३. स्त्रिया. ४. आनंदानें. ५. स्तुत्य. ६. दयारूपी अमृतरसाचा नद. ७. तूं सांगितलेलें. ८. सुंदर स्त्रिया. ९. वस्त्र. १०. नंदाला. ११. स्त्रियांला. १२. तीराला. १३. मनास आवडेल त्या. १४. आकर्षी. १५. हरण करी. १६. कृष्णाला. १७. त्याच्या पायानें पवित्र झालेल्या कदंबवृक्षाजवळ. १८. स्त्रिया. १९. हातांनीं. २०. फार आनंदानें. २१. पुण्य, सद्गुण, आणि कांति (सौंदर्य) यांचीं रहाण्याचीं स्थळें. हें पद 'सतींचा' याचें विशेषण आहे. २२. पूजित. २३ स्कंधीं वस्त्रें आहेत धरिलीं ज्याणें. २४. मनासारिखें. २५. तोंडानें. २६. यमुनेच्या तीर्थोदकीं. २७. नागव्यानें. २८. स्नानें. २९. मोठ्या अपराधास. ३०. मागतां. ३१. होवो. ३२. हस्तास. ३३. व्रतभंग. ३४. कृष्ण. ३५. हरण करितो. ३६. स्त्रिया.

[1]सर्वजगद्भावन ती स्त्रींची [2]सकरुण विलोकिं [3]सद्भावनति. ।
[4]स्वाधिगमायासवती गौरवि; कीं **श्री**सही गमाया सवती. ॥ १९
[5]रक्तसितासितहरितें वस्त्रें, नेसुनि [6]सकाम [7]विलसित, हरितें ।
पाहति, [8]निरुपमनियती; चिंतिति [9]यच्चरणदेवतरुप मनिं [10]यती. ॥ २०
जे मनिं, दे वर ते [11]हा; 'सत्वरचि,' म्हणे 'पुरेल,' देव, '[12]रतेहा. ।
येत्या [13]रजनीमाजी संगति पावाल [14]सादर जनीं माजी.' ॥ २१
करि [15]कुतुका [16]मदनारिप्रियगुण; तोषवि [17]समस्तकामद नारी. ।
हरिविण गणिति **व्रज** न प्रियतम; वचनें परंतु करिति [18]व्रजन. ॥ २२
वारूनि [19]महागाई स्त्रीकामाची, [20]संदिष्टतम हा [21]गाई. ।
चारित गेला [22]वृंदाविपिनाहुनि दूर [23]सबळ हरि [24]गोवृंदा. ॥ २३
तारी दीन [25]गजा, ती [26]सुखमूर्ती स्तवि पदोपदीं [27]नगजाति. ।
न करिति अन्यायासीं उपकृतिची जोडि; कीं न अन्या यासीं. ॥ २४
स्वसुखाची [28]सर्वगाई करित वनीं, **गो**[29]पवृंदवासव गाई ।
ने **यमुने यदुप** [30]रमापति; कीं करणार [31]यज्विमद [32]तदुपरमा. ॥ २५
करिति नमन [33]दीसलिला, पीति [34]सगोधन [35]सुधोपम [36]नदीसलिला. ।
सोडिति पशु [37]तदुपवनीं, बसति तटीं; सुखद जें [38]सुरभिमृदुपवनीं. ॥ २६

---

१. सर्व जगाची उत्पत्ति ज्यापासून तो. (कृष्ण.) २. कृपाळु. (कृष्ण.) ३. सद्भावयुक्त नमस्कार. ४. आपण (कृष्णानें) प्राप्त व्हावें याविषयीं प्रयत्न करणाऱ्या. ५. तांबडीं, शुभ्र, काळीं, आणि हिरवीं. ६.कामातुर. ७. सुंदर. ८. ज्यांच्या सुदैवास उपमा नाहीं अशा. ९.ज्याचे चरणरूप कल्पतरु. १०. संन्यासी. ११. जे वर (मिळावे असें त्यांच्या मनीं होतें) ते हा (कृष्ण) दे. १२. सुरताची इच्छा. १३. रात्रीं. १४. आदरयुक्त. १५. कौतुकास. १६. सांबास प्रिय आहेत गुण ज्याचे. १७. सर्व इच्छा पूर्ण करणारा. १८. गमन. १९. कमताई, इच्छा. २०, सज्जनास अत्यंत प्रिय. २१. गायन करी. २२. वृंदावनापासून. २३. बळरामासकट. २४. गाईंच्या कळपास. २५. गजेंद्रास. २६. सुख देणारी मूर्ति (प्रभूची.) २७. वृक्षजाति. हा 'स्तवि'चा कर्ता. 'अन्यायासीं'=अन्यआयासीं, (स्तवनाशिवाय) दुसऱ्या आयासांनीं. यासीं म्ह० कृष्णास. २८. विपुलता, स्वस्तता. २९. गोपसमूहाचा इंद्र. (कृष्ण.) ३०. कृष्ण. ३१. यज्ञ करणारे जे (ऋषि) त्यांचा गर्व. ३२. त्यांच्या गर्वाच्या नाशास. ३३. दृष्टीस पडलेलीस. (यमुनेस). ३४. गाईंच्या समवेत. ३५. अमृततुल्य. ३६. नदीच्या पाण्यास. ३७. त्याच्या जवळच्या रानांत. ३८. सुवास आणि मृदु वारे यांनीं.

## अध्याय तेविसावा.

गोपांच्या भूक [१]बळा लागे. मग विनविले [२]स्वयंभू [३]कवळा. ।
येति [४]दयोदधिभक्त प्रातःकाळीं, न आणितां [५]दधिभक्त. ॥ १
निर्जजन [६]अन्नपर महा, जाणे, [७]द्विजदार सुप्रसन्न परम, [८]हा. ।
[९]क्षुद्बाधा [१०]सकळबळा मित्रांच्या; ये [११]दयांबुधीस कळवळा. ॥ २
हरि जो [१२]दासत्रास, प्रभु धाडी गोप ते तदा [१३]सत्रास. ।
चिंतुनि [१४]नाकजय, जनीं जवळि [१५]सुरांच्याचि [१६]निरत [१७]सुद्विज [१८]यजनीं ! ॥ ३
सांगे तो, 'यजन मुनी करिति सुरांचें; [१९]तदंघ्रितोयज नमुनी, ।
[२०]आर्याच्या मागोनी, मन्नाम कथूनि, अन्न घ्या मागोनी. ॥ ४
निजलोकास [२१]त्राते करिती आंगिरसनामका [२२]सत्रा ते. ।
जवळि सदा [२३]सवशाला आहे;' कथि त्या जना पदास वशाला. ॥ ५
गेले [२४]तोकमृग जळा धांवुनि [२५]विषयेच्छु [२६]विप्रलोकमृगजळा. ।
न हरी ताप [२७]सभा जी, त्याची बरवी दुरूनि [२८]तापसभा जी ! ॥ ६
ते [२९]मूक [३०]बधिर अंध; श्री[३१]शा [३२]अमृतप्रदा न अर्पिति [३३]अंध. ।
आले परतोनीच. [३४]श्रुतमहिमा द्विजसमूह, [३५]पर तो नीच. ॥ ७
'होउनि [३६]सन्नत [३७]याचा [३८]साध्वीजन; वृत्ति [३९]सुप्रसन्न तयाच्या. ।
भेटीचा मनिं [४०]काम, [४१]स्वन्न समर्पिल [४२]सुबुद्धिधाम [४३]निकाम. ॥ ८
'आलों रामासहित' श्रवणें वाटेल [४४]विप्ररामांस हित. ।
[४५]धृतिच्या आया; [४६]सरिता करुणेच्या; न करितील आयास [४७]रिता.' ॥ ९

---

१. समुदायास. २. बळराम आणि कृष्ण. ३. अन्नासाठीं. ४. कृष्णभक्त. (गोप.) ५. दहीं-भात. ६. अन्नेच्छु. ७. ऋषिपत्न्या. ८. कृष्ण. ९. भुकेपासून पीडा. १०. सर्व समुदायास. ११. कृष्णास. १२. दासांचीं भयें. १३. यज्ञाजवळ. १४. स्वर्गप्राप्ति. १५. देवांच्या. १६. तत्पर. १७. ते उत्तम ब्राह्मण. १८. यज्ञ करण्याविषयीं. १९. तत्पादकमल. २०. बळराम दादाच्या मागून, म्ह० आधीं बळरामाचें नांव सांगून मग माझें सांगा. २१. तारणारे. २२. यज्ञास. २३. यज्ञशाळा. २४. बाळ(गोप)रूपी मृग. २५. 'विप्रलोक' याचें विशेषण. २६. ब्राह्मण-समुदाय हाच मृगजळ. २७. समुदाय. २८. तपस्व्याची कांति. २९. मुके. ते म्ह० ऋषि. ३० बहिरे. ३१. प्रभूस. ३२. मोक्ष देणाऱ्यास. ३३. अन्न. 'आले' याचा कर्ता 'गोप' (अध्याहृत). ३४. गाजलेला आहे महिमा ज्यांचा. ३५. परंतु. ३६. अतिनम्र. ३७. मागा, प्रार्था. ३८. पतिव्रता(ऋषिपत्नी)समुदाय. ३९. दयाळू. ४०. इच्छा. ४१. सुअन्न. ४२. सद्बुद्धीचें गृह, (तो जन). ४३. स्वेच्छेनें. ४४. ऋषिस्त्रियांस. ४५. धैर्याच्या. ४६. नद्या. ४७. रिकामा, निष्फळ.

नाशक जो [1]अशिवाचा. त्याची ऐकोन गोप ते अशि वाचा, ।
त्याच्या [2]त्वपदीं नमनें, पत्नीशाळेंत करिति [3]मुदधीन मनें. ॥ १०
म्हणती, 'देवि! भुकेले, आले श्रुत रामकृष्ण जे [4]विभु केले. ।
अन्नें द्या [5]अशना या [6]सानुचरां प्रभुंस; शांतवा [7]अशनाया. ॥ ११
मतिस विभू दे [8]वसति स्वपदिं [9]नतांच्या, तयास [10]भूदेवसती, ।
[11]सुखनिर्भर, परिसोनी होती, पावोनि [12]अधन ज्यापरि [13]सोनीं. ॥ १२
त्यजिति तदा [14]सवशाला, हरिला देखावया [15]स्वदासवशाला ।
त्या [16]प्रभुभक्तिरुचिरसें निवती घेउनि [17]चतुर्विधान्न [18]रुचिरसें. ॥ १३
न [19]रुचे [20]धाम निकाम; प्राशावी [21]श्रीशनखसुधा मनिं काम ।
बहु बहु [22]वासर; हातीं वेळा, मग भिउनि कां [23]धवास रहाती? ॥ १४
गुरु बांधव पति तानीं बाळें या जरि निवारिल्या [24]पतितांनीं, ।
[25]सरिता [26]पारावारा जाति; सुदुर्धरचि जेंवि पारा, वारा. ॥ १५
लंघुनियां [27]बंधुकडे गेल्या [28]प्रेमापगा [29]स्वसुखसिंधुकडे; ।
कोणी परि वाराया, न शकति सोडूनि जाति [30]परिवारा या. ॥ १६
[31]यमुनोपवनीं [32]महिला शोभवि, त्या पाहती मुनींच्या [33]महिला. ।
अद्भुतरूप मन हरी, सर्वामृतफलद [34]सुरतरूपम न हरी. ॥ १७
[35]श्याम [36]भुवनवनमाळी [37]पल्लवशिखिपिच्छधातुंनीं, वनमाळी, ।
[38]कनकांबर नटला. जे शोभा याची, तिला मदननट लाजे. ॥ १८
मुख [39]रुचिर [40]सदलकांहीं; [41]नयनतुळे ये न [42]तामरसदल कांहीं. ।
[43]श्रवणीं [44]उत्पल [45]विलसे; ताप न तेजें [46]स्मितामृत न पळविलसे. ॥ १९

---

१. संकटाचा. २. कृष्णपदीं. ३. आनंदाच्या अधीन. ४. प्रभु. ५. जेवण्यासाठीं. ६. ससेवकास. ७. भूक. ८. ठाव. ९. नम्रांच्या, सेवकांच्या (मतिस). १०. ब्राह्मणस्त्रिया. ११. सुखानें भरलेल्या. १२. दरिद्री. १३. सुवर्ण. १४. यज्ञशाला. १५ स्वसेवकांच्या स्वाधीन. १६. ईश्वरभक्तीची जी गोडी तिच्या रसानें. १७. चार प्रकारचें अन्नः— खाद्य, लेह्य, चोष्य, आणि पेय. १८. गोड असें. १९. आवडे. २०. गृह. २१. कृष्णनखाचें अमृत. २२. दिवस. २३. नवऱ्यास. २४. गुरु, बांधव, पति, तानीं बाळें, या पतितांनीं (पाप्यांनीं) निवारिल्या (प्रतिबंधित केल्या) तरी. २५. नद्या. २६. समुद्रास. २७. आप्तलोकरूपी पर्वताचे कडे. २८. प्रेमनद्या. २९. निजसुखसमुद्राजवळ. ३०. आप्तजनसमूह. ३१. यमुनेवरील अरण्यांत. ३२. भूमीला. ३३. स्त्रिया. ३४. कल्पतरूची उपमा देण्यास योग्य. ३५. कृष्णवर्ण. ३६. जगद्रूपी वनांतील माळी. ३७. वृक्षपल्लव, मयूरपिच्छ आणि अलंकार यांहीं (नटला). ३८. पीतांबरधारी. ३९. सुंदर. ४०. चांगल्या केसांनीं. ४१. नेत्रोपमेस. ४२. कमलपत्र. ४३. कर्णीं. ४४. कमळ. ४५. शोभे. ४६. हास्यामृत.

सुहृदंसीं[1] भुज, गाभा नीलद्युतिचा[2], तया महाभुजगाभा[3], ।
ठेवुनि हरि शोकमळा त्या दक्षें[4] फिरवि देववर तो कमळा. ॥ २०
पाहुनि सुभग[5] असा, या मधुपी[6] इच्छिति पदांबुजींच[7] असाया. ।
हृदयीं आणुनि कामप्रदमूर्तिस[8], भेटती सुबुद्धि निकाम. ॥ २१
चेतोहरसुखकायब्रह्मप्रेक्षणज[9] बोलवे सुख काय? ।
न धरी चलन वपु[10], तळ्या अमृताच्या पिउनि, दिसति अभिनव पुतळ्या. २२
बोले हरि, 'या हो! या; आलां माझ्याहि मोद[11] हृदया होयां[12]. ।
बरवें केलें येणें, मज देखायासि मन भुकेलें येणें. ॥ २३
मी आत्माप्रिय समजे ऐसें ज्यांला, सुशील[13], सत्क्रिय[14], सम[15] जे, ।
तेचि कुशल साच; रती[16] धरुनी मद्भक्ति मत्फला आचरती. ॥ २४
देहप्राणमनमतिस्वजनस्त्रीसुतधनादि[17] हीं प्रिय गमती ।
संपर्कास्तव[18] लोकां ज्यांच्या[19], प्रिय कोण त्याविणे अवलोकां[20]? ॥ २५
जा, सेवा सर्व[21]; वाटे प्रेक्षिति[22] भोगार्थि[23] देव वासव[24] वाटे. ।
संपवितिल सत्रास स्वर्गेच्छु पती; तुम्हांसह न संत्रास[25].' ॥ २६
ऐकुनियां असि वाणी, लागे हृदयां स्त्रियांचिया असिवाणी[26]. ।
म्हणति, 'असें न वद, मना परुष[27] गमे दीनवत्सला, भवदमना[28]. ॥ २७
रक्षीं निज निगमातें[29]; आम्हा करवे न एथुनि जनिं गमातें[30]. ।
विरहज्वरदृढकलिलस्वांतातें[31] सदय पाय काय ढकलिल? ॥ २८
दासी प्राप्ता सहसा टाकुनि, म्हणतोसि काय आप्तांस 'हसा'? ।
करिं वाचा सत्य जुनी; आलों स्वजनत्रपाभयास[32] त्यजुनी. ॥ २९

---

१. मित्रस्कंधीं. २. नीलकांतीचा. ३. महासर्पासारिखा. (सर्पांगासारिखे भुज असणें ही शोभा मानितात.) ४. उजव्या (हातानें). ५. सुंदर. ६. ऋषिपत्न्यारूपी भ्रमरी. ७. पदकमळींच. ८. इच्छित देणाऱ्या मूर्तीस. ९. चित्तास हरण करणारा आणि सुखानें भरलेला काय आहे ज्याचा असें जें ब्रह्म (कृष्ण) त्यास पाहिल्यावरून झालेलें. १०. शरीर. ११. आनंद. १२. होण्यासाठीं. १३. सुस्वभावी. १४. चांगली आहे क्रिया ज्यांची. १५. सर्वसमान. १६. प्रीति. १७. शरीर, प्राण, मन, स्वमति, स्वजन, स्त्री, सुत, धन, आदिकरून. १८. सहवासामुळें. १९. 'देहप्राण' इत्यादिकांच्या. २०. अवलोकितां. २१ यज्ञास. २२. पाहती. २३. स्वभागेच्छू. २४. इंद्र. २५. सभय, त्रासलेले. 'तुम्हांसह=तुम्हांबरोबर. २६. तरवारीसारिखी. २७. कठोर. २८. हे संसारदमना. २९. वेदवचनातें. ३०. जाणें. ३१. विरहरूपी ज्वरानें फार गढूळ झालें आहे अंतःकरण ज्याचें त्यास. ३२. आप्तांची लज्जा व भय.

[1]पतिपितृजनहीनांही आश्रय देणार सर्व जनही नाहीं; ।
आम्ही तरि हरि ! काय स्वगति [2]किजे, जीव जरी [3]परिहरि [4]काय ?॥ ३०
तुलसी[5]दाम तुडविलें, निर्माल्य पदें अनादरेंही उडविलें, ।
धरुं दासि शिरावरि तें; [6]तापाकुल मन तया [7]सुशिशिरा वरितें.' ॥ ३१
बोले [8]दीनप हा, ती काकुळती परिसुनी, 'पदीं न पहाती, ।
[9]अघदृष्टि [10]पतितनयन; स्तवितिल जे अन्य लोकहि, [11]पतितनय न. ॥ ३२
तुम्ही [12]सुकृतनदि सती; अनुमोदिति हे पहा [13]अमरजन, दिसती. ।
[14]संततें बहुधा माजा ध्यास असों द्या मनासि बहु; धामा जा. ॥ ३३
स्वसुखा, स्नेहाला वा, न समृद्धी अंगसंग दे हा; लावा ।
मद्रूपीं मन; या हो; पावा लौकरि [15]सुखाब्धिधाम [16]नया हो !' ॥ ३४
अत्युत्सव वाटाया पत्यादिजनासि, जाति [17]सवाटा या. ।
न मनुनि [18]अपरा, धव दे प्रिय आलिंगन; गणूनि अपराध वदे. ॥ ३५
रत निज [19]महिला भजनीं हरिच्या, येणें [20]गतभ्रमहि लाभ जनीं ।
मानुनि मुनि अतितर, ते झाले [21]अनुतप्त [22]भवनदीपति तरते. ॥ ३६
पति जाउं न दे, हातें धरि एका स्त्रीस, ते त्यजुन देहातें, ।
पावे [23]परें माप तिला [24]चैतन्यें; दे स्वरूप [25]परमा पतिला. ॥ ३७
'जाउं न दीजे [26]वाया [27]सिक्थ,' कथुनि हें [28]दयानदी जेवाया ।
लागे [29]बल्लवविसरासह; जे न तदीयपादपल्लव [30]विसरा. ॥ ३८
कौतुक [31]गाढें करि; तो त्या अन्नें, उदरि धरिं जगा, ढेंकरितो. ।
प्रेमें बहु [32]धाला; हे तृप्ति अशी अन्यथा न [33]बहुधा [34]लाहे. ॥ ३९
तापवि [35]वाडवमतितें निजकर्म[36]मदाख्य विष दुवाड; वमति तें. ।
वर्णिति गुरुसम जाया, कीं या हेतु स्वलाभ गुरु समजाया. ॥ ४०

---

१. पति आणि पितृजन यांपासून भ्रष्ट झालेल्यांस. २. करावी. ३. सोडी, त्यजी. ४. देह. ५. माळा. ६. तापानें व्याकुळ. ७. अतिशीतळ. ८. अनाथनाथ. (कृष्ण.) ९. निंदारूपी दृष्टि ज्यांची. १०. पापचक्षु. ११. 'पति' आणि 'तनय' स्तवितील इतकेंच नव्हे; परंतु इतर जनही इ०. १२. पुण्यनदी. १३. देव. १४. नेहमीं. १५. सुखसागरसदना. १६. हे नद्यांनो. १७. यज्ञाच्या स्थानीं. १८. दुसऱ्या अशा. १९. स्त्रिया. २०. गेला आहे भ्रम ज्यांचा. २१. पश्चात्तापानें तापलेले. २२. संसारसागर. २३. श्रेष्ठ. माप म्ह० लक्ष्मीपति, कृष्ण. २४. ज्ञानयोगें. २५. श्रेष्ठास. २६. व्यर्थ. २७. शीत (भाताचें.) २८. कृष्ण. २९. गौळिसमूहासकट. ३०. जे तदीयपादपल्लव ते न विसरा. ३१. मोठें 'धरि' म्ह० जरि धरी तरीही. ३२. तृप्त झाला. ३३. बहुत प्रकारेंकरून. ३४. पावे. ३५. ब्राह्मणमतीला. ३६. मदच (गर्व) आहे नाम ज्यास.

‘हरिची र[1]तिदा रजनींदिवस अधिक भक्ति स[2]द्विरति दा[3]रजनीं. ।
आपण त[4]द्रहित महासुज्ञानी;’ म्हणति, ‘वंचि[5]लों स्व[6]हितमहा.’ ॥
‘भगवान् हरि, य[7]दुपकृति स्वजनमुखें सूचवी अशी य[8]दुप कृ[9]ती; ।
क[10]र्ममदासवपानें, नेणों न भजों दिल्या पदास व[11]पानें. ॥
आम्ही अ[12]बुध न्या[13]याचार्य जरी; स्त्रीहि सुमति बहु धन्या या. ।
निज दृष्टि अ[14]सीम धुरा पी, या हरिगुणसुधानदी अशि मधुरा. ॥
शास्त्र पढोनि अशास्त्री आम्ही; परि धन्य, कीं जयांसि अशा स्त्री.
नेणों धर्म; ठकविते माया; भुललों; अभक्त, क[15]र्मठ कवि ते. ॥
कुल, विद्याभ्यास, कळा, व्रत, दीक्षा[16], कर्मकुशळता, या सकळा ।
लागो आग; मनाला भक्ति न; हरिच्याहि विमुख आगमनाला. ॥
हरिली मति मायेनें; कर्मपथीं दीन हे भ्रमति मा[17]येनें; ।
तारावें, स[18]दयाला हरि! शरणागत असों तुला सदयाला. ॥
घे न महाजन कानें, ऐसा अपराध परम हा जनकानें ।
क्षमिजेचि; अशी माया दीनिं तुझी! साधु गातिल असीमा या.’ ॥
स्मरुनी निज पापातें, प्रार्थिति हरिला, धरूनि अनुतापातें. ।
[19]मुनिमानसहंसाचें दर्शन घेती; न भय मनीं कंसाचें. ॥

---

## अध्याय चोविसावा.

जो मुनिलोकां मं[20]दहा तारी स[21]द्वृंदसेव्यपद का[22]मद हा, ।
नरतनु हरि; या, गवळी, कळती, जे सिद्ध करिति ह[23]रियागबळी.
जाणे, परि सानंदा, वृद्धा गोपांत जो नवासा, नंदा ।
प्रार्थुनि, दा[24]सभ्रमहा पुसतो कीं, ‘आज कोण हो! संभ्र[25]म हा? ॥

---

१. प्रियकर. २. सद्भाव. ३. निजस्त्रियांच्या ठायीं. ४. त्या ‘सद्विरति’रहित. ५
६. स्वहितोत्साहास. ७. जो उपकार. ८. यादवपालक. ९. कुशल. १०. कर्म आणि कोणी एक आसव (मद्य) त्याच्या पिण्यानें. ११. मांसानें म्ह० गर्वानें, मस्तीमुळें. १
१२. न्यायानें चालण्यास सांगणारे. १४. अमर्याद. १५. केवळ कर्ममार्गानें चालणारे. १ यागादि. १७. भ्रमानें. १८. साधूंचें कल्याणच असा जो तूं तुजला. १९. कृष्णाचें. हनन करणारा. २१. साधुसमूहानें सेवन करण्यास योग्य आहे पद ज्याचें. २२. इच्छा णारा. २३. इंद्रयागाकरितां बळी. २४. दासाचा भ्रम घालविणारा. २५. उत्साह, तयार

मी तों बाळ; परि [1]सेवा कां करितां? हें तुम्ही दयाळ परिसवा.’ ।
[2]लीलामानवदेहा **नंद** [3]ऋतुदेवताफळादि वदे हा. ॥ ३
[4]सुरपतियाग रहाया युक्ति वदे वेदशास्त्रसागर हा या; ।
मानेसाहि त्यातें; [5]गोद्विजमख करवि, लावि साहित्यातें. ॥ ४
टाकुनियां [6]**जं**भारी, [7]तद्यज्ञार्थ प्रकल्पितीं संभारीं ।
गोद्विजमख तैं करवी [8]अखिलेश्वर [9]**श**क्रगर्वतिमिरैकरवी. ॥ ५
[10]अन्नांबरहेमानें केले संतुष्ट विप्रवर हे मानें; ।
होमाच्या [11]अवसानीं पूजुनि गाईस तर्पिती [12]यवसांनीं. ॥ ६
पूजिति [13]सांग नगा, (ती रीति सुखाचीच!) गोप [14]सांगन गाती. ।
**ह**रि [15]बळें [16]साप्त [17]अहार्यप्रदक्षिणा करिति [18]सपशुवृंद [19]सहार्य. ॥ ७
बहु विश्वास गमाया, लोकांला **कृ**ष्ण दाखवी मग माया. ।
[20]रूपेतर **वि**[21]भु धरि तो. [22]पावनलीला करूनि जगदुद्धरितो. ॥ ८
धरुनि [23]बृहद्वपुसि खरा गिरिसाचि वसे, [24]अधिष्ठुनी [25]नगशिखरा. ।
त्यांसि म्हणे ‘परिसा, रे! वाटतसां इष्ट अवयवांपरि सारे. ॥ ९
कथितों सर्वांसि खरी वाणी; **गो**वर्धन स्वयें मी [26]शिखरी. ।
[27]शुचि भावें बाळक हो! दर्शन दिधलें तुम्हांसि गोपाळक हो.’ ॥ १०
तोषवुनि [28]पशुप, [29]हरि **श्री**चा सेवी समस्त मग [30]उपहार. ।
[31]**श्री**वास, हित कराया, जोडी आपणहि गोपसहित करा या, ॥ ११
[31]सिंधु अगाध रसाचा कुतुकाच्या **ह**रि; नमी अगा! [32]धरे साचा. ।
‘धरुनी भाव नमा, गा,’ **दे**व म्हणे, ‘यास वर [33]निजावन मागा. ॥ १२
तोषवि नयन मन; करा जोडुनि याला, धरा विनय, नमन करा. ।
होय जना [34]दरकारी हिंसक, [35]त्या मूढ जे अनादरकारी. ॥ १३

---

१. यज्ञास. २. लीलेनें मानवदेह धारण केलेल्यास. ३. यज्ञाची देवता व फळ इत्यादि. ४. इंद्रयाग. ५. गाई व ब्राह्मण यांकरितां यज्ञ. ६. इंद्र. ७. त्याच्या यज्ञासाठीं योजिलेल्या तयारींत. ८. अविनाश. ९. इंद्रगर्व हाच कोणीएक अंधार त्यास महान् सूर्यच. १०. अन्न, वस्त्र, आणि सुवर्ण यांहीं. ११. शेवटीं. १२. गवतांनीं. १३. यथाविधि. १४. सदार, बायकांसह. १५. बळराम. १६. आप्तांसकट. १७. पर्वतप्रदक्षिणा. १८. गाईच्या समुदायासह. १९. वडिलांसहवर्तमान. २०. अन्य रूप. २१. प्रभु. २२. पवित्र क्रीडा. २३. मोठें देह. २४. चढून. (हें क्रियापद सकर्मक आहे.) २५. पर्वतशिखरास. २६. पर्वत. २७. पवित्र. २८. गोप. २९. रमापति. ३०. उपयान, भेट, नजराणा. ३१. सागर. ३२. पर्वत. हें ‘नमी’ याचें कर्म. ३३. निजरक्षण. ३४. भिवविणारा. ३५. गोवर्धनदेवतेला.

वंदा हो! [1]गोत्रातें; देइल कल्याण आमुच्या [2]गोत्रातें. ।
हा प्रभु [3]गोवर्धन हो! गोवृद्धि करू; यथार्थ [4]गोवर्धन [5]हो. ॥ १४
करवी याग असा; या जाय जनासह मग, स्थळास असाया. ।
त्याच्याचि पदीं नमना करितों, स्थिति देउ दीन[6]सख दीन मना. ॥ १५

## अध्याय पंचविसावा.

म[7]दभाजन कोपाया इं[8]द्र, करी हरि [9]अमर्षजनकोपाया; ।
भंगी काम खरा, हे गोष्टि कळे दे[10]वनायका, मख राहे. ॥ १
मखभंगें [11]शतकोटिप्रहरण गणि गोपमं[12]तुच्या शत कोटी. ।
हृदयिं न [13]सामावेचि क्रोध; अदंडा नया [14]ससामा वेची. ॥ २
जडले अंगा रचिते ताप, न डोळे, [15]रुडग्निअंगारचि ते; ।
श्वासोच्छ्वासहि भाते; त्याचीच न सोसवे तयासहि [16]भा ते! ॥ ३
कोपें चोळूनि करा, बाहे [17]कल्पांतकरपयोधरनिकरा. ।
सांगे, 'जाऊनि, करा नंदव्रज [18]नामशेष; जाऊ नि[19]करा. ॥ ४
सुज्ञ बरा, न [20]टवाळा; त्या कृष्णा भजति गोप रानट बाळा. ।
कां साहेल? [21]नयज्ञा ईशा मजसहित करिति हे[22]लेन यज्ञा. ॥ ५
[23]व्रज न जगो, [24]पानीया वर्षा; केलें अनिष्ट गोपांनीं या. ।
क्षण न तगो धन; [25]दावा उगवा; दृष्टिस पुन्हा न गोधन [26]दावा. ॥ ६
लाविति मज पद वडिला, कीं नाहीं श्रीम[27]दावलेप दवडिला. ।
ऐसा दं[28]डक राजा साहेल कसा? निघाचि, दंड करा जा. ॥ ७
मी [29]ऐरावतनागारूढचि येतोंहि; [30]उद्धरा वतना [31]गा!' ।
निश्चित बोले, '[32]खपती गोप, करा तें,' असेंचि तो [33]लेखपती. ॥ ८

१. पर्वतातें. २. कुळातें. ३. पर्वताचें नांव. ४. गाईस वाढविणारा. ५. होवो. ६. अनाथाचा मित्र. ७. गर्वपात्र, गर्वानें भरलेला. (हें 'इंद्र' याचें विशेषण.) ८. याचा कर्ता 'हरि,' आणि 'अमर्षजनकोपाया' हें कर्म. ९. राग उत्पन्न करण्याचा उपाय. १०. इंद्रास. ११. वज्रशस्त्री (इंद्र). १२. गवळ्यांच्या अपराधांच्या. १३. मावे. १४. सामासहित वेची म्ह० सोडी. १५. क्रोधरूपी अग्नीचे निखारे. १६. तेज. १७. कल्पांत करणारे असे जे मेघसमूह त्यांस. १८. नाम मात्र शेष रहावें ज्यांचें असें (नंदव्रज) करा, म्ह० अगदी नाश करावा. १९. अनर्थास, नाशास. २०. निंदा करणारा. २१. न्याय जाणणारा, व देवश्रेष्ठ असा जो मी त्या मजसह. २२. निंदा. २३. गोकुळ. २४. पाण्यास. २५. द्वेष. २६. दाखवा. २७. संपत्तीपासून झालेला जो मद व गर्व तो. २८. रीति, मार्ग. २९. ऐरावत नामा हत्तीवर बसलेला. ३०. राखा. ३१. अगा. ३२. मरती. ३३. देवांचा स्वामी. (इंद्र.)

सोडिति जल, दगड, दया; पाडिति गृह, वृक्ष, [1]अशनि [2]जलद [3]गडद या. ।
भासति ते दगड गडी काळातें उग्र; [4]मेघवृंद गडगडी. ॥ ९
वर्षति [5]बहुतर [6]वारी; [7]घनकाळकरीं विजाचि बहु तरवारी; ।
[8]धन्वी [9]शरधारी; ती युद्धाची भासलीच [10]बहुधा रीति. ॥ १०
शब्द भयंकर; कानीं शूळ उठे, वर्षतां [11]महाकरकांनीं; ।
[12]अचळा हाले; खांचा पडती; संक्षोभ होय हा [13]लेखांचा. ॥ ११
मनिं इंद्र वदे, 'वांचा [14]खेळ हो, अपराध करुनि गुरुदेवांचा! ।
[15]कृष्णनराश्रित राना गिरि[16]लाहि पुजूनि, कां भयासि तराना? ॥ १२
भीति अपारसि तानीं बाळें पावति [17]सुनिष्कृपा [18]रसितांनीं; ।
दुःसह तो काळ; पति[19]क्रोडीं स्त्री, घेउनी [20]स्वतोका, लपती. ॥ १३
करु पाहति घात बळें, [21]काळपयोदावहप्रलयवातबळें. ।
न घडे [22]धारण; [23]धारा [24]स्थूला, उपमेसि होय [25]धारण [26]धारा! ॥ १४
कांपे [27]अत्यासारानिलपातें [28]पशुपलोक [29]नृत्यासारा. ।
स्थळ [30]उन्नत खळगे हा पूर भरी; न उरवी जलद खळ [31]गेहीं. ॥ १५
देहीं [32]वत्सशिरा या गाई झांकूनि, कृष्णचरणिं शिराया, ।
येती; कांपति तानीं बाळें; करुणा करावि कां [33]पतितांनीं! ॥ १६
[34]आबाळस्थविर हिता गति नेणति एक [35]कृष्णनाथविरहिता; ।
वरिती [36]सादर [37]तरणी [38]हरिपदयुगलीच, भरंवसा [39]दरतरणीं. ॥ १७
प्रार्थिति दीन जगाया कीं, 'पाळक तूं [40]दयानदीन जगा या; ।
[41]सुमहाभागा! रानीं मरतों गा! [42]वज्रसंनिभा गारांनीं.' ॥ १८

---

१. वज्र. २. मेघ. ३. कडाक्यानें. ४. मेघसमूह. ५. फारच. ६. पाणी. ७. मेघरूपी काळाचे हातीं. ८. इंद्रधनुष्य पडलें असे म्हणून. ९. पाण्याच्या धारा हेच कोणी बाण त्यांस धारण करणारे. १०. बहुत प्रकारांनीं. ११. मोठ्या गारांनीं. १२. पृथ्वी. १३ देवांचा. १४. दुष्ट हो. १५. कृष्ण मानवाचा आश्रय केला आहे ज्यांणीं असे जे तुम्ही. १६. पर्वतास. १७. अत्युग्र. १८. मेघगर्जनांनीं. १९. पोटीं. २०. आपआपल्या मुलांस. २१. काळासारख्या मेघांस आणणारीं प्रलयवायूंचीं बळें (समुदाय). २२. धरणें (सहन करणें). २३. मेघाच्या. २४. मोठ्या. २५. खांब. २६. लहान. २७. असंत वृष्टि व वादळ यांच्या पडण्यानें. २८. गवळी. २९. नाचासारिखा. ३०. उंच. ३१. घरांत. ३२. वासरांच्या डोक्यांस. ३३. पडलेल्यांनीं, (पातक्यांनीं), मेघांनीं इ० ३४. बाळापासून वृद्धापर्यंत. ३५. 'गति'चें विशेषण. ३६. आदरानें. ३७. नौका. ३८. कृष्णपदें. ३९. भयापासून तरण्याविषयीं. ४०. दयासागर. ४१. हे महासमर्था. ४२. वज्रासारिख्या.

क्रोधवशतम[1] न्यूनें मानें[2] जो होय, त्याचि शतमन्यूनें[3] ।
केलें हें, सकळ कळे; रक्षाया दीनबंधु[4] यांस कळकळे. ॥ १९
'श्रम झाले, खायाचा कीं न दिला भाग. काय लेखा[5] याचा ? ।
श्रीमदतम[6] हानीच; त्रिदशपतित्वेंचि[7] मत्ततम[8] हा[9] नीच. ॥ २०
स्मयघन[10] वारावा; हे मद तों वरि, जों न दंडवारा[11] वाहे. ।
तारि कटाक्ष, मला जे नत; अळसें हाचि एकटा क्षम[12] लाजे[13] ?' ॥ २१
हें मनिं आणि[14], खरा हो[15] व्रजजनविश्वास[16], बिरुद[17] आणिख राहो. ।
गोवर्धन हरि हातें एकें धरि; भय समस्तही हरि हा[18] तें. ॥ २२
उकरुनि[19] मूलासहित, छत्राका[20] बाळ धरि तसा, श्रमरहित ।
लीलेनेंचि धरातें[21] उचली; काय प्रयास विश्वधरातें[22] ? ॥ २३
सांगे नंदास महापूरुष, मात्रादिगोपवृंदा[23] समहा, ।
'या; धोका[24] मनिं वारा[25]; पर्वतगर्तीं[26] शिरा, निकाम[27] निर्वारा[28]. ॥ २४
गिरिच्या[29] ! कां, पतनाचा धाक धरुनि, वृष्टिमाजि[30] कांपत नाचा[31] ? ।
गोपावनिपा[32] ! तनया सत्य गणीं; मत्कराहुनि[33] निपात[34] न या[35]. ॥ २५
घनपवनासिहि न भिजे[36] तुमचें हाले न लोमें[37], येथें न भिजे; ।
गोधनसह[38] या, हो ! या; स्थळ केलें स्वास्थ्य[39] शीघ्र हृदया होया.' ॥ २६
धांवुनि जन, खळगा जो, त्यांत शिरति; सर्व म्हणति, 'घनें[41] खळ गाजो. ।
ऐसाचि सबळबाहो[42] ! कृष्णा ! दीनावनक्षम[43] सबळ[44], बा ! हो.' ॥ २७

---

१. क्रोधाच्या फार स्वाधीन. २. अपमानानें. ३. इंद्रानें. शत (शंभर) मन्यु (यज्ञ) ज्यानें केले तो. ४. कृष्ण. ५. बिशाद, किंमत. ६. संपत्तीपासून जो गर्व तोच कोणीएक अंधार. ७. इंद्रत्वानें. ८. फार माजलेला. ९. इंद्र. १०. गर्वरूपी पर्जन्य; अथवा गर्व आणि पर्जन्य. ११. दंडरूपी वारा. १२. योग्य. १३. लाजण्यास. १४. आणिलें. १५. होवो. १६. गोकुळींच्या लोकांनीं आपल्यावर ठेविलेला भरंवसा. १७. नांव, प्रतिज्ञा. १८. कृष्ण. १९. निखळून. २०. अळंब्यास. २१. पर्वतास. २२. विश्वाला धरणाऱ्यास. २३. आई वगैरे आनंदित गोपसमूहास. २४. भयास. (मनिं म्ह० मनांतून.) २५. घालवा. २६. पर्वताच्या दरींत. २७. स्वेच्छ. २८. वाऱ्याविरहित. २९. पर्वताच्या. ३०. पर्जन्यांत. ३१. नाचतां. ३२. हे गोकुळपते ! ३३. माझ्या हातांतून. ३४. पडणें. ३५. 'कर सोडिल नग, मोहें चित्ताला तुमचिया कदा न गमो हें' असाही पाठ आहे. ३६. भ्यावें. ३७. पर्जन्यानें तुमचें लोम (केश) भिजणार नाहीं, व तें लोम वाऱ्यानें हालणारहि नाहीं. ३८. गाईसहवर्तमान. ३९. स्वस्थता. ४०. न्हावया. ४१. मेघ. ४२. शक्तिमान् आहेत बाहू ज्याचे अशा. ४३. अनाथाचें रक्षण करण्यास समर्थ. ४४. बळरामासहित.

न प्रभु भागे; हातें गिरि धरि; [१]धारण जसा उभा [२]गेहांतें. ।
पाहति [३]वदन टकटका जन; मोहि [४]सुरांचियाहि [५]नरनट [६]कटका. ॥ २८
[७]नग धरि [८]सप्ताह, रितें[९] दावी वांछित करूनि [१०]दृप्तां [११]हरितें; ।
मनिं जो कां [१२]मदें, [१३]हातें तिमिरहि[१४] [१५]हरिरवि हरी [१६]स्वकामद हा तें. ॥ २९
[१७]सादर न स्तनिं [१८]तानीं; केलें उद्विग्न मनहि न [१९]स्तनितांनीं. ।
घातकि पातकि ते कीं गणुनि, त्यजिलेहि [२०]पक्ष्मपात कितेकीं; ॥ ३०
पीतां [२१]श्रीमुख [२२]खाणीं पाणी न स्मरति; उघडली [२३]सुखखाणी; ।
लक्ष्मीचा [२४]अनघ टिका सप्ताह उभा; गणी मनीं जन घटिका. ॥ ३१
केवळ त्या न नगाचा केला [२५]उद्धार, या जडाहि जगाचा. ।
केवश गिरिचें[२६] न उतरी, [२७]हरिमदभरही मुकुंद [२८]भवसिंधुतरी. ॥ ३२
'वृष्टि कशास ? न [२९]वारि त्यजा,' असें मेघ [३०]पाकशासन [३१]वारी. ।
कीं [३२]यांचा सर्व [३३]हरी, दावुनि [३४]योगानुभाव, [३५]मदगर्व हरी. ॥ ३३
[३६]उभले मेघ [३७]सरे हो; [३८]गर्वनगीं [३३]हरि चढे भ्रमें, घसरे हो ! ।
उरविल गर्व [३९]तमिं [४०]रवी केंवि ? [४१]पविपुढेंहि धैर्य पर्वत मिरवी ? ॥ ३४
देव वदे, 'हो ! सरला [४२]घन; [४३]तटिनीचाहि पूरही [४४]ओसरला; ।
टाकूनि निघा [४५]त्रास, स्त्रीसुत घेऊनि गोधना, पात्रास.' ॥ ३५
परिसुनियां जन [४६]सारे म्हणती, 'क्षणमात्र येथ आज नसा रे ! ।
सर्वहि बाहेर चला; कृष्णाच्या फार भार [४७]बाहे [४८]रचला.' ॥ ३६

---

१. खांब. २. घरातें. ३. तोंड. ४. देवांच्या. ५. नराचें सोंग घेतलें आहे ज्याणें. (कृष्ण.) ६. समूहास. 'कनकटप कटका' असाहि पाठ आहे. ७. पर्वत. ८. सात दिवस. ९. रिकामें, निरर्थक. १०. गर्विष्ठा. ११. इंद्रास. १२. गर्व. १३. हातानें. (गोवर्धन पर्वत धरून.) १४. अज्ञानरूपी अंधार. १५. कृष्णरूपी सूर्य. १६. निजांची (भक्तांची) इच्छा पूर्ण करणारा (कृष्ण.) १७. आदरपूर्वक. १८. लहान मुलें. कृष्णाच्या हाताकडेसच पाहत राहिलीं, असा अर्थ. १९. मेघगर्जनांनीं. २०. डोळ्यांचीं पातीं झांकणें. अस्खलित दृष्टीनें पाहत राहिले, असा भाव. २१. कृष्णाचें तोंड. २२. खाणें पिणें. २३. सुखाची खाण. २४. निर्मळ. (कृष्ण.) २५. वर उचलणें. २६. पर्वतच. २७. इंद्राचें गर्वरूपी ओझें (उतरी). २८. संसारसागरीं नौका. (कृष्ण.) २९. पाणी. (पाऊस पाडूं नका, असा भावार्थ.) ३०. इंद्र. ३१. सांगे; आज्ञा करी. ३२. इंद्राचा. ३३. कृष्ण. ३४. योगाचा म्ह० अमानुषशक्तीचा पराक्रम. ३५. अवसान व अभिमान. ३६. थांबले. ३७. पावसाच्या वृष्टीस. ३८. गर्वरूपी पर्वतावर. ३९. अंधाराच्या ठायीं. ४०. सूर्य. ४१. वज्रापुढें. ४२. पाऊस. ४३. नदीचा. ४४. काढला. ४५. भय. ४६. सर्व. ४७. बाहूला. (हाताला). ४८. केला. (झाला).

लोक निवे सर्व तसा, इंद्र मदहि गर्व, उतरि हरि[1] पर्वतसा. ।
मुदित[2] यशोदादिसती[3] झाल्या; उपमा न त्या प्रमोदा[4] दिसती. ॥ ३७
भेटति जन यांस[5] महा प्रेमें; मानी तदीय[6] मन यासम[7] हो. ।
आशीर्वादहि तातें[8] दिधले त्या, दे येदीय[9] पाद हितातें. ॥ ३८
सुर वाजविति नगारे; यश गाति, दुजांसि[10] म्हणति मुनिजन[11], 'गा रे!' ।
हसति अमृतघनगारे[12], 'हरिगुण[13] तापत्रयघ्न[14] सेविं नगारे[15]!' ॥ ३९
वांछिति न सुधाचमना[16], माने स्वर्गापरीस वसुधाच[17] मना. ।
विश्वाचाहि धणि वरी[18] नरता[19]; पाजी जनासि अमृत धणिवरी[20]. ॥ ४०
पहिला घन[21] तोयांचा[22]; मग पुष्पांचा प्रमोदघन[23] तो यांचा[24]. ।
गाति अदीनभगा[25] जे सुर, त्या गंभीर मुनिनदीं[26] नभ[27] गाजे. ॥ ४१
पावे मन मोदास[28]; स्तवन करुनि, म्हणति सर्वहि 'नमो' दास: ।
सुख तें पर्व[29] तदा वी[30]; प्रभु बहु वात्सल्य, धरुनि पर्वत, दावी. ॥ ४२
येतां भाउ[31] कलीला[32], तत्स्वतमोग्रंथि[33], करुनि भा, उकलीला[34]; ।
कीं हे भावुक[35] लीला गाउनि, जन नामशेष[36] भावु[37] कलीला[38]. ॥ ४३
विमर्द[39] करी अंगदमना[40] जो प्रभु, तद्यश[41] भवार्तिचें[42] अगद[43] मना. ।
स्वर्ग निपट[44] अधर[45]; धरा[46] यच्चरणें[47] उच्च; भज तयाचि धरधरा[48]. ॥ ४४
अंबुधरा[49] मारा[50] मापति[51] लाजवि, त्या मनोभिरामा[52] रामा[53] ।
भेटति; जलदवरा[54] या टाकुनि, आल्या विजा, अमृतद[55] वराया! ॥ ४५

---

१. कृष्ण. २. आनंदित. ३. स्त्रिया. ४. आनंदास. (उत्साहास.) ५. कृष्णास. ६. जनाचें. ७. अनुपम असा अर्थ. ८. नंदानें. ९. ज्याचें (कृष्णाचें). १०. दुसऱ्यांस. ११. ऋषिजन. १२. पाणी, मेघ व गारा यांस. १३. कृष्णगुण. १४. आध्यात्मिक, आधिभौतिक आणि आधिदैविक अशा तीन तापांतें नासून टाकणारे. १५. हे इंद्रा. १६ अमृतपानास. १७. पृथ्वीच. १८. स्वीकारी. १९. मनुष्यपणा. २०. तृप्ति होईपर्यंत. २१. पर्जन्य. २२. उदकांचा. २३. आनंद आहे फार ज्यांत. २४. देवांचा. २५. कृष्णभाग्यास. २६. सुस्वरांनीं. २७. आकाश. २८. आनंदास. २९. सण. ३०. उत्पन्न करी. ३१. इंद्र. ३२. तंद्यास. ३३. त्याचा अज्ञानांधाराचा बंध. ३४. सोडिला, मोकळा केला. ३५. भक्त, भावी. ३६. नाम मात्र शेष राहिलें आहे ज्याचें. ३७. मानावें. ३८. कलियुगाला. ३९. गर्वहीन. ४०. इंद्रास. ४१. त्याचें यश. ४२. संसारसंबंधी दुःखाचें. ४३. औषध. ४४. अत्यंत. ४५. खालीं. ४६. मृत्युलोक. ४७. ज्याच्या पादप्रसादेंकरून. ४८. गोवर्धनपर्वतधारी कृष्णास. ४९. मेघास. (श्यामवर्णानें.) ५०. कामदेवास. ५१. लक्ष्मीपति. (कृष्ण.) ५२. मनास आनंदकारक. ५३. स्त्रिया. ५४. मेघास. ५५. मोक्ष देणारा. (कृष्ण.)

गोपनदेवानंद प्रेमभरें जेंवि वासुदेवा नंद ।
भेटति सवपुरुहाया पदिं आलिंगोन राम भव पुरुहा या. ॥ ४६
रक्षुनि जन, [1]घन [2]बळहा याचा हरि गर्व, उरवि [3]अनघ न बळ हा; ।
प्रकटूनि यश, [4]स्वीया गो[5]ष्ठा घेवूनि ये प्रभु यशस्वी या. ॥ ४७
वेष्टुनि [6]जयशालीला, सेविति जन [7]कामधेनुपयशा लीला; ।
सत्य [8]मुकुंद [9]सुरभि ती; वत्स भजक गोप; इतर [10]असुर सुर [11]भिती. ॥ ४८

## अध्याय सव्विसावा.

अशिं सबळें [12]मुनिवित्तें [13]बक्यसुनाशाद्रिधारणान्तें [14]वित्तें ।
कर्में केलीं; हो तीं आठविती, सर्व गोप विस्मित होती. ॥ १
वदला जें काय कवी [15]गर्ग, [16]व्रजनाथ तें तयां आयकवी, ।
कीं, 'नारायणसम [17]यां सांगे,' हे गोप करिति [18]हीं या समया. ॥ २

## अध्याय सत्ताविसावा.

वि[19]क्रम पाहुनि [20]सुरभी, नि[21]जसंतति रक्षणें सुखावे [22]सुरभी. ।
ये ती पदनमनातें; [23]यांवांचुनि अन्य सुखद [24]पदें न मनातें. ॥ १
[25]अपराधी ये, [26]कांतीं श्रीच्या जाणुनि [27]दयास्थिती, एकांतीं. ।
[28]रविनिभमुकुटशिर कवी पदिं ठेवि, तयांत [29]रजें [30]भयघ्न शिरकवी. ॥ २
वंदी [31]हरिवाह, तसे चरण, श्री ज्यां कुचांचिवरि वाहतसे. ।
शेष[32]मळासि [33]उरकवी, लावुनि [34]पदपूतभूतळासि उर, [2]कवी. ॥ ३
जरि नाशी [35]तम, उरवी गुहेंत; करि ताप ही; न शीत [36]मउ रवी; ।
रज [37]लब्ध [38]शतमखा जें, उत्तम, [39]अमृतकर, न परवश [40]तमखाजें. ॥ ४

१. मेघ. २. इंद्र. ३. निर्मळ. (कृष्ण.) ४. आपल्या. ५. गोकुळास. ६. यशस्वियास. ७. कामधेनूच्या दुधासारिख्या. ८. कृष्ण. ९. कामधेनु. १०. जे भजक नसतील ते देव व दैत्य. ११. भितात. १२. ऋषींचें द्रव्य (कृष्ण) त्याणें. १३. पूतनेचे प्राण घेणें यापासून आरंभ होऊन गोवर्धन पर्वत धरणें एथपर्यंत. १४. प्रसिद्ध. १५. ज्ञानी गर्गऋषि. १६. नंद. १७. कृष्णास. १८. आश्चर्य. १९. पराक्रम. २०. कामधेनु. २१. गोरक्षणें. २२. ज्ञानी. २३. कृष्णपदावांचून. २४. स्थळ. २५. इंद्र. २६. कृष्णीं. २७. दयेला स्थान. २८. सूर्याप्रमाणें लखलखीत मुकुट आहे ज्यावर असें मस्तक. २९. मृत्तिकेचे कण. ३०. भयातें नाशणारे. ३१. इंद्र. ३२. राहिलेल्या मळास. (अज्ञानास.) ३३. संपवी. ३४. कृष्णपदानें पवित्र झालेल्या भूमीस. ३५. अंधार. ३६. मृदु. ३७. सांपडलेलें. ३८. इंद्रास. ३९. चंद्र; शीतल; मोक्षपद. ४०. अंधाराचें खाजें. (हा समास संस्कृत भाषेच्या नियमाप्रमाणें नाहीं. एक शब्द 'तम,' संस्कृत असून, 'खाजें' हा प्राकृत आहे.)

[1]प्रणतीं सुमृदु, [2]दर हरी जो, प्रभुवर्य [3]क्षमी [4]त्रिजगदुदर हरी; ।
जरिहि [5]अतिक्रम, [6]निवळे, वंदी जेव्हां पदांसि शक्र, मनिं [7]वळे. ॥ ५
'दे भाग्यमद भ्रम हा; केला अपराध तो न मम [8]दभ्र, [9]महा.' ।
ऐसें [10]हरि विनवि पदा प्रभुच्या, जो वंदितांचि उरवि न [11]विपदा. ॥ ६
वंदुनियां, स्तवन करी शक्र असें, रोष [12]विभु जयास्तव न करी. ।
दंड कसा? [13]चव दावी करुणेची; तेचि एक साच वदावी. ॥ ७
'तव [14]चरणसरोजांचा ध्यास न [15]मच्चित्त [16]लवहि विसरो; ज्यांचा ।
[17]भ्रमतम [18]रज कण वेची, [19]वाणि न करि [20]सत्प्रियतम रज [21]कणवेची. ॥ ८
सेवी शंभु [22]वनें [23]धणीवरि पायांचें तुझ्याचि, तूं [24]भुवनधणी. ।
[25]विश्ववरा! कामातें वश झालों; [26]श्रैष्ठ्यमद बरा का [27]मातें? ॥ ९
[28]लघुता यश [29]गौर वितें; [30]त्वत्पादनता [31]श्रुती [32]अनिश गौरवितें; ।
ते गणिली [33]अध मानें; केला हितघात म्यां महा अधमानें! ॥ १०
फार असावधसाच प्रभु! मी कीं आपुला असा वध साच, ।
सावध परि; वाराया; तूं गुरुवर, पाळिसी [34]स्वपरिवारा या. ॥ ११
बा! यापरिच यशातें जोडीं, सेवूनि [35]पादपरिचयशातें. ।
या [36]विभवा सतरावा तूं दाविसि, लोक कीं [37]भवास तरावा. ॥ १२
[38]स्वपर तरावे दास स्वयशें, हें विदित [39]परतरा वेदास. ।
तूं [40]शुचिसत्व [41]रसिकतें देसि, तरिच बुद्धि भक्ति सत्वर शिकते. ॥ १३
[42]त्रिभुवनकल्पद्रो! हें बहु पाप [43]त्वज्जनीं [44]अनल्पद्रोहें. ।
तूंचि [45]रसदयागातें [46]अर्ह, श्रुतिशत असेंचि [47]सदया! गातें. ॥ १४

---

१. शरणागतीं. २. भय. ३. क्षमा करणारा. ४. त्रैलोक्य उदरांत आहे ज्याच्या असा. ५. आज्ञेचें उल्लंघन, अपराध. ६. क्रोधरहित झाला. ७. सदय झाला. ८. क्षुल्लक. ९. मोठा. १०. इंद्र. ११. विपत्ति. १२. प्रभु, कृष्ण. १३. गोडी. १४. चरणरूपी कमळांचा. १५. माझें चित्त. १६. किंचित्‌हि. १७. भ्रमरूपी अंधार, किंवा भ्रम आणि अज्ञान. हें पद 'वेची' या क्रियापदाचें कर्म आहे. १८. रजोगुण हेंहि पद 'वेची' याचें कर्म आहे. १९. वाणीव. २०. साधूंस अत्यंत प्रिय असा जो रजःकण. २१. करुणेची. २२. उदक. २३. पोटभर, तृप्ति होईपर्यंत. २४. जगाचा स्वामी. २५. हे विश्वश्रेष्ठा. २६. थोरपणाविषयीं गर्व. २७. मजला. २८. लहानपण. २९. शुभ्र, निर्मळ. ३०. तुझ्या शरणागतास. ३१. वेद. ३२. नेहमीं. ३३. नीच. ३४. सेवकांस. ३५. पदप्राप्तिसुखें. ३६. पराक्रमास. ३७. संसारसागरास. ३८. आपल्याविषयीं तत्पर. ३९. श्रेष्ठाला. ४०. पवित्र आहे सत्व ज्याचें. ४१. गोडी. ४२. हे त्रिभुवनाच्या कल्पवृक्षा. ४३. माझ्या ठायीं. ४४. मोठ्या किंवा मोठ्याच्या द्रोहानें. ४५. मेघयज्ञातें. ४६. योग्य. ४७. हे दयाळो.

तूं प्रभु बहुल [1]क्षमिता; मत्कृतअपराधकोटि [2]बहुलक्षमिता; ।
[3]दीनप! [4]दासस्वामी! शरणागत होय तूज [5]दासस्वा! मी. ॥ १५
[6]प्रभुपदराजीवाचा स्पर्श, प्रिय शिष्य [7]बुध बरा [8]जीवाचा, ।
परि [9]नखराजी [10]वाचा स्तवुं न शके; गुण उणा खरा [11]जीवांचा. ॥ १६
[12]निजपदपद्मपरागासक्तेंद्रालिचिया, [13]श्रीसद्म! [14]परा गा! ।
टाकूनि सकप! रागा, [15]अनुपूर्वी धरिं मनीं न [16]शक्रपरागा.' ॥ १७
'सुख [17]मजपासाव [18]धरे होणार; स्वमनिं [19]नाकपा! सावध रे! ।
लवविं न [20]माने [21]स्तंभें; [22]श्रीमदमत्तहि मला न माने [23]स्तंभें; ॥ १८
कीं श्रीमदमत्त [24]नुरे; त्यासि गिळी काळ स[25]भ्रमद [26]मत्तनु रे! ।
हरितों श्रीमद हो! तों सरे, स्मरे मज; मग [27]स्वकामद होतों. ॥ १९
[28]स्तंभें कशास? नमा जें जा स्वपदा, भज विशंक, [29]शासन माजें.' ।
सदय [30]अनुग्र हरी ती आपुलि सांगे अशी [31]अनुग्रहरीति. ॥ २०
जो [32]विमळयश:सुरभी, ज्यापासुनि पावती [33]असाधु असुर [34]भी, ।
काळ [35]महाभयासुर [36]भी, प्रार्थी त्याला नमूनि भावें [37]सुरभी; ॥ २१
'कृष्णा! तुज वर दासी मागतसें भुवनपाळका! [38]वरदासी, ।
सर्व भितो [39]हरिवाहा; तूं [40]गोविप्रामरेंद्र हो, हरि! [41]वाहा. ॥ २२
कोण [42]महानलगेहाश्रय करि? कुळधर्मकाम हा नलगे, हा! ।
गोक्षितिदेवांस [43]वधी; बहु निष्ठुर फार भीति दे [44]वासवधी. ॥ २३

---

१. क्षमा करणारा. २. बहु लक्षांनीं मोजलेली (अपराधकोटि). ३. हे अनाथनाथा! ४. हे भक्तप्रभो! ५. भक्तांचें द्रव्य असा जो तूं त्या तुज. ६. प्रभूच्या चरणकमलाचा. ७. बुद्धिमान्. ८. बृहस्पतीचा. ९. 'नखराजी' म्ह० (तुझी) नखपंक्तिहि. १०. वाणी. ११. प्राण्याचा. १२. आपल्या चरणकमलाच्या परागांत म्ह० रजांमध्यें आसक्त असा जो इंद्ररूपी अलि म्ह० भ्रमर त्याच्या. १३. हे लक्ष्मीपते! १४. हे श्रेष्ठा! १५. पूर्वींप्रमाणें. १६. इंद्राच्या (माझ्या) महान् अपराधास. १७. माझ्यापासून. ('पासाव' हा 'पार्श्व'शब्दाचा अपभ्रंश आहे.) १८. पृथ्वीला. १९. हे स्वर्गपते! (इंद्रा!) २०. मानेला. २१. खांब. २२. संपत्तीच्या योगें माजलेला. २३. मूर्ख, गर्विष्ठ. २४. न उरे. (येथें 'न'वर्णांतील 'अ'स परसवर्ण आदेश झाला आहे.) २५. भ्रमविणारा. २६. मच्छरीररूपी. २७. इच्छा पुरविणारा. २८. गर्व. २९. आज्ञा. ३०. कोमल. ३१. उपदेशरीति. ३२. निर्मळ यशातें कामधेनूप्रमाणें देणारा. ३३. दुष्ट. ३४. भय. ३५. भयंकर. ३६. भय पावतो. ३७. कामधेनु. (इंद्र स्तुति करून थांबे तोंपर्यंत कामधेनु त्याच ठिकाणीं होती असें वाटतें.) ३८. वर देणारा असा जो तूं तुजपासीं. ३९. इंद्रास. ४०. गाई, ब्राह्मण, आणि देव यांचा इंद्र. ४१. पाळण कर. ४२. मोठ्या अग्नीच्या घरांचा आश्रय. ४३. गाई आणि ब्राह्मण यांस. ४४. इंद्रमति.

अभिषेकाच्या विधि[1]ला आलें, पुसुनी त्व[2]दीय पुत्रा विधि[3]ला. ।
क्षिति[4]भरविग्र[5]ह सारा हरिता तूं शुद्ध स[6]त्त्वविग्रह, सा[7]रा !' ॥ २४
विनवि असा धेनु; तिला वश होय स[8]भक्तिलाचि साधे नु[9]तिला. ।
स्व[10]रसवरक्षीरांनीं अभिषेकी, जो स्व[11]वंश रक्षी रानीं. ॥ २५
[12]हरिखनदी पा[13]नीया वर्षे, निज[14]मुकुटरत्नदीपांनीं या[15] ।
ना[16]थपदा नीरा[17]जी, घे माथां [18]तीर्थसत्पदा नीरा[19] [20]जी. ॥ २६
नमुनि पदें, **वा**सव दे स[21]द्रत्नाकल्प **वासु**देवास, वदे, ।
'**गो**विंद,' असें नामीं; अर्थ ग[22]वादींद्र तूं **प्रभु** ! असेना, मी. ॥ २७
**तुं**[23]**ब**रु **ना**रद, याचें गाती दोष[24]घ्न यश उ[25]दारदयाचें. ।
गमति सुर समस्त वनीं प्र[26]भुपादांभोजबंभरसम स्तवनीं. ॥ २८
करिति म[27]नोरम ला[28]स्या निर्जर[29]ललना क[30]लावती क[31]मलास्या. ।
वृष्टि र[32]सदसुमनांची, झाली सुखसंपदाचि स[33]दसुमनाची. ॥ २९
तैं अतिशय दुध वाहे गाईचें; भू निवे, वश य[34]दुधवा [35]हे; ।
स्रवती द्रु[36]म मधु रानीं पूर्ण रसांनीं स[37]पत्रसुम म[38]धुरांनीं. ॥ ३०
त्या त[39]त्तदुदधिमधुनी आल्या वाहतचि घृ[40]तपयोदधिमधुंनीं. ।
नैक[41]रसप्रसव धुनी; कीं सेवावेंचि स[42]र्वरसधिस व[43]धूंनीं. ॥ ३१
हे वसुधा [44]बुधरमणी त्यजिति न; कीं धरिति ध[45]रें सु[46]धांबुधरमणी. ।
हे त[47]रु गु[48]रु सु[49]रतरुचे; [50]तच्चित्तातें न नं[51]दनीं सुरत रुचे. ॥ ३२

---

१. मार्ग, संस्कार. २. तुझ्या. ३. ब्रह्मदेवास. ४. पृथ्वीचा भार. ५. तंटा. ६. सत्त्वच आहे देह ज्याचें. ७. हे मूलतत्वा !. ८. भक्तिमान्. (हें 'नुतिला' याचें विशेषण.) ९. स्तुतिला. १०. आपल्या रसभरित श्रेष्ठ दुधांनीं. ११. गोसमूहाला. १२. आनंदाची नदी. (प्राकृत संस्कृत शब्दांचा हा समास आहे.) १३. पाण्यास. १४. आपल्या मुकुटांतील रत्नरूपी दीपांनीं. १५. कृष्णास. १६. कृष्णपदा. १७. ओंवाळी. (नीराजना म्ह० आरती ओंवाळणें.) १८. तीर्थाचें शुद्ध स्थान. १९. पाणी. २०. कामधेनु. २१. शुद्ध रत्नांचे अलंकार. २२. गाई आदिकरून जनाचा इंद्र. २३. गंधर्वविशेष. २४. दोषांचा नाश करणारें. २५. उदार आहे दया ज्याची अशाचें. २६. कृष्णाच्या पादरूपी कमलाचे भ्रमर जसे. २७. मनास रमविणाऱ्या. २८. नृत्यास. २९. देवांगना. ३०. कलाप्रवीणा. ३१. कमलाप्रमाणें सुंदर मुखें ज्यांचीं अशा. ३२. मधुर पुष्पांची. ३३. सज्जनाचे प्राण व मन यांची. ३४. यदुपतीस. ३५. पृथ्वी. ३६. वृक्ष. ३७. पत्रें, पुष्पें, यांहीं युक्त. ३८. गोड असे जे तिहीं. (हें 'रसांनीं' याचें विशेषण). ३९. त्यांच्या त्यांच्या (आपापल्या) समुद्रांतून. ४०. तूप, दूध, दहीं, व मध यांहीं. ४१. अनेक रसांतें प्रसवणाऱ्या. ४२. सर्व रसांच्या कोशास. ४३. स्त्रियांनीं. ४४. देवांगना. ४५. पर्वत. ४६. अमृताच्या मेघांतील श्रेष्ठ. ४७. वृक्ष. ४८. बाप. (श्रेष्ठ.) ४९. कल्पवृक्षांचे. ५०. देवांगनांच्या मनांस. ५१. नंदनवनांत.

क्रूरें[1] जात्या[2] सत्वें[3]; झाला निर्वैरभाव[4] ज्या त्या सत्वें[5] ।
सन्मतिलाभ व्याला[6] व्याघ्रा; जीवौघ[7] पावला भव्याला[8]. ॥ ३३
अभिषेकुनि वरदास[9] श्रीगोगोकुलपतीस[10] सुरवरदास[11], ।
गोविंदाज्ञासुमना[12] धरुनि शिरीं, स्वर्ग करि सनाथ[13] सुसुमना[14]. ॥ ३४

---

## अध्याय अठ्ठाविसावा.

एकादश्युपवासा[15] करि, पूजी व्रजपति[16] त्रिविष्टपवासा[17]. ।
बहुरात्रीं आपगेला[18], साधाया द्वादशी, व्रजाधिप[16] गेला. ॥ १
स्नान करी, अरुणाचा उदय न जों; असुरभृत्य[19] तों वरुणाचा ।
निजवेळेंत[20] हरि[21]; खलाहितहरिजनक[22] न कळे, मनांत हरिखला[23]. ॥ २
नेला जेथें वरुण व्रजपति. हा उगवला प्रथम कीं अरुण[24]; ।
शीघ्रं[25] तमोघ्न[26] सकरुण[27] प्रकटेल हि लोकबंधुहंस[28] न[29] तरुण ॥ ३
गिळिला नंद नदीनें, मग गोपजनें तदीय[30] नंदन[31] दीनें[32] ।
प्रार्थियला हरि तातप्रिय; ज्याचे पाय भवभया[33] हरितात. ॥ ४
स्वाभयद[34] यशोधर[35] हा कृष्ण म्हणे सदय, 'मी करिन शोध, रहा ।
स्वस्थ; धरा विश्वास,' स्वमुखें कथि हें, प्रमाण जो विश्वास[36]. ॥ ५
जो सकरुण[37] भव[38] नाशी, गेला जगदीश[39] तो वरुणभवनासी[40]. ।
निजवैभवकलशातें[41] पाहुनि, पावे जलाधिप[42] सकल शातें[43]. ॥ ६

---

१. 'सत्वें' याचें विशेषण. २. जातीनें (स्वभावानें.) ३. प्राणी, जनावरें. ४. मित्रत्वाची बुद्धि. ५. साधुत्वें. ६. सर्पास. ७. जीवसमूह. ८. कल्याणास. ९. कृष्णास. १०. लक्ष्मी, पृथ्वी व गोकुल यांच्या स्वामीस. (कृष्णास.) ११. इंद्र हा सेवक. १२. गोविंदाची आज्ञा हेंच कोणी एक पुष्प, त्यास. १३. स्वामी आहे ज्यास. १४. फार चांगलें मन जहालें आहे ज्याचें, फार चांगल्या मनाचा, संतुष्ट. १५. एकादशीच्या उपवासास. १६. नंद. १७. त्रिविष्टप म्ह० स्वर्ग आहे वास ज्याचा अशा देवास. १८. नदीस. १९. राक्षससेवक. २०. आपल्या समयांत. २१. नेई. २२. दुष्टांचा शत्रु असा जो त्या कृष्णाचा बाप. २३. आनंदला. २४. ही उत्प्रेक्षा आहे. नंद हाच कोणी एक अरुण; आणि त्याच्या मागून येणारा जो कृष्ण तोच कोणी एक हंस म्ह० सूर्य, इ० २५. लवकर. २६. अज्ञानरूपी अंधकारास हनन करणारा. २७. दयावान्. २८. लोकबांधव (लोकांचें हितकर्ता म्ह० कृष्ण) हा सूर्य. २९. न तरुण म्ह० बाळसूर्य. ३०. नंदाचा. ३१. मुलगा. ३२. हें 'जनें' याचें विशेषण. ३३. संसारभयास. ३४. आपल्या जनास अभय देणारा. ३५. यशस्वी. ३६. लोकांस. ३७. दयाळु. ३८. संसार. ३९. कृष्ण. ४० वरुणाच्या घरीं. ४१. आपल्या वैभवाच्या डेऱ्यास (कृष्णास.) ४२. वरुण. ४३. सुखाला.

पसरुनि पदरा, जीवीं प्रार्थावीं, त्या [1]मुकुंदपदराजीवीं ।
दिधली भेटि परम; [2]हा धन्य [3]सुकृतसिंधु. पावलाहि [4]पैरमहा. ॥ ७
वंदी प्रभुपद[5]नलिनें, जीं न त्यजिलीं लवार्धमात्र [6]सदलिनें; ।
होती निर्म[7]ळें; मलिनें स्मरतां ज्यांतें, निजेंत भ्यावें कलिनें. ॥ ८
पूजी हरिपद, [8]काशीपतिमुख जपती जया महापदकासी. ।
तेजें नगर विराजे, ऐसे लेववि विभूसि नग [9]रविराजे. ॥ ९
वरुण वदे, पद नमुनी, ‘शिवति प्रत्यक्ष जें [10]सुखास्पद न मुनी, ।
तें [11]कामद गा राया! आलें, (वर्णील कोण?), मदगारा या. ॥ १०
झालों पावन मी, न स्तवनीं पटु परि, [12]भवत्कृपावनमीन. ।
[13]मुनिजनसर्वस्वा! मी सफळ जनन पावलोंचि सर्वस्वामी! ॥ ११
हा तात तुझा [14]कृष्णानीरांतुनि, न कळतां, [15]मदनुगें कृष्णा! ।
आणियला नंद; मना भय दे अपराध, थोर हा खळदमना! ॥ १२
भय दे [16]आग मनातें, परि कारण हें तुझ्याहि आगमनातें; ।
चुकला तो मूढ; [17]कलिध्वांतार्का! पदनता मज न तूं ढकलीं. ॥ १३
न्यावा हा निजतात; प्रभु! [18]तवपदसावलींत जे निजतात, ।
त्यांतें झुठवि न खवळी, जो [19]द्विपरार्धांत काळ उरवि नखबळी. ॥ १४
हे फुलली, पालवली, फळली, वैकुंठवल्लि सत्कृपा! लवली; ।
देउनि वैभव, [20]नीचं प्रभु! केला धन्य, येउनी [21]भवनींच. ॥ १५
[22]गंगाख्या धाम रसा जें, या वंदन तुझ्याचि पदतामरसा. ।
मायामानवदेहें क्षमिजे हा,’ वरुण निरभिमान वदे हें. ॥ १६

---

१. कृष्णाच्या पदरूपी कमलांनीं. २. वरुण. ३. पुण्यसागर. ४. श्रेष्ठ उत्सवातें. ५. कमलें. ६. साधुरूपी भ्रमरानें. ७. निष्पाप. ८. शिवादि. ९. सूर्यच असे (नग म्ह० भूषणें.) १०. सुखस्थान. ११. ज्या पदाचा स्पर्श मुनींलाही होत नाहीं तें कामद म्ह० इच्छा पूर्ण करणारें पद मदगारा म्ह० माझ्या घरास आलें. ‘मदगारा’ हें ‘आलें’ याचें अधिकरण, किंवा ‘आलें’ याचें अधिकरण आणि ‘वर्णील’ याचें कर्म, असें एकदम करितां येईल. मग मात्र हा उत्तरार्ध असा लिहिला पाहिजे:—‘तें कामद गा राया! आलें, वर्णील कोण, मदगारा या?’ १२. तुझी कृपा हेंच वन म्ह० उदक त्यांतला मीन म्ह० मासा; म्हणजे, कृपा नसेल तर मरेन—हा भाव. १३. मुनिजनप्रिया. १४. यमुना नदीच्या उदकांतून. १५. माझ्या चाकरानें. १६. अपराध. १७. कलिरूप (दोषरूप) ध्वांताच्या (तमाच्या) सूर्या! १८. संस्कृत प्राकृत शब्दांच्या समासाचें हें एक उदाहरण आहे. १९. कल्पांतींचा. २०. हे प्रभो! वैभव देऊन हा नीच (मला) आपण धन्य केला. २१. घरींच. २२. गंगाख्या (गंगा हें नाम आहे ज्यास अशा) रसा (उदकास) म्ह० गंगेला जें धाम (स्थान) त्या या तुझ्याचि पदतामरसा (पदकमलास) वंदन (असो).

मग तातासह, साची करुणा करुनि, ब्रजासि ये सहसाची. ।
आणी नंदन वासाप्रति; गोपांला गमे स्वनंद नवासा. ॥ १७
ऐश्वर्य भुवनपतिचें निजपुत्राचें महत्वहि [1]भुवनपतिचें ।
गोपां सहसा नंद प्रकट करी, विस्मयाहि सह सानंद. ॥ १८
पहिलें ईश्वरसा च प्रभु भासे त्यांसि आजि ईश्वर [2]साच. ।
म्हणती जन मनिं, 'जगतीधर पावविल ब्रजाहि सूक्ष्म निजगति. ॥ १९
[3]जड सुरतरु पूरवितो [4]स्वाश्रिततृष्णा, [5]हृदिष्टसलिलपूर वितो ।
चिंतामणिहि; [6]तदधिप प्रभु न कसा करिल भक्तजनहित [7]दधिप ! ॥ २०
[8]ब्रह्मऱ्हदीं मज्जन ते करिती, कीं हरि म्हणे, 'घडो [9]मज्जन ते;' ।
[10]श्रुतिसंस्तुत आपण हा वैकुंठीं शांतिचा उघडि [11]आपण हा ! ॥ २१

---

## अध्याय एकुणतिसावा.

लेशहि [12]शरदमळ न, [13]भा [14]धवली [15]अमृतांशुचीहि, [16]शरदमळनभा; ।
अंबरें [17]सित[18]रुचि [19]रजनीविलासिनी धरि, [20]भमौक्तिकें [21]रुचिर, जनीं. ॥ १
मंगल सुतिलक [22]अलिकीं [23]कुमुदाक्षीं भरि सुरम्य कज्जल [24]अलि कीं. ।
[25]चंद्रमुखी ते हरिला रुचली; श्रीकांत योगिपति [26]परि [27]हरिला. ॥ २
[28]प्राचीमुख चंद्र करी [29]स्वोदयरागें [30]करीं [31]अरुण मोदकरीं. ।
ये [32]प्रिय बहुदिवसां, जे [33]दयिता, तद्वदन कुंकुमें भरि सांजे ! ॥ ३
[34]कुंकुमपिंजरितरमामुखनिभशशिमंडळीं दिसे [35]द्युति परमा. ।
पाहुनि वन हि [36]धवळलें, हरिमन गायासि मधुर बहुविध वळलें. ॥ ४

---

१. जगत्पतीचें, भुवनपतीचें ऐश्वर्य म्ह० वरुणाचें ऐश्वर्य. २. प्रथमतः ईश्वरासारखा दिसे, पण आतां खरोखरच ईश्वर असा दिसला. ३. अचेतन. ४. आपल्या आश्रितांची तृष्णा. ५. मनांत इच्छिलेलें तेंच जणु उदक त्याचे पूर. ६. त्यांचा राजा, श्रेष्ठ. ७. दधिभक्षक. ८. ब्रह्मसुखाच्या डोहीं. मज्जन म्ह० स्नान. ९. माझ्या भक्तांस. १०. वेदस्तुत. ११. दुकान. १२. मेघसंबंधी मळ. १३. तेज, कांति. १४. शुभ्र करी. १५. चंद्राची. १६. शरदृतूच्या स्वच्छ आकाशास. १७. आकाश; व रूपकासाठीं 'वस्त्र' असें घ्यावयाचें. १८. शुभ्रकांतीचें. १९. रात्र हीच विलास करणारी एक स्त्री. २०. नक्षत्ररूपी मोत्यें. २१. सुंदर. २२. ललाटीं. २३. कुमुदरूपी नेत्रांत. २४. भ्रमर. २५. चंद्रच आहे मुख जीचें. २६. लक्ष्मीकांत जरी होता, व जरी योगिपति होता, तरीहि भुलविला. २७. भुलविला. २८. पूर्वदिशेचें मुख. २९. आपल्या उदयाच्या कांतीनें. ३०. आनंदकर किरणांनीं. ३१. तांबडें. ३२. प्राणनाथ. ३३. स्त्री. ३४. कुंकुमानें लेपलेल्या लक्ष्मीच्या मुखासारिखा जो चंद्र त्यावर. ३५. परम कांति. ३६. शुभ्र झालें.

ऐकति [1]युवतिमृगी तें, तों [2]तद्धृदयांत संचरे [3]स्मर [4]गीतें; ।
वन[5]वसुधा वेगानें पावति, हरि जेथ घेति धांवे गानें. ॥ ५
हरिनें [6]बहुशुभगानीं हरिलें मन; टाकिलें [7]सदन [8]सुभगांनीं. ।
लज्जा भय न पळ टिके; व्यवहार त्यागवी [9]गुरुजनप लटिके. ॥ ६
काढित असतां [10]धारा, टाकुनि, अनुसरति युवति [11]जगदाधारा. ।
तापवितां दुध [12]मणिकीं, त्यजिति; अमृत पाजितो बहु [13]विबुधमणि [14]कीं. ॥ ७
चुलीवरिच करपती अन्नें, गांठिति [15]वधु [16]प्रमोदकरपति. ।
पडतां ध्वनि तो कानीं, स्तन काढुनि, जाति, चोखितां [17]तोकांनीं. ॥ ८
करितां वाढप, [18]रिचवी [19]करपात्र; [20]स्वगुरुभयहि वाढ, परि, चवी ।
घेतां [21]गानसुधेची, त्यजिले व्यवहार. हे [22]असार [23]सुधेचि. ॥ ९
न रुचे पतिसेवा यां. वाटति हे मानिले स्वपतिसे वायां. ।
भेटाया निजपतितें गेल्या; फळलें [24]सदैवहि मनिं जपति तें. ॥ १०
हरिचा [25]स्वांता टकळा; भोजन करितांहि, ढकलिती ताट; कळा ।
[26]गानाख्या दूति सत्या खोळंबविती क्षणार्ध न वधू तिस त्या. ॥ ११
स्त्री संपविति न उटिला, उठती न्हातां न देह धुतला, [27]उटिला. ।
सांवरली हि न [28]कुटिलालकसंहति; लाविलें न कुंकुम निटिलीं[29]. ॥ १२
कोणी कुशला, केला [30]अंजित [31]दृक्प्रांत लावुनि [32]शलाकेला, ।
तो त्यजिति; वेणु सुचवी कीं, 'याहुनि [33]कृष्णरंग देइल [34]सुचवी.' ॥ १३
भूषण उत्तम नाकीं, तें कानीं धरिति; हरि अनंत मना कीं. ।
कानाचें ये नाका; वस्त्राच्या धारणीं असें येना कां? ॥ १४
पांघुरल्या लुगड्याला ऐशाही मानल्या दयाळु गड्याला. ।
प्रेमें [35]सरसा, जरि या [36]व्यत्यस्तांबरविभूषणा, साजरिया. ॥ १५

---

१. स्त्रीरूपी हरिणी. २. तीच्या हृदयांत. ३. कामदेव. ४. गायनानें. ५. जागा. ६. श्रेष्ठगायनानीं. ७. घर. ८. स्त्रियांनीं. ९. श्रेष्ठजनस्वामी. १०. दुधाच्या धारा. ११. कृष्णास. १२. डेऱ्यांत. १३. देवश्रेष्ठ. १४. 'कीं' हें 'त्यजिति' याचें कारण. १५. स्त्रिया. १६. आनंददायक पति. १७. मुलांनीं. १८. ओती, रिक्त करी. १९. हातांतील भांडें. २०. आप्तश्रेष्ठांचें भय जरी वाढ म्ह० थोर होतें तरिही. २१. गायनामृताची. २२. व्यर्थ. २३. खरोखरच. २४. नेहमीं. २५. मनास. २६. 'कळा' (कळावान् मधुर) गायन या नामाची जी दूति. २७. उटणें लाविलेला. २८. कुरळकेशसमूह. २९. ललाटास. ३०. काजळ लावलेला. ३१. दृष्टीचा प्रांत म्ह० कडा, स्थान. ३२. अंजन लावण्याची काडी. ३३. काळा रंग. ३४. उत्तम गोडी. ३५. प्रेमरूपी रसानें भरलेल्या. ३६. अव्यवस्थित, अंबर म्ह० वस्त्र व भूषणें आहेत ज्यांचीं.

त्यजिति [1]अपत्या; दिसती अनिवार्या; मानिती न [2]पत्यादि सती. ।
जातीच परम [3]हेला करुनी, जैशा [4]विटांप्रति [5]परमहेला. ॥ १६
गोप खरे श्रमहेलापात्रचि; गेल्या त्यजूनि उचित महेला. ।
कीं हरिविषयीं न चले वारण हे तर्क मतिस नाहीं सुचले. ॥ १७
गोप [6]दुरासद नीच स्त्री रोधिति ज्या सुदुर्धरा सदनींच, ।
त्या, ध्यानद्वारासी उघडुनियां, पावल्या [7]स्वमुद्वारासी. ॥ १८
करिति गळाठा; काया रोधिति; पडती पती गळां टाकाया. ।
स्त्रीमत काय, 'चिरा हे, भाजा खा;' कीं गृहांत कायचि राहे. ॥ १९
पावलिया [9]सदया यां; पाहूनि म्हणे [10]असद्दुरासद, 'या, या; ।
रात्रिं [11]महाभागा! या वनिं कां हो? कोण काम हा भागाया! ॥ २०
मी प्रिय करिन सकळ; वा आहे कीं जन अहो! [12]असाध्वस? कळवा. ।
[13]निवसा घरिं; [14]घोरांनीं रात्रिं फिरावें; [15]शिवेच्छु न [16]रिघो रानीं. ॥ २१
शोधित असतील [17]पतिप्रभृति स्वजन; त्यजूनि [18]असती लपती. ।
उचित तुम्हां [19]कुलजांचें अकपट [20]गुरुभजन, कीं विमळ कुल ज्यांचें. ॥ २२
जे [21]सुषमा हे रानीं, [22]चंद्रकरांनीं [23]सुधास्वमाहेरांनीं, ।
देखिलि? जा; ताप वनीं शमला कीं सर्व [24]सूर्यदुहितापवनीं? ॥ २३
[25]वत्सतनयदुहितांची भूक न हरितांचि, पातलां [26]दुहितांची. ।
[27]समजावा; [28]निलयाला जा; जें हें कृत्य, धर्म [29]वानिल याला. ॥ २४
मजचि पहाया [30]येणें स्नेहें हें जरि, सुखी असें मी [31]येणें. ।
जाणतसें प्रेमा, जें सुखदर्शन वांछितें सदा हें माजें ॥ २५
'[32]पतितद्बांधवसेवा हा स्त्रीचा मुख्य धर्म,' यातें [33]सेवा. ।
बाळातें पोसावें; हित [34]भेषज लागतां कटुहि सोसावें. ॥ २६

---

१. मुलास. २. पतिआदि. ३. हेलना. ४. जाराकडे. ५. परस्त्रिया. ६. हट्टी. ७. आपल्या आनंदांचा समूह, कृष्ण. ८. कृष्णाकडेस. ९. स्त्रिया. १०. खलांस जो दुर्लभ. (कृष्ण.) ११. हे भाग्यवंत स्त्रियांनो. १२. निर्भय. १३. राहा. १४. भयंकरांनीं. १५. कल्याणाची इच्छा करणारा. १६. शिरो. १७. नवरा इत्यादि आप्तजन. १८. छिनाल. १९. कुलीनाचें. २०. वडिलांची सेवा. २१. शोभा. २२. चंद्रकिरणांनीं. २३. अमृताचीं माहेरें म्ह० स्थानें. ('चंद्रकरांनीं' याचें विशेषण.) २४. यमुनेच्या वाऱ्यांनीं. २५. वासरें, मुलगे, लेंकी, यांची. २६. दूध काढित असतांच. २७. समजूत करा, समाधान करा. (मुलांस इत्यादि). २८. घरीं. २९. स्तुति करील. ३०. आगमन. ३१. या योगें. ३२. नवरा व त्याचे आप्त यांची सेवा. ३३. पाळा, आचरा, करा. ३४. औषध.

[1]अगुण [2]सगुण पति तातें दिधला त्यजिजे न; टाकिजे [3]पतितातें. ।
कीं जारीं सुख न [4]सती वांछिति; [5]दोन्हीहि लोक तेणें [6]नसती. ॥ २७
माझ्याठायीं [7]भाव, श्रवणें कीं दर्शनें [8]विगतपरिभाव, ।
जेंवि [9]निरूढचि होतो [10]ध्यानें [11]संकीर्तनें, न संगें हो [12]तो.॥ २८
यास्तव [13]चिंतित जावें; तेणें साधेल सर्व चिंतित; [14]जोंवें.' ।
निष्ठुरता क्षण दावी हरि अशि; अद्भुत [15]खरांशुभा [16]क्षणदा वी[17]. ॥ २९
स्त्रीजन [18]विप्रियवाणी परिसे बहु यापरी नवि [19]प्रियवाणी. ।
आशेच्या [20]परिभावें खिन्न मनें; हरिपदें स्मरति [21]परि [22]भावें. ॥ ३०
भ्याल्या [23]मदनदवाला; धांवति सेवावयासि [24]पदनद [25]बाला; ।
तो बहुदुस्तर वाटेमध्यें [26]यां [27]धर्मनर्म [28]रोधचि [29]वाटे. ॥ ३१
[30]पंकांत [31]इभी रुतती, ते व्याकुळ जाहलीच तसि [32]भीरुतति. ।
[33]चरणांगुष्ठें [34]महि ला खणिति शिरायासि काय दुःखित [35]महिला ! ॥ ३२
[36]अबळांचा धीर गळे [37]सांजननयनांतुनी जसें [38]नीर; [39]गळे ।
दाटति; [40]ओष्ठहि सुकले उष्ण श्वासें; स्तन स्वशोभे मुकले. ॥ ३३
केलें [41]रामांवर जें क्षण [42]औदासिन्य [43]सदयरामावरजें, ।
तें दे बहु [44]भी; रुसती [45]स्वजीवनीं, न [46]जगजीवनीं [47]भीरु सती. ॥ ३४
[48]अभिलषितसुरत, रुसवे न; मना लावी नवी [49]नतसुरतरु [50]सवें, ।
शब्द उदासीन; मनें भ्याल्या त्या; करिति हरिस दासी नमनें. ॥ ३५

---

१. द्वाड. २. गुणवान्. ३. पातकी. ४. पतिव्रता. ५. इहपरलोक. ६. न मिळतो. ७. विश्वास, भक्ति. ८. अनिंदित. ९. दृढ. १०. चिंतनानें. ११. मुखानें प्रभुनामोच्चारण करून स्तवन करणें. १२. भाव. १३. ध्यान करीत असावें. १४. घरीं जा. १५. फार तीक्ष्ण अशा किरणांची कांति म्ह० ताप. (कृष्णानें असा उपदेश करितांच गोपींस फार अस्वस्थता प्राप्त जहाली, इ०). १६. रात्र. १७. प्रसवे, करी. १८. प्रीतिविरहित अशी. १९. कृष्णाची वाणी. २०. खंडनानें. २१. परंतु. (आशापरिभावें मनें खिन्न, परंतु, इ०). २२. श्रद्धेनें. २३. कामरूपी वणव्याला. २४. कृष्णपदरूपी नदास. २५. स्त्रिया. २६. यांना (स्त्रियांना). २७. कृष्णानें धर्माच्या संबंधानें केलेली थट्टा. २८. बांध. २९. भासे. ३०. चिखलांत. ३१. हस्तिनी. ३२. भितऱ्यांची (स्त्रियांची) मंडळी. ३३. पायांच्या आंगठ्यानें. ३४. पृथ्वीला. ही उत्प्रेक्षा आहे. ३५. स्त्रिया. ३६. स्त्रियांचा. ३७. अंजन (काजळ इ० आहे ज्यामध्यें अशा डोळ्यांतून). ३८. पाणी. ३९. कंठ. ४०. ओंठ. ४१. स्त्रियांवर. ४२. उदासीनपणा; अवकृपा. ४३. बळरामाच्या कृपाळू धाकट्या बंधूनें म्ह० कृष्णानें. ४४. भय. ४५. आपल्या जीवावर. ४६. कृष्णावर. संस्कृताप्रमाणें 'जगज्जीवन' असा शब्द पाहिजे होता. ४७. भ्यालेल्या (स्त्रिया.) ४८. इच्छिलें आहे सुरत ज्यांनीं. हें 'न रुसवे' याचें कारण आहे. (त्या) अभिलषितसुरत होत्या म्हणून त्यांच्यानें रुसवे न—असा अन्वय. ४९. शरणागतांचा कल्पवृक्ष. (कृष्ण). ५०. सवई (विप्रिय बोलणें ही).

प्रणयक्रोधवशमती[1] सुदती[2] वदती, विलोकुनी धव[3], शमती[4]. ।
'क्रूर[5], विभो ! न वदावें; दग्धातें[6] काय जाळिसी नवदावें[7] ? ॥ ३६
साहेना आंग मन स्मरेषुची[9]; तवं[10] पदांबुजीं आगमन ।
टाकुनि सर्व विषय, मापति[11] ! केलें; वदसि जें असह्य[12] विष यमा[13]. ॥ ३७
हरि ! मान[14] सखे दासी; लोटीं विरहाग्निमाजि न सखेदांसी[15]. ।
जें देवां वांचवितें दे न, अधरिंचेंचि[16] अमृत देवा ! चवि[17] तें. ॥ ३८
मुनि पंचतपा[18], दासी याही पंचेषुतप्त[19], नत[20] पादासी. ।
तूं पुरुषोत्तम हातें धरिं, निववीं जें प्रतप्त[21] चित्त महा तें. ॥ ३९
न जरी आवडि[22], लांचें त्वद्भजनाच्या[23], करूं भजन[24] वडिलांचें. ।
याविण, गेहीं न सवे लागे; कैंची क्रिया ? उगेही नससवे[25]. ॥ ४०
'वचन करा गे ! जावें' म्हणसी हें न मानि[26] मन; न रागें जावें[27]. ।
कीं बहुवस[28] खेद वसे पतिपुत्रीं; होति तापद[29] सखे ! दवसे[30]. ॥ ४१
शिंपिलिया तरुबुड[31], तें दळफळकुसुमांत[32] जळ मिळे, कीं बुडतें. ।
कथिला तो धर्म; पण त्वच्चरणीं अर्पितां, खरें धर्मपण[33]. ॥ ४२
आत्माप्रिय, नित्य धणी तूं; पावति कुशल[34] तव पदींच सुखधणी[35]. ।
त्वदधररसपानाशा[36] बहु दिवसांची, न योग्य, सकृपा ! नाशा[37]. ॥ ४३

---

१. प्रेम व राग यांच्या स्वाधीन केल्या आहेत मति ज्यांनीं. २. सुंदर स्त्रिया. (सुंदर दंतांच्या). ३. कृष्ण. ४. सुखी होती. ५. निष्ठुर (भाषण). ६. आधींच जळालेल्यास. ७. अपूर्व किंवा नव्या वणव्यानें. ८. अग्नि. (ताप.) ९. कामाच्या बाणाची. १०. तुझ्या पदकमळीं. ११. हे लक्ष्मीपते ! १२. सोसण्यास कठीण. १३. यमाला सोसण्यास कठीण असें (विष.) १४. समज. १५. आम्हा दुःखितांस. १६. चुंबनांतील. १७. रुचि, गोडी. जें (अमृत) देवां वांचवितें तें चवि दे न, (परंतु) देवा ! अधरिंचेंचि अमृत (चवि दे) असा अन्वय. १८. पांच आहेत तपें ज्यांस. चार दिशांस चार अग्नि आणि मस्तकावर दोनप्रहरचा सूर्य असे पंचाग्नितप्त. १९. कामानें तापलेल्या. कामाचे बाण पांच असतात:—'अरविंदमशोकं च चूतं च नवमल्लिका । नीलोत्पलं च पंचैते पंचबाणस्य सायकाः ॥' अथवा 'उन्मादनस्तापनश्च शोषणः स्तंभनस्तथा । संमोहनश्च कामस्य पंच बाणाः प्रकीर्तिताः ॥.' २०. शरण. २१. फार संतापलेलें. २२. गोडी (असे तरी). २३. तुझ्या भजनरूपी लांचानें. (स्वीकार करिशील तर इ०) २४. सेवन, पूजन. २५. न असावे असवत नाहीं. २६. मान्य करितें (मन). २७. (आपण) रागें भरूं नये. २८. फार. २९. ताप देणारे. ३०. दावाग्नीसारिखे. ३१. वृक्षांचें बूड शिंपिलें असतां. (हा प्राकृत संस्कृत शब्दांचा समास निषिद्ध समजतात.) ३२. पानें, फळें, व पुष्पें यांत. ३३. धार्मिकत्व. ३४. चतुर. ३५. सुखाची समृद्धि. ३६. तुझें अधरामृत पिण्याची इच्छा. ३७. भंगाला उचित नाहीं.

कल्पतरू! पाहसि तें कलगीतें[1] कामकांतरूपा![2] हँसितें[3] ।
होय समुद्भव[4]; दमन स्मराग्निचें[5] यांत तर्कि दाह वद मन. ॥ ४४
कामदहनिं[6] कापूर स्त्री होति; तयां सुखावह निका[7] पूर ।
अधरसुधांचा[8] वाहो; तुमचा अबळासमूह[9] वांचावा हो! ॥ ४५
मन हरिलें कलगीतें[1]; दासी करितों तुझ्या पदीं सलगीतें; ।
तुज विरहदहनशमनीं[10] ध्यानें पावोंचि, तूंचि कीं अनिश[11] मनीं. ॥ ४६
सर्वस्वें[12] जो सवदा[13] साधिति साधू रमाहृदब्जोत्सवदा![14] ।
ज्यापासुनि तव चरणा शिवलों, वनजन[15], सख्या! सुभद्राचरणा![16] ॥ ४७
विटलों ओका[17], रीती भवदन्याची[18] रुचे न, ओकारी ती[19]. ।
पिकगुण[20] काय जि! भेकीं[21]? कांजी[22] अमृताधिकाहि[23] काय जिभे कीं[24]? ॥ ४८
करिती दैवतें[25] पाहों[26] श्रीपदें[27] या एकदा सदैव तपा हो! ।
अशि ती ही वरि तुळसी, सह पदधूळी धरूं शिरीं निरतुळसी[28]. ॥ ४९
तूं सुरपादप[29] राया! दासींतें दे स्वहास्य, पदपरा[30] यौं[31]. ।
तव वदनस्मितें[32] रुचिर[33] प्रेक्षुनि[34], मनिं कामतप्त[35] आहों सुचिर[36]. ॥ ५०
श्रीमुख वेष्टित अलकीं[37], अलिकुलपरिवृत[38] सुधांशुबिंब[39], कमल कीं[40]! ।
कुंडलरुचि[41] गंडांतीं[42]; अधरिं अमृत; वांचवीं विरहगंडांतीं[43]. ॥ ५१

---

१. मंजुळ गायनानें. २. कामदेवाप्रमाणें सुंदर आहे रूप ज्याचें त्या तूं. ३. हास्यानें. ४. महान् उत्साह, आनंद. ५. कामरूपी अग्नीचें. ६. कामाग्नींत. ७. चांगला. ८. अधरामृतांचा. ९. स्त्रीसमूह. १०. विरहरूपी अग्नि प्राप्त जहाल्यास तो विझवावयास. ११. नेहमीं. १२. आपलें सर्व देऊन. १३. व्यापार. 'सवदा' हा फारशी शब्द आहे. १४. हे रमेच्या हृदयकमळास आनंद देणाऱ्या! १५. आम्ही अरण्यांतील जन. १६. उत्तम कल्याणरूप आहे आचरण ज्याचें अशा तूं. १७. घरास. १८. तुज खेरीजकरून दुसऱ्या कोणाची आचरणपद्धति. १९. रीति. २०. कोकिलेचा गुण. २१. बेडकाच्या आंगीं. २२. पेज. 'कांजी' हा शब्द या ठिकाणीं स्त्रीलिंगीं आहे. २३. अमृतापेक्षां अधिक. २४. किंवा. २५. देव. २६. पाहावयास. २७. लक्ष्मीचीं स्थानें अशा ज्या या तुळसी. २८. निरुपम अशी. २९. कल्पवृक्ष. ३०. पायांच्या ठायीं तल्लीन. ३१. आम्ही. ३२. किंचित् हास्य. ३३. सुंदर. ३४. पाहून. ३५. मदनपीडित. ३६. फार दिवसपर्यंत. ३७. केंसांनीं. ३८. भ्रमरांनीं वेष्टिलेलें. (अलक हेच भ्रमर.) ३९. चंद्रबिंब. ४०. किंवा. ४१. कुंडलांची शोभा. ४२. कानसुलावर. ४३. विरहरूपी अपमृत्यूंत.

हरि तापसमूह [1]सितें [2]हँसितेंसहवर्तमान जें पाहसि तें[3]. ।
विश्वंभर भुज, गाजे यश देवसभेंत, लाजविति भुजगा [4]जे. ॥ ९२
[5]मुत्प्रभवक्षम नादे जेथें [6]श्री, हें [7]प्रमोद [8]वक्ष मना दे. ।
वाटे अंबट कीं तें अमृतहि! हें रूप गोड या [9]बेटकींतें. ॥ ९३
ऐसी कोण हरि! [10]सती त्रिजगीं, जे मधुर वेणुगीत [11]परिसती, ।
पाहे तुजहि [12]रमेना! [13]त्रिभुवनरुचिरा! व्रत त्यजून, रमेना? ॥ ९४
खग मृग [14]सनगजग रति[15]प्रदेरूपें मोहती; न कां तुज [16]गरती? ।
तूं विश्वं[17]भर साच; प्रसन्न हो; न तरि, देह हा [18]भरसाच. ॥ ९५
ततस्तनता पसरे; [19]करकंज न ठेवितां, न हा ताप [20]सरे. ।
[21]दुर्वह देह; ठकवणें [22]नोतःपर; सह्य होति हे हठ कवणें? ॥ ९६
हृदयीं [23]रामा [24]निशितें [25]कामशरें [26]विद्ध सुंदरा; मानिशि तें ।
कारिं; [27]तवसन्मुख रानीं बडबड केली [28]यथेष्ट या [29]मुखरांनीं.' ॥ ९७
चिंती [30]भव्य [31]सुरमणी कीं, 'जरि मत्संग दुर्लभ, [32]व्यसु [33]रमणी ।
होतिल;' यास्तव नातें [34]श्रीचें दे, सफळ करुनियां [35]स्तवनातें. ॥ ९८
इच्छिति पदरज [36]सुरता, गोपी करिती सुखें तयासह [37]सुरता! ।
चंद्र [38]अंजन, [39]तारा [40]यीं भासति; दावी चरित्र जन ताराया.' ॥ ९९
गज जैसा [41]स्ववशांला, गोपींला रमवि हरि वनीं [42]स्ववशांला. ।
[43]लज्जापर [44]मा केली; लक्ष्मीऐसीच होय [45]परमा [46]केली. ॥ १००

---

१. पांढरे, शुभ्र. २. हास्यासह. ३. तूं हांसत पाहतोस. तें तुझें पाहणें तापसमूह हरी. (हास्याचा रंग शुभ्र असतो असा कविसंकेत आहे.) ४. भुज. ५. आनंद उत्पन्न करण्यास योग्य. ६. लक्ष्मी. ७. आनंद, उत्साह. ८. छाती. ९. दासीतें. (आम्हांला.) १०. स्त्री. ११. ऐकिते. १२. हे रमेशा! १३. त्रिजगीं सुंदर. १४. पक्षी, सावजें, व वृक्ष आणि इतर जग. १५. प्रियकर. १६. स्त्रिया. 'मोहती' हें क्रियापद पुनः लावावें. १७. विश्वाचें भरण (रक्षण) कर्ता. १८. ओझ्यासारिखाच. १९. हस्तकमल. २०. संपे. २१. जड. २२. यानंतर नको. २३. स्त्रिया. २४. तीक्ष्ण अशा (कामशरें). २५. मदनाच्या बाणानें. २६. जखमी. २७. तुझ्यासमोर. २८. जशी आवडली तशी. २९. वाचाळांनीं. ३०. कल्याण. ३१. कृष्ण. ३२. गतप्राण. ३३. स्त्रिया. ३४. लक्ष्मीचें. (स्त्रीचें.) ३५. स्तुतीतें (आम्हीं केलेल्या.) ३६. देवसमूह. ('ता' हा समूहदर्शक प्रत्यय आहे:–जनता, बंधुता, ग्रामता.) ३७. क्रीडा. ३८. कृष्ण. ३९. चांदण्या. ४०. ह्या आम्ही (गोपी.) ४१. करिणींला. ४२. आपल्या स्वाधीन झालेल्या अशा ज्या त्यांस. ४३. लज्जाभरित. ४४. लक्ष्मी. ४५. महान्. ४६. क्रीडा.

मानी आपुलि नीच ज्योत्स्ना[1] पूर्णेंदु[2] ही, अशा पुलिनींच[3] ।
कृष्णेच्या[4], देव रमे; स्मरतां विस्मय रमा मना दे, वरमे[5]. ॥ ६१
धृतकुमुदामोदरसानिल[6] तेथें करि विलास दामोदरसा[7]; ।
जाला भीत रवीची कन्या[8] लंघुनि; तिच्याहि भीतर वीची[9]. ॥ ६२
'देऊं कां मी न रसा भक्तांतें?' म्हणुनि देव, कामी नरसा[10], ।
ध्याती प्रमदा[11] मनिं जें, आलिंगन, दे सुखें मुखें दाम[12] निजें. ॥ ६३
'मृदुता न कुसुमदामीं[13], कठिनीं जरि, तरि न लेशही श्रम, दामीं[14]. ।
प्रेमें बद्ध सदा मी, देव म्हणे गोपिकांसि; दे रस दामीं ॥ ६४
तों सौभगमदमानीं[15] त्या स्त्री मळतां, न साधुकामद[16] मानी. ।
येणें सुखहानीच; प्रभुहि विटे; फार मानमद हा नीच. ॥ ६५
पावे अंतर्धान[17] प्रभु हा सद्भक्तवृंदहर्षनिधान[18]; ।
कीं कुमति न सोसवती; श्रीचा[19] केल्याहि, हें परि नसो, सवती. ॥[20] ६६

## अध्याय तिसावा.

क्रीडे स्त्रींसह; साहे गर्व न; सुखमूर्ति विरहदा[21] सहसा[22] हे; ।
यन्मय[23] चर अग जग[24]; जीवानिं शोधिति, जेंवि यूथनाथ[25] गज[26] गजी[27]. ॥ १
हृदया देववि ललास[28] स्वविरहहस्तेंचि[29] वासुदेवविलास[30]; ।
स्मरति चरित्रें[31] सुकृतिध्येया[32]; करिती तदात्मिका[33] तदनुकृति[34]. ॥ २
विरहें दग्धवपु[35] सती अश्वत्थादिद्रुमासि[36] माधव पुसती[37] ।

१. चांदणें. २. पूर्णचंद्र. ३. वाळवंटावर. (पूर्णेंदूच्या चांदण्यापेक्षांही पुलिन शुभ्र होतें, असा भावार्थ.) ४. यमुनेच्या. ५. सलज्ज होई. ६. कमळांचा सुवास व रस धरिला आहे ज्यानें असा वायु. ७. कृष्णासारखा. ८. यमुना. ९. लाटा ('भीतर' जहाल्या.) १०. कामातुर. ११. स्त्रिया. (गोपी.) १२. चुंबन. १३. फुलांच्या हारीं. १४. दांव्यांच्या आंगीं. (यशोदेनें दांव्यांनीं बांधिलें, तेव्हां तीं फुलांच्या हारांहून मृदु होतीं इ०). १५. आपल्या भाग्याच्या गर्वानें व मानानें. १६. साधूंची इच्छा पूर्ण करणारा (कृष्ण). १७. गुप्त (जहाला). १८. भक्तसमूहाच्या आनंदाचें भांडार. १९. लक्ष्मीच्या. २०. येथें 'रासक्रीडे'चा प्रथम अध्याय समाप्त झाला. २१. वियोग करणारी. २२. एकाएकीं. २३. जेणेंकरून युक्त. २४. चराचर सृष्टि. २५. करिणींचा पति. २६. हस्ती. २७. हत्तिणी. २८. चुरका. २९. आपल्या विरहरूपी हातानें. ३०. कृष्णाची करणी. ३१. मागें केलेल्या कृत्याच्या योगानें. ३२. पुण्यवंतांचा ध्यान करण्याचा विषय. (कृष्ण.) ३३. गोपी. ३४. कृष्णानें केलेल्या चरित्रांचें पुनर्दर्शन (सोंग आणणें इ०). ३५. जळालें आहे शरीर ज्यांचें. ३६. पिंपळ इत्यादि वृक्षांस. ३७. माधव (कृष्ण) कोठें आहे असें विचारिती.

गृह न स्मरती; रानीं फिरती, उन्मत्तशा, [1]क्षत शरीरांनीं. ॥ ३
'जो वधि [2]अलिचिकुर [3]बका देखियला काय [4]चित्तचोर [5]कुरबका! ।
तूं तरि सांग, [6]अशोका! हे गोपीमंडळी करावि [7]अशोका. ॥ ४
हे [6]पुन्नागा ! [8]नागा ! सांग, करी विमर्द जो महात्मा [9]नागा; ।
भ्यालों [10]कंपकरा या कामशरा, कृष्ण सांग, [6]चंपकराया ! ॥ ५
तूं तरि सदये तुळसी ! वद [11]हरिचरणप्रिये ! (रमेसीं [12]तुळसी). ।
जरि अवलोकन, [13]कपटाकर कोठें ? सांग, भूललों [14]कनकपटा.' ॥ ६
प्रार्थुनियां मालतिला, पुसती त्या [15]कांतिनिर्जिततमाल तिला ।
गोपी, 'श्री[16]मल्लीलानिधि कोठें ?' हें विचारिती [17]मल्लीला. ॥ ७
'[18]निष्ठुर जे, [19]असु जाती; समृदु तुम्ही जातियूथिके ! [20]असु जाती ।
ऐसें हृदया वाटे; गेला कीं तो न [21]भवसुहृद या वाटे ? ॥ ८
[22]जलदश्यामा, कंदा [23]मोदांच्या, देखिलें तुवां [24]माकंदा ! ? ।
यश संपादा दानीं प्राणांच्या; हे [25]किजे कृपा [26]ददांनीं. ॥ ९
तूज [27]नता [28]पनसा ! हे [29]स्त्रीसंहति; [30]हरिवियोगताप न साहे. ।
सदया ! पाव, ([31]दवार्ता हरिणीशा;) करुनियां कृपा, वद वार्ता. ॥ १०
[32]व्याळविदारक [33]सारे न कथां हे [34]अनस ! कोवि[35]दार ! कसा रे ? ।
तुज [36]जंबुद्रो ! हातें वंदुनि पुसतों [37]अघाकृतद्रोहातें. ॥ ११
[38]सद्गतिदायक दावा, सांगा भेटेल [39]गोपराय कदा [40]वां. ।

---

१. कंटकादिकांनीं फाटलेल्या. २. अलीप्रमाणें (विंचवाप्रमाणें) अविचारानें पीडा देणाऱ्या. ३. राक्षसविशेष. ४. कृष्ण. ५. वृक्षविशेष. ६. वृक्षविशेष. ७. शोकरहित. ८. गर्वहीन. ९. कालियास. १०. कांपविणाऱ्या (कामरूपी बाणास). ११. कृष्णचरणास प्रिय अशी जी तूं. १२. तुलना पावतेस. १३. कपटखनि. १४. पीतांबरधारी कृष्णास. १५. निजकांतीनें जिंकिलें आहे तमालास ज्यानें. १६. महान् लीलेचें कोठार. (कृष्ण.) १७. वृक्षविशेष. १८. एथपर्यंत संबोधिलेले वृक्ष कठोर; आतां तुम्ही तरी हे जाई ! जुई ! सांगा, इ० १९. असों. (याचा कर्ता 'जाती'). २०. प्राण (आमचे). २१. शिवाचा मित्र. २२. मेघश्यामा, कृष्णास. २३. आनंदाच्या मुळास. (कृष्णास.) २४. आंबा. २५. करावी. २६. आपण (थोरांनीं). २७. शरणागत. २८. हे फणसा!. २९. स्त्रीसमूह. ३०. कृष्णाच्या वियोगानें झालेला संताप. ३१. वणव्यानें भाजलेल्या मृगीसारख्या. ३२. सर्प (कालिया) मर्दन करणारा. ३३. सर्व. ३४. वृक्षविशेष. ३५. कांचनाचे वृक्षा ! ३६. हे जांवळीच्या वृक्षा ! ३७. अघासुरेंही अकृतद्रोह (यशस्वीपणें द्रोहविरहित) अशा (कृष्णातें). 'अपाकृत द्रोहातें' असाही पाठ आहे. ३८. मोक्ष देणारा. (कृष्ण.) ३९. कृष्ण. ४०. कीं.

[१]यमुनातटतापस! रे! न कसे [२]उपकृति करा? न हा ताप सरे. ॥ १२
रे! रे! साधो! [३]अर्का! जाणसि, तरि सांग [४]खळतमाच्या अर्का. ।
वद [५]हृत्साक्षी [६]बकुळा! वरिल [७]अलीच्या भला, कसा क्षीब, [८]कुळा? ॥ १३
टाकुनि [९]युवतिकदंबा गेला, तो देखिला न काय [३]कदंबा!? ।
आणी वनिं पाजाया अधरामृत, टांकि [१०]कितव [११]नीपा! जाया. ॥ १४
त्वां केलें तप [१२]महि! तें नेणों, [१३]कीं [१४]पुलकिता [१५]हरिपदें [१६]महितें. ।
वद, तूं [१७]सतीवरा, हें सुख [१८]त्रिविक्रमपदें किं [१९]आदिवराहें? ॥ १५
वद हरिणिसखि! प्रभु, जा [२०]दयितेच्या ठेवुनी [२१]निजांसिं स्वभुजा, ।
गेला याचि पथानें; कीं तीचीं कुंकुमें [२२]सुचर्चित थानें? ॥ १६
आलिंगनसहवासें हरिचें [२३]कुंदसुमदाम [२४]दुःसह वासें ।
आम्हां हेंच सुचवितें, लाधलि तव दृष्टि दर्शनामृतचवितें.’ ॥ १७
सफळ तरू लवले; [२५]या भाविति, हरिपादधूळिचें [२६]लव लेया. ।
आलिंगित [२७]लतिकांहीं त्यांसहि पुसती, [२८]मनोज्ञ बोलति कांहीं. ॥ १८
दुःखें निजतनु [२९]कारा वाटे; मग [३०]पूतनावधाद्यनुकारा ।
करिती वाचा [३१]काय; [३२]स्वांतीं त्यां धाक या [३३]भवाचा काय? ॥ १९
करुनी [३०]चरितानुकृती, शोधिति जो [३४]भवतमक्षयीं भानु [३५]कृती, ।
सुखधन, गावे लीलागुण ज्याचे, पुसति तो [३६]नगां वेलींला. ॥ २०
वृंदावनिं ताप [३७]दयानिधिविरहें धरिति [३८]गोपवनिता; पद या ।

---

१. यमुनेच्या तटावरील तपस्वी. २. उपकार. ३. वृक्षविशेष. ४. दुष्टजनरूपी अंधाराच्या सूर्यास. (कृष्णास.) ५. लोकहृदयांतील विचार पाहणारा. (कृष्ण.) ६. ओंवळीचा वृक्ष, बकुळीचा वृक्ष. ७. भ्रमरांच्या. ८. मत्त अलींच्या कुळाला भला वरील; क्षीब कसा वरील? भ्रमरसमूह क्षीबाला म्हणजे रसातें न उत्पन्न करणाराला वरित नाहीं; तुम्हावर भ्रमरकूळ दिसतें आहे; तेव्हां तुम्ही क्षीब नाहीं, यास्तव कृष्ण कोठें आहे हें सांगा, असा भावार्थ. ९. स्त्रीसमूहास. १०. शठ, ठक. ११. वृक्षविशेष. १२. हे पृथ्वि! १३. कारण कीं. १४. रोमांच उभारलेजीचे. १५. कृष्णचरणानें. १६. पूजितानें. (पदानें.) १७. कृष्णास. १८. कृष्णपदें. १९. वराहअवतारें. २०. स्त्रियेच्या. २१. निजअंसिं, आपल्या खांद्यावर. (दयितेच्या अंसिं, स्वभुजाला; व निजांसीं, दयितेच्या भुजाला—असा अन्वय.) २२. सुशोभित. २३. कुंदीच्या फुलांचा हार. २४. उग्र; (सवतीनें आलिंगन देतां कृष्णांगीं तें दाम होतें म्हणून.) २५. गोपी. २६. अंश. २७. वल्लींनीं वेष्टित असलेल्या वृक्षांस. २८. सुरस. २९. बंदीखाना. ३०. पूतनेचा वध इत्यादि कृष्णचरित्रांच्या पुनर्दर्शनास. ३१. शरीर. ३२. अंतःकरणीं. ३३. संसाराचा. ३४. संसाररूपी अंधाराचा सूर्य. ३५. चतुर. ३६. वृक्षांस. ३७. दयासमुद्राच्या (कृष्णाच्या) विरहानें. ३८. गवळणी.

प्रभुचें [1]भुवनादिसतीं प्रिय, तन्मुद्रा [2]रजांत नयनां दिसती. ॥ २१
ते, [3]साधुमनोमठसे दिसती लोचनचकोर[4]पदसोम, ठसे; ।
जे [5]बहुमंडित [6]लक्ष्मीनयनाब्जरवि [7]ध्वजाद्यखंडितलक्ष्मीं. ॥ २२
त्या धुंडिति [8]पदवीतें, तों देखति जें सुसंपदा पद [9]वीतें. ।
(जी परमकृपा दानीं स्वसुखाच्या) दृष्टि वेधिल्या पादांनीं. ॥ २३
[10]पदंजळज वळखि [11]जाया जे ते; तों हेतु होय जवळि [12]खिजाया, ।
कीं दिसति [13]तयासहितें [14]युवतिपदें; न गमतीच मनिं त्यांस [15]हितें ॥ २४
‘अगइ! [16]विलासवतीनें [17]प्रेमगुणीं कृष्ण [18]गोविला सवतीनें! ।
सर्वस्वा हरि; लाजे दे आम्हा, गेलि घेवुनी हरिला जे.’ ॥ २५
पावति तापा; उलतें उर; जाणो वज्र सवतिचें पाउल तें! ।
तीचें [19]अतुल तप, नसे संशय, जीचे [20]पदांक तेहि [21]तपनसे.’ ॥ २६
द्वेषें होय तडफडा; म्हणती, ‘[22]चिंताब्धिची [23]अलभ्य [24]तड; फडा ।
जसि [25]निधिवरि सापिणिची, संगति हरिसीं तसीच या पापिणिची! ॥ २७
न लवूनि पळ, विलास त्यागवुनी, हरि! जिणें वनिं [26]पळविलास, ।
असि कोण [27]कृतव्रत ती [28]शृंगाररसुरद्रुमींहि चढली [29]व्रतती? ॥ २८
ये [30]श्रांत [31]तडागाला, [32]जीवन दे; हा न दे खचित डागाला. ।
[33]कर्मविपाका सारे हें तापविलें [34]सुधाकृपाकासारें. ॥ २९
जे प्रीतिस ये [35]कांता, घेवुनि गेला मुकुंद तिस एकांता; ।
करुणा न [36]सये! [37]कांता, रानीं त्यजितां [38]वधूततिस [39]ये [40]कांता! ॥ ३०
[41]स्कंध [42]अनुभवि भुजांचें स्पर्शसुख, [43]तिचा [44]प्रदान करि विभु [45]जांचें; ।

१. पृथ्वींतील इत्यादि साधूंस. २. धुळींत. ३. साधूंच्या मनांचे मठ (विश्रांतीचीं स्थानें.) ४. नेत्ररूपी चकोरपक्ष्यांचे पदरूपी चंद्र. ५. सुशोभित. ६. लक्ष्मीचे डोळे हींच कमळें त्यांचा सूर्य. ७. ध्वजादिकरून अखंडित (सर्व) चिन्हांनीं. ८. मार्गास. ९. प्रसवतें, देतें. १०. चरणकमल. ११. स्त्री. १२. रोषाया. १३. कृष्णासहितें. १४. स्त्रीचीं पाउलें. १५. प्रिय. १६. विलास करणाऱ्या स्त्रीनें. १७. प्रेमरूपी दोरांनीं. १८. बांधिला. १९. निरुपम. २०. पदचिन्हें. २१. सूर्यासारिखे. २२. चिंतासमुद्राची. २३. न मिळण्याजोगी. २४. किनारा. २५. द्रव्यावर. (पुरून ठेविलेल्या धनावर.) २६. पळविला गेलास; (हा कर्मणि प्रयोग. असे प्रयोग पंतांच्या काव्यांत कोठें कोठें आढळतात.) २७. व्रत केलेली. २८. शृंगाररसाचा कल्पवृक्षच असा जो तूं, हे कृष्णा! त्यावर. २९. वल्ली. ३०. एकादा थकलेला मनुष्य. ३१. तळें. ३२. उदक. ३३. कर्माच्या परिणाम. ३४. सुधाच अशी कृपा ज्यांत अशा सरोवरें. ३५. गोपी. ३६. सखे! ३७. कृष्णास. ३८. स्त्रीसमूहास. ३९. येई. ४०. सुंदर (कृष्णास). ४१. खांदा. ४२. सेवी, वेई. ४३. स्कंध. ४४. देणें. ४५. भुज्यांचें.

कीं नि[1]यता प[2]दराजी एकिकडे; दे मनास ता[3]पदरा [4]जी. ॥ ३१
ई[5]श्वरपदसारस ती जाली आ[6]राधिती नि[7]गमसार सती; ।
कीं नेली एकांता ते; अ[8]स्मत्स्मृति मनांतहि न ये [9]कांता ! ॥ ३२
[10]गतिजितबालकरेणु श्री[11]शपदांभोजभक्तपालकरेणु[12] ।
हे धन्य; विधि[13]भवानीपतिलक्ष्मी वाहती शिरों[14]बुभवांनीं. ॥ ३३
सिद्धी परमा दे, वी, जे जननी, हें त्रिवि[15]ष्टपें रमादेवी, ।
ते ही ताप सराया वरि रज हें, प्रिय शि[16]वादितापसराया. ॥ ३४
हे पीयू[17]षघन; तगे ताप न; होती वि[18]नष्टविपदघ [19]नतें गे! ।
स्व[20]विधि कसा [21]गरल वसे? तीचे पद गमति [22]अमृतसागरलवसे. ॥ ३५
भाग्यास न [23]माप तिच्या; [24]अस्मत्सर्वस्व त्या हरुनि, [25]मापतिच्या ।
[26]अधरांचा परम पिते रस एकांतीं; स्मरे न सख्य कि[27]मपि ते. ॥ ३६
अमृतांत वि[28]षलवास स्थिति; कीं स[29]न्मंडळीं म[30]हाखळवास; ।
[31]सुमदामांत वि[32]खारे किंवा व[33]रमाणिकांत वसति निखारे ! ॥ ३७
तैसें [34]सादर जांत स्वसुखसमृद्धी मुकुंदपादरजांत, ।
त्यांत पहा ! आली हो त[35]त्पदधूली सु[36]दुःसहा, [37]आली ! हो!' ॥ ३८
वर्णिति [38]वदनिं [39]श्रेणी कृष्णपदांची, [40]विमुक्तिपदनिश्रेणी. ।
'चं[41]दननिधिनीं [42]अहितें त्यजिलें; कीं न जवळी पदें तीं [43]अहितें ! ॥ ३९
भूमीतें [44]नातळवे, [45]यवसाग्रीं [46]विद्धें [47]अपटु [48]गमना तळवे; ।
यास्तव त्या [49]सुभगेला [50]स्वस्कंधीं बैसवूनि [51]वल्लभ गेला!' ॥ ४०

१. नियमित. २. पदमालिका. ('आहे' या क्रियापदाचा अध्याहार करावा.) ३. तापभय. ४. राजी. ५. ईश्वराचें चरणकमल. ६. पूजिती. ७. वेदसार. ८. आमची आठवण. ९. पतीस. (कृष्णास.) १०. गतीविषयीं जिंकिलें आहे लहान हत्तीस ज्याणें. ११. कृष्णपद-कमल. १२. रज:कण. १३. ब्रह्मा, शिव, आणि लक्ष्मी. १४. शिरोरूपी कमळांनीं. १५. जग. १६. सांबादि महान् तपस्वी लोकांस. १७. अमृताचे मेघ. १८. नष्ट जहाली आहे विपत्ति व पातक ज्यांचें. १९. शरणागत. २०. दैव. २१. विष. २२. अमृताचे लहानसे समुद्र. २३. मोज, गणना. २४. आमचें सर्व धन. २५. रमापतीच्या. (कृष्णाच्या.) २६. ओठांचा. २७. अगदीहि. २८. विषांशास. २९. साधूंच्या मंडळींत. ३०. महान् दुष्टाचा संग, वास. ३१. फुलांच्या हारांत. ३२. सर्प. ३३. श्रेष्ठ रत्नांत. ३४. आदरपूर्वक. ३५. त्या स्त्रियेच्या पायांचे रज:कण. ३६. सहन करण्यास फार कठीण. ३७. हे सख्यांनो! ३८. मुखांनीं. ३९. मालिका. ४०. मोक्षपदास चढून जाण्याची शिडी, निसण. ४१. चंदनवृक्षांनीं व द्रव्यांनीं. ४२. सर्पांतें. ४३. त्या गोपीचीं न आवडणारीं अशीं पाउलें. ४४. चालवेना. ४५. तृणाच्या अग्रांनीं. ४६. टोंचलेलें. ४७. अकुशल. (गैरमाहिती.) ४८. चालण्यास. ४९. स्त्रीला. ५०. आपल्या खांद्यावर. ५१. पति.

ऐसें [१]तर्कविख [२]बेळी हृदयांत शिरोन बहुत तापवि, खवळी. ।
जळति मनीं कोपानें, कीं केलीं [३]तच्छिरें तिणें [४]सोपानें. ॥ ४१
'या तरुळीं अतिशयितें प्रेमें [५]कुसुमेंहि वेंचिलीं [६]निजदयितें; ।
येथें [७]प्रमदा [८]मानें [९]भूषविली [१०]स्वकररचितसुमदामानें; ॥ ४२
कीं [११]पादाग्रेंचि पहा दिसती हरिचीं; [१२]प्रियानुकूल [१३]सकृप हा ! ।
आपणचि फुलां वेंची; आवडतीच्या [१४]गुणाप्रति भुलावेंची ! ॥ ४३
[१५]जानुयुगीं बसकेला चिन्हें जाणूनि, म्हणति, '[१६]हा वश केला; ।
वेणि तिची घातलि ही ! या [१७]भाळीं [१८]विधि असा कसा घात लिही ?॥४४
असि करुनि कृपा, [१९]सुमनें लेवविलीं [२०]तदधरासवपिपासुमनें, ।
नंदसुतें शोभविलें; सवतीनें हें कसें हृदय [२१]लोभविलें ! ॥ ४५
हीं चिन्हें कथिति, जसीं [२२]सूचकनेत्रें, मुकुंद रमला तिजसीं; ।
पाजुनि अधरासव ती, भुलवुनि या, [२३]भोगिती [२४]नगधरा सवती !' ॥ ४६
[२५]एवं गोपी [२६]विकळा [२७]विमनस्का धुंडिती हरीतें सकळा. ।
मनिं भरलें [२८]प्रेमपिसें, स्त्रीमंडळ तें वनांत हिंडे [२९]कपिसें. ॥ ४७
दुर्लभ हरिपद[३०]युगली पावुनि तेही मनांत गोपी फुगली. ।
कीं, 'बहुतांपरि, सकळा स्त्रींत बरी, जाणतें [३१]तयांपरिस कळा.' ॥ ४८
घेवुनि वल्लभ गेला जीस, असा गर्व होय त्या [३२]सुभगेला; ।
हे बुद्धि [३३]कुडी [३४]आली व्रजशापाचीच, गर्व न उडी घाली. ॥ ४९
पति लक्ष्मीचा [३५]लीलानर त्यास म्हणे, 'अशक्त मी [३६]चालीला; ।

---

१. विचाररूपी विष. (संस्कृत प्राकृत शब्दांचा समास कविनैरंकुश्यामुळें अदोष होय.) २. बलवान्. ३. त्यांचीं शिरें. ४. पायऱ्या. ५. फुलेंहि. ६. निजपतीनें. ७. स्त्री. ८. सन्मानानें. ९. शोभविली. १०. आपल्या हातानें गुंतलेल्या फुलांच्या हारानें. ११. पायांचीं अग्रें, शेवट. १२. प्रियांस अनुकूल. १३. सदय. १४. गुणरूपी दोरीस. १५. दोन्ही जांघांवर, मांडीवर. १६. कृष्ण. १७. या (आमच्या) कपाळीं. १८. ब्रह्मा. १९. फुलें. २०. तिचें अधरासव (मद्य) पिण्याविषयीं तृषित आहे मन ज्याचें त्यानें. (नंदसुतानें.) २१. भुलविलें. २२. चहाडखोराच्या नयनाप्रमाणें. २३. भोगिले. २४. गोवर्धनधरा. (कृष्णा.) २५. याप्रकारेंकरून. २६. कळारहित, व्याकुळ. २७. असंतुष्ट, खट्टु, विरस झालेल्या. २८. प्रेम(ममता)रूपी वेड. (एक शब्द संस्कृत व दुसरा प्राकृत अशांच्या समासाचें हें एक उदाहरण होय. अथवा 'प्रेम' आणि 'पिसें' अशीं दोन पदें वेगवेगळीं लिहून 'पिसें' हें 'मंडळ' याचें विशेषण करावें.) २९. वानरांसारिखें. ३०. जोडी. ३१. त्यापेक्षां. बहुतांपरि म्ह० अनेकप्रकारें. ३२. स्त्रीस. ३३. वाईट, दुष्ट. ३४. सखी. ३५. लीलेनें मनुष्य झालेला. ३६. चालण्यास.

न घडे हा श्रम; जाणें[1] तेथें न्यावें, न एकही क्रम[2] जाणे.' ॥ ५०
हांसे कृष्ण; मग मनीं श्रीकांत म्हणे तिला, 'बहु श्रम गमनीं; ।
स्पर्शसुखा दासाचा[3] योग्य करीं तरि बसोनि खांदा साचा.' ॥ ५१
मानीस्त्रीजित[4] कामी[5], कीं, 'वर्ते वर्तवीं हरी जितका मीं' ।
या मतिस न सोपा हे जाणे; स्कंधीं चढोनि बैसों पाहे. ॥ ५२
श्रुतिनुत[6] ऐसा, याला नेणें; स्कंधींहि जाय बैसायाला ।
जों ते रामा[7], लवला; अंतर्हित[8] होय दीपसा मालवला[9]. ॥ ५३
'कंठीं हार विलासीं अहा! प्रमादें[10]करूनि हारविला[11]सी! ।
चंद्र न हा [12]रवि [13]लासी; करिल [14]उरीं [15]स्मरशर [16]प्रहार विलासी[17]! ॥ ५४
करिचा[18] निधि हारविला, तेणें जो ताप, लाजविल हा [19]रविला!' ।
करि बहु हारावा[20] हे; स्व उरावरि अश्रुच्याचि हारा वाहे! ॥ ५५
करि फार विलापा हे; हरिविरहीं हिमकरांत[21] [19]रविला पाहे. ।
गेला जो धव[22] नीतिभ्रंशें, न पवे[23] तदीय शोध वनीं ती. ॥ ५६
'चंद्र न भागे[24], लासी[13] हृदया, कां प्राणवल्लभा! गेलासी? ।
धांवुनि दे खेंव[25]; दये करिं; मृत्यु घडेल, जरि न देखें; वद ये. ॥ ५७
आचरलें[26] आगा[27] मी दुर्मति; नेणेंचि ताप हा आगामी[28]! ।
या मानसखेदासी वारीं; टाकीं वनांत न सखे! दासी.' ॥ ५८
करि नैक[29] विलाप वनीं, तो ध्वनि गोपींस आयकविला पवनीं[30]. ।
भेटति तीस झडकरी, जीवरि हरिविरहवन्हिमेघ[31] झड[32] करी. ॥ ५९
आळ[33] विट[34]विलासाचा ज्यावरि, आत्मा हरी विटविला साचा, ।
वृत्त कथी फार, जिणें गणिलें[35] कमळासुपतिविणें[36] भार[37] जिणें[38]. ॥ ६०

---

१. जाणें असेल तिकडे मला न्यावें, पण माझ्यानें तर स्वतः चालवत नाहीं. २. पाऊल जाणतें. ३. सेवकाचा. (माझा कृष्णाचा.) ४. स्त्रीनें जिंकिलेला. ५. कामाधीन. ६. वेदांनीं स्तविलें आहे ज्यास. ७. स्त्री. ८. गुप्त. ९. विझाला. १०. गर्वानें, चुकीनें, उन्मत्तपणानें. ११. माझ्याकडून गमावला गेलास. १२. सूर्य. १३. भाजी. १४. हृदयीं. १५. कामरूपी बाण. १६. घाव. १७, विलास करणारा. १८. द्रव्य. १९. सूर्याला. २०. हा! आरावा, खेदशब्दास. २१. चंद्राच्या ठायीं. २२. पति. २३. लाहे, पावे. २४. जाई. २५. आलिंगन. २६. केलें. २७. अपराधास. २८. येणारा. २९. अनेक. ३०. वायूंनीं. ३१. कृष्णाचा विरह हाच कोणी एक अग्नीचा पर्जन्य. ३२. वृष्टि. ३३. आरोप. ३४. जारकर्मी विलासाचा. ३५. मानिलें. ३६. लक्ष्मीच्या प्राणपतीशिवाय. ३७. ओझें. ३८. जगणें.

[1]सुखधाम गवळणीस त्यागी; आल्या समस्त मग [2]वेळणीस. ।
होय उदासीन [3]मन जेणें, तें स्मरुनि, करिति दासी नमन. ॥ ६१
[4]धुंडिति पुनरपि [5]नाकी वांछिति [6]यच्चरणरेणुला [7]सपिनाकी. ।
[8]त्यांला [9]विधु [10]रुचिदिवटी दाविल कसि? [11]वृक्षमूलतम जिस [12]निवटी.॥ ६२
म्हणती, 'दाट [13]नग वसे; छायातीरांत कृष्णवाट न [14]गवसे ! ।
न शमे तापहि;' त्याया पदरज, जाती स्थळासि त्या पहिल्या, [15]यां. ॥ ६३
[16]चेष्टावचनमनाहीं त्या [17]तन्मय सर्व; अन्य [18]उद्यम नाहीं. ।
[19]नंदकुलभवनदीपा गाती, [20]पुलिनीं बसोनि, [21]शर्मनदीपा. ॥[22] ६४

## अध्याय एकतिसावा.

'[23]व्रज [24]उत्कृष्ट तव [25]जनिस्तव हरि ! कीं, [26]श्री वसे सदा [27]मुदित जनीं; ।
प्राण [28]त्वदर्थ दासी धरुनि, [29]हुडकितों दिशांत; दाविं पदासी ! ॥ १
[30]शरदंबुजगर्भरुची चोरी[31] तुझि दृष्टि जे [32]सुखवरदगुरुची, ।
तीणें फुकटा दासी मारिसि; हा वध न काय या [33]प्रमदांसी? ॥ २
[34]विषजळ, [35]दाव, [36]वृष, [37]घनश्वसनाशनि अन्यभय [38]मयात्मज, [39]अघ, न ।
बाधों दिधलें, सदया ! [40]संप्रति दुःखांत गोपिका कां वद या? ॥ ३

१. सुखाचें घर. (कृष्ण.) २. नम्रतेस, वळणीस. ३. या शब्दांतील 'न' हें अक्षर पादांतस्थ असल्यामुळें दीर्घ जाणावें, व गीतिछंदांतील पहिल्या चरणास पाद' असें मानून तदंतस्थ अक्षर ऱ्हस्व असल्यास, त्याच्या मात्रा दोन मानाव्या, हा नियम मोरोपंतांनीं आपल्या ग्रंथांत स्वीकारिल्याचें हें एक उदाहरण आहे. ४. 'त्यास' याचा अध्याहार करून, या क्रियापदाचें कर्म करावें. ५. देव. ६. ज्याच्या पायांच्या रजःकणास. ७. सांबासहित. पिनाक आहे आयुध ज्याचें तो पिनाकी (शंकर). ८. गोपींस. ९. चंद्र. १०. निजकांतिरूपी मशाल. (संस्कृत प्राकृत शब्दांचा समास येथें केला आहे.) ११. झाडांच्या मूळाजवळचा अंधार. १२. काढून टाकी, नाशी. १३. वृक्ष. (एकाच वृक्षाविषयीं बोलतात असें नव्हे, परंतु एकवचनी नामाविषयीं बोलून तज्जातीय अनेक व्यक्तींचा बोध या ठिकाणीं केला आहे. या वचनास 'जात्यैकवचन' असें म्हणतात.) १४. सांपडे. १५. गोपी. १६. हलनचलन, बोलणें, आणि मन यांहीं. १७. कृष्णमय. १८. उद्योग. १९. गोकुलरूपी घरांतील दिवाच, असा जो (कृष्ण) त्यास. २०. तटीं. २१. कल्याणसमुद्रास. (कृष्णास.) २२. येथें 'रासक्रीडे'चा दुसरा अध्याय समाप्त झाला. २३. गोकुळ. २४. सुखी. २५. जन्मासाठीं. (तूं जन्मास आलास म्हणून.) २६. लक्ष्मी. २७. आनंदित. २८. तुझ्यासाठीं. २९. शोधितों. ३०. शरदृतूंतील कमलगर्भाची शोभा. ३१. हरण करी; (त्याप्रमाणें सुंदर इ०.) ३२. सुख आणि वर देणारे जे कोणी, त्यांत श्रेष्ठ असा जो तूं त्या तुझी (दृष्टी). ३३. स्त्रियांस. ३४. विषयुक्त पाणी. (यमुनेच्या डोहांतील.) ३५. वणवा. ३६. बैलाचें रूप घेऊन आलेला राक्षस. ३७. मेघ, वारा आणि वज्र. ३८. मयासुराचा मुलगा. ३९. अघासुर. ४० तूर्त.

गोपीकुक्षींतून[1] प्रकट जहालासि विश्वसाक्षी तूं न; ।
जगदवना[2] उदय जनीं यदुवंशीं तुज सख्या ! विनवि कमळजनी[3]. ॥ ४
यदुपति ! भवभीत[4] मनीं जे, तव पद वरिति साधु तद्भयशमनीं[5]; ।
जें पटु धरि करिं कमळा[6], वरदा[7] ! ठेवीं शिरीं तया करकमळा[8]. ॥ ५
वीरा ! व्रजार्तिशमना[9] ! करिसी गतगर्व[10] तूं स्मितें स्वजनमना; ।
दासी न विरहदावीं[11] टाकिं, सख्या ! भेटि दे; मुखांबुज[12] दावीं ! ॥ ६
हरि नम्राच्या शमला[13], पशुपाठिं[14] फिरे, जयांत नांदे कमळा[15], ।
जें नुरवि[16] फणिमदमळा[17], काम मथी, ठेवुनी कुचीं पदकमळा[18]. ॥ ७
सत्प्रियवाक्या[19] वाणी[20] जींत न, असि सुनयना ! तुझि मधुर[21] वाणी[22], ।
तीणें दासी मोहाकुळ[23] विरहीं; अधरअमृत[24] पाजिं; शमो हा[25]. ॥ ८
'तप्तातें वांचवितें तव[26] सुकथामृत,' कवींद्र वर्णिति चवितें[27]. ।
'अघ[28], मदं[29], हरि; सुख करितें श्रवणें,' ते बहुद[30] कथिति जे बहु हरि ! तें ॥ ९
प्रेमनिरीक्षण[31], हसित[32], ध्यानीं सुख जें, प्रिया ! विहार विलसित[33], ।
एकांत विनोद, मना जडले, खवळिति; करीं कपटिया ! शमना. ॥ १०
पशु चारित फिरसि वनीं, कांता[34] हे कळवळे सदा तव[35] भवनीं[36]. ।
तृणकणिशअंकुरांनीं[37], कीं, दुखतिल कमळमृदुल[38] तव पद रानीं. ॥ ११
धूळीधूसरअलकीं[39] वेष्टित समधुपपराग[40] फुल्ल कमळ कीं ! ।
सांजे घडि घडि वदना दावुनि, वीरा ! मनांत अर्पिसि मदना ! ॥ १२

---

१. यशोदेच्या उदरांतून. २. लोककल्याणार्थ. ३. कमलोद्भव. (कमळापासून जनि म्ह० जन्म ज्याचें तो, ब्रह्मदेव.) ४. संसारास भ्यालेले. ५. त्यांच्या भयनिवारणार्थ. ६. लक्ष्मी. ७. वर देणाऱ्या ! ८. हस्तरूपी कमळास. ९. गोकुळांतील दुःखशमन करणाऱ्या ! १०. नम्र. ११. वियोगरूपी वणव्यांत. १२ मुखकमळ. १३. पातकास. १४. गाईमागून. १५. लक्ष्मी. १६. येथें 'उरवि' या अजन्त धातूच्या योगानें 'न' या शब्दांतील 'अ'स परसवर्ण आदेश झाला आहे. जसें:— नुगवे, नुवडि. १७. कालियाचा गर्वरूप मळ. १८. चरणकमलास. १९. साधुजनास प्रिय अशा वाक्यांला जींत वाणी (उणीव) नाहीं. २०. उणीव. २१. गोड. २२. वचन. २३. मोहानें व्यथित झालेल्या. २४ चुंबनामृत. (हा शब्द सामासिक आहे म्हणून संधिनियमानें 'अधरामृत' असा लिहावयाचा, पण समास असतांहि संधि न करितां अशीं असंगतपदें मोरोपंतांनीं योजिल्याचें हें एक उदाहरण होय.) २५. मोह. २६. तुझें गोड चरित्र हेंच कोणी एक अमृत. २७. रुचितें. २८. पातक. २९. गर्व. ३०. दयाळ. ३१. प्रेमानें (प्रीतिनें) पहाणें. ३२. हास्य. ३३. सुंदर. ३४. स्त्रिया. (जात्यैकवचन.) ३५. तुझ्या (कांता.) ३६. घरीं. ३७. गवताच्या आणि कणिसांच्या अंकुरांनीं. (सामासिक शब्द असून समासघटित पदें नाहींत. मागच्या ८ व्या पद्यावरील टीप पहा.) ३८. कमळासारखें कोमल. ३९. धूळीनें व काळ्या केसांनीं. ४०. भ्रमरांनीं व पुष्परजांनीं युक्त.

पुरवि मनोरथ नमनें, [1]श्रीसहि जो पूज्य [2]भूविभूषणहि, मनें ।
ध्यावा संकटतरणा, ठेवीं स्तनिं त्या प्रियासि तूं निजचरणा. ॥ १३
वाढवि सुरता, झुरवी शोका, दे [3]स्वरित वेणुला रुचि बरवी, ।
अन्य सुखेच्छा न जना स्मरवी, [4]स्वाधररसासि दे [5]त्या [6]अजना ! ॥ १४
फिरसि वनिं [7]दिसां, [8]युगसी [9]त्रुटि होय तुला न देखतां; जैं दिससी, ।
[10]कुंटिलकचवदनपानीं, पातीं करि [11]म्हणुनि मन [12]विधिस [13]जड मानी. ॥ १५
त्यजुनि स्वजनसुतपती आलों निशिं[14] निकट तव [15]सुगीतहृतमती; ।
[16]इंगितें जाणसिहि; अति प्रभु [17]शठ तूं; त्यजिल अन्य पूरुष [18]युवती ? ॥ १६
[19]श्रीगृह, विशाळ उर, [20]संप्रेम [21]स्मित, दृष्टि, मुख विलोकुनि सुरस, ।
तव [22]विजन [23]नर्म [24]खेवळी [25]स्मर; सुरतेच्छा उठे; मना भ्रम कवळी ! ॥ १७
[26]व्रजजनदुःखासि हरी तुझी [27]अभिव्यक्ति सर्व [28]कुशलनिधिलहरी. ।
तव [29]वांछोगद मनिं या; [30]लवं तरि दे [31]स्वार्तिहर [32]अगद करुनियां. ॥ १८
जें तव पदकमळ तया, कठिण कुचीं हळुच ठेवुं सखया ! [33]सभया. ।
तेणें फिरसि वनिं, खडे खुपति, म्हणुनि जीवना ! सुबुद्धि गडबडे.' ॥ १९
[34]एवं बहु [35]ओळविती गोपी गुण गावुनी [36]गळे [37]वाळविती, ।
[38]तामरसाक्षी बसती, रडति, पडति, [39]विकळमानसा क्षी[40]बसंती ! ॥[41] २०

---

## अध्याय बत्तिसावा.

त्या [42]युवतिसभे [43]टकळा पतिचा; न सुचे मनांत तिस भेट[44]कळा. ।
जाल्या [45]हिंपुटि; [46]काया सांवरिति न; हरिदयाचि [47]तदसु टिकाया ! ॥ १

१. लक्ष्मीस. २. पृथ्वीचें भूषण. ३. स्वरानें युक्त अशा. ४. आपल्या अधरामृतास. ५. स्वाधररसास. ६. हे जननरहिता ! ७. दिवसाला. ८. युगासारिखी. ९. निमिष्य. १०. वक्र केश व वदन तद्रूप रसपान आम्ही करितों तेव्हां. ११. डोळ्यांचीं पातीं हालतात तितक्यानेंच कांहींवेळ दृष्टि चलित होते म्हणून. १२. ब्रह्मदेवास. १३. मूर्ख. १४. रात्रीं. १५. उत्तम गायनानें हरिल्या आहेत मति ज्यांच्या. १६. तात्पर्य. १७. लबाड. १८. तरुण स्त्रिया. १९. लक्ष्मीचें स्थान. २०. प्रीतिपुरःसर. २१. हास्य. २२. एकांतींचें. २३. विनोद. २४. चेतवी. २५. काम. २६. गोकुळांतील लोकांच्या दुःखास. २७. मूर्ति. २८. कौशल्यसागराची लाट. २९. इच्छारूपी रोग. ३०. किंचित्. ३१. आमच्या व्याधीस हरणारें. ३२. औषध. ३३. (आम्ही.) ३४. या प्रकारेंकरून. ३५. प्रणयानें प्रार्थिती. ३६. कंठ. ३७. शुष्क करिती. ३८. कमलनेत्री. ३९. व्याकुळ आहेत मनें ज्यांचीं. ४०. शठ(कृष्ण)स्त्रिया. ४१. येथें 'रासक्रीडे'चा तिसरा अध्याय समाप्त झाला. ४२. युवतिसमूहास. ४३. ध्यास. ४४. भेटीचा उपाय. ४५. श्रमयुक्त. ४६. देहें. ४७. त्यांचे प्राण.

वृंदावनिं रमणीया वि[1]रहदवें करपल्या [2]उदारमणी या. ।
[3]करुणामृतघन निववी, दर्शनमात्रेंचि त्या समस्तहि जिववी. ॥ २
वि[4]रहोष्णांत करपल्या [5]युवतिकुमुदिनी वि[6]कासकांति हरपल्या. ।
[7]तत्परिपाळक [8]रजनीपतिसा उगवे मुकुंद [9]अमृतकर जनीं. ॥ ३
पाहे वदनाला जे दृष्टि, म्हणायासि [10]रुचिर मदना लाजे, ।
ऐसा सुखदेह, [11]सितें, ताप निवारूनियां, [12]कुशल दे [13]हसितें. ॥ ४
प्राणांविण अचळ, [14]बळक्षीणेंद्रियगण, तसा करी न [15]चळबळ; ।
तो विरहीं जवळ वळे [16]शक्तिप्रद, तोंचि [17]युवतिवर्ग वळवळे, ॥ ५
त्यांत प्रकटे सहसा; धांवति, पाहुनि [18]वरास्यजलजा [19]सहसा. ।
[20]अमृतकर [21]सतारक हो तो [22]स्वचकोरसुविवेकरसतारक हो. ॥ ६
कोणी धरि करकमळा, स्वीकारी जो अनंतसुखकर [23]कमळा; ।
घे [24]प्रमदाबाहांतें [25]स्वांसीं, जा साधुमन सदा [26]बाहातें. ॥ ७
एकि म्हणे, 'तां[27]बूल प्राशुनि, व्हावें उरीं गुणें तां[28]बूल.' ।
एकि धरी पदकमला कुचीं, म्हणे, 'हेंचि आवडे पदक मला.' ॥ ८
एकि करी कोप, तिला [29]प्रीत्यालि म्हणे जरी, 'छळूं नको पतिला.' ।
चावुनि ओष्ठ, [30]कटाक्षीं ताडी; शिरलीच काय [31]बद्धकटाक्षीं. ॥ ९
एकि परम [32]सार सती [33]अनिमिष नयनें [34]मुकुंदमुखसारस ती ।
[35]पी बहु जेंवि [36]अधासी; तृप्ति नसे जसि [37]पदाब्जलुब्धबुधासी. ॥ १०

---

१. विरहरूपी वणव्यानें. २. उदार रत्नें. ३. करुणारूपी अमृताचा मेघ. (कृष्ण.) ४. विरह उष्णांत. ५. स्त्रीरूपी कमळणी. ६. प्रफुल्लित तेज. ७. त्यांचें परिपाळण करणारा. ८ चंद्रासारिखा. ९. मोक्षप्रद. १०. सुंदर. ११. शुभ्र (हास्य). १२. कल्याण. १३. हास्यानें. (हसिताचा रंग पांढरा अशी कवींची परिभाषा आहे, तिला अनुसरून हें वर्णन आहे.) १४. बळानें क्षीण अशीं इंद्रियें. १५. हलनचलन. १६. शक्ति देणारा. (कृष्ण.) १७. स्त्रीसमूह. १८. पतीच्या मुखकमलास. १९. हास्यानें युक्त अशा. २०. चंद्र. २१. नक्षत्रांनीं युक्त. २२. आपल्या चकोरांस विवेकरूपी रसानें (अमृतानें) तारणारा. ('चकोराणां चंद्रः कुसुमसमयः काननभुवां सरोजानां भानुः कुवलयकदंबं मधुलिहाम् । मयूराणां मेघः प्रथयति यथा चेतसि सुखम्' इत्यादि सुभाषितावरून चंद्र हा चकोरपक्ष्यांचा सुखदाता मित्र आहे असें व्यक्त होतें.) २३. लक्ष्मी. २४. स्त्रियांच्या बाहूंतें. २५. आपल्या स्कंधावर. २६. बोलावितें. २७. विडा. २८. तांबडें. २९. प्रीतिरूपी सखि. ३०. नेत्रप्रेक्षणांनीं. ३१. वैरत्वीं. ३२. श्रेष्ठ. ३३ पातें न हालवितां. ३४. कृष्णाचें मुखकमल. ३५. आदरानें किंवा प्रेमानें पाही. ३६. खादाड. ३७. (कृष्णाच्या) पदकमलीं लुब्ध झालेल्या ज्ञान्यास.

एकी [1]नयनावाटे ने [2]श्रीकांता [3]हृदब्जशयना वाटे ।
पावलि [4]शर्म विपुल, कीं नेत्रें झांकी, तनूहि सारी [5]पुलकीं. ॥ ११
पावुनि, [6]मुमुक्षु निवती ब्रह्मज्ञानेंचि, तेंवि हरिला, युवती. ।
गोपींस बहु शोभे, [7]परमाशक्तीस हर जसा; मन लोभे. ॥ १२
[8]यमुनापुलिनिं [9]मुकुंदप्रभृतिकुसुमसुरभिवायु जेथ, [10]मुकुंद ।
स्त्री ने चांदणियांत [11]क्षीरधिनें दिधलिया स्व आंदणियांत. ॥ १३
बसविति हरि सव्यानीं कृतासनीं हृदयपंकजीं भव्यांनीं; ।
जो ध्यावा साधूंनीं, बहु बहु जन्मीं महा[12]सुकृत साधूनी ॥ १४
निज [13]अंकावर पाया घेती, [14]तत्स्पर्शसुखसुधा [15]वरपाया. ।
[16]करजलजांसि [17]उरोजीं ठेविति, देती न तापलेश उरों जीं. ॥ १५
त्या [18]प्रणयक्रोधवती संमर्दन करिति हळुच चरणीं [19]युवती; ।
[20]धृतरोमांचवपु सती [21]जनवृत्तापरिच वृत्त [22]अभिनव पुसती. ॥ १६
‘एक भजति, जे भजनीं रत त्यातें; एक [23]अभजकाप्रतिहि जनीं; ।
एक न भजती [24]उभया; सख्या जना वद हरी! निवडुनी [25]शुभ या.’ ॥ १७
ज्याचें [26]अकृतज्ञपण स्थापिति तें [27]त्याकडे तदुक्तेंचि, [28]पण ।
साक्षी [29]तत्स्वसखा, तें जाणे, जें दुःख युवतिबुद्धिस [30]खातें. ॥ १८
कृष्ण म्हणे, ‘परिसा, जे भजति परस्पर, न रीति ते बरि [31]साजे; ।
कीं स्वार्थचि तें भजन, स्नेह, सुकृतही न ते वि[32]धूतदंभ जन. ॥ १९
ज्यास न [33]भजनापेक्षा, [34]वनभवनीं [35]तुल्य चंद्रिकारूपेक्षा ।

---

१. डोळ्यानें खुणाऊन. २. कृष्णास. ३. हृदयकमळीं निद्रा करण्यासाठीं. ४. कल्याण, सुख. ५. रोमांचांनीं. ६. मोक्षेच्छु. ७. पार्वतीस. ८. यमुनेच्या तीरावर. ९. मुकुंद इत्यादि पुष्पांच्या सुगंधानें युक्त असा वायु. १०. कृष्ण. ११. क्षीरसागरानें. १२. पुण्य. १३. मांडीवर. १४. त्याच्या (पायांच्या) स्पर्शापासून जहालेलें जें सुख तेंच कोणी एक अमृत. १५. अधाशीपणानें पीण्यास. १६. हस्तकमलांस. १७. स्तनीं. १८. प्रेमा व तसाच क्रोध यांहीं युक्त. १९. स्त्रिया. २०. धरिले आहेत रोमांच वपूंनीं (शरीरांनीं) ज्यांच्या. २१. सर्व लोकांस सामान्य असें वर्तमान. २२. नवीन. २३. आपली भक्ति न करणारास. २४. आपली भक्ति करणारा व न करणारा. २५. या तिहींतून चांगलें. २६. अपकारीपण. २७. कृष्णाकडे. २८. परंतु. २९. या पदांत ‘स्व’ याचा कांहीं उपयोग नाहीं म्हटलें असतां चालेल. ३०. जाचतें. ३१. शोभे. ३२. दंभरहित. ३३. दुसऱ्यानें आपलें भजन करावें अशी इच्छा. ३४. अरण्यांत किंवा घरांत. ३५. चांदणें जसें वनभवनीं तुल्य तसेंच पहाणें (ज्यांचें).

ज्यांची, सदय पितर ते; तद्धृदयीं[1] स्नेहधर्मही सतत रते. ॥ २०
उभयासहि न भजति जे पुसिले ते सांगणें तुम्हासि मज तिजें,[2] ।
'आत्मारामज्ञानी[3] एक तयामाजि', वर्णिलें तज्ज्ञांनीं;[4] ॥ २१
कीं आप्तकाम[5] दुसरे; किंवा अकृतज्ञ; मूढ ऐसे तिसरे; ।
स्वगुरुद्रोही चरम,[6] स्वांतीं[7] जे सर्वदाहि निष्ठुर परम. ॥ २२
सदयपरमकोटींत,[8] श्रुतिचा जो ख्यात,[9] तो चरमकोटींत.' ।
गणुनि हळुच हसती, तें जाणुनि, बोले दयैकगेह[10] सतीतें; ॥ २३
'ऐका सखयानों! हें यांत, परी, एकही स्वयें मी नोहें. ।
न भजें भजकाला[11] गे! तरिहि मजकडे न दोषगंधहि[12] लागे. ॥ २४
जाणति गुज[13] स्थविर[14] हें, सतत ध्यानप्रवृत्ति होते विरहें; ।
निर्धन पावे निवितें;[15] मग चित्तौत्सुक्य[16] हरपतां निरवधि[17] तें. ॥ २५
लोकश्रुति[18] स्वजनता[19] टाकुनि जालां तुम्ही समस्त मज नेता;[20] ।
हो प्रीति असीमा,[21] जी हे मद्विरहें, सुबुद्धिच असी माजी. ॥ २६
स्नेह करा गे! जावें; मनिंचा मी कठिन, हें न रागेजावें;[21] ।
ओळ[22] वृथा आली हो निष्ठुरतेची; न हे खरी ओली![23] हो. ॥ २७
दे प्रेमालाप[24] रती;[25] टाकीं मी यापुढें सुधेला[26] परती! ।
गुप्त जवळि कां नसणें जरि तर्पावे तृषार्त[27] हे कान सणें. ॥ २८
तोडुनियां गृहबेड्या,[28] आलां, झालां, न देखतां मज, वेड्या. ।
न फिटे हें स्नेहरिण; प्रिया तुम्ही मधुरगीतवश[29] मी हरिण.[30] ॥ २९

---

१. त्यांच्या हृदयीं. (येथें संधिनियमाप्रमाणें 'हृदय' शब्दांतील 'हृ'चा 'धृ' झाला आहे.) २. तिसरें. ३. आत्मज्ञानी. ४. तें (तत्त्व) जाणणाऱ्यांनीं. ५. स्वार्थी. ६. शेवटचे. ७. अंत:करणीं. ८. भागांत. ९. गायिलेला; श्रुतीनें ( वेदानें.) १०. दयेचें मुख्य स्थान. (कृष्ण.) ११. भक्ताला, सेवकाला. १२. दोषाचा वास, कणसुद्धां. १३. गुह्य. १४. ज्ञानवृद्ध. १५. द्रव्यातें. १६. चित्ताची उत्सुकता. १७. अमर्याद. १८. लोकांचें बोलणें, लोकवार्ता, जनश्रुति. १९. आप्तजनसमूह. ('ता' हा समूहदर्शक प्रत्यय आहे—जसें, बंधुता (बंधुसमूह), ग्रामता (ग्रामसमूह). २०. नम्र. २१. रागें भरावें. रागेजाणें=रागावणें. २२. आरोप. २३. हे सखयांनो! २४. प्रेमयुक्त आलाप. २५. प्रीति. २६. अमृताला. २७. तहानेनें पीडित. २८. एक शब्द संस्कृत आणि एक प्राकृत अशांचा समास मोरोपंत केव्हां केव्हां करितात त्याचें हें उदाहरण होय. समासांतील पदें एकाच भाषेंतील असावीं या नियमास अशा उदाहरणांनीं बाध येतो. २९. गोड गायनास वश. ३०. हरिण नादलुब्ध आहे अशी प्रसिद्धि आहे.

[1]मन्मानसा नच कळे [2]भवदुपकारामृताब्धिमाजि [3]बुचकळे. ।
न घडे [4]ऋणपरिहार प्रीतिचि दे हें महा जयापरि हार ! ॥ ३०
[5]उपकृतिसागरतरणीं सखिहो ! तुमची [6]सुशीलता [7]वर [8]तरणी; ।
[9]स्वप्रत्युपकृति होडी; मज ठावी शक्ति; गति इची बहु थोडी !' ॥ ३१
हे [10]अजित [11]पराभूती दावी भक्तां, परंतु न [12]परा [13]भूती; ।
[14]शरणागति बहु मानी; बसवी [15]निजकिंकरी [16]प्रसादविमानीं. ॥[17] ३२

---

## अध्याय तेहतिसावा.

मग तेथें हरि [18]रासक्रीडा करि चेतवूनि [19]अशरीरास. ।
वेष्टिति [20]कनकदुकूला मंडलरूपें प्रिया स्त्रिया अनुकूला. ॥ १
[21]बहु जाला घडिमाजी दोघी दोघांत; म्हणति, 'आवडि माजी ।
पतिला, कीं आपलियाजवळी;' गोपी अशाचि परि व्यापलिया. ॥ २
क्षितिचा तो हार; मणी [22]मरकत [23]श्यामकांति हरि हा; रमणी ।
[24]गौरस्वर्णमणिगणीं, [25]भुजगुणसुषुमा मनोहरा कोण गणी ? ॥ ३
बाहु समर्पी [26]विभु जा स्त्रीचा स्कंधीं, स्वयेंहि मग तेंवि भुजा, ।
अतुल सुखां द्यायाच्या [27]सुरतरुचा [28]व्रततिसीच खांद्या [29]यांच्या ! ॥ ४
[30]भास्वर देवविमानें [31]व्योमीं दाटति, अनेक [32]सूर्यसमानें; ।
वाटे तीं न [33]खयानें; तें मिष केलें च्चि [34]पद्मिनीसखयानें ! ॥ ५

---

१. माझ्या मनास. २. तुमच्या उपकाररूपी अमृतसागरांत. ३. याचा कर्ता 'मानस.' ४. कर्ज फेडणें. ५. उपकाररूपी समुद्र तरून जाण्याविषयीं. ६. चांगला स्वभाव. ७. श्रेष्ठ. ८. नौका. ९. मी जो उलट उपकार करीन तो. १०. कृष्ण. ११. पराजय. १२. श्रेष्ठ. १३. अद्भुत शक्ति. १४. शरण येणें. १५. आपल्या दासी. (गोपी.) १६. प्रसादरूपी विमानांत. १७ येथें रासक्रीडेचा चतुर्थ अध्याय पूर्ण झाला. १८. रासोत्सव. कृष्णानें गोपींसह कुंजवनांत जो खेळ केला त्याला 'रासक्रीडा' म्हणतात. १९. कामास. (कामाला शिवानें दग्ध केलें ह्मणून अशरीर, अनंग, असें त्याला नांव पडलें.) २०. कनक (पीत) आहे दुकूल (वस्त्र) ज्याचें, अशा कृष्णास. २१. अनेकरूपी. २२. मरकतरत्नासारिखा. २३. कृष्णवर्णी. २४. गौर आणि सुवर्ण वर्णाच्या ज्या स्त्रिया हेच मणि, त्यांच्या समूहांत. २५. बाहुरूपी दोरीची शोभा. २६. कृष्ण. २७. कल्पवृक्षाच्या. २८. वल्लीसमान. २९. कृष्णाच्या खांद्यावर भुजा समर्पी. ३०. तेजोमय. ३१. आकाशीं. ३२. सूर्याप्रमाणें तेजोमय. ३३. आकाशवहनें. (विमानें.) ३४. सूर्यानें. (सूर्य कमळिणीचा मित्र होय, कारण त्यांच्या किरणांनीं कमलें विकसित होतात.)

वाजति दुंदुभि[1]; केली[2] पाहुनि, सुमवृष्टि[3] निर्जरीं[4] नभिं[5] केली; ।
सस्त्रीक[6] स्वर्वासी[7] जन[8] आला; इष्टलाभ हा सर्वांसी. ॥ ६
गाती हरिचीं अमलें[9] सांगन[10] गंधर्वपति यशें हृतशमलें[11]. ।
नादें नभ तें कोंदे; त्यांतहि निजगीत विभु[12] तयां ऐकोंदे! ॥ ७
सुरजन सविनय[13] नाचे हरिचा; सकळेष्टही[14] पुरवि नयनांचें; ।
म्हणति, 'नको पात्यांची[15] क्रिया; रुसे आजिवरि सकोपा[16] त्यांची!' ॥ ८
हरिसह त्या कमलास्या[17] करिती पुलिनीं[18] सतत मनोरम लास्या[19]; ।
किंकिणि[20]नूपुर[21]वलय[22]व्राताचा[23] लावि वृत्तिलागि[24] रवें[25] लयें[26]. ॥ ९
कृष्णतनुघनानीकीं[27] स्त्री चपला[28] भाविल्या[29] बुधमनांनीं[30]; कीं ।
गर्जित गीतें[31]; तुषार[32] स्वेदहि[33]; चातकमयूर सज्जनवार[34]. ॥ १०
जें त्या नृत्यें गीतें हर्ष, न वदवति विलासकृत्यें गीतें[35]. ।
वेणुपरिस तानांहीं[36] स्त्रींच्या न भुले, असा परिसता[37] नाहीं. ॥ ११
दे भगवान्[38] स्वर; सकळा[39] गाती बहुविध[40] अमिश्रितस्वर[41] सकळा; ।
त्या विधिगुरुवरालीगानाची[42] स्तुति करील कोण निराळी? ॥ १२

---

१. नगारे. २. क्रीडा. ३. पुष्पवृष्टि. ४. देवांनीं. ५ आकाशीं. ६. स्त्रियांसहित. ७. स्वर्गवासी. ८. हें समुदायवाचक नाम आहे. ९. निर्मळ. १०. स्त्रियांसह. ११. पातक हरणारीं. (शमल=मलिनता—पातक) कवितेंत अकारांत विशेषणांस विशेष्यानुरोधानें कधीं कधीं लिंगवचना दिकांचा विकार होतो, या नियमाचीं 'अमलें' आणि 'हृतशमलें' हीं उदाहरणें आहेत. १२. कृष्ण. १३. नम्रतेनें. १४. सकल कामना, सर्व मनोरथ. १५. पातीं लावणें—डोळे मिटणें. १६.क्रोधयुक्त (क्रिया). देवांस डोळ्यांचीं पातीं नाहींत. १७. कमलवदना. १८. वाळवंटांत. १९. नृत्या. २०. लहान घुंगुर ज्याला आहेत असा दागिना. २१. पैंजण, तोरड्या. २२. कंकण इत्यादि हस्तभूषण. २३. समुदायाचा. २४. चित्तवृत्तीची एकाग्रता करून कोणेका विषयाकडे लावी. २५. नाद. २६. लक्ष. २७. कृष्णाचीं जीं (त्या वेळेस धारण केलेलीं) अनेक देहें तोच मेघ, त्यांच्या समूहांत. २८. विजा. २९. मानिल्या. ३०. देवांच्या मनांनीं. ३१. गाणें हेंच मेघाचें गर्जणें. ३२. उदकाचा बारीक थेंब. ३३. घर्म. ३४. सज्जनांचा समूह. ३५. वाणीतें. ३६. उंच स्वरांनीं. ३७. ऐकणारा. ३८. श्रीकृष्ण. 'भगवान्'शब्दाची व्याख्या आढळते ती:—'उत्पत्तिं प्रलयं चैव भूतानामगतिं गतिम् । वेत्ति विद्यामविद्यां च स वाच्यो भगवानिति ॥' (सर्व स्थावर-जंगमात्मक जगाचा उद्भव आणि नाश हे कसे होतात, जग आलें कोठून, जाणार कोठें, विद्या आणि अविद्या काय आहेत, हें सर्व जो जाणतो त्याला भगवान् म्हणावें; किंवा भगवान् म्ह० सकल ऐश्वर्य, धर्म अथवा वीर्य, कीर्ति, द्रव्य, ज्ञान, वैराग्य हीं सहा भगें ज्यास आहेत तो भगवान्. ३९. कळेनें. ४०. बहुत प्रकारांनीं. ४१. भिन्न भिन्न स्वरांनीं. ४२. कृष्णसख्यांचें गायन.

आइकतां गीतगती, देहादि स्मृति न [१]अंतरंगीं [२]तगती, ।
विधि[३]गुरुही तो मानी; डोलावें कां न [४]सुरशिरस्तोमांनीं ? ॥ १३
त्या [५]परमोदारासीं नटतां पावति सती [६]प्रमोदा [७]रासीं; ।
जे [८]श्रांता स्कंधाला धरि, तत्स्पर्शें तिचा [९]निजात्मा [१०]धाला. ॥ १४
[११]उत्पलसौरभ ज्या ये, तो [१२]स्वांसीं इंगितांचि [१३]बल्लवजाये, ।
हरिभुज निववी [१४]रासीं, जे [१५]भागे गात नटत [१६]यदुवीरासीं. ॥ १५
जो योगा यागाला दुर्लभ, त्या गाल मिळवुनीयां गाला ।
घे [१७]यदुराजविडा जे, ते स्त्री **श्री**[१८]च्या मनास लाजवि [१९]डौजे. ॥ १६
[२०]तंतंनंनाताथांनीं [२१]श्रांतीं [२२]हरिकरसरोज तप्ता थानीं ।
ठेवुनि, युवति निवे; कीं हें छत्रचि सुखद सेविलें [२३]सविवेकीं. ॥ १७
लाजुनियां **श्री** लपती जाली; कीं [२४]गोपिकावश [२५]श्रीलें पती, ।
करि फार रमा नवला; कीं केवळ वनचरींस [२६]वर मानवला. ॥ १८
करि [२७]सुगुणश्रीशाला गोपी जो, त्या [२८]दयाकरा **श्री**[२९]शाला ।
गाती, या नाचविती. भुलवी अत्यंत [३०]गगनयाना [३१]चवि ती. ॥ १९
गोपी सकळा **श्री**[३२]शा, तितकें होणें पडे रमाया **श्री**[३३]शा. ।
[३४]मुदितमना नारी ती [३५]रति [३६]रासीं पावल्याचि नानारीती. ॥ २०
[३७]युवतिसभे हा रतिला दे, सांपडला [३८]रमासुधाहार [३९]तिला; ।
जो [४०]कर [४१]वरि [४२]अनघा [४३]**मा** [४४]पुंसि [४५]सुरतश्रांतगोपिकाननघर्मा[४६] ! ॥ २१

---

१. मनीं. २. रहाती. ३. ब्रह्मदेवाचा बाप. (कृष्ण.) ४. देवांच्या मस्तकसमूहांनीं. ५. परम उदारासीं. (कृष्णासीं.) ६. आनंदा. ७. रासक्रीडेंत. ८. दमलेली. ९ अंतरात्मा. १०. संतुष्ट झाला. ११. कमलाचा सुवास. १२. आपल्या खांद्यावर. १३. गोपीला. १४. रासक्रीडेंत. १५. दमे, थके. १६. कृष्णासीं. १७. कृष्णाचा विडा. 'यदुराजविडा' हा समास अग्राह्य होय. १८. लक्ष्मीच्या. १९. डाग देई. २०. गायनांतील स्वरविशेष. २१. थकलेली. २२. कृष्णाचें हस्तकमल. २३. विवेक्यांनीं, विचारी जनांनीं. २४. गोपींस वश झालेला, गोपिकाधीन. २५. आपलें (लक्ष्मीचें) पाणिग्रहण करणारा. २६. नवरा. २७. सद्गुण व शोभा यांचीं स्थानें. २८. दयेच्या आकराला. (खाणीला.) २९. रमापतीला. ३०. देवांच्या विमानास. ३१. शोभा. ३२. लक्ष्मीसमान. ३३. कृष्णास. ३४. आनंदित आहेत मनें ज्यांचीं. ३५. आनंद. ३६. रासक्रीडेंत. ३७. स्त्रीसमूहास. ३८. रमेचा अमृताचा घोट. ३९. त्या युवतिसभेला. ४०. हस्त. ४१. सेवी. (विवाहांत.) ४२. निर्मळ. ४३. लक्ष्मी. ४४. याचा कर्ता 'तो कर' अध्याहृत. ४५. सुरतानें श्रमलेल्या गोपिकांच्या तोंडावरील घाम. ४६. हा समास अप्रशस्तच समजावयाचा.

[1]जलकेली [2]वनकेली करुनि स्त्रीमंडळी [3]सुपावन केली. ।
विझवी [4]कामज्वलन प्रभु, परि झालें न चरमधातु[5]स्खलन. ॥ २२
विश्वात्मा विश्वपती पावन चरितें करी, जया मुनि जपती. ।
[6]भक्तेच्छा हरि पुरवी [7]विषयिजनाज्ञानदोषतिमिररिपुरवि. ॥ २३
बहुदीर्घा [8]अमृतकरद्युतिधवलशरन्निशा, तयांत सुखकर ।
प्रभु गोपींतें रमवी; [9]कामज्वरदाह अंगसंगें शमवी. ॥ २४
आणिक एकहि माया हरिची दावी असा [10]व्रजीं महिमा या ; ।
मानिति सदनिं जसे जे नित्यव्यवहार [11]युवतिसीं [12]निजसेजे. ॥ २५
त्यांसि म्हणे हरि, जा, गे ! जों नाहीं जाहले [13]स्वजन घरिं जागे.' ।
दे [14]सुखधाम निरोपा, तोषवि, तरुचाचि होय [15]तन्मानिं रोपा. ॥ २६
जाति पहाटे जाया, गोपांच्या, धरुनि [16]वसतिवाटे, [17]जाया. ।
सोडीना मन पाय प्रभुचे; कीं सौख्यधाम ते [18]अनपाय. ॥[19] २७

---

## अध्याय चौतिसावा.

गोपांसह [20]सानंद व्रजपति तो अंबिकावनाला नंद ।
गेला; [21]सांबशिवाला पूजी [22]विध्युक्त, जो [23]हरी [24]अशिवाला. ॥ १
[25]पशुपतिला [26]अंबेला वाहति गोपाल भक्तिपूर्वक बेला; ।
विप्रांला [27]मोदानें देती [28]स्वर्णांबरान्नसह गोदानें. ॥ २

---

१. उदकांतील क्रीडा. २. वनक्रीडा. ३. पवित्र. ४. कामरूपी अग्नि. ५. पतन. ६. भक्तांची इच्छा. ७. विषयी लोकांचें अज्ञान व दोष हाच अंधार त्याचा शत्रु सूर्य. ८. चंद्रकांतीनें शुभ्र अशी जी शरदृतूंतील रात्र. ९. कामरूपी ज्वराचा दाह (उष्मा.) १०. गोकुळांत. ११. स्त्रियेसीं. १२. आपआपल्या बिछान्यावर. सेज=शय्या, संस्कृत शब्दांतील 'य'च्या स्थानीं 'ज' होतो; जसें, भार्या-भाज, कार्य-काज, योग्य-जोगा, युग-जुग, ये-जे, इत्यादि. १३. घरांतील आप्तजन. १४. सुखाचें स्थान. (कृष्ण.) १५. गोपींच्या मनांत. १६. वराच्या मार्गास. हा समास प्रशस्त नव्हे. १७.स्त्रिया. (पुत्ररूपानें पति जायते म्ह० उत्पन्न होतो जीमध्यें ती जाया, असा या शब्दाचा अर्थ टीकाकारांनीं केला आहे). १८. ज्यांपासून अपाय होणें नाहीं. १९. येथें रासक्रीडाप्रकरण समाप्त झालें. २०. आनंदी. २१. पार्वतीसहवर्तमान शंकराला. २२. विधियुक्त. २३. नाशी. २४.अकल्याणास. २५. शिवास. पशूंचा (जीवांचा अथवा प्रमथ नामक गणांचा) पति म्ह० स्वामी. २६. पार्वतीस. २७. आनंदानें. २८. सुवर्ण, वस्त्र, अन्न, इतक्यांसह.

सेवुनियां [1]नीरासी निजति [2]अधिष्ठुनि **सरस्वतीतीरासी**; ।
तों रात्रीं ये जवळी [3]क्षुधिताजगर, [4]व्रजाधिपाला [5]कवळी. ॥ ३
आक्रोशें [6]हरितात स्वसुता [7]बाहे, [8]यदंघ्रि भय हरितात. ।
'ये **कृष्णा!** [9]सापाया मज रक्षीं; ग्रासितो, वधीं सापा या.' ॥ ४
गोप महा उग्रासी ताडिति बहु [10]उल्मुकीं, तथापि ग्रासी. ।
[11]सद्विभवा सापा या मग लावी शीघ्र [12]पीतवासा पाया. ॥ ५
जळलें [13]अशुभ [14]व्यालाकृतिसह, पावोनि पदरजा [15]भव्याला; ।
दावी तेज [16]स्वीया चरणाचें [17]अहिस देव तेजस्वी या. ॥ ६
हरि दग्ध करी राशी पापाच्या; तत्क्षणींच सुशरीरासी ।
[18]विद्याधरपति पावे; त्या तेजें [19]गोपवृंददृष्टि दिपावे. ॥ ७
श्री[20]चतुराननतातें पुसिलें [21]वृत्त [22]स्वपादनलिननतातें. ।
[23]मुनिसर्वस्वा चरणा नमुनि कथी तो [24]सुदर्शन [25]स्वाचरणा, ॥ ८
'[26]श्रीरूपें [27]दर्पित मी विद्याधर; मज [28]मदीय मद अर्पि [29]तमीं; ।
हिंडें लोक विमानीं बैसुनि, न [30]विरूप [31]आंगिरस [32]कवि [33]मीनीं. ॥ ९
खळ [34]निस्त्रप हा साधी [35]अघ योजुनि त्याचिया [36]स्वउपहासा [37]धी. ।
हे **श्रीकर!** अजगर ते वसले [38]क्रोधाख्य, पावलों [39]अजगरते. ॥ १०

---

१. पाण्याला. २. व्यापून. ३. क्षुधित अजगर, भुकेलेला अजगर. (सर्प). ४. नंदाला. ५. ग्रासी. ६. नंद. ७. बोलावी. ८. ज्याचे चरण. ९. अपायांत सांपडलेल्यास. १०. कोलितांनीं. ११. भाग्यवानास. कृष्ण आपला पाय सापाला लावी म्हणून साप भाग्यवान् गणावयाचा. १२. पीत (पिवळें) आहे वास (वस्त्र) ज्याचें तो. (कृष्ण). १३. पाप. १४. सर्पशरीरासह. (हें 'अशुभा'चें विशेषण आहे). १५. कल्याणकारक चरणधूलिला. १६. आपल्या. १७. सर्पास. १८. 'विद्याधर' ही देवांत एक जाति आहे; तिचा हा राजा होय. याचें नांव सुदर्शन. एका प्रसंगीं हा अंगिराऋषीला हंसला, त्यावरून रागानें 'तूं साप होशील' असा त्यानें यास शाप दिला. त्याप्रमाणें तो साप होऊन अंबिकावनांत पडला. एकदां नंद गोपालांसहवर्तमान अंबिकेच्या जत्रेस गेला असतां, या सापानें त्यास गिळिलें. तेव्हां कृष्णानें सापासून नंदास सोडवून त्याचा उद्धार केला, अशी कथा आहे. (भागवत, स्कंध १० अ० ३४). १९. गोपसमूहाची दृष्टि. २०. ब्रह्मदेवाच्या पित्यानें. (कृष्णानें.) २१. वर्णन. २२. आपल्या चरणकमलीं नम्र असा जो (विद्याधरपति) त्यास. २३. मुनीचें सर्व धनच असा जो चरण त्यास. २४. हें त्या विद्याधरपतीचें नांव. २५. स्वआचरणा. २६. संपत्ति व सौंदर्य यांहीं. २७. गर्विष्ठ. २८. माझा. २९. अज्ञानांत. ३०. कुरूप. ३१. हें एका ऋषीचें नांव. ३२. ज्ञानी. ३३. याचा कर्ता 'मी'. ३४. निर्लज्ज. ३५. पातक. ३६. या शब्दांत 'स्व' याचा कांहीं उपयोग नाहीं. ३७. बुद्धि. ३८. क्रोधनामें. ३९. सर्पता.

[1]सुतपोधन ! शापा या [2]अंते कथिति तव [3]दयैकघनशा पाया; ।
[4]मदमळ सहसा धूते ज्यांची [5]शापोक्तिही सदय साधू ते ! ॥ ११
[6]भवशमना देवास प्रार्थितसें, निजपदीं मना दे वास.’ ।
[7]नाशिति [8]अवलेपा या, तुजिया ज्ञाते म्हणोनि लवले पाया. ॥ १२
[9]वारी [10]पन्नगतेतें जें तव [11]पादांबुज, [12]प्रपन्नगते! तें ।
न बहु; [13]भवभ्रम राहे न, स्मरतां; शक्ति विदित [14]सद्भ्रमरा हे.’ ॥ १३
आज्ञा, पद वंदुनि, घे **सुदर्शन**; [15]व्योमपथिं, जसा [16]इंदु, निघे; ।
अद्भुत गुण **हरिचे** ते जाणुनि **नंदादि** होति [17]विस्मितचेते. ॥ १४
केली यात्रा सारी; हरि दे गोपांसि विस्मया [18]त्रासारि. ।
आले [19]घोषीं; गाती **नंदाची** [20]मुक्ति; ऐकती सुभगा ती. ॥ १५
एका समयीं रातीं [21]गाती गोपीगणांत [22]असुहृदराति ।
जे **बळकृष्ण** भ्राते, वर्णें जिंकिति [23]सितासिता अभ्रा ते. ॥ १६
[24]स्मरबांधवतारांनीं [25]धवल [26]निशामुख; सुगंध [27]भवता रानीं; ।
[28]कोलाहल [29]मधुपांनीं मत्तांनीं [30]कुमुदमल्लिकामधुपानीं. ॥ १७
[31]सन्मुनि**मान**सहंसीं [32]**बळगो**विंदीं [33]समस्तदेववतंसीं, ।
आरंभियलें [34]अंसीं गायन, ठेवूनि गाल डाव्या [35]अंसीं. ॥ १८

---

१. उत्तम तपच आहे धन ज्याचें. २. अंत करणारा. ३. दयेचा मुख्य मेघ अशा. ४. गर्वरूपी मळ. ५. शापवचनही. ६. संसारनाश करणारा. ७. याचा कर्ता ‘पाय’. ८. गर्वास. ९. दूर करी. १०. सर्पपणास. ११. चरणकमल. १२. हे शरणागतास गति देणाऱ्या. १३. संसारसंबंधी भ्रम. १४. साधुरूपी भ्रमरास. १५. आकाशमार्गी १६. चंद्र. १७. विस्मित आहेत चित्तें ज्यांचीं असे. १८. भयाचा शत्रु. (हें ‘हरि’ याचें विशेषण.) १९. गोकुळास. २०. मोकळीक. २१. भाग्यशालिनरनारी. २२. दुष्टांचे शत्रु. २३. शुभ्र व काळें अभ्र (अनुक्रमें, बळराम व कृष्ण हे जिंकिति.) २४. कामजनक तारांनीं. २५. शुभ्र. २६. रात्रीचा आरंभ. २७. सभोंवता. २८. गुंजारव. २९. भ्रमरांनीं. ३०. कमळ आणि मल्लिका या फुलांचें मधु पिऊन मत्त जालेल्यांनीं. ३१. साधु व मुनी यांच्या मनोरूपी मानससरोवरांत हंसाप्रमाणें असणारे जे त्यांनीं. (हंसांस मानससरोवर फार प्रिय आहे अशी प्रसिद्धि आहे. हिमालयपर्वताच्या गंधमादन नामक शिखराच्या उत्तरेस मानससरोवर आहे.) ३२. बळराम आणि कृष्ण. ३३. सर्व देवांचे तुरे असे जे त्यांणीं. (या स्थलीं समासामध्यें ‘अवतंसीं’ असा शेवटचा शब्द आहे त्याचा ‘अ’ लुप्त आहे, यास आधार.:—‘वष्टि भागुरिरल्लोपमवाप्योरुपसर्गयोः । आपं चैव हलंतानां यथा वाचा निशा दिशा ॥’ भावार्थः—भागुरि नामक वैयाकरणाला ‘अव’ आणि ‘अपि’ या उपसर्गांतील अकाराचा लोप इष्ट आहे. तसेच हलंत स्त्रीलिंगी शब्दांचें ‘अ’कारांतत्व ही इष्ट आहे; जसें वाच् याच्या ठिकाणीं वाचा, दिश् याच्या ठिकाणीं दिशा, इत्यादि. ३४. रात्रीच्या आरंभीं. ३५. खांद्यावर.

गाणें त्या दोघांचें [1]श्रीसच्चित्सुखरसाचिया ओघांचें ।
दे[2]हस्मृति यो[3]षांची हरि, त[4]द्यश जेंवि वासना दोषांची. ॥ १९
करिती आलापा हे [5]धनदानुग [6]शंखचूड आला, पाहे ।
स्त्रीरत्नें; हा का[7]मी धृ[8]ष्ट 'न नेऊं,' म्हणे, 'स्व[9]गेहा,' कां? 'मी' ॥ २०
न ग[10]णी देवा; घाला घाली; या [11]गृष्टि भीति त्या वा[12]घाला. ।
जिकडे उत्तर [13]हरिता, तिकडे गोपीजनासि जाला हरिता. ॥ २१
सा[14]ग्रज हरि हा, कानीं लागुनियां, विनविला व[15]धूहाकांनीं, ।
कीं, 'रक्षी निज आ[16]ली; गातां, कसि दीनबंधुला निज आली?' ॥ २२
श[17]त्रुतमोरवि शा[18]लद्रुम घेवुनि धांवले कि[19]शोर वि[20]शाल. ।
अ[21]भयप्रद हाकेला देती; [22]स्त्रीभीतिपात्र खळ हा केला. ॥ २३
त्रि[23]भुवनपालक रानीं आले, कवळूनि उ[24]ग्र शाल करांनीं; ।
जों आ[25]टोपा पाहे, तों का[26]ळचि वाटले मनीं पा[27]पा हे. ॥ २४
दुर्मति त[28]दमत्रास व्यापी त्या गुह्यकास परम त्रा[29]स. ।
सोडुनि गोपी रानीं, शीघ्र [30]पळे गांठि घालितां वीरांनीं. ॥ २५
स्त्री रक्षी ब[31]ळ शा[32]ली, गांठी चोरासि कृष्णजी ब[33]ळशाली. ।
तोडि करेंचि शिरो[34]मणि, दे रा[35]मा; तुष्टि धरिति फारशि र[36]मणी. ॥ २६

---

१. ज्ञानसुख हाच कोणी एक रस त्याच्या. २. शरीरस्मरण. ३. तरुण स्त्रियांची. ४. त्या दोघां ओघांचें यश. (हें पद 'हरी' या अध्याहृत क्रियापदाचा कर्ता आहे.) ५. कुबेराचा सेवक. ६. हें त्या सेवकाचें नांव. हा शापानें राक्षसयोनि पावून वृंदावनांत गेला असतां गोपीहरण करूं लागला, तेव्हां कृष्णानें याचा शिरश्छेद केला. (भागवत, स्कंध १० अ० ३४). ७. कामुक. ८. दांडगा. ९. आपल्या घराला. १०. जुमानी. ११. गोपीरूपी लहान गाई. १२ शंखचूडरूपी वाघाला. १३. दिशा. १४. वडील भाऊ (बळराम) यासहित. १५. स्त्रियांच्या हाकांनीं. हा समास संस्कृतप्राकृतशब्दमिश्रित म्हणून अग्राह्य समजावयाचा. १६. सखी. १७. शत्रुरूपी अंधाराचा सूर्य. १८. शालनामक वृक्ष. १९. मुलगे. २०. हें 'द्रुम' याचें विशेषण. २१. 'भिऊं नका' अशी हाक. २२. पहिल्यानें स्त्रियांस जी भीति प्राप्त झाली होती तिचें पात्र, नंतर हा खळ केला; म्हणजे त्यांस निर्भय करून त्यास सभय केलें. २३. रामकृष्ण. २४. भयंकर शालवृक्ष. २५. वेगास. २६. यम. २७. पाप्यास. २८. त्या गुह्यकरूपी पात्रास. (अमत्र म्ह० पात्र.) २९. भय. ३०. याचा कर्ता 'तो शंखचूड' अध्याहृत. ३१. सैन्य. ३२. शालवृक्ष हातांत धरिला आहे ज्याणें. ३३. बळवान्. (बळानें शोभायमान.) ३४. शिरोरूपी मणि. ३५. बळरामाला. ३६. स्त्रिया.

हरितां युवति सपत्नें[1] गुह्यकनीचें, वधूनि तो लघुयत्नें, ।
बळ[2] तच्चूडारत्नें[3] भूषविला, लोक निज यशेंहि, प्रत्नें[4]. ॥ २७

## अध्याय पस्तिसावा.

रात्रौ[5] हरिसीं रमती, दिवसा गोपी वियोगदुःखें श्रमती; ।
गाती लीला सुमती; युगदीर्घ[6] दिनासि परम कष्टें गमती[7]. ॥ १
गात बसति वृजिनारिप्रभुलीलांतें[8] स्थळस्थळीं व्रजिं[9] नारी[10]; ।
करिती काळक्रमणा, आळवुनी[11] वेणुगानपटु[12] हृद्रमणा[13]. ॥ २
नयना सुख दे वेश; त्रिभंगललिताकृती[14] सुमुख देवेशें[15]. ।
वर्णिति भास्वर[16]; जाती ताप, अशा वेणुच्या शुभा[17] स्वरजाति[18]. ॥ ३
अतिसुखदा[19] या दासी गाति, कथा; स्मरति नंददायादासी[20]. ।
स्थिरचर[21] मोहुनि, उरली शक्ति जिची, वर्णिती मनःप्रिय मुरली. ॥ ४

## अध्याय छत्तिसावा.

व्रजजननयनें कुमुदें[22] विकसवि, विरहार्कदुःख[23] नाशुनि समुदें[24], ।
यदुचंद्र सदा सांजे[25] उगवे, दे स्मितसुधा[26], प्रिया[27] दासां जे. ॥ १
नामें असुर[28] अरिष्ट प्रभुवरि ये एकवेळ मूर्त[29] अरिष्ट; ।
हरि गौरव[30] शैलांचें[31] ऐसें धरि रूप दुष्ट तो बैलाचें. ॥ २

---

१. शत्रूनें. २. बळराम. ३. शिरोरत्नें. ४. आदिपुरुषें. (कृष्णें.) ५. रात्रीं. 'रात्रौ' हें संस्कृत 'रात्रि'शब्दाचें सप्तमीचें एकवचन; अशीं रूपें प्राकृत कवितेंत कोठें कोठें आढळतात. ६. युगाप्रमाणें लांब वाटणारा. ७. फार कंटाळ्यानें घालविती. ८. पातकाचा शत्रु असा जो प्रभु, त्याच्या लीलांतें (वृजिन=पातक.) ९. गोकुळीं १०. स्त्रिया. ११. मधुरशब्दें प्रार्थून. १२. वेणूवर गायन करण्यांत कुशल असा. १३. मनोरंजका. (कृष्णास.) १४. तीन ठिकाणीं (गातांना) अंग वांकविल्यामुळें सुंदर आहे आकृति ज्याची, असा. १५. देवश्रेष्ठ. १६. सुंदर. १७. चांगल्या. १८. स्वरांचा समूह. १९. अत्यंत सुख देणाऱ्यास. २०. नंदाच्या मुलास. दायाद=वारस, दाय घेणारा. २१. स्थावरजंगम. २२. गोकुळांतील जनाचीं नेत्रें हींच कमळें. २३. विरहरूपी सूर्यापासून जहालेलें दुःख. (कुमुदें हीं चंद्रविकसितें कमळें असतात). २४. सर्व. २५. संध्याकाळीं. २६. हास्यरूपी अमृत. २७. जे (स्मितसुधा) दासां प्रिया (आवडणारी). २८. राक्षस. २९. मूर्तिमान्. ३०. गुरुत्व. तो दुष्ट शैलांचें गौरव हरि ऐसें बैलाचें रूप धरि—असा अन्वय. अरिष्ट नामक राक्षस कंसाच्या आज्ञेनें कृष्णास मारण्यासाठीं बैलाचें रूप घेऊन गोकुळांत आला होता, तो कृष्णाच्या हातून मरण पावला. (भागवत, स्कंध १० अ० ३६) ३१. पर्वताचें.

व्रज कांपवि [1]वृष; [2]भाचा कंसाचा भी न, काळ त्या [3]वृषभाचा. ।
[4]वप्रासि उकरि, [5]शृंगें विंध्यगिरीचीं हि लज्जितें करि [6]शृंगें. ॥ ३
शब्दें भय दे; हगत स्वल्प खणित [7]भूसि, दावि बळ दे[8]हगत. ।
[9]ककुदाश्रितजीमूत [10]स्तब्धाक्ष, पदोपदीं [11]विसर्जी मूत. ॥ ४
उचलूनि [12]अतुच्छातें धरितो, [13]अभ्रंलिहा निजा पुच्छातें. ।
[14]गोगोपींचे गळती गर्भ रवें ज्याचिया, भयें पशु पळती. ॥ ५
भ्याला व्रज या, [15]बाहे हरिला कीं, ‘रक्षिजे [16]स्वजनता बा हे.’ ।
कृष्ण [17]बलीवर्दा या [18]दर्पी, इच्छा करी बळी मर्दाया. ॥ ६
निज[19]सुहृदंसीं [20]बांहे ठेवुनि, त्या [21]चंद्रकावतंसी [22]बाहे. ।
क्रोधें वृषहि फुफाटे, ज्याच्या [23]खुरकुट्टनें [24]धरातळ फाटे. ॥ ७
योजी शृंगां, ‘राहा,’ शूळा जीं म्हणति; [25]मूर्तशृंगारा हा ।
वृष जाय [26]विदाराया विश्वात्म्या मोक्षदा [27]प्रियोदारा या. ॥ ८
धांवे [28]उद्दामोक्षा शृंगें हाणावया स्वशुद्धा मोक्षा; ।
धरि शृंगें हरि हा तीं [29]ज्यां श्रीच्या [30]पाणिपंकजां वरि हातीं. ॥ ९
शृंगें धरुनि ढकलिला मागें अठरा पदेंहि; तो दृढ [31]कलिला ।
ये उठुनिहि घामेला; जन [32]भावी, ‘वांचला, जरि मघा मेला!’ ॥ १०
ये कोपें खवळोनी, तों [33]श्रीशें [34]तद्विषाणयुग कवळोनी, ।
पाडुनि तो पादानें, [35]आक्रमिला खळ [36]जगत्रयोपादानें. ॥ ११
जेंवि [37]पटा ओल्याला, पिळितां [38]रक्तांगराग, वृष तो त्याला; ।

---

१. बैल. २. भागिनेय (कृष्ण.) ३. बैलाचा. ४. उंचवट्यास, डोंगरीस, डोंगराच्या कड्यास. ५. शिंगांनीं. ६. शिखरें. ७. भूमीस. ८. शरीरांत असलेलें. ९. (मानेवरच्या) कोळानें आश्रित आहेत मेघ ज्याच्या. १०. स्तब्धनेत्रीं. ११. टाकी. १२. मोठ्यास, भयंकरास. १३. आकाशास लागलेल्या. १४. गाईचे आणि गोपींचे. १५. हांक मारी, बोलावी. १६. स्वजनसमूह. १७. बैलास. १८. भिववी. १९. आपल्या मित्रांच्या खांद्यावर. २०. बाहु. २१. मयूरपिच्छावरील चिन्हें आहेत वतंसीं म्ह० तुऱ्यांत ज्याच्या तो (वतंस=अवतंस.) २२. बोलावी. २३. खुरांच्या आघातानें. २४. भूमीची सपाटी. २५. कृष्णास. २६. फाडण्यास्तव. २७. प्रिय आणि उदार अशास. २८. उद्दाम उक्षा, दांडगा बैल. २९. ज्या हातीं श्रीच्या (लक्ष्मीच्या) पाणिपंकजां वरि—असा अन्वय. ३०. करकमळांस. ३१. कलहाला, युद्धाला. ३२. गणी, मानी. ३३. कृष्णानें. ३४. त्याचीं दोनहि शिंगें. ३५. घाला घातला. ३६. त्रैलोक्याचें कारण त्यानें. (कृष्णानें. उपादान=कारण.) ३७. वस्त्रास. ३८. तांबड्या रंगाची कांति.

तच्छृंगें तो कुटिला[1]; घातक[2] निजगुणचि होय अंतीं कुटिला[3]. ॥ १२
वधिला कनकपटानें[4] वृष, जेणें त्रासिले स्वजन कपटानें. ।
वर्षति सुर कुसुमांनीं[5], वाद्यस्तुतिगीतनाद उठति विमानीं. ॥ १३
संहारूनि अरिष्ट, व्रज[6] रक्षी विश्वपाळ सर्ववरिष्ट. ।
स्त्रीनयनतृषा[7] रातीं भेटुनियां, हरि[8] सहाग्रज[9] वृषाराती[10]. ॥ १४
वृषमथनोपरि[11], नातें[12] हरिच्या श्रीनारदें परोपरि नातें[13] ।
कथिलें कंसा; नंदें रक्षित बळकृष्ण शौरिसुतें[14] सानंदें[15]. ॥ १५
स्वरसपिपासूच[16] कसा मुनि घात करील शौरिचा[17] सूचकसा[18]? ।
सांगे भोजपतीतें[19] यास्तव कीं देवकार्य हो[20] जपती तें. ॥ १६
वधिले जे तत्पुरुष[21] प्रकट करि रहस्य[22] सर्व तें सत्पुरुष[23]. ।
दे बहु संतापा जी प्रभुचरितसुधाहि[24] कीं असंता[25] पाजी. ॥ १७
हे वार्ता तो धमनी[26] पेटवि कंसाचिया शिखिक्रोध[27] मनीं. ।
शौरिवधा[28] तरवारी घेत्या[29], मुनि, युक्ति कथुनि लघुतर[30], वारी[31]. ॥ १८
कीं 'तातवधा कानें परिसुनि, बळकृष्ण[32] पळति तव धाकानें; ।
म्हणवूनि तदसु[33] देवा[34]! रक्षावे; बद्ध मात्र करिं वसुदेवा!'. ॥ १९
हतबुद्धि[35] हा[36] दाया[37] साधाया, मानवे मुनिचहाडा[38] या. ।
गेला सांगोनि गडी[39] साधूंचा बांधवोनि शौरी निगडीं[40]. ॥ २०
यत्नद्रुम[41] अवकेशी[42] जाले, परि धाडि कंस दानव[43] केशी. ।
कीं मारवितो भाचे, विलास हे जीविताचिया[44] लोभाचे. ॥ २१

---

१. ठेंचला, चेंचला. २. हें वाक्य सुभाषितरूप आहे. ३. दुष्टास. ४. पीतांबरधारी कृष्णानें. ५. फुलांनीं. ६. गोकुळ. ७. स्त्रियांच्या डोळ्यांची तहान (इच्छा). ८. कृ-हरण करी. ९. बळरामासहित. १०. वृषासुराचा शत्रु. ११. वृषासुराच्या मथना(मर्दना)नंतर. १२. नातवानें. (विष्णूचा पुत्र ब्रह्मदेव आणि त्याचा पुत्र नारद म्हणून नातू.) १३. संबंध. १४. वसुदेवाचे मुलगे. १५. आनंदयुक्त (नंदानें.) १६. निजरसाविषयीं (भक्तीविषयीं) तृषित. १७. वसुदेवाचा. (शूर राजाच्या वंशांत झालेला.) १८. चहाडखोरासारिखा. १९. कंसास. २०. होवो. २१. कंसाचे पुरुष (राक्षस इ०) २२. गुह्य. २३. नारद. २४. कृष्णचरित्ररूपी अमृत. २५. दुर्जनास (कंसास.) २६. फुकणी. २७. क्रोधरूपी अग्नि. (हें अवधारणापूर्वपदकर्मधारय समासाचें उदाहरण आहे.) २८. वसुदेवास मारण्याकरितां. २९. घेणाऱ्या. (कंसास.) ३०. थोडकीच. ('युक्ती'चें विशेषण.) ३१. निवारण करी. ३२. बळराम व कृष्ण. ३३. वसुदेवाचे प्राण. ३४. हे राजा! ३५. बुद्धिहीन. ३६. कंस. ३७. द्वेषास. ३८. नारदास. ३९. नारद. ४०. बिड्यांनीं. ४१. यत्नरूपी वृक्ष. ४२. निर्फल. ४३. केशीनामक दैत्य. ४४. जीवाच्या.

धाडुनि हरिरिपु[1] केशी, मल्लामात्यादिकांहि[2] मग न चुकेशी ।
युक्ति कथी बाहूनी[3], वाराया आत्ममृत्यु त्या बाहूंनीं ! ॥ २२
इतरां ठेविति जेठी[4] बहुबळ चाणूरमुष्टिकाभिध[5] जेठी[6], ।
त्यां बोधि, 'असा रंगीं[7] सिद्धचि; व्हा सिंह शौरिसुतसारंगीं[8]. ॥ २३
रे वीर महामात्र[9] ! द्वारीं रंगाचिया परम हा मात्र ।
तूंहि कुवलया पीड[10] स्थाप सबळहंस[11] हरि कुवलयापीड[12]' ॥ २४
रिपुवधयुक्ती[13] सुचवी; कार्मुकमख[14] मल्लरंग मंचेंहि[15] सुचवि. ।
आणवि मग अक्रूरा[16]; गोष्टी सांगे तया स्वयें अक्रूरा[17]. ॥ २५
'तूज अशा साधूंनीं साधावें यश, सुहृद्यशा[18] साधूनी[19]; ।
गुरुबळ[20] सुत्राम्यातें[21], स्वगत[22] गणियलें अदीर्वसूत्रा[23] ! म्या [24]तें. ॥ २६
माजा तूं हितें[25] साच, स्वर्गेशा[26] विष्णु, साधु ! तूंहि तसाच. ।
[27]शौरितनुज आणि, खरे मन्मृत्यू; आत मज नसे आणिख रे ! ॥ २७
नंदहि आणावा; हें कळतां, भीतां मदर्थ आणा[28] वाहें; ।
कीं, 'करि नृप हा यागा धनुराख्या[29], द्या उपायन[30], पहा, या, गा!' ॥२८
मारूं शत्रुस हीं[31]; यापरि तद्वधयोग[32]; मल्ल मजहि सहाया[33]; ।
या देहना[34] मारुत[35] हो; शिशु[36] तृण तें; मज न सज्जना ! मारुत हो. ॥ २९

---

१. कृष्णशत्रु. २. मल्लअमात्यादिकांसही. ३. बोलावून. ४. 'जेठी' या पदाचे दोन भाग केले असतां 'जे' आणि 'ठी' असे होतात; त्यांतून जेठी म्हणविणाऱ्या इतरांस 'ठी' इतका भाग ठेवणारे, म्हणजे इतर सर्व 'जेठी' अर्धे जेठी असें मानणारे (चाणूर इ०.) ५. चाणूर, मुष्टिका, हीं नांवें आहेत ज्यांस. ६. ज्येष्ठ. (बळानें—जो वयानें मोठा तो जेठी असा मूळचा अर्थ असून—कालांतरानें बळानें मोठा असा अर्थ निष्पन्न झाला.) ७. मल्लांगणीं. ८. वसुदेवाच्या पुत्ररूपी मृगांविषयीं. ९. हे महाता ! ('महामात्रः समृद्धे चामात्ये हस्तिपकाधिपे इति मेदिनी.) १०. हत्तीविशेष. ११. बळरामासहित 'हंस'=कृष्ण. १२. कमलाचा तुरा आहे ज्यास असा. (कृष्ण.) १३. कृष्णवधाची युक्ति. १४. धनुर्याग. १५. बसण्याचीं उंच स्थानें. १६. हा श्वफल्क नामक राजाचा पुत्र. कंसानें यास कृष्ण आणि बलराम यांस गोकुलांतून मथुरेस आणावयासाठीं पाठविलें होतें. यास 'दानपति' असें अन्य नांव आहे. १७. क्रूर नव्हे असा जो तो त्यास. १८. आप्तांच्या कीर्तीस. १९. संपादून. २०. बृहस्पतीचें बळ. २१. इंद्रातें. (सुष्टु त्रायतेऽसौ सुत्रामा—जो चांगलें पालन करतो तो—हा शब्दार्थ.) २२. मजजवळ आहे असें. २३. हे चपळा ! २४. बळ. २५. मित्र. २६. इंद्रास. २७. वसुदेवपुत्र. २८. शपथा. २९. धनुः-आख्या-यागा, धनुर्यागा. ३०. नजराणा, करभार. ३१. मी. ३२. त्यांच्या वधाची संधि. ३३. मदतीस. ३४. अग्नीस. ३५. वारा. ३६. मुलगे.

वसुदेवादि तदिष्ट[1], स्वपिता देवकहि, वधिन मी हतदिष्ट[2]. ।
जैसी स्त्री नवि, भूमी, भोगिन, निष्कंटका[3] करून, विभू[4]! मी. ॥ ३०
प्रिय मी सासुरयातें[5] मगधपतीतें[6]; भिती सदा सुर[7] यातें. ।
द्विविदसखा[8], शंबर वा, बाण, नरक[9], मित्रभाव यांसीं बरवा. ॥ ३१
पुरंमखतृष्णा[10] नयनां उपजवुनि, करीं सरामकृष्णानयना[11]. ।
तुज वहु नय[12] पाठ; बळा[13] अनुजयुता[14] आणिं, जा, सख्या ! पाठबळा !' ३२
अक्रूर म्हणे, 'होतें होणार; चुके न शाहणपणें हो ! तें. ।
जरि विधि[15] कर[16] दे वांचे; फळति मनोरथहि देवनरदेवांचे[17].' ॥ ३३
तो मानवदेवाचा[18] निरोप घे, जाय, अहित न वदे वाचा. ।
तत्त्व कथूनि खळा या काय सजे धर्मसेतु जो निखळाया[19]? ॥ ३४

---

## अध्याय सदतिसावा.

कंसा जो भाकेशी दे, धरि हरिघातपापलोभा केशी[20], ।
तो तनु[21] घे अश्वाची[22], ये यदुसिंहावरी[23] पिसाच श्वांचि[24]. ॥ १
धरि अद्भुत हयदेहा[25], भूमि खुरांनीं खणी, व्रजा[26] भय दे हा. ।
वर्णाया योग्य कशा होति, जयाच्या सटा[27] सुराभ्रांस[28] कशा[29]? ॥ २
बहु दीर्घ सटा याच्या; पाठिं विमानाचियाहि घंसटायाच्या[30]. ।
जैसा वेग मनाचा तैसाचि; उणा न बोलवे गमनाचा. ॥ ३

---

१. त्यांचे मित्र. २. दैवहीन. ३. शत्रुरहित. ४. हे प्रभो! अथवा, 'मी' याच्याबरोबर घेतलें तरी बरेंच. ५. सासऱ्यातें. ६. मगध देशाचा राजा जरासंध यानें आपल्या दोन कन्या अस्ति आणि प्राप्ति या कंसास दिल्या होत्या, म्हणून तो कंसाचा सासरा. ७. देव. ८. नरकासुराचा मित्र एक वानर. ९. द्विविद, शंबर, बाण, नरक, हीं दैत्यांचीं नांवें आहेत. १०. पुरांत होणाऱ्या यज्ञास पाहण्याची तृषा. ११. सराम, कृष्ण, आनयन=बळरामासहित कृष्णास आणणें. १२. न्याय. १३. बळरामास. १४ धाकट्या बंधू(कृष्णा)सहित. १५. दैव. १६. हात. १७. देव व राजेलोक यांचे. १८. राजाचा. (कंसाचा.) १९. उपटाया. २०. हा कंसपक्षीय एक राक्षस. हा अश्वाचें रूप धरून वृंदावनांत कृष्ण आणि गोपाळ यांस पीडा देण्यासाठीं गेला असतां कृष्णानें त्याचा वध केला (भागवत, स्कंध १० अ० ३७) २१. शरीर. २२. घोड्याची. २३. कृष्णरूपी सिंहावर. २४. कुत्राच. २५. घोड्याच्या शरीरास. २६. गोकुळास. २७. मानेवरचे आयाळ. २८. देवांस व अभ्रांस २९. चाबूक. ३०. लागायाच्या.

दे त्रास जनां, [1]हिंसे; ते होती [2]बधिर, कर्ण यां नाहींसे. ।
असुरा [3]हयवेषाची व्याकुळ गोकुळ करी क्षणें [4]हेषांचि. ॥ ४
धांवे हुडकित; [5]वाहा या [6]बाहे हरि [7]तदंतकर [8]कितवा; हा ।
गर्जे, जेंवि [9]हरि [10]हरी, खवळे, शब्दें जरि स्वगवे [11]हरि [12]हरी. ॥ ५
धांवुनि [13]घोटक, राया विश्वाच्या, ये समीप घोट कराया. ।
कीं हा राहू नीच ग्रासूं ये [14]विधुंस जपत राहूनीच. ॥ ६
[15]कुंकुम ज्याला [16]थानीं त्या [17]श्रीच्या [18]मुद्रिता उरा लाथांनीं ।
ताडाया हा [19]वाजी झाडी पद; तो प्रहार जों व्हावा, जी, ॥ ७
तों चकरुनि, देव [20]हया धरि त्या चरणींच [21]सज्जनसुखावह; [22]या ।
फिरवुनि गरगर [23]तुरगा उडवि धनुःशत जसा [24]खगेश्वर [25]उरगा. ॥ ८
दगड जसा गोफणिचा, [26]पक्षिपतिक्षिप्त [27]भोग कीं तो [28]फणिचा ।
दूर उडविला साचा; दावी महिमा हरी [29]भुजविलासाचा. ॥ ९
[30]संनद्ध तो, [31]दाया धरुनि, पुन्हा ये [32]रमाधवा तोडाया. ।
वाटे साचा [33]विलया नेइल काळस्वरूपसा चाविल, [34]या. ॥ १०
दानव[35]हयमुखविवरामाजि शिरवि, जो [36]प्रपन्न जन सुखवि बरा, ।
स्वभुजा [37]सव्या, लपती ज्याच्या देखोनि कांतिस [38]व्यालपति. ॥ ११
गुण ज्याच्या वेदांतें प्रिय बहु, तो बाहु, दुष्ट चावे दांतें; ।
शिवतां [39]तप्तायातें गळति, तसे [40]रदं; सुदुःख [41]दृप्ता यातें. ॥ १२
जाइल जो खंडाया मंदमती परम तप्तलोखंडा, या- ।
परि, डसतां [42]वैरेंदा, हें [43]सद्य घडे; गळति दंत [44]भूवर [45]दाहें. ॥ १३

---

१. किंकाळे. २. बहिरे. ३. घोडयाचा वेष घेतला आहे ज्यानें त्याची. ४. किंकाळी. ५. घोडयास. ६. बोलावी. ७. त्याचा (घोडयाचा) अंत करणारा. (कृष्ण). ८. दुर्जनास. ९. सिंहासारिखा. १०. हा घोडा. ११. कृष्ण. १२. हरण करी. १३. घोडा. १४. चंद्रास. १५. केशर. १६. ज्याला श्रीच्या थानांनीं कुंकुम त्या मुद्रिता उरा लाथांनीं, ताडाया; हा वाजी पद झाडी-असा अन्वय. १७. लक्ष्मीच्या. १८. चिन्हित. १९. घोडा. २०. घोडयास. २१. सज्जनास सुखद (कृष्ण.) २२. 'तुरगा' याचें दर्शक. २३. घोडा. २४. गरुड. २५. सर्पास. २६. गरुडानें फेकलेला. २७. शरीर (सर्पाचें.) २८. सर्पाचा. २९. बाहुप्रतापाचा. ३०. सावध होऊन. ३१. द्वेषास. ३२. कृष्णास. ३३. अंतास. ३४. कृष्णास. ३५. घोडयाचें रूप घेतलेला दैत्य त्याचें तोंड तेंच कोणीएक विवर त्यांत, (स्वभुजा शिरवी इ०.) ३६. शरणागत. ३७. डाव्या. ३८ सर्पश्रेष्ठ. ३९. तापलेल्या लोखंडास. ४०. दांत. ४१. गर्विष्ठास. ४२. कृष्णास. ४३. त्वरित. ४४. जमिनीवर. ४५. उष्णतेनें.

वाढे [1]भामय [2]समहामणिभुज देहीं [3]उपेक्षितामयसम हा; ।
मग [4]असदसुरविरोधी, वायुसि [5]निर्गमें न, मार्ग न उरवि, [6]रोधी. ॥ १४
ज्यापरि [7]मीनें [8]गळाला हा तेंवि, समर्थ [9]विक्रमी; न गळाला, ।
हें उचित [10]अनाचरणा फिरवी, झाडी, विशाळ नयना, चरणा. ॥ १५
सोडी हा लेंड [11]गळन्मूत्र, परी यासि मरण आलें [12]डगळ; ।
कीं याला [13]विभु, ज्याला चिंतिति योगी, अशाहि लावि भुजाला. ॥ १६
कर्माच्या [14]परिपाकें, [15]कर्कटिकाफळ [16]उले जयापरि [17]पाकें, ।
[18]हयदेह तसा उलला; भासे रक्तार्द्र, [19]पळस जैसा फुलला ! ॥ १७
सहज हरुनि [20]गळबाहे, काढुनि घे [21]असुहि [22]विश्वमंगल, बा ! हे. ।
[23]कीर्त्यमृतपिपासु मनीं, [24]सुर पूजिति या [25]क्षतार्द्रपापा [26]सुमनीं. ॥ १८
असि करि [27]बहुवार दया दासावरि जो, पहावया [28]**नारद** या ।
प्रभुला, ये एकांतीं; प्रेमा याचा अपार [29]लक्ष्मीकांतीं. ॥ १९
स्तवुनि म्हणे, 'हाकेशी ज्याच्या भीती [30]सुधांधसहि, हा **केशी** ।
अंता नेला वाजी ! यापरिच यशांत [31]कविमनें लावा जी ! ॥ २०
[32]भूसुरखेददक्षपणीं हे तव भुज याचिसारिखे दक्षपणीं ! ।
वधिं त्या [33]मूढा; [34]सळिती साधु, [35]श्रुतिसेतु [36]खळचमू ढासळिती. ॥ २१
तूं [37]सदवनपर, वांचे **कंस** कसा ? मारिसी दिसीं परवांचे ।
[38]कमलारंगा ! माजी दृष्टि निववसील [39]मल्लरंगामाजी. ॥ २२

---

१. तेजोमय. २. महामण्यानें युक्त अशा सर्पासारिखा भुज. ३. उपेक्षा केलेल्या रोगासारिखा. ४. दुष्ट दैत्यांचा द्वेषी (कृष्ण.) ५. गम्य. ६. अडवी. ७. मासा. ८. फांसाला. ९. पराक्रमी. १०. दुराचाऱ्यास. ११. मुतरा. १२. मोठें. १३. प्रभु. १४. परिणामानें. १५. फळविशेष. १६. फुटे, उकलून जाई. १७. पक्वतेनें. १८. घोड्याचें शरीर. १९. रक्तेंकरून आर्द्र (तांबडा) जसा पळसाचा फुललेला वृक्ष. २०. गळ्यांतील बाहा (बाहु). २१. प्राणहि. २२. कृष्ण. २३. कीर्तिरूपी अमृताविषयीं तृषित. २४. देव. २५. क्षतांनीं आर्द्र (भिजलेला) असा जो पातकी त्यास. २६. फुलांनीं. २७. पुष्कळ वेळ. २८. हा मोठा भगवद्भक्त होता. (नार म्ह० नरसमूह त्याला (कलहानें) जो द्यति म्ह० नाशितो तो नारद—असा या शब्दाचा अर्थ केलेला आढळतो.) २९. कृष्णीं. ३०. अमृतच आहे अन्न ज्यांचें ते. (देव.) ३१. पंडितांचीं मनें. ३२. ब्राह्मणांचा खेद घालविण्याविषयीं, जी चलाखी तींत. ३३. कंसास. ३४. छळती. ३५. वेदरूपी सेतु. ३६. दुष्टसमूह. ३७. साधूंच्या रक्षणाविषयीं तत्पर. ३८. हे रमापते ! ३९. मल्लांच्या सभेंत.

मग वध पं[1]चजनाचा य[2]वननरकमुरमुखामरारिजनाचा ।
देखेन; तदुपरि भ[3]वभ्रमहर क[4]ल्पद्रुहरण श[5]क्रपरिभव. ॥ २३
बहु त[6]न्ववलग्नाचें स्त्रीरत्नाचें हि कुतुक नव लग्नाचें. ।
मग उद्धरिसिल नृ[7]ग ती पाहेन द्वारकेंत लीला नृ[8]गती ! ॥ २४
सुश्रीमंत कराया, स्त्रीरत्नासह मणि स्य[9]मंतक राया! ।
येइल, ते आ[10]ळ सरे, स्मरतां यश, कीर्तनीं, हरिल आळस रे ! ॥ २५
मृ[11]तपुत्रोपादानें विप्र[12] सुखविजेल विष्ट[13]पोपादानें. ।
पिडिल जगा, तव सोंगा घेवुनि, पौंड्रक[14], त[15]दंत गात वसों गा ! ॥ २६

---

१. राक्षसविशेष. हा समुद्रांत राहत असे. याला कृष्णानें मारून याच्या अस्थींचा शंख केला, म्हणून त्या शंखाला 'पांचजन्य' असें नांव होतें. (भागवत, स्कंध १० अध्याय ४५.) २. यवन, नरक, मुर इत्यादि जे देवांचे शत्रु त्यांचा. ३. संसारभ्रमाचें हरण करणारें. ४. कल्पतरूचें हरण. ५. इंद्राचा पराजय. ६. बारीक आहे कंबर ज्याची असें जें स्त्रीरत्न त्याचें (कुतुक.) ७. नृगराजा. सूर्यवंशीय ओघरथ राजाचा पुत्र. यानें कोट्यवधि गोप्रदानें दिलीं. त्यांत एक गाय विप्रास दिली होती ती चुकून राजाच्या कळपांत आली. त्यानें न जाणतां एका दुसऱ्या द्विजास तिचें दान केलें, तेव्हां उभय ब्राह्मणांचा तन्निमित्त कलह झाला. त्याचा निर्णय राजानें केला नाहीं म्हणून प्रथम ज्याला गाय दिली होती त्या विप्रानें कोपून 'तूं कृकलास (सरडा) होशील' असा शाप राजाला दिला. त्याच्या सविनय प्रार्थनेवरून 'तुझा उद्धार कृष्णाच्या हस्तें होईल' असा विप्रानें प्रसन्न होऊन उ:शाप दिला. राजा अरण्यांत सरडा होऊन पडला असतां कृष्णानें हस्तस्पर्श करून त्याचा उद्धार केला. (रामायण, उत्तरकांड सर्ग ५३-५४ आणि भारत, अनुशासनपर्व, अध्याय ७०.) ८. हे मनुष्यगते ! ९. मण्याचें नांव. हा मणि सूर्यप्रसादेंकरून यदुकुलोत्पन्न सत्राजित् राजास प्राप्त झाला. या मण्यापासून प्रत्यहीं चौसष्ट सहस्र तोळे सोनें प्राप्त होत असे. १०. सत्राजिताचा भाऊ प्रसेन हा स्यमंतकमणि कंठांत धारण करून मृगयेस गेला असतां एका सिंहानें त्यास ठार मारिलें. तेव्हां तो मणि खालीं पडला. इतक्यांत जांबवान् तेथें आला, त्यानें सिंहास मारून तो मणि घेऊन गुहेंत प्रवेश केला. इकडे प्रसेन मृगयेहून परत आला नाहीं, तेव्हां त्याला मारून कृष्णानें मणि नेला असावा असा संशय सत्राजितास आला. हाच कृष्णावर आळ (खोटा आरोप) आला. ११. मेलेल्या पुत्राच्या हेतूनें. (मृतपुत्र आणिल्यानें.) १२. सांदीपनि गुरु. याच्यापाशीं वेदवेदांगें पढून कृष्ण व बलराम यांनीं ब्रह्मविद्या ही संपादिली. नंतर गुरुपत्नीच्या वचनास अनुसरून यांनीं गुरूचे मृत पुत्र परत आणून पुत्रदानरूप गुरुदक्षिणा दिली. (भागवत, स्कंध १० अध्याय ४५).१३. विष्टपास (भुवनास) कारण असा जो तूं त्या त्वां.१४. दैत्यविशेष. हा पुंड्रदेशाचा राजा. हा कृष्णासारखीं पीतांबर मकर कुंडल कौस्तुभ इत्यादि कृत्रिम चिन्हें धारण करी म्हणून यास पौंड्रकवासुदेव असेंही नांव होतें. हा कृष्णाचा फार द्वेष करी आणि धिक्कार करी. याचें आणि कृष्णाचें काशींत मोठें युद्ध झालें. त्यांत कृष्णान काशीराजासह याला ठार मारलें आणि नगर दग्ध केलें. (भागवत, स्कंध १० अध्याय ६६ ). १५. त्याचें मरण.

मग जळतां **का**शिपुरी, तव शक्ति कळेल सर्व लोकांशि पुरी. ।
तुज भगवद्वैद्यातें गातिल कवि, मारितां [1]मखीं [2]**चै**द्यातें. ॥ २७
**ह**रि ! [3]**दं**तवक्रनिधना करिसिल तूं [4]**शं**करादिसर्वमुनिधना ! ।
श्री**द्वा**रकेंत वसतां, चरितें गाईन, ऐकवीन तव [5]सेतां. ॥ २८
वीर [6]**ध**नंजय, साच [7]द्वेषहविप्राशनीं [8]धनंजयसाच; ।
तूंहि [9]समीरण या गा ! सारथि, पाहेन दास मी [10]रणयागा. ॥ २९
हरिलें [11]महिमानस [12]तां, कवि जगति न, हा प्रसिद्ध महिमा नसतां. ।
आतां कां मन [13]करणें न वळवि ? भजकांस अन्य काम न करणें.' ॥ ३०
[14]अंशु वना [15]रदनांचे प्रभुच्या [16]धवळिति; नमूनि **ना**रद नाचे; ।
कीं न तसा दास; कळा हे **ह**रिची; पात्र सुप्रसादा सकळा. ॥ ३१
चिंतित वदना [17]रदनद्युति [18]सुभगा जाय, परि मनें, **ना**रद न. ।
[19]रिझवि [20]**र**मावल्लभ या; [21]सूचकतेच्या मुनी धरि न [22]वेल्हे भया. ॥ ३२
सेवित [23]चिद्रसवर्षिप्रभुगुण गेल्यावरि [24]स्वपुत्रभवर्षि, ।
ये चारित पशु [25]भवन [26]श्रीचें पदिं; काय हो करि तप शुभ वन ! ॥ ३३
[27]फलसुमपल्लवजाती घेती, चारीत धेनु [28]बल्लव जाती. ।
[29]पर्वतसानूंत नसे भय, होति विनोद मानसा [30]नूतनसे ! ॥ ३४

---

१. यज्ञामध्यें. २. असुरविशेष. याचें नांव शिशुपाल. हा चेदिराजाचा वंशज म्हणून याला 'चैद्य' म्हणतात. हा हिरकण्या शिपूच्या अंशानें जन्मला. धर्माच्या राजसूययज्ञांत अग्रपूजेचा मान कोणास द्यावा ह्मणून वादविवाद झाला. भीष्माच्या विचारें या मानास उचित कृष्ण असें ठरलें. ही गोष्ट शिशुपालास सहन न होऊन तो कृष्णाची निंदा करूं लागला. परंतु कृष्णानें याच्या आईला वचन दिलें होतें कीं मीयाला शंभर अपराध क्षमा करीन; कारण ती कृष्णाची आत होती. वसुदेवाची भगिनी श्रुतश्रवा ही चैद्याची माताहोय. शिशुपालाचे शतापराध होईपर्यंत वाट पाहून नंतर कृष्णानें आपलें दिव्यचक्र त्याजवर सोडलें. तेव्हां त्याचें मस्तक गळून तो मरण पावला. (भारत,सभापर्व, अध्याय,४५;भागवतस्कंध १० अध्याय७४). ३. दंतवक्राचें मरण. दंतवक्र हा कृष्णाचा आतेभाऊ. हा असुरांश असल्यामुळें कृष्णाच्या हातून मरण पावला. (भागवत, स्कंध १० अध्याय ७८). ४. शंकरादि सर्व मुनींचें धन असा जो तूं. ५. साधूंस. ६. अर्जुन. ७. शत्रुरूपी होमान्न प्राशन करण्याविषयीं. ८. अग्नीसारिखाच. ९. वायु. १०. युद्धरूपी यज्ञास. ११. जनांचें मन. १२. त्वां. १३. इंद्रियें. १४. किरणें. १५. दांतांचे. १६. शुभ्र करिती. १७. दंतशोभा. १८. स्वच्छा. १९. आनंदवी. २०. कृष्ण. २१. चहाडपणाच्या. २२. वालभरहि. २३. आनंदरसाचा वर्षाव करणारे असे प्रभूचे गुण. २४. ब्रह्मदेवापासून जहालेला ऋषि. (नारद.) २५. घर. २६. लक्ष्मीचें. २७. फळें पुष्पें, पालवी यांच्या जाती. २८. गवळी. २९. कडयावर. ३०. नवीन.

हरिसह कौतुकरीती[1] एक असा खेळ तोषहेतु[2] करीती; ।
किति[3] जाले हो! पाळ[4], स्वांगें किति मेष[5], चोर किति गोपाळ. ॥ ३५
चोरिति ते मेषांतें, जे घेते तस्करांचिया[6] वेषांतें. ।
हासविति विनोदानें सगुणब्रह्मासि[7] गोप हे मोदानें[8]. ॥ ३६
त्यजुनि भयास, मयाचा[9] सुत ये व्योमाख्य[10] विघ्न[11] या समयाचा; ।
घे बल्लववेष[12] हरिप्रियसख[13] जे ते समस्त तो मेष हरी. ॥ ३७
चोरी ज्या, त्यास दरीमध्यें घाली नगाचिया[14] हा सदरी[15]; ।
मुख झांकि घनें[16] उपळें[17]; पुनरपि ये तो दुजासि अघ[18] नेउ पळें. ॥ ३८
हरि पशुपा[19], चपळा या न सुचे, उरतांहि चार पांच, पळाया; ।
हरि एवंच[20] करांनीं प्रभुच्या मरणार साधुवंचक[21] रानीं. ॥ ३९
साक्षी[22] चिन्मय[23] भूतें धरि, याविण गति[24] नसे क्वचिन् मयभूतें[25]. ।
कोठें खळ पळविल या कृष्णधना, ज्याचिया नको पळ विलया[26]? ॥ ४०
कृष्ण धरी व्योमातें[27]; व्यापी, वाढोनि, तो अरि, व्योमातें[28]; ।
जरि हा बहुबळ[29] कटकीं[30] असुरांच्या, तरि मधुघ्नभुज[31] बळकट कीं[32]? ॥ ४१
काळविलोकित[33] वांचे, न परि तगति[34] जीव हरिपुढें कितवांचे[35]. ।
पावे अनसु[36] टकेला[37], काळाधीशेंहि[38], सुकविजन, सुटकेला. ॥ ४२
खळवधकाम करी, ती पशुमृतिची[39] दावि बाळकां मखरीति[40]. ।
शिवसेव्यपदांबु[41] कलित्रासद[42] त्यां[43] तोख[44] दे दिविषदां[45] बुकली[46]! ॥ ४३

---

१. कौतुकाची रीति आहे ज्यांत. २. आनंदजनक. ३. कित्येक, अनेक. ४. अजापाळक. ५. बकरे. ६. चोरांच्या. ७. सावतार ब्रह्मास. (कृष्णास.) ८. आनंदानें. ९. मयासुराचा. १०. व्योम या नांवाचा. याला कृष्णानें मारलें. (भागवत–स्कंध १० अध्याय ३७.) ११. 'विघ्न' हा शब्द संस्कृतांत पुंलिंगी आहे. १२. गवळ्याचा वेष. १३. कृष्णास प्रिय असे गडे. १४. पर्वतांच्या. १५. सज्जनाचा शत्रु. १६. मोठ्या. १७. दगडानें. १८. पापरूपी. १९. गोपांस. २०. यासाठीं. २१. ठकविणारा. २२. आपण उदासीन राहून प्रत्यक्ष पाहणारा. २३. ज्ञानमय. (कृष्ण.) २४. उपाय. २५. मयासुराचा मुलगा. २६. नाश. २७. व्योमासुरास. २८. आकाशास. २९. फार बळवान्. ३०. सैन्यांत=समूहांत. ३१. मधुदैत्यास मारणाऱ्या कृष्णाच्या भुजास देखील. ३२. काय. ३३. काळानें (टौकारून) पाहिलेला. ३४. टिकति. ३५. दुष्टांचे. ३६. गतप्राण. ३७. टकटक पाहण्यास. ३८. काळश्रेष्ठें. (कृष्णें.) ३९. पशुमरणाची. ४०. यज्ञरीति. ४१. ज्याच्या पायांचें उदक सांबानें सेवन करण्यास योग्य तो. ४२. कलियुगास भय देणारा. ४३. त्या देवांस. ४४. संतोष. ४५. देवां. ४६. बुकलणारा.

जो साधुजनीं श्वा[१] सद्द्वेष्टा[२] तो मारिला विगतनिःश्वास[३]. ।
ज्या स्वपदीं विश्वास[४] प्रभु तारी त्यांसि, करि सुखी विश्वास[५]. ॥ ४४
उघडुनि गुहापिधान[६], श्रीपति घे दुर्लभ स्वभक्तनिधान[७]. ।
म्हणत, 'नमस्ते[८]' नाचे सुरजन, वर्णूनि भुज यमस्तेनाचे[९]. ॥ ४५
त्या दासां 'गडियांचें[१०] स्तोत्र[११]' रुचे बहु भवाब्धिसांगडियाचें[१२]. ।
निवती असु[१३] खेवेंचि[१४] ब्रह्माच्या; प्राप्ति सर्व असुखें वेंची[१५]. ॥ ४६
जातां याला, 'गे! हा,' म्हणति सखी, 'प्राणनाथ आला गेहीं[१६]; ।
न म्हणा[१७] कां वो? बाळा[१८] विरहें कां? कांतपादुका वोवाळा. ॥ ४७
आलों मुनिसीं[१९] समतें[२०]; त्यां आम्हां दिननिशाव्यवस्था[२१] सम; ते ।
आश्रित सत्यानंदातें[२२]; आम्हीं टाकिला सकळ गृहधंदा. ॥ ४८
निंदास्तवनीं समता[२३] त्यांपरि[२४] आम्हां; नसे अहंता[२५], ममता; ।
ते नित्य सुखी लोकीं; आम्हीच कशा निमग्न[२६] होतों शोकीं? ॥ ४९
ते मुरली हे वाजे, धरि हरिदंतच्छदामृतीं[२७] हेवा जे; ।
वंशभवा[२८] खरि; असुनी विपक्ष[२९], हित कथि; म्हणे, 'पुजा हरि असुनीं[३०].' ॥ ५०
ऐसें बहु नवसांनीं गोपी पाहति हरीस रव्यवसानीं[३१], ।
ज्यांला शिव! शिव! सानीं[३२] कल्पशतें[३३] दाविलीं विरहदिवसांनीं[३४]. ॥ ५१

---

१. कुत्रा. २. सज्जनांचा द्वेष करणारा. ३. श्वासोच्छ्वसन गेलें आहे ज्यापासून. ४. श्रद्धा, भक्तिभाव. ५. सकल जगताला. ६. गुहेचें तोंड. ७. आपले भक्त हाच कोणीएक द्रव्याचा ठेवा. ८. तुला नमस्कार. ९. यमाचा चोर, काळास नेणारा. १०. सख्यांचें. ११. स्तुति. १२. संसाररूपी सागरांत नौकासमूहच असे जे हे गोप. (हें 'दासां गडियांचें' या पदाचें विशेषण आहे.) १३. प्राण. १४. आलिंगनानेंच. १५. नाशी, दूर करी. १६. घरास. १७. म्हणतां. १८. बाळतां. १९. ऋषींशीं. २०. बरोबरीला. २१. दिवस आणि रात्र हा व्यवस्थाप्रकार. २२. सत्य आनंद, खरोखर आनंदरूपी. (कृष्ण.) २३. सारखेपणा. २४. मुनिजनांसारखी. २५. मीपणा. २६. बुडलेल्या. २७. कृष्णाच्या अधरामृतीं. २८. वेळूपासून जहालेली. (परंतु अलंकारासाठीं 'सत्कुलोत्पन्ना' असा अर्थ करावा.) २९. शत्रु. (हरीच्या अधरामृतीं हेवा धरी म्हणून). ३०. प्राणांहीं. ३१. सूर्यास्तीं. ३२. लहानशीं (कल्पशतें). ३३. कल्प=ब्रह्मदेवाचा एक दिवस; मानवांचीं ४३२०००००० वर्षें. ३४. विरहाचे दिवस.

# अध्याय अडतिसावा.

केशिविनाश[1] सकाळ[2] स्वभुजें करि देव दाससाध्वसकाळ[3]; ।
मग भेटे **नारद** या, (व्योमवधें[4] त्यावरी करि अपार दया;) ॥ १
त्याचि गुरुपदा सांजे **अक्रूर** नमी; वरी सकृप[5] दासां जें. ।
मूर्तपरमनोरथ[6] वा[7], वृष्णिमनाचाचि[8] ये प्रभुसमोर थवा! ॥ २
राशि तपाचा राया[9]! आला **अक्रूर** हरिस पांचाराया[10]; ।
प्रेषी स्वपतिस कां[11] या. श्रीमथुरा मूळ[12] सात्विकौघ[13] सकाया[14]. ॥ ३
**अक्रूर** रथावरुनी व्रजासि[15] येतां सुरस्तुतपथा[16] वरुनी, ।
चिंति मनांत नतरतिप्रद[17] ऐसें, ज्याविणें[18] जनांत न तरती. ॥ ४
'कंसाचें आग[19] मनीं नाठवि हा; **गो**कुळाचिया आगमनीं ।
सुमहाभागवतन[20] मी पाहेन,' म्हणे; नृपाहि[21] भागवत[22] नमी. ॥ ५
'आणाया शिशु[23] भाचे मज पाठवि, लाभ फार यांसि[24]! शुभाचे ।
ते पाहिन पाय महासुखनिधिचे[25]; मजवरी करि कृपा यम[26] हा! ॥ ६
काय मला पदरींचें सुकृत[27], कळेनाचि; कलिमलापदरीचें[28] ।
चिद्रसदा[29] चरणाचें दर्शन! हें फळ तरी सदाचरणाचें. ॥ ७
विषयीं मन वांवरतें[30] प्रेमें स्त्रीपुत्रवित्तविभवा[31]वरतें, ।
त्या तुज हरिभेटि कसी रे **अक्रूरा**? न तज्जनसभे टिकसी! ॥ ८
दुर्लभ तत्सुगमाचें[32] दर्शन मज, शूद्रसंभवा[33] निगमाचें[34] ।
उच्चारण जेंवि; कसे पद नयनां दिसति, या तमीं[35] जें विकसे[36]? ॥ ९

---

१. केशीदैत्याचा वध. २. प्रातःकाळीं. ३. दासांच्या भयाचा काळ. ४. व्योमासुराच्या वधानें. (व्योमासुर हा मयासुराच्या वंशांतील एक असुर, यास कृष्णानें मारिलें. भागवत-स्कंध १० अ० ३७.) ५. दयाळू. (पद.) ६. शत्रूचा (कंसाचा) मूर्तिमान् मनोरथ. (ही अक्रूरावर उत्प्रेक्षा आहे.) ७. किंवा. ८. यादवांच्या मनांचा. ९. हे राजा. १०. बोलाविण्याला. ११. किंवा. १२. आमंत्रण. १३. सात्विक भावाचा ओघच. १४. मूर्तिमान्. १५. गोकुळास. १६. देवांनीं स्तुति केली आहे ज्याची अशा मार्गास. १७. शरणागतास प्रियकर. (कृष्ण.) १८. ज्या नतरतिप्रद कृष्णाविणें. १९. अपराध. २०. भाग्यवंत (साधु) जे त्यांचें वतनच असा जो कृष्ण. (हा सामासिक शब्द लक्ष्यांत ठेवण्यासारखा आहे. यांतील एक पद संस्कृत व दुसरें फारशी आहे.) २१. कंसालाही. २२. अक्रूर, भगवंताचा भक्त. २३. मुलगे, लहान. २४. मला. २५. महासुखाच्या ठेव्याचे. २६. कंस. २७. पुण्य. २८. पातक व विपत्ति यांचा शत्रु (कृष्ण) त्याचें. २९. आनंदरस देणाऱ्या (चरणाचें.) ३०. निमग्न असतें. ३१. पराक्रम. ३२. त्या सुलभाचें. ३३. शूद्रापासून जहालेल्यास. ३४. वेदांचें. ३५. अंधारांत. ('जें'='पद.' येथें लिंगांतर किंवा वचनांतर झालें आहे.) ३६. झळके.

उत्साहें स्वमनींच्या, वाटे भेटेल मज [१]सुरोत्तम [२]नीचा. ।
[३]सरिता हरिती रासी, लागे तृण त्यांत एक तरि तीरासी. ॥ १०
सरलीं सारीं [४]दुरितें, जन्म सफळ आज; दुःख गेलें दुरि तें; ।
जीं ध्याति मुनिजनमनें [५]हरिपदनलिनांसि करिल शिर निज नमनें.॥ ११
पूजिति [६]विधि [७]सुर ज्यातें, सेविति [८]सात्वत रमा मुनी [९]सुरजातें; ।
पशुमागें [१०]पदनलिनें फिरति वनीं, [११]गोप्युरोजकुंकुममलिनें. ॥ १२
भुलली ज्याच्या [१२]रुचितें [१३]श्रीभ्रमरी [१४]हरिमुखांबुरुह [१५]चारुचि तें ! ।
या दृष्टिस [१६]उजविलसे शकुन [१७]हरिणपंक्तिमाजि; या उजवि [१८]लसे. ॥ १३
जालासे [१९]अज [२०]नरसा रक्षाया, स्वपद दावुनि, स्वजन [२१]रसा. ।
[२२]स्वनयनयुग [२३]रुचिरतमीं जडतां, मानीन सफळ त्या [२४]रुचिरत मी. ॥ १४
करिती महि, [२५]मानवते धरुनि, सुखी; दाविती स्वमहिमा [२६]नव ते. ।
पाहुनि [२७]भाउ, तरेन; त्यजुनि रथा, धरुं पदा [२८]शुभा, उतरेन. ॥ १५
[२९]सारसभव [३०]हर पाया ज्या चिंतिति त्या नमीन [३१]भव [३२]हरपाया. ।
कुंकुम [३३]माथानींचें ज्या, कर तो पाविजेल माथां [३४]नीचें. ॥ १६
[३५]प्रणतांचा [३६]दर वारी [३७]भूप्रद बळि [३८]ज्यांत सोडि [३९]सादर [४०]वारि, ।
[४१]भंजकजनवनवसंत [४२]प्रभुकर [४३]वर वरति···· नव नव संत. ॥ १७
जातों कंसाकडुन, [४४]स्वांतीं वाटेन [४५]यदुवतंसा कडु न; ।
कीं [४६]क्षेत्रज्ञा त्याला [४७]तत्त्व कळे सर्व ईश्वरा ज्ञात्याला. ॥ १८

---

१. देवश्रेष्ठ. २. हें 'मज' याचें विशेषण. ३. नद्या. ४. पातकें. ५. कृष्णाच्या चरणकमलास. ६. ब्रह्मदेव. ७. देव. ८. यादव. ९. उत्तम असा जो रजःकण. १०. चरणकमलें. ११. गोपींच्या स्तनावरील कुंकुमानें माखलेलीं. १२. शोभेतें. १३. लक्ष्मीरूपी भ्रमरी. १४. कृष्णाचें मुखकमल. १५. सुंदर. १६. कृतकृत्य करील असें. १७. हरिणाच्या मालिकेंत. १८. ('पंक्ति') शोभे, धांवे. १९. जन्म नाहीं ज्याला. २०. मनुष्यासारिखा. २१. पृथ्वी. २२. निजनेत्रद्वय. २३. अत्यंत सुंदर असा जो कृष्ण त्याच्या ठायीं. २४. शोभेंत निमग्न. २५. मनुष्यपणास. २६. नूतन. २७. बळराम. २८. मंगळ. २९. कमलोद्भव. (ब्रह्मा.) ३०. शिव. ३१. संसार. ३२. घालवाया. ३३. लक्ष्मीच्या स्तनींचें. (एक पद संस्कृत व दुसरें प्राकृत, अशांच्या समासाचें हें एक उदाहरण आहे.) ३४. म्यां. ३५. शरणागतांचा. ३६. भय. ३७. पृथ्वी दान करणारा. ३८. ज्या हातांत. ३९. आदरानें. ४०. पाणी. ४१. भक्तजनरूपी वनांतील वसंतऋतु. ४२. कृष्णहस्त. ४३. श्रेष्ठ. ४४. अंतःकरणीं. ४५. यादवांचा तुरा. (कृष्ण.) ४६. आत्म्याला. (कृष्णास.) ४७. तात्पर्य. (माझ्या येण्याचें इ०).

मनिं आलिंगन [1]मा जें इच्छी, तें राहवील [2]लिंग न माजें. ।
करिल पवित्र [3]वपु; निवे चकोरसंताप जो [4]क्षुदुद्भव [5]पुनिवे. ॥ १९
ज्यास [6]विबुध भजतात ब्रह्मादि प्रभु म्हणेल तो मज 'तात!' ।
ईश्वरकृतसन्मानप्राप्तिफळतदन्य[7]जंतुंच्या जन्मा न ॥ २०
प्रिय, अप्रिय; हित, अहित; प्रभु या भावें करूनियां जरि रहित; ।
[8]सुरतरुसा निजभजकां सत्फळ दे; [9]विषम होय यास्तव मज कां?॥ २१
राम [10]भगवदग्रजनी देइल आलिंगनें सुख, समग्र जनीं; ।
[11]सदनीं मज धरुनि करीं नेइल, सत्कार करिल [12]निजजननिकरीं.' ॥ २२
ऐसें चिंतित [13]काया विसरे; नकळेचि मार्ग तो [14]तितका या; ।
पावे अस्तास [15]रवी; [16]व्रजाहि [17]हो; [18]मार्गदैर्घ्य [19]चिंता सरवी. ॥ २३
तों पाहे, [20]अवनितळीं अमृताचीं [21]भवदवार्तजगदवनिं तळीं, ।
कृष्णपदें [22]ज्ञानिहितें, ज्यांतील [23]रजें [24]हरादिचूडानिहितें, ॥ २४
ज्यांहींच [25]धरित्रि [26]दिवारात्रि [27]विभूषित, मनांत न धरी [28]त्रिदिवा; ।
ज्यां [29]पविपद्मयवांचे [30]अंक, न [31]यन्नतजनाघसंचय वांचे. ॥ २५
[32]आठांही भावांचा अक्रूर [33]निवास सात्विकां [34]भावांचा ।
वंदुनि माथां, घोळी तीर्थपदरजांत [35]तनु, करी आंघोळी. ॥ २६

---

१. लक्ष्मी. २. दोष. ३. शरीर. ४. भुकेपासून जाहलेला (चकोरांचा संताप). ५. पौर्णिमेस. ६. देव. ७. प्राण्याच्या (मनुष्याखेरीज इ०.) ८. कल्पवृक्षासारिखा. ९. कठोर, निष्ठुर. १०. कृष्णाचा वडीलबंधु. ११. घरांत. १२. आपल्या आप्तसमूहांत. १३. शरीर. १४. वर सांगितलेलें बोलत चालला तितका. १५. सूर्य. १६. गोकुळास. १७. अक्रूर. (पावे.) १८. रस्त्याची लांबी. १९. वर सांगितलेलें चिंतन, मनन. हा 'सरवी' याचा कर्ता. २०. जमिनीवर. २१. संसाररूपी वणव्यानें दुःखित जनाच्या संरक्षणाविषयीं. २२. ज्ञान्यांस हितकारक. २३. कण. २४. सांबादिकांनीं आपल्या शिरावर धारण केलेलीं. २५. पृथ्वी. २६. रात्रंदिवस. २७. सुशोभित. २८. स्वर्गास. २९. वज्र, कमळ व यव (आंगठ्याच्या खालच्या अंगानें असलेलें एक चिन्ह) यांचे. ३०. चिन्हें. ३१. ज्याच्या शरणागतांचा पापसमूह. ३२. आठ सात्विक भावांचीं नांवें:—स्तंभ (स्तब्धता), प्रलय (वेशुद्धि), रोमांच (आंगावर कांटा उभारणें), स्वेद (आंगास घाम येणें), वैवर्ण्य (तोंडावरचा रंग बदलणें), वेपथु (शरीरास कांपरी सुटणें), अश्रु (डोळ्यांतून पाणी येणें), आणि वैस्वर्य (स्वर पालटणें.) ३३. शरीर. ३४. कृष्ण आणि बळराम यांचा. ३५. देह.

रोवी [1]साधू [2]लीलानरतीर्थपदाचिया असा धूलीला; ।
फळले [3]कृष्णवसंतें मनिं लावियले [4]मनोरथद्रुम [5]संतें. ॥ २७
न [6]श्रुत [7]मोहस्थांनीं जे ते बळकृष्ण [8]धेनुदोहस्थानीं ।
देखियले [9]भागवतें [10]सहज नतें; अन्यथा न कां [11]भागवतें? ॥ २८
श्री[12]मृगमदकापुर ते निववितिं [13]गुणपरिमळें स्वभजका पुरते; ।
[14]नित्यनवश्रीनिलयें, [15]सदलिहितें, दिव्य [16]पुंडरीककुवलयें. ॥ २९
[17]श्वेतश्यामल [18]लीलानिधि, जे दिसती न दृष्टिला [19]मळलीला, ।
[20]यमुनासुरसरिदोघ [21]व्रजाप्रयागासि आणिती [22]सरि [23]दोघे. ॥ ३०
वर्णें [24]सरसा रूप्यापाचूच्या धरिति [25]धरणिधर [26]सारूप्या; ।
[27]असिता [28]पीता [29]चेलीं त्याले; सौंदर्य न वदवे वाचेला. ॥ ३१
भय ज्याचें [30]रिपुकटकीं, [31]प्रलंब भुजदंड [32]पीन शोभति [33]कटकीं; ।
असुरांचें उर गाजे [34]यत्स्मरणें, [35]वर्ण्य [36]करिकरां [37]उरगां जे. ॥ ३२
लो[38]कत्रयनेत्यांचीं श्री[39]केलिगृहेंचि वदननयनें, त्यांचीं; ।
त्याचि [40]कृपाकासारीं जनिं अमृतें [41]भजकचंचरीकां [42]सारीं. ॥ ३३
अवलोकनगेहें[43]; वसे तेथ कृपा; पुरवितां न भागे हवसे; ।
विश्वघटाचें [44]निवणें प्रेक्षण तें; सहज जेथ [45]तप्तें [46]निवणें. ॥ ३४

---

१. अक्रूर. २. लीलेनें मनुष्य जहालेल्या कृष्णाच्या निर्मळ चरणाच्या. ३. कृष्णरूपी वसंतऋतूनें. ४. मनोरथरूपी वृक्ष. ५. अक्रूरानें. ६. ऐकिलेले. ७. मोहांत पडलेल्यांनीं. ८. दूध काढण्याच्या ठिकाणीं. ९. भगवंताच्या भक्तानें. १०. बंधू. ११. त्यांस पाहून श्रमरहित जहाला; त्यांस जर न पाहता, तर तो तसाच श्रमलेला राहिला नसता काय? इ०. १२. बळकृष्णरूपी कस्तुरी व कापुर. (मृगमद=कस्तुरी.) १३. आपल्या गुणरूपी सुवासानें. १४. नित्य नूतन अशा कांतीचीं स्थानें. १५. साधुरूपी भ्रमरांस हितकारक. १६. शुभ्र, व श्याम कमलें; (अनुक्रमें बलराम व कृष्ण.) १७. शुभ्र व काळे. १८. लीलेचे समुद्र. १९. पापयुक्त; पापाच्या मळानें बिघडलेल्या. २०. यमुना व भागीरथी यांचे ओघच (कृष्ण व बळराम). (सुरसरित्=देवांची नदी–भागीरथी.) २१. गोकुळास व प्रयागास. २२. बरोबरी. २३. दोघे. २४. सुंदर. २५. बळकृष्ण. २६. वर्णसाम्यतेस. २७. काळ्या. २८. पिंवळ्या. २९. वस्त्रास. ३०. शत्रुसैन्यांत. ३१. लांब. ३२. पुष्ट. ३३. कड्यांनीं. ३४. ज्या बाहूंच्या स्मरणानें. ३५. वर्णीयास योग्य. ३६. हत्तींच्या सोंडींस. ३७. सर्पास. ३८. त्रैलोक्याच्या प्रभूंची. ३९. शोभा, लक्ष्मी, यांच्या क्रीडेचीं स्थानें. ४०. कृपेच्या तळ्यांत. ४१. भक्तरूपी भ्रमरांस. ४२. सर्व. ४३. घर. ४४. घट ठेवण्याकरितां गवताचें वेटाळें. ४५. तापलेल्यानें. ४६. शांत व्हावें.

[1]श्रीमद्वदनेंदु, [2]सरें [3]स्मितामृताचीं; [4]तुळे न वचनें दुसरें; ।
[5]सन्मानसयादां तीं पोषिति [6]सितपद्मखगसमुदया दांतीं. ॥ ३५
[7]सुमतुळसीहार गळां चित्तभ्रमरी विमोहिती [8]बारगळा; ।
सेवुनि त्या [9]सुपरिमळा, देवांचा इच्छिती न त्या उपरि [10]मळा! ॥ ३६
[11]मृगमदसत्तिलकांहीं ऊरविला न [12]मदें [13]शशिमनांतिल कांहीं; ।
स्तविजे चंद्र? न काय स्वांगें जो निववि [14]नंदनंदन[15]काय? ॥ ३७
हरि [16]पापदरा, [17]जीवीं ध्यातां [18]यद्रज, अशा [19]सुपदराजीवीं ।
ध्यावे निशिदिनिं[20] [21]शांतें [22]ध्वजवज्राद्यंक शंकरादि[23]निशांतें. ॥ ३८
शुभवासरिं दोघांतें [24]प्रेक्षुनियां त्या [25]दयैकसरिदोघांतें, ।
उतरे [26]यानावरुनी, वस्त्रादि [27]स्रस्त जें तया [28]नावरुनी. ॥ ३९
पद [29]सुखनिधिकल्लोळ; [30]प्रेमसखा सूचवी तया कीं [31]लोळें ।
[32]हो स्नानीं, पानिं; बरा उपदेश क्षय पळांत तापा [33]निबरा! ॥ ४०
दे [34]परिरंभण गा! तें जें दुर्लभ इंदिरे[35]स त्या [36]भणगातें; ।
जाला आपण साचा रोमांचित[37] [38]सुरगुरु सखा [39]पणसाचा. ॥ ४१
त्या सकृपा, दासाचें आलिंगन सुखद, [40]तीर्थपादा साचें! ।
दाटून गळा, याचे नेत्रांतुनि अश्रुबिंदु न गळायाचे? ॥ ४२
राम तया धरि [41]वत्सीं, [42]चिरदृष्टीं [43]धेनु जसि दया करि वत्सीं. ।
मिळला दीन उरा या प्रभुच्या, [44]वर्षोपळचि [45]ह्रदीं न [46]उराया. ॥ ४३

---

१. त्यांचीं वदनें हेच कोणी चंद्र. २. तळीं. ३. हास्यरूपी अमृताचीं. ४. तुळनेला. ५. साधूंचीं मनें हींच जलचरें त्यांस. ६. शुभ्रकमलांवरील भ्रमरसमूहास. ७. फुलें व तुळसी यांचा हार. ८. उनाड फिरणाऱ्या. ९. सुवासास. १०. इंद्रभुवनींचें नंदनवन. ११. कस्तुरीच्या सुंदर तिलकांनीं. १२. गर्व. १३. चंद्राच्या मनांतील. १४. कृष्ण. १५. देह. १६. पापभयास. १७. मर्त्यांनीं. १८. ज्याचा रज:कण. १९. सुंदर चरणकमलीं. २०. रात्रंदिवस. २१. सुखानें, आनंदानें. २२. ध्वज, वज्र आदिकरून चिन्हें. २३. भुवनांतें. २४. पाहुनियां. २५. दयारूपी महानदीच्या ओघांतें. २६. वाहनावरून. २७. विगलित. २८. मं आवरून. २९. सुखाच्या समुद्राची लहरी. ३०. प्रेमरूपी मित्र. ३१. उतावीळ, उत्सुक. ३२. अक्रूर. ३३. कठिणा (तापास). ३४. आलिंगन. ३५. लक्ष्मीस. ३६. भिकाऱ्यास. (अक्रूरास.) ३७. रोमांचांनीं भरलेला. ३८. देवश्रेष्ठ. ३९. अंगावर कांटा उठला म्हणून फणसासारखा सकंटक झाला. ४०. कृष्णास. ज्याचे पादीं तीर्थ (पवित्रजल) आहे तो. ४१. हृदयीं. ४२. पुष्कळवेळानें पाहिलेल्या. ४३. गाई. ४४. गार. ४५. डोहांत. ४६. डोहीं गार पडली तर जशी वितुळते, तसा हा प्रभुहृदयीं चिकटला आणि एकरूप जहाला इ०.

तो दास खरा मानें तोषविला वडिल दीनसख[1] रामानें; ।
भक्त सुखाकर[2] केला, भेद नसे सर्वतोमुखा[3] करकेला[4] ! ॥ ४४
दाखविती तोकरिती[5], पूजुनि गुरुसा[6] कृतार्थ[7] बहु तो करिती. ।
प्रेमा सज्जानिं[8] त्यांनीं आत्मगत[9] प्रगटिला जगज्जनित्यांनीं[10]. ॥ ४५
गेहें[11] सदा नंदाचें वैकुंठ; स्थान तें सदानंदाचें[12]. ।
स्थैर्य अदभ्र[13] मनासी; भगवद्भागवतसंगम[14] श्रम नाशी. ॥ ४६
विश्रमें[15] हा नंदानें जेवविला भागवत[16] महानंदानें[17]. ।
पुसिलें स्वसुहृद्वृत्त[18] स्वांतीं[19] नाणून[20] कंसकृत उद्वृत्त[21]. ॥ ४७
‘मृतिदायक[22] सापाची छाया भेकां[23] अवीसहि[24] कंसापाची[25]; ।
ज्या कंस विभू[26] तगणें कैसें त्या वृष्णिभोजसंभूतगणें[27]? ॥ ४८
कोण नृपा पतिजे[28] जो वधि भगिनिप्रजा[29] अपापा[30] ते जे? ।
निद्रालाभ व्यसुचे[31] या डोळे न वरितां मला भव्य सुचे.’ ॥ ४९
नंदाची असि कानें सेवुनियां सत्यवाक्सुधा[32] रसिकानें[33], ।
त्यजिला दानपतीनें[34] श्रम; वश ज्याला जगन्निदान[35] पतीनें[36]. ॥ ५०

---

## अध्याय एकुणचाळिसावा.

कंसें जो धावडिला, प्रेमें हे[37] त्या विशुद्धबोधा[38] वडिला ।
पर्यंकीं[39] निजवीती; ज्यांचे, भवनें[40] अनेक, पद निज, वीती[41] ! ॥ १

---

१. अनाथमित्र. २. सुखाची खाण. ३. सर्व बाजूंनीं मुखें आहेत ज्यास. (ईश्वर.) ४. गारेला. ५. मुलांची रीति. (‘रीति’ असा हा शब्द आहे; पंतांनीं येथें ‘रिती’ असें लिहिलें आहे.) ६. बापासारिखा. ७. तृप्त. ८. अक्रूरीं. ९. आपल्या अंगाचा. १०. जगाच्या उत्पन्नकर्त्यांनीं. ११. घर. १२. साधूंचा आनंदरूपी जो कृष्ण त्याचें. १३. मोठें. (हें ‘स्थैर्य’ याचें विशेषण). १४. कृष्णाचा व अक्रूराचा संयोग. १५. श्रमरहित जहालेला, किंवा श्रमरहित होई अशा रीतीनें. १६. भगवद्भक्त. (अक्रूर). १७. मोठ्या आनंदानें. १८. आपल्या आप्तांचें वर्तमान. १९. अंतःकरणांत. २०. मनांत न आणून. २१. मसलत, कृत्रिम. २२. मारक. २३. बेडकास. २४. मेंढ्यास. २५. दुष्टाची, खलाची. २६. राजा. २७. वृष्णि, आणि भोज यांपासून जहालेल्या लोकसमूहानें. २८. विश्वासिजे. २९. वहिणीची संतति. ३०. निष्पाप. ३१. प्राणरहित. ३२. सत्यभाषणरूपी अमृत. ३३. हें ‘कानें’ याचें विशेषण. ३४. अक्रूरानें. दानपति हें अक्रूराचें नामांतर. (भागवत-स्कंध २५ अ० ४९). ३५. जगाचा उत्पन्नकर्ता. ३६. मानानें, अब्रूनें. ३७. बळकृष्ण. ३८. अत्यंत शुद्ध आहे बोध ज्याचा त्यास. (अक्रूरास.) ३९. पलंगावर. ४०. जगें. (‘वीती’ या क्रियापदाचें कर्म.) ४१. उत्पन्न करिती.

कृष्ण म्हणे, 'हो तात! [1]स्वजनकजननीस कष्ट बहु होतात; ।
देतो [2]नृप जो नीच श्रम, ते मीच स्वयेंच [3]उपजोनीच.॥ २
[4]उद्भव हाहा! काय? [5]स्वातां श्रम देतसे महा हा [6]काय! ।
[7]अशुभाचा हा [8]निकर स्वजनां; सर्वांस तुपजती [9]हानिकर. ॥ ३
न [10]मनीं अघ मामातें, स्पर्शे [11]बंधुघ्नभाव अधमा मातें. ।
[12]यदुकुळगदनृपजागा [13]मदपथ्यें; दोष माजिया [14]उपजा गा. ॥ ४
मति [15]वधकामा म्याचि [16]स्वप्रभवें केलि घातका [17]माम्याची; ।
येतों ना उदराशी, [18]गुरु खेदाचा न देखते [19]उदराशि. ॥ ५
तव दर्शन, बा! पांचा प्राणां सुख; लाभ हा [20]जननित्रापांचा; ।
नामचि भेद जिभे दे; तुमचें आत्मैक्य तें कसें अजि! भेदे? ॥ ६
ताता! सांग मनाचें इच्छित, कारण मला [21]त्वागमनाचें; ।
ऐकावा तो कानीं सारा वृत्तांत तेथिला लोकांनीं.' ॥ ७
[22]धृतवारिरुडर्यकीं स्वकरीं चुरितां [23]स्वभक्तपद [24]पर्यंकीं, ।
पुसिलें [25]कोमलें तातें [26]विधिच्या; फळ भक्ति दे, न [27]सोमलता, तें. ॥ ८
ते [28]सुभग, 'वदा' ज्ञाते [29]बंधु म्हणति; [30]तो करी [31]भगवदाज्ञा ते. ।
सांगे [32]सहस्रशीर्षा [33]पुरुषा [34]स्वागमनहेतु [35]कंसचिकीर्षा. ॥ ९
ऐकुनि [36]महानुभावां हांसें ये फार रामकृष्णां भावां. ।
कीं तो [37]पामर दीन स्वबळेंचि म्हणे, '[38]त्रिलोकपा [39]मर्दीन!' ॥ १०

---

१. आमच्या आईबापांस. २. कंस. ३. ते (श्रम) मीच स्वयेंच उपजोनीच देतो. ४. जन्म. ५. स्वआप्तां. ६. शरीर. ७. अकल्याणाचा. ८. समूह. ९. हानि करणारीं मुलें. १०. मान, समज. ११. बंधुघ्नता. (आपले बंधु कंसानें मारिले त्याचा दोषी मीच इ०) १२. यादवांच्या कुळाचा रोगच असा जो कंस तो. १३. मी हेंच कोणी एक अपथ्य, तेणेंकरून. १४. जन्मा. १५. वधातें इच्छिणारी. १६. माझ्या उत्पत्तीनें. १७. मामाची. ('माम्या,' 'काक्या,' 'दाद्या,' 'बाब्या' अशीं सामान्यरूपें क्वचित् करितात; अथवा नाहीं म्हटलें तरी चालेल.) १८. आईबापें. १९. समुद्र. २०. हा समास संस्कृत प्राकृत शब्दांचा आहे. २१. तुझ्या येण्याचें. २२. धरिलीं आहेत कमळ, चक्र, हीं चिन्हें ज्यांनीं अशा (स्वकरीं). २३. अक्रूराचे चरण. २४. पलंगीं. २५. मंजुळ स्वरानें. २६. ब्रह्मदेवाच्या. २७. चंद्रवल्लि. (कल्पवृक्षाच्या सारिखे गुण असतात जींत अशी एक.) २८. भाग्यवान्. २९. बळकृष्ण. ३०. तो अक्रूर. ३१. ईश्वराची आज्ञा. (हें पद 'करी' या क्रियापदाचें कर्म आहे. आज्ञा करी=आज्ञा मानी.) ३२. सहस्र आहेत शिरें ज्याला असा. (कृष्ण.) ३३. कृष्णास. ३४. आपल्या येण्याचें कारण. ३५. कंसाची इच्छा. ३६. महान् आहे आशय ज्यांचा, महाशय. ३७. मूर्ख. (कंस.) ३८. त्रैलोक्यपाळांस. ३९. मर्दीन. (या स्थळीं प्रासासाठीं शब्दाची बरीच ओढाताण केली आहे.)

मग **भो**[1]जवतंसाची, आज्ञा **नं**दासि कथिति हे, **कं**साची; ।
कीं, '**अक्रूर** [2]वेहाया आला, **मथुरें**त [3]चापयाग पहाया.' ॥ ११
'घेउनि गोरस जावें, करितो नृप चापयाग थोर; सजावें; ।
**अक्रूर** वहायाला आला; जाऊं समस्तहि पहायाला. ॥ १२
[4]व्रजरक्षाधिकृतातें केली आज्ञा असीच **मा**[5]धवतातें, ।
तो घो[6]ष करि असा, 'रे! **मथुरे** जायासि सर्व सिद्ध असा रे.' ॥ १३
परिसुनि हा [7]हांकारा, व्रज जाला गोपिकांसि हाहा! [8]कारा. ।
हा वृत्तांत हरि बळा, 'आला **अक्रूर** न्यावयासि [9]**हरिबळा**.' ॥ १४
गोष्टि नव्या परिसे जे ते स्त्री गणि तापल्या तव्यापरि सेजे. ।
होय तनू निज [10]लाहे; मूर्छेवांचूनि कोणती निज [11]लाहे? ॥ १५
तो दुःसह रायाचा न, **य**माचा दूत जीवनें[12] हरायाचा. ।
स्त्रीमनिं बहु धाक सिरे; म्हणति, '**विधे**[13]! लिहिलि हानि बहु[14]धा कसि रे?'॥ १६
'धरि नामा दुसरी, ती लोपुनि[15] **अक्रूर** [16]कपटमादुसरीति; ।
अथवा जन न क्रूर त्रिजगांत दुजा म्हणोनि हा [17]अक्रूर !' ॥ १७
'चोर, न साव; धरा हा, निश्चय निजधन हरील, सावध राहा; ।
कीं अकृप [18]दरवडा जी ! घालुनि, मनिं [19]सर्वतापपदरव डाजी.' ॥ १८
'गळती [20]कुंतल [21]पट हो!' **अक्रूरा** स्त्री म्हणति, 'तुझें तळपट [22]हो; ।
हरिसी [23]काममसणा [24]सद्वेष्ट्या ! गेलासि तूं न कां मसणास?' ॥ १९
'मनिं कोपहि लेकांहीं **नं**दाच्या धरियला, न पहिलें कांहीं ।
सख्य स्मरति, न वसती आम्हांहुनि सुंदरी [25]पुरींत नव सती?' ॥ २०
हे दोघे भाउ दया करितिल; यांची [26]मुखेंदुशोभा उदया ।
मनिं आणिल [27]रतिपा; तीं त्या स्त्रीचीं कां लवों न विसरति पातीं? ॥ २१

---

१. भोजकुळाचा किरिट. (कंस.) २. बोलवाया. ३. धनुर्याग. ४. गोकुळ राखण्याचा अधिकारी. ५. नंदानें. ६. प्रसिद्धि. ७. दवंडी. ८. बंदिखाना. ९. कृष्ण व बळराम यांस. १०. लाही. ११. पावे. १२. जीव. १३. हे ब्रह्मदेवा! १४. बहुत प्रकारांनीं. १५. लपवून. १६. कपटाच्या पेटीची साम्यता. १७. ज्याहून दुसरा एखादा अधिक क्रूर नाहीं. (या सर्व 'अक्रूर' या नामाच्या अर्थाविषयीं उत्प्रेक्षा किंवा कल्पना होत.) १८. घाला. १९. सर्वांस ताप देणारा शब्द. २०. केश. २१. वस्त्र. २२. होवो. २३. इच्छा पुरविणाऱ्यास. २४. हे दुर्जना! २५. मथुरेंत. २६. मुखरूपी चंद्राची कांति. २७. कामास.

स्फुरतां भुज [1]वामाक्षि, [2]प्रमुदित असतील सर्व [3]पुरवामाक्षी ! ।
समयीं [4]गोदोहाचे [5]स्वप्नहि सूचक सुलभ [6]संदोहाचें ! ॥ २२
भाग्यें लक्ष्मीसम या [7]स्वोभयकुळमंदिरींचिया [8]मणिसमया, ।
ज्या हरिमुख पाहतिल [9]स्तंभें चित्राकृती तशा राहतिल. ॥ २३
ज्यांचे सुविलास गळा धरितिल, हरि मोहतील [10]महिला सगळा; ।
त्याग कसा करवेल स्त्रींचा [11]यां ? सोडि न तरुचा कर वेल. ॥ २४
हा [12]जन रानट; काय ! स्त्री त्या चतुरा हरी बरा [13]नटकाय. ।
मिळतां नयनां नयन, [14]व्रजपत्यनधीन [15]पुत्रनयनानयन. ॥ २५
[16]अस्मत्प्रेमा अळणी, कीं आम्हीं [17]वनचरी प्रसिद्ध गवळणी; ।
प्रेमा [18]त्यांचा [19]लवणें युक्तचि, लागेल **मा**धवा चालवणें. ॥ २६
प्रिय न वदावे, [20]दारप्राणहर, प्रकट अदय, [21]दावेदार; ।
[22]हे [23]सजती तडक, [24]रिती दाखविति नवीच; गोप [25]तांतडे करिती. ॥ २७
अंधनिजस्थविरहित, दोष असाहा; जन व्रजस्थ विरहित. ।
न जगेचि असें; तरुणी न देखिजे डोळसीं खळीं निष्करुणीं ? ॥ २८
वेष प्रिय [26]सावांचे; रिपु चोरचि हे; [27]वधूजन कसा वांचे ? ।
मानचि कापलि; केला घात खरा, दाखवूनि [28]आपलिकेला. ॥ २९
राक्षस, मानव, [29]धव ते नव्हति; [30]इतरथा [31]स्वदार यां न वधवते. ।
कीं **कं**सपुरा [32]रिपुसे प्राणधना नेति, कांहिं न [33]**मु**रारि पुसे ! ॥ ३०
**अक्रू**रासह साची जायाची सिद्धता कसी सहसाचि ।
केली ? आम्हां तारा ! न निघे हा; **नं**द विचळला म्हातारा. ॥ ३१
न म्हणे [34]बाइल याला कीं, ‘ठेवा **रामकृ**ष्ण’ बाइ ! ‘[35]लयाला ।
व्रज जातो हा;’ नीति त्यजिलि; **य**शोदेसि लाभ जी हानी तीं. ॥ ३२

---

१. डावा डोळा. २. आनंदित. ३. मथुरेंतील स्त्रिया. ४. धार काढण्याच्या. ५. हा शब्द पुल्लिंगी आहे. ६. उत्तम लाभांचा समूह. (या पदाचा संबंध ‘सूचक’ याकडे.) ७. स्व–उभय-कुळ–मंदिरींचिया. ८. रत्नखचित समया. ९. देहभान जाऊन. १०. स्त्रिया. ११. कृष्णास. १२. आम्ही. १३. नटशरीरी. १४. नंदाच्या हातीं नाहीं. १५. पुत्रांस नेणें व आणणें. १६. आ-मची प्रीति. १७. वनांत फिरणाऱ्या, राहणाऱ्या. १८. मथुरेंतील स्त्रियांचा. १९. मिठानें. २०. स्त्रियांचे प्राण हरण करणारे. २१. द्वेषी. (‘दावेदार’ हा आरबी शब्द आहे.) २२. रामकृष्ण. २३. तयार होती. २४. संस्कृतांत हा शब्द ‘रीति’ असा आहे. २५. घाई, त्वरा. २६. प्रमाणिकांचे. २७. स्त्रीजन. २८. मैत्रीला. २९. पति. ३०. नाहीं तर. ३१. स्वस्त्रिया. (हा शब्द पुल्लिंगी आहे.) ३२. शत्रूंसारिखे. ३३. कृष्ण. ३४. यशोदा. ३५. नाशाला.

जरि हृदया [1]त्रासाची [2]झळ झोंबति, राहतीच यात्रा साची. ।
हें निघणें तों, डास [3]व्याळ न घे; विघ्न दाविना तोंडीस! ॥ ३३
[5]मेघसखी देवी जे ती पडती, परि न मति [6]विधी दे वीजे; ।
जरि एखादा मरता, तरि म्हणता, नंद 'विघ्न [7] जाला, परता.' ॥ ३४
जाउं न द्यावा हा, या पथिं लावूं अश्रुच्या नद्या वाहाया; ।
दृढ कास धरुं धिराची; घालुं बरी आण हरिस [8]गलरुधिराची. ॥ ३५
भय न धरा लेश; पथीं वारूं; [9]हरिपाय काय चाले शपथीं? ।
माथा पाय नमुं, रडों; मग तरिहि म्हणेल कृष्ण काय न '[10]मुरंडों?' ॥ ३६
गुरुपितृपतिसुत[11]ऱ्हीतें भूषण म्हणती कुलस्त्रियांस, तऱ्ही, तें ।
दूषण; कीं अंत [12]रतिप्रदपदविरहें; इणें सुखें अंतरती. ॥ ३७
हरि गेल्यावरि, साचें होइल भावंड वडिल पळ [13]वरिसाचें. ।
सरल्या जरि तेल, टिके दीप[14]ाचीं, म्हणति बोलें[15] तरि ते लटिके. ॥ ३८
व्रज [16]विषपाथोराशी होइल; [17]विधु करिल [18]आतपा थोराशी; ।
[19]तापजनक वणवा गे! [20]मारुत, जीवंत मग जन कवण वागे? ॥ ३९
मागावें सखि! [21]तप्ततां, 'देवा! देऊं नको [22]मृतीस, [23]खिन्नपतां;' ।
[24]भाविल [25]विरहानल गे! क्षणक्षणीं मृत्यु; ज्या उशिर हा नलगे. ॥ ४०
सुखकर परि हा [26]रास, स्मरतां, भाजील देह; [27]परिहारास ।
नेणें; त्या गेहिं वसा, जो करिल हरीविणें कसा गे! [28]हिंवसा?' ॥ ४१
ऐसी चिंता ज्या त्या स्त्री जागोजाग करिति भीरू [29]जात्या; ।
अश्रुजळें [30]जंबाला करिति, पहाती व्रजीं न [31]अवलंबाला. ॥ ४२

---

१. भयाची. २. ज्वाला. ३. सर्प. ४. हे निघून जाण्यापूर्वींच आम्हांस सर्पदंश होऊन आम्ही कां मरत नाहीं; अथवा दुसरें एकादें विघ्न येऊन या जाणारांस अपशकुन कां होत नाहीं? इ०. ५. वीज. (मेघाची मैत्रीण.) ६. दैव. ७. हा शब्द पुल्लिंगी आहे. ८. गळ्याच्या रक्ताची. ९. हा समास संस्कृत प्राकृत शब्दांचा आहे. १०. परतून जाऊं या. ११. लज्जेस. १२. कृष्णचरणविरहें. (रति देणारें पद ज्याचें तो, कृष्ण.) इणें=या लज्जेनें. १३. वर्षाचें. (वर्षाहून पळ लांब दिसेल.) १४. दीपतेज. १५. 'तेलावांचून दीपाचें न टिके' हे शब्द. १६. विषसमुद्र. (पाथोराशि=पाण्याच्या राशि, समुद्र). १७. चंद्र. १८. तापास. १९. ताप उत्पन्न करणारा. २०. वायु. २१. ताप प्राप्त झाला असतां. २२. मरणास. २३. दुःखानें झुरत असतांहि. २४. वाटेल, मानला जाईल, सिद्ध होईल. २५. विरहरूपी अग्नि. २६. रासक्रीडा. २७. निवारण. २८. हिंवा(बर्फा)सारिखा. २९. स्वभावतः. ३०. चिखलास. ३१. स्थानास, आधारास.

वदनीं हारावा हे स्त्रीसंहति, तैंदुर अश्रुहारा वाहे; ।
प्रियविरह नको; मळकीं जालीं बहु आननें मनें कोमळ कीं. ॥ ४३
'साधुनियां कां बुकसी स्त्रीवृंदें? रडवितोसि उकसाबुकसी? ।
अक्रूरा! हाहा! रे! तूजपुढें अंतकहि खरा हा हारे. ॥ ४४
तुजि सुखधामा! नेवली कसि फिरलि, जिला जगत्रयी मानवली? ।
जालें खर मृदु धांतें मन जेणें त्या विषत्व जेंवि दुधातें.' ॥ ४५
विरह जळा यादासी हा; तापें लागल्या जळाया दासी; ।
जें नाहीं तेज चिते तें दावी शीतमृदुहि जी सेजचि ते. ॥ ४६
ओष्ठातें वाळविती श्वासें; हरिला परोपरी आळविती; ।
करिती रोदन दीना, कीं पी अक्रूरघटज मोदनदीना. ॥ ४७
तापसमुदयास विता पावे अक्रूरमित्र उदया सविता, ।
भंगुनि आशे, वधिला स्त्रीजन; कीं हरि तदेकसुखशेवधिला. ॥ ४८
प्राणचि हरि रामांचे देह द्विविधौघमूर्त हरिरामाचे; ।
धरि मथुरापथ हा कीं श्वफल्कसुतसूत; विभु म्हणे, 'रथ हाकीं.' ॥ ४९
रथिं वाहुनि चालविलें मूर्तव्रजभाग्य तें, जया पाळविलें. ।
मथुराश्रीनें पदरें, अक्रूरें निर्मळें विगततापदरें. ॥ ५०
पाहुनि नाथरथरया, कांपति विरहें व्रजांगना थरथर या. ।
आत्मा यांचा हरि तो, त्यातें कीं कंसदूत देखत हरितो. ॥ ५१
'जाउनि तो रथ परतो' स्त्रीमनिं हें; कर न दे मनोरथ परं तो; ।
भ्रमती चिंतावर्तामाजि, म्हणे न हरि 'न भय, चिंता; वर्ता.' ॥ ५२

---

१. 'हा!' या दुःखदर्शक शब्दास. २. स्त्रीसमूह. ३. त्यांचें वक्षःस्थल. ४. अश्रूंचा हार. ५. तोंडें. ६. मारिसी. ७. यमहि. ८. सुखाचें स्थान. ९. स्वभाव (पालटला). १०. तीक्ष्ण. ११. तृप्त होतें. १२. जलचरास. १३. स्मशानभूमीतें. १४. थंड व मृदु. १५. बिछाना. १६. रडणें. १७. अक्रूररूपी अगस्ति. १८. आनंदसागरास. (कृष्णास.) (नदी+इन=नदीचा स्वामी, सागर.) १९. अनेक तापांस. २०. उत्पन्नकर्ता. २१. सूर्य. २२. त्यांचा (गोपींचा) सुखनिधि. (कृष्ण.) २२. स्त्रियांचे. २४. दोन मूर्तिमंत देह. २५. कृष्ण व बळराम यांचे. २६. मथुरेचा मार्ग. २७. अक्रूर हा सारथी. श्वफल्क हा अक्रूराचा पिता. याला काशीच्या राजानें आपली कन्या गांदिनी ही दिली होती. तिजपासून याला अक्रूर इत्यादि तेरा पुत्र झाले. २८. प्रभु. २९. गोकुळाचें मूर्तिमंत भाग्य. ३०. खुणेनें बोलाविलें. ३१. मथुरारूपी लक्ष्मीनें. ३२. गेला आहे ताप व भय ज्यापासून. ३३. कृष्णरथाच्या वेगास. ३४. गोपी. ३५. अक्रूर. ३६. हस्त. मनोरथ हात देतो=पूर्ण होतो. ३७. परंतु. ३८. चिंतारूपी भोंवऱ्यांत. ३९. रहा (स्वस्थ).

मागेंमागें दीना चालति; कीं [1]आगमावधि [2]निवेदीना. ।
श्रमहि दिला हो पीनीं[3] [4]वक्षोजीं, परि न मानिला गोपींनीं. ॥ ५३
[5]करुणाब्धि [6]परिवृढ वळे, कीं [7]गोपीप्रेममंदरें मनिं ढवळे. ।
रंजवि मानस यांचें, सादर पाहोनि सबहुमान [8]सयांचें. ॥ ५४
दूतमुखें [9]सामातें करि, 'येइन; कीं प्रिया बहु असा मातें; ।
प्रेम धरा, गे! जावें सदनातें; मजवरी न [10]रागेजावें.' ॥ ५५
सांत्वुनि गेल्यावरि, त्या स्त्री [11]धैर्यस्थैर्यलेश जाल्या वरिल्या. ।
तनु ठाकलि, [12]यानं; मनें हळु चालाया रथा करिति या नमनें. ॥ ५६
प्रार्थिति [13]रथकेतूतें, 'विलोकितां दूर दृष्टि न थके तूतें; ।
दिसतां दूर नदि, सरे तृष्णेचा क्षोभ; धीर धरु मन, दिस रे!' ॥ ५७
[14]गोपजनवधू [15]लीलानरतनुहरिरथसमुत्थनवधूलीला ।
[16]पीति; मन रमे; घाली त्या [17]चातकततिमुखांत ते [18]मेघाली. ॥ ५८
[19]हरिरथपादरजांतें पाहत होत्या दुरूनि सादर ज्यांतें, ।
तींही त्यांसि न दिसती; मग दुस्तर देखती स्वदुःखनदि सती. ॥ ५९
व्यग्र न हो [20]स्वाधीनें गोपीजन, म्हणुनि करुनि [21]तत्स्वाधीनें ।
निज चरितें, हरि मथुरापथ धरि; [22]तद्रुचि वधूहृदय हरि [23]मधुरा. ॥ ६०
लभ्य अनंत तपानें जें [24]कृष्णयशोमृतैकसंततपानें, ।
[25]प्रियविरहाग्नींत, [26]गणें गोपींच्या, देखिलेंचि कांहीं [27]तेंगणें. ॥ ६१
मग जगदीश क्रमुनी पथ, अक्रूरास [28]मज्जनीं, शक्र मुनी ।
ज्या [29]नेते लाख, विभु [30]वनीं यमुनेच्या तें स्वरूप दाखवि [31]भुवनीं.॥ ६२

---

१. येण्याची मर्यादा. २. सांगेना. ३. स्थूल. ४. स्तनीं. ५. करुणासमुद्र. ६. प्रभु. ७. गोपिप्रेमरूपी मंदराचलानें. ८. सख्यांचें. ९. शांति, समजूत. १०. रागें भरावें. ११. धीर व स्थीरता यांचा फार थोडा अंश. १२. गमन. १३. रथाच्या ध्वजातें. १४. गोपस्त्रिया. १५. लीलेनें मानव झालेला जो हरि, त्याच्या रथाखालून उठणारी जी नवी धूळ, तिजला. १६. सादर सेविति. १७. चातकसमूहाच्या तोंडांत. १८. मेघपंक्ति. १९. कृष्णरथाच्या चक्राखालून निघणारे रजःकण. २०. आपण ह्याच कोणी एक आधि (मानसिक दुःख). २१. त्यांच्या (गोपींच्या) स्वाधीन. २२. कृष्णवैभव. २३. 'तद्रुचि' याचें विशेषण. २४. कृष्णाचें यश हेंच कोणी एक अमृत, त्याच्या श्रेष्ठ व नित्य पिण्यानें. २५. कृष्णविरहरूपी अग्नींत. २६. समूहानें. २७. जीवन. २८. स्नानांच्या वेळीं. २९. शरण. ३०. अरण्यांत. ३१. उदकीं.

'होइल हानि खळा[1], या बाळापासूनि केंवि?' हा निखळाया[2] ।
शंकाशंकु[3] अशेष[4], प्रकटी स्वाकार[5] ज्यास मंचक शेष. ॥ ६३
त्रिभुवनभासक[6] लेश स्वजनमनीं धाक नुरवि[7] हा सकलेश[8]; ।
दावि पद समस्त वनीं, ज्याच्या ब्रह्मादि निरंत[9] परम स्तवनीं. ॥ ६४

---

## अध्याय चाळिसावा.

तो अघमर्षणसमयीं[10] अक्रूर बुडे ह्रदीं[11] निजानंदमयीं[12]. ।
प्रेक्षि सदाराध्यातें[13], स्तवि भावें विश्व ज्या उदारा ध्यातें. ॥ १
तें शेषांकावरिलें[14] दावुनि निजरूप मागुतीं आवरिलें. ।
मनिं अक्रूर समजला, 'दे अलिस[15] पदाब्जिचा[16] विभू रस मजला.' ॥ २

---

## अध्याय एकेचाळिसावा.

मग यमुनाडोहातें त्यजि, विभुच्या शीघ्र कंस नाडो हातें ।
म्हणउनि; उत्साहानें मथुरेस बळा[17] सुवर्णवासा[18] हा ने. ॥ १
यमुनोपवनीं[19] टिकले तीचे पाटीरकस्तुरीचे[20] टिकले[21]. ।
सद्भ्रमरा[22] यश वास प्रिय ज्यांचें तदितरास[23] काय शवास! ॥ २
'होतां कंसांत[24],' वनप्रभवाक्ष[25] म्हणे, 'करूनि गुरुसांतवन[26], ।
तव सदना मज कार्यानंतर येणें असे खरें भक्तकार्या[27]! ॥ ३
अक्रूरा! जा गेहीं[28]; संकल्प स्वांतरीं[29] बरा जागे हां[30], ।
न्यावें या यानाहीं[31]; विस्मृति तूझी मदाशया[32] या नाहीं.' ॥ ४

---

१. कंसास. २. उपटून टाकण्यास. ३. शंकारूपी खिळा. ४. समूळ. ५. स्वरूप. ६. त्रैलोक्यप्रकाशक. ७. न उरवि. ८. सर्वश्रेष्ठ. ९. तत्पर. १०. पापविनाशक विधिविशेष. ११. डोहीं. १२. आपल्या आनंदानें भरलेला, त्यांत. १३. सतांस आराध्य, साधूंनीं आराधना करण्यास योग्य असा. (कृष्ण.) १४. शेषाच्या मांडीवरील. १५. भ्रमरास. १६. चरणकमलींचा. १७. बळरामास. १८. कृष्णास. (सुवर्ण आहे वस्त्र ज्याचें.) १९. यमुनेजवळच्या वनांत. २०. चंदन व कस्तूरीचे. (अनुक्रमें बळराम व कृष्ण.) २१. टिळे. २२. सज्जनरूपी भ्रमरास. २३. सद्भ्रमराशिवाय जे इतर ते या वासाविषयीं शववत् (प्रेतासमान), त्यांस काय! २४. कंसमरण. २५. कमलनेत्र. (कृष्ण.) २६. आईबापांस समजावून. सांतवन=सांत्वन. २७. हे भक्तश्रेष्ठा! २८. घरास. २९. माझ्या ध्यानांत. ३०. तुझ्या घरीं येण्याचा. ३१. वाहनामहि. ३२. माझ्या मनास.

[1]सुमहाभागवतन तें साधूंचें नमि शिरें [2]सुभागवत [3]नतें; ।
पावुनि [4]भव्य, वसाया जाय पुरीं, करुनि या [5]शुभव्यवसाया. ॥ ५
[6]सद्धृदयांबुजग दि[7]नव्ययसमयीं [8]शकट उतरवि त्रि[9]जगदिन, ।
गोप[10]बळासह मग, ती मथुरा पाहों निघे [11]गजेंद्रसमगति. ॥ ६
जींत [12]कनकनगरीति [13]प्रासाद [14]अनेकविध असी नगरी ती, ।
[15]कांचनसन्मणिखचितें [16]भवनें; वैभव जगत्त्रयीं [17]अणिखचि तें. ॥ ७
ते [18]यदुवासव तीतें पाहति अमरावतीच्चिया सवतीतें; ।
[19]पुरयौवत [20]अभिरामा कृष्णा [21]सादर विलोकि त्या [22]अभिरामा. ॥ ८
[23]रुचिअवलोकानें [24]वेळधे सदनशिरीं, लाभ युवतिलोक, निवळ घे, ।
ते क्षुधित चकोर सदा प्रभुचंद्रा म्हणति, 'पद पळ टिको [25]रसदा!' ॥ ९
त्यजिल्या [26]महिला भानें तनुच्या; भुलल्या अनंतसुखलाभानें; ।
विसरति [27]भवना; वेधी नयनें मुख; लिगटलीच [28]भवनावे [29]धी. ॥ १०
म्हणती, 'पाय कवळिती ज्याचे उरिं गोपि, लोकनायक वळिती ।
नं[30]दंपशु सुतनु रवि ते हे गे! बळकृष्ण [31]दुःखतिमिर नुरविते!' ॥ ११
प्रभुवरि [32]सुमलाज्यांतें वर्षति पुरयुवति, हर्ष गमला ज्यांतें; ।
द्विजसमुदाय नहाती या अमृतीं; घेवुनी [33]उपायन हातीं. ॥ १२
पूजिति साधु [34]वसुमतीसुर सादर [35]पौरें लोक सो[36]त्सव सुमती. ।
वर्णिति गोपी [37]लपनीं देखति ज्या जागरींहि हरिला सपनीं. ॥ १३
नाशी [38]तम रज कानें पीतां [39]यशसुतीर्थतम, [40]रंजकानें ।
तो महिचा न [41]धणिवर श्रीचा गणिला, न पाहिला हि धणिवर. ॥ १४

---

१. मोठ्या भाग्यशाली उदारधी जनांचें वतन. (कृष्ण.) २. अक्रूर. (परमभगवद्भक्त). ३. नम्र, वांकविलेलें. (हें 'शिरें' याचें विशेषण.) ४. व्हावयाचें, भविष्यकथन. ५. (कृष्णास आणण्याच्या) शुभकृत्यास. ६. साधुहृदयरूपी कमळांत असणारा. (कृष्ण.) ७. अस्तमानीं. ८. गाडा. ९. त्रैलोक्यपति. १०. गोप आणि बळराम यांसह; किंवा गोपसमूहासह. ११. गजश्रेष्ठाच्या सारिखी आहे गति ज्याची. १२. मेरूसारिखे. (कनकनग=मेरु). १३. वाडे. १४. पुष्कळ प्रकारचे. १५. सुवर्ण व श्रेष्ठ रत्नें यांहीं खचित. १६. घरें. १७. निराळें. १८. यादवकुळांतले इंद्र. (बळ व कृष्ण.) १९. पुरस्त्रीसमूह. २०. सुंदरास. २१. आदरपूर्वक. २२. बळराम आहे जवळ ज्याच्या. २३. कांति. २४. चढे. २५. हे अष्टरस देणाऱ्या! २६. स्त्रिया. २७. घरा. २८. संसारनौकेस. (कृष्णास.) २९. बुद्धि. ३०. नंदाचे गोरेख असे हे सुशरीरी सूर्य. ३१. दुःखरूपी अंधार. ३२. पुष्पें व लाह्या. ३३. नजराणा. ३४. ब्राह्मण. ३५. पुरांतील. ३६. आनंदानें. ३७. भाषणीं. ३८. तमोगुण व रजोगुण. ३९. ज्याचें यशोरूपी महातीर्थ. ४०. परिटानें. ४१. स्वामिश्रेष्ठ.

भेटे हरि, परि टाचें[1] पुण्य खळा कंसकिंकरा[2] परिटाचें. ।
मोक्षद[3] याचकरीती[4] मागति वस्त्रें[5]; प्रभू दयाच करीती ! ॥ १५
परि अर्पि न रजक पट, प्रकट वदे शब्द, ज्यांत तम रज कपट. ।
शुभसामग्री[6] वेची म्हणुनि हरि करी छिंदा[7] खलग्रीवेची[8]. ॥ १६
तापहर न तापविता, (रक्षी हरिकर दयाकर[9] नता[10]) पविता[11], ।
धरि जरि जितनीरज[12]; कीं खरें[13] परें[14] भावानुरूप कुजनीं रजकीं. ॥ १७
पडतांचि रजकमाथा[15], पळती तदनुग[16] भिवूनि या उन्माथा[17]. ।
जातां टाकुनि वासें[18], सबळें[19] स्वीकारिलीं त्रिलोकनिवासें. ॥ १८
स्वीकारिति शिशु[20] पगडी, अंगडी, सेलें[21], विजार ते पशुप[22] गडी. ।
धरुनी शोका, पडतें जालें धूळींत टाकिलें कापड तें. ॥ १९
सर्वस्वें निष्कपटी अर्चित[23] विभु[24] जे जगत्रयीं, निष्कपटीं[25] ।
मंडितकाय[26] विशेषें[27] केले मग भक्ततंतुवायविशेषें[28]. ॥ २०
दासा, देव वरद[29], या दे सारूप्यादि[30], करुनि, मुक्ति, वर दया. ।
तरला वायक[31] रीती असि; यास्तव साधु पदक पाय करीती. ॥ २१
माळाकार सुदामा[32] करि पूजन सानुगा[33], समर्पि सुदामा[34] ।
वारि तरी जीव सती हरिची पदभक्ति, सन्मना[35] जी वसती[36]. ॥ २२

---

१. लहान, थोडें. २. कंससेवका. ३. बळ व कृष्ण. ४. भिक्षुकासारिखें. ५. वस्त्रें. ६. पुण्यसामग्री. ७. छेदन. ८. दुष्टाच्या गळ्याची. ९. दया-आकर (=दयेची खाण) किंवा दया-कर (=दया करणारा). १०. शरणागतास. ११. वज्रता. १२. जिंकिलें आहे कमल ज्यानें (स्वसौंदर्यें). १३. उग्र. १४. कृष्ण. १५. परिटाचें शिर. (हा समास एक पद संस्कृत व दुसरें प्राकृत अशा दोन पदांचा केला आहे.) १६. त्याच्या मागून जाणारे, त्याचे सेवक. १७. हननास. १८. वस्त्रें. १९. बळरामासह. २०. मुलें. २१. हा फारसी शब्द आहे. २२. गौळी, गोप. २३. सुशोभित. २४. प्रभु. २५. निष्कपट=अलंकार (निष्क) व वस्त्रें यांहीं. २६. अलंकृत आहेत देह ज्यांचे. २७. शेषरहित, सर्वांगभर. २८. कोणीएक साळवी जातीच्या भक्तानें. (तंतुवाय=साळवी, कोष्टी.) २९. वर देणारा. ३०. सलोकता, सायुज्य आणि समीपता ह्या इतर तीन मुक्ति. ३१. तो साळवी. ३२. नामविशेष. ३३. सेवकांसह (कृष्णास). ३४. पुष्पांच्या उत्तम माला. ३५. साधूंच्या मनास. ३६. स्थान.

## अध्याय बेचाळिसावा.

देवकिकुक्षि[1]ककु[2]ब्जा मित्रा[3], नलिनी[4] नमी सकौतुक कुब्जा[5]; ।
देहीं वक्रा, सरळी मनिं; तीसीं रुचलि गोपेशक्रास[6] रळी[7]. ॥ १
कथि परिपाटी[8]; राज्या द्यायाला नेत होति पाटीरा[9] ज्या, ।
तेणें दे उटि काया, कीं हरि पदिं पद मनास देउ टिकाया. ॥ २
प्रपदावरि[10] ठेवि पदा तीच्या हरि, यन्नतोपरि[11] तुटे विपदा; ।
सुरतरुसंदोहनुतें[12] उजरि[13] करा्ग्रेंचि[14], उचलुनी तो हनुतें. ॥ ३
जाली वरतनु[15], सरली कुदशा[16], कीं स्वर्द्रुसेवना[17] अनुसरली. ।
तींठायीं लवलीला दावी हरि भजनसुकृतवरलवलीला[18]. ॥ ४
क्षितिच्या[19] ठायीं दुसरी न तसि; मुखाची तिच्या करि न इंदु[20] सरी[21]. ।
रूपा करि आवास[22] ब्रह्मपिता, निजकरेंचि भरि आवास[23]. ॥ ५
विभुचा धरुनि पदर ती, मागे प्रमदोत्तमा[24] नमूनि पद, रति. ।
स्मर[25] सूचवि भोग मना; 'स्वगृहासि,' म्हणे, 'करा अजि विभो! गमना.' ॥ ६
नेउं गृहा सेला जे ओढि, न [26]ते, परि हरीच हांसे, लाजे. ।
'सह[27] गोपां दादासीं न गणुनि वरित्ये बळेंचि पादा दासी! ॥ ७
आप्तजनस्वाधी[28] न ध्वंसीं तों मी शुभांगि[29]! न स्वाधीन. ।
तन्मानसकृत्स्नेहा[30] पुरवुनि येईन; करिन असकृत्स्नेहा[31].' ॥ ८
जडलि घना[32] या विजशी; तसि समजाविसि[33] करी मना यावि जशी; ।
प्रीतिचि तो बेडि कसी सोडवि हरि, जी करासि झोंबे डिकसी[34]? ॥ ९

---

१. देवकीची कूस. २. दिशा. (येथें पूर्वदिशा घ्यावी.) ३. सूर्यास. ४. कमळणी. ५. कुब्जा ही कंसाची दासी. ही तीन ठिकाणीं शरीरानें वक्र होती. कृष्ण आणि बळराम ह्यांस ज्या वेळेस धनुर्यागार्थ मथुरेस कंसानें आणविलें तेव्हां कृष्णप्रसादानें ही सरळ झाली. (भागवत—स्कंध १० अध्याय ४२.) ६. गोपेंद्रास. (कृष्णास.) ७. लाड, प्रीति. ८. निरक्रम. ९. चंदनास. १०. आंगठ्याच्या शेवटावर. ११. ज्याच्या शरणागतावर. १२. कल्पतरुसमूहानें (संदोहानें) स्तविलें (नुत) आहे ज्यास. १३. सरळ करी. १४. बोटानेंच. १५. श्रेष्ठ आहे शरीर जीचें. १६. वाईट स्थिति. १७. कल्पतरूचा सेवाविषय (कृष्ण) त्यास. १८. भजनाच्या पुण्याचा जो श्रेष्ठ अंश त्याची लीला. १९. पृथ्वीवर. २०. चंद्र. २१. बरोबरी. २२. स्थान. २३. अंगसौंदर्यास. २४. प्रमदांमध्यें (स्त्रियांमध्यें) उत्तमा, श्रेष्ठा. २५. काम. २६. ती. ('लाजे' या अध्याहृत क्रियापदाचा कर्ता.) २७. हें विशेषण आहे; 'बरोबर असलेल्या' (गोपां इ०). २८. आप्तजनांची (आधि) मानसिक व्यथा, दुःख. २९. हे सुंदरांगि! ३०. त्यांच्या मनांतील सर्व (कृत्स्न) इच्छा (ईहा). ३१. नित्यस्नेहास. (असकृत्=नित्य, वारंवार.) ३२. मेघास. ३३. समजूत. ३४. डिकासारिखी.

[1]स्वसुरधराजनिरोपा, दे [2]सामें तीस, [3]विबुधराज, निरोपा. ।
करि, तारित [4]नत, गमना; स्त्रीच्या, ज्या निरखितां, निघे न तग मना.॥ १०
त्रि[5]भुवननायक बरवा दिसतां, न स्मरति [6]वसन, काय, कंबर, [7]वा. ।
स्त्री चित्राकृति वरिती; हरिमूर्ति मनोहरा खरी क्षितिवरि ती. ॥ ११
पुसुनि जना वि[8]बुधनुतें स्थान, [9]निरखिलें [10]महेंद्रधनुसम धनु तें. ।
जें [11]अर्चित, [12]भोजपतिप्रिय, [13]भट भलत्यासि देति न शिवों, जपती; ॥ १२
तें घेतां, [14]धन्ववनस्थित भट बहु [15]रूक्ष जेंवि [16]मरुधन्ववन; ।
म्हणति, 'शिवुन [17]कोदंडीं मरणें जरि, हरि! तरी भिवुं नको दंडा.' ॥ १३
जरि भुंकिति [18]भटकुतरे, धनुरिक्षुजि[19]घृक्षुपुरुषगजमद [20]नुंतरे; ।
सोडुनि ओझें पावे लघुपण तें उरगिं गरुड जैं झेपावे. ॥ १४
न गणुनि [21]वारण साच, प्रभु घे सज्जुनि, [22]उसास [23]वारणसाच; ।
ओढुनि [24]चापलतेतें, मोडी; साहति न वीर [25]चापलतेतें. ॥ १५
[26]भवतरुमोड करपवी, [27]चित्र न करि धनुलतेस मोड [28]करपवी; ।
[29]सुरदुष्कर दुःसह जें तें जो दावी [30]स्ववीर्य कुतुकें सहजें. ॥ १६
[31]भटजन धाके, तुकडे होतां धनु; धूमपूर्वधा [32]केतुकडे ।
धांवे. आयुध राहे धरुनि पथिं; म्हणे, 'न यांस आयु, धरा हे!'॥ १७
वेदमता पाखंडा, तेंवि प्रभु दाविती प्रतापा; [33]खंडा ।
धनुच्या घेऊनि करें, मारिति वीरांसि, मुक्ति देऊं [34]निकरें. ॥ १८

---

१. स्वभक्तांचा, देवांचा पृथ्वीवर (स्वर्गी) जहालेला बाळवृक्ष=स्वभक्तांचा बाळकल्पवृक्ष. २. सन्मतीनें. ३. देवस्वामी. ४. शरणागत. ५. त्रिभुवनपति. ६. वस्त्र. ७. अथवा. ८. देवांनीं नमिलें आहे ज्यास, त्याणें. ९. पाहिलें. १०. इंद्रधनुष्यासमान. ११. पुजलेलें. १२. कंसास आवडणारें. १३. (रक्षक) वीर. १४. धनुष्याच्या संरक्षणार्थ (अवन) राहिलेले (स्थित). १५. क्रूर, निर्दय, अनार्द्र. १६. मारवाड व धन्व (जळरहित एक दुसरा प्रदेश) यांतील वनासारिखे. १७. धनुष्य. १८. वीररूपी कुत्रे. १९. धनुष्यरूपी उंसाविषयीं भुकेलेल्या पुरुषरूपी (कृष्णरूपी) हत्तीचा मद. 'जिवृक्षु'च्या ठिकाणीं 'जिघृक्षु' असाही एक दुसरा पाठ आहे. २०. न उतरे. २१. निवारण. २२. उच्छ्वास, मोठा दम मारणें, श्वास सोडणें. २३. हत्तीप्रमाणें. (वारण=गज.) २४. धनुष्याच्या दोरीस. २५. चपळपणास. २६. संसाररूपी वृक्षाचा अंकुर. ('भवतरु' संस्कृत आणि 'मोड' प्राकृत असूनही त्यांचा समास केला आहे.) २७. आश्चर्य. २८. हस्त हेंच वज्र आहे ज्यास तो. २९. देवांनीं करण्यासही अशक्य. ३०. स्वशौर्य. ३१. वीरसमूह. ३२. ध्वजाकडे. ३३. तुकड्यास. ३४. समूहानें (=एकदम).

'गमन मनिं जरि, पुसा रे ! पतिचें[१] प्रस्थान,[२]' म्हणति; निजरिपु[३] सारे ।
वधुनि, भुवनहेतु[४] कडे[५] निघती, धनुचे मग त्यजुनि हे तुकडे. ॥ १९
झाले नृपबळ[६] हरितें ऐसे त्रिजगत्पती सकृप बळ हरि ते. ।
हांसे आलेख्या[७] ती नगरी, असि विभु करूनि आले ख्याती. ॥ २०
करि शयना शकटाळीप्रति[८] येउनि; रात्रि दुरितनाशक[९] टाळी[१०]. ।
जीतें[११], 'नृपा ! मरशील,' स्वप्न म्हणति, परि गणी न पामरशील[१२], ॥ २१
शोभा परमा [१३]रंगीं आणवि तो शत्रुमतिनृपरमारंगीं[१४]. ।
लोक वरिति मंच; [१५]रवि प्रकटे, तों तेथ मल्लवर[१६] संचरवी. ॥ २२
शिक्षित[१७] जे ठीक, रणीं बाहूंची दाविणार जेठी[१८] करणी, ।
ते चाणूरादि. [१९]सले हृदयीं हरि; परि बलाढ्य लोकां दिसले ! ॥ २३
मिळती आंटोकाट[२०], 'स्वदृष्टिचा,' म्हणति लोक, 'आटो कांट[२१]; ।
पाहों हरिवळलीला, चातक घनपंक्तिला[२२] जसे वेळलीला[२३].' ॥ २४
गर्जति भेरी[२४], घनसे मल्लहि; सांमंत[२५] किति उभे; रीघ नसे; ।
वरमंचीं[२६] नृप हा या जेठींचें बैसला नियुद्ध[२७] पहाया. ॥ २५
ने तो [२८]स्वोपायन, 'मी नंद' असें कथुनि सांप्त[२९] तो पाय नमी. ।
वार्षिककर[३०] भूधव[३१] घे; मंचीं बैसवि सनाथ[३२] बल्लव[३३] अवघे. ॥ २६
त्यजि कंसा धीर; 'चला' प्राणांहि म्हणे; असा महाधी[३४] रचला. ।
हृदया जरि कातरते चिंतावापीं[३५], न दावि परि कातरते[३६]. ॥ २७

---

## अध्याय त्रेचाळिसावा.

धरुनि मनीं रिपुरोषा[३७], आइकतां मल्लतालदुंदुभिघोषा[३८], ।
बळ हरि, निज[३९]गुण दोषावरि, तैसे जाति; हर्षविति पुरयोषा[४०]. ॥ १

---

१. कंसाचें. २. निघणें (स्वर्गास). ३. शत्रु. ४. जगाचीं कारणें. ५. एक बाजूस. ६. कंससैन्य. ७. चित्रास. ८. गाड्यांच्या रांगेंत. ९. पापनाश करणारा. १०. घालवी. ११. शोभेंत. १२. मूर्ख आहे स्वभाव ज्याचा. १३. सभेंत. १४. कृष्णीं. १५. कृष्ण. १६. मल्लश्रेष्ठ. १७. शिकविलेले. १८. बलिष्ठ, मल्ल. १९. ठुसठुसे. २०. सर्व. २१. इच्छा. २२. मेघपंक्तीला. २३. जवळ आलेलीस. २४. नगारे. २५. एकमेकांस चिकटून. २६. वरमंचीं=उच्चस्थानीं. २७. द्वंद्वयुद्ध. २८. आपण आणलेला नजराणा. (उपायन=नजराणा.) २९. इष्टमित्रांसह. ३०. खंडणी. ३१. पृथ्वीपति. (कंस). ३२. नंदासहित. ३३. गवळी. ३४. मोठें मनोदुःख. ३५. चिंतारूपी नदी. ३६. भयभीतपणा. ३७. शत्रुक्रोधास. ३८. मल्ल, ताल, दुंदुभि (नगारा) यांच्या गर्जनेस. ३९. त्यांचे गुण. ४०. पुरस्त्रिया.

[1]रंगद्वारानिकटीं, ज्याच्या [2]अलि [3]मत्त [4]दानधारांनिं [5]कटीं ।
होता [6]मदनाग; मनीं जाणे हरि त्यासि हेतु '[7]मदनागमनीं.' ॥ २
[8]भवरोगमहामात्रा प्रभुची मूर्तिहि रुचेचि न [9]महामात्रा; ।
[10]प्रेरि हरिवरि [11]करीना [12]गतायु खळ तो; विवेक लेश करीना. ॥ ३
मग [13]बळसिंधु [14]परिकरा बांधी [15]अलकांहि उचलुनी [16]उपरि करा. ।
कृष्ण म्हणे, 'को[17]प[18]रता काढीं, [18]आधोरणा! गजा; हो परता. ॥ ४
गोचर [19]हो यमहाता तुमचा आत्मा; न दूर होय, महाता! ।
आला बळसिंधु; रहा [20]आर्यासन्मुख, न काढिं खळ [21]सिंधुर हा.' ॥ ५
ये समरा [22]शितें दंतीं गज; हरिमन धरि [23]सुवीर्यराशि [24]तद्दंतीं. ।
धांउनि येउनि जवळी, शुंडादंडें [25]निजांतका [26]द्विप कवळी. ॥ ६
दाटति [27]सुरयुवतिगळे; [28]करिहस्तांतुनि [29]तदश्रुबिंदुसह गळे. ।
चूर्णचि करिता डिखळापरि; कोपवि, मुष्टिनेंचि हरि ताडि खळा. ॥ ७
जन करिति नवल, पाला तेंवि रगडितां, पदांत [30]सजव लपाला. ।
भी [31]सुरपुंगवसेना; गज करि बहु यत्न, परि हरी [32]गवसेना. ॥ ८
[33]शुंडाग्रें तो [34]गिवशी गज, ज्यातें न शकती धरूं योगि [35]वशी; ।
तों करुनि बल, हठ, कडे ये; ज्या जिंकिति न निर्मुनि कलह [36]ठकडे. ॥ ९
ओढी हा [37]सेप शुभें हस्तें; [38]सुर होति [39]विवश हासें; [40]पशु [41]भें ।
धरि; शत हस्त खरखरा ने, [42]अहिस जसा [43]खगाधिप प्रखर [44]खरा. ॥ १०

---

१. सभेच्या दरवाज्याजवळ. २. भ्रमर. ३. माजलेले. ४. दानधारांनीं, गंडस्थळांपासून वाहणाऱ्या मदाच्या धारांनीं. (दान=मदोदक.) ५. गंडस्थळीं. ६. या नांवाचा हत्ती. ७. मी न यावें अशासाठीं. ८. संसाररूपी रोगावर महामात्रा. ९. महातास. १०. पाठवी, घाली. ११. गजश्रेष्ठास. १२. आयुष्यहीन. १३. बळसागर. १४. कंबरपट्टा. १५. केसांनीं. १६. वर. १७. क्रोधी. १८. हे महाता! १९. होवो. २०. थोरासमोर. २१. हत्ती. २२. तीक्ष्ण. २३. उत्तम शौर्याचा राशि. २४. तन्मरणीं. २५. आपल्या काळास. २६. हत्ती. (दोन द्वारांनीं म्हणजे शुंडेनें आणि मुखानें पाणी पिणारा.) २७. देवांगनांचे गळे. २८. हत्तीच्या सोंडींतून. २९. इकडे हा गळे; तिकडे (देवांगनांच्या डोळ्यांतून) अश्रु गळति (बंद होती). ३०. वेगानें. ३१. देवेंद्राची सेना, किंवा 'सुरपुंगव'=कृष्ण, त्याची सेना, (बरोबर आलेले गवळी इ०). ३२. सांपडेना. ३३. सोंडीच्या शेवटानें. ३४. खुपसी; टोंची. ३५. इंद्रियांस वश करणारे योगी. ३६. ठक लोक. ३७. शेंपूट. ३८. देव. ३९. खुष. ४०. हत्ती. ४१. भय. ४२. सर्पास. ४३. गरुड. ४४. 'अहिस' याचें विशेषण.

[१]पार्श्वीं एके वळतो, तों [२]इतरीं हरि; गज श्रमे केवळ तो. ।
पाहे न [३]वपुच्छाया; खेळे [४]शिशु काय धरुनि [५]नव पुच्छा या ! ॥ ११
पुच्छ त्यजी; मग जाला सन्मुख, ताडी करें [६]निकाम गजाला. ।
कौतुक दावि [७]पळांत; द्विप धांवे, गांठिलाचि भावि पळांत ! ॥ १२
पळतां सहसा पडला हरि; गज मानी 'भला [८]स्वरिपु सांपडला !' ।
ताडी [९]वरदा, [१०]घातीं तो चुकवी सांपडेचि न [११]रदाघातीं. ॥ १३
झणझणलें [१२]सशिर [१३]कलेवर [१४]रदें भूमींत, चुकुनि हरिस, शिरकले. ।
[१५]मदमत्त असा पडतो तोंडघसीं. ह्यासि सज्जन न सांपडतो. ॥ १४
केला [१६]सोद्यम [१७]हातीं माथा थोपटुनि तो सकोप महातीं, ।
धांवडिला [१८]अंतकसा; परि गज हरिचा करील हा अंत कसा ? ॥ १५
न धरी हरि [१९]खेद मनीं, [२०]मुग्धा भीती, [२१]सुरौघ [२२]हरिखे [२३]दमनीं. ।
कवळुनि, [२४]जितसुर, गाळी द्विप तो मलमूत्र, [२५]करें असा मुरगाळी.॥ १६
पाडी [२६]अवनीवर हा हरि गज कीं, 'तापलासि; निज, नीव, रहा'. ।
[२७]पतित [२८]शिरोपरि चरणें [२९]आक्रमिला, ज्याचिया तरति [३०]परिचरणें. ॥ १७
[३१]दशन [३२]तद्दंता [३३]वलयालंकृतहस्तें हरूनि, [३४]दंतावल या ।
दंडें सुमहामात्र प्रभुनें वधिला; प्रयास न महा [३५]मात्र. ॥ १८
हो न [३६]कुवलया पीडा, म्हणुनि वधी हरि गजा [३७]कुवलयापीडा. ।
कीं [३८]तत्संगीं [३९]केली न बरि; [४०]दलिततनु [४१]धरा [४२]तदंगीं केली. ॥ १९
ऐसा [४३]असदंतकर, [४४]द्विपास्रमदबिंदुचित्रतनु, [४५]दंतकर, ।
[४६]शोणितजंबाल, हरि करी, [४७]करिमथनीं, [४८]बळांबुनिधि, [४९]बालहरी. ॥ २०

---

१. बाजूस. २. दुसऱ्या (बाजूस). ३. शरीराची छाया (कृष्णाच्या). ४. बाळ. ५. नवा, लहान (बाळ). ६. इच्छेस आलें तेवढें. ७. पळण्यामधें (पळून). ८. स्वशत्रु. ९. कृष्णास. १०. मारतेवेळीं. ११. दांतांच्या झपाट्यांत. १२. डोक्यासहित. १३. शरीर. १४. दांत. १५. हा भाग सुभाषितरूप आहे. १६. उद्योगसहित, चपळ, हुषार. १७. 'हातें' असाही पाठ आहे. १८. यमासारिखा. १९. विषाद. २०. अज्ञानी (स्त्रिया). २१. देवसमूह. (सुर + ओघ.) २२. आनंद पावे. २३. निवारणीं. २४. जिंकिलें आहे मुरासुरास ज्याणें तो. (कृष्ण.) २५. सोंड. २६. जमिनीवर. २७. पडलेला. २८. डोक्यावर. २९. (त्यावर) हल्ला केला; चढला. ३०. सेवेनें, भजनें. ३१. दांत. ३२. त्याला मारण्यासाठीं. ३३. आंगठीनें सुशोभित अशा हातानें. ३४. या नांवाचा महात. ३५. किंचित्. ३६. भूगोलास. (कु=पृथ्वी, वलय=गोल.) ३७. हें त्या हत्तीचें नांव. ३८. त्याबरोबर. ३९. क्रीडा. ४०. पिष्टशरीरी. ४१. पृथ्वी. ४२. त्याच्या अवयवांनीं. ४३. दुष्टांचा संहार करणारा. ४४. हत्तीच्या रक्ताच्या व मदाच्या बिंदूंनीं रंगित आहे तनु म्हणजे शरीर ज्याचें असा. (द्विप=हत्ती, अस्र=रक्त, मद=दानोदक, तनु=देह.) ४५. दांत आहे हातांत ज्याच्या असा. ४६. रक्ताचा चिखल. ४७. गजमर्दनीं. ४८. बळाचा समुद्र. ४९. बालसिंह.

**रामहि हरिसम** दांत **स्वीकरि, दुष्टांत** [1]अशनि जो [2]समदांत. ।
गोपांसह [3]सारंगीं सिंह, तसे देव शिरति सहसा [4]रंगीं. ॥ २१
जरिहि [5]चिदेकरसद हा पाहति मल्लादि तेथ लोकरस [6]दहा. ।
धरि नृपमति काळजिला, वाटति ते **रामकृष्ण** निजकाळ [7]जिला. ॥ २२
न रुचे नीचांशि [8]शुची; [9]विप्रमुखा प्रीति **दे**वकीच्या शिशुची; ।
सुख होय बहु भल्याला; जो तो [10]स्तंभादि भूषणें [11]शुभ त्याला. ॥ २३
[12]सुरुचिकरचि दोघांचें जन वर्णिति चरित [13]शुचिकर [14]चिदोघांचें; ।
[15]निजयदु गोकुळहीं; न प्रेम असे जेथ [16]लेश तो कुळहीन[17]. ॥ २४
**चाणूर** वदे वाचा, ऐका हो! **रामकृष्ण**! [18]नरदेवाचा ।
[19]काम [20]नियुद्ध पहाया; कारणहि तुम्हांसि येथ हेंच [21]बाहाया. ॥ २५
राजाज्ञा जन [22]नीतिज्ञांतें पूजिति; सदा [23]प्रजाजननी ती[24]. ।
तुम्ही **हरिबळ** [25]कटकीं गोपांच्या भुजरणीं महा बळकट कीं. ॥ २६
**कृष्ण** म्हणे, 'धन्या या नृपप्रसादा नसे [26]निषेध न्याया; ।
तुष्ट [27]धरापाळक [28]हो; खेळों [29]तुल्यासवें; असों बाळक हो.' ॥ २७
**चाणूर** म्हणे, '[30]**बळ** हा क्रीडो या **मुष्टिका**सवें [31]परबळहा; ।
दिसतां जरि बाळकसे, [32]लोकप्रख्यातशक्ति तरि; बाळ कसे? ॥ २८
त्यजुनि, भय व्रीडा, या आम्हां दोघांजणासह क्रीडाया; ।
मजसीं तूं हरि! भीड; [33]द्विप वधिला [34]दशशतेभबळ तरि भीड!' ॥ २९

---

१. वज्र. २. गर्विष्ठ. (हें 'दुष्टांत' याचें विशेषण.) ३. हत्तीवर किंवा मृगादि पशूंवर. ४. सभेंत. ५. ज्ञानरस देणारा. ६. दहा रस याप्रमाणें वर्णिले आहेत:—'रौद्रोऽद्भुतश्च शृंगारो हास्यं वीरो दया तथा । भयानकश्च बीभत्सः शांतः सप्रेमभक्तिकः ॥;' रौद्र, अद्भुत, शृंगार, हास्य, वीर, दया, भयानक, बीभत्स, शांत, आणि प्रेम. ७. मतीला. ८. कांति. ९. विप्र (ब्राह्मण) आदिकरून लोकांस. १०. स्तब्धता. ११. निर्मळ. १२. फार सुंदर. १३. प्रियकर. १४. ज्ञानाचे ओघच असे जे (बळराम व कृष्ण) त्यांचें. १५. आपले यादव. १६. किंचितहि. १७. हा चरण सुभाषितरूप आहे. १८. कंसाचा. १९. इच्छा. २०. द्वंद्वयुद्ध. २१. बोलाविण्यास. २२. नीति जाणणारे. २३. प्रजेची आई. २४. हा चरण सुभाषितरूप आहे. २५. समूहांत. २६. नकार. २७. कंस. २८. होवो. २९. आमच्या बरोबरीच्या संगतीं. ३०. बळराम. ३१. शत्रुबळनाशक. (पर+बल+हन्.) ३२. लोकांत प्रसिद्ध आहे शक्ति ज्यांची असे. ३३. हत्ती. ३४. सहस्र हत्तींच्या बळाचा. (इभ=हत्ती.)

## अध्याय चव्वेचाळिसावा.

नीतिविरुद्धा लोकीं नृपरीति विनिंदिली[1] नियुद्धालोकीं,[2] ।
'नेणेचि विकल[3] भाचे, विक्रम[4] गणि तुल्य मत्तगजकलभाचे[5] ! ॥ १
लागो न ढका यांला; मल्लांला वश न होत दृढकायांला.[6] ।
रगडवि जळजां[7] उपळें[8] यां खळ;' वदतात, 'सतिळ[9] जळ[10] जाउं पळें.' ॥ २
न नया[11] मान सभा जे दे, जातां तेथ, साधुमानस[12] भाजे.[13] ।
'हानिच, अन्या यांला[14] सिद्धि न; करितो नृपाल अन्यायाला. ॥ ३
वदना घर्मकणवहा[15] यांच्या निरखि[16] न, परंतु धर्म कणव[17] हा. ।
अहह ! नृपा सुकुमारप्रकृति[18] नियुद्धश्रमें पिपासु[19] कुमार.' ॥ ४
जनभाव सकळ कळती प्रभुला, कीं निजजयार्थ बहु कळकळती; ।
क्रीडारस संपविला. **चाणूर** क्षीणशक्तिगति[20] कंपविला. ॥ ५
कळला **हरि** दुःसहसा; मुष्टियुगें[21] ताडि भगवदुर[22] खळ सहसा. ।
भासे लोकां पवि[23] भूधरिं[24] पडला; परि वरी न तो कांप विभू.[25] ॥ ६
सज्जन ज्यास बुक्यांनीं पूजिति, हाणी तया उरास बुक्यांनीं ! ।
त्याचि भुजांसि तदैव[26] प्रभुनें **चाणूर** कवळिला हतदैव;[27] ॥ ७
विनतासुत[28] सापातें, **चाणूरा** फिरवि गरगर तसा; पातें ।
जों नयनीं न लवेचि, द्वेषिपतंगायु[29] **हरिबलानल**[30] वेंचि. ॥ ८
आफळि भूवरि हातें; कौतुक दावी जनासि **हरि** अरिहा[31] तें; ।
इंद्रध्वजसा[32] पडला; वांचे अहि[33] काय खगपतिस[34] सांपडला ? ॥ ९

---

१. फार दोषिली. २. 'नियुद्ध आलोकीं'=द्वंद्वयुद्ध पाहतांना. ३. कलाहीन. ४. पराक्रम. ५. माजलेल्या बाळहत्तीचे. (कलभ=हत्तीचा छावा.) ६. दृढ (बळकट) आहेत काय (देह) ज्यांचे अशा (मल्लांला). ७. कमलांस. (जळांत उत्पन्न झालेल्यांस.) ८. दगडानें. ९. तिलांजलिसह. १०. पाणी. 'सतिल पाणी जावो'=तो मरो. ११. न्यायास. १२. साधूंचें मन. १३. हें अर्ध सुभाषितरूप आहे. १४. कंसाला. १५. घामाचे कण (थेंब) आहेत ज्यावर अशा (वदना). १६. पाहे. १७. दया. १८. अत्यंत कोमळ आहेत देह ज्यांचे असे. १९. तृषित. २०. क्षीण आहे शक्तीची गति ज्याच्या. २१. दोन मुष्टींनीं. २२. कृष्णहृदय. (भगवत्+उर.) २३. वज्र. ('पवि'शब्द संस्कृतांत पुल्लिंगी आहे.) २४. पर्वतीं. २५. कृष्ण. २६. त्याच. २७. दैवहीन. २८. गरुड. २९ शत्रुरूपी पतंगाचें आयुष्य. ३०. कृष्णबळ हेच अग्नि. (अनल=अग्नि.) ३१. शत्रूस मारणारा. (अरि+हन्.) ३२. इंद्राच्या ध्वजासारिखा. ३३. सर्प. ३४. गरुडास. हा भाग सुभाषितरूप आहे.

मुष्टिकमद[1] या रामें हरिला सहजात साधुहृदयारामें[2]; ।
वधिला रंगांत[3] तळें[4]; भरिलें रक्तें तदंगभंगांत[5] तळें. ॥ १०
काळपदोत्तरकूट[6] क्रूर तसा उसळला बळावर[7] कूट[8]; ।
विंध्यधराधरकूटप्रतिभट[9] ये निकट; मूर्त[10] दुर्धर कूट[11]. ॥ ११
कूटअचळ तोडावा, हें मनिं येतांचि, राममुज तो डावा ।
कृतमुष्टि मिरवि पविता, रिपु हृन्नयनीं बळेंचि तिमिर विपविता. ॥ १२
शल तो शलक हरीनें वधिले कुतुकें, गजेंद्र जेंवि हरीनें[12]. ।
उरले मल्ल न तगती, पळति, न जाणोनि देवदेवनतगति[13]. ॥ १३
जयिं बळदेव हरि खलाग्रेसरवधलब्धविजय[14], लोक हरिखला[15]; ।
प्रभुभुजविक्रमसूर्यें[16] अरितम[17] गिळिलें, म्हणोनि गर्जति तूर्यें[18]. ॥ १४
जे गोपसखे दास क्रीडति त्यांसीं, सुरारिस सखेदास[19] ।
अति दुःसह; तो सेनामल्लबलक्षय[20] समक्ष बहु सोसेना. ॥ १५
वध करितिल हें मनिं भें[21], परि नेत्रें फिरवि तप्ततरहेमनिभें[22]; ।
तूर्यें वारूनि करें, बोले तो लेखरिपु[23] शरारू[24] निकरें[25]. ॥ १६
'उद्वृत्तचि[26] हे कपिसे[27] वसुदेवात्मज[28] अनादृतविवेक[29] पिसे; ।
घाला बाहिर, नगरीं न वसोत क्षणहि; इष्ट संनिधि[30] न गिरीं[31]. ॥ १७
जालें पुष्कळ जवळी द्रव्य म्हणुनि फार माजले खळ गवळी. ।
व्यसन[32] करुनि वांचविलें, वित्तें[33] हरा तें असेल जें सांचविलें. ॥ १८
बांधा नंदा निबरा[34], गोपांनीं मानिला सुमंदांनिं बरा. ।
योग्य न मोकळिकेला दुर्मति हा; या खळेंचि हो कळि[35] केला. ॥ १९

---

१. मुष्टिकाचा गर्व. २. साधूंच्या हृदयास आल्हादकारक असा जो (बळराम) त्याणें. ३. सभेंत. ४. हाताच्या तळव्यानें. ५. त्याचें आंगाचें मर्दन करितेवेळेस. ६. 'काळ' या पदाच्या मागून 'कूट' हें पद जोडिलें असतां जो शब्द होतो त्याचा जो अर्थ तसा; म्हणजे 'काळकूट = विष. ७. बळरामावर. ८. या नांवाचा मल्ल. ९. विंध्याद्रीच्या शिखराएवढा उंच व शूर. १०. मूर्तिमान्. ११. कपट. १२. सिंहानें. १३. देवश्रेष्ठ व शरणागतांची गतिच. (कृष्ण.) १४. दुष्टांतील मुख्यांस मारिल्यानें जय मिळाला आहे ज्यांस. १५. आनंदला. १६. प्रभुभुजाच्या पराक्रमरूपी सूर्यानें. १७. शत्रुरूपी अंधार. १८. वाद्यें. १९. खेदयुक्त असुरास. (कंसास.) २०. सेना व मल्ल यांच्या समूहाचा क्षय. २१. भय. २२. फार तापलेल्या सुवर्णासारखीं (नेत्रें.) २३. देवशत्रु. (लेख=देव.) २४. पापी, अपायकारक. २५. अनर्थानें. २६. उन्मत्त, उद्धत. २७ वानरांसारखे. २८. वसुदेवाचे मुलगे. ९२. विवेकाचा अनादर केला (टाकिला) आहे ज्यांणीं. ३०. जवळपणा; सांनिध्य. ३१ विषीं. हा चरणांश सुभाषितरूप आहे. ३२. पातक. ३३. द्रव्य. ३४. उग्रास, वृद्धास. ३५. कज्जा.

आझुनि कां न वधा रे! [1]शौरिस? खड्गाच्रिया धुवा नव धारे. ।
वधुनि, करा हित साची आज्ञा हे, मुख्य शत्रु, [2]बाहि तसाचि'. ॥ २०
कंसा दुष्टा [3]कुपिता वाटे वसुदेव शत्रु सुपिता [4]कुपिता. ।
न शिवति संत [5]तमा जे, त्यांसि म्हणे, 'हेचि [6]अहित संतत माजे.' ॥ २१
गुरुलंघन हानि, सरे [7]आयु जिणें; नृप पदींहुनी हा निसरे. ।
होइल विपरीत मतें [8]भद्र कसें? ज्ञान दाखवि, परी [9]तम तें. ॥ २२
[10]दुरुदित नायकवेचि [11]क्षांतिधनकण त्रि[12]लोकनायक वेची; ।
[13]हरिसाच टिके, [14]वळघे मंचीं; कीं कोप चित्त हटि केवळ घे. ॥ २३
म्हणती, 'मर, पड!' ताळी वाहुनि, [15]सुरें, कंस जैं [16]असी [17]पडताळी. ।
'कोण म्हणे मातुळ त्या [18]व्याघ्रवृकासींहि न [19]जगदधमा [20]तुळल्या?' ॥ २४
[21]केसरिमथना गजसा हरिवरि ये कंस; [22]खगवरीं [23]नाग जसा. ।
धरिला, परि [24]अव [25]रितां पडला; कीं [26]विमुख [27]विधि [28]धृतिस आवरिता.॥ २५
[29]खड्गवरा नागविया धरुनि उभा, परि हरी खळा नागवि या. ।
कवळुनि केश, वनींच्या तरुपरि रंगांत लोटि केशव नीचा. ॥ २६
वरुनि रिपू ढकलीला न उठे, जो [30]पतित कंस मूढ [31]कलीला. ।
वरि पडला [32]शतकोटिब्रह्मांडाश्रय, [33]नगीं जसा [34]शतकोटि. ॥ २७
हरिभारें [35]असुजाती दडपे, रंगांत तत्क्षणीं [36]असु जाती. ।
विक्रम तो ढिग जाला क्षितिवरि त्या सिंह जेंवि ओढि गजाला. ॥ २८
खळ वधितां हा [37]हेतीविण, शब्द उठे [38]जनाननीं '[39]हाहेति.' ।
म्हणती, '[40]मावळि याला रविला, [41]अस्ताद्रिकृष्ण, [42]मावळियाला.' ॥ २९

---

१. वसुदेवास. २. बापहि. (उग्रसेनसुद्धां वधून इ०). ३. कोपिष्टास. ४ दुष्ट बाप. (चांगला असतांहि वाईट वाटे इ०.) ५. अज्ञानास. ६. शत्रु. ७. आयुष्य. ८. कल्याण. ९. अज्ञान. १०. दुर्भाषण. (दुर्+उदित.) ११. क्षमारूपी द्रव्याचा कण. १२. कृष्ण. १३ सिंहासारखा. १४. चढे. १५. देव. १६. तरवार. १७. हातांत तयार धरी; हालवी. १८. वाघ व लांडगा यांसीं. १९. लोकांत पातकी. २०. तुलना पावणाऱ्यांस. २१. सिंहवध करण्यासाठीं. २२. गरुडावर. २३. सर्प. २४. अवसान. २५. रिकामा. २६. प्रतिकूल. २७. दैव. २८. धैर्यास. २९. खड्गश्रेष्ठाला. ३०. पडलेला, पातकी. ३१. कज्जाला. ३२. शतकोटी ब्रह्मांडांचा आश्रय. (कृष्ण.) ३३. पर्वतावर. ३४. वज्र. ३५. अ-सुजाति, सु नाहीं जाति ज्याची, दुर्जन्मा. ३६. प्राण. ३७. शस्त्राविण. ३८. लोकांच्या तोंडीं. ३९. हा हा इति, हा! हा! या प्रकारचा. ४०. मावळे असें करी. ४१, कृष्णरूपी अस्ताचल. ४२. मावळ्यास.

धाकें [1]अशनीं, [2]शयनीं, [3]पानीं, [4]यानीं, वनीं, जनीं, मनिं, नयनीं, ।
हरि पाहे [5]पर; मरणीं होय हरिच; वरि [6]अरीहि गति परम रणीं! ॥ ३०
[7]कंकाद्यष्ट अनुजनीं निरखुनि रंगीं [8]व्यसु [9]स्वबंधुतनु जनीं, ।
[10]अनृण्यार्थ, उसपिती [11]असिअहि, [12]रिपुरक्त जे, धरुनि हउस, पिती. ॥ ३१
फेडाया स्नेहरिण भ्रात्याचें धांवलेचि, परि ते हरिण; ।
[13]यदुसिंहें बळभद्रें देखिलिया, केंवि तगति असु, बळ, [14]भद्रें? ॥ ३२
उठले [15]समरा; माजे कलह; न जाणति [16]कृतांतसम [17]रामा जे. ।
[18]बळदहनीं [19]शलभांनीं पडिजेलें त्या [20]विनष्टकौशलभानीं. ॥ ३३
[21]सानुज कंस खपविला जेणें, [22]त्यां स्तवि, न त्या [23]शचीसख, [24]पविला; ।
येउनि [25]आशु, [26]भवादि [27]त्रिदश करिति पुष्पवृष्टिला [28]शुभवादी. ॥ ३४
अवकाश गगनिं [29]रसितीं [30]स्वर्भेरीच्या उरेचि न मग [31]निरसितीं; ।
[32]संसृतिचीं [33]वरदयशें गाती गंधर्व [34]तद्वधूससमुदय [35]शें. ॥ ३५
भोजेंद्र[36]रसावरजा मारी [37]साग्रजजगत्पती [38]सावरजा; ।
करिति [39]चिर विलापा [40]तद्दार; म्हणति, ‘जाहलाचि रविला [41]पात! ॥ ३६
मन जरि [42]नाका जाया उत्कंठित, यार सोडिना कां [43]जाया? ।
त्यजुनि स्त्री [44]वसु जाणें केलें कां कठिन करुनि जीव सुजाणें? ॥ ३७
हें [45]अघ बहुविध; ‘वांचा,’ प्राण म्हणति, घात करिति बहु विधवांचा; ।
जाचिति हे [46]हितरिपुसे; आम्हा मृत्यु न, जरि स्तवूंहि तरि, पुसे! ॥ ३८

---

१. खाण्यांत. २. निजेंत. ३. पिण्यांत, पीतेवेळीं. ४. गमनीं. ५. शत्रु. (कंस.) ६. शत्रुहि. ७. कंक, शंकु, राष्ट्रपाल, सुहू, सृष्टि, तुष्टिमान्, इत्यादि आठ धाकटे बंधु. ८. गतप्राण. ९. आपल्या बंधूचें शरीर. १०. उपकाररूपी ऋण फेडण्याकरितां. ११. तरवाररूपी सर्प. १२. शत्रूचें रक्त. १३. कृष्णें. १४. प्राण सामर्थ्य व कल्याण हीं. १५. युद्धास. १६. यमासारखा. १७. बळरामा. १८ बळरामरूपी अग्नींत. १९. टोळांनीं. २०. नष्ट जाहलें आहे कौशल व भान ज्यांचें असे जे त्यांनीं. २१. बंधूंसह. २२. कृष्णास. २३. इंद्र. शची आहे सखा (मित्र) ज्याची तो. २४. वज्रास. २५. लौकर. २६. सांबादि. २७. देव. २८. शुभ बोलणारे. २९. नादांनीं. ३०. स्वर्गीच्या नगाऱ्याच्या. ३१. फेकलेल्यांनीं. (‘रसितीं’ याचें विशेषण.) ३२. संसाराचीं. ३३. कृष्णयशें. ३४. स्वस्त्रियांच्या समूहासह. ३५. शेंकडो. ३६. भोजकुळाचा राजा उग्रसेन त्याच्या पुत्रास (कंसास). (रसावर=राजा.) ३७. बळरामासह. ३८. बंधूंसह. (‘भोजेंद्ररसावरजा’ याचें विशेषण. अवरज=धाकटा बंधु.) ३९. फार वेळपर्यंत. ४०. त्याची बायको; किंवा बायका. ४१. पतन. ४२. स्वर्गास. ४३. स्त्री. ४४. द्रव्य, संपत्ति. ४५. पातक. ४६. हितशत्रु; हित सांगून नाश करणारे.

छाया कसि [1]तग तरुची धरिल तरुविणें? पुरीसहित [2]विगतरुचि ।
जालों तुजवांचोनी; [3]अवलंबावा [4]विलापभुज वांचोनी ! ॥ ३९
स्त्री, जैशा [5]अपरिचिता त्यजिल्या; [6]शय्याचि होति याउपरि [7]चिता ! ।
मृत्यु गमे रुसवा. हे [8]भीरुमती केंवि [9]शोकमेरुस वाहे ? ॥ ४०
न सुखकर क्षण [10]भूतें जालासि, न पावलींच रक्षण [11]भूतें; ।
[12]सुकृततरुफळदशेतें भोगिसि; [13]बीजानुरूपचि फळद शेतें ! ॥ ४१
[14]प्रस्थानीं [15]धवें पुसती, सात्विति; हीं स्मरति तूज न [16]स्ववपु सती. ।
नेले भाउचि; तगती न [17]तदसु; हे स्त्रीस वल्लभा ! उचित गति !' ॥ ४२
'हानि [18]असीमा मीचि'; 'व्यथा हरूं' हरि म्हणे, 'असी मामींची;' ।
योजुनि सामा वळणी आणी त्या [19]विकळमानसा [20]मावळणी. ॥ ४३
मृतसंस्कार करवितो [21]सद्रतिनलिनिप्रबोधकारकरवि तो ।
[22]आप्तसदाचा; राशी करुणेचा, त्यजिल कां [23]सदाचाराशी ? ॥ ४४
पितरांच्या [24]भवनिगडासह तोडी देव दीनबांधव [25]निगडा; ।
पुत्र [26]चिदुदधी नमनें करिति [27]गुरुपदीं लवोनि [28]मुदधीन मनें. ॥ ४५
'[29]यन्माया विश्व रची ते हे, न स्वसुत मनुज, जगदीश्वरचि,' ।
ऐसें जाणुनि पितरें भेटति, न [30]स्वांत होय शंकित भितरें. ॥ ४६
कळवी [31]संयुगलीलातत्व म्हणुनि [32]जोडिति [33]स्वकरयुगलीला. ।
श्रम न मनांमधिल टिके. [34]तमें हरितिल न, तरि [35]दिव्यधामधि लटिके. ॥ ४७

---

१. टिकाव, जगणें. २. तेजोहीन. (रुचि=तेज, कांति.) ३. आश्रय करावा. ४. शोकाचा भुज. ५. अनोळखी. ६. बिछाने. ७. स्मशानभूमि. ८. भ्यालेली मति. ९. शोकरूपी मेरुपर्वतास. १०. पृथ्वीतें. ११. प्राणी, प्रजा. १२. पुण्यरूपी वृक्षाचें फळच अशी अवस्था. १३. हा भाग सुभाषितरूप आहे. १४. बाहेर जातांना. १५. नवरे. १६. आपलें शरीर. १७. त्यांचे प्राण. १८. अमर्याद. १९. कलाहीन आहेत मानसें ज्यांचीं. २०. मामी. २१. सद्गतिरूपी कमळणीस प्रबोधकारक (जागी करणारा.) सूर्य. २२. आप्तसमूहाचा (संस्कार). २३. सत् आचारासी. २४. संसाररूपी बिड्यांसह. २५. बिड्या. २६. ज्ञानसागर. २७. वडिलांच्या पायीं. २८. आनंदाच्या स्वाधीन. ('मनें' याचें विशेषण.) २९. ज्याची माया. ३०. मन. ३१. युद्धलीलेचें तत्व, कारण. ३२. याचा कर्ता 'पितरें.' ३३. दोनहि हातांस. ३४. अज्ञान. ३५. दिव्यधामकोश.

## अध्याय पंचेचाळिसावा.

स्वार्थी तो टाकविजे होऊं देती न म्हणति तोटा कवि जे ।
निजपरहित साधूनी स्वस्थ तरि न निर्मिले जना साधूनी. ॥ १
'न सुतसुखरुचिद[1], धिग मी !' कृष्ण म्हणे, 'नाडिलेचि गुरु चिदधिगमीं[2].' ।
'हा योग्य नसे उमज क्षण, याचें पुत्र म्हणुनि, मन सेउ मज. ॥ २
तात सदार[3] समीहा[4] हेचि धरूं इच्छितो; सदा रस मी हा ! ।
पुत्रप्रेमचि शुभ[5] तें, दुर्लभ लोकीं जसें सुरभिचें[6] दुभतें. ॥ ३
वंदिल माथां बातें[7] ज्ञान; स्मरतां यदूत्तमा[8], 'थांबा,' तें. ।
न म्हणत, सन्नत[9] यातें[10] होइल हें[11] वशचि, मी प्रसन्न तयातें.' ॥ ४
करुनि विचार असा, या पितरीं, मायेसि करि निदेश[12] असाया; ।
कीं, 'पुत्रप्रेमातें धरुनी, सेवुत सुखांबुधी[13] ते मातें.' ॥ ५
दुःखशमन मायेनें[14], पितरांचें, करुनि विवश[15]मन मायेनें[16], ।
बोले मोहकरीती; ते शब्द मुदब्द[17], हरिति मोह, करीती. ॥ ६
'हे अंब ! अहो तात ! क्लेश असे या मनास बहु होतात; ।
येउनि भवदुदरातें[18] सुख न दिलें लेश हरुनि शत्रुदरातें[19]. ॥ ७
चिंता या वाळविला[20] पाळूनि तुम्ही स्वदेहतरु[21] वाळविला[22]. ।
पाश गळां तो कांचे[23]; वध अनुभविले सुदुर्बळा[24] तोकांचे[25] ! ॥ ८
नाहीं आबाल[26], पण स्वसुताचें पाहिलें नसां बाळपण; ।
अमृत जयांत अनुभवी[27] सुरदुर्लभ[28] पावती कृतार्थजनु[29] भवी[30]. ॥ ९
आम्हीं दैवहतांनीं निज[31]पितृगृहवास बहुसुखावह, तानीं ।
ज्यांत सुरभवन[32] वसुधा[33] गणिति, न तो पाहिला, जयांत नव सुधा[34]. ॥ १०

---

१. पुत्रसुखाची रुचि देणारा. २. चिद्प्राप्तीविषयीं. ३. स्त्रीसह. ४. सुबुद्धि. ५. कल्याण. ६. कामधेनूचें. ७. वसुदेवास. ८. मजला. ९. नम्र. १०. वसुदेवातें. ११. ज्ञान. १२. आज्ञा. १३. सुखसागरास. १४. ममतेनें, भक्तीनें. १५. अस्वाधीन. १६. मोहानें. १७. सुखाचे मेघ. (मुद् + अब्द) १८. तुझ्या कुसीस. १९. शत्रुभयास. २०. लांकूड इ० पोखरणारे एक प्रकारचे प्राणी. २१. निजदेहरूपी झाड. २२. सुकविला, शुष्क केला. २३. जाचे, झोंबे. २४. बळहीनाचे. २५. मुलांचें. २६. विपत्ति. २७. अनुभव घेतलेले. ('भवी' याचें विशेषण.) २८. देवांसहि अलभ्य. २९. कृतकृत्य आहे जन्म ज्यांचें. ३०. संसारांत असलेले प्राणी. ३१. आपल्या आईबापांच्या घरीं राहणें. ३२. देवलोक. ३३. पृथ्वी. ३४. अमृत.

[1]सकळार्थदकृतिकायप्रदपितरांची फिटेल [2]उपकृति [3]काय? ।
ज्याला चिंतुनि [4]गमजे त्यजिति [5]विषयिकामपूरकस्वरगम जे. ॥ ११
[6]शुश्रूष, भला, भजनीं रत पितरांच्या, तयासि शुभ [7]लाभ जनीं. ।
ऋण न फिटे परिसाचें [8]हेम कसें होय हो! [9]अनृण परि, [10]सांचें? ॥ १२
पुत्र [11]समर्थ न देहें [12]वित्तें पितरांसि [13]जीविकेसि न दे, हें ।
[14]अघ, त्या ने [15]अध; [16]मांस [17]स्वीयचि खाणे पडे पुढें अधमास. ॥ १३
हें कंसा राज्याचें करणें, भय मानि लोक सारा ज्याचें; ।
[18]सुहृदांच्या [19]अंतररतें भूपें पडलें, क्षमा करा, अंतर तें. ॥ १४
[20]पोष्यजनासि न पोषी, जीवंतहि तो असोनियां [21]शव दोषी. ।
आम्हां घडलें कांहीं न भजन; दिधलें न सुख उघड लेंकांहीं.' ॥ १५
तीं परम गभीर हितें [22]प्रभुवागमृतें पिऊनि मग [23]भीरहितें ।
हृदयें, [24]डिंभें द्रवती मानुनि, दोघें [25]विभूक्ति असि [26]भद्रवती. ॥ १६
वाटति [27]कायज; नातें हें मोहक ठाउकें न काय जनातें? ।
[28]अंकीं स्थापुनि, [29]शिशिरीं वर्षति नेत्रोदकीं [30]स्वसुखराशिशिरीं. ॥ १७
[31]जननीजनकमनीं या भरल्या [32]सुखसिंधुमूर्ति [33]जनकमनीया. ।
[34]तनुजयुग [35]अमृतसर तें; [36]तापत्रय जाहलेंचि देखत सरतें. ॥ १८
पूज्य सदा जो [37]बाला, करि यदुनृप उग्रसेन आजोबाला. ।
'करुं पद भजना तूतें उचित' म्हणे हरि, '[38]अभीष्ट मज नातूतें. ॥ १९

---

१. सर्व अर्थ देणारी कृति आहे ज्याची असा जो देह, तो देह देणारीं जी पितरें, त्यांची (उपकृति.) २. उपकार. ३. हें अर्ध सुभाषितरूप आहे. ४. हावभाव, डौल. ५. विषयी लोकांची इच्छा पुरविणारे कल्पतरु. (स्वर्गांतील अगम=वृक्ष.) ६. सेवा करणारा. ७. कल्याणाचा लाभ. ८. सुवर्ण. ९. ऋण न फेडलेलें. १०. मुक्त. ११. द्रव्यवान्, शक्तिमान्. १२. द्रव्यानें. १३. उपजीविका. १४. पातक. १५. खालीं, अधोगतीस. १६. मांस. १७. आपलेंच. १८. आप्तांच्या. १९. नाशाविषयीं रत; तत्पर असा जो 'भूप' त्याच्या योगानें इ०. २०. पाळण करण्यास योग्य. २१. प्रेत. हें अर्ध सुभाषितरूप आहे. २२. कृष्णाचीं वचनें हींच अमृतें. २३. निर्भय. २४. मुलगे. २५. कृष्णाचें वचन. २६. कल्याणकारक, शुभ; योग्य. २७. मुलगे असे. २८. मांडीवर. २९. शीतल अशा. ३०. आपल्या सुखाचे राशि असे जे बळ व कृष्ण त्यांच्या शिरावर. ३१. आईबापांच्या मनांत. ३२. सुखसागराच्या मूर्ति. ३३. जनांत सुंदर. (कमनीय=सुंदर.) ३४. दोन मुलगे. ३५. अमृताचें तळें. २६. पृष्ठ ७० टीप १४ पहा. २७. बापाला. (वसुदेवाला.) ३८. इच्छित.

मी तव किंकर[1]; भारा वाहिन; देतील नमुनि सुर करभारा[2]; ।
योग्य विमानवरा[3] जे ते भजतिल; मग न केंवि मानवराजे[4]?' ॥ २०
मग आणवि वरदेश[5] स्वजना, ज्यां नृपभयें दिला परदेश; ।
त्यांस वदे, वसुधा[6], 'मी तुमचा,' दे द्रव्य, वसवि, देव सुधामीं[7]. ॥ २१
अमृतरससुखें[8] दुभले[9] स्वजनचकोरीं[10] बळाच्युतमुखेंदु[11] भले; ।
ताप न लेश तशांचे उरति कुभूपातपें[12] दिले शतशांचें. ॥ २२
हरि रीती दावि नवी; प्रांजलि[13] साग्रज[14] सबाष्प[15] नंदा विनवी, ।
कीं तो बा पहिला; जे वत्सलता, तीस शौरि बापहि लाजे. ॥ २३
'करुणासरिदोघानीं[16] तात! तुम्ही वृद्धभाव परि, दोघांनीं ।
आधि[17] अजी! वाहूनी, प्रिय केलें रक्षुनि स्वजीवाहूनि. ॥ २४
स्वमुखें बोलाल न तें रक्षण, पोषप्रकार तो, लालन तें, ।
नित्यनिरवधिक[18] तो कीं प्रेमा, आत्म्यापरीसहि अधिक तोकीं[19]! ॥ २५
रक्षाक्षम[20] निज जन; कीं नृपभीत[21] त्यागिलेहि जननीजनकीं. ।
आम्हां बाळां अवनीवरि[22] पितर तुम्ही च पोषणीं पटु[23] अवनीं[24]. ॥ २६
तुमची दृष्टि नवि सरे[25] प्रेमघनाची[26], तिचा पडेल न विसर. ।
अमृताचें अनव[27] सरें[28] त्वद्गृह[29] या; यांन[30] तेथ मज अनवसर[31]. ॥ २७
कंसें चित्त दुखविलें सुहृदांचें; म्यां न तें यथेष्ट[32] सुखविलें. ।
इष्टरसद[33] या लोकां होइन, तुमच्याहि पात्र सदयालोकां[34]. ॥ २८
न करिं विलंबा बा! जे मत्प्राणा[35] ते न धरु मंदंबा[36] बाजे[37]. ।
पदमुदुदधि[38] देखाया येइन; मागेन साय, दधि; दे खाया! ॥ २९

---

१. दास. २. खंडणी. ३. श्रेष्ठ विमानास. ४. भूप. ५. कृष्ण. ६. पृथ्वी, जमीन. ७. उत्तम घरांत. ८. अमृतरसासमान सुखें. ९. प्रसवले, देते जहाले. १०. आप्तलोकरूपी चकोरांस. ११. बळराम व कृष्ण यांचीं मुखें हेच चंद्र. १२. कंसरूपी सूर्यानें. १३. हात जोडून. १४. बळरामासह. १५. डोळ्यांत अश्रु आले आहेत असा. १६. करुणारूपी नद्यांच्या ओघांनीं. १७. मनोव्यथा, कष्ट. १८. नेहमी व अमर्याद. १९. बाळकीं. २०. रक्षण करण्यास योग्य. २१. कंसास भ्यालेल्या. २२. पृथ्वीवर. २३. कुशल. २४. रक्षणीं. २५. वृष्टि. (पावसाचें आगमन.) २६. प्रीतिरूपी मेघाची. २७. फार दिवसांचें. २८. तळें. २९. तुझें घर. ३०. गमन. ३१. अकाळचें, अनियमित. (अन् + अवसर.) ३२. मनासारिखें. ३३. इच्छित सुख देणारे. ३४. सदय अशा अवलोकनांस. ३५. मम प्राणरूपी असी जी. ३६. माझी आई. ३७. मंचकास; 'बाजेस धरणें' म्हणजे विरहानें अस्वस्थ होऊन बिछान्यावर पडून राहणें. ३८. आनंदसागर.

‘मेला, मारक राजा; निज गोत्रत्सांसि [1]आकुमार करा, जा,’ ।
म्हणतो राम, ‘जतन या; हेंचि मनीं याचि, द्या वरा मज तनया.’ ॥ ३०
ऐसी [2]सांत्वनवाणी हरि बोले, जींत मधुरतेसि न [3]वाणी. ।
[4]भोजकुलकलंकारी स्वपित्यासह [5]बल्लवांसिहि अलंकारी. ॥ ३१
जें कां कांसें, पितळ स्वच्छ तयांचीं [6]सुरम्य पात्रें नितळ, ।
कांति जयांवरि झळके ऐसीं दे बहु; न ज्यांत [7]गोरस काळके. ॥ ३२
[8]नंद, ‘स्वसुखा या मी पुसों,’ म्हणे ये परंतु न मुखा ‘[9]यामी;’ ।
वाट फुटे कशि? रोधी वाणी ते [10]शोकबाष्परुद्धशिरोधी. ॥ ३३
देतां [11]परिरंभ, गळे दाटति; नेत्रांतुनीहि [12]अमुदंभ गळे. ।
नंदादि [13]अनघ राशी दुःखाचे वरिति; जाय न मन घराशी! ॥ ३४
[14]कृष्णसुखनिधी राहे; विरहें धरिती न गोप मनिं धीरा हे. ।
होय अपाय नवा; हे [15]असिधारा वाट काय! पाय न वाहे. ॥ ३५
न धरावा विश्वास स्त्रीचा हें ठाउकें असे विश्वास; ।
कीं मथुरेनें, जवळी येतां, [16]सर्वस्व हरुनि, ठकविले गवळी. ॥ ३६
स्वस्थानींच न गमनीं दैवें दिधला न तर्किलाचि नगमनीं ।
होय महाउत्सव घे ज्याचा तो तेंवि गोप भासति अवघे. ॥ ३७
पुत्रविरह [17]बहळ [18]हळ [19]स्वांत विदारी; करी [20]व्रजेश हळहळ. ।
तो तेथुनि जावासा समय नव्हे, पावला परि [21]निजावासा. ॥ ३८
[22]शौरी [23]गर्गाकरवीं [24]द्विजातिसंस्कार [25]आत्मजांचे करवी; ।
कथिलीं जीं वेदानें, तीं सत्पात्रीं समस्तही दे दानें. ॥ ३९
[26]सांदीपिनिभवनिं [27]बटु प्रभु वसती (ब्रह्मचर्य तें [28]भव निवटू;) ।
[29]सर्वज्ञानखनि [30]गदाग्रज [31]साग्रज घे, दुजा न [32]गुरुमुखनिगदा? ॥ ४०

१. मुलांपासून किंवा सहित. २. समजाविसीचीं वचनें. ३. उणें, ऊनत्व. ४. भोजकुलांतील कलंकच (डाग) असा जो कंस त्याचा शत्रु. ५. गवळ्यांस. ६. सुंदर. ७. दुभतें. ८. कृष्णास. ९. जातों. ‘यामि’ हें संस्कृत ‘या’ (जाणें) धातूचें प्रथम पुरुषाचें वर्तमानकाळचें एकवचन. १०. शोकाश्रूंनीं रोधिलेली आहे मान किंवा गळा ज्याचा. ११. आलिंगन. १२. दुःखाश्रु. (अमुत्=दुःख.) १३. निर्मळ, पापरहित. १४. कृष्णरूपी सुखाचें भांडार. १५. तरवारीची धार. १६. सकल धन. (स्व=धन.) १७. फार मोठा. १८. नांगर. १९. अंतःकरण. २०. नंद. २१. स्वस्थानास, गृहास. २२. वसुदेव. २३. गर्गमुनीच्या हातांनीं. २४. ब्राह्मणसंस्कार, व्रतबंध. २५. मुलांचें. २६. सांदीपिनि नामक गुरूच्या घरीं. २७. ब्रह्मचारी. २८. संसार. २९. सर्व ज्ञानाची खाण. ३०. कृष्ण. ३१. बळरामासह. ३२. गुरुमुखापासून उपदेशास.

अद्भुत अभ्यास; कला[1], विद्या, शिकले भजोनि सभ्या सकला; ।
दोघे भाउ करीती कौतुक; दाविति जनास भाउकरीती[2]. ॥ ४१
प्रभुमत कीं, 'मंहि[3] माजे, प्रियसत्यहितोक्ति[4] साधुनिगमहि[5] माजे ।
सांगति; आचरण तरी करूं; तरो जन धरूनि गुरुचरणतरी[6].' ॥ ४२
प्रणत[7] शुचि[8] सदा सत्वें भजति, धरुनि गुरुपदीं रुचिस, दासत्वें; ।
म्हणुनि अवंतीवासी[9] दे ज्ञान, कृतार्थ जें करी जीवांसी[10]. ॥ ४३
गुरुसि गमे धात्याची[11] विश्वाच्या अद्भुताचि मेधा[12] त्यांची[11]. ।
न बहुत अभ्यास, कळा दिवसांतचि धरिति, त्या अलभ्या सकळा. ॥ ४४
विनविति विप्रां[13] ज्ञाते, द्याया गुरुदक्षिणा[14], कवि[15]. प्राज्ञा[16] ते ।
स्वस्त्री; ब्राह्मण तीतें सांगे जें शिष्य आपणा म्हणती तें. ॥ ४५

---

१. या कला चौसष्ट आहेत त्यांचीं नांवें श्रीमद्भागवत दशम स्कंध, अध्याय ४५ श्लोक ३६ याच्या टीकेंत दिलीं आहेत. तसेंच श्रीवात्स्यायनप्रणीत 'कामसूत्रा'च्या प्रथम प्रकरणाच्या तिसऱ्या अध्यायांत दिलीं आहेत. तीं नांवें:—१ गीतम्, २ वाद्यम्, ३ नृत्यम्, ४ नाट्यम्, ५ आलेख्यम्, ६ विशेषकच्छेद्यम्, ७ तंडुलकुसुमविकाराः, ८ पुष्पातरणम्, ९ दशनवसनांगरागाः, १० मणिभूमिकाकर्म, ११ शयनरचनम्, १२ उदकवाद्यम्, १३ उदकयानम्, १४ चित्रयोगाः, १५ माल्यग्रंथनविकल्पाः, १६ शेखरापीडयोजनम्, १७ नेपथ्ययोगाः, १८ कर्णपत्रभंगाः, १९ गंधयुक्तिः, २० भूषणयोजनम्, २१ ऐंद्रजालम्, २२ कौचुमारयोगाः, २३ हस्तलाघवम्, २४ चित्रशाकापूपभक्तविकारक्रियाः, २५ पानकरसरागासवयोजनम्, २६ सूचिवायकर्म, २७ सूत्रक्रीडा, २८ वीणाडमरुकवाद्यानि, २९ प्रहेलिकाः, ३० प्रतिमालाः, ३१ दुर्वचकयोगाः, ३२ पुस्तकवाचनम्, ३३ नाटकाख्यायिकादर्शनम्, ३४ काव्यसमस्यापूरणम्, ३५ पट्टिकावेत्रबाणविकल्पाः, ३६ तर्ककर्माणि, ३७ तक्षणम्, ३८ वास्तुविद्या, ३९ रूपरत्नपरीक्षा, ४० धातुवादः, ४१ मणिरागज्ञानम्, ४२ आकरज्ञानम्, ४३ वृक्षायुर्वेदयोगाः, ४४ मेषकुक्कुटलावकयुद्धविधीः, ४५ शुकसारिकाप्रलापनम्, ४६ उत्सादनम्, ४७ केशमार्जनकौशलम्, ४८ अक्षरमुष्टिकाकथनम्, ४९ म्लेच्छितविकल्पाः, ५० देशभाषाज्ञानम्, ५१ पुष्पशकटिका, ५२ निमित्तज्ञानम्, ५३ यंत्रमातृकाधारणम्, ५४ मातृकासंवाच्यम्, ५५ मानसीकाव्यक्रिया, ५६ अभिधानकोशः, ५७ छंदोज्ञानम्, ५८ क्रियाविकल्पाः, ५९ छलितकयोगाः, ६० वस्तुगोपनानि, ६१ द्यूतविशेषः, ६२ आकर्षक्रीडा, ६३ बालक्रीडनकानि, ६४ वैनायकानां वैजयिकानां वैयासिकानां च विद्यानां ज्ञानानि. २. भक्तरीति. ३. पृथ्वीलोक. ४. प्रिय, सत्य, आणि हितकारक असीं वचनें. ५. साधु आणि वेद. ६. गुरुचरणरूपी नौका ७. नम्र. ८. शुद्ध. ९. सांदीपिनि. हा अवंती नगरींत राहत असे. (स्कंध १० अ० ३१.) १०. संसारी जनास. (हें एकवचन आहे; परंतु अनेकार्थींच उपयोगिलें आहे; यास 'जात्यैकवचन' असें म्हणतात.) ११. धारण करणाऱ्याची. (कृष्णाची.) १२. बुद्धि. १३. सांदीपिनीस. १४. विद्यासंपादनोत्तर शिष्य संतोषानें आपल्या गुरूस जी दक्षिणा देतो ती. १५. चतुर; हें 'ज्ञाते' (=कृष्ण व बळराम) याचें विशेषण आहे. १६. बुद्धिमान् ('स्वस्त्री'चें विशेषण.)

'अतुळ [1]प्रतिभा, उमज, [2]द्युति यांची; [3]ईशसे गमति भाउ मज; ।
जरि [4]नरबाळवपु सती! प्रभु हे,' ब्राह्मण म्हणे, '[5]स्वअभिमत पुसती. ॥ ४६
ईश्वर हे; महिम्यातें जाणोनि [6]अनर्घ्य रत्न [7]हेमहि म्या तें ।
कांही न [8]छात्रांसी मागितलें; कीं मनास इच्छा त्रासी. ॥ ४७
[9]त्वद्वांछा ब्राह्मणि! जे कळली; द्या [10]सिंधुमग्नपुत्रा' म्हणिजे. ।
त्याचा महिमा गाया, लोकीं हें योग्य [11]असुगम हि मागाया. ॥ ४८
[12]स्वव्रत यामागें न [13]क्षत, परि 'सुत द्या' असें तयां मागेन.' ।
करुनि विचार असा, या [14]अर्थावरि बहुत काळ कीर्ति असाया. ॥ ४९
नोहे [15]लुब्रा, म्हणतो परि हें निज [16]कल्पतरुस सुब्राह्मण तो. ।
'[17]सागरहृत पंडित हो! सुत द्या; तुमच्या यशें [18]भुवन [19]मंडित होे[20]' ॥ ५०
ज्या [21]सकृपा ध्यायाला सादर मुनि, नमुनि तो [22]उपाध्यायाला, ।
[23]साग्रज विप्रस्थानापासुनि करि [24]भवतमोरवि [25]प्रस्थाना. ॥ ५१
जाय सुरथ वेगानें प्रभुचा; हर्षें [26]महीसुरथवे [27]गानें, ।
ऐकविती, दासांचे ज्याच्या मनिं [28]हरियशोमृत सदा [29]सांचे. ॥ ५२
कृष्णरथाचा कानीं ध्वनि शिरतां, हरि [30]भवव्यथा चाकांनीं; ।
पूर्ण [31]सुधाकर साचा लाजविला; [32]मृतिस याचि धाक रसाचा. ॥ ५३
[33]गुरुसुतरक्षे [34]त्राते गेले देव [35]प्रभासक[36]क्षेत्रीं ते; ।
सागर धाउनि [37]वेळास्थितविभुचरणां नमी, न लाउनि वेळा. ॥ ५४

---

१. स्मरण. २. कांति. ३. ईश्वरासमान. ४. मानवी मुलांचीं शरीरें आहेत ज्यांस' असे. ५. इष्ट, आवडलेलें. ६. अमोल्य. ७. सुवर्णहि. ८. शिष्यांकडे. ९. तुझी इच्छा. १०. समुद्रांत बुडालेल्या मुलास. मृत झालेले मुलगे आणा अशी गुरुदक्षिणा गुरुपत्नीनें मागितली. (स्कंध १०. अ० ४५.) ११. दुर्लभ. १२. आपलें व्रत, नियम (न मागण्याचा.) १३. भग्न, मोडलेलें. १४. याचनेला. १५. मुखस्तुति करणारा. १६. कल्पवृक्ष. १७. समुद्रानें हरण केलेला. १८. जग. १९. सुशोभित. २०. होवो. २१. दयाळास. २२. गुरूस. उपाध्यायाचें लक्षण असें आहे:—'एकदेशं तु वेदस्य वेदांगान्यपि वा पुन: । योऽध्यापयति वृत्त्यर्थमुपाध्याय: स उच्यते ॥'. २३. वडील बंधूसह. २४. संसाररूपी अंधाराविषयीं सूर्य. २५. गमनास. २६. ब्राह्मणांचे थवे. 'महीसुरथवे' हा संस्कृतप्राकृत शब्दांचा समास लक्षांत ठेवण्यासारखा आहे. २७. गायनें. २८. हरियश हेंच अमृत. २९. जमतें, संचय होतो. ३०. संसारसंबंधी व्यथा. ३१. चंद्र. ३२. मृत्यूस. ३३. गुरूच्या पुत्राच्या रक्षणासाठीं. ३४. तारणारे. ३५. एका पवित्र तीर्थाचें नांव. ३६. स्थळास. ३७. किनाऱ्यावर असलेल्या प्रभुचरणांस.

[1]मंजुळवर्णवयांतें पाहे डोळेभरूनि [2]अर्णव यांतें ।
'[3]भवसागरनावा हे पाय,' म्हणे, [4]रत्नभूषणमना वाहे. ॥ ५५
[5]शौरिभंव [6]नदीपातें म्हणती, 'दे [7]विप्रकुळभवनदीपातें; ।
[8]रत्नाकर [9]पर तूं, न स्वीकारुनि देसि रत्न जें परतून.' ॥ ५६
सिंधु म्हणे, '[10]हां! [11]तनया [12]विप्रांच्या सत्य लाविला हात न; या ।
हरुनी [13]ब्रह्मस्वा, मी कैसा [14]भवदंघ्रिपूजनार्ह स्वामी! ॥ ५७
[15]मज्जळवासी जो गा, [16]पंचजनासुरचि या कुकर्माजोगा; ।
तुम्ही '[17]सर्वज्ञानीं शोधावें; हें कळेल सर्व ज्ञानीं.' ॥ ५८
मग शोधुनि [18]उदराशी विभु पंचजना वधी, चिरी [19]उदराशी! ।
त्या यत्नातेंही न प्रभुच्या करि सफल; कीं [20]द्विजसुतें हीन. ॥ ५९
तो करि पंचजनाचा वध, जो हरि संहरी प्रपंच जनाचा. ।
शंख [21]तदंग हरुनि घे सिंधूबाहेर [22]भक्तकल्पतरु निघे. ॥ ६०
गेले [23]संयमनीतें, साधाया कार्य जें स्वकीय मनीं तें. ।
वाजवि तेथ हरि [24]दरा, जो [25]भजकभवाचिया समूळ हरि [26]दरा. ॥ ६१
प्रभुच्या सहसा [27]दरजा नादा यम सेवि, पीति मुनि [28]सादर ज्या. ।
जाय [29]विनत सामोरा; उत्सव [30]जलदागमीं हि न तसा मोरा. ॥ ६२
अवलोकीना [31]शमन [32]स्वांगा, कीं भूललेंचि [33]कीनाशमन. ।
[34]हो बहु सात्विक, भाव यां पाहुनि, वशचि होय सात्विक [35]भावा. ॥ ६३

१. सुंदर आणि योग्य आहेत वर्ण (कांति) व वयें ज्यांचीं असे जे त्यांस. २. समुद्र. ३. संसाररूपी समुद्रांतील नौका. ४. रत्नें, भूषणें, व मन यांस. ५. वसुदेवापासून जहालेले (बळ व कृष्ण.) ६. समुद्रास. ७. ब्राह्मणकुलरूपी घरांतील दिव्यास. (गुरुपुत्रास.) ८. रत्नांचा आकर (खाण). ९. परंतु. १०. आश्चर्यार्थक अव्यय. ११. मुलास. १२. ब्राह्मणाच्या. १३. ब्राह्मणाच्या धनास. १४. तुझ्या चरणाग्रांची पूजा करण्यासयोग्य. १५. माझ्या उदकांत राहणारा. १६. 'पंचजन' यां नांवाचा राक्षस. हा संऱ्हाद दैत्याचा पुत्र, याला मारून कृष्णानें याच्या अस्थींचा शंख केला, तो, पांचजन्य' या नांवानें प्रसिद्ध असे. (स्कंध १० अ० ४५). १७. सर्व जाणणारे. १८. समुद्र. (उद+राशि=उदकाचा संचय.) 'उदक'शब्दाला स्थलविशेषीं 'उद' असा आदेश होतो. १९. पोटास. २०. ब्राह्मणपुत्रेंकरून. २१. त्याच्या अंगीं असलेला. २२. भक्तांचा कल्पवृक्ष. २३. यमपुरीस. २४. शंखास. २५. भक्तांचा संसाराच्या. २६. भयास. २७. शंखापासून जाहालेल्या. २८. आदरपूर्वक. २९. नम्र होत्साता. ३०. मेघ आला असतांहि. ३१. यम. ३२. आपल्या अंगास. ३३. त्याचें (यमाचें) मन. (कीनाश=यम.) ३४. बळ कृष्णास. ३५. स्वेद, रोमांच, कंप, स्वरभंग, वैवर्ण्य इत्यादि आठ सात्त्विक भावांस.

प्रभुचे पाय मनाचे प्रिय गुरु वंदूनि, [१]सत्तपा यम नाचे. ।
सर्वस्व निवेदी; न ज्ञाता [२]शठ होय, शठचि; न निवे दीन. ॥ ६४
चरितें [३]नरकायासप्रशमार्थ, करावयास, [४]नरकायास ।
धरिते [५]सद्ध्येय महापुरुष, पुजी श्रेष्ठ साधुमध्यें यम हा. ॥ ६५
'करिजे आज्ञा; पाया [६]नत जन हा, योग्य होय आज्ञापाया. ।
कांहीं सेवा याला सांगा जी! मन [७]सकाम सेवायाला.' ॥ ६६
प्रार्थित [८]माजानि यमें, बोले, 'आज्ञेंत वससि माज्या नियमें; ।
येणें [९]आर्यास मज [१०]त्वन्निकट स्वगुरुच्याचि कार्या समज. ॥ ६७
तूं [११]उग्रनय न; दीनीं निजकर्में [१२]मग्न [१३]विप्रतनय [१४]नदीनीं ।
त्या, सखया! दे; शिकवी जो आम्हां ज्ञान, तो तया [१५]देशिक वी. ॥ ६८
सुत गुरुवर्या देसी, तरि तूं प्रभु पाळिता स्वमर्यादेसी.' ।
भाव असा जाणविला, [१६]यमधर्में शीघ्र तोंचि [१७]शिशु आणविला. ॥ ६९
त्रिजगत्पालक [१८]वळसा करुनि असा, रक्षि बाळ [१९]काळकवळसा. ।
हें, उपदेशि, कराया लोकां; दे पुत्र [२०]यदुप [२१]देशिकराया. ॥ ७०
आलिंगुनि वत्स तिघे, विप्र म्हणे स्त्रीस, 'सुत [२२]यथावत् सति! घे. ।
या पसरिति पदरा जे [२३]स्वरगादिहि; त्या प्रजांत हरिपद राजे. ॥ ७१
ज्यांचा [२४]सन्मनु जपणें, अवतरले [२५]ईश तेचि हे [२६]मनुजपणें. ।
निजजन [२७]विपदवसादा [२८]बोभातां, देति [२९]दुरितवनदव [३०]सांदा.' ॥ ७२
हर्षे तो [३१]कवि [३२]तरणिप्रभवपुरानीतनैजतोकवितरणीं. ।
विनवी आणिख; रीति प्रभुची [३३]कपिलेसि उणिव आणि खरी ती. ॥ ७३

---

१. उत्तम आहे तप ज्याचें असा. २. ठक. ३. नरकवासांतील श्रम निवारण करण्याकरितां. ४. मानवी शरीरास. ५. साधूंनी ध्यान करण्यास योग्य जो त्यास. ६. शरण. ७. सेच्छ. उत्सुक. ८. रमापति, कृष्ण. 'जायाया निङ्' (पाणिनि ५-४-१३४) या सूत्रानें 'जाया' स्थानीं 'जानि' असा आदेश बहुव्रीहिसमासांत होतो. जसें, जानकीजानि, लक्ष्मीजानि. ९. श्रेष्ठास. १०. तुझ्याजवळ. ११. उग्र आहे न्याय ज्याचा असा, जुलुमी. १२. बुडलेला. १३. ब्राह्मणाचा पुत्र. १४. समुद्रांत.(नदी+ईन=नदीचा स्वामी.) १५. गुरु. १६. यमानें. १७.मुलगा. १८. फेरा. १९. काळाच्या तोंडांतील ग्रासासारिखा. २०. कृष्ण. २१. गुरुराजास. २२. होते तसे. २३. कल्पवृक्षादि. २४. सन्मंत्र. २५. ईश्वर. २६. मनुष्यपणें. २७. विपत्ति क्षीण करण्याकरितां=हरण करण्याकरितां. (विपत्+अवसाद=विपत्तीचा नाश.) २८. बोलावितां. २९. पातकरूपी वनांतील दावाग्नि. ३०. हाकेला. ३१. सांदीपिनी. ३२. सूर्यापासून उत्पत्ति ज्याची (यम) त्याच्या नगराहून आणिलेल्या आपल्या पुत्राच्या दानानें. (तरणि+प्रभव+पुर+आनीत+नैज+तोक+वितरणीं=सूर्य+उत्पत्ति+नगर+आणलेले+स्वकीय+पुत्र+दानीं.) ३३. कामधेनूस.

तो [1]गतलोभ, 'वश मला मन आहे,' मुनि म्हणे, '[2]मनोभव शमला; ।
हेचि पुरे [3]देशिकता तुमची; मणिहुनि न [4]मोदें बहु दे [5]सिकता. ॥  ७४
ज्यां गुरुराजे, पण जे ज्ञानी, तैसेचि बाप, आजे, पणजे, ।
त्यांहिं दिली [6]रसिकांनीं शिष्यांनीं दक्षिणा [7]श्रुत न असि कानीं. ॥  ७५
कीर्तिस [8]वीरमणी हो! तुमच्या लज्जित [9]पयोधिची [10]रमणी [11]हो; ।
लाजो [12]रात्रिधव, लता देवांची, दुग्धराशिचीहि [13]धवलता. ॥  ७६
तरतिल लोक छंदें तुमच्या; भजतिल [14]भवद्धृदोक [15]छंदें; ।
[16]नतचित्त [17]नभोगुरु जे रक्षूत [18]भवद्गुणागद, न भोगु [19]रुजे.' ॥  ७७
करुनि बहु [20]पवाड; वदे [21]आशी, आज्ञा तयां सकृप [22]वाडव दे. ।
वंदुनि आले मथुरे; लोक म्हणति, '[23]मूर्त हे [24]निजानंदथु रे!' ॥  ७८

## अध्याय [25]शेचाळिसावा.

व्रज [26]आनंदावासा करुनि विचार, स्वभक्त [27]नंदावासा ।
पाठवि; जो [28]उद्धव दे, उद्धव, [29]देवप्रियात, हितशुद्ध वदे. ॥  १
'बहु पाहति वाट, [30]कळाहीन [31]अंजनयन, नित्यहि नवा [32]टेकळा ।
घालुनि मजवरि; साचा क्षण देतो दुःख भोग ज्यां [33]वरिसाचा. ॥  २
भोगिति [34]दुःखकदंबा नंदपिता वृद्ध शुद्धबुद्धि [35]मदंबा ।
वाटे व्रज ओस, कळाहीन जना ताप देतसे ओ! सकळा. ॥  ३
जें [36]दवें करि न वनीं, तें [37]विरहें; मनें केंवि सोसितिल [38]नवनीतें? ।
[39]गुरुजन तो [40]हवि, घर तें कुंडचि; दहनीं कठोर [41]लोहें [42]विघरतें! ॥  ४

---

१. गेला आहे लोभ ज्यापासून, निर्लोभी. २. इच्छा. ३. गुरुपणा. ४. आनंद. ५. वाळू. ६. भक्तांनीं. ७. ऐकिली. ८. हे वीरश्रेष्ठांनो. ९. क्षीरसागराची. १०. स्त्री. ११. होवो. १२. चंद्र. १३. शुभ्रपणा. १४. तुमचीं हृदयें हींच घरें. (भवत्+हृद्+ओक=तुमचीं+हृदयें+घरें) १५. गीतें. १६. नम्र आहे चित्त ज्याचें त्यास. १७. आकाशाहून मोठे. १८. तुमचे गुण हींच औषधें. 'अगद' हा शब्द पुल्लिंगी आहे. १९. रोगास. २०. स्तुति. २१. आशीर्वाद. २२. ब्राह्मण. २३. मूर्तिमंत. २४. आमचा आनंद. २५. या अध्यायांत गोपीसांत्वनार्थ उद्धवप्रेषण हा विषय आहे. २६. आनंदावा असा. २७. गोकुळास. २८. उत्साह, आनंद. २९. कृष्णास प्रिय आणि आप्त. ३०. निस्तेज. ३१. गोकुळांतील जनाचे डोळे. ३२. अत्यंत मोठी आळ (पाहण्याची इच्छा). ३३. वर्षाचा. ३४. दुःखसमुदायास. ३५. माझी आई. ३६. दावाग्नि. ३७. याचें क्रियापद 'करी' हें अध्याहृत आहे. दव जें वनीं न करी, तें विरह (घरीं) करी—असा अन्वय. ३८. लोण्यासारखीं. हें 'मनें' याचें विशेषण आहे. ३९. आईबापें. ४०. होमद्रव्य. ४१. लोखंड. ४२. वितुळतें.

शृं[1]गारांबुजसरसी गोपी[2]वधूमंडळी वसे म[3]जसरसी. ।
हरिच्या सेजारा ती पावलि मृगि, तिस [4]चिंताचि सेजा रा[5]तीं ! ॥ ५
तीव्र [6]मनोगद; वांचे कोण? तृण प्राण ते वियो[7]गदवाचें. ।
मज जोडुनि कर, 'पावें,' म्हणति, 'किती वि[8]रहपावकीं करपावें?' ॥ ६
स्व [9]तनु जन नि[10]वासासु प्रिय[11] सुत हि न मानुनी जननि वा[12] सासु, ।
मिळति [13]नद्या वाहात स्वपतिस मज; म्या कसा न द्यावा हात? ॥ ७
गोपी सारखि जे ते; छळहि न मानुनि मनीं असार खिजे[14] ते; ।
'तव पद या लोभ जनीं वाढवि,' म्हणती, 'वसो दयालो! भजनीं.' ॥ ८
पसरिल तरि कर पेजे, [15]चातकरसना तृषेंकरुनि करपे जे? ।
तेंवि [16]मदितरनर मतिप्रति न, स्वप्नींहि वाटति व[17]र न, रमती. ॥ ९
मी जीव[18]नें, मीन[19] सती; प्राण कुशल उद्धवा! [20]स्वधामीं नसती. ।
प्रथमहि मन घाबरवी दिनवि[21]रहेंहि; तद्रती न [22]अनघा! बरवी. ॥ १०
होइल सं[23]गम नाशा यास्तव; पावति न कीं [24]मदागमनाशा ।
[25]मत्प्रिय तो जन [26]वाटे देखतचि असेल [27]अकृतभोजन वाटे! ॥ ११
यास्तव जा, पितरांतें समजावीं, गोपिकांदिकां इतरांतें. ।
जाणसि साम, निरोपें स्वसुखाचीं लावि त्यांचिया मनिं [28]रोपें. ॥ १२
घेऊनि निरोप[29]वनें, आज्ञारूपेंहि शीघ्रगति हो [30]पवनें; ।
[31]रथगगनीं वेंघ[32]; न ते [33]व्रजाटवी वि[34]रहदव गिळो; घे [35]घनते. ॥ १३
[36]उद्धवनामसदभ्र, [37]प्रभुसंदेशाख्यअमृत ज्यांत [38]अदभ्र, ।
त्या [39]व्रजजनकेकींतें भेटों जाय; [40]प्रमोदउं शके कीं तें[41] ॥ १४

---

१. शृंगाररूपी कमळें आहेत ज्यांत अशा तळ्यासारिखी. २. गोपींचा समुदाय. ३. मजजवळ. ४. स्मशान. ५. रात्रीं. ६. मनाचा रोग. ७. वियोगरूपी वणव्याचें. ८. विरहरूपी अग्नींत. ९. शरीर. १०. निवास+असु,=घरें आणि प्राण. ११. हें, 'तनु,' 'जन,' 'निवासासु,' 'सुत,' 'जननि,' 'सासु,' यांचें विशेषण आहे. १२. अथवा. १३. गोपीरूपी नद्या. १४. रुसे. १५. चातकाची जिव्हा. १६. माझ्याशिवाय दुसरा पुरुष. १७. नवरा. १८. पाणी. १९. मत्स्य. २०. आपल्या घरीं. २१. एक दिवसाचा वियोगहि. २२. हे निष्पापा! २३. संयोग, भेट. २४. माझ्या येण्याची आशा. (मत्+आगमन+आशा) २५. मला प्रिय. 'सत्प्रिय' असाहि पाठ आहे. २६. मार्गास. २७. उपोषित, उपवासी. २८. लहान झाडें. (हा शब्द या ठिकाणीं नपुंसकलिंगीं आहे.) २९. निरोपरूपी उदकें. (वन=उदक.) ३०. वायूनें (आज्ञारूपी.) ३१. रथरूपी आकाशांत. ३२. चढ. ३३. गोकुळरूपी अरण्य. ३४. वियोगरूपी वणवा. ३५. मेघपणाला. ३६. उद्धवरूपी उत्तम मेघ. ३७. कृष्णाची आज्ञा या नामेंकरून अमृत (उदक.) ३८. फार. ३९. गोकुळवासी जनरूपी मोरांस. ४०. आनंदवायास. ४१. अभ्र.

रवि बहुधा मावळला लाजे; कीं साधु[1] नंदधामा[2] वळला. ।
आपण तापद[3] वारिप्रदास[4]; तो लोकशांततापद[5] वारी. ॥ १५
पाहुनि सहसा, **नंदें** पूजियला साधु युवतिसह[6] सानंदें[7]; ।
त्या सुघना[8] चातक वा मोर भजे हा; दिसे मनाचा तकवा[9]. ॥ १६
वाढवि पायस खाया; पुसिला कुशली[10], चुरूनि पाय, सखा[11] या. ।
धैर्याचा नगहि[12], वरें[13] व्रजभूचा[14], परि तया धरें[15] न गहिवर. ॥ १७
**नंद** वदे, 'सांग, मन[16] स्मरतें आम्हां? घडेल कृष्णागमन[17]? ।
पाहों मुखराजीवा[18]? अमृताचा लाभ तो बहु खरा जीवा. ॥ १८
दावादिक[19] मृत्युचि तें **कृष्ण** निवारी भुजें सदुपकृत्युचितें[20]; ।
त्या वीर्या, त्या तिथिला, स्मरतां होते क्रिया समस्तां शिथिलें[21] ! ॥ १९
त्या प्रथममात्रस्थानीं[22], दुष्टाची[23] ओळखोनि माव[24] स्थानीं[25] ।
ज्यां[26], खळसंहति[27] केली, स्मरतां कुंठित करी मनोगति केली[28]. ॥ २०
त्यजिलीं यदुकुळतिलकीं[29], विरहदवें[30] तीं स्थळें गमति उलतिल[31] कीं. ।
रोदन शुकपिकरव[32] तें; हृदय चिरे कृष्णपदवियोगकरवतें[33]. ॥ २१
कर्में काय करवती ! निष्ठुर **बळहरि**वियोग काय[34] करवती[35]. ।
श्रम ज्यांहीं हरिपावे[36], भ्रम ते देताति हे मनोहर पांवे ! ॥ २२
बोल खरे गर्गाचे[37], 'अवतरले ईश्वर त्रिदशवर्गाचे[38]'; ।
भयहर भूस्वर्गाचे[39]; गेयगुणचि[40] **रामकृष्ण** हे भर्गाचे[41]. ॥ २३

---

१. उद्धव. २. नंदगृहास. ३. ताप देणारा. ४. उदक देणाऱ्यास. (उद्धवास.) 'वारिप्रदसा' असाही पाठभेद आहे. ५. लोकांच्या शांततेचें स्थान (उद्धव.) 'वारी'=त्यजी; सोडून जाई. याचा कर्ता 'तो'=सूर्य, आणि कर्म 'लोकशांततापद.' ६. स्त्रीसहवर्तमान. ७. आनंदभरितें. ८. उत्तम मेघास. ९. दृढता, शक्ति. १०. सुखरूप. ११. कृष्ण. १२. पर्वत. १३. पति. १४. गोकुळाचा. १५. धरवे. १६. कृष्णाचें मन. १७. कृष्णाचें येणें. १८. मुखकमल. १९. वणवा इत्यादि. (१७ व्या अध्यायांत सांगितलेला.) २०. साधूंवर, किंवा चांगले, उपकार करण्यास योग्य अशा (भुजें). २१. सैल, ढिली. २२. पहिल्या स्थितींत, बाळपणांत. २३. दुर्जनाची. २४. कपट. २५. बसलेल्या ठिकाणीं. २६. हें 'स्थानीं' याचें संबंधी सर्वनाम आहे. २७. दुष्टाचा नाश, दुष्टसंहार. २८. क्रीडा. २९. कृष्णें. ३०. वियोगरूप वणव्यानें. ३१. फुटतील. ३२. कीर आणि कोकिळा यांचा जो शब्द (गायन) तें आतां 'रोदन' म्हणजे रडें असें वाटतें इ०. ३३. कृष्णचरणाचा विरह हाच कोणी एक करवत, तेणेंकरून. ३४. देह. ३५. कापतो. ३६. घालवावे. ३७. गर्गऋषीचे. ३८. देवांचे. ३९. पृथ्वीरूपी स्वर्गाचे. ४०. गाण्यासयोग्य आहेत गुण ज्यांचे असे. 'भर्गाचे हे (बळ व कृष्ण) गेयगुण आहेत' म्हणजे भर्गानें (सांबानें) ज्यांचे गुण गाण्यास योग्य असे. ४१. सांबाचे.

कृष्णा रामा नवलें[1] चरितें, जनमन दयाकरा[2] मानवलें. ।
केलें यश शुद्ध रणीं खळदमनीं[3], सप्तदिन नगसमुद्धरणीं[4]. ॥ २४
पडली चरमा[5] माजे दृष्टिस गति, वरि सहानुचर[6] मामा[7] जे. ।
न क्षम[8] नर परम रणा, पावे न इतरकरेंहि[9] सुरपर[10] मरणा ! ॥ २५
जे बहुधा मायावी[11] खळ, ज्यांची भीति जिष्णुधामा[12] यावी; ।
तेही जाले शलभ[13] ज्वलनीं[14] कृष्णीं, बळींहि[15] सिंहीं कलभ.[16]' ॥ २६
ऐसीं पुत्रचरित्रें वर्णी विकिलें जयांसि चित्त गिरित्रें ।
तों ये फार गहिंवर; स्रवति जळें लोचनें अपार महिवर. ॥ २७
होय यशोदा विकळा[17], प्रेमाश्रु तदीक्षणांबुजीं[18] दावि कळा; ।
पुत्रोदारकथांनीं[19] ये पान्हा कंचुकीविदारक[20] थानीं. ॥ २८
त्यांचा उद्धव[21] दे हा प्रेमा; विसरे मुहूर्त उद्धव देहा. ।
स्वमनिं म्हणे, 'या लाभें, संसृतिचे[22] सर्वथा नसे यांला भें.[23]' ॥ २९
सुख उद्धवपिक[24] लाहे; कृष्णप्रेमाम्र[25] गोकुळीं पिकला; हे ।
सत्संगम[26] मधु; रवँ[27] दे सुभजनकामासि[28] बळ, असें मधुर वदे;—॥ ३०
'धन्य तुम्ही; परिसा, जे सुतभावें प्रीति ईश्वरीं परि[29] साजे; ।
विश्वगुरुजगज्जनकीं[30] लाजविले या सुभक्तिनें सज्जन कीं. ॥ ३१
यांच्या चरणस्मरणीं जो जन वसवी मन क्षण स्थिर मरणीं, ।
होतो मुदाशि[31], शुचि[32]; (त्यांहीं क्रीडार्थ धरिलि मुद्रा[33] शिशुंची[34] !) ॥ ३२

---

१. 'चरितें' याचें विशेषण. २. दयानिधीस ('कृष्णा' व 'रामा' याचें प्रत्येकीं विशेषण.) ३. दुष्टमर्दनीं. ४. पर्वताच्या (गोवर्धनाच्या) 'समुद्धरणा'विषयीं=उचलून धरण्याविषयीं. (दशम स्कंध अध्याय ४६ श्लोक २५ पहा.) ५. शेवटींची (गति=मरण). ६. सहपरिवार. ७. कंस. ८. योग्य. ९. दुसऱ्याच्या हातानें. १०. देवशत्रु, कंस. ११. कपटी. १२. इंद्रलोकास. १३. टोळ. १४. कृष्णरूपी अग्नींत १५. बळरामरूपी सिंहीं. १६. हत्तीचा छावा. १७. कळाहीन. व्याकुळ (अध्याय ४६ श्लोक २८–२९.) १८. तिच्या नेत्रकमळांत. १९. पुत्रांच्या उदार (सुखकारक) कथांनीं. २०. चोळी फाडणारा. २१. आनंद. २२. संसाराचें. २३. भय. २४. उद्धव हाच कोकिलपक्षी. २५. कृष्णप्रेमा हाच कोणीएक आंबा, (गोकुळरूपी बागेंत पिकलेला). २६. साधूंचे संयोग. २७. शब्द. २८. उत्तम भजनाच्या इच्छेस. २९. 'सुतभावें प्रीति (आहे) परि, ईश्वरीं साजे' इ० असा अन्वय. ३०. ब्रह्मदेव व जगत् यांचा जो बाप (कृष्ण) त्याच्या ठायींच्या भक्तीनें लाजविले इ० ३१. आनंदाचा राशि. ३२. पवित्र. ३३. आकृति. ३४. मुलांची.

[१]साधुपरित्रात्याच्या गातां, [२]आकर्णितां चरित्रा त्याच्या, ।
जालीं तत्पर [३]करणें; काय तुम्हाला असे अतःपर करणें? ॥ ३३
मातेला [४]जनित्याला सत्वर भेटेल [५]वत्सला, जनि त्याला ।
क्षणमात्र नसे विसर; [६]प्रियमानस, हंस कां मग न सेवि, [७]सर? ॥ ३४
मारुनि कंसा राज्या, तुजसीं गोष्टी स्वयें वदे [८]सारा ज्या, ।
करिलचि त्या सत्या गा, धैर्य नसे वत्सलास त्यास [९]त्यागा.' ॥ ३५
दे [१०]सुखसंदोह, गळे त्यांचे हातीं धरूनि तो; मोह [११]गळे; ।
तत्व असें आयकवी श्रीउद्धव [१२]बुद्धवस्तु [१३]बुधराय [१४]कवी. ॥ ३६
सत्संगक्षण दे तें सुख अद्भुत; कोण आठवि [१५]क्षणदेतें? ।
[१६]परमामृतखनि शांतप्रेमरस पितांचि, दाखवि मुख [१७]निशांत. ॥ ३७
[१८]व्रजयुवतिजन [१९]रहाटे दधिमथनीं; कृष्णचरित गाय पहाटे. ।
[२०]प्रेमोद्दीपनें गानीं करिति, हरिति [२१]तमहि, जेंवि दीप, [२२]नगांनीं. ॥ ३८
तें हरि [२३]तम हो दधिचें मथन; यश जयांत [२४]सुचरितमहोदधिचें. ।
गाती डुलत, [२५]नुरवि तें प्रेम श्रम; फिरविती [२६]मृदुलतनु [२७]रवितें. ॥ ३९
[२८]बाष्पें कंठ [२९]निरुद्ध, स्वर [३०]गद्गद, परि न गीतरीति [३१]विरुद्ध. ।
स्वसुखाचे कोंब, [३२]रवे प्रेमसुधेचेचि, वर्ण ते हो बरवे ! ॥ ४०
[३३]भानुकृशानु उगवता जाला, जाळुनि [३४]तमा जुन्या मउ गवता; ।
लागे धूर बळकट, [३५]स्वच्छांबर यामुळेंचि होय मळकट ! ॥ ४१
स्त्रीजन ते, जेंवि [३६]रवी, रथ देखति जो तम स्वतेजें विरवी; ।
त्या [३७]कांचनमणिखचितें आश्चर्य दिलें [३८]व्रजेक्षणीं [३९]अणिखचि तें. ॥ ४२

---

१. साधूंचें संरक्षण करणाऱ्याच्या. २. ऐकतां. ३. इंद्रियें. ४. बापाला. ५. 'मातेला' आणि 'जनित्याला' यांचें विशेषण. ६. आवडतें मानस नामक सरोवर. (हें 'सर' याचें विशेषण) ७. सरोवर, तळें. ८. श्रेष्ठ. (हें 'गोष्टी' याचें विशेषण.) ९. त्याग करण्यास (तुमचा). १०. सुखसमूह. ११. नाश पावे. १२. बुद्ध वस्तु, जाणिलें आहे तत्व ज्याणें असा. १३. ज्ञानिश्रेष्ठ. १४. चतुर. १५. रात्रीस. १६. परमअमृतखनि. १७. सकाळ (निशा+अंत), पहांट. १८. गोकुळांतील स्त्रीजन. १९. असे, वर्ते. २०. प्रेमाचें (प्रीतीचें) उत्तेजन. २१. अंधार. २२. अलंकारांनीं. २३. अज्ञान. २४. उत्तम चरित्रांचा समुद्र. (कृष्ण.) २५. न उरवी. २६. कोमलांगी. २७. मंथनदंडातें. २८. नेत्रोदकें. २९. प्रतिबद्ध, भरलेला. ३०. सद्गदित. ३१. उलटी, छंदाचा भंग आहे जींत. ३२. गोळे. ३३. सूर्यरूपी अग्नि. ३४. तमोरूपी वाळलेल्या गवतास. ३५. स्वच्छ आकाश. ३६. सूर्य. ३७. सुवर्ण व रत्नें यांहीं जडलेल्या. ३८. गोकुळजनाच्या नेत्रांस. ३९. वेगळेंच, फार.

म्हणती [1]बल्लवमहिला, 'जो [2]अस्मत्प्राणपश्यतोहर पहिला, ।
तो अक्रूर [3]कुनर पी [4]व्रजजीवन, पातला असेल पुनरपि. ॥ ४३
त्या कंसा अधमास, व्रजयुवतीचा करूनियां वध, मास, ।
श्राद्धीं पिंड कराया, नेणार असेल [5]तृप्तिदायक राया. ॥ ४४
स्वामी नृप शूरहि, [6]तत्प्रिय करि [7]मागेंहि साधु अक्रूर हित. ।
त्यजुनि अशाहि जिवलगा, कंसा! गेलासि हें तुजेंहि नवल गा!' ॥ ४५
वदति असें; तों [8]सुरसापुष्करमालाधर [9]स्मितानन [10]सुरसा ।
पाहे [11]भगवदनुग या [12]अंतर्धृतविष्णुचरणयुवतितनुगया. ॥ ४६

---

## अध्याय सत्तेचाळिसावा.

[13]दृगतिथि उद्धव यांहीं केला [14]कृष्णोपभुक्तशुद्धवयांहीं; ।
जेंवि [15]विशद यज्ञांनीं निर्मळ [16]मोक्षेच्छु नीच सदय ज्ञानी. ॥ १
म्हणति हृतनयन रमणी, 'हा [17]अच्युतवेष [18]भूप कोण [19]नरमणि?' ।
[20]देववधूप्रतिमाशा वेष्टिति त्याला, जशा मधूप्रति माशा. ॥ २
ते [21]गोपस्त्रीजनता जाली [22]हरिदासचरणसरसीजनता; ।
मग एकांतीं [23]बैसका केली, प्रकटावया [24]निजाशय [25]असका. ॥ ३
[26]रासीं हरिच्या [27]तूर्यें, स्त्रीरत्नें ज्यांत कोटिभरि चातूर्यें, ।
हा महिमा [28]जीवांचा; [29]तदुक्तिरससिंधुमग्न माजी वाचा. ॥ ४
सप्रेमा कोपांचे बोल वदति फार [30]दार ते गोपांचे; ।
'जाणों [31]यदुपाळाचा सेवक तूं [31]उग्रसेनसुतकाळाचा. ॥ ५

---

१. गोपस्त्रिया. २. आमच्या प्राणांस (कृष्णास) (आमच्या समक्ष) चोरणारा. ३. दुष्ट मनुष्य. ४. गोकुळाचें 'जीवन'=जीवरूपी उदक. ५. तृप्ति देणारा. (अक्रूर.) 'राया' हें 'कंसा'चें विशेषण. ६. त्याला आवडता (अक्रूर). ७. मेला तरीहि. ८. पुष्करांच्या सुरस माला धारण करणारा. ९. हास्यमुख. १०. देवासारिखा. ११. ईश्वराचा दास. १२. ध्यानीं आहेत कृष्णाचे चरण धरिलेले ज्यांनीं अशा गोपीरूपी 'गया'=गंगा. १३. 'दृष्टीचा अतिथि (केला)'=कृपादृष्टि केली, असें वाटतें. १४. कृष्णानें उपभोगिलीं म्हणून शुद्ध आहेत वयें ज्यांचीं. १५. पवित्र. १६. मोक्ष इच्छिणारा. १७. कृष्णाचा वेष आहे ज्याकडेस. १८. राजा. १९. पुरुषश्रेष्ठ. २०. देवांगनांच्या आकृतींसमान; 'वेष्टिति' या क्रियापदास 'रमणी' (गोपी) हा अध्याहृत कर्ता घ्यावा. २१. गोपीसमूह. २२. साधूच्या (अक्रूराच्या) चरणकमलीं लीन. (सरसिज=कमळ.) २३. बैठक. २४. आपला अभिप्राय. २५. सर्व. २६. रासक्रीडेंत. २७. वाद्यें. २८. नादाचा. २९. तच्छब्दरूपी क्षीरसागरांत निमग्न. ३०. स्त्रिया. ('दार' हा शब्द पुंलिंगी आहे). ३१. कंसारी, कृष्ण.

पाठविलेंसे, स्मरणा धरुनि, तुला येथ [1]निजपितृप्रियकरणा; ।
जो [2]अपवर्गद मुनिहीं [3]स्वस्नेहाधीन, [4]करणवर्ग [5]दमुनिही. ॥ ६
आठविजे काय दुजें या [6]घोषीं, त्यजुनि [7]जननिजनका [8]यदुजें? ।
इतरीं कार्यापुरती मैत्री; संस्कार ते मनीं मग नुरती. ॥ ७
पुरुष [9]रसपिपासु मनीं, स्त्रीठायीं सख्य; जेंवि [10]मधुपा [11]सुमनीं. ।
त्यजिजे [12]आंगणिं, कानीं ऐकुनि [13]चाटूहि, [14]हृतधना [15]गणिकांनीं. ॥ ८
जेथ कृपा सत्य, [16]जिती प्रजा तया; [17]गतबळा नृपास त्यजिती. ।
जो विद्या दे, शिकते जे शिष्य [18]सुविद्य, सोडिती [19]देशिक ते. ॥ ९
धरि [20]पदतोयज, मान [21]प्रत्यह करि जो, असाहि तो [22]यजमान, ।
टाकिति [23]ऋत्विज, [24]यजनीं होतां [25]निजदक्षणोदशीतशय जनीं. ॥ १०
[26]खगहि त्यजिति [27]अगातें विफळातें, स्मरति [28]तदुपकृत न अगा! तें. ।
[29]दातृगृहांत अतिथि जे, तन्मनही [30]यावदशनमात्र अति [31]थिजे. ॥ ११
[32]दग्धवना मृग विटती; भोगुनि टाकी [33]अतृप्त जी स्त्री [34]विट ती.' ।
ऐसें बहुतचि वदती, निर्लज्ज्या रडति, [35]कृष्णपदरति [36]सुदती. ॥ १२
तों [37]व्रजवामान्यतमा कळवाया भाव उद्धवा [38]मान्यतमा, ।
बोलतसे मधुपासीं; तो रस नाहीं सुधाकरा [39]विधुपासीं– ॥ १३
'स्नेह मनीं आठविला, म्हणुनि मधुपदूत [40]वल्लभें पाठविला,' ।
कल्पुनि ऐसीच वदे [41]मधुपा अन्योक्ति; [42]सुधा न तसी चव [43]दे;–॥ १४

---

१. आपल्या बापास प्रिय असलेलें करण्यासाठीं. २. मोक्ष देणारा. ३. आपल्या स्नेहाच्या स्वाधीन. ४. इंद्रियसमूह. ५. शमवून. ६. गोकुळीं. ७. आईबापांस. ८. कृष्णानें. ९. शृंगाररसाविषयीं तृषित. १०. भ्रमरास. ११. पुष्पीं. १२. द्वारापुढच्या जाग्यांत. १३. प्रियकर आणि गोड अशीं खोटीं भाषणें. १४. हरण केलें आहे धन ज्यापासून अशाला. १५. कलावंतिणींनीं. १६. जीवंत. १७. गेलें आहे बळ ज्यापासून, निर्बळ. १८. चांगले विद्वान् (जहाले म्हणजे). १९. गुरु. २०. चरणकमल. २१. दररोज. २२. यज्ञ करणारा. २३. उपाध्याय, यज्ञकर्म चालविणारा. २४. यज्ञीं. २५. आपल्या दक्षणेच्या उदकानें थंड आहेत हात ज्यांचे. २६. पक्षी. २७. वृक्षास. २८. त्याणें (वृक्षानें) केलेले उपकार. २९. दात्याच्या घरीं. ३०. जोंपर्यंत जेवण असेल तोंपर्यंत मात्र. ३१. एका ठिकाणीं राहे. ३२. जळलेल्या अरण्यास. ३३. तृप्त न जहालेली. ३४. जार. ३५. कृष्णचरणीं प्रीति आहे ज्यांस. ३६. सुंदर आहेत दंत ज्यांचे; सुंदर. ३७. गोपिकांतून कोणी एक स्त्री. ३८. मान्य, श्रेष्ठ. (उद्धवाचें विशेषण.) ३९. सुधा–कर (किंवा, आकर) विधु, अमृत प्रसवणारीं किरणें आहेत ज्याचीं; किंवा अमृताची खाणच असा जो चंद्र, त्याजवळ. ४०. पतीनें. ४१. मधुपाशीं संबोधून पण अक्रूरास उद्देशून बोललेली वाणी. ४२. अमृत. ४३. या अर्धांत 'क्ति-सुधा' हा 'ज'गण नसल्यामुळें हें अर्ध सदोष आहे. 'सुधा' याच्या बदली 'अमृत' असें वाचल्यास बरोबर जमेल.

'इच्छा कायशि? वांया मधुपा! धांवसि धरून पाय, शिवाया; ।
विदित असति कितवाचा[1] बंधू तूं; वदसि मधुर सचकित[2] वाचा. ॥ १५
वनमाला[3] सवतीच्या भरली कुचकुंकुमें[4] विलासवतीच्या,[5] ।
तें त्वज्जीवन[6]; मिसिया[7] पिवळ्या कीं निस्त्रपा[8]! पदासि नमिसि या? ॥ १६
स्वाधरमधु[9] पाजी जी आवडती, त्या शठास[10] मधुपा! 'जी! जी!' ।
समजावीं मानवती[11] त्या कितवा[12]! तुज तयास ज्या मानवती. ॥ १७
जेंवि रसपिपासुमनें[13] तूं चुंबुनि टाकितोसि मधुपा! सुमनें[14]; ।
त्यजिलें आम्हांहि तसें, भुलवुनि अधरामृतें; म्हणों त्या हितसें[15]? ॥ १८
मन मोहुनि टाकि तव स्वामी, ऐसा प्रसिद्ध रे! हा कितव[16]; ।
कसि चरण शिवे कमळा[17] याचे? तीचा कसा धरि विवेक मळा[18]? ॥ १९
कळलें पिउनि भुलल्ति तें अनृतकथामृत[19] तदाननेंचि[20] सुललितें[21], ।
नेणुनि भाव, सुरा[22] ती पी; न धरि विवेक, जशि विभावसु[23] राती[24]. ॥ २०
कंसाचा रिपु[25], राणा[26] वृष्णींचा[27], श्रेष्ठ, कामचारि[28], पुराणा[29], ।
गासी येथ तशास भ्रमरा! इतरा जनासमीप कशास? ॥ २१
येथुनि मधुपा! जावें; हरिसखियांतें[30] स्वगीतमधु[31] पाजावें; ।
करितिल भवदिष्ट[32]; गदाग्रज[33] त्यांच्या हरि निरंतर उरोजगदा[34]. ॥ २२
ज्या स्त्री लोकत्रितयामाजि[35] दुरापा[36], न त्या अरे! पत्रि[37]! तया; ।
भ्रूयुग[38] कनकपटाचें[39] नाचे बहुरुचिर[40], हसित[41] गृह कपटाचें! ॥ २३
करुनि महा तप, दासी श्री[42] लावि रजोर्थ[43] मात्र हात पदासी; ।
तेथें काय कंद[44] वनालयदारांचा[45]! न कामसायक[46] दवना[47]. ॥ २४

१. शठाचा, ठकाचा. २. आश्चर्यकारक. ३. कृष्णाच्या अंगावरची आपादलंबिनी माळ. ४. केशरानें. ५. विलास करणाऱ्या (सवतीच्या). ६. तुझें अन्न. ७. मिशा. ८. हे निर्लज्जा. (त्रपा=लज्जा.) ९. आपले अधरामृत. १०. ठकास. (कृष्णास.) ११. स्त्रिया. 'जी! जी,' म्हणून समजाविसी कर. १२. शठा. १३. रसाविषयीं तृषित अशा मनानें. १४. पुष्पें. १५. हित करणारा असें म्हणावें? १६. ठक. १७. लक्ष्मी. १८. मळास. ('धरी' या क्रियेचें कर्म.) १९. खोट्या कथा हेंच अमृत. २०. कृष्णमुखानें. २१. सुंदर ('आननें' याचें विशेषण). २२. मद्य. २३. सूर्य. २४. रात्र. २५. शत्रु. २६. राजा. २७. यादवांचा. २८. स्वेच्छ. २९. आद्य, जुनाट. ३०. कृष्णप्रिय स्त्रियांतें. ३१. तुझें गायन हेंच मधु. ३२. तुझें इच्छित. ३३. कृष्ण. ३४ स्तनज व्याधी. ३५. त्रैलोक्यांत. ३६. दुर्लभ. ३७. हे पक्ष्या, भ्रमरा! ३८. दोनहि भिंवया. ३९. पीतांबरधारी कृष्णाचें. ४०. फार सुंदर. ४१. हास्य. ४२. लक्ष्मी. ४३. चरणरज:कणासाठीं. ४४. पदार्थ, किंमत, बिशाद. ४५. अरण्यवासी गवळ्यांच्या बायकांचा. ४६. कामबाण. (आम्ही जे त्यास मारूं ते.) ४७. बेलासारिखी एक विष्णुप्रिय वनस्पतिविशेष.

तदपि दया जरि [1]कृपणांवरि करिसिल, 'उचित [2]उत्तमश्लोकपणा,' ।
ऐसेंचि कळिव, राजा कितवांचा जो, तयाप्रति [3]अळिवरा ! जा. ॥ २५
कां चरणां शिवशि ? वहा न शिरीं पाय; प्रणाम भर शिवशिव ! हा. ।
तन्मुखरस चाटूनी आलासि; कळे, वळे न मन [4]चाटूंनीं. ॥ २६
करुनी [5]खोलेंशि कविता, जालां तो [6]कितव तूज बोल शिकविता; ।
तें आम्हां सकळ कळे; आठवुनि मुकुंद [7]यां जनास, कळकळे ! ॥ २७
हें सुख दावि; श्वासें ओंठ करपले, रडों सदा विश्वासें, ।
तळमळ [8]दिनिनिशीं, वांचे न [9]व्रज, होतिल विलास सदनिं [10]शिवांचे. ॥२८
ज्याकरितां निजपतितें, [11]तोकें [12]जगद्द्वयहि ज्या सुमुनि जपती, तें[13], ।
त्यजुनी [14]ध्यास, त्यजिल्या जालों; त्या वाटलों [15]मृता सत्य [16]जित्या. ॥ २९
त्या [17]अजितस्वांतातें काय भजोनी ? भजों हित [18]स्वांतातें; ।
सख्य पुन्हा फुटकळ, तें फळ कळलें; [19]अन्न बहु शितें[20] [21]अटकळतें. ॥३०
रावण ज्या वोवाळी [22]स्वमुकुटमणिदीपकीं असा जो [23]वाळी, ।
त्यास वधी [24]लुब्धकसा; सेवावा व्यर्थ [25]परनिधनलुब्ध कसा ? ॥ ३१
आपण तों स्त्रीजित, कीं सीता[26]वश; करि [27]तदीय वाक्यें जितकीं. ।
वरि [28]तन्वर्पण, खीजे, बहुत विटंबी तसीहि [29]शूर्पणखी जे. ॥ ३२
दाता, शूर, मृदु [30]बळी; ज्याच्या कीर्तीपुढें [31]सुधारुचि दुबळी, ।
छळिला तो, करि पूजे सर्वस्वें तरि; न देति शोक रिपू जे ! ॥ ३३
वर्णी महिमा, [32]गेहीं जाउनि त्याच्या; [33]त्रिपाद [34]महि मागे हां[35]. ।
देतां, सर्व [35]हरि हरी; बांधुनि घाली [36]रसातळींच हरिहरि ! ॥ ३४

१. आम्हां गरिबांवर. २. उत्तम पवित्रता. ३. हे भ्रमरश्रेष्ठा ! ४. मिथ्या व गोड भाषणांनीं. ५. गूढ अशी. ६. लबाड, ठक. ७. आम्हांस. ८. रात्रंदिवस. ९. गोकुळ. १०. कोल्ह्यांचे (विलास) होतील=घरें ओसाड पडतील. ११. मुलें. १२. इहलोक व परलोक. १३. जगद्द्वयहि. १४. मुलांबाळांचा. १५. मेलेल्या. १६. जीवंत. १७. अजित (जिंकिलेलें नाहीं) अंतःकरण ज्याचें. १८. आपल्या मरणास. १९. भाताची परीक्षा एका शितावरून होते—अशी म्हणच आहे. २०. (भाताच्या) एकच शितानें. २१. समजतें. २२. आपल्या मुकुटांतील मणिरूपी दीपकांनीं. २३. वानरविशेष. २४. पारध्यासारिखा. २५. दुसऱ्याच्या मरणाविषयीं तत्पर. २६. सीतेनें वश केलेला. २७. सीतेचीं. २८. देहाचें अर्पण. २९. रावणभगिनी. ३०. प्रल्हादाचा पौत्र: यानें इंद्रपद मिळावें म्हणून विश्वजिन्नामक यज्ञ आरंभिला. तेव्हां विष्णूनें वामनावतार घेऊन त्याजपाशीं तीन पावलें भूमि मागून घेतली व त्रिविक्रमरूप धरून त्या बलिदैत्यास पाताळीं लोटिलें—अशी कथा आहे. ३१. अमृताची गोडी. ३२. घरास. ३३. तीन पावलांएवढी. ३४. पृथ्वी. ३५. कृष्ण. (वामनरूपधारी.) ३६. पृथ्वीच्या खालीं.

ऐसा [1]भोजपरिपु रे; [2]तत्सख्यामाजि बहुत [3]चोज, परि पुरे. ।
म्हणसी जरि 'कां गातां,' भजिजेतें [4]कंज बांधि तरि कां गा ! [5]तां ? ॥ ३५
जाणों [6]ऽर्गलतेतें कृष्णकथेच्या, खणी [7]त्रिवर्गलतेतें; ।
परि [8]हरिभृत्या ! गाया [9]रसना रत, न [10]क्षमा [11]सकृत् त्यागाया. ॥ ३६
[12]कृष्णानुचरित लीला तें कर्णामृत धुतें [13]कुपंककलीला; ।
तीची जे कीं [14]कणिका लाजे [15]साध्वीस त्या [16]सुधाख्या [17]गणिका. ॥ ३७
तीचे [18]सेवनकरिते [19]द्वंद्ववियोगासि पावती लौकरि ते; ।
म्हणुनचि होति [20]विनष्ट, त्यजिति गृह कुटुंब दीन ज्यांत [21]सुकष्ट. ॥ ३८
आपणही बहु दीन भ्रमण करिति [22]सर्वभोगसौख्यविहीन, ।
ऐसे बहुत [23]विहंगें प्राणार्थहि भीक मागतात [24]असंग. ॥ ३९
[25]कृष्णकथासवकणिका मोहितसे [26]चतुरमानसा ! जसि गणिका. ।
न धरि [27]तयाँउपर मती; [28]लोकव्यवहृतिरुचि क्रिया [29]उपरमती. ॥ ४०
सकुटुंब सदन सुटतें; [30]श्रुति, लज्जा, स्नेह, लोकबंधन तुटतें; ।
मान [31]लव जनांत नुरे; स्मरे [32]स्वपूर्वप्रियाहि न मना [33]तनु रे ! ॥ ४१
गेले कामांतूनि छंदें या बहुत जन [34]फुका [35]मातूनि; ।
मग हाता पसरीती [36]उदरार्थ; पडे गळांचि [37]तापसरीति. ॥ ४२
हें जाणत गोपी तों जाणूं; कीं जीव हा क्षण तगो, पीतों ।
हें [38]परमामृत कानीं; मानियलें व्रजजनींहि या [39]मृतकांनीं. ॥ ४३

---

१. कंसशत्रु. २. त्याच्या मैत्रींत. ३. गुह्य, सुख. ४. कमळ. ५. त्यां. ६. सहायातें, आधारातें. ७. मोह, कर्म, आणि संपत्ति यांच्या गणरूपी वल्लीतें. ८. हे कृष्णसेवका ! ९. जिव्हा. १०. योग्य, शक्तिमान्. ११. एकदाहि. १२. कृष्णाच्या अनुकृत लीला=कृष्णानें जीं चरितें केलीं तींच (आम्हीं) करून दाखविलेलीं. १३. दुष्ट पातक आणि कलह यांस. १४. कण, अंश. १५. पतिव्रतेस. (कणिकेस.) १६. सुधाआख्या, अमृत नामक. १७. वेश्या. १८. उपभोक्ते. १९. कलहाच्या वियोगास (पावती)=कलहापासून मुक्त होतात. २०. सर्वत्यक्त. २१. फार कष्ट. २२. सर्व भोग आणि सुख यांविरहित झालेले. २३. पक्षी. २४. संगहीन, एकटे. २५. कृष्णाची कथा हेंच कोणी एक मद्य, त्याचा अंश. (आसव=मद्य.) २६. हे शहाण्या ! २७. त्यावर. २८. लोकसंबंधी कामें. २९. नाश पावतात. ३०. वार्ता. ३१. किंचित्हि. ३२. पूर्वी आपणास प्रिय असलेली (तनु). ३३. शरीर. ३४. फुकट. ३५. गुंग होऊन. ३६. पोटासाठीं. ३७. तपस्व्याची चालचलणूक. ३८. श्रेष्ठ (कथारूपी) अमृत. ३९. मेलेल्यांनीं.

गेला ओकित [1]वमना आम्हां, वार्ताचि ते असो; [2]कितवमना; ।
याची काय [3]रुचि ? रहा उगला आतां; [4]नकोचि काय रुचिर हा. ॥ ४४
[5]मृगयु जसा गाय महा मधुर, गमे साधुमानसा ! गा यम [6]हा; ।
[7]मांससतृष्ण वधूं तें करि कपट कळे न शुद्ध कृष्ण [8]वधूंतें. ॥ ४५
[9]तो खाया [10]पळ, उर तें भेदि [11]शरें; [12]आयु काय मग पळ उरतें ! ।
होय गति भ्रमरा ! हे; प्राण मधुर गीत हाहि न भ्रम राहे. ॥ ४६
हरिणीस न पाप, [13]शुचि; परि आम्ही त्या [14]वनेचरी बा पशुचि, ।
त्या [15]यांही [16]भीरुच; तें [17]दृग्युगही [18]सम; न गीत दे [19]भी, रुचतें. ॥ ४७
'न पडो [20]भव्या [21]धामीं तोटा त्याच्या,' म्हणें, '[22]शुभ,' व्याधा मी; ।
कीं हरिणी माराया उशिर न [23]लावी; दया न ये [24]माराया. ॥ ४८
भुलवी विश्वा, सोंगा घेउनि; आम्ही तयास [25]विश्वासों गा ! ।
जाणों [26]सुखजनक रवे [27]तच्छब्द; त्यागबुद्धि सहज न करवे. ॥ ४९
गणितां [28]तद्वच, [29]नख रे ! करिति कुचीं शिवुनि तीव्र [30]रतिपतिनखरे; ।
अनुभवुनि स्वमन [31]खरे, '[32]हरिपरिस' म्हणे, '[33]दुराग्रही कवि न [34]खरे.' ॥ ५०

---

१. ओकीस. २. कृष्णाचें विशेषण. ही प्रथमा आहे, संबोधनी नव्हे. ३. गोडी, शोभा. ४. 'गमे न काय रुचिरहा' असाही पाठ आहे. ५. पारधी. ६. कृष्ण. ७. मांसाविषयीं आशाभरित. ८. आम्हांस. ९. पारधी. १०. मांस. ११. बाणानें. १२. आयुष्य. १३. शुद्ध, पवित्र. १४. वनांत फिरणाऱ्या. असा समास प्राकृतांत बहुधा येत नाहीं, परंतु 'वने' या सप्तमीचा लोप होऊन 'वनचरी' असा येत असतो. संस्कृतांत अशा समासास 'अलुक्' समास म्हणतात. यांत विभक्तिप्रत्ययाचा लोप होत नाहीं; जसें—स्तंबेरम, कर्णेजप, अप्सुयोनि, दिविस्पृक्, इत्यादि. १५. आम्ही. १६. भितऱ्या. १७ दोनही डोळे. १८. 'कुरंगनेत्री' असें स्त्रियांस म्हणतात म्हणून 'सम' असें म्हटलें आहे. १९. भय. २०. कल्याणास. २१. वरीं. २२. कल्याण, इष्ट. २३. याचा कर्ता 'व्याध.' २४. कृष्णास. 'माराय' हा संस्कृतप्राकृत शब्दांचा समास चिंतनीय आहे. २५. विश्वास ठेवीत होतों. २६. सुख उत्पन्न करणारे (रवे=तुकडे, गोळे). २७. कृष्णाचे शब्द. २८. कृष्णाचें वचन (गणितां=मनांस आणलें असतां). २९. नखें. ३०. कामाचे नखरे=उत्तेजनें. ३१. दाहास (कामापासून होणाऱ्या). ३२. कृष्णापेक्षां. ३३. अशक्य असेल तरीहि ग्रहण करणारे. ३४. सत्य. सर्वांचा अर्थ:—त्याचें वचन मनास आणिलें तर नखें (आम्हांस) स्पर्श करून कुचीं कामाचे नखरे (=नखांनीं केलेलीं कांहीं कृत्यें) करीत असत; मग (त्या कामापासून जाहलेल्या) दाहास अनुभविल्या (=सहन केल्या)नंतर आमचें मन असें म्हणे कीं, 'होण्यास अशक्य अशा गोष्टीहि स्वीकारणारे असे जरी कवि असतात तरी त्यांणीं, या कामदाहापासून किती दुःख होतें, असें जें वर्णन केलें आहे, तें अगदीं अपूर्ते; पण कृष्णानें आपल्या स्पर्शानें तें दुःख किती होतें, तें प्रत्यक्ष दाखविलें.,

स्मर करि [1]अर्हा पीडा, कीं [2]भूत; न बोल [3]बर्हिबर्हापीडा. ।
भी[4]रुसि होय झडपणी; करिती [5]ब्रह्मग्रहादि काय धडपणीं? ॥ ९१
तूं [6]चिरंजीव; [7]दवार्ता वृष्टि तसी, [8]मधुकरा! दुजी वद वार्ता; ।
[9]कीं झांकुनि मुख राहें; किति कथिलें परि न ऐकसी [10]मुखरा! हें. ॥ ९२
न [11]स्थापुन राग मनामाजि भ्रमरा! किमर्थ [12]पुनरागमना ।
केलें? तुज पाठविलें, प्रिय सखया! काय [13]केशवें आठविलें? ॥ ९३
आगमन तव पुन्हा या निववाया, [14]विरहदहनगतवपु न्हाया, ।
[15]प्रियसंदेशामृत कीं द्याया? जावें न [16]काळदेशा [17]मृतकीं. ॥ ९४
[18]हृदयेप्सित [19]कुशलिवरा मागें तूं [20]पारितोषिकार्ह [21]अलिवरा! ।
[22]तत्संगम तों [23]लंबालोलदलाग्रांबुबिंदुसख [24]रोलंबा ॥ ९५
जा वेड्या! नव घडतें प्रेम [25]त्रुटित? न जडे, पडे अवघड तें; ।
हेंहि असो, [26]हरिशील [27]द्वंद्व; [28]त्यागासहिष्णुहि न [29]हरिशील. ॥ ९६
न वदें फार [30]कथकसा; [31]अस्मन्नयनोचित प्रकार कथ कसा. ।
किति सुकुमारा! खणिशी [32]नगे नखरें? सहचि ते [33]रमा [34]रखणिशी!॥ ९७
यश रोलंबा! गा जें बहु म्हणती [33]श्री [35]हरिप्रिया; बा गाजें. ।
नांदे [36]तदुरोधामीं; साहेन तिसीं पळार्ध न विरोधा मी. ॥ ९८
ऐसें बहु संकट, कीं! [37]निधिपरि वरि वेढिला [38]फणीच्या [39]कटकीं; ।
[40]तदुरोवासवतीतें माने न [41]विपक्षजन नवा सवतीतें ॥ ९९
करुनी [42]गुरुकुलवासा आला कीं विजित [24]चंचरीका! [43]कुळवासा? ।

१. योग्य. (स्मर=काम.) २. पिशाच, काम पीडा करी हें योग्यच आहे. कांकीं तें कोणी एक भूतच होय. ३. मयूरपिच्छाचा तुरा आहे ज्यास=कृष्ण. (आपीड=तुरा.) ४. भ्यालेल्यास. ५. ब्रह्मराक्षसादि. ६. अमर, कालांतापर्यंत जगणारा. ७. वणव्यानें त्रासलेल्यास. ८. हे भ्रमरा. ९. किंवा. १०. हे बडबड्या. ११. धरून. १२. पुनः येण्यास. १३. कृष्णें. १४. विरहरूपी अग्नींत पडले आहेत देह ज्यांचे. १५. कृष्णाचा निरोप हेंच अमृत. १६. मृत्युस्थळाला. १७. मेलेल्यांनीं (आम्हीं). १८. मनोभीष्ट. १९. कल्याणदायकांच्या श्रेष्ठास–कडे. २०. बक्षिसास योग्य. २१. हे भ्रमरश्रेष्ठा. २२. कृष्णाची संगति. २३. कडू भोंपळ्याच्या हालणाऱ्या अशा पानावरील पाण्याचा जो बिंदु त्याचा सखा. २४. हे भ्रमरा! २५. तुटलेलें. २६. हरण करिसील. २७. कुब्जा. २८. त्याग करणें हें सहन होत नाहीं ज्याला. २९. हरीचा स्वभाव. ३०. गोष्टी सांगणाऱ्यासारखा. ३१. आमच्या नयनास योग्य असा. ३२. वृक्ष. ३३. लक्ष्मी. ३४. राखणारी तसी. ३५. कृष्णास आवडणारी. ३६. कृष्णाच्या वक्षःस्थळीं. ३७. द्रव्याच्या ठेवीसारिखा. ३८. सर्पाच्या. ३९. वर्तुळांनीं, वेऱ्यांनीं, वेटाळ्यांनीं. ४०. कृष्णवक्षःस्थळीं वास करणारीस. ४१. शत्रुजन. ४२. गुरुच्या घरीं राहणें. ४३. आपल्या कुटुंबाच्या स्थळास.

[1]वनमाळी आहे कीं [2]आर्यपुत्र [3]जनवनमाळी ? ॥ ६०
केव्हां तरि वदतो रे ! या दासींची कथा [4]प्रियंवद तो रे ? ।
तूं साधु [5]अली कानीं पडली तरि सांग, फटिव न [6]अलीकांनीं. ॥ ६१
जो [7]स्वर्द्रुमगुरु [8]सुरभीनाथ श्रीकृष्णबाहु [9]सदगुरुसुरभी, ।
तो केव्हां निववील, छत्रत्व धरूनि, [10]किंकरी जिववील.' ॥ ६२
इत्यादि [11]व्रजवनितासूक्तिसुधा [12]तन्मुखामृतद्युतिजनिता; ।
उद्धव सुचकोर [13]तिला सेवुनि, पावे महा [14]रसिक तो [15]रतिला. ॥ ६३
[16]वक्तृवरा [17]जीवांचा शिष्य, मधुप [18]कृष्णचरणराजीवाचा. ।
बोले या [19]वामांतें कीं, [20]भवदवधानलेश यावा मातें. ॥ ६४
धन्य तुम्ही; कवि [21]भुवनीं गाति यशा, 'सेविला[22] [23]त्रिलोकविभु वनीं;' ।
[24]बहुसुकृतीं [25]बहुजननीं साधे हरिभक्ति [26]सर्वमंगळजननी. ॥ ६५
बहु [27]बरव्यापरि चरणीं हरिच्या भक्ति प्रवर्तविलि [28]परिचरणीं. ।
त्यजुनि पतिकुलगुरुभया; [29]मुनिवर्यांलाहि नव्हति सिद्धि सुलभ या. ॥ ६६
तुमचें प्रेम न मापीं सांठे, मोजील कोण त्या ? मन [30]मापीं. ।
जालों कृतकृत्य, हिमीं तप्त निवालों तसाचि, [31]हरिभृत्यहि मी. ॥ ६७

---

१. कृष्ण. २. राजपुत्र.. ३. जनरूपी अरण्यांतील माळी. ४. गोडबोल्या. 'प्रियंवद' हें द्वितीया अलुक् समासाचें उदाहरण आहे. ५. भ्रमर. ६. लबाड्यांनीं. ७. कल्पवृक्षांचा गुरु (श्रेष्ठ). ८. कामधेनूचा स्वामी. ९. उत्तम चंदनाचा सुवास. १०. दासी. ११. गोपींचे सुबोल हेंच अमृत. १२. त्यांच्या मुखरूपी चंद्रापासून उत्पन्न जाहलेली (सुधा). अमृतद्युति=अमृतांशु=चंद्र. १३. सुधेला. चकोरपक्षी चंद्राच्या अमृतकिरणांनीं आनंदित होतात, असा कविसंकेत आहे. या कविसंकेतांविषयीं विश्वनाथकविराजकृत 'साहित्यदर्पणां'तील तीन पद्यें (सप्तम परिच्छेद) उपयुक्त आहेत म्हणून येथें दिलीं आहेत. यांत बऱ्याच कविसमयांचा समावेश केला आहे:—'मालिन्यं व्योम्नि पापे यशसि धवलता वर्ण्यते हासकीर्त्योः रक्तौ च क्रोधरागौ सरिदुदधिगतं पंकजेंदीवरादि । तोयाधारेऽखिलेऽपि प्रसरति च मरालादिकः पक्षिसंघो ज्योत्स्ना पेया चकोरैर्जलधरसमये मानसं यांति हंसाः ॥', 'पादाघातादशोकं विकसति बकुलं योषितामास्यमद्यैर्यूनामंगेषु हाराः स्फुटति च हृदयं विप्रयोगस्य तापैः । मौर्वी रोलंबमाला धनुरथ विशिखाः कौसुमाः पुष्पकेतोर्भिन्नं स्यादस्य बाणैर्युवजनहृदयं स्त्रीकटाक्षेण तद्वत् ॥,' 'अह्न्यंभोजं निशायां विकसति कुमुदं चंद्रिका शुक्लपक्षे मेघध्वानेषु नृत्यं भवति च शिखिनां नाप्यशोके फलं स्यात् । न स्याज्जाती वसन्ते न च कुसुमफले गंधसारद्रुमाणामित्याद्युन्नेयमन्यत्कविसमयगतं सत्कवीनां प्रबंधे ॥'. १४. भक्त, आसक्त. १५. सुखाला. १६. वक्तृत्व करणारांत श्रेष्ठ अशा. १७. बृहस्पतीचा. १८. कृष्णचरणकमळाचा. १९. स्त्रियांतें. २०. तुमचें किंचित् लक्ष. २१. जगीं. २२. आराधिला. २३. त्रैलोक्यप्रभु. २४. फार पुण्यांनीं. २५. फार जन्मीं. २६. सर्व कल्याणाची आईच. २७. साधूंसारिख्या. २८. सेवेंत. २९. ऋषिश्रेष्ठांस. ३०. रमाधवीं. ३१. हरिदास.

मानस [1]आनंदेशा [2]सूक्ति जयांत [3]प्रियाचिया [4]संदेशा ।
त्या घेउनि आलों मी, ऐका; ताप न टिकेल एका [5]लोमीं. ॥ ६८
प्रीति [6]धवाचि कदा त्या न उणि म्हणा, मजहि सत्य [7]वाचिकदात्या. ।
[8]संदेशसुधाधारा प्या हे, [9]स्वांतीं धरूनि [10]विबुधाधारा. ॥ ६९
'[11]प्रेमामृतभरितांला हृदयसखींला तुम्हां [12]सुकृतसरितांला, ।
[13]त्रिजगदुपादानासीं मजसीं न वियोग [14]कृतकृपादानासीं. ॥ ७०
[15]खानिलशिखिजलभू तीं हेतुत्वें वसति जसिं [16]चराचरभूतीं; ।
मी तेंवि [17]मनोसुमतीकरणगुणानुगत जाणतो, जो [18]सुमती. ॥ ७१
भेद [19]नगा [20]हेमां, या [21]विश्वास मजहि तसा, उगा हे [22]माया; ।
मी [23]ज्ञानघन सती हो! आत्मा [24]स्वगतादि भेद लव नसती हो. ॥ ७२
[25]अहिस न जरि हार [26]वितो, भासे [27]तत्सत्यता; न परि [28]हारवितो; ।
नसुनि विलोकवि; वर्ता, जाणा मजमाजि तेंवि [29]लोकविवर्ता. ॥ ७३
[30]शोणं [31]रुचि स्फटिकाची, दावि [32]जपापुष्प भाव तो लटिकाची, ।
तसि माया स्वच्छा या आत्म्या लावी अनेकता [33]स्वच्छाया. ॥ ७४
[34]नियमा मन; घाबरिया वृत्ती न करा; असाहि [35]अनघा बरिया. ।
[36]मदुदितयोगांत रती [37]नाव, इणें साधु मद्वियोगा तरती. ॥ ७५
स्थिति माने दूर सती! कीं प्रेमाचा विटोंचि [38]नेदू रस ती. ।
मद्ध्यान बहु घडावें, स्वसुखनिधिद्वार आपणचि उघडावें. ॥ ७६

---

१. आनंद पावेल अशा (सूक्ति). २. उत्तम भाषणें. ३. कृष्णाच्या. ४. निरोपास. ५. केशीं. ६. पतीची. ७. वर्तमान देणाऱ्यास ('सत्य म्हणा'). ८. निरोपरूपी अमृताची धार. ९. मनांत. १०. देवांच्या आधारास. (कृष्णास.) ११. प्रेमरूपी अमृतानें (अमृत=पाणी) भरलेल्यांस. १२. पुण्यनद्यांस. १३. त्रैलोक्याचें कारण (कृष्णासीं). उपादान म्हणजे समवायी कारण—माती हें घटाचें उपादान कारण आहे, आणि कुंभार हें निमित्त कारण आहे. तंतु हें पटाचें उपादान कारण, आणि कोष्टी हें निमित्त कारण होय. १४. केलें आहे कृपेचें दान ज्याणें. (हें १३ चें विशेषण). १५. आकाश, वायु, अग्नि, उदक, आणि पृथ्वी हीं पंचतत्वें. १६. स्थावर जंगम अशा भूतीं. १७. मनस्+अनु+मति+करण+गुण+अनुगत. १८. बुद्धिमान्. १९. अलंकारास. २०. सुवर्णास. २१. जगास. २२. भ्रम. २३. ज्ञानाचा पर्जन्य. २४. आपल्या मधील. २५. सर्पास. २६. उत्पन्न करितो. २७. त्याचा खरेपणा. २८. त्यागिला किंवा विसरला जातो. २९. लोकरूपी विवर्त. विवर्त=भ्रम; जसें, दोराच्या ठिकाणीं भ्रमानें सर्पता मानणें यास 'विवर्त' असें म्हणतात. मीच आहें जेथें, तेथें लोकांचा भास मानणें याला 'लोकविवर्त' असें म्हणावें. ३०. तांबडी. ३१. कांति. ३२. जास्वंदीचें फूल. ३३. आपली छाया, भ्रम. ३४. आकलन करा, आकर्षा. ३५. निर्दोषी. ३६. मीं सांगितलेल्या योगांत. (रति=प्रीति.) ३७. नौका. ३८. न देऊ.

दूर [१]प्रियजन वसती. देखाया करिति नित्य नवस [२]नैव सती; ।
सहवासीं त्यासम न, प्रेम धरुनियां, भजे सदा त्यांस मन. ॥ ७७
मी सुखधाम जपावा, ध्यावा, गावा, पथें अशा मज पावा. ।
सुखनिधिला [३]गिंवसाल स्वपदीं, भेटोनि, शांतिलागिं, वसाल. ॥ ७८
न रति घडो [४]जारासीं मजसिं म्हणुनि, वध [५]'निरोधिती ज्या [६]रासीं ।
अर्पुनि [७]निजमानस त्या विरहीं मज, पावल्या [८]मुनिसमान सत्या,' ॥ ७९
[९]प्रियतम जो हरि, त्याचा [१०]संदेशाख्यप्रसाद [११]भवहरित्याचा ।
ऐकुनि, [१२]वरतनु रागें वदति [१३]स्वांतांत पूर्ण परि [१४]अनुरागें:— ॥ ८०
'वधिला कंस [१५]अराती, उद्धरिली [१६]आप्तिहृद्गताचि [१७]अरा ती; ।
[१८]द्विडिभाचा अंकुश तें करि बरवें; [१९]हरिस काय रिपु[२०]रंकुशतें? ॥ ८१
धन सन्मान [२१]समुदित ज्ञातिस देऊनि करुनि मानस [२२]मुदित, ।
त्यांसह उद्धवजि! वसे हरि कीं, अन्योन्य [२३]लब्धउद्धव जिवसे? ॥ ८२
पुसतो हरि दासां गा! उद्धवजी! कीं यथार्थचि वदा सांगा. ।
[२४]श्रुतिरति पुरवा; माया पतिचि असे काय, भजति [२५]पुरवामा या? ॥ ८३
कृष्ण रमविला; सकळा जाणति त्या [२६]तन्मनोरमविलासकळा? ।
पुसणें हें काय? शतें जन्मांच्या ये न, करुनि [२७]हेका, यश तें. ॥ ८४
[२८]सुहृदंबुजरवि [२९]दग्धा निज[३०]विरहाग्नींत या जना [३१]अविदग्धा, ।
आठवितो [३२]गोष्टींच्या केव्हां तरि काय [३३]अवसरीं गोष्टींच्या? ॥ ८५
तूं यदुवीरां[३४]सरसा वससि, पुसों म्हणुनि; आठवी [३५]रासरसा,—।
कीं हरि जाला रमता नाचत, गात, प्रिया जया फार [३६]मता? ॥ ८६
जाले जेवण [३७]व्यालां स्वविरहशोका तयाच, जे वणव्याला, ।
हे जन शुष्क अरण्य; प्रभुकरुणाघन करील शांत [३८]शरण्य? ॥ ८७

---

१. पतिजन. २. नवा. ३. पावाल. ४. छिनालासी. ५. अटकाविती. ६. रासक्रीडेंत. ७. आपलें मन. ८. मुनी पावतात तशा. ९. अत्यंत प्रिय. १०. 'निरोप' हेच आहे नाम ज्यास. ११. संसार हरण करणाऱ्याचा. १२. सुंदर आहेत शरीरें ज्यांचीं. १३. आपल्या मनांत. १४. प्रीतीनें. १५. शत्रु. १६. आप्तांच्या हृदयांत गेलेली. १७. धार, अग्र. १८. शत्रुरूपी हत्तीचा. १९. कृष्णरूपी सिंहास. २०. शत्रुरूपी शेंकडो हरिणांनीं. (रंकु=हरिण.) २१. उदय जहाला आहे जीचा अशा. २२. आनंदित. २३. सांपडला आहे उद्धव (उत्साह) ज्यांस. २४. कर्णाची इच्छा. २५. नगरवासी स्त्रिया. २६. कृष्णाच्या मनास आराम देणारा असा विलास. २७. आग्रह. २८. आप्तांच्या हृदयकमळाचा सूर्य. २९. जळालेल्या. ३०. आपला विरह हाच अग्नि त्यांत. ३१. मूर्खास. ३२. गोष्ठांतील. ३३. वेळीं. ३४. जवळ. ३५. रासक्रीडेंतील रसास. ३६. मान्य. ३७. (स्वविरहरूपी) सर्पास. ३८. पालन करणारा.

न धरुनि परवा, टोळें कंसें छळिलें उदंड, पर वाटोळें ।
जालें यादवपातें[1]; वश यास्तव सर्व आप्त यादव पोतें[2] ? ॥ ८८
नृपवरकन्या[3] वरिल; प्रेम कसें हो ! तगेल वन्यावरिल[4] ? ।
या मायादावातें[5] काय अधिक फळ वदोनियां ? दावा तें. ॥ ८९
आम्हा रानींच्यांनीं काय तया लाभ ईश्वरा नीचांनीं ? ।
नृपकन्याही न वरा[6] तो आत्माराम भूतिचा[7] कीं नवरा. ॥ ९०
'सुख नैराश्यापरतें[8] नाहिं म्हणे,' पिंगलाख्यवेश्या[9], पर तें ।
न घडे देखा; परिस स्वर्णत्वप्रद[10]हि तें न दे खापरिस. ॥ ९१
कोण सये ! कांताच्या[11] वार्ता सोडूं शकेल एकांताच्या ? ।
इच्छीना हरि, पर ती श्री, पद सोडुनि, न होय पळभरि परती. ॥ ९२
दुःख न होतें विसरीं; दवदाह जसा तटीं, न हो तेंवि सरीं[12]. ।
न स्वमतिस दावि मुख श्रीपतिचा विसर कां सति ! सदा विमुख[13] ? ॥ ९३
स्मृति नुठवी मनिं यमुना, तरि काय क्षण मुकुंदकाम नियमुना[14] ? ।
नामें रूपें कृष्णा स्मरवि, ठकवि, शुक्ति[15] जेंवि रूपें[16], कृष्णा[17]. ॥ ९४
जेथ वधी सदरींतें[18], तें तें स्थळ मोहितेंचि धीस[19] दरींतें ।
होय क्षोभ वनातें विलोकितां, करि जयांस तो भवनातें[20]. ॥ ९५
शुचिहृदया[21] गाईतें पाहों जेव्हां हरिप्रिया, गाई[22] ! तें ।
वाटे आला पीतद्युतिवसन[23], स्मरसमूह[24] आलापीत. ॥ ९६
हें सर्वहि आठव दे; मन मतिसीं तद्गुण प्रहर आठ वदे; ।
जेंतेंही स्मरवीतें, स्मरण हरीचें सुदुःसह स्मर वीतें.[25] ॥ ९७

---

१. यादवांच्या पतानानें; किंवा, कृष्णाच्या योगानें. २. स्वामीतें. ३. श्रेष्ठ राजांच्या कन्या. ४. अरण्यांत राहणाऱ्यांवरील. ५. मायारूपी दावाग्नीतें. ६. सुंदर, श्रेष्ठ. ७. ऐश्वर्याचा. ८. निराशेहून. ९. पिंगला या नावांची एक मिथिला नगरींत राहणारी लावण्यवती वेश्या. ही एके दिवशीं सायंकाळीं द्वारांत उभी राहून परपुरुषाची मार्गप्रतीक्षा करीत होती. पण त्या दिवशीं तिच्याकडे कोणीच पुरुष आला नाहीं. बराच वेळ वाट पाहून ती निराश झाली. तों मध्यरात्र होऊन गेली. तेव्हां तिला उपरति झाली. नैराश्य हेंच सुख असें तिला वाटूं लागलें. नंतर तिनें स्वहृदयस्थ जो परपुरुष त्याचें स्तवन करून तोच भगवान् परमात्मा आपला सनातनपति असें दृढ मनांत समजून नित्य चालू असलेला निंद्य व्यवहार सोडून दिला. १०. सुवर्णपणा देणारा. ११. पतीच्या. १२. तन्व्यांत. १३. 'विसरा'चें विशेषण. १४. नियमांत ठेवणार नाहीं. १५. शिंपा. १६. रौप्य. १७. यमुना. १८. सत् + अरींतें. १९. बुद्धीस. २०. घरें. २१. निष्कपटी, भोळ्या. २२. अगाई. २३. पीतांबरधारी. २४. कामसमूह. २५. या क्रियापदाचा कर्ता 'स्मरण'.

असति उमटलीं [1]पदकें श्रीधरणीच्या उरस्थळींचीं पदकें, ।
नयनांतें लोभविती, शोभविती भूमितळ, मन क्षोभविती. ॥ ९८
[2]स्मितगत [3]ईक्षण [4]ललितें मधुरोक्तें पाहुनि स्वबुद्धि भुललि तें. ।
न शकों विसरा [5]विसर स्वसुखांचा, चातकीं न विसरावि [6]सर, ॥ ९९
[7]विरहांबुधि करिल [8]गट व्रजासि; [9]तवशोकवाडवचि करि लगट ।
'निजजनजीवित राहो' हें दान [10]वदान्यनाथ जी! [11]वितरा हो! ॥ १००
शोकांबुधि तीव्र, तरे न व्रज; तूं रक्ष [12]महदुपकृतिव्रत रे! ।
जो निकट उभा नुतरी, बंधु कसा! न निववी, [13]अमृतभानु तरी?' ॥ १०१
[14]वारिवहाभा गाल्या जाल्या ऐसें सती [15]महाभागा त्या. ।
[16]प्रियसंदेशीं अगदीं आधिव्याधि शमले, परि न ते अगदीं. ॥ १०२
तो प्रियकर मित्राचा पूजिति, [17]नलिनी जशा स्वकर [18]मित्रांचा. ।
[19]प्लवंग [20]समीहित सीते, मानी हरिदास मंडळीहि तसी ते. ॥ १०३
त्यजि आत्मारामहि, ने तो उद्धव काळ गोकुळीं [21]सा महिने; ।
करि सत्सहवास, वदे, सेवी यश. सुख तसें न [22]यदुवासव दे. ॥ १०४
लावि दयाळकथांनीं भजनीं मन, माय जेंवि बाळक थानीं. ।
बहु सुख दे [23]वासर; ते जाले क्षण, चिंतितांचि देवा, सरते. ॥ १०५
गोपींचें कृष्णीं तें प्रेम जसें, सर्वथा नसे [24]वृष्णींतें; ।
सर्वहि शुद्ध वरीती ब्रह्म सगुण, गाय तेचि उद्धव रीति. ॥ १०६
'गोपी सकळ जनु जनीं आत्माधिक इष्ट ज्यांसि शौरितनुजनि; ।
भक्त मुमुक्षु ज्ञानीं काय अधिक यासि पूजिजे सुज्ञानीं? ॥ १०७
वांछिति ज्या प्रेम्यातें साधु सकळ, येथ देखिलेंसे म्यां तें; ।
जरि गोपवधू, तरि ते सिद्धि असे; यासि अन्य अवधूत रिते. ॥ १०८
'हे [25]ब्राह्मणजननींच प्रेम शुचित्वें घडे, इतर जन नीच,' ।
म्हणतां अन्यायाची जोडि असे; योग्यताचि अन्या याची. ॥ १०९

---

१. पाउलें. २. हास्य आहे ज्यांत. ३. पहाणें. ४. सुंदरें. ५. समूह. ६. पावसाची. ७. विरहरूपी समुद्र. ८.. खाऊन टाकणें. ९. वडवाग्नि. १०. दयाळूंत श्रेष्ठ. ११. पसरा, अर्पण करा. १२. मोठे उपकार करणें हेंच आहे व्रत ज्यांचें. १३. चंद्र. (अमृत आहे भानूंच्या=किरणांच्या ठायीं ज्याच्या तो.) १४. घनश्यामास. १५. भाग्यवती. १६. प्रियाचे निरोप हींच औषधें, त्यांनीं. १७. कमळणी. १८. सूर्याचा. (कर=किरण.) १९. वानर. (मारुति.) २०. फार इष्ट. २१. सहा. २२. यादवेंद्र. २३. दिवस. २४. यादवांतें. २५. ब्राह्मणजन्मींच.

यन्मन बाळक थानीं लावियलें सदयविश्वपाळकथानीं, ।
त्यास अशा सन्मानीं काय? अधिक विप्र विप्रवर संमानी. ॥ ११०
हेतु महत्वा चरणप्रसाद हरिचा; तयास जात्याचरण[1] ।
ज्ञानहि न हेतु; भजन प्रभुचें केवळ तदिच्छु सर्व शुभ जन. ॥ १११
युवति सदा रानींच्या, व्यभिचारपराहि, गोपदारा, नीचा; ।
या कोठें अजितरती[2] कोठें[3] भजतां न जाणते अजि! तरती. ॥ ११२
बोध न लेश वसे, जे दीर्घस्वापार्थ[4] पहुडले शवसेजे[5]. ।
त्याहि अजीवां चवितें नेणतयां, अमृत कीं अजी वांचवितें! ॥ ११३
जड न चुके; शवरक्षा[6] होतांही उठवि अमृत; 'केशव रक्षा[7] ।
न करी कां जी, भजनीं?' कथि हें श्रुतिचीच[8] भाविकां जीभ जनीं.॥ ११४
श्री स्त्रीही परि रंभाद्यमरवधू[9] सुंदरीच बहु परिरंभा[10] ।
नेणति ही लव ज्या, यीं[11] रासीं[12] त्या पावल्याचि बल्लवजाया[13]. ॥ ११५
यांचें भाग्य बहुचि; तें वानाया दशशताननेंहि[14] न उचितें. ।
शक्ति नसे, वानावें किति? गावुनि परि करावि सेवा नावें. ॥ ११६
कृष्णकृपा होउ, घडो प्रार्थित, हें सदय दैव पाहों उघडो. ।
वाटे मज लाभ लता गुल्मतृणोद्भवहि[15] येथ मजला भलता. ॥ ११७
जन्म असें मम नीच क्षुद्र[16] घडो हरि; सुखी असेन मनींच ।
साधुकृपाहि लहानीं दिसते; हें जाणता न पाहिल हानी. ॥ ११८
इच्छीं अवर जनुस[17], तें यास्तव कीं पदसरोजभवरज[18] नुसतें ।
गोपींचें असुलभ, या माथां ठेवूनि पाय, हरिल कुलभया[19]. ॥ ११९
जरि अनुकंपा[20] दीनस्वर्द्रुम[21] हरि करिल, हेंचि संपादीन; ।
गोपींचें पायतण स्पर्शो, व्हावें करूनि सदुपाय[22] तृण[23]. ॥ १२०
ज्याचें दुस्त्यज नातें, त्यजित्या जाल्या तृणापरि स्वजनांतें; ।
धर्मालाही नमनें केलीं; गणिलेंही मृत्युलाही न मनें. ॥ १२१

---

१. जाति+आचरण. २. अजिताची (विष्णूची) रति. ३. या दोहोंमध्यें फारच मोठें अंतर आहे—असा भावार्थ. ४. मोठ्या निजेसाठीं. ५. प्रेताच्या बिछान्यावर. ६. प्रेताची राख. ७. पालन. ८. वेदाची. ९. रंभादि देवांगना. १०. आलिंगनास. ११. 'बल्लवजाया'चें दर्शक. १२. रासक्रीडेंत. १३. गोपी. १४. शेषानें. १५ गुल्मापासून व तृणापासून जाहलेली. १६. हलकें. १७. नीच जन्मास. १८. पदकमलांपासून जहालेले रज:कण. १९. कुलाच्या भयास. २०. दया. २१. दीनाचा कल्पतरु. २२. उत्तम तजवीज. २३. तृण.

जें श्रुति[1]शतपद वीची[2] स्वसुखांबुधिची[3], मुकुंदनिजपदवीची, ।
जरि परिभवहि, वरिलि; हे पुण्यर्धी[4] चित्रगुप्त न वहिवरि लिहे. ॥ १२२
ज्याची सतत अपचिती[5] श्री करि, तपली तदर्थ तीव्र तपचि ती; ।
जें मुनिदैवत, शाला शांतीची, ध्याति भू सदैव[6] तशाला. ॥ १२३
स्कंदपिता[7] पाथांनीं[8] ज्याच्या विषदाह शमवि; तापा, थानीं ।
ठेवुनि त्या हरिचरणा, विज्ञविति गोपी, करूनियां परिचरणा[9]. ॥ १२४
गोपींच्या पायाला नमन; नसे भेद शार्ङ्ग[10]चापा याला. ।
भजती हरिसख्यातें; प्रेमें गाती, स्मरोनि हरिस, ख्यातें[11]. ॥ १२५
केलें हतैरिपुंनीं[12], तें गाउनि सच्चरित सौख्यकारि, पुनीतें[13] ।
भुवनें करिती, न मनें[14]; असोत यां नित्य जन्मभरि तीं नमनें. ॥ १२६
ऐसें तो उद्धव या गोपींतें गाय साधुतम शुद्धवया; ।
स्मरशरजा[15] मनिं घाया करुनि, बरें विनवि गंतु[16]काम निघाया. ॥ १२७
नाहीं मनिं जावासा प्रिय उद्धव माधवासम निजा वासा[17], ।
जाय तरि; असा नंदप्रभृतिजन वदे कृतांजलि[18] असानंद[19]. ॥ १२८
'अस्मन्मानसवृत्तीहंसीला हरिपदाब्जमानसवृत्ती ।
द्या, ऐसें वरदास प्रार्था जातांचि; मागतो वर दास. ॥ १२९
वाणीसहि लावु चटी हरिनाम, न विस्मृति क्षण जिला उंचटी[20]; ।
आम्हां हा हो सण तां[21] विनवावा हरिमुखास ये वोसणतां. ॥ १३०
त्या सदुदारा, बावा उद्धवजी! माग कीं सदा राबावा ।
सेवेंतचि देह; रितें पळ न टळो; फार दास्य हें दे हरि तें. ॥ १३१
कर्मेंचि परिश्रमतां वारावा कर्मभोग न; परि श्रम तां ।
उरवावा न मनांत प्रेम असो फार माधवा! नमनांत. ॥ १३२

---

१. वेदशतांचें स्थान. २. लाट, लहरी. ३. स्वसुखसमुद्राची. ४. पुण्यवृद्धि. ५. पूजा. ६. सर्वदा. ७. शिव. ८. उदकांनीं. ९. सेवनातें. १०. शार्ङ्ग=विष्णूच्या धनुष्याचें नांव. शार्ङ्ग-चापा=शार्ङ्ग आहे चाप (धनुष्य) ज्याचें त्याला. (विष्णूला.) ११. चरित्रें; अथवा विशेषण मानून 'ख्यातें प्रेमें'=सर्व प्रसिद्ध अशा प्रेमानें. १२. हत (मारिले) आहेत (स्व) रिपु (शत्रु) ज्यांणीं त्या (बळकृष्णांनीं). १३. पावन, पवित्र. १४. केवळ (आपलीं) मनेंच पुनीतें करिती असें नव्हे, पण भुवनें पुनीत करिती. १५. स्मरशरापासून उत्पन्न जहालेल्या ('घाया'). १६. जाण्यास इच्छिणारा. १७. घरीं. १८. हात जोडून. १९. सखेद. २०. उपटी. २१. त्वां.

निष्कामत्वें शुचिता संपन्ना सत्क्रिया घडाव्या उचिता. ।
[1]स्वावनदक्षभुजातें वद, 'आश्रय दे पदांबुजेंचि सुजातें. ॥ १३३
न पदापरती राहो मति, सदय [2]भवांबुराशिपरतीरा हो!' ।
हें हरिस वदा, 'विसरा न तृषार्ता,' जो [3]कुलप्रसव दावी [4]सरा'. ॥ १३४
[5]सांजलि, साश्रु तदा सव्रजपति जन काम करि असा श्रुत, दास. ।
दे [6]विविधोपायन तें घे उद्धव; नमि शिरेंचि तो पाय नतें. ॥ १३५
पावे मथुरापुर; तें व्रजवासिप्रेम हरिस सांगे पुरतें; ।
वंदुनि मृदुपाय नतें स्वशिरें, अर्पी यथोक्त सदुपायन तें. ॥ १३६

---

## अध्याय अठ्ठेचाळिसावा.

मांडुनि [7]पाटी, रतिचा योग पुसे जे, गृहीत[8]पाटीर तिचा ।
ताप दयाघन सारा हरि; वंदूं सावळ्या तया [9]घनसारा. ॥ १
दे सकुतुक [10]मलयज न, प्रभुचें घडलें दुजें पदकमलयजन. ।
दीनाचा भाउ, जरी अल्प भजन, दे असीम शोभा, [11]उजरी. ॥ २
[12]सुरुचिरदेहा रमणी भोगी, जाउनि गृहासि दे हार मणि. ।
काम पुरविला साचा; दे दुर्मति घे वर स्मरविलासाचा. ॥ ३
[13]सैरंध्री कृतकृत्या केली जी, तनु करूनि धिक्[14]कृतकृत्या, ।
पावे श्रीपरिस रतिप्रसाद; ज्यास न सुरांगना परि [15]सरती. ॥ ४
वरद [16]जलजनाभ जनीं दावी ऐसें महाफल जना भजनीं ।
संगें [17]अतनुशि खंडी त्या स्त्रीच्या देव, जेंवि अहिस [18]शिखंडी. ॥ ५
अक्रूराला [19]भवना भेटाया, द्यावया वरा लाभ वना ।
त्या दयमान वसंत, प्रभु जाउनि, सुखवि देव, मानव, संत. ॥ ६

---

१. स्वजनांचें संरक्षण करण्याविषयीं समर्थ आहेत भुज ज्याचे त्या (कृष्णास). २. संसाररूपी सागराचें पैल तीरच असा जो तूं. (हें संबोधन आहे.) ३. कुलाची उत्पत्ति ज्यापासून. ४. सरोवरास. ५. हात जोडून. ६. अनेक प्रकारचे (उपायन) नजराणे. ७. नित्यक्रम. ८. चंदन. ९. मेघाचें केवळ सारच असा जो त्यास. याचा अन्वय असा आहे:—पाटी मांडुनि, जे रतिचा योग पुसे, तिचा सारा ताप गृहीतपाटीर (=स्वीकारिलें आहे चंदन ज्याणें) दयाघन हारे (=हरण करी). १०. चंदन. सकुतुक मलयज दे इतकेंच नव्हे, पण प्रभूचें दुजें पदकमलयजन (चरणरूपी कमलाचें पूजन) घडे. ११. नीट करी. १२. फार सुंदर आहे देह जीचा. १३. दासी. १४. धिक्कार केला आहे कृत्येचा जीणें. कृत्या= एक देवता. १५. बरोबरीस पोंहचतात. १६. कमलनाभ. १७. कामास. १८. मोर. १९. घरीं.

स्मरला भाके कीं तें वदला होता; दयाब्द[1] हा केकीतें[2], ।
भक्तातें विसरेल प्रभु कां? तत्ताप सर्व केंवि सरेल? ॥ ७
पूजुनि शुद्धवपूतें[3], अक्रूरें साधिला सदुद्भव पूतें. ।
तो उत्सव दोंदीं[4] न ब्रह्मांडसमीं धरे; किति वदों दीन? ॥ ८
'पसरुनियां आ, म्यांचि स्वांबेच्या[5] सेवली सुधा आम्याची[6]. ।
गोडी आहे नामीं, तैसी हरि! तींतं लेश पाहेंना मी. ॥ ९
पसरवि 'आ' म्हातारी[8] दे अमृत, तुजीहि कीर्ति आम्हां[9] तारी; ।
अज्ञानां आमांतें जें दे आरोग्य, बा! न दे आमा तें. ॥ १०
बहु चिटि[10] तों, कांटाळा ये मग दे माय तेहि तोका टोळा[11]. ।
'नित्य चिटों[12] कीं नामीं श्रम न,' म्हणे 'क्षणहि हेचि[13] टाकीना,' मी. ॥ ११
त्राणीं आळस, दोंपी[14] जाणतया, अजि न जीस बाळ सदा पी; ।
थोरीं, आणि लहानीं, कीर्ति सम प्रीतिला, न आणि लहानी[15]. ॥ १२
कोणाहि न भी; डसती ते अहि पाजी; विलंघिहि न भीड सती ।
कीर्ति तुजी, जननीच्या परिस भली; करि सुखैकभाजन[16] नीचा. ॥ १३
कीर्तिसमहि मातेला म्हणतों[17]; ये काय आज्यमहिमा तेला[18]? ।
हे माता अमृताची, न मृताची; कीर्ति तों मृताअमृताची. ॥ १४
तूज्या पदयुगलीची, रीति पहातों मनांत जो उगलीची, ।
सुरभीची आजि कडे घे दीना, धांवते पसरि 'आ' जिकडे. ॥ १५
धरिते भाव शनीच्या दृष्टीचा, भूतिवल्लभा[19]! वशनीचा ।
करि पीडा परम; उशी शांतीची, अंघनगाशनी[20], पर मउशी. ॥ १६
सुख यद्रज दे, वांचे ज्या अमृतें विश्व, पाय मज देवाचे ।
हे नौकानाविक; ते घ्यावे, देऊनि चित्त, कां ना विकते? ॥ १७
लागो मोघों[21] भावा[22] आगि; तुम्हां भेटले न दोवां भावां. ।
गेले भव[23] देवा! जे नेणत, एकहि न त्यांत फळ दे वांजे. ॥ १८

---

१. दयेचा केवळ मेघच. २. मोरातें. ३. शुद्ध आहे शरीर ज्याचें. (कृष्ण.) ४. उदरीं. ५. आपल्या आईच्या. ६. स्तनाची. ७. 'स्वांबेच्या आम्याच्या सुधेंत.' ८. यशोदा. ९. आम्हांतें. १०. पीतों. ११. चुकवाचुकव. १२. प्या. १३. तुझी कीर्ति. १४. दटावीं. १५. लहानपणा. १६. सुखाचें मुख्यस्थान. १७. म्हणालों असतों. १८. हा भाग सुभाषितरूप आहे. १९. हे ऐश्वर्याध्यक्षा! २०. पापपर्वताला वज्र. २१. व्यर्थ. २२. भक्तीला. २३. जन्म.

धन्यचि हा दीन, वर्मी नामें अगदें अहंममादी नव, मी. ।
हे तूज असे विनती, मात्रा [1]भवगदच्चिकित्सका! सेविन ती.' ॥ १९
करि बहुशः स्तव, देहा चरणीं अक्रूर ठेवि, [2]शस्त वदे हा. ।
तेथ असाया दास प्रार्थि असें; लोभ जळिं असा [3]यादास. ॥ २०
देव वदे, 'अजि! तातें प्रेमें या जिंकिलें तुवां अजितातें. ।
यदुच्चि अहो! भागवतश्रेष्ठा! न पवे [4]उशीरशोभा गवत. ॥ २१
तुजला जनका कांहीं भेद न हा पोष्य होय जन काकांहीं ।
जो हित तोका कानीं पाजावा सदुपदेश तो काकांनीं. ॥ २२
तुमचा संता पद वा रजचि स्मरतां निवारि संतापदवा; ।
जरि मन सेविल याला अशुभाच्या उशिर पळ नसे विलयाला. ॥ २३
बहुतांपरि साधूंतें श्रेष्ठ म्हणों, तेंचि लेश परिसा; धूतें ।
सत्पदरज भजकमळा; [5]तत्पूताला सदा भजे मज [6]कमळा. ॥ २४
सुखद न भजकां पुरते, स्वार्थपरचि देव; गमति मज कापुर ते. ।
न धरी जरि लोक टुक, स्वच्छ हिमहि [7]सुरभि होय परि तो कटुक. ॥ २५
साधु भले साधु भले; हे सर्वां [8]सर्वकामसुरसा दुभले. ।
त्यजिति न दीना, वाडे शांतीचे, [9]संसृतीनदीनावाडे. ॥ २६
दीना तो भाउ खरा साधुन धन दे; न [10]सस्यशोभा [11]उखरा. ।
हो खळहि, तथापि [12]कवी तद्धृदयीं [13]शांतिशालिसुकथा पिकवी. ॥ २७
तीर्थें तों तोय, शिळा मृन्मय देव, प्रसाद तरि होय [14]शिळी; ।
कीं करिति शुभा उशिरें; सुख द्या नमितां तुम्ही सदय भाउ शिरें. ॥ २८
शुद्धविवेका काजें लोकोपकृतें सुसमुदितें काका! जें ।
हित परिसा; बापाजी! रुग्णापत्यासि सद्रसा बा! पाजी. ॥ २९
श्रीकुंती आका जी पांडुवियोगार्तमानसा, काकाजी! ।
श्रमते बहुविध, वेंचे जीवन शोकांत; ताप बहु विधवेचे. ॥ ३०
ती पंचसुता; पतिचें मरण; नवे भोगितें मन सुताप तिचें. ।
बाळां चुलताचुलतीं पोषिति; वाहे प्रदीप्त चिंता चुल ती. ॥ ३१

---

१. हे भगवदचिकित्सका! अहंममादि नव अगदें मी वर्मी (ओकतों), म्हणून नामरूपी मात्रा दे. २. प्रशस्त. ३. जलचरास. ४. वाळ्याची शोभा. ५. तेणेंकरून पवित्र झालेल्याला. ६. लक्ष्मी. ७. सुवास. ८. सर्वमनोरथरूपी सुरसाला. ९. संसारनदीचे नावाडी. १०. धान्याची शोभा. ११. उकिरड्याला. १२. साधु. १३. शांतीची कथा हेंच भात. १४. उशीरानें दिलेला.

वाटे [1]जनदेव शतें पुत्रांच्या मुग्ध; त्यासि मन दे वश तें ।
पुत्रस्नेहा; लाहे कोण न मोही महामते! हाला हे? ॥ ३२
सुत बहु नीच [2]क्षुर; जे तें करिल तिजेंहि झांकुनी चक्षु [3]रंजें ।
बहु अस्वस्थ विरहिता; आंतहि पाहत असेल न [4]स्थविर हिता. ॥ ३३
वैधव्यचि आधी तें अंगारस्नान; दे सकळ आधींतें; ।
शोकाचें गांव; तणें प्राण; तयातें दवाग्निचें [5]आंवतणें! ॥ ३४
दुःखक्षोभा, ऊन छद्म तसें, हरुनि, करुनि लोभा ऊन ।
पूर्ण करा. भाऊ न त्यजिती, आचार हा बरा [6]भाऊन. ॥ ३५
बाळसुता आत, पतिच्छत्र न माथां; असह्य हा [7]आतप. ती ।
[8]जातिव्रतति; फुलांतें तीच्या साहेल ताप काय मुलांतें? ॥ ३६
समय निका काजा या सत्वरचि [9]गजाव्हयासि काका! जाया; ।
कळतां वृत्त मनाशी, तेंचि करूं, जें बरें सुहृत्तम नाशी.' ॥ ३७
मग **सोद्धव बळहरि** ते गेले सदनासि सकळखळबळहरितें, ।
प्रिय शुभदैवा, राजे विधिचे, [10]शुंचिच्याचि घेति कैवारा जे. ॥ ३८

---

## अध्याय एकुणपन्नासावा.

स्वामिकृपा साधुनि, घे आज्ञा **अक्रूर**; सत्तपा साधु निघे. ।
वृत्तांत जसा, व्हाया विदित तसा, पावलाचि [11]गजसाव्हा या. ॥ १
भेटे **धृत**राष्ट्रातें, **भी**ष्मातें नीतिधर्मधृत[12]राष्ट्रातें; ।
[13]मोहमहानगभिदुरा **हरि**चरणा जो भजे तया कवि**विदुरा**; ॥ २
काय **पृ**था जी वाहे, 'श्रम भोग' म्हणे, 'तनू वृथा जीवा हे,' ।
तीस; खळजना भाचे जे रिपु पाहे सखे **जळ**जनाभाचे. ॥ ३
भेटे **द्रो**णास, **कृ**पा, अन्यासहि; हा न इष्ट कोणा [14]संकृपा? ।
करिती **कौरव** ते जें युक्त तया [15]त्यांचियाचि गौरव तेजें. ॥ ४

---

१. धृतराष्ट्र. २. वस्तरा. ३. रजोगुणेंकरून. ४. वृद्ध. ५. आमंत्रण. ६. मानून. ७. ताप. ८. जाईची वेल. ९. हस्तिनापुरास. १०. शुद्धाच्या. ११. हस्तिनापुरास. १२. नीतिधर्म करून धारण केलें राज्य ज्याणें त्यास. (भीष्मास.) १३. मोहरूपी पर्वतास वज्र असा जो त्यास. १४. 'हा' याचें विशेषण. १५. याचा अन्वय असा:—त्याच्याच तेजें जें गौरव युक्त (तें) ते कौरव तया करिती.

याच्या पौर वैलक्षज्ञाना[1] गाती; सुबुद्धि पौरव लक्ष- ।
लाभ म्हणति; शिर काया अर्पिति, हरिजनपदीं सुखीं शिरकाया. ॥ ५
कुंतीचा भाउ मग स्थिर राहे, घेत आप्तलाभा, उमग[2] ।
वृत्ताचा कुरुपाच्या[3] व्हाया, भगिनीमनांतिल्या कुरुपाच्या[4]. ॥ ६
करि बहुमास कळाया स्थिति रीति, कळे सदुत्तमा सकळा या. ।
का[5] मुनिसुत[6] पोर, हितद्वेषी, प्रियसाधुअहित, सुतपोरहित. ॥ ७
पाहुनि तो भाउ, सरी[7] देवी न करी जिची, विशोभा उसरी[8] ।
जाली; बहुविध वाहे ताप; रडे, आठवूनि बहु, विधवा हे. ॥ ८
'आप्तमतिस दादा! ही स्मरते कीं, जीस दुर्गति[9] सदा दाही? ।
पितरांस भ्रात्यांतें, ज्यांची पहिली दया अंदभ्रा[10] त्यांतें? ॥ ९
बहिणीभावजयांचा स्नेह असे? पूर्ण आप्तभाव जयांचा; ।
स्मरती सन्मति आली[11]? कुंतीची आजि बरि तुम्हां स्मृति आली! ॥ १०
स्मरला मजला भाचा कृष्णहि कीं? आजि दिवस मज लाभाचा. ।
जालें मन अभिराम[12]! स्मरतो कीं मत्सुतांसि या अभिराम[13]? ॥ ११
अग नग पौरव नीच, भ्रात्या! मी ही मृगीच पौरवनींच. ।
भय फार; कशा वांचे यत्नें? असु हरिति दुष्ट वृकें[14] शावांचे[15]. ॥ १२
वदतां, मन भी माजें, करिते जाले सपत्न[16] जन भीमा जें. ।
हा अज्ञान, गरांतें[17] चारियलें; विदित सर्व या नगरातें. ॥ १३
स्वसुतां सुख भावो जी इच्छा, अनुमोदिती तिला भावोजी[18]; ।
कुगति असी मामाजी[19] तळमळती देखतां असीमा माजी. ॥ १४
मनचि न नृप दे शतशा विदुरोक्तीं[20]; काय करुनि उपदेश तशा? ।
सत्यवती सासू, या, असती तरि, वारिती सती, सासूया[21]. ॥ १५
भव, भजतां हरि[22]; माय[23] त्रिजगीं जीची दया न; ते हरिमाय[24] ।
दीनजना थानातें लाविल कीं, स्मरुनियां अनाथा नातें? ॥ १६

---

१. शुद्धज्ञानातें. २. शोध. ३. कुरुपतीच्या. ४. कांत्याच्या. हें 'कुरुपा'च्या (कुरुपतीच्या) याचें विशेषण. ५. 'कीं नृपसुत पोर, हितद्वेष्टे; ज्यां गमति पांडुसुत पोर हित' असाही पाठ आढळतो. ६. कौरव. ७. बरोबरी. ८. वाळलेलें वांगें. ९. अधोगति. १०.मोठी. ११. मैत्रिणी. १२.प्रसन्न. १३. जवळ आहे राम ज्याच्या, रामासहित. (कृष्ण.) १४. लांडगे. १५. वत्सांचे. १६. शत्रु. १७. विषातें. १८. विदुर. १९. व्यास. २०. विदुराच्या वचनाला. २१. निंदायुक्त. २२. हरण करी. २३. मावतो. २४. हरिरूपी माता.

मी प्रहरहि आठवितें चिंता, चिंतामणिप्रभुस आठवितें; ।
स्तविल जग [1]श्रुतरीती, पितृभगिनीचे पुशील अश्रु तरी ती. ॥ १७
तूं सदुदार; कपाळीं पदरज लावूनि, [2]दीनेदारक पाळीं. ।
घे, घेशिल [3]आतर जें; तारीं; न, भवीं बुडो, मळो आत, रजें. ॥ १८
नाहिं अनाथा, राया दीनाच्या बांधवा! जना धारा या. ।
दे सत्कृपा दान, तमीं न बुडेसें अभयमात्र; पादा नत मी; ॥ १९
**अक्रूर** म्हणे, 'न सती शोकार्हा तूं; तुला अभद्रें नसती. ।
निर्भय आका! राहें; आलें [4]ब्रह्मचि दयालु आकारा हें. ॥ २०
त्या [5]मुनिवित्ता सारें ठाउक आहे करील [6]चित्तासारें. ।
पुत्र तुजे वाढविल; [7]त्रिजगच्छल्यें हि [8]यांकरें काढविल. ॥ २१
न मळे आकाश मळें, [9]सद्वत्सलदेवयशहि आका! [10]शमळें. ।
नससी आका! रानीं; जाणवती सुत समर्थ आकारांनीं.' ॥ २२
**विदुर** वदे, 'वहिनी! ती पहिली सोडील काय देवहि नीति? ।
प्रभु दयमान सहाय स्वजना; तुमचें म्हणो न मानस 'हाय!' ॥ २३
**अक्रूर** म्हणे, 'मजला दे आज्ञा; येथिंचा विचार उमजला. ।
'येतों' ये तोंडासी [11]प्रभुनामास्तीक [12]असदहि न तों [13]डांसी.' ॥ २४
मग जाउनि [14]उर्वीशा भेटे **अक्रूर**कवि; म्हणे, '[15]कुर्वीशा! ।
मेला **पांडु**; रहातें [16]यश; जोडिति सुज्ञ तेंचि पांडुर हातें. ॥ २५
[17]भाग्यमदें [18]उतण्यांत स्थिति न बरी, वर्त सम सुतांपुतण्यांत. ।
न [19]कुमतिवश गा! ऊत श्री जीवन चपळ; साधु यश गाऊत. ॥ २६

---

१. ऐकिलेले स्वभाव. २. दीन मूल. (पांडव.) ३. नावेवरून नेण्याचें मोल. ४. ब्रह्म आकारा आलें=ब्रह्मानें अवतार घेतला. ५. भगवंतास. ६. मनाजोगें. ७. त्रिजगाचीं दुःखें. ८. यांकरवीं. ९. प्रेमळदेवाचें यश. १०. पापानें. ११. प्रभुनामरूपी आस्तीक ऋषि. आस्तिक—हा जरत्कारु ऋषीस वासुकीची भगिनी जरत्कारु हिच्या ठायीं झालेला पुत्र. जनमेजयानें जेव्हां सर्पसत्र आरंभिलें तेव्हां यानें आपल्या मामांच्या म्हणजे सर्पांच्या प्रार्थनेस अनुसरून राजाच्या यज्ञमंडपांत जाऊन आपल्या तपोप्रभावानें आणि मनोहर भाषणानें राजास प्रसन्न केलें आणि सर्पसत्र समाप्त करावें असा वर मागून घेतला. यासमयीं तक्षक अग्निकुंडावरच्या भागीं होता तेव्हां असा वर देण्यास राजास कठिण पडलें. पण अखेरीस जनमेजयाला सर्पसत्र समाप्त करणें भाग पडलें. याप्रमाणें आस्तिकानें आपल्या मामांची मुक्तता केली. १२. दुष्ट सर्प. (असद् + अहि) १३. दंश करी. १४. राजाला. (धृतराष्ट्राला.) उर्वी+ईश. १५. कुरुश्रेष्ठा. १६. यश मात्र राहतें. १७. संपत्तीच्या गर्वानें. १८. उन्मत्त होण्यांत. १९. अगा! तूं कुमतिवश (दुष्ट मतीच्या अधीन) होऊं नको.

कवि न वदे, हासाचें पद होतें वचन म्हणुनि, देहा साचें; ।
भावुनि देव, पुजा तें, आप्त न; विरह क्षणांत दे, वपु जातें. ॥ २७
कांता, बांधव, सुत, या तनुचे संबंधि जन; [१]धनांधवसु तया- ।
पासुनि, दावुनि माया, हरिति; कसे आप्त, ज्यांचिया मनिं [२]माया? ॥ २८
न गणुनि पातक, [३]पाळा; येतो परि उग्र नरकपात कपाळा; ।
दुर्गतिहेतु जन मनें धूर्त, करिति वरिवरीच हे तुज नमनें. ॥ २९
भी मन हे [४]भार तमीं बुडविति; वदतों हितेच्छु हे **भारत**! मी. ।
टाकुनि लोभ, [५]**व्यास**प्रभवा! विश्वांत पात्र हो [६]भव्यास. ॥ ३०
बुडविति इष्टा पूर्तें हे काम, क्रोध, लोभ [७]ईष्टापूर्तें. ।
[८]प्रज्ञाचक्षु! द्रव दे तव हृदया, [९]अतित जरि सुत क्षुद्र वदे. ॥ ३१
हा तनय न, अहि; तातें त्वां वारावा. करील बहु [१०]अहितातें. ।
[११]नयपथविमुखां [१२]बानें शिक्षावें कुरुगृहाचिया खांबानें. ॥ ३२
बहु म्हणतिल '[१३]फट;' काळ ग्रासिल तुज; अयश केवळचि फटकाळ. ।
[१४]वृत्त जना सुखवु, जळ [१५]श्रांता जैसे; कुळीं तरिच मुख उजळ. ॥ ३३
उपजे जेव्हां प्राणी, वद, तेव्हां संगतीस कवणा आणी? ।
जेव्हां भूपा! मरतो, कोणातें संगतीस घे [१६]पामर तो? ॥ ३४
[१७]सुकृतासुकृता आंगें भोगी, कीं त्या सहाय असतो सांगें. ।
सहवासहि तो [१८]मूर्त [१९]श्रेयःप्रत्यूह [२०]कृतसुहृन्मिष धूर्त. ॥ ३५
मग कुजकी जशि दोरी, आयुष्याची तुटे; [२१]स्वपापशिदोरी ।
घे लुटिला तो नर; कीं [२२]स्वार्थपरिभ्रष्ट रडत जातो नरकीं. ॥ ३६
म्हणुनि स्वप्नासम या लोकास पहा; स्मर श्रुतीच्या [२३]समया. ।
हो शांतमना; शील स्वच्छ धरीं, [२४]गा हरीस; [२५]तमें नाशील. ॥ ३७
वाटे चतुरा ज्या जी रीति वरि, भजे तिलाचि बहु राजाजी! ।
परि करि जो निजहित, जी! धरि साधुपथ, क्षुधा तृषा निजहि [२६]तजी.' ३८

---

१. धन, अन्न, आणि रत्नें. २. कपट. ३. पाळितां. ४. दुर्योधनादि. ५. हे धृतराष्ट्र! (व्यासापासून प्रभव=जन्म ज्याचें तो.) ६. कल्याणास. ७. परोपकारी कृत्यानें. ८. हे अंधा! ९. दुष्ट. १०. अकल्याणातें. ११. न्यायमार्ग ठाउक नाहीं त्यांस. १२. बापानें. १३. छीः. १४. वर्तणूक. १५. थकलेल्या जनांस. १६. नीच, हलका. १७. पुण्याला व पापाला. १८. मूर्तिमंत. १९. कल्याणास विघ्न. २०. सुहृदाचें ज्याणें मिष केलें तो. २१. आपली पापसामग्री. २२. स्वार्थीविषयीं विन्मुख. २३. नियमा. २४. स्तुति करा. २५. अज्ञान, पाप, माया. २६. लज्जी.

भूप वदे, [1]वसुधेतें येउनि, [2]रुग्णासि पाजि देव सुधेतें, ।
साधो! तूंहि तसाच श्रेष्ठ कथिसि बोध हा मला हित, साच. ॥ ३९
[3]श्रुतिस सुविद्या [4]वीचि [5]प्रमुदब्धीचीच हे नवी द्यावीचि; ।
पसरी वपु, ढेंकरही दे, न मिटकियाचि दे, करि पुढें करही. ॥ ४०
उक्ति तुजी परम [6]मता; सोडीना दुष्ट चित्त हें पर ममता. ।
न तगे हृदयीं विषमीं; जाणतजाणतहि सेवितों बा! विष मी! ॥ ४१
ऐसें मम मन, ताकीं आवडि फार; प्रिया जया ममता कीं. ।
भवदुक्त्यमृतांत रुची न चिर धरि अभाग्य, साउलि न [7]सुरतरुची. ॥ ४२
[8]वागमृतसुधारा हे [9]भग्नमनोभाजनांत न बुधा! राहे; ।
न धरि [10]हृदयतितउ पळ [11]त्वदुदितजळ, शुष्क [12]सिंधुनिपतित [13]उपळ. ॥ ४३
माया भ्रमहेतु जगा भगवंताची, असे विदित हें तुज गा! ।
कोप करुं नको; टिकवे न इच्छ्या मथनीं, प्रयत्न जरि कोटि कवे! ॥ ४४
कोणाहि नको [14]टिपरी हे नाकींची, श्रमेहि जन कोटि परी. ।
हरि करिल दया, तर ती हरिलचि; [15]मायाब्धि सेतुनें या तरती. ॥ ४५
तो प्रभु यदुराज [16]गतिप्रद अवतरला; करील [17]विभरा [18]जगती. ।
त्या करितों मी नमन; '[19]श्रीशपदामृतनिधींत हो मीन मन.' ॥ ४६
अक्रूरास कळे, हा नृप वदतां आणि पाहतां, [20]सकळेहा. ।
मग सुहृदाज्ञा त्यानें घेउनि, नमिलें [21]विमुक्तिदा, ज्ञात्यानें. ॥ ४७
करुणाघनदेवाचे पाय नमी; वृत्त सर्वहि वदे वाचे. ।
पुरले काम मनाचे; [22]अक्रूरमयूर, विसरुनि श्रम, नाचे. ॥ ४८

## सज्जनप्रार्थना.

(श्लोक.)

माजा प्रेमा सुदामा [23]हरिसख दुबळा; [24]शब्दसंदोह जो, हे
साधूंपासीं [25]श्रुतींनें पदर पसरुनी, जोडिले स्वल्प पोहे; ।

१. पृथ्वीवर. २. रोग्यास. ३. कानास. ४. लहरी. ५. हर्षसमुद्राचीच. (प्रमुद्+अब्धीचीच.) ६. अत्यंत मान्य झालेली. ७. कल्पवृक्षाची. ८. वाणीरूपी अमृतधारा. ९. मनोरूपी फुटक्या भांड्यांत. १०. हृदय ही चाळण. ११. तुझा उपदेश हें उदक. १२. समुद्रांत पडलेला. १३. दगड. १४. चिमटा. (नाकास टिपरी लावणें ही एक शिक्षा आहे.) जरी ही शिक्षा आवडत नाहीं तरी जनकोटि अपराध करून श्रमे=शिक्षा भोगते. १५. मायारूप समुद्र. १६. गति (मुक्ति) देणारा. १७. भाररहित. १८. पृथ्वी. १९. विष्णुपदरूप अमृतसमुद्रांत. २०. सकळ इच्छा. २१. मुक्ति देणाऱ्या (कृष्णास). २२. अक्रूररूपी मोर व तिकडे अक्रूर आणि इकडे मोरोपंत. २३. हरीचा मित्र. २४. शब्दसमूह. २५. कानानें.

या दीनो[1]पायनातें [2]बुधजनभगवान् प्रीतिनें, फार गोडी
आणूनि, [3]श्रोतृवक्रीं भरिल, बहु दया मानुनी तेहि थोडी. ॥ १

नसे तादृक् [4]चेतोहर गुण जरी, साधु तरि या
वरू, [5]चूडारत्नीकृतविधुहि जैसा [6]धुतरिया; ।
भले सद्विद्यांचे नद करिति ते लोभ, विहिरा[7]
तयांचा मी; कर्ला जडहि घडिला शोभवि हिरा. ॥ २

अभय दिधलें आहे, वाहे श्रुतिप्रतिभा झरा;
[8]विधुमणिचिया सारा [9]तारप कारण पाझरा; ।
जडहि कविता जोडी, गोडी गुणीं हरिच्या बरी;
सहज तुमचा दीना हीना प्रसाद समुद्धरी. ॥ ३

प्रसाद तुमचा [10]कलानिधिहुनी गुणें [11]आगळा;
हरी [12]नतमनोमळा, [13]निजसुरद्रुमाचा मळा. ।
करी रत सदा [14]बळानुजपदीं मना चंचळा;
सुखेंचि पुरवी [15]लळा; [16]सुचिर कीर्ति दे [17]उज्ज्वळा. ॥ ४

श्रीम[18]द्भागवतामृतोदधि तुम्ही, अर्थज्ञ ते मेघसे,
आम्ही चातक पाहतों मुख, [19]तृषासंशुष्क ज्याचे घसे, ।
पीतां द्वि त्रि कण, क्षणीं सुख गमे [20]तृप्त्युत्थ [21]गाढें; कर
[22]ब्राह्मीचाहि लिहों शकेचि न, असो तें, ग्रंथ हा ढेंकर. ॥ ५

रामकृष्णचरणीं [23]समर्पित ग्रंथ; हो रसिकचित्त [24]तर्पित; ।
न [25]प्रमादभव दोष राहवू; [26]सत्प्रमोदनयनोद वाहवू. ॥ ६

---

१. गरिबाच्या नजराण्याला. २. बुधजनरूपी कृष्ण. ३. कर्णरूपी मुखांत. ४. मनोहर. ५. चूडारत्न (शिरोमणि) केलें आहे विधूस (चंद्रास) ज्याणें तो=शिव. ६. धोतऱ्याला वरतो. ७. झरा. ८. चंद्रकांताच्या. ९. ताराकांत=चंद्र. १०. चंद्राहून. ११. अधिक. १२. शरणागताच्या मनांतील मळास. १३. आपल्या कल्पवृक्षांचा. १४. कृष्णपदीं. १५. हौस. १६. सर्वदा. १७. या श्लोकांत 'ळा' या अक्षराची आवृत्ति वारंवार झाली आहे म्हणून ह्यांत अनुप्रासालंकार आहे. १८. श्रीमद्भागवतरूपी अमृताचा सागर. १९. तहानेनें अत्यंत वाळलेले. २०. तृप्ति+उत्थ=तृप्तीपासून झालेले. २१. मोठें. २२. सरस्वतीचा. २३. अर्पण केलेला, दिलेला. २४. तृप्त. २५. मोहापासून होणारा. २६. सदानंदाचे अश्रु.

# THE KRISHṆAVIJAYA

OF

# MOROPANTA.

(THE GREAT MARÂTHÎ POET OF THE MAHÂRÂSHTRA.)

## PART II.

" *A great poem is a fountain for ever overflowing with the waters of wisdom and delight.*"—*SHELLEY.*

*EDITED WITH*

CRITICAL AND EXPLANATORY NOTES

BY

VÂMANA DÂJÎ OKA.

HEAD MASTER, HIGH SCHOOL, RAIPORE.

PRINTED AND PUBLISHED

BY

TUKÂRÂM JÂVAJÎ,

PROPRIETOR OF JÂVAJÎ DÂDÂJÎ'S "NIRṆAYA-SÂGARA" PRESS.

Bombay.

1894.

*Price* 1¾ *Rupees.*

# महाराष्ट्रकविवर्यमोरोपंतकृत

# कृष्णविजय.

## उत्तरार्ध.

इह मुख्य कलोपेतः कोऽभवत्कविनायकः ।
इति मीमांस्यमाने तु मयूरेशः स्मरत्यलम्. ॥
विठोबा अण्णा.

हा

**वामन दाजी ओक**

हेडमास्तर, हायस्कूल, रायपूर.

यांनीं अर्थनिर्णायक, साहित्यशास्त्रविषयक व अवांतर माहितीच्या टीपा देऊन तयार केला.

आणि

मुंबईत जावजी दादाजी यांच्या 'निर्णयसागर' छापखान्याचे मालक तुकाराम जावजी यांनीं छापून प्रसिद्ध केला.

१८९४.

किंमत १॥। रुपये.

महाराष्ट्र भाषेचें व कवितेचें

आस्थापूर्वक अध्ययन

करूं पाहणाऱ्या सज्जनांस

हा ग्रंथ

सप्रेम अर्पण करतों.

'काव्यसंग्रह'कार.

# अनुक्रमणिका.

# मोरोपंतकृत कृष्णविजय.

## उत्तरार्ध.

### अध्याय पन्नासावा.

(आर्यागीतिवृत्त.)

[1]अस्ति प्राप्ती [2]जाया कंसाच्या मागधाचिया तनुजा या, ।
सांगति [3]दुःसह तापा आपुलिया शीघ्र रडत जाउनि बापा. ॥ १
निजकन्या दुःखार्ता पाहुनि, [4]हे आयकोनि अप्रिय वार्ता, ।
चित्तांत धरि क्रोधा वीर जरासंध धीर [5]अप्रतियोधा. ॥ २
मानी [6]तो नृप कोपें [7]यदुकुळसंहारकर्म केवळ सोपें, ।
शूरवरांच्या [8]सोळा सातहि [9]अक्षौहिणी चमू करि गोळा. ॥ ३
[10]सहसा मथुरा रोधी शूर जरासंध उग्र परम क्रोधी, ।
तो [11]लोकगिलनलुब्ध प्रलयोदधि काय जाहला संक्षुब्ध ? ॥ ४
[12]झालें निजपुर रुद्ध, स्वजन भयाकुळ [13]गिरिव्रजेशविरुद्ध, ।
[14]सहसोपस्थित युद्ध, प्रभु जाणे मनिं म्हणे, 'करूं यश शुद्ध; ॥ ५
आलें [15]रिपुबल फार [16]क्षितिचा उतरीन हा [17]सुदुर्वह भार, ।

---

१. अस्ति आणि प्राप्ति या नांवांच्या कंसाच्या जाया (स्त्रिया) ज्या मगधपतीच्या (जरासंधाच्या) तनुजा (कन्या) त्या. २. महिषी. ३. कंसवधजन्य जो दुःसह ताप त्यातें आपल्या बापास (जरासंधास) सांगती. ४. हे (ही) कंसवधरूप अथवा कन्यावैधव्यरूप अप्रिय वार्ता ऐकून. ५. कोणी प्रतिद्वंद्वी ज्यास नाहीं असा. (जरासंध.) ६. तो अभिमानी जरासंध राजा. ७. यादवकुळसंहाररूप कर्म. (कुळ=सजातीयगण; 'सजातीयगणे गोत्रे गेहेऽपि कथितं कुलम्' इति सुधा.) ८. सोळा आणि सात म्हणजे तेवीस अक्षौहिणी सैन्य. (दशम स्कंध—अध्याय ५० श्लोक ४ पहा.) ९. अक्षौहिणी या संबंधानें पुढील कोष्टक लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहेः—१ रथ, १ गज, ३ घोडे, ५ पायदळ=१ पत्ति; ३ पत्ति=१ सेनामुख; ३ सेनामुखें=१ गुल्म; ३ गुल्म=१ गण; ३ गण=१ वाहिनी; ३ वाहिन्या=१ पृतना; ३ पृतना=१चमू; ३ चमू=१ अनीकिनी; १० अनीकिनी=१ अक्षौहिणी. १०. एकाएकीं मथुरापुरी रोधी (वेढी). ११. लोकांस गिळण्याची इच्छा धरणारा प्रलयसमुद्रच काय? १२. मथुरापुर रुद्ध झालें. १३. गिरिव्रजनामक पुराचा ईश जरासंध त्याशीं विरुद्ध असें युद्ध. १४. अकस्मात् उद्भवलेलें. (सहसा+उपस्थित.) १५. शत्रूचें सैन्य. १६. पृथ्वीचा. १७. वाहण्यास फार कठीण असा.

[1]मगधपतिस सोडावें कीं याणें यापरीच बळ जोडावें. ॥ ६
भूभार हराया मी अवतरलों कीं स्वयें त्रिभुवनस्वामी, ।
[2]साधूंतें ताराया, दुष्टातें आपुल्या करें माराया'. ॥ ७
ऐसें ध्यातां तर्क क्षण मानी ज्यांसि गगनमार्गीं [3]अर्क, ।
[4]ऐसीं [5]प्रभुरथरत्नें उतरति, जय देति जीं रणीं [6]लघुयत्नें. ॥ ८
कृष्ण म्हणे [7]आर्याला, 'अवतरलों यदुकुळांत ज्या कार्याला ।
त्याची आली वेळा, बैसा [8]स्वरथीं, रणांगणीं या खेळा; ॥ ९
नाशुनियां भूभार, व्यसनापासुनि करा [9]स्वजनतोद्धार, ।
[10]यदुचक्र विलोकुं[11] तुका[12] '[13]हरिसीं रिपु[14]मृगगणीं करा हो! कुतुका.'॥ १०
करुनि असा शुभ मंत्र[15], [16]प्रभु झाले [17]सज्ज [18]सज्जनीं परतंत्र. ।
घेउनियां [19]बळ अल्प द्विषि[20]वनीं शिरति [21]वन्हिमारुत[22]कल्प. ॥ ११
[23]हरिदरनादें कंपा[24] पावति, गर्जे न तेंवि[25] पडतां शंपा[26]. ।
हस्तीतें [27]हरिनाम व्याकुळ करि, [28]गर्जितां नये कां घाम? ॥ १२
करि मागध तो निंदा, पाहुनि [29]युद्धेच्छु [30]साग्रजा गोविंदा, ।
'आलासि बरा कामा स्वभुजीं रंगांत सुखविला बहु [31]मामा. ॥ १३
तुजसीं अधमा! [32]बाळा! युद्धीं मज [33]लाज वाटत्ये भूपाळा; ।

---

१. मगधपति जरासंध यानें वारंवार सैन्य जमवावें या कारणानें त्यास न मारतां सोडावें. २. दशम स्कंध—अध्याय ५० श्लोक ९-१० पहा. ३. सूर्य. ४. सूर्यासारखीं तेजस्वी. ५. सूर्याची भ्रांति देणारीं अशीं तेजोमय रथरत्नें आकाशांतून उतरलीं. ६. अल्प प्रयासानें. ७. बळरामाला. (दशम स्कंध—अध्याय ५० श्लोक १२-१५ पहा.) ८. आपल्या रथांत बसा आणि या रणांगणीं खेळा म्हणजे क्रीडा करा. ९. स्वकीय जनता (जनसमूह) तिचा उद्धार. १०. यादव-समूह. ('चक्र' म्हणजे 'समूह'. या शब्दाचे अनेक अर्थ आहेत:—'चक्रः कोके पुमान्, क्लीबं वज्रे सैन्यरथांगयोः । राष्ट्रे दंभांतरे कुंभकारोपकरणास्त्रयोः । जलावर्तेऽपि' इति मेदिनी.) ११. कौतुक पाहों. १२. तुम्ही हरिशीं (सिंहासीं तुका=सम व्हा.) १३. हा दृष्टांत मूळांत नाहीं. पंतांनीं स्वकल्पनाचातुर्यानें योजिला आहे. १४. शत्रुरूप मृगसमूहांत कौतुक करा. १५. उत्तम विचार. १६. रामकृष्ण. १७. बद्धकवच. १८. स्वभक्तवश. १९. सैन्य. २०. शत्रुरूप अरण्यांत. २१. एक अग्नि, एक वारा. २२. तुल्य, समान. २३. कृष्णाच्या शंखशब्दानें. २४. शत्रु कंपातें पावले. २५. जेंवि कृष्णाचा शंख गर्जे, तेंवि शंपा (वीज) पडतां न गर्जे. २६. हा दृष्टांत पंतांनींच योजिला आहे. २७. सिंहाचें नांव. २८. सिंहगर्जना ऐकतां हत्तीला घाम कां येणार नाहीं? २९. रामकृष्ण युद्धेच्छु पाहून. ३०. बळदेवासह. ३१. मामा कंस. ३२. तूं अधम बाळ; तुजसीं युद्ध कराया मज भूपाळा लाज वाटते. ३३. अध्याय ५० श्लोक १८ पहा.

मजसह समरीं गोपा[1] ! योग्य न तूं, नव्हसि पात्र मागधकोपा.[2] ॥ १४
श्रद्धा[3] जरि तरि रामा[4] ! धैर्य[5] गदा धरुनि ठाक तूं संग्रामा. ।
निजबाणच्छिन्न शिवासेव्य[6] असो काय कांय रक्षुनि अशिवा?[7]' ॥ १५
कृष्ण[8] म्हणे, 'राजा जे शूर न बोलति मुखें भुजें तें[9] साजे; ।
बोले आसन्नमृती[10] तैसा तूं शब्द, कोण घेईल[11] कृती?' ॥ १६
धरि मोठा आव रणा, करि सैन्यें प्रभुरथाचिया आवरणा,[12] ।
रविला मारुत[13] अभ्रें कीं पटलें रेणुच्या शिखीस अदभ्रें. ॥ १७
हें पाहोनि पुरस्त्री भ्याल्या,[14] कीं शस्त्रवृष्टि करिती शस्त्री,[15] ।
दिसती केवळ केतू,[16] न प्रभु, जे सर्वलोकजीवनहेतू.[17] ॥ १८
मेघांचे आवांके[18] किति? वृष्टिभरें नगेंद्र कैसा वांके? ।
इतरासह्यें[19] अजि तीं परि करितिल काय शत्रुसैन्यें अजितीं? ॥ १९
शार्ङ्गाभिध[20] वरधनु[21] तें केलें रविमंडल क्षणें विबुधनुतें,[22] ।
शर तेहि अहो! किरण, द्विड्बळ[23] तम, अमरवृंद अवलोकि रण. ॥ २०
प्रभुबाणदलितशूरद्विपहयपादातिकायशोणितपूर[24] ।
वाहति, उसळति दूर, व्योमपथीं,[25] रक्तबिंदु न्हाणिति सूर.[26] ॥ २१
रामकरीं हळ[27] मुशळ प्रेक्षुनि पावेल काय रिपुबळ कुशळ? ।
वाहति फारचि खोल, क्षतजनदी[28] तत्तटांत[29] मांसचिखोल. ॥ २२

---

१. हे गवळ्या. २. मागध राजाच्या कोपास तूं पात्र नव्हस. ३. तुला जर युद्धश्रद्धा असेल तर. ४. हे बळरामा. ५. गदा आणि धैर्य धरून युद्धास उभा राहा. ६. तुझा काय (देह) माझ्या बाणांनीं छिन्न होऊन कोल्ह्यांस (शिवांतें) भक्ष्य असो. ७. अशिवा अपवित्रा देहा रक्षुनि फळ काय? ८. अध्याय ५० श्लोक २० पहा. ९. तें पराक्रमकृत्य. १०. मरणोन्मुख बडबड करतो. ११. ऐकून घेईल, तुझा शब्द कोण सुज्ञ ग्रहण करील? १२. सैन्यानें प्रभुरथ वेष्टिला. १३. वायु जसा अभ्रें रविला किंवा अदभ्रें (विपुलें) रेणुच्या पटलें शिखीस (अग्नीस) झांकितो. १४. मोह पावल्या. (श्लोक २२.) १५. शस्त्रधारी वीर. १६. ध्वज मात्र दिसत होते. १७. सर्व लोकांचे प्राण वांचण्याविषयीं हेतु असे प्रभु. १८. धैर्य. १९. कृष्णेतरास असह्य तीं शत्रुसैन्यें अजितीं (कृष्णीं) काय, करितील? २०. शार्ङ्ग नांवाचें धनुष्य; (शृंगस्य विकारः शार्ङ्गम्=धनु.) २१. उत्तम शरासन. २२. देवस्तुतें. (कृष्णें.) २३. शत्रुसैन्य. २४. कृष्णाच्या बाणांनीं मारलेल्या वीरांच्या, हत्तींच्या-घोड्यांच्या, व सैनिकांच्या शरीरांतील रक्ताचे पूर. (अध्याय ५० श्लोक २६ पहा.) २५. आकाशमार्गांत. २६. सूर्यातें. २७. नांगर. बळरामाचीं आयुधें मुसल आणि हल असल्यामुळें त्याला मुसली हली सीरपाणि अशीं नांवें 'अमरकोशां'त दिलेलीं आढळतात. २८. रक्तनदी. २९. रक्तनदीच्या कांठीं मांसाचा चिखल.

[1]मायामानुषवेष प्रभुपासुनि राहिला [2]जरासुत शेष, ।
[3]लुप्तोडुकरस्तोमव्योमीं [4]विच्छाय जेंवि दिवसा [5]सोमें. ॥ २३
[6]सिंहातें सिंह जसा राम धरी विरथ मगधपतितें सहसा, ।
वारुणपाशीं बद्ध द्वेष्टा केला [7]विनष्टयुद्धश्रद्ध. ॥ २४

'न वधा' म्हणोनि जोडी कर, हरि जाणोनि भाव, रामहि, [8]सोडी. ।

मग [9]दोघे जयशाली म्हणति मनीं, 'अल्पसी धरा [10]हळु झाली.' ॥ २५
होय [11]मगधपति [12]खिन्नस्वांत म्हणे, 'विधि[13]विलास केवळ भिन्न; ।
मुख [14]अश्रुजलक्लिन्न, स्वजनमनोरथतरू करील च्छिन्न. ॥ २६
जावें, तपचि करावें विजनवनीं, [15]भूमिधरगुहेंत [16]भरावें, ।
आप्तांसि न या तोंडा [17]दावावें, [18]नृपपदावरि पडो धोंडा.' ॥ २७
झाली मोटी हाणी ऐसें चित्तांत तो जरासुत आणी, ।
वनमार्गीं नृपवर्या भूप म्हणति, '[19]तूंज योग्य न तपश्चर्या. ॥ २८
हो सावध [20]नृपरत्ना ! पुनरपि विजयार्थ सिद्ध हो, करिं यत्न; ।
आम्ही सर्व सहाय, प्रभु तूं, यादव [21]वैराक ते किति काय? ॥ २९
कोण पराभव नाहीं पावत हें नीतिबुद्धिच्या [22]भवनाहीं ।
आणावें स्वमनींच, व्याकुळ होताति पावतां श्रम [23]नीचें. ॥ ३०
निजनगराला चाला, [24]यदुमृगयूथीं फिरोनि घाला घाला, ।
[25]सिंहें तुम्ही, हा काय! व्यर्थ [26]उपेक्षाविचार अजि हा काय?' ॥ ३१
इत्यादि [27]प्रियें [28]यांचे बोलति ते बोल वाटले बहु साचे, ।

---

१. मायेनें मनुष्यरूप धरिलें आहे ज्यानें असा. २. जरासंध अवशिष्ट राहिला. ३. नक्षत्रें (उडु) आणि किरण (कर) यांचा समूह (स्तोम) ज्यांत लोप पावला अशा आकाशांत. ४. तेजोहीन. (छाया=कांति. 'छाया सूर्यप्रिया कांतिः प्रतिबिंबमनातपः' इत्यमरः.) ५. चंद्र. ६. अध्याय ५० श्लोक ३१-३२ पहा. ७. युद्ध करण्याची हौस ज्याची नष्ट झाली असा. ८. न मारतां सोडी. ९. रामकृष्ण. १०. हलकी. ११. जरासंध. १२. खिन्नमना. (स्वांत=मन.) १३. दैवगति. १४. बाष्पांनीं भिजलेलें. १५. भूमिधराच्या (पर्वताच्या) गुहेंत. १६. शिरावें. १७. पराभव झाला असतां लज्जा उत्पन्न होऊन आप्तांला तोंड दाखवूं नये अशी रूढि आहे. १८. राज्यपदावर. १९. हें राजाचें भाषण मूळांत नाहीं. पंतांनीं प्रसंग मनांत आणून स्वकल्पनेनें योजिलें आहे. पंतांनीं वर्णनाविस्तार केल्याचें हें एक उदाहरण आहे. अशीं उदाहरणें पंतांच्या ग्रंथांत फार थोडीं आहेत. २०. हे नृपवर्या. (रत्न=उत्तम, श्रेष्ठ. 'रत्नं स्वजातिश्रेष्ठेऽपि मणावपि नपुंसकम्' इति मेदिनी.) २१. तुच्छ, दुर्बळ. २२. गृहांनीं. २३. पराभवानें नीच श्रम पावतात. २४. यादवरूप मृगांच्या कळपावर. २५. सिंह तुम्ही यदुमृगयूथीं पुनः घाला घाला. २६. उपेक्षा करण्याचा विचार व्यर्थ. २७. मित्र. २८. जरासंधाचे.

मग टाकुनियां दैन्य, स्वपुरा जाऊनि, मेळवी नृपसैन्य. ॥ ३२
बळकृष्णांउपरि सुरीं[1] केली सुमवृष्टि,[2] हर्ष होय बहु पुरीं,[3] ।
अक्षतबळ[4] बळशाली जाती, सर्व प्रजा सुखी बहु झाली. ॥ ३३
करुनि असें वरयुद्ध, प्रभुवर्य अनंत जोडिती जें शुद्ध,[5] ।
या करिति धना पात्र स्वनृप स्वीकारिति स्वयें यश मात्र. ॥ ३४
मगधेंद्रें संक्रुद्धें केलीं पहिल्यापरीच सतरा[6] युद्धें ।
अंतीं आपणचि उरे, कीं चित्त भरीं भरे म्हणे न 'रण पुरे.' ॥ ३५
तो समरांगणकुंडीं[7] बळहरिबाहुप्रतापपावकतुंडीं[8] ।
होमी आणूनि बळें तेविस अक्षौहिणी, वरी अयशफळें.[9] ॥ ३६
आणिक 'हा अठरावा संग्राम प्रभुसवें' म्हणेचि 'करावा.' ।
तों यदुचक्रद्वेषी[10] काळयवन ये सुरर्षि[11] ज्यास प्रेषी.[12] ॥ ३७
रोधी मथुरा, कोटित्रयवीर म्लेच्छ, रीति ज्याची खोटी. ।
पाहुनि जिस शतकोटिप्रहरणही[13] भी, असीं चमू बहु मोटी. ॥ ३८
श्रीकृष्ण म्हणे, 'आर्या![14] काळयवनवाहिनी[15] असी अनिवार्या;[16] ।
आजि उद्यां[17] कीं परवा नृप[18] येइल, न धरि आमुची जो परवा.[19] ॥ ३९
आम्ही दोघे यवनध्वंसीं[20] गुंतों, अशांत तो[21] जरि जवन[22] ।
येइल, दुःसह पवन[23] ज्वलन[24] तसे मग घडे कसें सुहृदवन?[25] ॥ ४०
नरदुर्गम[26] दुर्ग[27] करूं, ज्ञाती ठेवूनि तेथ मग शस्त्र धरूं, ।
काळयवन खळ मारूं, ऐसे व्यसनार्णवांत यादव तारूं.' ॥ ४१

---

१. देवांनीं. २. पुष्पवृष्टि. (अध्याय ५० श्लोक ३६.) ३. द्वारकापुरींत. ४. ज्यांचें बळ क्षीण झालें नाहीं असे. ५. जें शुद्ध धन जोडिती त्या धनास नृप (उग्रसेन) पात्र करिती, आणि यश मात्र आपण घेती. ६. अध्याय ५० श्लोक ४२ पहा. ७. युद्धस्थान हेंच कुंड त्यांत. ८. बळराम आणि कृष्ण यांचा बाहुप्रताप (भुजपराक्रम) हाच पावक (अग्नि) त्याच्या मुखांत. ९. त्या यज्ञाचीं अयशोरूप फळें वरी. १०. यादवांचा शत्रु कालयवन. ११. नारद. नारदानें कृष्णाचीं लक्षणें सांगून कृष्णावर त्यास पाठविलें. १२. प्रेरी, पाठवी. १३. वज्रायुध इंद्रहि. (शतकोटि=वज्र आहे प्रहरण=आयुध ज्याचें तो. शत=शंभर आहेत कोटि=धारा ज्याला तें शतकोटि=वज्र.) १४. संकर्षणा! बळरामा! १५. काळयवनाची सेना. १६. जिचें निवारण होणें कठीण अशी. १७. अध्याय ५० श्लोक ४७ पहा. १८. जो आमची परवा न धरी असा नृप कालयवन. १९. हा फारशी शब्द आहे. २०. यवन मारण्याच्या कामांत. २१. जरासंध. २२. वेगवान्. २३. वारा. २४. अग्नि. २५. आप्तरक्षण. (सुहृद्+अवन=मित्र+रक्षण.) २६. मनुष्यांस जाण्यास कठीण असें. २७. किल्ला.

नाशाया यदुकष्टा[1] देवें आज्ञापिला सुनिपुण त्वष्टा[2]. ।
दुर्ग समुद्रीं रचिलें, तेणें[3] जें रजत[4]हेमरत्नीं खचिलें. ॥ ४२
द्वादशयोजन[5] रचना दुर्गाची, अद्भुताचि न विषय वचना[6]. ।
मुक्तिपुरी[7] असि साजे स्वर्गहि ज्या द्वारकेसि पाहुनि लाजे. ॥ ४३
योगबळानें[8] अजन[9] क्षणमात्रें तेथ ने समस्त स्वजन. ।
न कळों दे प्रभुवर्य[10] स्वपरांसहि तें असें करी आश्चर्य. ॥ ४४
ठेवी मथुरेंत बळा[11] संरक्षाया निजप्रजांस प्रबळा[12]. ।
मग आपण जयशाली स्वपुराबाहिर निघे सरोरुहमाळी[13]. ॥ ४५

## अध्याय एकावन्नावा.

तो यवनांचा भूप[14] प्रभुचें[15] पाहे जगन्मनोहर[16] रूप; ।
नारदकथितें[17] सारीं ओळखिलीं लक्षणें भगवदाकारीं[18]. ॥ १
यवन म्हणे, ‘एकाकी[19] पत्ति[20] हरी यान[21] सैन्य शस्त्रें टाकी, ।
तरि आपण काशाला ध्यावें भुज हेचि फार[22] रिपुनाशाला.’ ॥ २
प्रभुमागें मंदमती[23] एकाकी धांवला स्वयें यवनपती[24]. ।
‘योगिमनोदुष्प्रापा[25] धरिन’ म्हणे पापमूर्ति हा ‘निष्पापा.’ ॥ ३
सांपडलोंसें दावी प्रभु, खळ धरितों[26] क्षणांत ऐसें मानी[27]. ।
यवनास असें फटवी[28] ने दूर[29] विलंघि फार भूमिभृदटवी[30]. ॥ ४
यवन म्हणे, ‘पाठ[31] शुभा[32] देसी मजचि न, यदूद्वहा[33] ! ठाक[34] उभा; ।
काय पराङ्मुख पळसी? अयश[35]:कज्जळ कुळासि लाविसि मळसी.’ ॥ ५

---

१. यादवांचें संकट. २. विश्वकर्मा. ३. विश्वकर्म्यानें. ४. रुपें, सोनें, रत्नें यांनीं. ५. अध्याय ५१ श्लोक ५०-५१ पहा. ६. वाणीला वर्णन करण्यास विषय नव्हे अशी (रचना.) ७. द्वारका. ८. मायाशक्तीनें. (कालयवनास अथवा अन्य जनास कळणार नाहीं अशा रीतीनें.) ९. कृष्ण. १०. कृष्ण. ११. बळरामास. १२. हें बळरामाचें विशेषण. १३. कमलमालाधारी (सरोरुह=कमळ), पद्ममाली. १४. कालयवन. १५. कृष्णाचें. १६. जगताचें मन हरण करणारें असें. १७. नारदानें सांगतलेलीं. (अध्याय ५१ श्लोक १-४.) १८. भगवत्+आकारीं=श्रीकृष्णाच्या आकृतींत. १९. एकटा. २०. पादचारी. २१. वाहन. २२. पर्याप्त. २३. मूढबुद्धि. २४. कालयवन. २५. योग्यांच्या मनासही दुष्प्राप (मिळण्यास अशक्य) अशा निष्पापा कृष्णास. २६. कृष्णाला धरितों. २७. मानी. २८. फसवी. २९. अध्याय ५१ श्लोक ६-७ पहा. ३०. भूमिभृत्+अटवि=पर्वत आणि अरण्य. ३१. पाठ देणें=शुभा पाठ देणें किंवा दाखविणें=युद्धादिसंकटप्रसंगीं स्वकल्याणास विमुख होऊन पळून जाणें. ३२. स्वकल्याणास. ३३. हे यदुश्रेष्ठा कृष्णा. ३४. युद्धास तयार हो. ३५. अयश हें काजळ.

[1]शंभुवर प्रतिपाळी, स्वीकारी भी[2]रुरीतिला [3]वनमाळी. ।
[4]स्वाधिक्षेप न मानी, हांसे खळ, परि न पूज्यसत्कृतिहानी. ॥ ६
मग विश्वनिवास [5]दरीमाजि शिरे, तोहि त्याचिमागें [6]सदरी; ।
झाला प्रभुवर गुप्त, म्लेच्छेंद्रें तेथ देखिला नर सुप्त. ॥ ७
'आणुनियां दूर मला, साधु निजेला गुहेंत पळतां श्रमला.' ।
ऐसें श्री[7]मदमत्ता वाटे मग मूढ [8]त्यास मारी [9]लत्ता. ॥ ८
स्वप्राणांचा [10]अत्ता सिंह उठविला [11]गजेंचि मारुनि लत्ता. ।
मग कैंचें कल्याण? [12]द्विपमाथां घालि [13]केसरी [14]पल्याण. ॥ ९
उघडुनि नेत्र न्यहाळी, तों [15]निजतनुवन्हि **काळ**यवना जाळी. ।
ऐसाचि विजयशाळी [16]मुचुकुंद नृप स्वयें सुरां जो पाळी. ॥ १०
इक्ष्वाकुकुळीं ख्याता कीर्ति जयाची नृपाळ जो [17]मांधाता. ।
[18]तत्सुत [19]असुरव्राता [20]भयदायक [21]हो [22]स्वरीश्वराचा त्राता. ॥ ११
देवांच्या सेनानीं हा [23]वरिला, मग [24]महेशसुत [25]सेनानी. ।
झाले बहुयुग कष्ट [26]व्यासंगें [27]आप्त सुचिरकाळें नष्ट. ॥ १२

---

१. एकवार कृष्णाचा पराभव करशील असा शिवाचा वर यवनास होता, तो कृष्णानें पाळिला. २. भित्र्याच्या रीतीला. ३. जो वनमाला धारण करतो तो. 'आपादपद्म या माला वनमालेति सा मता' इति कलिंगः; अथवा—'आजानुलंबिनी माला सर्वर्तुकुसुमोज्वला । मध्ये स्थूलकदंबाढ्या वनमालेति कीर्तिता ॥' तात्पर्यार्थ—कंठांत घातली असतां पायांपर्यंत पोंचणाऱ्या मालेला वनमाला असें नांव आहे. श्रीकृष्णाची माला पूर्वोक्त प्रकारची असे म्हणून त्याला 'वनमाली' असें नांव आहे. ४. निजउपहास. ५. पर्वतगुहेंत. ६. दुष्टयवन. (सद्+अरि=साधूंचा शत्रु. 'सन्साधौ धीरशस्तयोः । मान्ये सत्ये विद्यमाने त्रिषु' इति सुधा.) ७. संपत्तिमदानें माजलेल्या यवनास. ८. त्या निजलेल्या मुचकुंद राजाला (अध्याय ५१ श्लोक १०.) ९. लाथ. १०. भक्षिता. (अद्=भक्षणें.) ११. हा दृष्टांत मूळांत नाहीं. १२. गजाच्या मस्तकावर. १३. सिंह. १४. आसन. १५. स्वशरीरोत्पन्न अग्नि. १६. मुचकुंद नामक राजा. हा मांधाता राजाचा कनिष्ठपुत्र. यानें देवांस साहाय्य केलें म्हणून त्यांनीं यास निद्रा करण्यास निवांत स्थळ, निद्राभंग करणारास त्याच्या दृष्टिपातानें मृत्यु, आणि तत्क्षणींच विष्णुदर्शन, असे तीन वर दिले. गुहेंत निजला असतां मुचकुंदास कालयवनानें जागें केलें म्हणून कालयवन त्याच्या कोपानलानें दग्ध होऊन मरण पावला. १७. हा इक्ष्वाकुकुलोत्पन्न युवनाश्वराजाचा पुत्र. हा पित्याच्या कुक्षींतून बाहेर आला, आणि दुग्धपानार्थ रडूं लागला. तेव्हां इंद्र म्हणाला, 'हा पुत्र मला पिईल (मां धास्यति).' यामुळें यास 'मांधाता' असें नांव पडलें. (द्रोणपर्व—अध्याय ६२.) १८. मांधातृसुत. १९. दैत्यसमूहास. २०. भय देणारा. २१. मुचकुंद. २२. इंद्राचा. (स्वर्+ईश्वराचा=स्वर्गाच्या+प्रभूचा.) २३. सेनापतित्वें वरिला. २४. शिवपुत्र कार्तिकस्वामी. २५. सेनानायक, सेनाग्रणी. २६. युद्धप्रसंगानें. २७. तत्कालीन आप्तवर्ग.

न पहाती [१]सदृश वर [२]स्वपरित्रात्यासि द्यावया [३]त्रिदशवर. ।
'चिरनिद्रा सेव, रहा, उठविल तो [४]भस्म '[५]हो' म्हणति 'घे वर हा.'॥ १३
तो [६]हा जागा केला जेणें तत्काळ **काळ**यवनहि मेला. ।
तों उगवे [७]अमृतकरश्याम श्रीवत्सकांक [८]नतपापहर. ॥ १४
पाहे [९]त्रिभुवननम्या रम्या वेदांतसाधुसेवनगम्या. ।
साहे तेज न [१०]तो तें जरि चित्तीं धैर्य शौर्य पुष्कळ होतें. ॥ १५
भूप म्हणे, '[११]महनीया ! तूं कोण ? भ्रमसि कां [१२]पदीं [१३]गहनीं या ? ।
चरण तुझे मृदु, कांटे [१४]कठिनांचे नग दरी वनें हे वांटे. ॥ १६
दिससी अद्भुतकाय, [१५]प्रकटिततेजस्वितेज तें तूं काय ? ।
ताप न करिसि, न [१६]भानू, अकलंक म्हणोनि चंद्र तुज ना मानू.॥ १७
इंद्रासीं बहु [१७]दाटी, जाणे मी सर्व [१८]निर्जरांची [१९]धाटी. ।
तूं **विष्णु** असें वाटे, तम हरुनि तुझें गुहेंत तेजचि दाटे. ॥ १८
[२०]श्रवणीं क्षुधित [२१]श्रोत्रें, स्वमुखें वद [२२]आत्मजन्मकर्महि गोत्र. ।
लंघावा [२३]रुचिपथ न, [२४]स्वांता मानेल तरि करावें कथन. ॥ १९
आम्ही [२५]क्षीराब्धितुळीं झालों [२६]क्षत्रियसुविश्रुतेक्ष्वाकुकुळीं. ।
[२७]अस्मद्देहविधाता [२८]युवनाश्वसुत [२९]क्षितीश पति [३०]**मां**धाता. ॥ २०
हा नामेंहि [३१]**मु**कुंदप्रियजनपदपद्मरेणुधन **मुचु**कुंद. ।
[३२]चिरजागरसुश्रांत [३३]प्रबळा निद्रा म्हणोनि मोही स्वांत. ॥ २१

---

१. योग्य. २. निजरक्षक मुचकुंद यास. ३. इंद्रादिदेव. ४. नेत्राग्निद्वारा भस्म होवो. ५. होवो. ६. मुचकुंद. ७. कृष्णचंद्र. ८. शरणागताच्या पापाचें हरण करणारा. ९. त्रिभुवनास नम्य (नमस्कार्य), रम्य (मनोहर) आणि वेदांत (उपनिषद्), साधुसेवन (गुरुसेवा) यांहीं करून मात्र गम्य (प्राप्य) अशा कृष्णातें पाहे—असा अन्वय. १०. मुचकुंद. ११. हे पूजनीया! (अध्याय ५१ श्लोक २८-३६.) १२. पायांनीं. १३. अरण्यांत. १४. कांटे, पर्वत, गुहा, वनें हे कठोर पुरुषाचे वांटे. १५. सकल तेजस्वि पदार्थांचें तेज ज्यानें प्रकट केलें असें तें वस्तु तूं काय आहेस? १६. सूर्य. १७. फार सलगी किंवा परिचय. १८. देवांची. १९. रीति, चाल. २०. ऐकण्याविषयीं. २१. कान. २२. आपलें जन्म कर्म गोत्र सांग. २३. आवडीचा मार्ग. २४. मनास. २५. क्षीरसमुद्रासारखा शुभ्र. ('कुळीं' या शब्दाचें विशेषण.) २६. क्षत्रियांमध्यें प्रसिद्ध इक्ष्वाकूच्या कुळीं. २७. माझ्या देहाचा जनक. २८. युवनाश्वराजाचा पुत्र. २९. पृथ्वीपति. ३०. मांधातानामक. ३१. विष्णूच्या भक्तांच्या पादकमलाचे पराग तेंच धन ज्याचें असा मुचकुंद तो मी. ३२. चिरकाळ जागल्यानें थकलेला म्हणून. ३३. प्रबळ निद्रा स्वांत म्ह० चित्त मोही.

तेथें निद्रित होतों, [1]कोणैकें उठविलें बळेंचि अहो ! तों[2]. ।
झाला तत्क्षण [3]भसित [4]प्राणी तो [5]तें [6]तदीयकर्मविलसित. ॥ २२
मग या सुतृषितदृष्टिप्रति दिसली मूर्ति हे [7]सुधाघनवृष्टि. ।
हा लाभ महाभागा ! कैंचा जरि जाहलों न असतों जागा ?' ॥ २३
ऐसें ऐकोनि, कृपा करुनि, म्हणे [8]देवदेव तो, 'ऐक नृपा ! ।
लोकीं नुपजे [9]कवणा इच्छा [10]मज्जन्मनामकर्मश्रवणा ? ॥ २४
मजहि न लागे पार [11]स्वीयांचा, कीं तसींच [12]तीं बहु फार. ।
करुनि [13]उपक्रम संत ज्ञाते परमर्षि पावलेचि, न अंत. ॥ २५
मोजिलही भूमिरजें बहुजन्मीं तरि करील बहु दुष्कर जें. ।
शक्य [14]**वि**धीसहि [15]पण न त्रिजगीं [16]मज्जन्मनामगुणपरिगणन ॥ २६
परि परिसा, [17]अद्यतन [18]प्रभवादिक सांगतों, करा या जतन. ।
[19]धर्मजगद्भद्रार्थी पूर्वी मजला स्वयें [20]**वि**रिंचि प्रार्थी. ॥ २७
[21]असुरचमू बहु भार क्षितिस, तयाचा करावया [22]परिहार ।
विनवि [23]सुरव्रज **च**तुराननसह निजरक्षण [24]क्ष्मा मज चतुरा. ॥ २८
मग [25]**या**दव ताराया धरिता झालों [26]तयांत अवतारा [27]या, ।
मज **व**सुदेवापत्या ठेविति कवि **वा**सुदेव [28]अभिधा सत्या. ॥ २९
वधिला [29]सानुग **कं**स स्वभुजें जो [30]**का**ळनेमि [31]असुरवतंस ।

---

१. कोणाएकानें. २. इतक्यांत. ३. जळून राख. ४. तो कालयवन. ५. भस्म होणें. ६. त्याच्या कर्माचें फळ. ७. अमृतघनाची वृष्टिच अशी मूर्ति माझ्या तृषित दृष्टीस दिसली. ८. कृष्ण. ९. कोणाला नाहीं उपजणार? तर सर्वांस उपजेल. असा काक्वर्थ गृहणीय आहे. १०. माझें जन्म, नाम, कर्म हीं ऐकण्याविषयीं. ११. स्वकीय जन्मनामकर्मांचा. १२. जन्मनामकर्में. १३. माझीं जन्मनामकर्में मोजण्याचा उपक्रम (आरंभ) करून ज्ञाते (संत) अंत पावले नाहींत. १४. ब्रह्मदेवाला. १५. परंतु. १६. माझीं जन्में नांवें व गुण यांची गणना. १७. सांप्रतचें. १८. जन्मादिक. १९. धर्म आणि जग यांच्या कल्याणातें इच्छिणारा. (भद्र=कल्याण.) २०. ब्रह्मदेव. २१. दैत्यसेना. २२. नाश. (अध्याय ५१ श्लोक ४० पहा.) २३. ब्रह्मदेवासह देवसमूह. २४. पृथ्वी. २५. यदुवंशज. २६. यादवकुळांत. २७. या कृष्णावतारातें. २८. नाम. २९. सुनामा, न्यग्रोध, इत्यादि नऊ धाकट्या भावांसह. ३०. कंस हा कालनेमि नामक असुरांशानें जन्मला होता. ३१. दैत्यांत श्रेष्ठ. (असुर+वतंस=दैत्य+भूषण. 'वष्टि भागुरिरल्लोपमवाप्योरुपसर्गयोः' म्हणजे अव आणि अपि या उपसर्गांतील 'अ'चा लोप भागुरि वैयाकरणाला मान्य आहे म्हणून 'अवतंस' शब्दांतील 'अ'चा लोप झाला आहे; अवतंस=भूषण.)

[1]त्वल्लोचन या यवना भस्म करि, नृपा! जसा [2]दहन खाय वना. ॥ ३०
तो मी आज [3]वरद या स्थाना आलों, न केलि [4]आजवर दया; ।
त्वां [5]हा श्रीवर मागें प्रार्थियला फार, [6]पार्थिवा! वर मागें.' ॥ ३१
ऐसी ऐकुनि वाणी, वंदी **मुचुकुंद** भूप जोडुनि [7]पाणी; ।
[8]**गर्ग**भविष्य स्मरला जाणे [9]**नारायण** स्वयें अवतरला. ॥ ३२
स्तवुनि यथामति लागे पायांला, वर [10]तदीय भजनचि मागे. ।
देव म्हणे, 'तूं धन्य त्रिजगीं, कीं तुज नसेचि इष्ट [11]मदन्य. ॥ ३३
सृष्टि पहा, मद्रूपा विचर सुखें या जगांत निर्भय भूपा! ।
कृपणाची जसि वित्तीं प्रीति असे तसिच भक्ति तुझिया चित्तीं. ॥ ३४
मृगया घडली मागें [12]तदघक्षपणार्थ तीर्थ[13]भजना लागें. ।
सज्जनवृंदीं वागें [14]माझ्याठायींच मन असों दे जागें. ॥ ३५
[15]मग [16]भूतसुहृत् विप्र क्षितिवरि होसील साधुचरित क्षिप्र. ।
पुढिल्या जन्मीं मातें ब्रह्मातें पावसील सुखधामातें.' ॥[17] ३६

---

## अध्याय बावन्नावा.

जेणें [18]भव [19]परिहरिला [20]नृप वंदुनि त्या प्रदक्षिणा करि हरिला. ।
त्यजुनि गुहेसि निघाला, [21]राहुवदनमुक्तकाय [22]विधु तो झाला. ॥ १

---

१. तुझे नेत्र. २. वणवा. (अध्याय ५१ श्लोक ५९-६४ पहा.) ३. वर देणारा. ४. आजपर्यंत तुजवर दया केली नाहीं ती करावयास मी येथें आलों. (श्लोक ४३ पहा.) ५. हा मी श्रीवर, विष्णु. ६. हे मुचकुंदा. ७. हात. ८. अठ्ठाविसाव्या युगीं द्वापारांतीं भगवान् वसुदेवगृहीं अवतरेल असें जें वृद्ध गर्गऋषीनें सांगितलेलें भविष्य तें. (श्लोक ४५ पहा.) ९. नारायण या नांवाच्या उत्पत्तिविषयीं पुढील श्लोक अवलोकनीय आहेत:—'नराज्जातानि तत्त्वानि नाराणीति विदुर्बुधाः । तस्य तान्ययनं पूर्वं तेन नारायणः स्मृतः ॥ १ ॥ आपो नारा इति प्रोक्ता आपो वै नरसूनवः । अयनं तस्य ताः पूर्वं तेन नारायणः स्मृतः ॥ २ ॥,' अर्थ—पंडित लोक नरापासून उत्पन्न झालेल्या तत्वांना 'नार' असें समजतात. तीं नारें (तत्वें) पूर्वीं परमेश्वराचीं अयनें (आश्रयस्थानें) झालीं होतीं म्हणून त्याला 'नारायण' असें नांव पडलें. ॥१॥ उदक नरापासून उत्पन्न झालें म्हणून त्याला 'नार' असें म्हणतात. तें 'नार' (उदक) पूर्वीं ईश्वराचें अयन (वसतिस्थान) होतें म्हणून परमेश्वराला 'नारायण' असें नांव पडलें. ॥२॥. १०. त्या देवाचें भजन हाच वर मागे. ११. मजहून अन्य वस्तु. १२. त्या मृगयेपासून झालेल्या पापाच्या निरासार्थ. १३. तीर्थसेवना. १४. माझे ठायीं मन जागृत असूं दे. १५. क्षत्रियदेह पडल्यावर. दुसऱ्या जन्मीं. १६. भूतांचा सखा ब्राह्मण होशील. (श्लोक ६४ पहा.) १७. 'मुचुकुंदस्तुति' असें या अध्यायास नांव आहे. १८. संसार. १९. नाशिला. २०. मुचुकुंद. २१. राहूच्या मुखांतून सुटला आहे देह ज्याचा असा. (काय=देह.) २२. चंद्र.

तो [1]क्षुल्लकता पाहे [2]अचरींहि [3]चरींहि [4]जी न पूर्वी राहे. ।
जाणे [5]कलिची चेष्टा, भूप म्हणे, 'या दिशेंत वसती [6]नेष्टा.' ॥ २
या लोकांत न ठेला, सत्वर इकडोनि उत्तरेसचि गेला. ।
[7]कंसप्रमुखासदरिप्रियकिंकर [8]भूप पावला [9]श्रीबदरी. ॥ ३
[10]तेथें [11]श्रुतिसारा [12]धीवृत्ति स्थिर करुनि साधु तो आराधी. ।
एकांतीं सुसमाधी अभ्यासुनि [13]शुद्धबुद्धि निजहित साधी. ॥ ४
आला [14]यदुराय वन त्यागुनि तत्काळ, जे [15]निजपुरा [16]यवन ।
वेष्टुनि बसले होते नेले युद्धांत सर्वहि लया हो! ते. ॥ ५
करुनि [17]यवननिधनातें नेववितां द्वारके [18]तदीयधनातें. ।
[19]मगधाधिप समराला तेविस[20]अक्षौहिणीबळासह आला. ॥ ६
तें बळ पाहुनि पळ [21]ते न टिकति टाकूनि वित्त झाले पळते. ।
जाणो केवळ भ्याले, [22]देशधडी प्राणरक्षणास्तव झाले. ॥ ७
केवळ कोमळपाय प्रभु पळती शस्त्रहीन कीं न उपाय. ।
मगधपती करि हास्य [23]स्वोत्कर्षें न समजोनि पसरुनि [24]आस्य. ॥ ८
सेना घेउनि [25]धांवे, कीं दोघेही धरूनि शत्रु वधावे. ।
आजुनि [26]ईश न ठावे, अंध जरासंध केंवि [27]त्यांप्रति पावे? ॥ ९
ते बहुयोजन दूर प्रभु गेले कौतुकी [28]जसेचि न शूर. ।
मगधपतीतें गमले कीं हे आतां धरीन बाळ [29]श्रमले. ॥ १०
[30]त्यांच्या चढति मग वर [31]प्रभु नामें जो [32]प्रवर्षणाख्य [33]नगवर. ।
[34]त्यांला [35]मागध रोधी, आपण सेनासमेत यांतें शोधी. ॥ ११

---

१. अल्पता. २. वृक्षपाषाणादिकींहि. ३. मनुष्यपश्वादिकींहि. ४. जी क्षुल्लकता. ५. कलियुगाच्या कृत्यांस आरंभ झाला असें जाणे. ६. इष्ट नाहीं. ७. कंसप्रमुख जे दुष्ट शत्रु त्यांचा शत्रु (कृष्ण) त्याचा प्रियदास. ८. मुचुकुंदराजा. ९. बदरिकाश्रम. १०. बदरिकाश्रमीं. ११. वेदतत्व ईश्वर यातें. (अध्याय ५२ श्लोक ४ पहा.) १२. बुद्धिवृत्ति. १३. निर्मलमति. (मुचुकुंद.) १४. कृष्ण. १५. आपलें नगर जें मथुरा त्याला. १६. म्लेच्छसैनिक. १७. यवनांच्या नाशातें. १८. यवनांच्या धनातें. १९. जरासंध. २०. पृष्ठ १ टीप ९ पहा. २१. रामकृष्ण. २२. देशांतरस्थ. २३. आपला उत्कर्ष झाला म्हणून. (श्लोक ९ पहा.) २४. मुख. २५. 'मागध' हा कर्ता. २६. हे ईश्वर असें समजेना. २७. त्या ईश्वरांप्रति. २८. जसे काय शूर नव्हत तसे प्रभु बहु योजन दूर गेले—असा अर्थ. २९. अध्याय ५२ श्लोक १०७ पहा. ३०. त्या पर्वताच्या. ३१. राम कृष्ण. ३२. प्रवर्षण नामक. पर्वतश्रेष्ठ. ३३. त्या पर्वताला जरासंध वेष्टी. ३४. जरासंध. ३५. रामकृष्णांतें.

नाहीं आले हाता, परि दुष्ट म्हणे, ‘करीन त्यांच्या घाता. ।
आतां कोण त्राता? आले हुंडकित[1] भला जड[2] नगभ्राता[3]. ॥ १२
होती न जरि प्रकट द्वेष्टे तरि या प्रवर्षणाद्रीसकट, ।
जाळा, काष्ठें आणा, याचि उपायें हरूं रिपूंच्या प्राणा. ॥ १३
माझ्याही या अरितें आश्रय दिधला महीभृदधमा[4]! तरि तें. ।
घे बळवद्वैरफळ[5] स्वांगें शरणागतां[6] खळांसकट जळ.’ ॥ १४
आज्ञा घेउनि सेना रचिती काष्ठें[7], तयांत[8] अद्रि[9] दिसेना. ।
श्रीमदमत्ता[10] उचिता रीति ‘शरण्या नगा’ म्हणे ‘खाउ चिता.’ ॥ १५
मगधनृपें अतिरुष्टें लावविला चहुंकडोनि[11] पावक[12] दुष्टें. ।
दहनासि[13] सखा[14] भेटे, प्रळयीं जैसा तसाचि तेव्हां पेटे. ॥ १६
जाणुनि रिपुबुद्धि कुडी[15], प्रभुवर गिरिवरुनि टाकिती दूर उडी. ।
यांस[16] नकळत पळाले, आले स्वपुरासि, मूढ म्हणति जळाले. ॥ १७
मग जाय मगधराज स्वपुरास[17], म्हणे, ‘कृतार्थ झालों आज.’ ।
मानुषवेषनिगूढ[18] प्रभुतें जाणेल काय तो खळ मूढ? ॥ १८
नृपभूषण[19] आनर्ताधिप[20] रेवत[21] रेवतीसुतेतें भर्ता ।
योग्य कवण सर्वगुणें विधिसें[22] म्हणे, ‘घटित तूं वदावें निपुणें.’॥ १९
चतुरानन तो नवरा सांगे बळभद्र योग्य त्या भुवनवरा[23]. ।
दिधली आणुनि कन्या धन्या, ज्योत्स्नाचि[24] योग्य विधुसि, न अन्या. ॥ २०

---

१. शोधीत. (हे रामकृष्ण.) २. मूर्ख. ३. पर्वतरूप भाऊ. ४. हे पर्वताधमा. (महीभृत्=पर्वत.) ५. बलवंताशीं वैर केल्याचें फळ. ६. तुला शरण आले जे खळ रामकृष्ण त्यांसकट जळून जा. पंतांनीं वर्णनविस्तार केल्याचें हें एक उदाहरण आहे. या अध्यायांतील वर्णन कोठें कोठें बरेंच विस्तृत केलें आहे असें हा अध्याय मूळाशीं ताडून पाहिला असतां दिसतें. ७. सर्पण, इंधन. ८. काष्ठांत. ९. पर्वत. १०. शरणागतांचें रक्षण करणाऱ्या पर्वतास ‘चिता खाऊ’ असें म्हणणें श्रीमदमत्तास धनगर्वानें मागलेल्याला उचित. ११. पर्वताच्या चार बाजूंनीं. १२. अग्नि. १३. अग्नीसी. १४. वायु. १५. खोटी. १६. जरासंधास. १७. अध्याय ५२ श्लोक १४ पहा. १८. मनुष्यवेषानें जे गुप्त प्रभु त्यांतें. १९. नृपश्रेष्ठ. २०. देशविशेष त्यांचा स्वामी. २१. राजविशेष. रेवत राजाला रेव नामक पुत्र होता व रेवती नामक कन्या होती. ती उपवर झाल्यावर कोणास द्यावी अशी चिंता पित्यास पडली. तेव्हां ब्रह्मदेवास विचारावें म्हणून रेवत राजा कन्येला घेऊन सत्यलोकास गेला. त्यानें ही कन्या बलरामास दे असें सांगितलें. तेव्हां तो तिला घेऊन परत आला व त्यानें त्याप्रमाणें केलें अशी कथा आहे. (भागवत—स्कंध ९ अध्याय ३ पहा.) २२. ब्रह्मदेवास. २३. रेवतराजाला. २४. ज्योत्स्ना (चंद्रिका) विधूस (चंद्रासच) योग्य, अन्या न योग्य—असा अन्वय.

राजा भीष्मक सुमती धर्मज्ञ नयज्ञ शुचि विदर्भाधिपती. ।
तत्सुत रुक्मिप्रभृती[१] पांच तेदनुजाहि[२] रुक्मिणी सुप्रकृती[३]. ॥ २१
भीष्मकसदनीं अतिथी अभ्यागत साधु कृष्णचरितें[४] कथिती. ।
जों जों सेवी कृष्णामळयश[५], धरि फार रुक्मिणी श्रुतितृष्णा[६], ॥ २२
ज्याचा गुणगण मोही वैदर्भीतें[७] स्वयें गुणाकर[८] तोही[९]. ।
'मज ते योग्या[१०] पत्नी' कृष्ण म्हणे, 'चित्त जाय त्या स्त्रीरत्नीं[११].' ॥ २३
वैदर्भी 'नवरा[१२] हो हरिच' म्हणे 'प्रेम तेथ अभिनव[१३] राहो.' ।
कृष्ण म्हणे, 'नवरी न स्वसमा[१४] दुसरी, न ती त्यजीन, वरीन.' ॥ २४
बंधुमना ये नवरा कृष्ण; म्हणे एक मात्र रुक्मी 'न बरा[१५]' ।
नमनी[१६] भवगदवैद्या[१७] तो खळ[१८], देऊं करि स्वसा[१९] नृप चैद्यां[२०]. ॥ २५
हें कळतां भूस्वर्भीहरभुजहरिचरणतत्परा[२१] वैदर्भी ।
झाली बहु विमनस्का[२२], कृष्णाविण जीस लोक शून्यचि अस्का[२३]. ॥ २६
झाली चिंताव्याप्ता, कृष्णाप्रति पाठवी द्विजा परमाप्ता[२४]. ।
सुहृदुपकारी[२५] विप्र[२६] ज्ञानिवर द्वारकेसि पावे क्षिप्र[२७]. ॥ २७
होता प्रभु ज्या स्थानीं तेथें नेला द्विजेंद्र तो द्वाःस्थानीं[२८]. ।
साध्वनुदासीनातें[२९] अवलोकी कांचनासनासीनातें[३०]. ॥ २८
पाहुनि आसन सोडी यांतें[३१] ब्रह्मण्यदेव[३२] तो कर जोडी. ।
पूजियलें स्वस्थानीं बैसवुनी, आपणा जसें स्वस्थानीं[३३]. ॥ २९

---

१. रुक्मी, रुक्मरथ, रुक्मबाहु, रुक्मकेश आणि रुक्ममाली असे भीष्मकाचे पांच पुत्र होते. (श्लोक २२ पहा.) २. त्यांची धाकटी बहीण. ३. सुस्वभाव. ४. कृष्णाचीं गुणकर्मै. ५. कृष्णाचें अमल यश. ६. श्रवणेच्छा. ७. रुक्मिणीतें. ८. गुणांचा आकर=खाण. ९. तो कृष्णहि. १०. रुक्मिणी. ११. स्त्रीरूप रत्नाचे ठायीं. १२. हरिच नवरा हो असें वैदर्भी म्हणे. १३. नवीन. १४. आपणास योग्य अशी दुसरी नवरी न. १५. बरा नाहीं. १६. न मानी. १७. भवरोगाचा चिकित्सक कृष्ण त्याला. १८. रुक्मी. १९. बहीण. २०. शिशुपाळा. २१. भू (पृथ्वी) स्वर् (स्वर्ग) यांची भी (भय) हरणारे भुज ज्याचे अशा हरीचे चरणीं तत्पर (आसक्त) अशी. २२. खिन्नचित्ता. २३. सर्व. २४. फार हितकर्त्या. उत्तम यथार्थ वक्ता अशा. २५. मित्रावर उपकार करणारा. २६. सुदेव. (अध्याय ५२ श्लोक २५-२६ पहा.) २७. लौकर. २८. द्वारपालांनीं. २९. साधूविषयीं उदासीन नव्हे अशा कृष्णातें. ३०. सोन्याच्या सिंहासनावर बसलेल्यातें. (श्लोक २७ पहा.) ३१. ब्राह्मणातें. ३२. कृष्ण. (विष्णु.) ३३. स्वर्गस्थदेवांनीं जसें आपणास पुजावें तसें ब्राह्मणास पूजिलें.

जेवविला, [1]पल्यंकीं निजउनि, वेउनि हळूच [2]तत्पद [3]अंकीं. ।
स्वकरें चुरि, करि सेवा, [4]हे चित्तांतूनि फार आवडी देवा. ॥ ३०
सत्कल्पलता उक्ति प्रभुच्या, ज्यांचीं फळें [5]चतुर्विध मुक्ति, ।
देति सुख [6]निकाम, [7]धुनी अमृताच्या त्या, निघोनि वदनामधुनी. ॥ ३१
'मार्गीं तुज आर्यास श्रम झाले येथवरि जया कार्यास, ।
येणें केलें सांगें, जरि मी [8]श्रवणार्ह करिन सर्वहि आंगें.' ॥ ३२
ऐकुनि हे देवाची उक्ति, कथी वृत्त, पत्रिका दे, [9]वाची, ।
[10]वैदर्भीची चेतोवृत्तिच जे पत्रमूर्ति आली ते तो.[11] ॥ ३३
'[12]श्रोतृमनस्तापहर त्वद्गुण ऐकोनि, रूप [13]दृष्टिस रुचिर ।
[14]रुचिरवरा! मन शिरतें तुजमाजि [15]अलज्ज जें सुखेच्छु सुचिर तें, ॥ ३४
कोण [16]सुगुणरत्नखनी कन्या उचिता [17]जगन्मनोज्ञास जनीं? ।
न वरिल लज्जावसरीं, तृषित शिरेलचि [18]मुकुंदजी! अमृतसरीं. ॥ ३५
[19]वरिलें, दिधलें [20]कांया, तूं पतिच, विभो! करीं मला [21]निजजाया, ।
तव भागा शिशुपाळ स्पर्श न करु, [22]सिंहबळिस जेंवि [23]शृगाळ. ॥ ३६
[24]पूर्तेष्टनियमदानव्रतसुरमुनिगुरुसमर्चनीं भगवान ।
बहुजन्मीं पूजियला तरि हरिच वरू, न अन्य चैद्यादि मला. ॥ ३७

---

१. मंचकीं. २. त्या विप्राचा चरण. ३. मांडीवर. ४. ही ब्राह्मणसेवेची. ५. चार प्रकारची मुक्ति. या प्रकारांचीं नांवें—सलोकता, समीपता, स्वरूपता व सायुज्यता. उपास्य देवतेच्या लोकीं राहणें ती सलोकता; उपास्य देवतेच्या संनिध राहणें ती समीपता; उपास्य देवतेचें व आपले स्वरूप व गुण सारखे होणें ती स्वरूपता; आणि उपास्य देवतेमध्यें (ब्रह्मीं) मिळून लीन होणें ती सायुज्यता. ६. बहुत. ७. नद्या. ८. ऐकावयास योग्य. येथें पंतांनीं वर्णनसंकोच केला आहे. (श्लोक ३०-३५ पहा.) ९. उच्चारी. कृष्णाच्या आज्ञेनें वाचून दाखवी. १०. पत्रिकेच्या रूपानें वैदर्भीची (रुक्मिणीची) मनोवृत्तिच आली काय. ११. ब्राह्मण. १२. पत्रिकेंतील प्रथम श्लोक. श्रोत्यांच्या मनाचा ताप हरणारे तुझे गुण. १३. नेत्रांस गोड लागणारें रूप. १४. हे सुंदरवरा. १५. लाज सोडून. १६. सुगुण रत्नांची खाण. १७. त्रिभुवनसुंदरास (तुला). १८. हे मुकुंदजी. १९. म्यां तुला वरिलें. २०. देह. २१. आपली स्त्री. २२. सिंहभागास. २३. कोल्हा. कृष्णकेसरीच्या भागास चैद्यजंबुक कसा शिवेल—हें वर्णन मूळांतच आहे. (अध्याय ५२ श्लोक ३९ पहा.) २४. तळ्या, विहिरी, इत्यादि बांधणें, यज्ञ करणें, तीर्थाटनादिक नियम धरणें, दान देणें, आणि व्रतें पाळणें, व देव, मुनि, गुरु, यांचें पूजन करणें, यांहींकरून. (अध्याय ५२ श्लोक ४० पहा.)

लग्नाच्या पूर्वदिसीं ये [1]नकळत, युक्त होय मग [2]बळपतिसी, ।
[3]चैद्यादिबळें वधुनी, [4]राक्षसविधिनें वरीं, [5]हरीं अरिमधुनी. ॥ ३८
न वधुनि [6]बंधु तुज कसें म्हणति हरूं तरि वदेन युक्ति हरि! असी, ।
प्रथमदिनीं कुळिं नवरी बाहिर [7]देवीस नेति ती वेळ बरी. ॥ ३९
चरणरजःस्नान [8]हरी! तव वांछिति मुनि [9]तमःक्षया [10]शंभुपरी. ।
तो तूं करिसिल न कृपा, घेइन शतजन्म, करिन [11]असुशमनतपा.' ॥ ४०
विप्र म्हणे, 'या देशा आलों घेऊनि [12]रुक्मिणीसंदेशा, ।
हें कर्तव्यचि आधीं प्रभु! कन्यारत्न उचित सत्वर साधीं.' ॥ ४१

## अध्याय त्रेपन्नावा.

पत्रार्थ मनीं आणी, विप्राचा कर धरूनि [13]पंकजपाणी. ।
हांसोनि म्हणे, 'रात्रीं मजहि निज नये मनांत [14]तेचि [15]सुगात्री. ॥ १

---

१. गुप्तपणें. २. सेनापतीशीं युक्त हो. ३. शिशुपालादिकांचीं सैन्यें. ४. विवाहविधि आठ प्रकारचे आहेत, त्यांत एकास राक्षसविवाहविधि असें म्हणतात. या आठ प्रकारांचीं नांवें आणि लक्षणें—विद्या व सदाचार यांनीं युक्त असून, कन्येची याचना न करणारा अशा वराला सत्कारपूर्वक बोलावून आणि वस्त्रालंकारांनीं पूजून कन्यादान करणें हा 'ब्राह्मविवाह.' ज्योतिष्टोमादि यज्ञ होत असतां, यथाविधि कर्म करणाऱ्या ऋत्विजाला अलंकारयुक्त कन्यादान करणें हा 'दैवविवाह.' वरापासून धर्मार्थ म्हणजे यागादिसिद्धीसाठीं किंवा कन्येला देण्यासाठीं एक गोमिथुन (एक गाय व बैल), अथवा दोन गोमिथुनें घेऊन त्याला यथाशास्त्र कन्यादान करणें हा 'आर्षविवाह.' 'तुम्ही उभयतां मिळून धर्माचरण करावें' असा कन्यादानकाळीं पूर्वीं नियम करवून पूजा करून कन्यादान करणें हा 'प्राजापत्य विवाह.' कन्येला पित्रादि ज्ञातींला आणि कन्येला यथाशक्ति स्वेच्छेनें धन देऊन कन्येचा स्वीकार करणें हा 'आसुर विवाह.' कन्या आणि वर यांच्या अन्योन्यानुरागानें आलिंगनादिरूप परस्पर वधुवरांचा संयोग तो 'गांधर्व विवाह' होय. कन्यापक्षीय लोकांचा नाश करून अथवा त्यांचे शरीराला जखमा करून व प्राकारादि फोडून रोदन करणारी आणि पित्याला व भ्रात्याला आक्रोशपूर्वक हाका मारणारी अशी कन्या गृहांतून बलात्कारानें आणणें हा 'राक्षस विवाह.' निजलेली, मद्यमदविव्हल अथवा शीलसंरक्षणाविरहित अशा स्त्रियेशीं एकांतीं मैथुनधर्में प्रवृत्त होणें हा 'पैशाच विवाह.' (मनुस्मृति—अध्याय ३ श्लोक २७-३४. पहा.) ५. हरून ने. ६. तुझे बंधु. ७. गिरिजेच्या दर्शनास. ८. हे हरी. ९. अज्ञानाच्या नाशा. १०. शंकरासारखे मोठे मुनी. ११. प्राणत्याग करणाऱ्या तपाला. (अध्याय ५२ श्लोक ४३ पहा.) १२. रुक्मिणीच्या निरोपातें. १३. कमलपाणी. (कृष्ण.) १४. रुक्मिणीच. १५. शोभनांगी, सुंदरी.

रु[1]क्मी करितो दा[2]वा, आहे हा भाव सर्व मजला ठावा, ।
काय त्[3]याचा लेखा[4], करितों कौतुक कसें बरें तें देखा. ॥ २
नलगेचि बहुत कथन, द्वेषिनृ[5]पांचें करूनि युद्धीं मथन, ।
मीच हरिन ती बा[6]ळा का[7]ष्ठापासूनि जेंवि वन्हिज्वाळा.' ॥ ३
परवां रात्रि स[8]दृक्ष स्वमनीं जाणें असें स्व[9]जनसुरवृक्ष, ।
स्थिर न[10]सवे क्षण दा[11]त्या मुक्तीच्या, काय कंठवे क्ष[12]णदा त्या? ॥ ४
वैदर्भीनें पाश प्रेमाचा घातला गळां, अवकाश ।
लग्नाला बहु थोडा, 'स्वरथाला' दा[13]रुका म्हणे 'ह[14]य जोडा.' ॥ ५
मग तो दारुक रीती ज्यांची शु[15]चि, गमन जे सु[16]चारु करीती. ।
शै[17]ब्यादि तु[18]रगराजे योजि रथीं, ज्यांपुढें न रविरथ साजे. ॥ ६
देव रथावर [19]वेघे, विप्रहि बैसोनि सोहळे बरवे घे. ।
वै[20]दर्भा आ[21]नर्तापासुनि रा[22]त्रींत जाय तो श्री[23]भर्ता. ॥ ७
भी[24]ष्मक रु[25]क्मिस्नेहा वश झाला, करि जसें कुबुद्धि वदे हा[26]. ।
कीं दे न रिपु त्रास ज्ञात्या लौकि[27]केंचि, मान्य करि पुत्रास. ॥ ८
ये न म[28]ना, परि बा[29]ळा दे[30]ववि तो दुष्ट सु[31]त बळें शिशुपाळा. ।
करवी क[32]र्मे विवाहापूर्वीचें आग्रहें, करी क[33]वि बा 'हा[34]!' ॥ ९
त्याचि परी द[35]मघोष स्व[36]सुताभ्युदयार्थ कर्म करि, धरि तोष[37]. ।
द्विज करिती श्रुतिघोष प्रभुवांचुनि, परि मुहूर्त त्यांसि सदोष. ॥ १०

---

१. अध्याय ५३ श्लोक २-३ पहा. २. माझ्याशीं द्वेष. ३. रुक्मीचा. ४. गणना, पर्वा. ५. शत्रुराजांचें. ६. स्त्री रुक्मिणी. ७. काष्ठाचें मंथन करून त्यापासून अग्निज्वाळा जसी तसी. ८. उत्तम नक्षत्र, सुमुहूर्त. (सद्+ऋक्ष=उत्तम+नक्षत्र.) ९. स्वजनांचा सुरवृक्ष=कल्पतरु. (कृष्ण.) १०. न राहवे. ११. मुक्तीचा दाता कृष्ण यास. १२. रात्र. १३. कृष्णाचा सारथि. १४. घोडे. (कुंडिनपुरास जाण्यासाठीं.) १५. चांगली. १६. सुंदर. १७. शैब्य, सुग्रीव, मेघपुष्प, व बलाहक हे कृष्णाचे चार अश्व. १८. श्रेष्ठ अश्व. १९. चढे. २०. वैदर्भदेशाला. २१. आनर्त नामक देशापासून. २२. एक रात्रींत. २३. कृष्ण. २४. कुंडिनपति. २५. पुत्रस्नेहबद्ध. २६. पुत्र रुक्मी. २७. ज्ञात्याला लौकिक जसा त्रास देतो तसा रिपु देत नाहीं. २८. भीष्मकाच्या मनास. २९. कन्या रुक्मिणी. ३०. 'देववि' आणि 'करवी' या पदांवरून भीष्मकाची अनभिरुचि व्यक्त होते. ३१. रुक्मी. ३२. नगर शृंगारणें, पितृदेवार्चन, विप्रभोजन, मंगलवाचन, ग्रहशांति, गोदान इत्यादि कर्मे. (अध्याय ५३ श्लोक ७-१३ पहा.) ३३. ज्ञानी. (भीष्मक.) ३४. खेद. ३५. शिशुपालपिता, चेदिदेशपति. ३६. आपल्या पुत्राच्या (शिशुपालाच्या) उत्कर्षासाठीं. ३७. संतोष.

कुंडिननगरा चेदिप्रभु[1] ये, हें पुत्र[2] भीष्मकास निवेदी. ।
निजभाव दिसों नेदी, नृप पूजी सर्व, रुक्मिमत न छेदी. ॥ ११
देवविले [3]जानिवसे ज्यांत [4]सबळ [5]साप्त चेदि[6]भूजानि वसे. ।
उत्तरविलें [7]तत्पक्षक्षितिपांचें सैन्य सुस्थळीं बहुलक्ष. ॥ १२
ते ते नृप चेदिपतिप्रिय [8]घूक प्रभु रवीपुढें जे दिपती. ।
[9]प्रतिनिमिष उणी होत [10]द्युति ज्यांची जाय, काय ते [11]खद्योत? ॥ १३
आले बांधोनि [12]फळी शाल्वजरासंधदं[13]तवक्रादि बळी. ।
कीं येतिल [14]कृष्णहळी कन्या साधावया करायाहि [15]कळी. ॥ १४
बळभद्रास सकल हा [16]वृत्तांत कळे, मनांत शंके कलहा. ।
गेला हरि [17]एकटका यास्तव घेऊनि आपणहि ये[18] [19]कटका. ॥ १५
प्रस्थानाची रात्रि प्रभुच्या जी तींत[20] ती जगाची [21]धात्री ।
पडली [22]चिंतावर्तामध्यें, कीं द्विज दिसे न तो [23]प्रियकर्ता. ॥ १६
[24]चिंतासिंधुनिमग्नस्वांता [25]देवी म्हणे, '[26]अहो! मम लग्न ।
[27]एकक्षणदांतरित, प्रभुवर यावाचि, कां न आला त्वरित? ॥ १७
[28]चिंतासागरसेतू ज्यास्तव येना, कळे न तो मज हेतू, ।
माझें [29]भाग्यचि [30]मंद, प्राप्त कसा होय मूर्त [31]परमानंद? ॥ १८

---

१. चेदिनामक देशाचा राजा. २. रुक्मी. ३. वधूपक्षीय अथवा वरपक्षीय ४. ससैन्य. ५. आप्तजनांसह. ६. चेदिभू आहे जाया (स्त्री) ज्याची तो चेदिभूजानि. 'जायाया निङ्' (पाणिनि—५।४।१३४) या सूत्रानें 'जाया' शब्दाला 'जानि' असा आदेश बहुव्रीहि समासाच्या अंतीं होतो, जसें—जानकीजानि, युवजानि. जनास विवाहसमयीं ग्रामांतरीं राहावयास दिलेलें गृह=जानिवसा. ७. चैद्यपक्षीय राजांचें. ८. घुबड. ९. प्रतिक्षणीं. निमिष=अल्पकाळ. १०. कांति. ११. काजवे. १२. जूट. १३. दंतवक्र—'करूषकदेशाधिपति वृद्धशर्मा त्यापासून वसुदेवभगिनी श्रुतदेवा, तिच्या ठायीं झालेला पुत्र. हा कृष्णाच्या हातून असुरांश असल्यामुळें मरण पावला.' १४. कृष्ण व बळराम. १५. कलह. (श्लोक १७-१८ पहा.) १६. शत्रुसैन्याची हालचाल, विपक्षीय सैन्योद्यम. १७. एकाकी. १८. कुंडिनपुराला. १९. सैन्यास. ('कटकस्त्वद्रिनितम्बे बाहुभूषणे सेनायां राजधान्यां च' इति हैम:.) २०. त्या रात्रींत, सूर्योदय होण्यापूर्वी. २१. जगाची माता रुक्मिणी. २२. चिंतारूप भोंवऱ्यांत. २३. आपलें प्रिय करणारा. २४. चिंतासमुद्रांत बुडालें चित्त जिचें अशी. २५. रुक्मिणी. २६. अध्याय ५३ श्लोक २२-२६ पहा. २७. एकरात्रीचें (क्षणदेचें) अंतर ज्यास म्हणजे, एक दिवसाचा मात्र अवकाश ज्याला असें. २८. चिंतारूप समुद्रांतून तारण्याविषयीं सेतुरूप कृष्ण तो. २९. दैवचि. ३०. प्रतिकूल. ३१. श्रीकृष्ण.

चिंता चित्त व्यापी, कां तो आला न [1]विप्रही अद्यापी ? ।
विस्मृति पडली काय ? स्वसुखीं झाला निमग्न साधु [2]सेकाय. ॥ १९
विप्र विलंब न साहे, परि [3]वरवाक्यें कृतार्थ झाला आहे, ।
माझ्याठायीं पाहे [4]प्रस्थानीं किमपि [5]निंद्य मग हरि राहे. ॥ २०
न मला विधि अनुकूळ, [6]श्रीश नये त्यास हेंचि केवळ मूळ ।
विमुख [7]महेश्वर [8]गौरी झाली वाटे, म्हणोनि दुर्लभ [9]शौरी.' ॥ २१
ऐसें चिंती बाळा, लावी मग बोल आपुल्याचि कपाळा. ।
हळुच रडे, यदुपाळा आठवि, पाहे मनीं [10]तदागमकाळा. ॥ २२
'करिल दया [9]यदुपाळ प्रभु, तरि आहे' म्हणे '[11]तदागमकाळ ।
उशिर तयाला काय [12]प्रणतजनालागिं दाखवाया पाय ?' ॥ २३
असि चिंतेनें झुरली चित्तीं, तों [13]वामबाहुवल्लि [14]स्फुरली, ।
[15]ऊरु नयनही वाम [16]स्फुरती म्हणती, 'तुझा सफळ [17]हत्काम.' ॥ २४
पाहिलीं अप्रिय भार [18]स्वांगें चिंतेंत विटविलें मन फार. ।
स्फुरतां करि सत्कार प्रेमें, [19]तीं भूषणें फुलें [20]हेळवार. ॥ २५
या [21]नलिनीतें [22]अरुणद्विज दर्शन दे, [23]प्रियार्क [24]तदनु [25]सकरुण. ।
भेटुनियां [26]शर्म [27]करें स्पर्शुनि देणार [28]ईस [29]घर्मकरें. ॥ २६
[30]देवीतें [31]आर्याची [32]वदनश्री सिद्धि सूचवी कार्याची. ।
तदपि करि कृपा कर्णावरिच पुसे कीं [33]प्रियोक्तिला [34]आकर्णा. ॥ २७

---

१. ब्राह्मण. २. संदेह. ३. श्रीकृष्णाच्या भाषणानें. ४. प्रस्थानसमयीं. ५. वाईट गुण. ६. श्रीकृष्ण. ७. शिव. ८. पार्वती. ९. कृष्ण. १०. कृष्णागमनाच्या अवसराला. ११. त्या कृष्णाच्या येण्याचा समय. १२. शरण आलेल्या जनांस. १३. डावी भुजा हीच लता ती. (वल्लि लता हे शब्द अथवा या अर्थाचे इतर शब्द भुज, बाहु, असि, चाप, विद्युत्, भ्रू इत्यादि शब्दांशीं समासांतीं अन्वित होऊन सौंदर्य, कोमलता, तनुता, सौकुमार्य इत्यादि गुण दर्शवितात.) १४. फुरफुरली. स्त्रियांचें वामनेत्रबाहुस्फुरण हें शुभसूचक आणि इष्टकार्यसिद्धिप्रद होय असें वर्णन सामुद्रिक ग्रंथांत आहे त्यास अनुसरून हीं पद्यें आहेत. १५. डावी मांडी आणि डावा डोळा हीं. १६. फुरफुरती. १७. हृदयसंबंधी इच्छा, मनोरथ. १८. आपले अवयव. १९. अंगें. २०. हलकीं वाटलीं. २१. रुक्मिणीरूप कमलिनीतें. २२. अरुणरूप ब्राह्मण. हें रूपक मूळांत नाहीं. २३. प्रिय कृष्णरूप सूर्य. २४. त्या ब्राह्मणरूप अरुणामागून. २५. सदय. 'दर्शन दे' या पदांचा येथें अध्याहार केला आहे. २६. सुख. २७. किरणें किंवा हातानें. २८. रुक्मिणीस. २९. घाम करणाऱ्या किरणरूप हातानें. ३०. रुक्मिणीतें. ३१. श्रेष्ठ ब्राह्मणाची. ३२. मुखकांति. ३३. आवडणारें भाषण. ३४. ऐका.

'आला वरद[1] वराया देवि ! तुला हा, विपक्षकीर्ति[2] हराया.' ।
हे उक्ति सुधावृष्टी[3] तीवरि पडलीच, कृष्णमूर्तिहि दृष्टी. ॥ २८
जो झाला करुनि दया सदसुलभानंतसुखदवस्तुवरद[4] या[5] ।
गुरुवर्यास वितरणा[6] प्रियं[7] न दिसे, निजशिरें नमि द्विजचरणा[8]. ॥ २९
त्या श्रीतें जे नमिती त्यांच्या संपत्सुखासि[9] भुवनीं[10] न मिती[11]. ।
काय न दे आपण ती[12]? स्वशिरें कीं या करी द्विजाला प्रणती. ॥ ३०
आधीं चरणीं ठेवी मस्तक मग वस्त्र हेम मणिही देवी[12] ।
यश काय दिलें थोडें ? ब्रह्मांडें ज्यास भासती बहु रोडें. ॥ ३१
कळलें चिंतामग्ना भूपा[13] देखावया स्वकन्यालग्ना ।
आले यदुचक्रयुत[14] श्रीमन्मणि[15]..........वसुदेवसुत[16]. ॥ ३२
जलदाभिगमीं[17] ग्रीष्मारण्यमयूरासि[18] तेंवि सुख या भीष्मा. ।
साग्रजकृष्णागमनीं 'धन्य'[19] म्हणे आपणा महाभाग मनीं. ॥ ३३
प्रभु घन तैसा मोरा परि भीष्मक भूप जाय तैं सामोरा. ।
पाय नमी आद्यांचे[20], होती बहु घोष तेधवां वाद्यांचे. ॥ ३४
वाजत असतां वाद्यें केलीं प्रभुपूजनें[21] यथोक्त सपाद्यें[22]. ।
वेदशिरःप्रतिपाद्यें[23] स्वीकारुनि तें[24] दिलें परम सुख आद्यें. ॥ ३५
वश न सुतातें, मिथ्या[25] कृष्णीं वरमति[26] करी यथोक्तातिथ्या[27] ।
मग दे जानिवसा या[28] त्रिभुवनसदनास भूमिजानि[29] वसाया. ॥ ३६
अर्पी विभवा हातें त्यां, आले जे नरेंद्र[30] उद्वाहातें[31]. ।
सर्व यथोचित अर्ची[32], दीपाची वस्तुमात्र[33] भूषवि अर्ची[34]. ॥ ३७

१. वर देणारा कृष्ण. २. शत्रूंचें यश. ३. अमृतवृष्टि. ४. साधूंसही दुर्लभ जें अनंत सुख तें देणारें जें कृष्णरूप वस्तु त्यातें देणारा असा. ५. या ब्राह्मणास. ६. द्यावयास. वितरण=दान. ७. देण्यास योग्य (प्रिय) कांहीं नव्हतें म्हणून नमन केलें. ८. विप्राच्या पायांस. ९. ऐश्वर्याला आणि सुखाला. १०. लोकीं. ११. गणती. १२. श्रीरुक्मिणी. १३. भीष्मकराजास. १४. यादवमंडळीसह. १५. शोभायमान रत्नरूप असे. १६. वसुदेवाचे पुत्र बळराम कृष्ण ते. १७. मेघाच्या आगमनीं. १८. ग्रीष्मकाळीं तप्त झालेल्या अरण्यांतील मयूरास. १९. पुण्यवान्, सुकृती. २०. रामकृष्णांचे. २१. मधुपर्कादिपूजनें. २२. पाद्यासहित. (पादायेदम्=पाद्यम्=पाय धुण्यासाठीं उदक.) २३. उपनिषदांनीं प्रतिपाद्य जो आद्य कृष्ण त्यानें. २४. पूजन. २५. खोटें. २६. कृष्णच माझ्या कन्येचा वर अशी बुद्धि धरणारा. २७. यथाविधि अतिथिसत्कार. २८. श्रीकृष्णास. २९. भीष्मक. भूमि आहे जाया ज्याची तो भूमिजानि=भूपति. ३०. राजे. ३१. विवाहातें. ३२. पूजी. ३३. सर्ववस्तु. ३४. ज्योती.

आला साग्रज[1] कृष्ण श्रुत होतां हें सदार[2] पौर सतृष्ण[3]. ।
येउनि नेत्रेंचि पसे[4] भरुनि प्राशिति[5] मुखा, घना चातकसे. ॥ ३८
पोट भरुनि हरिमूर्ति प्राशिति, परि होइना तृषापरिपूर्ती. ।
चंद्रें ताप निवाले, देहीं रोमांच कंप काय हिंवाले[6]? ॥ ३९
पौर म्हणति[7], 'नृपकन्या हेच[8] समुचिता[9] वधू हरीस न अन्या, ।
हाचि वर तिला धन्य प्रभु समुचित अन्य न त्रिदश[10] राजन्य[11]. ॥ ४०
सुकृतें[12] त्रिभुवनकर्ता[13] तोषो [14]हो कृष्ण रुक्मिणीचा भर्ता.' ।
ऐसें वदती पौर, प्रेमें गाती मुकुंदयश [15]शशिगौर . ॥ ४१
वर्णिति [16]अभिनव रीती प्रभुची जन, तोंचि रुक्मिणी नवरी ती. ।
पूजाया गौरीतें[17] राजगृहांतुनि निघे स्मरत [18]शौरीतें. ॥ ४२
वैदर्भीचें[19] सद्म[20] स्पष्ट दिसे लोचनांसि[21] परि तें पद्म[22], ।
कन्या ही श्रीच सती नाहीं तरि भक्ति कांति ऐसी नसती. ॥ ४३
वेष्टिलि सारिखियानीं[23] सखियानीं, देखिली[24] न पारखियांनीं[25], ।
चाले, बसलि न यानीं, युक्ता धृतिरीतिमतिसतीविनयानीं[26]. ॥ ४४
भंवत्या[27] माता धात्री[28], चाले त्यांमाजि[29] मौन धरुनि सुगात्री[30], ।
जवळि सती विप्रस्त्री रक्षिति [31]संनद्ध शूर नृपभट[32] शस्त्री[33]. ॥ ४५
दुंदुभिदरमुरज्यांचे[34] गण गर्जति, नाद ऐकती सुर ज्यांचे, ।
जे जे वाद्यविशेष ध्वनि ते ते करिति उत्सवांत अशेष[35]. ॥ ४६
गायक सुस्वर गाती, नाचति नट नर्तकी, [36]मनोज्ञ कळा[37] ती, ।
जो तो जन आनंदी, स्तवन करिति साधु सूत[38] मागध बंदी. ॥ ४७

---

१. बळरामासहित. २. स्त्रियांसहित. ३. अवलोकनेच्छासहित. ४. ओंजळी. ५. पिति, पाहति, नेत्रें भरून प्राशिति. यावरून आदरातिशय सूचित होतो. ६. शांत झाले काय ?. ७. श्लोक ३७-३८ पहा. ८. हे नृपकन्या रुक्मिणीच. ९. योग्या. १०. देव. ११. राजा. १२. पुण्यसामग्रीनें. १३. त्रैलोक्य करणारा. १४. होवो. १५. चंद्रासारखें शुभ्र. यशाचा रंग शुभ्र असा कविसंकेत आहे. 'मालिन्यं व्योम्नि पापे यशसि धवलता' इत्यादि टीप पहा. (कृष्णविजय—पूर्वार्ध—पृष्ठ १६१ टीप १२ पहा. काव्यसंग्रह.) १६. नवीन, मनोहर. १७. अंबिकेतें. १८. कृष्णातें (श्लोक ३९-४०). १९. भीष्मकाचें. २०. गृह. २१. जननेत्रांस. २२. कमळ. २३. सारख्या सख्यांनीं. २४. पाहिली. २५. परक्यांनीं. २६. धैर्य, रीति, बुद्धि इत्यादिक ज्या पतिव्रतांच्या नम्रता त्यांणीं. २७. भोंवताल्या. २८. उपमाता. २९. माता उपमाता यांजमध्यें. ३०. रुक्मिणी. ३१. सज्ज, कवचयुक्त. ३२. नृपवीर. ३३. शस्त्रधारी. ३४. दुंदुभि, शंख, मृदंग, यांचे. ३५. सर्व. ३६. मनोहर. ३७. गानकला. ३८. हेच शब्द मूळांत आहेत. (श्लोक ४३.)

तर्पी [1]वरविभवानीं [2]श्रीकरवीं जे नतास वरवि भवानी ।
तीचीच रमा आली हे पूजायास होय परमा आली. ॥ ४८
कृष्णपदध्यान [3]तिला करविति त्या [4]विप्रयुवति वृद्धा [5]नतिला, ।
श्रीच जरी न [6]नरी ती दावितसे [7]पूतजनादिकीं जनरीती. ॥ ४९
तीच्या हातीं [8]आर्या पूजन विध्युक्त करविती द्विजभार्या. ।
आयकिली नच कवणीं [9]ऐसी करि हळुच अंबिकेसि विनवणी. ॥ ५०
'करिन सदा नमन [10]शिवे! [11]सपतिसुते! तुज दुज्या वरा न मन [12]शिवे, ।
[13]नतजनसुरलतिकेला [14]मानो हें, म्यां मनें [15]अजित पति केला'. ॥ ५१
जी पावे [16]निर्वाणीं भावें आराधिली सदा [17]गीर्वाणीं, ।
यश जीचें [18]स्वर्वाणी गाय सदा ते [19]समर्चिली [20]शर्वाणी. ॥ ५२
गुरुभजना जपति, मती धर्मीं ज्यांची, [21]द्विजातियुवति [22]पतिमती, ।
त्यांचे भरि [23]कर [24]वाणीं, ऐकविती रुक्मिणीस [25]सुखकर वाणी. ॥ ५३
सौभाग्यद्रव्यांनीं [26]भूदेवी पूजिल्या स्वयें [27]भव्यांनीं. ।
आशीर्वादा [28]आर्या [29]निर्माल्यांसहित देति त्या द्विजभार्या. ॥ ५४
मग जोडुनियां [30]पाणी नमिली आर्या महासती [31]रुद्राणी, ।
[32]देवीचें सदन [33]मुनिव्रतहि त्यजिलें [34]द्विजांगनापद नमुनी. ॥ ५५
कर द्याया आलीला धरि [35]मणिमुद्राधरें करें [36]आलीला. ।
[37]मद हंसाचा [38]लीलालेशें [39]जी नुरवि दावि त्या [40]चालीला. ॥ ५६
श्री[41]मूर्तीची शोभा पाहुनि पावे नृपाळचित्त क्षोभा, ।
तो तो गिळिला मोहें देखे [42]स्मरमोहनास्त्र [43]योधीं जो [44]हें. ॥ ५७

---

१. उत्तम ऐश्वर्यानें. २. जी भवानी (गौरी) नतास (भक्तास) श्रीकरवीं (लक्ष्मीकडून) वरवी आणि उत्तम विभवानीं तर्पी, तीचीच आली (सखी) हे रमा पूजायास आली. ३. रुक्मिणीला. ४. ब्राह्मणस्त्रिया. ५. नमस्कारातें करविती. ६. मानवी. ७. पवित्र जनाच्या ठायीं. ८. पूज्य विप्रस्त्रिया. ९. कोणास ऐकूं न जाई असी. १०. हे गौरी. ११. शिवगणपतिसहिते. १२. न स्पर्शें. १३. भक्तजनाची कल्पलता जी तूं त्या तुला. १४. मान्य होवो. १५ कृष्ण. १६. शेवटीं. १७. देवांनीं. १८. स्वर्गस्थांची वाणी. १९. पूजिली. २०. गौरी. २१. ब्राह्मणस्त्रिया. २२. सौभाग्यवती. २३. ओंजळी, ओंट्या. २४. वायनांनीं. २५. मंगळकारक. २६. विप्रस्त्रिया. २७. उत्तम प्रकारचीं द्रव्यें त्यांनीं. २८. श्रेष्ठ द्विजभार्या. २९. निर्माल्य=देवादिकांवर वाहलेला पुष्पादिपदार्थ. याला संस्कृतांत 'शेषा' असें म्हणतात. ३०. हात. ३१. गौरी. ३२. अंबिकागृह. ३३. मौनहि. ३४. विप्रस्त्रियांचे चरण. ३५. रत्नांगुलीयकशोभित (करें). ३६. सखीला. ३७. गर्व. ३८. अल्पक्रीडेनें. ३९. जी चाल. ४०. मंदगतीला. ४१. रुक्मिणीच्या देहाची. ४२. कामाचें आर्तजनास मोहित करण्याचें आयुध. ४३. वीर. ४४. हें स्मरमोहनास्त्र रुक्मिणीरूप जो जो योद्धा पाहे तो तो मोहें गिळिला.

त्रिभुवनमोहनरूपप्रेक्षण तें मोह[1]वृक्षदोहदधूप ।
[2]स्मरशिखिकुंडें भूप [3]स्मितमुग्धकटाक्षमोक्ष तें वरि तूप. ॥ ५८
[4]शुचिरससंपदगूढस्मितसव्रीडेक्षणस्मरेषुविमूढ, ।
तच्छस्त्रेंहि गळालीं, लाजुन [5]कुसुमायुधासि काय पळालीं ? ॥ ५९
रथतुरगगजारूढ क्षिति[6]पति शूर [7]स्मरेषुहत संमूढ ।
पडति न, ते कुसुमशरा नमिति, म्हणति, 'तूंचि एक वीरवर खरा.' ॥ ६०
लोक प्रकट वि[8]पक्षस्मयकक्षज्वलन शस्त्रशास्त्रसुदक्ष ।
[9]स्मरशरविदलितवक्षस्थळमूर्छित पतन पावले बहु लक्ष. ॥ ६१
[10]हरदृगनलदग्धतनू, कुसुमविशिख पंच, म[11]धुप गुण, कुसुम धनू, ।
परि करि [12]अदितिदितिदनुप्रभव वश श्री[13]कटाक्षबळ चि[14]त्तजनु. ॥ ६२
साक्षान्मातापितर त्रैलोक्याचे तयांसि म्हणती इ[15]तर; ।
करिती रक्षण काय [16]स्वीयहि ज्यां रक्षवेचि न क्षण काय. ॥ ६३
ज्यांच्या हस्तीं नग्न [17]प्रखरायुधनिकर ते [18]कुसुमशरभग्न ।
झाले मोहनिमग्न, श्रीचें हरिसीं तया मुहूर्तीं [19]लग्न. ॥ ६४
न दिसे कां श्री[20]चक्र प्रवरायुध म्हणुनि नयन जों करि [21]वक्र ।
तों आला [22]यदुशक्रद्युमणि तदुदयीं [23]उलूक रि[24]पुनृपचक्र. ॥ ६५
[25]श्री कर देतांच पळामाजि [26]सुखघनावरासि मि[27]नली [28]चपळा; ।
श्रीस महाभाग हरी जेंवि [29]शृगाळांमधूनि निजभाग [30]हरी. ॥ ६६
ऐसा घालुनि घाला स्त्रीरत्न हरूनि वृष्णिवीर निघाला. ।
किति मोहित किति होते टकमक वदनाकडेचि पाहत हो! ते. ॥ ६७

---

१. मोहवृक्षाचा डोहळा जो धूप तद्रूप असें. २. कामाग्निरूप कुंड. ३. हास्यानें सुंदर जे कटाक्ष त्यांचें सोडणें तें. ४. शृंगाररसबाहुल्यानें गुप्त जें स्मित तें आणि सलज्ज प्रेक्षण तेच मदनबाण त्यांनीं मोहित. ५. काव्यसंग्रह—कृष्णविजय—पूर्वार्ध—पृष्ठ ८१ टीप १९ पहा. ६. राजे. ७. कामबाणपीडित. ८. शत्रूच्या गर्वतृणास जाळणारे. ९. कामबाणांनीं हत केलें वक्षस्थल म्हणून जे मूर्च्छा पावलेले ते. १०. शिवाच्या नेत्राग्नीनें जळाली ज्याची तनु असा. ११. भ्रमर हीच दोरी. १२. देव, दैत्य, दानव. (अदिति, दिति आणि दनु यांजपासून ज्यांचा प्रभव=जन्म ते.) १३. लक्ष्मीच्या कटाक्षांचें बळ ज्याला असा. १४. मदन. १५. परकीय. १६. स्वकीयशरीरहि. १७. तीक्ष्ण आयुधांचा समूह. १८. काममोहित. १९. लग्न झालें. २०. श्रीमत् चक्र हेंच श्रेष्ठ आयुध ज्याचें असा कृष्ण. २१. वांकडें. २२. यादवेंद्र कृष्ण हाच सूर्य. २३. घुबड. २४. शत्रुराजांचा समूह. २५. रुक्मिणी. २६. सुखाचा मेघ कृष्ण याला. २७. मिळाली. २८. वीज. २९. कोल्ह्यांमधून. ३०. सिंह. (श्लोक ५५ पहा.)

गेला घेऊनि बळें मग हळहळ करिति [1]सकळखळनृपतिबळें. ।
म्हणती, 'कन्या हरिली कीर्तिहि जी बहुत दिवस आम्हीं वरिली. ॥ ६८
दिवसाढवळ्या [2]नीतिभ्रष्टांनीं हरिलि कीर्ति गवळ्यांनीं ती ।
सिंहाचीं जसिं [3]एणीं शस्त्रें शोभति न जेंवि [4]विपतिस [5]लेणीं. ॥ ६९
[6]मागधमुख नृप मानी साहति न क्षणहि कीर्तिची असि हानी. ।
कोपें [7]द्विज[8]निजवस्त्रें खंडिति, नग्नेंचि जाहलीं बहुशस्त्रें. ॥ ७०

---

## अध्याय चौपन्नावा.

ते [9]भूमिधव [10]शयानीं शस्त्रें कवळूनि [11]कोपपरवश [12]यानीं ।
बैसुनि [13]उद्दामरणा धांवति साधावया जया वा मरणा. ॥ १
[14]रिपुबळसागरवेळा [15]यदुसेना प्राप्त जाहली रणवेळा ।
[16]भटनट उठले, [17]खेळीं प्रेक्षाया ये नभीं [18]सुरांचा मेळा. ॥ २
[19]यदुचक्रनगीं वृष्टी [20]शस्त्रांची करिति [21]शत्रुघन ते, दृष्टी ।
पडतां [22]वैदर्भी ती पावे स्वनिमित्त म्हणुनि लज्जा भीती. ॥ ३
पावुनि [23]परितापा हे [24]निजसुखसागर मुखासि [25]सरिता पाहे. ।
हांसोनि म्हणे [26]साक्षी, 'सावध हो, भय नको धरूं, [27]वामाक्षी! ॥ ४
सुंदरि! यादव [28]कल्पज्वलनचि, हें शत्रुभूपबळ तृणकल्प. ।
[29]झगडाया कोटि [30]करी येतां होईल काय [31]भीतिवश [32]हरी? ॥ ५
यदुदहनीं जळतील [33]द्विषिभटपतंग भीरु! बहु पळतील. ।
विजयश्री तुज देवी! सेवाया येतसे खळासि न सेवी. ॥ ६

---

१. सर्व दुष्ट राजांचीं सैन्यें. २. नीतिभ्रष्टांनीं गवळ्यांनीं. ३. हरिणीं. (श्लोक ५६ पहा.) ४. विधवेस. ५. भूषणें. ६. जरासंधादि राजे. ७. दंत. ८. ओष्ठें. (दांतांचीं जीं वस्त्रें तीं=ओष्ठ.) ९. राजे. १०. हातांनीं. ११. क्रुद्ध. १२. रथादिकवाहनीं. १३. निकराचें युद्ध करावयास. १४. शत्रुसेना हाच समुद्र त्याच्या वेळा (तीराला.) 'वेला काले च सीमायामब्धिकूलविकारयोः । अक्लिष्टमरणे रोगे ईश्वरस्य च भोजने ॥' इति मेदिनी. १५. यादवसेना हीच प्रतिबंधवेळा. १६. वीररूप नट. १७. युद्धरूप नर्तनास. १८. देवांचा. १९. यादवसैन्यरूप पर्वतावर. २०. शस्त्ररूप जलाची. २१. शत्रुरूप मेघ. २२. ती रुक्मिणी स्वनिमित्त युद्ध झालें म्हणून लज्जा पावली. २३. संताप. २४. स्वसुखसमुद्र जो कृष्ण त्याच्या मुखाकडे. २५. गंगारूपिणी रुक्मिणी. २६. कृष्ण. २७. हे रुक्मिणी. (वाम+अक्षि=सुंदर+नेत्र जीचे ती.) २८. प्रलयाग्नि. २९. लढावयास. ३०. गज. ३१. भयाकुल. ३२. सिंह. ३३. शत्रुवीर हेच शलभ.

ज्याच्या स्वरथीं ताळ ध्वज तूझा दीर वीर यादवपाळ ।
[1]बळ [2]बळसागर हा तीं[3] संहारिल धरुनि मुसळ नांगर हातीं. ॥ ७
[4]पूर्णेंदुमुखि! पहा गे! असती [5]यदुवीरसिंह सर्वहि जागे. ।
[6]शरदंष्ट्रासंकीर्णें [7]यद्वदनें [8]चापमंडळें विस्तीर्णें. ॥ ८
तो **गद**, तो **अक्रूर**, श्रीमान् बळसिंधु तो [9]मदग्रज शूर ।
करिती [10]शरजळवृष्टी [11]कल्पांतांभोद पडतसे कीं [12]दृष्टी.' ॥ ९
सुटले उग्र [13]यदुभटानिळ रणरंगीं [14]नभीं [15]अहितजळदघटा ।
पळमात्रांत [16]वितुळती [17]त्यांची लोकीं प्रसिद्ध शक्ति अतुळ ती. ॥ १०
[18]निर्जरक्तें नाहविले, [19]शोणिततटिनींत भट सगज वाहविले. ।
[20]यवसधरचि राहविले, [21]अमरां [22]नृत्यत्कबंधनट पाहविले. ॥ ११
ते [23]प्रलयनटछात्र ज्ञानतपोवेदमंत्रविद्यापात्र, ।
परि भयकंपितगात्र [24]त्रांण [25]रमापत्यधीन हें यां मात्र. ॥ १२
युद्धीं यत्न न चाले, [26]मगधपतिप्रमुख नृप पराङ्मुख झाले. ।
**शि**शुपाळाला नवरी देती [27]अपकीर्ति तीस, ती त्यासि वरी. ॥ १३
[28]तच्चित्त जसें [29]बोधे वदति तसें [26]मगधनाथभूपतियोधे. ।
समजावुनि नृप देशा आपुलिया [30]नेति करुनिया [31]उपदेशा. ॥ १४
रुक्मीही [32]परमर्षिप्रियहरिचा शत्रु दुष्टबुद्धि [33]अमर्षी ।
ऐकत असतां राजे बळगर्वें [34]काळमेघ तैसा [35]गाजे. ॥ १५

---

१. बलराम. २. बळाचा समुद्र. ३. शत्रुबळें. ४. हे राकामुखि. ५. यादववीर हेच सिंह. ६. बाणदाढांनीं व्याप्त. ७. ज्या चापमंडळाचीं तोंडें. ८. धनुष्याचीं मंडळें. ९. माझा वडील भाऊ राम. १०. बाणरूप जलाची वृष्टी. ११. गद अक्रूरादि हेच प्रलयमेघ. १२. पंतांनीं वर्णनविस्तार केल्याचें हें दुसरें उदाहरण या ग्रंथांत आहे. पंतांस विस्तृत वर्णन आवडत नसे असें खरें, तथापि प्रसंग पाहून त्याचा ते आदरच करीत असत असें वाटतें. १३. यादववीर हेच वायु. १४. रणभूमिच आकाश त्यांत. १५. शत्रु हेच मेघ त्यांचे समुदाय. १६. नष्ट होती. १७. यादवांची. १८. हें अत्यंतातिशयोक्तिनामक अलंकाराचें उदाहरण आहे. १९. रक्तनदींत. २०. दांतीं तृण धरणारेसेच. २१. देवांना. २२. नाचणारे कबंध हेच नट. कबंध=ज्याला डोकें नाहीं असा देह. २३. शिवाचे शिष्य. २४. रक्षण. २५. कृष्णाधीन. २६. जरासंधादिक. २७. अपकीर्तिरूप नवरी. २८. शिशुपाळाचें चित्त. २९. ज्या प्रकारें बोधलें जाई असें. ३०. शिशुपाळाला घेऊन जाती. ३१. हा उपदेश श्लोक ११-१६ यांत आहे. ३२. थोर ऋषी ज्याला प्रिय तो (हरि). ३३. क्रोधी, असहन करणारा. ३४. प्रळयकाळचा मेघ. ३५. गर्जना करी. (श्लोक २० पहा.)

[1]हरिरक्तें न्हाणीन [2]क्षितिला, भगिनीस सोडवुनि आणीन ।
[3]मी मृगपति कळवीन स्वबळ यदु[4]कुरंग दशदिशा पळवीन. ॥ १६
करितिल न परित्राण स्वयशाचें भगिनिचें न हे जरि [5]बाण ।
हरितिल न हरिप्राण, स्वपुरा येईन तरि असे मज [6]आण.' ॥ १७
माराया [7]यदुपाळा घेउनि अक्षौहिणीबळा खळ [8]साळा ।
सोडित उष्णश्वासा धावे [9]हरिवरि पिसाळलाचि [10]श्वासा. ॥ १८
तो मनुजाकृति [11]भूत क्रोधा[12]रुणनयन खळ म्हणे, 'रे [13]सूत! ।
लंघी लघुपथ हा, कीं जावूं द्यावा न [14]चोरटा, रथ हाकीं. ॥ १९
[15]निजलंघन जगिं नीचें असमर्थं साहिजेचि, मी भगिनीचें ।
हरण न साहें, [16]गोपें मज न वळखिलें म्हणोनि गमलें [17]सोपें. ॥ २०
सिंहशिरीं [18]वामपदन्यास [19]सृगाळासि [20]भद्र? हें तूंचि वद. ।
नाशिन [21]खळवीर्यमद [22]वैरिपुक्षतजें भरीन मी आजि [23]नद.' ॥ २१
फार खवळले दोष [24]ज्ञानतरणिराहु काम लोभ [25]सरोष ।
[26]बोले बोल पिसा जे [27]ते योग्य, न [28]त्यांविणें पिसेपण साजे. ॥ २१
त्यजिली सेना मागें धांवे खळ [29]दांत ओंठ खातचि रागें. ।
[30]सज्जितधन्वा कोपी रुक्मी ईश्वररथासि त्या आटोपी. ॥ २३
गर्जे, दाखवि कोपा, तो मूढ म्हणे, '[31]उभा, उभा रे! [32]गोपा! ।
उत्तम पाहुनि [33]होरा [34]मद्भगिनीरत्न नेसि चोरुनि चोरा!' ॥ २४

१. कृष्णाच्या रक्तानें. २. पृथ्वीला. ३. मीं सिंह आहे असें यादव मृगांस कळवीन. ४. कुरंग=मृग. ५. हे माझे बाण. ६. शपथ. हें रुक्मिभाषण मूळांतील २० व्या श्लोकाशीं ताडून पाहण्यालायक आहे. यांतील आवेश मूळांत नाहींच असें म्हटलें तरी चालेल. ७. कृष्णास. ८. मेहुणा. (रुक्मी.) ९. सिंहावर. १०. कुत्र्यासारखा. (श्वन्=कुतरा.) ११. पिशाच. १२. रागानें अरुण (लाल) नयन (डोळे) ज्याचे तो. १३. हे सारथ्या. १४. कृष्ण. (बहिणीला चोरणारा.) १५. स्वमर्यादेचें उल्लंघन. १६. गवळी कृष्ण यानें. १७. भगिनीहरण सोपें गमलें. १८. डावा पाय ठेवेंण. १९. कोल्यास. २०. कल्याणकारक होईल काय?. २१. दुष्ट कृष्णाचा पराक्रमगर्व हरीन. २२. शत्रूच्या रक्तानें. (क्षतज=रक्त.) २३. मोठी नदी. २४. ज्ञानरूप सूर्याला (तरणीला) राहूप्रमाणें गिळणारे. २५. क्रोधासह काम लोभ हे तीन दोष. जसे कफ वात पित्त तसे नाशक आहेत. २६. पिसा जे बोल बोलतो ते. २७. ते बोल त्यांस योग्य २८. तशा बोलावांचून. २९. दांतओंठ खाणें किंवा चावणें=क्रोधानें चडफडणें. ३०. सज्जित (गुणयुक्त, ज्या (दोरी) सह आहे धनुष ज्याचें तो सज्जितधन्वा. ['धनुषश्च' (पाणिनि ५-४-१३२) या सूत्रानें 'धनुष्'शब्दाला बहुव्रीहि समासांचे अंतीं 'धन्वन्' असा आदेश होतो; जसें–अधिज्यधन्वा, शार्ङ्गधन्व इत्यादि.) ३१. श्लोक २३–२४ पहा. ३२. हे गवळ्या. ३३. मुहूर्त. ३४. माझी बहीण हेंच रत्न

[1]उग्रशरत्रय जोडी, ओढुनि दृढचाप, [2]पाप हरिवरि सोडी. ।
'चोरीची बहु [3]गोडी' दुष्ट म्हणे 'सोडवीन मी हे खोडी. ॥ २५
चोरुनि [4]दिवसाढवळ्या दुर्लभरत्नासि पळसि कोठें [5]गवळ्या? ।
[6]यदुवंशकलंका! मी रुक्मी आलों [7]खळा [8]भवद्वधकामी. ॥ २६
क्षणमात्र उभा ठाक, प्राण हरायासि पातलों मी, [9]काक ।
पात्र न जैसा [10]हविला, [11]आयुःशेषेंचि दोष पळ साहविला. ॥ २७
तूं कपटी हें जाणें, परि मी त्वद्वीर्यमद विनाशिन बाणें. ।
कन्यारत्नस्नेह त्यज, जों झाला न [12]मदिषुचूर्णितदेह.' ॥ २८
ऐसी ऐकुनि वाणी हांसे जगदीश [13]शार्ङ्गमार्गणपाणी, ।
सत्वर सा शर सोडी, ताडुनियां [14]शालकासि [15]तद्धनु तोडी. ॥ २९
[16]आठानीं हय वेधी, सूताचें हृदय दोंशरांनीं भेदी. ।
ध्वज तीं बाणीं ताडी, [17]मारुत वृक्षासि तेंवि भूवरि पाडी. ॥ ३०
पुनरपि रुक्मी पाप क्रोधें करि सज्ज शीघ्र दुसरें [18]चाप, ।
पांचांबाणीं वेधी हरिला, तो देव तेंहि [19]धन्व छेदी. ॥ ३१
तिसरा घे [19]ईष्वास [20]ज्यां जोडी तोंचि कृष्ण तोडी [21]त्यास. ।
ऐसें होय परि [22]घातो प्रभुला म्हणवूनि घे [23]विमूढ [24]परिघ [23]तो. ॥ ३२
तोडी हरि परिघाला, परि घालाया पुन्हाहि [25]तदुपरि घाला ।
घे [24]पट्टिश, मग [24]शूळ, स्पष्ट तया लागलेंचि केवळ [26]खूळ. ॥ ३३
केला न [27]प्रणिपात, [28]त्रिभुवनगुरुवरि [29]उगारिलेही हात. ।

---

१. तीन बाण. २. रुक्मी. ३. तुला जी चोरीची गोडी आहे ती. ४. ढळढळीत दिवस असतां. ५. हे गवळ्या कृष्णा. ६. हे यदुवंशदूषका, यदुकुलपांसना. ७. हे दुष्टा कृष्णा. ८. तुझ्या वधाची इच्छा धरणारा. ९. कावळा. १०. कावळा हवीला पात्र जसा नव्हे तसा तूं कन्यारत्नास पात्र नाहींस असा अर्थ. (श्लोक २५ पहा.) ११. तुझा अपराध तुझ्या आयुःशेषानें मजकडून साहविला. १२. जों तुझा देह माझ्या बाणांनीं चूर्ण झाला नाहीं तों कन्यारत्नाचा स्नेह टाक. (मद्+इषु=बाण+चूर्णित+देह.) १३. शार्ङ्ग (धनुष्य) व बाण हातीं ज्याच्या असा (कृष्ण.) [मार्गण=बाण. 'मार्गणं याचनेऽन्वेषे मार्गणस्तु शरेऽर्थिनि' इति हैमः] १४. रुक्मीला. १५. त्या शालकाचें चाप. १६. आठ बाणांनीं चार अश्वांला. १७. वारा. हा दाखला मूळांत नाहीं. १८. धनुष्य. १९. धनुष्य. [इषु+आस=इषवो बाणा अस्यन्तेऽनेन=ज्याच्या योगें बाण (इषु) सोडले जातात तें.] २०. दोरी. २१. त्या धनुष्यास. २२. घात करो, मारो. २३. तो मूर्ख रुक्मी. २४. आयुधविशेष. २५. कृष्णावर. २६. वेड. २७. नमन. २८. त्रिभुवनाचा गुरु कृष्ण त्यावर. २९. उगारणें=रोंखून धरणें.

तद्वत[1] शस्त्रव्रात[2] क्षणमात्रें धूळि[3] होय, योग्यचि वात. ॥ ३४
करवालासह[4] चर्मा[5] जों घेता जाहला सुनिंदितकर्मा[6], ।
तों दांभिककृतधर्मा[7] परि निष्फळ होय, पावलाचि न शर्मा[8]. ॥ ३५
दावाया भुजशक्ती हरिला रुक्मी धरी सुदुःसह शक्ती. ।
खंडी तीसहि, भक्ती जेंवि कुमतिला[9], परंतु न वरि विरक्ती[10]. ॥ ३६
पुनरपि घे तोमर तो, जेंवि अपथ्यास आग्रही[11] तो मरतो. ।
त्यातेंही करि चूर त्रिदशवरगुरुप्रभु[12] प्रतापी शूर. ॥ ३७
परि सोडी न मति कुडी[13] टाकी धृतखड्ग[14] तो रथावरुनि उडी. ।
धांवोनि रमारंगज्वलनावरि[15] जाय मूढ रुक्मि पतंग[16]. ॥ ३८
बाणांहीं क्षिप्र[17] चुरा करि खड्गा खंडुनी मदाहि प्रचुरा[18]. ।
घे नंदककरवाळा[19] रुक्मिवधार्थ प्रभु द्विषज्जनकाळा[20]. ॥ ३९
पडतां हें सर्व दिठी[21], प्रणताभयदानपटुपदीं[22] घालि मिठी, ।
विनवी करुणाभ्रा[23] त्या, 'प्रभुजी[24]! द्या प्राणदान माझ्या भ्रात्या.' ॥ ४०
आली होती चीड[25] द्वेष्ट्याची[26] परि पडे सतीची[27] भीड. ।
देउनि अभया, चेलें[28] बद्ध खेळा[29] शालकास सत्वर केलें. ॥ ४१
खड्गेंचि मिशा दाढी डोईचे केशही मधिं मधीं काढी[30]. ।
मरणाहुनि ही गाढी[31] लज्जा, हें त्यांस[32] तत्क्रिया[33] फळ वाढी. ॥ ४२

---

१. रुक्मीजवळील. २. शस्त्रसमूह. ३. माती. ४. तरवारीसह. ५. ढालीला. ६. रुक्मी. (वाईट आहे कर्म ज्याचें तो.) ७. ढोंग्यानें केलेल्या धर्माप्रमाणें जो तो. ['धर्म' शब्दाला 'धर्मादनिच्केवलात्' (पाणिनि ५-४-१२४) या सूत्रानें 'धर्मन्' असा आदेश बहुव्रीहि समासाचे अंतीं होतो—जसें—कल्याणधर्मा, निवृत्तिधर्मा, अनुच्छित्तिधर्मा, समानधर्मा, इत्यादि]. ८. सुखातें. ९. वाईटबुद्धीला. १०. वैराग्य, पश्चात्ताप. ११. जो आग्रही रोगी अपथ्यास घेतो तो मरतो, हा दृष्टांत मूळांत नाहीं. १२. देवांचा (त्रिदशांचा) वर (श्रेष्ठ) असा गुरु (कृष्ण.) १३. खोटी. १४. धरिलें आहे खड्ग (तरवार) ज्यानें तो (रुक्मी), खड्गपाणि. १५. कृष्णरूप अग्नीवर. १६. श्लोक ३० पहा. १७. शीघ्र, लौकर. १८. पुष्कळ (गर्वालाही.) १९. नंदक नामक खड्गा. [नंदक हें विष्णूचें खड्ग; । देवान् नंदयति इति नंदकः—देवातें आनंद देणारें जें खड्ग तें नंदक । 'नंदको हरिखड्गे च हर्षके कुलपालके.'] २०. शत्रुजनाच्या काळा (हें खड्गाचें विशेषण.) २१. दृष्टीस. २२. शरणागतांस अभय देण्याविषयीं समर्थ जो कृष्ण त्याच्या पायीं रुक्मिणी मिठी घाली. २३. दयेचा मेघ कृष्ण यास. २४. हे प्रभो. २५ क्रोध. २६. रुक्मीची. २७. रुक्मिणीची. २८. वस्त्रानें. २९. दुष्ट मेव्हण्यास. ३०. कृष्ण हा कर्ता. डोईचे मध्यें मध्यें केश काढणें=पाट काढणें. (हा एक दंड अथवा शासन करण्याचा प्रकार आहे.) ३१. थोर. ३२. रुक्म्यास. ३३. त्याचें कर्म.

आला जो [1]शत्रुबळ द्विपसिंह [2]सयादव प्रवीर विभु [3]बळ. ।
तो हें भी[4]ष्मकभूपज्येष्ठसुताचें विलोकि सहसा [5]रूप. ॥ ४३
आली रामास दया सोडि स्वकरें कृतापराधाहि [6]तया. ।
थोरांचें [7]मन [8]पोळे रिपुचेंही दैन्य देखती जरि डोळे. ॥ ४४
तो करुणेचा [9]अब्द प्रभु बळ लावी नि[10]जानुजाला शब्द. ।
'संबंधी जरि दुष्ट ज्ञाते होती असे कदापि न रुष्ट. ॥ ४५
[11]वैदर्भी [12]मानि भावी खेद, तिला ज्ञान सांगुनी समजावी, ।
कीं प्राणी निजकर्में पावे [13]अनिवारितेंचि दुःखें [14]शर्में.' ॥ ४६
राम स्वमुखें बोधी, वैदर्भीच्या मनोमळातें [15]शोधी. ।
परि तो रुक्मी क्रोधी वेश सदुपदेश घे न [16]साधुविरोधी. ॥ ४७
उग्र जयापरि [17]भूत प्रभु तो [18]पंचाक्षरी करी [19]परिभूत, ।
[20]तेथेंचि [21]तया गोडी निजलीलेनें [22]बळप्रभा [23]हरि [24]नेडी. ॥ ४८
[25]जेथें पराभव लाहे वसवुन तेथेंचि भो[26]जकट पुर राहे, ।
न पुन्हा कुंडिन लक्षी, [27]मानी रुक्मी [28]कृतप्रतिज्ञा रक्षी. ॥ ४९
[29]भीष्मककन्याहरणीं श्रीकृष्णें जिंकिले प्रबळ भूप रणीं; ।
स्वपुरा [30]आणुनि [31]विधिनें वरिली लोकैकनायकें सुखनिधिनें. ॥ ५०
प्रथमहि नव्हता [32]तोटा परि हो तो द्वारकेंत [33]उत्सव मोठा, ।
कीं तें श्रीचें लग्न स्वसुखसमुद्रांत लोक होय निमग्न. ॥ ५१

---

१. शत्रुबळरूप गजाचा हंता. (सिंह.) २. यादववीरांसहित. ३. बलराम. ४. भीष्मकराजाच्या वडील पुत्राचें. (रुक्मीचें.) ५. खंडमुंडितरूप. ६. रुक्मीस. ७. हें अर्ध सुभाषितरूप आहे. ८. व्यथित होतें. ९. मेघ. १०. कृष्णाला. ११. रुक्मिणी. १२. मानी. १३. अनिवारण केलेलीं. १४. सुखें. १५. धुऊन टाकी. १६. साधुद्वेषी. (रुक्मी.) १७. पिशाच. १८. मांत्रिक, पिशाचनिरासक, पंचाक्षरी मंत्रानें जो पिशाच घालवितो तो. १९. जिंकिला असा. २०. दुष्ट जिंकण्यांतच. २१. कृष्णास. २२. दुष्टांचें बळ आणि तेज तें. २३. कृष्ण. २४. हिरून घेई. २५. ज्या ठिकाणीं. २६. या नांवाचें नगर. २७. अभिमानी. २८. केलेली प्रतिज्ञा. २९. रुक्मिणीहरणप्रसंगीं. ३०. रुक्मिणी आणून. ३१. यथाशास्त्र. ३२. उत्सवास तोटा नव्हता. ३३. विवाहसंबंधी.

## अध्याय पंचावन्नावा.

(श्लोक.)

[1]पूर्वीं [2]रुद्रललाटलोचनशिखिज्वाळामुखीं जो जळे,
[3]तो रुक्मिण्युदरासि ये [4]रतिपती हें [5]शंबराला कळे, ।
कीं 'स्वप्राणहर स्मर प्रकटला, जो [6]अप्रगल्भ स्वयें,
तो मारीन' म्हणे '[7]उपेक्षित रिपू देतो [8]अनल्पें भयें.' ॥ १
ऐसें चिंतुनि [9]कामरूप खळ [10]तो पावे [11]पळें द्वारका,
[12]प्रासादांत शिरे, हरी हरिचिया [13]मायाबळें [14]दारका; ।
ने [15]व्योमीं सहसा [16]अनिर्दश शिशू प्राणक्षया दांडगा
[17]जैसा कीं [18]मृगशावकास पळवी भक्षावया लांडगा. ॥ २
काम [19]श्रीहरिजात बाळ वधवे कैसें [20]सपत्नाकरीं ?
टाकी झांकुनि नेत्र निर्दय बळें तें [21]रत्न [22]रत्नाकरीं, ।
तों [23]मीनें [24]नवनीतपिंडमृदुल प्रेक्षूनियां भक्षिला,
[25]जाणो [26]रम्यकरंडकींच सुमणी रत्नाकरें रक्षिला. ॥ ३
[27]दुष्टें नेउनि पुत्रशोक दिधला श्रीरुक्मिणीच्या मना,
झाला खेद [28]महोत्सवांत सहसा त्या द्वारकेच्या जना, ।
जो देतो बहुतांसि दुःख कुमति स्वार्थार्थ तो नाडिला,
[29]कामाद्युग्ररिपुत्रयेंचि नरकीं बांधोनियां [30]पाडिला. ॥ ४

---

१. पूर्वकाळीं. २. शिवाच्या तृतीयनेत्रांतील अग्नीच्या ज्वालेच्या मुखांत. ३. प्रद्युम्न. (शंबरारि.) ४. काम. ५. शंबरासुराला. ६. बाल्यावस्थेंत असणारा. ७. उपेक्षिलेला शत्रु. ८. बहुत. ९. इच्छेस येईल तें रूप घेणारा. (मायावी कपटी–असा भाव.) १०. शंबरासुर. ११. एका पळांत. १२. कृष्णमंदिरांत. १३. कपटसामर्थ्यें. १४. मुलास. (प्रद्युम्नाला.) १५. आकाशांत. १६. जन्मून ज्याला दहा दिवस झाले नाहींत असा, सद्योजात. (अध्याय ५५ श्लोक ३.) १७. ही उपमा मूलग्रंथांत नाहीं. १८. हरिणबालकास. १९. अगोदर काम, त्यांत कृष्णसंभूत, त्यांत बाळ. २०. शत्रुहस्तें. २१. बालकरत्न. २२. समुद्रांत. (रत्न+आकर=मणि मोत्यें इत्यादि+खाण.) २३. मत्स्यानें. २४. लोण्याच्या गोळ्यासारखा मऊ. २५. हें उत्प्रेक्षालंकाराचें उदाहरण आहे. २६. चांगल्या डब्यांत. २७. शंबरासुरानें. २८. पुत्रजन्ममहोत्सवांत. २९. काम, क्रोध, लोभ, या तीन शत्रूंनीं तो नाडिला व नरकीं पाडिला असें समजावें. ३०. या व पुढच्या श्लोकास मूळांत आधार नाहीं, हे पंताच्या पदरचे आहेत, तेव्हां हें काव्य भाषांतररूप होय किंवा कसें या प्रश्नाचा अशा पद्यांच्या आधारानें बराच निर्णय होतो.

भक्षावा [1]जळजंतुनीं म्हणउनी टाकूनि तो अंबुधी-
मध्यें बाळक **शंबर** स्वसदना निश्चिंत गेला [2]कुधी; ।
[3]जो निःशेष न जाहला जरि **हरक्रोधानलें** जाळिला,
केला अंबुधिमग्न [4]दुर्मति म्हणे, 'मृत्यु स्वयें टाळिला.' ॥ ५
पसरुनी [5]गुरुजाळक [6]धीवरीं, धरियले बहुमीन [7]नदीवरीं; ।
[8]यदुदरीं शिशु तो [9]झष सांपडे, विधिबळें व्यसनीं सहसा पडे. ॥ ६
[10]दाशांहीं बहु पीन[11] मीननिकरीं[12] जो देखिला तो बरा,
[13]भावें भेटविला[14] तयाचि असुरा राष्ट्राधिपा **शंबरा**; ।
तेणें [15]सूदकरीं दिला मग तिहीं [16]पाकस्थळीं कापिला,
पोटीं बाळ करंडकांतुनि निघे जैसा मणि स्थापिला. ॥ ७
होती तेथ[17] पतिव्रता [18]रति पतिप्राप्त्यर्थ रम्याकृती
[19]आच्छादूनि [17]महानसीं करि [20]तदादेशेंचि पाकाप्रती, ।
मानी [21]पाचकमंडली [22]स्वगुरुता देऊनि सारी तिला[23],
कीं तो **शंबर** [24]मानवे बहु तिच्या पाकाचिया रीतिला[25]. ॥ ८
परम कोमल रम्य शरीर ती झिजवि, [26]दुर्जनदास्य करी **रती**; ।
प्रियपदींच सती धरि भाव कीं, उचित मृत्यु [27]तदर्थहि [28]पावकीं. ॥ ९
जैसें [29]रूप तसेंचि नाम दुसरें **मायावती** हें [30]धरी,
शत्रूच्या सदनीं, न पाक, तप ती [31]पत्याप्तिसाठीं करी; ।

---

१. जलचरांनीं. २. दुर्बुद्धि. ३. कामशत्रु. ४. दुर्बुद्धि. ५. मोठें जाळें. ६. कोळ्यांनीं. ७. नदीवर (समुद्र) यांत. ८. ज्या माशाच्या पोटांत. ९. मासा. १०. कोळ्यांनीं. ११. पुष्ट. १२. मत्स्यसमुदायामध्यें. १३. राजभक्तीनें. १४. नजर केला, उपायन म्हणून दिला. १५. पाककर्त्याच्या हातीं. १६. महानसांत. १७. पाकशाळेंत. १८. कामाची स्त्री. द्वापारांतीं कृष्णापासून रुक्मिणीच्या उदरीं काम जन्मास येणार असें जाणून, व त्याच्या हातून शंबर नामक असुराचा मृत्यु आहे हें मनांत धरून त्या असुराच्या गृहीं रति ही 'मायावती' असें नांव धारण करून स्वपतिजन्मोदयाची वाट पाहत राहिली होती. १९. आपलें सौंदर्य झांकून. २०. शंबराच्या आज्ञेनेंचि. २१. पाक करणारी मंडळी, सूदसमूह. २२. आपलें मुख्यत्व. २३. रतीला. २४. संतोष पावे. २५. पाकक्रियेला. २६. दुष्ट शंबराची सेवा. २७. पतीकरितां. २८. अग्नींत. २९. जसें रूप पालटलें तसें नामही पालटलें. ३०. रति मायावती हें दुसरें नाम धरी. ३१. पतिप्राप्त्यर्थ तपच करी, पाक न करी.

सूदांहीं[1] शिशु पोषणार्थ दिधला प्रार्थूनि तीकारणें,
त्याचें रूप विलोकितांचि घडलें तल्लोचना[2] पारणें[3]. ॥ १०
मायावतीस शिशु अर्पिति सूपकार[4], सांगोनि तत्त्व[5] करि नारद सूपकार[6]; ।
होतां अकल्पितचि तो पतिलाभ जाया[7] पोषी सुखासह[8] तया पतिला भजाया. ॥ ११
रक्षी ज्यासि पतिव्रता प्रियतमा मायावती मायसी[9], ।
शंभूची अभयोक्तिही[10], मग तया चिंता असे कायसी ?
संसाराब्धिनिमग्न[11] जे जन तयां ज्यांचीं पदें पारदें[12],
योगींद्रें अवलोकिलेंहि करुणालीलालयें[13] नारदें. ॥ १२
जो श्रीकुक्षींत[14] जन्मे मदन सुत अनौपम्यकीर्त्यर्णवाचा[15],
कैसी वर्णील चेतोहर[16] तदुदित[17] तद्रूप[18] तद्वर्ण[19] वाचा[20] ? ।
स्वल्पें काळेंचि झाला तरुण[21], सकरुणश्रीमहेशप्रसाद[22],
स्वैरें[23] क्रीडावयाचा रतिनिजमतिचा[24] दीर्घपूर्वप्रसाद[25]. ॥ १३
कामत्वाच्युतजत्वयौवन[26] अशा अत्यद्भुताचि त्रया,
जेथें गांठि विलोकितां न युवती होती कशा चित्रें[27] या ? ।
जी स्वप्नांतहि मन्मथाविण सती चिंतीच ना येरें[28], ती
एकांतीं सुरतार्थ[29] भूषिततनू[30] होऊनियां ये रती. ॥ १४
लज्जा[31] व्यालोलदृष्टि[32], स्मित रुचिर[33] मुखीं, भ्रूयुगीं नृत्य, नर्म[34]
व्यवहारीं[35], कोमलांगीं अभिनव मिरवे घर्म[36] रोमांचवर्म; ।

---

१. पाचकांनीं. २. रतीच्या नेत्रास. ३. पारणें घडणें=पारणें फिटणें=ज्या ज्या इंद्रियांस जो जो विषय अत्यंत प्रिय आहे तो तो त्याला मिळून त्या इंद्रियांचें समाधान होणें. ४. पाककर्ते. ५. गुह्य. (मुलाची उत्पत्ति (कामजन्म) आणि मत्स्योदरप्रवेश हें नारद तिला कळवी.) ६. चांगला उपकार. ७. स्त्री रति. ८. सुखाला आणि निजपतीला वाढवी. ९. आईप्रमाणें. १०. आशीर्वादही रक्षी. ११. प्रपंचरूप सागरांत बुडालेले. १२. पार देणारीं, तडीला पोंचविणारीं (पदें). १३. करुणारूप लीलेचें स्थान अशा नारदानें. १४. रुक्मिणीच्या उदरीं. १५. निरुपम कीर्तिसागर जो कृष्ण त्याचा सुत. १६. मनोहर. १७. त्याचें भाषण. १८. त्याचें रूप. १९. त्याचा वर्ण. २०. मनुष्यवाणी. २१. अध्याय ५५ श्लोक ९ पहा. २२. सकरुण जो श्रीशिव त्याचा मूर्तिमंत प्रसादच. २३. यथेच्छ. २४. रतीच्या स्वकीय मतीचा. २५. प्रसाद यांतील पूर्व वर्ण 'प्र' हा दीर्घ ज्याचा म्हणजे प्रासाद. (गृह.) २६. कामत्व, अच्युतापासून उत्पन्नत्व, आणि यौवन ह्या तीन गुणांची (गांठि). २७. साश्चर्य. २८. अन्य पुरुष. २९. निधुवनार्थ. ३०. अलंकृतदेहा. ३१. या श्लोकास मूळ ग्रंथांत कायसा आधार आहे हें शोधकांनीं पहावें. ३२. चपल दृष्टींत लज्जा. याप्रमाणें पुढें आधाराधेययोजना करावी. ३३. सुंदर. ३४. विनोद, परिहास. ३५. भाषणांत. ३६. घाम, स्वेद.

ऐसी [1]मायावती जी तिस मदन म्हणे, 'माय तूं, [2]धेनुधर्म
स्वीकार [3]व्रीडकारी, तुज मजहि न दे शर्म हें निंद्य कर्म. ॥ १५
रीति जे बहु जगीं [4]अधमा ते, हेचि हो त्यजुनि साधव माते! ।
सेविति स्वजनता सुरता तें इष्ट इच्छिसि कसी सुरतातें?' ॥ १६

प्रथम गमला ऐसा मोठा अधर्मचि तो, [5]दिलें
न [6]मन वचना कामें नाहींच तें [7]अनुमोदिलें, ।
मग कथि तया [8]जाया [9]जाया स्वसंशय वृत्त, [10]मी
रति, मदन तूं, हें तें होय [11]प्रभा [12]स्मरहृत्तमीं. ॥ १७
[13]महामाया माया रति पतिस दे [14]जी न उरवी
अनेका [15]मायांतें, [16]निबिडतिमिरा ज्यापरि रवी; ।
गदाही दे [17]मायाशतनिपुणशत्रुप्रमथन
क्रियासिद्धयुत्साहा उपजवि, करी युक्ति कथन. ॥ १८
उठे काम क्रोधेंकरुनि [18]कलितोद्दामगद या
[19]रिपूतें माराया, कलह करि, कैंची मग दया? ।
सभेमध्यें होता [20]असुरपति त्याच्याचि जवळी
बसे बोले [21]कार्ष्णि [22]श्रवणकटु दुष्टास [23]खवळी. ॥ १९
[24]स्वाधिक्षेपविवृद्धमन्यु खळ तो [25]दंडाहतव्याळसा
धांवे शीघ्र, तदा गदा धरि न जी [26]ही उत्सवीं [27]आळसा, ।
[28]कोपानें करि अस्त्र शस्त्र कपटें वेचूनियां युद्ध तें,
तैसें जें [29]हरिबाळकोन्मुख [30]बळें येणें गजें [31]उद्धतें. ॥ २०

१. माता. २. पशुधर्मस्वीकार. ३. लज्जाप्रद. ४. नीच. ५. वचना मन न दिलें. ६. मन दिलें= लक्ष पुरविलें, मन देणें, मन लावणें, मन घालणें=मन एकाग्र करून एखाद्या पदार्थावर किंवा कार्यावर लावणें. ७. मान्य केलें. ८. स्त्री. (रति.) ९. आपला संशय जावा यासाठीं. १०. मी रति, तूं मदन. ११. प्रकाशक. १२. मदनाच्या हृदयांतील अज्ञाननाश विषयीं. १३. महामाया नामक माया विद्या. १४. माया विद्या. (सर्व कपटाचा नाश करणारी विद्या.) १५. कपटांतें (शंबरप्रयुक्त कपटप्रबंधातें.) १६. दाट काळोख. १७. मायाशतामध्यें निपुण जो शत्रु (शंबरासुर) त्याच्या मथनकर्मसिद्धीच्या उत्साहाला. १८. गृहीत आहे मोठी गदा ज्यानें असा. (प्रद्युम्न.) १९. शंबरातें. २०. शंबर. २१. कृष्णपुत्र. (प्रद्युम्न.) २२. कानास कटु असें बोले. २३. क्षुब्ध करी. (सर्पाप्रमाणें.) २४. निजनिंदेनें (स्वाधिक्षेपानें) ज्याचा क्रोध वाढला असा. २५. काठीनें ताडिलेल्या सर्पासारखा. (श्लोक १८ पहा.) २६. जी गदा. २७. आळशी नव्हे. २८. अस्त्र शस्त्र वेंचून कोपानें युद्ध करी–असा अन्वय. २९. सिंहबालकाच्या समोर. ३०. चालून जाणें. ३१. दांडग्या हस्तीनें.

[1]भृंगाची पंक्ति [2]मौर्वी, [3]कुसुममय धनू, बाण तेहि [4]प्रसूनें,
लीलेनें दास केले असुर सुर नर प्रौढही [5]ब्रह्मसूनें, ।
तोचि प्रद्युम्न [6]साक्षादजितसुत युवा ज्या रणीं शस्त्रपाणी,
[7]बाहे पाहे [8]तदाप्तीं [9]तिळसहित तया सोडिजे कां न [10]पाणी? ॥ २१
[11]काळव्याळविषाग्निचीच धरिली [12]जाणों [13]करीं जीभ, [14]या
माराया तरवारि [15]वारिदनिभा देवाहि दे [16]जी भया; ।
शत्रूचें [17]सकिरीटकुंडल शिर च्छेदी क्षणें, होय [18]जो
कांहीं न श्रम, [19]कोमळेंहि खुडितां जैसें नखें [20]तोयजा. ॥ २२
जे होते [21]उत्सवा त्या निरखित अमर व्यापुनी [22]अंबरा, 'रे!
[23]दुष्टा! जा [24]दुर्गतीतें' म्हणति '[25]निजपुरा जा, प्रभो! [26]शंबरारे! ।
प्रद्युम्ना! तूं स्मर, स्त्री रति, बहुदिवसां युक्त जाला बरा हो!
हा योग [27]स्वाप्तमूर्तोत्सवचि न घटिका यावरी लांब राहो. ॥ २३
ऐसाचि [28]प्राज्य नित्योत्सव [29]खळमथनें सज्जना दे, वसेना
शत्रुत्रास त्रिलोकीं, करुनि यश असें हर्षवीं [30]देवसेनां; ।

---

१. भ्रमराची माळा. २. धनुष्याची दोरी. ३. पुष्पनिर्मित. (मदनाला 'पुष्पधन्वा' असें नांव आहे). ४. पुष्पें. (मदनाला 'कुसुमेषु' असें नांव आहे. हीं पांच पुष्पें—'अरविंदमशोकं च चूतं च नवमल्लिका । नीलोत्पलं च पंचैते पंचबाणस्य सायकाः ॥.') ५. कामानें. (ब्रह्मसू=काम; ब्रह्म तपः ब्राह्मणं वा सुवति चालयति.) ६. साक्षात् कृष्णपुत्र. ७. बोलावी. ८. ज्या बाहे त्याच्या आप्तांनीं. ९. तिलांजलियुक्त. १०. उदक. तिलांजली सह पाणी सोडणें=मेला असें समजणें. उत्तरक्रिया करतांना तिलांजलि देण्याचा विधि आहे, त्यास अनुलक्षून हें वर्णन आहे. ११. काळसर्पाच्या विषरूप अग्नीची जीभ अशी तरवार. १२. हा उत्प्रेक्षालंकार होय. 'जाणों' हा उत्प्रेक्षाव्यंजक शब्द आहे. संस्कृतांतही असेच उत्प्रेक्षाव्यंजक शब्द आहेत:—'मन्ये शंके ध्रुवं प्रायो नूनमित्येवमादिभिः । उत्प्रेक्षा व्यज्यते शब्दैरिव शब्दोऽपि तादृशः ॥' (काव्यादर्श–द्वितीय परिच्छेद–श्लोक २३४.) १३. हातीं. १४. या शत्रूस. १५. मेघवत् नीलवर्णी. १६. जी तरवार. १७. कर्णभूषणें (कुंडल) आणि मुकुट किरीट) यांसहित. (श्लोक २४ पहा.) १८. ज्या प्रद्युम्नास कांहीं श्रम न होय. १९. कोमळें नखें. २०. कमलाला खुडितां. (तोयज=कमळ; तोयापासून=उदकापासून झालेलें.) २१ युद्धोत्सवास. २२. आकाशास. ('अंबरं वाससि व्योम्नि कार्पासे च सुगंधके' इति विश्वः.) २३. रे दुष्टा शंबरा. २४. नरकातें, अधोगतीतें. २५. आपल्या नगराला. (द्वारकेला). २६. हे प्रभो शंबरारे शंबरशत्रो. २७. स्वजनांचा मूर्तिमंत उत्सवचि. २८. पुष्कळ. २९. दुष्ट शंबरासुराच्या वधानें. ३०. देवसमुदायाला.

दुष्टाचें साधुपीडाकर [1]खर [2]असिनें ते रणीं बाहु [3]तासीं,
  व्हावे [4]द्वेषी [5]पतंग, [6]त्वदिषुमुखिं वसो [7]शक्ति जी बा! [8]हुताशीं.'॥ २४

[9]गेले ते पुष्पवृष्टि स्तुति करुनि मुखें, [10]शंबरांतोत्सवासी
  पाहोनि, [11]प्रेक्षणीयाकृति [12]रतिपतिसि [13]स्त्रीसख [14]स्वर्गवासी; ।
नेला [15]मायावतीनें मग [16]गगनपथें [17]मन्मथ द्वारकेला,
  [18]विद्युन्मेघभ्रमेंचि क्षणभरि [19]कुतुकी तो [20]सुहृद्वार केला. ॥ २५

[21]व्योमापासुनि जेधवां उतरला, अंत:पुरीं देखिला
  [22]दारांनीं प्रभुच्या क्षण स्वहृदयीं तो [23]श्रीहरी [24]लेखिला; ।
शोभा आकृति वर्ण वेष सकळ [25]भ्रांतिप्रद, स्त्री सती
  लज्जेनें लपती, मग [26]प्रतिनिधित्वें [27]तींचें [28]त्यां दीसती. ॥ २६

[29]पतिप्रतिनिधिप्रति [30]प्रभुवरस्त्रिया [31]पाहती.
  तयाचि भवत्या उभ्या परमकौतुकें राहती; ।
परस्पर असें तदां वदति कीं, 'कसें [32]यांस [33]ये
  मुकुंद निजरूप? हें हरिस जाणवूं, [34]यां [35]सये! ॥ २७

कृष्णासी जसि रुक्मिणी तसिच [36]हे [37]यांसी [38]सुशोभा सती,
  [39]आदर्शीं प्रतिबिंबकेंहि न असीं तुल्यें गुणें भासती.' ।
ऐसें बोलति [40]यादवेंद्रयुवती त्या विस्मिता सन्मती,
  तों ये तेथ पहावयासि उदरीं [41]यांचें जिच्या जन्म [42]ती. ॥ २८

---

१. तीव्र. २. खड्गानें. ३. छेदीं. ४. शत्रु. ५. शलभ. ६. तुझ्या बाणमुखांत. (त्वत्+इषु+मुखिं.) ७. प्रदीपकशक्ति. ८. अग्नींत. ९. देव. १०. शंबरमरणरूप उत्सवातें. ११. पाहण्यास उचित (प्रेक्षणीय) अशी आकृति (आकार) ज्याची तो (मदन.) १२. प्रद्युम्नास. १३. सस्त्रीक. १४. देव. (ते स्त्रीसख स्वर्गवासी गेले—असा अन्वय.) १५. रतीनें. १६. आकाशमार्गें. १७. प्रद्युम्न. १८. विद्युल्लतेसहित मेघच काय हा अशा भ्रमानें. (श्लोक २५-२६ पहा.) १९. कौतुकवान्. २०. मित्रसमूह. (वार=समूह.) २१. आकाशांतून. २२. स्त्रियांनीं. २३. श्रीकृष्ण. २४. मानिला. २५. कृष्णभ्रांति देणारीं होतीं. २६. कृष्णाचे प्रतिनिधित्वें. २७. उभयतां रतिप्रद्युम्न. २८. त्या स्त्रियांस. २९. पतिसदृश प्रद्युम्न त्याप्रति. ३०. कृष्णपत्न्या. ३१. पृथ्वीछंद. ३२. या पुरुषास. ३३. आलें. ३४. चला. ३५. सख्यानों. ३६. हे सती (रति.) ३७. या पुरुषाशी. (प्रद्युम्नाला). ३८. सुंदरी. ३९. आरशांत. ४०. कृष्णपत्न्या. ४१. या प्रद्युम्नाचें. ४२. रुक्मिणी.

वैदर्भी यास पाहे, द्रव हृदय धरी, तत्क्षणीं [1]स्तन्य वाहे,
कीं ते आनंद [2]लाहे, जरि [3]तनुज असें ज्ञान होणेंचि आहे; ।
बाष्पानें कंठ दाटे, सकळ[4]तनुवरि क्षिप्र रोमांच [5]थाटे,
शोकाचा [6]सिंधु आटे, त्वरित परम [7]तद्दर्शनीं लाभ [8]वाटे. ॥ २९
[9]म्हणे, 'हा कोण [10]श्रीयदुपतिसम श्रीनरमणी,
गमे या पुत्रास [11]प्रसवलि नराची न [12]रमणी; ।
अशा रत्नाची जी [13]खनि [14]जनि तिचा धन्य [15]कुसवा
स्वयें याचें वृत्त [16]प्रियसखि! पुसा, गे! न [17]पुसवा. ॥ ३०
या [18]लावण्यांबुधीला अनुसरलि असे जी [19]अनन्या नईचें
पत्नीचें भाग्य लोकीं अतुळ, [20]सुकृत जें मोजवे तें न [21]ईचें, ।
ती धन्या होय ऐसें विमळ उपजलें रत्न जीच्या [22]कुशीला,
न स्पर्शावी तुला बा! [23]रुचिरतरतनो! दृष्टि जी कीं [24]कुशीला.॥ ३१
माझाही पहिला [25]अनिर्दश शिशू नेला [26]स्वगेहांतुनी;
दैवें [27]हारपला [28]अनर्घ्य सुमणी जैसा पडे [29]हातुनी; ।
[30]तो जीवंत असेल [31]शंकरदयाधात्रीनिजांकीं जरी,
वाटे बुद्धिस येवढाचि सुवयें झाला असावा तरी. ॥ ३२

---

१. दुग्ध. (श्लोक ३०.) २. पावे, लाभे. ३. पुत्र. (प्रद्युम्न.) ४. तनु=देह. ५. उभा राहे. ६. समुद्र. ७. त्या प्रद्युम्नाच्या दर्शनानें. ८. या श्लोकांत अनुप्रासालंकार आहे. ९. श्लोक ३०-३४ पहा. हें वैदर्भीभाषण मूळांतील श्लोकाशीं तोलून पाहण्याजोगें आहे. पंतांनीं भागवतकारांवरही तान केली असें ह्या स्थलावरून मार्मिक जनांस वाटल्यावांचून राहणार नाहीं. मोरोपंत हा भाषांतरकार होय, या विधानाच्या खंडनार्थ हें एकच स्थळ पुरे आहे असेंही दिसून येईल. १०. श्रीयुक्त नरश्रेष्ठ. ११. व्याली. १२. मानवी स्त्री. १३. खाण. १४. लोकीं. १५. उदर. १६. अहो प्रियसखींनो. १७. दुसऱ्याकडून पुसवूं नका, स्वयें पुसा. १८. लावण्यसमुद्राला अनुसरली जी नई म्ह० नदी त्या नईचें पत्नीचें. १९. एकनिष्ठ. २०. पुण्य. २१. या पत्नीचें. २२. पोटीं. २३. हे सुंदरांगा. रुचिर=सुंदर; तनु=शरीर. संस्कृत भाषेंत विशेषणास 'तर' आणि 'तम' अथवा 'ईयस्' आणि 'इष्ठ' असे प्रत्यय लागून 'अधिक' आणि 'अतिशयित' असे तारतम्यभावदर्शक यथानुक्रम अर्थ होतात, त्याप्रमाणें येथें 'तर' प्रत्यय लागून 'रुचिरतर' म्हणजे 'अधिक सुंदर' असा अर्थ झाला आहे. २४. दुष्टा, दृष्टि तुला न स्पर्शो. २५. दहा दिवस ज्याला झाले नाहींत असा. २६. आमच्या घरांतून. २७. हारवला. २८. अमूल्य. २९. हातांतून. ३०. तो माझा पुत्र. ३१. शंकराची दया तीच उपमाता तिच्या (अंकीं) मांडीवर म्ह० शंकरकृपेनें.

देता झाला कृपेनें वरद सुरमणि[1] स्वर्द्रु[2] तें तोकदान[3],
ज्ञानिध्येयांघ्रिपद्म[4] प्रभु हरिल पुन्हा बाळसा तो कदा न; ।
दैवें नेला म्हणावें, तरि जगदुदयत्राणसंहारशक्त[5]
श्रीकंठाचे कसें तें[6] अशिवनतबळी[7] पंगु गांजील भक्त ? ॥ ३३
हा कैसें पावला हें असुलभ हरिचें दिव्य सारूप्य[8], शंका
हे मोटी, राजयाच्या तनुजनिविण[9] तल्लक्षणप्राप्ति[10] रंका[11], ।
वाटे मत्पुत्र आला श्रवण हितमुखें[12] वृत्त जालें असेल,
प्राप्तप्रौढत्व[13] सिंहीतनय[14] न पळही क्रोष्टृयूथीं[15] वसेल[16]. ॥ ३४
घडेल काय हें आला मत्सुत द्वारका पुरा ? ।
निवेल आलिंगुनि त्या ससुहृद्दार[17] कापुरा[18] ? ॥ ३५
दिसे याच्या ठायीं सहज अधिक [19]प्रीति, भुजही[20]
स्फुरे डावा, 'आहे विदित' म्हणतो[21] 'रीति तुज ही'[22] ।
मला लग्नापूर्वी प्रियकथनदक्षें[23] कळविली
स्वयें कृष्णप्राप्ति स्फुरुनि निजचिंता पळविली.'[24] ॥ ३६
प्रभुप्रियतमा[25] असा मनिं विचार जों ते करी,
स्वतातजननीसह[26] त्वरित तेथ आला हरी[27]; ।
कळे परि न तो वदे किमपि विश्वसाक्षी[28], धरी
अविज्ञजनरीतिला[29], तरि चरित्र तें[30] उद्धरी[31]. ॥ ३७

---

१. महादेव. २. कल्पतरु. (स्वः+द्रु=स्वर्गांतील+वृक्ष.) ३. बालकाचें दान. ४. ज्ञान्यांसही ध्येय पादकमल ज्याचें असा. ५. जगाची उत्पत्ति स्थिति लय करण्याविषयीं समर्थ जो श्रीकंठ त्याचे भक्त. ६. तें दैव. ७. जे शिवभक्त नव्हत त्याविषयीं बलवान्, वस्तुतः पंगु, असें दैव कसें गांजील ? ८. साम्य. ९. राजशरीरापासून जन्म झाल्यावांचून. १०. राजलक्षणप्राप्ति. ११. निर्धनाला. १२. आप्तमुखें. १३. मोठा जाणता झालेला. १४. सिंहीचा पुत्र. १५. कोल्ह्याच्या मंडळींत. १६. हा चरण सुभाषितरूप आहे. १७. मित्रसमूहासहित. १८. कापुरासारख्या सुखदा. १९. माझी प्रीति. २०. स्त्रियांच्या वामभुजाचें स्फुरण शुभप्रद होय अशी लोकांची जुनी समजूत आहे, तिला अनुसरून हें वर्णन आहे. २१. भुज म्हणतो. २२. वामबाहुस्फुरण शुभप्रद होय. ही रीति लग्नाच्या वेळीं आलेल्या अनुभवावरून माहीत आहे—असा भाव. २३. प्रिय सुचविण्याविषयीं समर्थ जो भुज त्यानें. २४. हें वैदर्भीभाषण मूळांतील श्लोकांचें भाषांतर आहे किंवा कसें हें वाचकांनीं अवश्य पहावें म्हणजे पंतांच्या कवित्वचातुर्याची त्यांस साक्ष पटेल. २५. प्रभुस्त्री. २६. वसुदेवदेवकीसहित. २७. श्लोक ३६ पहा. २८. कृष्ण. २९. मूढजनाच्या रीतीतें धरी. ३०. अविज्ञजनासारखें केलेलें चरित्र. ३१. लोकोद्धार करतें.

[1]जो लोक[2]त्रितयीं फिरे, स्थिर नसे, ताटीं जसा [3]पारद,
[4]स्वांत [5]ध्येयपदींच [6]निश्चळ, [7]भवांबोधींत जो [8]पारद, ।
जो वर्णें [9]गगनोदरीं क्षण दिसे [10]पूर्णेंदु कीं शारद,
[11]**श्री**शांतःपुरचत्वरींच उतरे तो [12]सन्मुनी **नारद**. ॥ ३८

‘[13]नाभिस्थानासि [14]नेणे [15]मृग [16]हुंडकि जसा घेत रानांत वास,
तैसे [17]दोघेंहि [18]नेणां, जवळिहि हृदयीं [19]या धरा [19]नातवास; ।
[20]**शौरे** ! हा [21]**वा**सुदेवात्मज [22]सुतसुत हा [23]देवकी ! वोळखावा,
तो हा [24]**वै**दर्भि ! [25]जेणें प्रथमचि तुजला लागला [26]बोळ खावा. ॥ ३९

[27]वर्णाकारनिरीक्षणस्मितगतिव्याहार [28]हे सांगती
कीं **कृ**ष्णप्रतिबिंब हा, न वळखा, सर्व [29]भ्रमा [30]मागती; ।
जो निःशंक गृहांत ये [31]इतर तो कैसा तुम्हीं [32]धीरधी
[18]नेणां हे **बळकृ**ष्ण ! कौतुक [33]करां लोकांत [34]चिन्नीरधी ! ॥ ४०

टाकी यासि [35]पयोनिधींत हरुनी दुर्बुद्धि तो **शंबर**,
ग्रासी [36]मीन, असे सुखें [37]तदुदरीं, जैसें घटीं [38]अंबर; ।
[39]दाशांनीं दिधला [40]खळासि [41]झष तो, तत्रापि [42]विश्वंभर
त्राता होय जयास काय करिती विघ्नें तया [43]शंभर ? ॥ ४१

---

१. येथें मूळांत (श्लोक ३६) नारदानें सर्व कथन केलें इतकेंच वर्णन आहे. या पद्यांत नारदाचें जें वर्णन केलें आहे. त्यास मूळांत ‘नारद’शब्दाशिवाय दुसरा कांहीं आधार नाहीं. तेव्हां पंतांवर भाषांतरकारत्वाचा अथवा भारवाहकत्वाचा जो आरोप कित्येक पंडितंमन्य करतात तो निर्मूल होऊं पाहतो. २. त्रितय=तिहींचा समुदाय. ३. पारा. ४. चित्त. ५. भगवत्पदींच. ६. स्थिर. ७. भवसमुद्रांत. (भव+अंबोधींत=संसार+सागरांत.) ८. पार नेणारा. ९. आकाशाच्या अंतर्भागीं. १०. शरत्कालच्या पूर्णचंद्रासारखा. ११. कृष्णाच्या अंतःपुरांतील अंगणांत. (श्री+ईश+अंतःपुर+चत्वर=लक्ष्मी+स्वामी+राणिवसा, जनानखाना+अंगण.) १२. मुनिश्रेष्ठ. १३. कस्तूरीचे स्थळास. १४. नेणे=न जाणे. (नेणते=अजाण, अज्ञान.) १५. कस्तूरीमृग. १६. धुंडी. १७. वसुदेवदेवकी हीं दोघें. १८. जाणत नाहीं. १९. या प्रद्युम्नाला. २०. हे वसुदेवा. २१. कृष्णपुत्र. २२. तुझ्या पुत्राचा पुत्र. २३. हे देवकी. २४. हे वैदर्भि. २५. ज्याच्या योगानें. २६. बाळंतीण बोळ खात असते तो. यास ‘बाळंतबोळ’ असें म्हणतात. २७. वर्ण, आकृति, पाहणें (निरीक्षण), हांसणें, चालणें, बोलणें (व्याहार). २८. वर्णादि भाव. २९. भ्रांति पावतां. ३०. पुनः पुन्हा. ३१. परकी कसा येऊं शकेल. ३२. धीर बुद्धीचे. ३३. करतां. ३४. चैतन्यरससागर तुम्ही. ३५. समुद्रांत. ३६. मासा. ३७. मीनोदरांत. ३८. आकाश. ३९. कोळ्यांनीं. ४०. दुष्ट शंबरासुराला. ४१. मासा. ४२. परमेश्वर. ४३. शतसंख्या. हें वचन सुभाषितरूप आहे.

नेत्रें पाहुनि [1]मीन शंबर धरी, तो [2]भक्षणेच्छे दिला
तेणें [3]सूदकरींच पाकसदनीं, त्यांहीं मग छेदिला[4]; ।
तों तो बाळ [5]विशाळभाळ उगवे [6]आभाळ जातां जसा
[7]तारापाळक [8]पाचकीं निरखिलें तैसेंचि या [9]राजसा. ॥ ४२
करीत होती तेथेंच[10] [11]नवसा [12]गरती रती, ।
पावे [13]त्यांपासुनी [14]चिंतानवसागरतीर [15]ती. ॥ ४३
मीनोदरीं सांपडला अकल्पित लहानसा, ।
ओळखेना रती हे जों तों मी गेलों [16]महानसा. ॥ ४४
म्यां सारें कथिलें [17]रहस्य न [18]म्हणे निद्रा शरीर क्षण,
स्नेहें माय तसी रती स्वपतिचें [19]तेथें करी रक्षण; ।
झाली आपुलि आपण [20]प्रियपरित्राणार्थ [21]सासू, न ती
[22]स्तुत्यर्हा, परि गौरवा समुचितें, [23]सासू असा, सून [24]ती. ॥ ४५
पावे [25]प्रद्युम्न हा त्या निजरिपुपतगीं वन्हिभावा [26]युवा, हे[27]
सद्विद्यानीतिवृत्तस्मरण करुनि दे [28]तो महावायु वाहे; ।
सेवाया दूर आली क्रमुनि पथ रती ही [29]पिपासू, [30]नद्याहो
पाजा आशीरसा जें हृदभिमत इला आजपासून द्या, हो! ॥ ४६

---

१.मासा. २ भक्षण्याच्या इच्छेला. ३. पाचकाच्या हातीं. ४. कापिला. ५. विस्तृत कपाळ ज्याचें. ६.अभ्र. ७. चंद्र. ८. पाककर्त्यांनीं. ९.सुकुमार बालकास. १०.त्या पाकगृहांत. ११.नवस करणें=स्वकार्य सिद्ध व्हावें म्हणून देवादिकांची प्रार्थना करून अमुक अमुक वस्तु अर्पण करीन अशी प्रतिज्ञा करणें. १२. पतिव्रता. १३.त्या वेळेपासून. १४. चिंतारूप नवीन समुद्राचें परतीर तिची चिंता सरली—असा भाव. १५. हें पद्य 'संदष्टक' नामक यमकालंकाराचें उदाहरण आहे. ज्या पद्याचे द्वितीय आणि चतुर्थ पाद समवर्णात्मक असतात त्यांत हें यमक असतें. याचें लक्षण:—'प्रत्येकं पश्चिमयोरावृत्त्या पादयोर्द्वितीयेन । यमके संजायेते गर्भः संदष्टकं चेति ॥' [काव्यालंकार—अ० ३ श्लो० ७, काव्यमाला २, पृ० २२.] अशीं संदष्टकाचीं उदाहरणें पंतांच्या काव्यांत अनेक आहेत. [महाभारत—वनपर्व—अध्याय ८, गीति ५४ पहा.] १६. पाकशाळेंत. १७. गुह्य. १८. अधिक न मानी. १९. त्या शंबरासुराच्या घरांत. २०. पतिरक्षणार्थ. २१. पतिमाता. २२. स्तुतियोग्या. २३. आतां तुम्ही सासू असा, ती सून असो. २४. पंतांनीं वर्णनविस्तार केल्याचें हें एक उदाहरण आहे. या स्थळीं मूळांत फक्त एका श्लोकांतच काम आटपून घेतलें आहे. २५. हा युवा प्रद्युम्न त्या निजरिपुपतगीं (शत्रुपतंगावर) वन्हिभावा (अग्निरूपता) पावे—असा अन्वय. २६. तरुण. २७. ही रति. २८. सद्विद्यादस्मरण तोच महावात सहाय झाला. २९. तृषार्ता. ३०. तुम्ही नद्या आहां हो.

प्रद्युम्ना वसुदेव राम हरि हे सप्रेम भव्या कुळ[1]-
ज्येष्ठा भेटति होति [2]हुंगुनि शिरीं [3]बाष्पोद्गमव्याकुळ; ।
[4]तत्पत्नीहि [5]सदारदारकतनुस्पर्शामृतीं मज्जना
पावोनी, निवती, न तोष वदवे तो लेश धी[6]मज्जना. ॥ ४७
जाहलाचि न [7]परासु कुमार, प्राप्त होउनि [8]परा सुकुमार; ।
वांचला नव लहान [9]गरांत, [10]प्राज्य दे नवल हा [11]नगरांत. ॥ ४८
आला काढूनि [12]कांटा [13]अमरहृदयिंचा मन्मथ द्वारकेला,
होतें शो[14]काख्य शल्य [15]स्वजनहृदुदजीं [16]तत्समुद्धार केला; ।
[17]जी स्वीकारी हराया वि[18]षयरतजगद्धृन्मळाला वि[17]भूती
दुष्टां संत्रास, शिष्टां अभय सुखहि, दे प्रेमळाला विभू ती. ॥ ४९
सौं[19]दर्याकर सोहळे पुरविता जो दृष्टिचे तो [20]रमा-
लीलामंदिर ज्या नसेचि उपमा त्रैलो[21]क्यचेतोरमा; ।
ऐशाचें [22]प्रतिबिंब कां न इतरस्त्रीचित्त मोही, [23]लया
मातांची क्षण ने [24]धृती, न कविची [25]धी केंवि मोहील [26]या ? ॥ ५०
मेघाचें प्रतिबिंब पाहुनि सुखें नाचोंचि लागे, भुले,
मानी सर्व मनोरथद्रुम फळीं [27]ओथंबले आपुले; ।
ऐसा भक्तमयूरचातकही जो नेणे दुजीं [28]भावुकें,
तो साक्षा[29]द्घनदर्शनीं किति सुखी ? तें प्रे[30]मळां ठाउकें[31]. ॥ ५१

---

१. कुळज्येष्ठा प्रद्युम्ना. २. प्रिय अपत्याचें शिरोवघ्राण करण्याची रूढि प्राचीनकाळीं होती तिला अनुसरून हें वर्णन आहे. ३. गहिंवरानें ज्यांचा गळा दाटला असे. ४. कृष्णादिकाच्या स्त्रियाही. ५. सस्त्रीक प्रद्युम्नाच्या शरीरस्पर्शरूप अमृतीं. ६. बुद्धिमंत कवीला. ७. मृत. पर+असु= गत+प्राण.) ८. शत्रूच्या हातीं पडून. ९. विषांत पडून वांचला. १०. मोठें. ११. द्वारकेंत. १२. शंबररूप कांटा. १३. देवाच्या हृदयांतील. १४. शोक हें नांव ज्याचें असें (शल्य). १५. स्वकीयांच्या हृदयकमळांत. (स्वजन+हृत्+उदजीं=स्वकीय बांधव+हृदय+कमळीं.) १६. कंटकोद्धार. १७. जी विभूती विभू (कृष्ण) स्वीकारिती—असा अन्वय. १८. विषयिजनाच्या हृदयांतील मल (पाप) हराया. १९. लावण्याची खाण. (सौंदर्य+आकर.) २०. कृष्ण. २१. त्रैलोक्यसुंदरास. २२. प्रद्युम्न. २३. जो मातांचीही धृति क्षणभर लयातें नेता झाला. २४. धैर्य. २५. बुद्धि. २६. या कवीची, या मोरोपंत कवीची. २७. भारानें लवले. २८. कल्याणें. २९. मेघदर्शनानें. ३०. ईश्वरभक्तीच्या ठायीं ज्यांस अतिशयित प्रेम अशा भक्तांला. ३१. या अध्यायास ‘शंबरवध’ अशी संज्ञा आहे.

## अध्याय छप्पन्नावा.

(श्लोक)

जो सप्रेम[1] उपासिला[2] सुनियमें सत्राजितें[3], तो रवी
भेटे[4], सख्य करी, स्यमंतकमणी[5] दे, वाढवी थोरवी; ।
आला द्वारवतीप्रति[6] द्युमणिसा[7] रत्नप्रभामंडला[8]
संलक्ष्याकृति पौर हें कळविति[9] श्रीयादवाखंडला[10]. ॥ १
'तूं[11] देवेश्वर गुप्त[12] या यदुकुळीं, आलें फळा दैव तें[13],
वैकुंठ त्यजिलें, तुला हुडकिती[14] जाणो[15] सदा दैवतें[16]; ।
भेटाया वळखोनियां तुज जगच्चक्षु[17] स्वयें आज, गा!
येतो, दृष्टिस रश्मिमंडळ[18] हरी, रक्षीं हरी[19]! या जगा.' ॥ २
हांसे कृष्ण, म्हणे, 'न तो रवि, तुम्हीं होऊं नका भीत[20], यों[21],
ऐका हो! कथितों यथार्थचि तुम्हां कीं जाणतों मी तया; ।
जो सत्राजित सूर्यभक्त तुमचा इष्ट स्वगेहास[22] तो
येतो, भास्करदत्तरत्नधर[23] तत्तेजें तसा भासतो.' ॥ ३
तो सत्राजित येउनि स्वसदना[24], पूजूनियां ब्राह्मणा,
प्रार्थी कीं, 'मणिकारणें[25] मज तुम्ही स्वस्त्यस्तु[26] ऐसें म्हणा.' ।
स्थापी देवगृहांतरींच[27], मिरवी[28] जैसी सुशोभा रवी,
स्वर्णाचे[29] वसुसंख्य[30] नित्यहि मणि[31] श्रीमंत तो भार[32] वी[33]. ॥ ४

---

१. भक्तीनें, प्रीतिपूर्वक. २. आराधना केली. ३. सत्राजित हा एक यादव असून सूर्योपासक होता. ४. दर्शन दे. ५. रत्नविशेष. ६. द्वारकेप्रत. ७. सूर्यासारखा. ८. रत्नप्रभेच्या मंडलानें असंलक्ष्या दुःप्रेक्ष्या आकृति ज्याची असा. ९. सत्राजित आला असें न जाणून सूर्यच आला असें कृष्णास कळविलें. १०. श्रीयादवेंद्रा (कृष्णास). [आखंडल=इंद्र.] ११. पौर कृष्णास म्हणतात. १२. गुप्तपणें. १३. आमचें नशीब उदयास आलें. १४. शोधतात. १५. आम्ही जाणतों. १६. देवता. १७. सूर्य. सर्व जगतांचा चक्षु (नेत्र) म्हणजे सर्वपदार्थदर्शक असा सूर्य आहे म्हणून त्याला 'जगच्चक्षु' असें नांव आहे. १८. किरणसमूह दृष्टीचें हरण करतो. १९. हे कृष्णा. २०. भयभीत. २१. इकडे या किंवा त्याला. २२. निजगृहास. २३. सूर्यानें दिलेलें रत्न (स्यमंतकमणि) धारण करणारा. २४. आपल्या घरास. २५. मला मणि प्राप्त झाला आहे या कारणास्तव. २६. कल्याण असो. (स्वस्ति+अस्तु) आशीर्वाद द्या. हा मणि सदा मजपाशीं राहो असें म्हणा इत्यादि. २७. देवघरांत. २८. बाहेर दाखवी. २९. सोन्याचे. ३०. अष्टसंख्य. ३१. मणि. ३२. भार म्हणजे ८००० तोळे एवढें मान. ३३. प्रसवे, देई.

[1]आधि [2]व्याधि भुजंग दुष्ट कपटी दुर्भिक्ष [3]मारी असे,
[4]कल्याणेतर [5]दुःखहेतु नसती, जेथें मणी तो असे; ।
[6]सच्चिंतामणिहि स्यमंतकमणी मागे [7]नृपाकारणें,
कीं [8]वृष्णीश्वर उग्रसेन रविसा शोभेल [9]तद्धारणें. ॥ ५
श्रीमत्कृष्णप्रसादापरिस बहु मनीं [10]मानिलें [11]स्वर्ण [12]दीनें,
त्या मूढें, [13]थिल्लरीचें जळ [14]वरें गणिलें वाहतां [15]स्वर्णदीनें; ।
[16]दुष्प्राप [17]स्पर्शरत्न त्यजिल तरि न तो होय का हीन [18]सोनीं?
[19]रक्षी, लक्षी कुबुद्धि स्वहित, करि असें [20]लाभ कांहीं नसोनी. ॥ ६
दे सोनें मात्र तेंही [21]परिमितचि, दिला भास्करें एक गोटा,
[22]साधु [23]प्रत्यूह ज्याला म्हणति, तुज कसा वाटला लाभ मोटा? ।
[24]त्यागें [25]विश्वचिंतामणि मणि मिळतां मानिला फार तोटा,
[26]हा हा! सत्राजिता! तूं सकळबुधमतें या जनीं मूढ खोटा. ॥ ७
लोकत्रयीं [27]हो [28]शुभकीर्ति [29]यांची, याकारणें श्रीपति रत्न [30]यांची; ।
कांहींच लोकांत उणें असेना, [31]कृष्णप्रसादास्तव उग्रसेना. ॥ ८
पूज्य श्री[32]भगवत्पदीं न करितां सद्वस्तुचें अर्पण
[33]प्रारंभीं करि आपुलेंचि जन जो [34]तेणें [35]मनस्तर्पण, ।

---

१. मानसिक व्यथा. २. शारीरदुःख. ३. महामारी. ४. कल्याणविरुद्ध. ५. दुःखनिमित्तें. ६. साधूंचा चिंतामणि (कृष्ण). साधुजनास चिंतिलेलें देणारा मणि (कृष्ण). कृष्ण स्वतः सच्चिंतामणि होता म्हणून त्यानें स्वतःसाठीं न मागतां केवळ उग्रसेनासाठीं मणि मागितला. ७. उग्रसेनासाठीं. ८. यादवांचा राजा. (उग्रसेन.) ९. मणिधारणानें. १०. बहु मानिलें. ११. सोनें. (सु+अर्ण= चांगला+वर्ण.) १२. सत्राजितानें. १३. सांचवणीचें, डबक्याचें. १४. श्रेष्ठ. १५. भागीरथीनें. १६. प्राप्त होण्यास कठीण. १७. परीस. कोणी परिसाचा त्याग करील तर तो सोन्यानें हीन होणार नाहीं काय, असें समजून रक्षी. १८. सोन्यानें हीन होणार नाहीं काय? १९. मणि रक्षी. २०. कृष्णाच्या कृपेपेक्षां लाभ नसतांही. २१. मोजकें, नियमितप्रमाणाचें. २२. सत्पुरुष. २३. ज्या मण्याला सत्पुरुष प्रत्यूह म्हणतात; कारण हा मणि कृष्णकृपेच्या प्राप्तीस प्रत्यूह (अडथळा) झाला. २४. स्यमंतकमणि देऊन. २५. कृष्णरूप मणि. (विश्वास इष्ट फळ देणारा मणि कृष्ण.) २६. आश्चर्यें. २७. होऊ. २८. उत्तम ख्याति. २९. या स्यमंतक मण्याची. ३०. मागे. ३१. कृष्णकृपेकरून. ३२. त्रिजगत्पूज्य परमेश्वरचरणीं. ३३. अगोदर. ३४. त्या चांगल्या वस्तूनें. ३५. मनाची तृप्ति.

तें[1] इष्टप्रदही अनिष्ट[2] फल दे, कीं चूकला[3] सूचित,[4]
ज्ञाते जाणति या कथेंत इतुकें सत्तत्व[5] हें सूचित[6]. ॥ ९
त्याचा सोदर[7] जो प्रसेन[8] मणिला बांधोनि कंठीं वना
गेला, तो मृगजातिच्या शरकरें[9] शोषावया[10] जीवना[11]; ।
एकाकीं तुरंगासमेत[12] विपिनीं[13] पंचाननें[14] मारिला,[15]
ने जों रत्न[16] अशांत ऋक्षपतिनें[17] तो सिंह संहारिला[18]. ॥ १०
तो[19] घेऊनि मणि स्वकीयविवरीं नेवूनियां बाळका
खेळाया दिधला, न दुर्लभ[20] गमे त्या ऋक्षभूपाळका; ।
ज्याचे[21] श्रीपदरेणु[22] केवळ जगच्चिंतामणी[23] आंगणीं
भाग्यें वेंचिति देव, तत्पर[24] सुधी[25] या प्रस्तरा[26] कां गणी[27]? ॥ ११
पावे संताप सत्राजित बहुत, म्हणे, 'हा मणिग्रीव[28] सेनो[29]-
हीन स्वच्छंद गेला तरि जरि मृगयाशीळ[30] रानीं वसेना[31]; ।
भ्राता कां हो! न आला? हय जवन[32], नसे काळ[33] आतां, अरीनें
प्रायः संहारिला[34] तो वरमणिकरितां क्रूरकर्मे[35] हरीनें.' ॥ १२

---

१. तें वस्तु. २. विघ्नकारक असें फळ. ३. सत्राजित चुकला. ४. योग्य कृत्य. (सु+उचित) सत्राजित कर्तव्य कर्म चुकला असें शहाणे लोक जाणतात. ५. धर्मतत्व, तात्पर्य. सत्राजितानें मणि दिला नाहीं हें गैर केलें असें ज्ञाते समजतात. ६. सुचविलेलें. ७. धाकटा सखा भाऊ. ८. नामविशेष. ९. बाणरूप हस्तानें. येथें 'करें' म्हणजे 'किरणें' असाही अर्थ संभवनीय आहे. 'शरमुखें' असाही पाठ आढळतो. १०. शोषण करण्याकरितां. ११. प्राणातें, उदकातें. १२. अश्वासहित. १३. अरण्यांत. १४. सिंहानें. पंच+आनन=विस्तृत+मुख=विस्तृत आहे मुख ज्याचें तो; किंवा आनन आणि चार पाद हींच पांच मुखें ज्याचीं तो. (सिंह.) 'मुखं पादाश्च पंच आस्यानीव यस्य स पंचास्यः'. १५. अध्याय ५६ श्लोक १२-१५ पहा. १६. स्यमंतक मणि. १७. जांबवंतानें, अस्वलांच्या राजानें. (ऋक्ष=आस्वल.) १८. मारिला. १९. ऋक्षपति. २०. हा मणि दुर्लभसा त्यास वाटला नाहीं, कां कीं तो साधु होता. २१. ज्या भगवंताचे. २२, श्रीमंत पायाचे रजःकण. २३. जगतास चिंतित वस्तु देणारे असे मणीच. २४. त्या भगवंताचा भक्त. २५. ज्ञानी. २६. दगडाला. प्रस्तर=(दगड) फत्तर, पाथर. २७. कां थोर मानील? २८. मणि आहे ग्रीवेंत (गळ्यांत) ज्याच्या तो (प्रसेन). कंठीं मणि बांधून गेलेला प्रसेन. २९. सेनाहीन म्ह० एकाकी. ३०. शिकारीच्या नादीं लागलेला. ३१. राहणार नाहीं. ३२. वेगवान् आहे. ३३. वाट पाहण्याची वेळ राहिली नाहीं. ३४. मारिला. ३५. क्रूर आहेत कर्मे ज्याचीं अशा हरीनें.

हा त्याचा बोल झाला प्रसृत पुरजळीं केवळ स्नेहबिंदु,
या अंका पात्र ही तो, अमृतकरपरी यादवोदन्वदिंदु; ।
हां तो आल्हादकारी शुचि, करुनि मलारोप या मूढ निंदु,
आम्हां दासां चकोरां बहुमत, करिती सद्गुणस्तोत्र बिंदु.' ॥ १३
ऐसे ऐकुनि तें निघे नरतनू लीलासुधासागर
क्षाळाया निज दुर्यश प्रभु सवें घेऊनियां नागर; ।
तो सन्मृग्यपद प्रसेनपदवी शोधीत गेला वना,
'आली आळ तुलाहि' साधु म्हणती, 'देवा! जगत्पावना! ॥ १४

१. "या श्लोकांत प्रसिद्ध चंद्राची व कृष्णाची तुलना करून चंद्राचे सर्व गुण याचे ठिकाणीं आहेतच, परंतु त्याप्रमाणें हा कलंकी नाहीं. हा कृष्णाचा विशेष आहे असें दाखविलें; आतां याजवर जो हा दोष आला तो प्रसिद्ध चंद्राप्रमाणें खरा कलंक नाहीं; केवळ आरोपित दोष आहे असें दर्शविण्याचा कवीचा उद्देश दिसतो म्हणून हा शुद्ध म्हणजे कृष्ण शुद्ध आहे असें योजिलें आहे." २. सत्राजिताचा. ३. भाषणरूप तैलबिंदु पुररूप जळांत पसरला. ४. पसरलेला. ५. तेलाच्या बिंदूप्रमाणें. ६. दूषणास. ७. तो कृष्ण. ८. चंद्राप्रमाणें. ९. यादवसमुद्राचा चंद्र असा कृष्ण. (यादव+उदन्वत्+इंदु=यदुवंश+समुद्र+चंद्र) १०. श्रीकृष्ण. ११. शुद्ध. १२. दोषारोप करून मूर्ख सत्राजितानें या कृष्णाची निंदा केली तर करो.१३.चकोर पक्षी हा चंद्रकिरणांवर उपजीवन करतो, असा प्राचीन कविसंकेत आहे. या कविसंकेतांविषयीं विश्वनाथकविराजकृत 'साहित्यदर्पणां'तील तीन पद्यें (सप्तमपरिच्छेद) उपयुक्त आहेत म्हणून येथें दिलीं आहेत. यांत बऱ्याच कविसमयांचा समावेश केला आहे:—'मालिन्यं व्योम्नि पापे यशसि धवलता वर्ण्यते हासकीर्त्यो रक्तौ च क्रोधरागौ सरिदुदधिगतं पंकजेंदीवरादि । तोयाधारेऽखिलेऽपि प्रसरति च मरालादिकः पक्षिसंघो ज्योत्स्ना पेया चकोरैर्जलधरसमये मानसं यांति हंसाः ॥,' 'पादाघातादशोकं विकसति बकुलं योषितामास्यमद्यैर्यूनामंगेषु हाराः स्फुटति च हृदयं विप्रयोगस्य तापैः । मौर्वी रोलम्बमाला धनुरथ विशिखाः कौसुमाः पुष्पकेतोर्भिन्नं स्यादस्य बाणैर्युवजनहृदयं स्त्रीकटाक्षेण तद्वत् ॥,' 'अह्न्यंभोजं निशायां विकसति कुमुदं चंद्रिका शुक्लपक्षे मेघध्वानेषु नृत्यं भवति च शिखिनां नाप्यशोके फलं स्यात् । न स्याज्जाती वसंते न च कुसुमफले गंधसारद्रुमाणामित्याद्युन्नेयमन्यत्कविसमयगतं सत्कवीनां प्रबंधे ॥.' दुसऱ्या एका पद्यांत या कविसमयांचा समावेश केला आहे तो असा:—'पादाघातादशोकस्तिलककुरबकौ वीक्षणालिङ्गनाभ्यां स्त्रीणां स्पर्शात्प्रियंगुर्विकसति बकुलः सीधुगण्डूषसेकात् । मन्दारो नर्मवाक्यात्पटुमृदुहसनाच्चम्पको वक्त्रवाताच्चूतो गीतान्नमेरुर्विकसति च पुरोनर्तनात्कर्णिकारः ॥.' १४. अत्यंत मान्य. १५. साधूंच्या गुणाची स्तुति. १६. ज्ञानी. १७. अध्याय ५६ श्लोक १७-१९ पहा. १८. सत्राजिताचें भाषण. १९. कृष्ण. नरतनु म्हणजे मनुष्यदेह धारण करणारा. लीलासुधासागर म्हणजे क्रीडारूप अमृताचा समुद्र. कृष्ण हा साधारण मानवाप्रमाणें लीला करी असें दाखविण्यासाठीं 'नरतनु' आणि 'लीलासुधासागर' हीं पदें योजिलीं आहेत. २०. लीलासुधेचा सागर. २१. अपकीर्ति. २२. नगरस्थ लोक. २३. साधूंनीं शोधण्यास योग्य आहेत पद (पाय) ज्याचे असा. (कृष्ण.) २४. मार्ग, माग, पावलें. २५. जगास पावन करणाऱ्या.

गेला जों याचिमागें हुडकित विपिनें तो असा, क्षिप्र[1] सेना[2]
पौरांची घेउनीयां तंव निरखी[3] मृता **विश्वसाक्षी प्रसेना;** ।
जेणें हा साश्व[4] केला व्यसु[5], मणि हरिला, काढितां मिग[6] रानीं
तो सिंह प्राप्तमृत्यु क्षितिधरकटकीं[7] देखिला नागरानीं. ॥ १५
जो सत्वें[8] समदें[9] वनांत नुरवी[10] देउनि हांके[11], सरी[12]
ज्याची ये न दुजासि, तोहि वधिला कोणें पहा! केसरी[13]; ।
ऋक्षाचीं[14] दिसती पदें[15], न हरिसीं[16] तो[17] दक्ष[18] भांडों, गळा[19]
मीनें[20] ग्रास करूनियांहि जगला? कीं[21] विंगळा[22] डोंगळा[23]? ॥ १६
त्या ऋक्षाचा[24] तेथुनी माग रानीं, कृष्णाज्ञेनें काढिला नागरानीं[25], ।
मार्ग स्वार्थस्थानदर्शी[26] मिळाला, भल्लूकाच्या[27] सर्व गेले बिळाला. ॥ १७
स्वयें दे[28] 'येतों मी त्वरितचि' असा धीर जनता[29],
बहिर्देशीं[30] संस्थापुनि निजपदक्षीरजनता[31], ।
मनीं ध्यावा मात्र व्यपगततमीं[32] जो कविवरीं[33]
शिरे तो ऋक्षाच्या भयकरनिरालोकविवरीं[34]. ॥ १८
गेला वृष्णिकुलप्रदीप[35] त्रिवरीं[36] त्या दूर जों तों भलें
पाहे सुंदर ऋक्षमंदिर, मणिस्वर्णादिकीं शोभलें; ।

---

१. मोठ्या स्वरेंनें. २. मंडळी. ३. पाहे. ४. अश्वासह. ५. प्राणहीन. ६. मार्ग, शोध करितां. ७. पर्वताच्या कड्यावर. (क्षितिधर+कटक=पर्वत+कडा.) ८. प्राणी. ९. मत्त. १०. राहूं देत नाहीं. नुरवी=न+उरवी. येथें न याच्या अला परसवर्ण आदेश झाला आहे. ११. गर्जना. १२. बरोबरी. १३. सिंह. १४. आस्वलांचीं. १५. पावलें. १६. सिंहासीं भांडावयास समर्थ नाहीं. १७. ऋक्ष. १८. समर्थ, चतुर. १९. गळाचा ग्रास करून मीन जगला. माशांस धरण्यासाठीं पाण्यांत गळ टाकितात हें सुप्रसिद्ध आहे. २०. मासा. २१. किंवा. २२. निखारा गिळून डोंगळा जगला, हें आश्चर्य. [विंगळा=इंगळ, अंगार, निखारा.] २३. मीनानें गळाचा घास केला अथवा डोंगळा अग्नि गिळून वांचला या दोन्ही गोष्टी असंभवनीय होत. २४. ऋक्ष=रीस, आस्वल. २५. नगरच्या लोकांनीं. २६. स्वार्थ जो मणि त्याच्या स्थानातें दाखविणारा (मार्ग.) २७. आस्वलाच्या. २८. मी त्वरित येतों असा लोकांस धीर देता झाला. २९. जनता=लोकसमूह. ('ता' प्रत्यय ग्राम, बंधु, जन, गज आणि सहाय या शब्दांपुढें समुदायवाचक आहे; जसें–ग्रामता=ग्रामसमूह.) ३०. विवराच्या बाहेर. ३१. निजपदरूप क्षीरजीं (कमलीं) नम्र जो जनसमूह तो बाहेर ठेवून. ३२. गतभ्रम जे कविवर त्यांनीं (जो मनीं ध्यावा मात्र तो कृष्ण.) ३३. थोर साधूंनीं. ३४. भयंकर आणि प्रकाशरहित अशा विवरीं (गुहेंत). ३५. कृष्ण. (यादववंशाचा दीपक.) ३६. गुहेंत.

[1]बालक्रीडनकीकृतस्वमणिच्या ये [2]वोळखोनि [3]ग्रहा,
[4]धात्री आरडली भिवोनि सहसा, ये **जां**बवान् [5]निग्रहा. ॥ १९
गेला मात्र समीप [6]हा, न मणिला त्या हात लावी ग्रहा,
तों [7]स्वागार पराभवें खवळला, तो पातला [8]विग्रहा; ।
[9]क्रोधांधेक्षण वोळखेचि न [10]धण्या कीं, लाज लावि [11]ग्रहा-
धीशा [12]जो [13]द्युतिनें, विलोकुनि अशाही [14]निस्तुला [15]विग्रहा. ॥ २०
जन्म श्री**वा**मनाच्या [16]प्रथम बहुयुगें, हें असे आयु, [17]धाला
नाहीं, **रा**मायणीं ही **द**शमुखसमरीं हांसला आयुधाला; ।
तो हा मोठा प्रतापी **र**घुवरचरणोपासक प्राज्ञ [18]ऋक्ष,
[19]स्वस्वामीसीं [20]नियुद्ध प्रबळ करि रणीं नेउनी [21]ग्रांव वृक्ष. ॥ २१
[22]मण्यर्थी वीर अठ्ठाविस दिवस [23]निशी ते [24]अविश्रांत, बोटें
[25]ज्याला पाहोनि [26]वक्त्रीं [27]धरिति [28]सुरवधूवर्ग, अत्यंत [29]मोटें, ।
[30]श्येन [31]क्रव्यार्थ जैसे, झगडति [32]विजयाकारणें मत्त [33]मल्ल,
[34]स्ववासिस्वांतगर्वापह करिति [35]भुजायुद्ध **गो**विंद[36]मल्ल. ॥ २२
[37]पुराणदेवभक्तांसीं न घडे [38]संगर क्षण; ।
[39]शुद्धसत्वप्रेमवर्म तें करी अंगरक्षण. ॥ २३

---

१. बालाचें खेळणें केलेला जो निज मणि त्याच्या. २. जाणून. ३. ग्रहणाविषयीं. ४. दाई. ५. शासनास (शासन करण्यासाठीं धांवून आला.) ६. कृष्ण. ७. आपल्या घरांत शिरल्यामुळें (स्व+अगार+पराभव=निज+सदन+अतिक्रम.) ८. युद्धाला. ९. क्रोध+अंध+ईक्षण=कोप+अंध+नयन. १०. धनी=रामचंद्र. रामास राज्याभिषेक झाला तेव्हां त्यानें ज्या ज्या प्रिय भक्तांनीं त्याला साहाय्य केलें होतें त्यांस वर देऊन संतुष्ट केलें आणि जाण्याचा निरोप दिला. जांबवंत हा ही एक त्याच्या प्रियभक्तांपैकींच होता, तेव्हां त्यास असें सांगितलें कीं, 'पुढें कृष्णावतारापर्यंत तूं रहा, त्यासमयीं तुझें माझें बाहुयुद्ध होऊन तुला मी ह्या मूर्तीचें दर्शन देऊन तुझा उद्धार करीन. या कथेस अनुसरून कृष्ण हा जांबवंताचा धनी होय. ११. सूर्यातें. (ग्रह+अधीश=ग्रहांचा स्वामी.) १२. जो विग्रह. १३. कांतीनें. १४. निरुपमा, तुलनारहिता. १५. देहातें. ('विग्रहे युधि विस्तारे प्रविभागशरीरयोः' इति हैमः.) १६. पूर्वी. १७. तृप्त झाला नाहीं. १८. जांबवंत आस्वल. १९. रामापाशीं. २०. बाहुयुद्ध. २१. पाषाण. २२. मणि हा ज्यांचा अर्थ आहे असे, स्यमंतकमणिलाभेच्छु २३. रात्री. २४. निरंतर. २५. ज्या भुजायुद्धाला. २६. तोंडांत. २७. बोटें वक्त्रीं धरिति=तोंडांत बोटें घालिति=आश्चर्यानें थक्क झालों असा अभिनय करती, चमत्कारती, नवल करती. २८. देवांगनासमूह. २९. हें 'भुजायुद्ध' याचें विशेषण. ३०. पक्षी (ससाणे). ३१. अभिषार्थ, मांसासाठीं. (अ० ५६ श्लो० २३ पहा.) ३२. जय मिळविण्यासाठीं. ३३. जेठी. ३४. स्वर्+वासि+स्वांत+गर्व+अपह=देवांच्या मनांतील युद्धगर्व नाशणारें (युद्ध.). ३५. बाहुयुद्ध. ३६. कृष्ण आणि आस्वल जांबवान्. ३७. प्राचीन जे देवभक्त त्यांसी. ३८. युद्ध. ३९. शुद्धसत्वरूप प्रेमकवच.

म्हातारा[1] त्या नियुद्धीं[2] अजितभुजबळें[3] शेवटीं भागला[4], जे[5]
वज्रें[6], ते बाहु झाले शिथिल म्हणुनियां तो महाभाग[7] लाजे; ।
देहाचे संधिबंध[8] प्रबळहि ढेळले[9] चक्रभृन्मुष्टिपातें[10],
पाडी ऐसा अपूर्वस्वपरिभव[11] महाविस्मयीं ऋक्षपातें[12]. ॥ २४
संततरामपदाब्जपरा[13] भव श्रम नदे, मग कोण पराभव ? ।
करि[14] सुविस्मित त्या अनघा महा[15] प्रथम दावुनि आनन घाम हा. ॥ २५
'नियंता[16] काळाचा पुरमदनहंता[17] परि भव
त्रिशूळीही[18] नेदी अजित नतसंता[19] परिभव; ।
मनीं वाटे रामा[20]! त्रिजगदभिरामा[21]! नवल या
मला न्याया जाला समुचित[22] कसा मानव लया[23]? ॥ २६
ऐसें सौंदर्य अत्युत्तम, अतुळ बळ स्थैर्य गांभीर्य कांहीं
श्रीमद्रामेतराला[24], द्विजगुण[25] अवरा[26] प्राप्त होणेंचि नाहीं; ।
माझा स्वामीच[27] साक्षाद्भजकसुरतरु[28] श्रीश[29] विश्वाभिराम[30],
स्वांगें[31] आला कराया सफळ सुचिर[32] जो हा नियुद्धाख्य[33] काम[34].' ॥ २७
गृहीं भेटला सर्वलोकप्रभू[35], ती सुसंपत्ति, नोहे परापूर्वभूती[36], ।
विचारूनि[37] ऐसे महाभाग्यवंत स्तवी हस्त जोडूनि तो जांबवंत. ॥ २८
'अहो! अतुळलक्षणीं[38] अमृत वर्षसी ईक्षणीं[39],
भुज स्वजनरक्षणीं[40] सुपटु हे असच्छिक्षणीं[41]; ।

---

१. जांबवान्. २. बाहुयुद्धीं. ३. कृष्णाच्या भुजबळानें. ४. थकला. ५. जे बाहू. ६. वज्रतुल्य दृढ. ७. महापराक्रमी. ८. सांधे. ९. ढिले पडले. १०. चक्रभृत् (कृष्ण) त्याच्या मुष्टिपातानें. ११. पूर्वी कधीं झाला नाहीं जो निजपराभव तो. १२. जांबवंतातें पाडी. १३. निरंतर रामपदरताला भवही श्रम देत नाहीं. १४. प्रथमच जो घाम आला हा आपलें आनन (मुख) दाखवून त्या अनघा (निष्पाप जांबवंताला) महासुविस्मित करी—असा अन्वय. १५. अत्यंत. १६. शासनकर्ता. (हें जांबवंताचें भाषण आहे.) १७. त्रिपुर आणि मदन याचा हंता. (भव=शिव.) १८. ज्याचें आयुध त्रिशूल आहे तो शिव. १९. नम्र जे संत त्यांस पराभव देत नाहीं. २०. हे रामा. २१. हे त्रिभुवनसुंदरा. २२. योग्य. २३ नाशाप्रत न्याया. २४ श्रीरामचंद्रावांचून अन्याला. २५. ब्रह्मणाचे गुण. २६. अंत्यजास. २७. रामचंद्र. २८. भक्तांचा कल्पतरु. २९. विष्णु. ३०. विश्वाला आनंदविणारा. ३१. स्वदेहें, स्वतः. ३२. पुष्कळ दिवसांचा. ३३. भुजयुद्ध नांवाचा. ३४. मनोरथ. ३५. राम (कृष्ण). ३६. पराभूति, पराभव. ('परा' हें पद आहे पूर्वी जिच्या अशी 'भूती'=पराभूती.) ३७. विचार करून. ३८. हें 'ईक्षणीं' याचें विशेषण. उपमारहित आहेत लक्षणें ज्याचीं असें (ईक्षण). ३९. अवलोकनानें, नयनानें. ४०. स्वभक्तांचें रक्षण करण्याविषयीं. ४१. असत्+शिक्षणीं=दुष्टांस शासन करण्याविषयीं.

प्रचंड महिमा रणीं[1] दशमुखाचिया मारणीं,
इनान्वयशिरोमणि[2], प्रकट आमुचा तूं धणी. ॥ २९
शिळेसि[3] दिधली गती[4], जिस[5] महामुनी मागती[6],
द्विषत्[7]सहज सन्नती[8] करि, तयासि[9] अत्युन्नती[10], ।
करूनि नत पावती वरिति सिद्धि दे पाय ती,
जयास खळ कांपती अजित! आमुचा तूं पती. ॥ ३०
महर्धि[11]कुळभाजन स्वपितृराज्यशोभा जन
त्यजूनि, सकृपा[12]! वनव्रजन[13] दाविलें पावन, ।
तपस्विपरिपालनप्रणतबाळसल्लालन-
प्रवीण सुखसाधन, प्रकट आमुचें तूं धन. ॥ ३१
भल्यासि करुनि छळ व्यसनिं पाडिती जे खळ,
क्षपाचर[14] असृक्पळप्रिय[15] असंख्य पापाचळ[16], ।
तया[17] वनिं दवानळ स्वजनहृज्झषांचें[18] जळ,
त्रिविष्टप[19]तपःफळ प्रकट आमुचें तूं बळ. ॥ ३२
अहो[20]! नयनहो! न हो भ्रम तुम्हांसि, हा वोळखा,
मुखास विधु[21], कांतिला जलद, भानु[22] लाजे नखा; ।
तधीं[23] जलधिबंधनोत्तर[24] करि त्रिकूटीं[25] मखा[26],
मिळे सहितलक्ष्मण प्रथम ऋष्यमूकीं[27] सखा[28]. ॥ ३३

---

१. श्लोक २९, ३०, ३१ आणि ३४ यांत यथानुक्रम णी, ती, न आणि ळा या अक्षरांची वारंवार आवृत्ति झाली आहे म्हणून हा अनुप्रासालंकार आहे. २. सूर्यवंशीयराजांत श्रेष्ठ. (इन=सूर्य, अन्वय=वंश.) ३. अहल्येसि. ४. मुक्ति. ५. ज्या गतीस. ६. याचिती. ७. शत्रूचा बंधु बिभीषण. ८. नमस्कार. ९. त्या बिभीषणास. १०. अति उत्कर्ष. ११. मोठ्या संपत्तीचें उत्तम पात्र. १२. हे दयाळो. १३. अरण्यांत जाणें. १४. राक्षस. (क्षपा+चर=रात्रि+फिरणारे) १५. रक्तमांसभक्षक. (असृज्=रक्त, पळ=मांस.) १६. पापपर्वत. १७. त्या राक्षसरूप वनांत. १८. स्वभक्तांचीं हृदयें तेच मत्स्य त्यांस जळ. १९. स्वर्गाच्या तपाचें फळ. २०. जांबवंत आपल्या नयनास उद्देशून म्हणतो. २१. चंद्र. (मुखास पाहून चंद्र लाजतो.) २२. सूर्य. २३. त्यावेळीं. २४. समुद्रावर सेतु बांधल्यावर. २५. त्रिकूट नामक पर्वतावर. २६. यज्ञाला. २७. ऋष्यमूक पर्वतीं. हा पर्वत दक्षिणहिंदुस्थानांत असून यापासूनच पंपेचा उगम आहे. २८. मित्र (सुग्रीव).

तुवां वधुनि वाळिला, [१]सुगळ दीन [२]सांभाळिला,
[३]नतांगदहि पाळिला, जन यशोमृतीं क्षाळिला; ।
[४]द्विषत्पतग जाळिला, [५]तदनुजाधिही [६]वाळिला,
[७]प्रियाविरह टाळिला, भरतभक्त कुर्वाळिला.' ॥ ३४

म्हणे [८]वंदूनिया पाय, 'देवदेव! [९]क्षमस्व कीं, ।
[१०]सापराधीं परी नम्रीं जसा [११]तोकीं [१२]क्षम स्वकीं.' ॥ ३५

[१३]हरि [१४]तनुविकळत्व [१५]क्षिप्र तो [१६]देवें [१७]देहा-
वरि कर फिरवूनी, वृत्त सारें वदे [१८]हा, ।
मग मणिसह [१९]कन्या [२०]अर्पिली [२१]पादपद्मीं,
[२२]कवि सकळ निवेदी ये जयीं [२३]पात्र [२४]सद्मीं. ॥ ३६

बिळाच्या त्या द्वाराप्रति धरुनि बारा दिवस ते,
सवें जे जे आले जन सकळ जाले निवसते; ।
पुरेना श्री[२५]कृष्णागमनधृततृष्णा [२६]मुरडले,
'मुकुंदा! हा! हा! रे!' म्हणुनि बहु सारेहि रडले. ॥ ३७

वार्ता जाणवितांचि साश्रुनयनीं [२७]शोकातुरीं [२८]नागरीं,
जाली [२९]सर्वपुरी निमग्न सहसा शोकाचिया सागरीं, ।
ऐसें ऐकुनियां म्हणे [३०]नृपति, 'हा! तो तात! हा! [३१]माय हा,
स्त्री हा' [३२]जो न नभींहि वृत्तजठरीं या काय [३३]हा माय हा. ॥ ३८

'[३४]हें हा! सत्राजिता रे! हरिवरिच कसा घातला [३५]आळ साचा,
तूं पापी संहरावें [३६]त्वरित तुज नव्हे काळ हा आळसाचा; ।

१. सुग्रीव. २. रक्षिला; सांभाळ=संभार, पोषणार्थ. 'भृ'धातूला 'सम्' उपसर्ग लागून 'चांगलें पोषण करणें' या अर्थाचा 'संभार' हा शब्द झाला आणि त्यापासून 'सांभाळ' हा शब्द निघाला. संस्कृतांतील र आणि ल यांच्या स्थानीं मराठींत ळ होतो. ३. नत+अंगद=शरण आलेला अंगद वानर. ४. शत्रुरूप पतंग (रावण). ५. बिभीषणाची मनोव्यथा. [तद्+अनुज+आधि=त्याच्या+धाकटा बंधु+मनोव्यथा]. ६. दूर केला. ७. सीताविरह. ८. देवाधिदेवा. ९. क्षमा कर. १०. अपराधयुक्त, ११. पुत्राचे ठायीं. १२. समर्थ बाप. १३. घालवी. १४. शरीरशैथिल्य, शरीराची ग्लानि. १५. लागलाच. १६. कृष्ण. १७. अंगावर. १८. हा जांबुवंत. १९. जांबुवती. २०. समर्पिली. २१. चरणकमळीं. २२. जांबवान्. २३. सत्पात्र. (कृष्ण.) २४. घरीं. २५. कृष्णाच्या आगमनाची धरलेली इच्छा. २६. माघारे फिरले. २७. शोकविव्हल. २८. पौरजनांनीं. २९. द्वारका. ३०. उग्रसेन. ३१. देवकी. ३२. जो हाहाकार नभींही नमाय. ३३. तो हाहाकार वृत्तजठरीं माय काय (मावेल काय)?. ३४. खेदार्थक अव्यय. ३५. मिथ्या आरोप. ३६. लवकर.

दुष्टा! [1]अंगार कीं तो [2]यदुकुळभवना लाविला, [3]भूललासी
[4]मूर्खा! दीपा [5]पतंग खमनिं जरि म्हणे 'हें खरें [6]फूल' [7]लासी.' ॥ ३९
कृष्णप्राप्त्यर्थ सर्व [8]प्रणति करुनि ते [9]प्रार्थिती [10]चंद्रभागे,
'माते! [11]त्वत्पाणि [12]साक्षादमृतकर खरा वांटितां [13]चंद्र भागे, ।
हस्ताचा कोण वर्णी निरुपम महिमा? पाय हे काय [14]राय
[15]स्वर्वृक्षांचे न देती, रजचि बहु [16]शिवें संहराया [17]अपाय. ॥ ४०
[18]ज्या लाभे या पदींचा [19]शुभनियतिबळें सेवका एक [20]रेणु,
त्यातें माथा वहाया [21]सविनय सहसा [22]जिष्णुचा ये [23]करेणु; ।
[24]आदेश [25]स्वर्द्रुचिंतामणि [26]सुरकपिला कां न त्याचा करीती?
कां मोटा भाग्यलाभ स्वसुकृत फळलें तें नव्हे चाकरी ती. ॥ ४१
आम्हां वांचविलें तुवांचि, [27]जननी! त्या दुष्ट [28]कंसारसा-
शल्यापासुनि दाविला सकरुणे! लोकांत संसारसा; ।
वैदर्भी [29]दुहिताचि, भूषवु इला [30]त्वत्पाणि [31]कांसारसा,
अन्या दे परितुष्टि पुष्टि, न निजां दे पाणि कां [32]सारसा?' ॥ ४२
एवं नानाप्रकारें [33]प्रणतजनमनःकामदा जी [34]भवानी,
[35]सर्वांचीही [36]तिचे ते अमृतगुण दिवारात्रिही जीभ [37]वानी; ।

---

१. अग्नि. (अंगार=निखारा.) २. यादवकुळरूप भवनास (घरास). ३. मोहित झालास. ४. रे मूर्खा. ५. शलभ. ['पतंगः शलभे शालिप्रभेदे पक्षिसूर्ययोः' इति सुधा.] ६. पुष्प. ७. भाजितें. ८. नमस्कार. ९. ही प्रार्थना पंतांनींच येथें विस्तृतपणें घातली आहे; मूळांत केवळ या स्थळीं एकच श्लोक आहे. १०. ह्या नांवाच्या देवीस. (अध्याय ६ श्लोक ३५ पहा.) ११. तुझा पाणि (हस्त). १२. चंद्र (अमृत आहे करीं किरणीं) ज्याच्या तो. १३. खरा चंद्र अमृत वांटितां भागे. १४. हे पाय, स्वर्वृक्षांचे राय, (राजे) काय न देती?—असा अन्वय. येथें काकर्थग्रहण इष्ट आहे. १५. कल्पवृक्षांचे. १६. कल्याणानें. १७. अपाय संहराया रजचि बहु. १८. ज्या पुरुषा (सेवका) या पदींचा एक रेणु लाभे—असा अन्वय. १९. शोभन दैवाच्या योगानें. २०. रज. २१. नम्र, विनीत. २२. इंद्राचा. २३. गज. (ऐरावत.) २४. हुकूम. २५. स्वर्द्रु. (स्वर्+द्रु=स्वर्ग+वृक्ष.) २६. कामधेनु. २७. चंद्रभागे. २८. दुष्ट कंसरूप भूकंटकापासून. (रसा=पृथ्वी.) २९. रुक्मिणी तुझी कन्या होय. ३०. तुझा हात. ३१. बांगड्या भरणारासारखा. ३२. कमळास म्ह० धरलेल्या कमळास. ३३. प्रणत जनाच्या मनांतील काम देणारी. ३४. पार्वती. 'आनी' प्रत्यय लागून भव शर्व मृड इंद्र वरुण रुद्र शब्दांपासून त्यांचें स्त्रीलिंगी रूप साधतात:—भव-भवानी, मृड-मृडानी. ३५. सर्वांची जीभ. ३६. भवानीचे. ३७. वाखाणी.

जीच्या पायांचिपासीं निर[1]वधि क[2]रुणाकन्यका नित्य रांगे,
'स्व[3]प्नीं देखाल साक्षात् त्वरित हरि' असें त्यां स[3]मस्तांसि सांगे.'॥४३

ति[4]च्या पायांपासीं बहुदिन उपासींच सकळ,
प्रभूसाठीं हो ! ते जन करित होते कळकळ, ।
जसें जातां वित्त क्षण कृ[5]पणचित्त स्थिर नसे,
पहाती तें नि[6]द्रामुख अ[7]सुखविद्रावित कसे ? ॥ ४४

परंतु ई[8]श्वरीनेंचि ती निद्रा क्षण आणिली, ।
जीव[9]च्छवचमू आ[10]शी:सुधा वर्षोनि न्हाणिली. ॥ ४५

चंद्रभागाप्रसादानें प्राप्त होतांचि जागर, ।
सस्त्रीरत्न मणिग्रीव प्रेक्षिला सु[11]खसागर. ॥ ४६

आला कृष्ण कृ[12]पासुधाघन घ[13]नानंदप्रद प्रेक्षणें[14]
[15]स्वीयादर्शनजातदु:सहमहाताप क्षया ने क्षणें; ।
ते पौरा[16]प्त मयूरचातक सुखें अत्युत्सवें नाचती,
त्यांची भा[17]ग्यसमृद्धि [18]हर्षविवशा या बोलवेनाच ती. ॥ ४७

सभेंत सत्राजित आणवीला, वृत्तांत सारा मग जाणवीला; ।
दि[19]लें मणी जो न सदा र[20]हाता, अ[21]न्यत्र येणार स[22]दार हाता. ॥ ४८

आला [23]श्रीकांतहस्ता मणि मिळवुनियां निस्[24]तुळा जां[25]बवज्जा,
हस्ता सत्राजिताच्या पुनरपि वरिता होय जोडूनि लज्जा; ।

---

१. असीम, अमेय. २. करुणारूप कन्या. ३. हरि देखाल असें समस्तांस स्वप्नीं सांगे. ४. या श्लोकाचें वृत्त 'शिखरिणी' आहे. याचें लक्षण:—'यमनै: सभलैर्गेन युक्ता सप्तदशाक्षरा । षडेकादशविच्छेदवती शिखरिणी मता ॥' [क्षेमेंद्रविरचित सुवृत्ततिलक–प्रथम विन्यास ३४.] या वृत्ताविषयीं सुवृत्ततिलकांत पुढील विवेचन केलें आहे:—'शिखरिण्या: समारोहात्सहजैवौजस: स्थिति: । सैव लुप्तविसर्गांतै: प्रयात्यस्तमुन्नतिम् ॥ शिखरिण्या: पदैश्छिन्नै: स्वरूपं परिहीयते । मुक्तालताया निःसूत्रमुक्तैर्मुक्ताफलैरिव ॥' [सुवृत्ततिलक द्वितीय विन्यास ३१-३२.] ५. लोभ्याचें मन. ६. निद्रारंभही. ७. शोकव्याकुळ. ८. भवानीनेंच. ९. जिवंत शवांची (प्रेतांची) मंडळी. १०. आशीर्वादरूप अमृत. ११. कृष्ण (कृष्णसागर) सस्त्रीक मणिकंठ असा पाहिला. १२. कृपारूप अमृताचा मेघ. १३. घन (पुष्कळ) आनंद देणारा. १४. अवलोकनानें. १५. आपल्या अदर्शनानें झालेला जो महाताप तो क्षया नेला. १६. नगरवासी लोक आणि आप्त जन हे यथानुक्रमें मयूर आणि चातक. १७. भाग्याची विपुलता. १८. आनंदानें विवश (पराधीन) झालेल्या या (या कवीला—मोरोपंताला). १९. अध्याय ५६ श्लोक ३८ पहा. २०. आपणाजवळ सदा राहणारा नव्हे असा मणि दिला. २१. कालांतरीं. २२. अन्य प्रसंगीं स्त्रीसह आपल्या स्वाधीन होणारा असा (मणि). २३. कृष्णाच्या हातीं. २४. निरुपमा, अद्वितीया. २५. जांबवती.

कीं तत्त्वज्ञा उदारा [1]सदभिमतगुणा अर्थ दे लाभ, हानी
तद्भिन्ना, हें यथार्थ स्वहित कळविलें सन्मतीच्या [2]गृहानीं. ॥ ४९
ऐसे नाना अनर्थव्रज पडति गळां आग्रहें यन्निमित्त,
[3]व्यामोहाचें [4]निदान स्थिरहि न धरितां पोटिसीं होय वित्त; ।
सत्पात्रीं [5]त्याग याचा अगुण नुरवि हें [6]नैकती मूढचित्त,
व्यर्थ क्लेशीच होती म्हणुनि उसळतें सज्जनाचेंहि पित्त. ॥ ५०
[7]याच्ञाभंग प्रभूचा, कृपणपण दुजें, तीसरी बंधुहानी,
[8]शोकाप्ति श्रेष्ठनिंदा घडलि, न उरला मान थोरीं लहानीं; ।
माथां लज्जा शिळाचि, प्रकटचि पडला भूपतीसींच [9]दावा,
ज्याचा तो मात्र जाणे जन, सकळ कसा ताप आम्हीं वदावा ?॥ ५१
[10]निवाराया पापा [11]हृतविनततापा [12]यदुहिता
समर्पी [13]पद्मापा मग धुउनियां पाय दुहिता; ।
जरी केला यत्न, प्रभुवर न [14]रत्नग्रह करी,
वरी प्रेमें [15]कन्या हृदयिं न [16]तदन्यायहि धरी. ॥ ५२
ऐसें **सत्राजिताला** स्मितवदन म्हणे तो [17]प्रभूत्तंस, '[18]मामा!
आम्हां कन्या दिली, हें उचित [19]उदधिनें जेंवि [20]सर्वोत्तमा [21]**मा**; ।
या रत्नेंचि [22]प्रमोद [23]प्रचुर, [24]जतन हें आमुचें [25]रत्न ठेवा,
सेवाया योग्य आम्हीं [26]फळचि, न भजलों धारणा **सूर्यदेवा**.' ॥ ५३

---

१. साधूस मान्य ज्याचे गुण असा जो उदार तत्वज्ञ त्यालाच अर्थलाभ देतो, आणि त्यांहून भिन्न आहेत अशा अतत्त्वज्ञ आणि अनुदार पुरुषाला अर्थहानि देतो. २. सुज्ञ जनांनीं. ३. अज्ञानाचें. ४. आदिकारण. ५. दान. ६. ऐकत नाहीं. ७. याचनानिषेध, प्रार्थनेचा अस्वीकार. ८. शोक-लाभ. ९. वैर. [दावा हा आरबी शब्द आहे.] १०. पाप निरसन होण्यासाठीं. ११. विनतांचा (शरणागतांचा) ताप हरणारा. (कृष्ण.) १२. कृष्णा. (यादवांच्या हितकर्त्यास.) १३. लक्ष्मीपतीस. १४. मण्याचा अंगीकार. १५. सत्यभामा. १६. सत्राजिताचा अन्याय. १७. प्रभु+उत्तंस=प्रभु+भूषण. १८. अहो मामाजी. १९. क्षीरसागरानें. २०. विष्णूला. २१. लक्ष्मी. २२. आनंद. २३. विपुल. २४. जतन ठेवणें=राखणें, बाळगणें. २५. स्यमंतकमणि. २६. आम्ही सूर्यभक्त नाहीं म्हणून हें रत्न आमच्या पाशीं नको, तुमच्या पाशींच असों दे, आम्ही त्या रत्नापासून जें फल (लाभ) प्राप्त होईल तेंच घेण्यास योग्य आहों. [तुमच्या अपुत्रत्वामुळें तुमचें जें धन तें आमचेंच होय—असा गूढाभिप्राय.] [अध्याय ५६ श्लोक ४५ पहा.]

**वै**दर्भी[1] प्रथमा, **र**मा भगवती भार्या[2] दुजी सन्मती,
देवी **जां**बवती तसीच तिसरी श्री**स**त्यभामा सती; ।
**कृ**ष्णें भक्तमयूरजीवनदयांभोदें[3] तिवी कामिनी[4]
केल्या, शोभविती तयासहि[5], जशा मेघासि सौदामिनी[6]. ॥ ५४

---

## अध्याय सत्तावन्नावा.

(श्लोक.)

**कुं**तीसीं[7] **पां**डव स्वप्रियकृतविवरांतूनि[8] ठावे पळाले,
वार्ता कानास आली असि जनवदनें कीं 'अकस्मात् जळाले'; ।
गेले श्री**राम**कृष्ण त्वरित **ग**जपुरा[9], भेटले **आं**बिकेया[10],
**भी**ष्मा **द्रो**णा **कृ**पाहि श्रितवर[11]**वि**दुरा, जो[12] स्वचित्ता विके यां[13]. ॥ १
जैसा अंध[14] कुबुद्धि पुत्रवशग[15] स्वांतीं[16] निवाला, **पृ**था-
**मा**द्रीपांडुसुतांसि आठवि रडे, झांकूनी डोळे वृथा; ।
तत्त्वज्ञ[17] प्रभुही[18] तसेच रडती आच्छादुनी श्रीमुखें[19],
क्षत्ता[20] **भी**ष्महि हे खरेहि रडती, कीं मूढ[21] भावी[22] सुखें. ॥ २
प्रभू गेल्यामागें सुमति **कृ**तवर्मा, परि बळी[23]
विधी[24] त्यां **अ**क्रूरासहि भुलवि कीं सूचवि कळी[25]; ।
कुमंत्री[26] क्षीणायू[27] शतधनु[28] मिळे त्यास तिसरा,
सुबुद्धीच्या झाले स्वनियतिबळें[29] पात्र विसरा[30]. ॥ ३

---

१. मोरोपंत हा भाषांतरकार होय, कवि नव्हे—असें मत ज्यांचें असेल त्यांनीं हा अध्याय मूळाशीं एकवार ताडून पाहण्याची तसदी घेतल्यास त्यांचें मत कितपत कसोटीस उतरण्यासारखें आहे हें त्यांचें त्यांसच समजेल. २. भरण (पोषण) करण्यास योग्य—असा मूळ शब्दार्थ. भार्या=भाजा, स्त्री. ३. भक्त मयूराला वांचविणाऱ्या कृपारूप उदकाच्या मेघें. (कृष्णें.) ४. स्त्रिया. ५. कृष्णासहि. ६. विद्युल्लता. हा उपमालंकार आहे. ७. कुंतीसहवर्तमान. ८. जतुगृहांतून आप्त विदुर यानें खनकहस्तें करविलेल्या बिळद्वारानें. ९. हस्तिनापुराला. १०.धृतराष्ट्रास. (अंबिकापुत्राला. आकारांत अथवा ईकरांत स्त्रीलिंगी विशेषनामांवरून त्या शब्दांच्या आद्य स्वरास वृद्धि होऊन अंत्यस्वराच्या स्थानीं 'एय' 'एयी' आदेश होऊन अपत्यवाचक यथानुक्रम पुंलिंगी स्त्रीलिंगी विशेषनामें होतात:—गंगा-गांगेय, अंबिका-आंबिकेय, कुंती-कौंतेय. ११. आश्रितश्रेष्ठ जो विदुर त्याला. १२. विदुर. १३. या कृष्णास. १४. धृतराष्ट्र. १५. पुत्रांच्या स्वाधीन. १६. चित्तांत. १७. प्राज्ञ, तत्त्वनिष्ठ. १८. राम कृष्ण.१९. शोभासंपन्न मुखें.२०. विदुर.२१. धृतराष्ट्र.२२. मानी. २३. बळवत्तर. [हें 'विधी'चें विशेषण.] २४. दैव. २५. कलह.२६. वाईट मसलत करणारा. २७. अल्पायु. २८. या नांवाचा यादव. २९. निजदैवबळानें. ३०. सुबुद्धीच्या विस्मरणास पात्र झाले.

[1]दोघेही बोधिती त्या शतधनुसि, 'अहो! शूर तूं धीर मा[2]नी,
ज्ञानीही न स्वनाशीं घे[3]णमणति, न त्यां साहवे मा[4]नहानी; ।
मा[5]नी आम्हांसि सत्राजित उचित व[6]र स्वा[7]त्मकन्याप्रदानीं,
सा[8]नी हे काय लज्जा? न पुसत[9] हरिला प्रार्थुनी दे नि[10]दांनीं. ॥ ४
आम्हां धायासि केली अ[11]सतचि, दिधली तेचि [12]गोपूर्वविंदा,
दो[13]षाध्यारोप शब्दें न करुनिहि खळें फार केलीच निंदा. ।
आहे तें कां न घेसी? प्रभुसहि न दिलें, मागतांही स्वै[14]रत्न,
भ्राता याचा प्रसेन प्रिय[15]मणि, तरि तूं दाखवी सिंहयत्न'. ॥ ५
त[16]याचे मनें मानिले शब्द वेदे[17], क्षणामाजि केला [18]तिहीं बुद्धिभेद; ।
गळा सु[19]प्तसत्राजिताचा सु[20]पापी, स्वहस्तेंचि रा[21]त्रौ श[22]तेष्वास कापी. ॥ ६
ग[23]तायूस ते वाटले शब्द वेद, क्षणामाजि केला तिहीं बुद्धिभेद; ।
स[24]हस्रांकरांचा सखा जो तथापी, तयाचा गळा शत्रु सा[25]नाहि कापी. ॥ ७
तेज[26]स्वी विश्व[27]चक्षु द्रु[28]तगति निमिषार्धांतही नित्य चाले
गा[29]वें बेवीसशें जो युगुळहि, परि ते अ[30]श्व न श्रांत झाले; ।
नामें कर्मेंहि मित्रे[31], स्व[32]कर द[33]शशत ख्यात ज्याचे प्रतापी,
ऐशा[34]च्याही स[35]ख्याचा, रिपु, विधि[36] फिरतां, कंठ तत्काळ का[37]पी. ॥ ८

---

१. अक्रूर आणि कृतवर्मा. २. मानवान्, अभिमानी. ३. न बावरती. ४. मानभंग. हा चरण सुभाषितरूप आहे. ५. मानीत होता. ६. त्याच्या कन्येचा वर (पति) होण्यास योग्य असे. ७. आपल्या कन्येच्या (सत्यभामेच्या) दानाविषयीं. ८. लहान. ९. आम्हांस न विचारितां. १०. शेवटीं. ११. असतांही. १२. गोविंदाला. १३. दोषाची स्थापना शब्दानें न करून. १४. स्यमंतक मणि. १५. प्रिय आहे मणि ज्याला असा याचा भ्राता प्रसेन त्याला जसें सिंहानें मारिलें, तसा तूं या सत्राजिताला सिंहाचा पराक्रम दाखीव. हाही प्रियमणि आहे. १६. त्या शतधन्व्याचे. १७. वेदाप्रमाणें सन्मान्य, वंद्य. १८. त्या शब्दांनीं. (कृतवर्माक्रूरभाषणानें). १९. निजलेल्या. २०. पापाचारी. २१. रात्रीमध्यें. 'रात्रौ' हें संस्कृताप्रमाणें सप्तमीचें एकवचन आहे. २२. शतधनु. २३. मेलेल्या सत्राजिताला. २४. सूर्याचा. २५. लहानही. श्लोक ६ व ७ हे समानार्थक आहेत म्हणून यांतील दुसरा श्लोक (७ वा) कदाचित् प्रक्षिप्त असावा असें वाटतें. २६. या श्लोकावरून पंत हे केवळ भारवाहक भाषांतरकार होते किंवा कसे याचा निर्णय करितां येणार आहे. २७. विश्वचक्षु=जगच्चक्षु=सूर्य. (विश्वाला नेत्राप्रमाणें सर्व पदार्थ दाखविणारा.) २८. शीघ्रगामी. २९. योजनें. ३०. सूर्याचे सात अश्व (घोडे). ३१. सूर्य [सूर्याचें नांव मित्र आहे व त्याची करणी ही मित्र (मित्राप्रमाणें हितकारी आहे.] ३२. कर=किरण, हस्त. ३३. एक हजार. ३४. अशा सूर्याच्या. ३५. मित्राचा. (सत्राजिताचा.) ३६. दैव. ३७. याचा कर्ता रिपु '(शतधन्वा).'

प्रार्थिती विलपती बहुशः स्त्री, न द्रवे अदय हा[१] बहुशस्त्री[२], ।
अर्थलुब्ध[३] वध दस्यु[४] करीती, तेंवि दावि पशुसौनिकरीती[५]. ॥ ९
घेऊनि गेला[६] मणिला स्वधामा[७], शोकासि पावे बहु सत्यभामा, ।
तो ठेविला देह[८] परासु[९] तैलद्रोणींत[१०], चित्तांतहि दुःखशैल[११]. ॥ १०
शोकार्ता सत्यभामा त्वरित गजपुरा[१२] जाय, कीं तेथ कर्ता
धर्ता[१३] लोकत्रयाचा, बळसहित[१४] वसे दुर्जनप्राणहर्ता, ।
भर्ता श्रीकृष्ण, त्यातें कथि निजवदनें वृत्त हें साश्रु[१५]; तीचें
रक्षाया चित्त 'हा! हा!' म्हणुनि गहिवरे, तें रहस्य[१६] श्रुतीचें[१७].॥ ११
जाणों[१८] ते प्रभुसिंह, केवळ गुहा त्यांची पुरी[१९] मोकळी[२०],
तेथें निर्भय हीनसत्त्वनिकरीं[२१] झाला असा तो[२२] कळी[२३]; ।

---

१. शतधन्वा. २. बहुत शस्त्रें धरणारा. ३. धनलोभी. ४. चोर. ५. पशूला मारणारा जो सौनिक म्हणजे कसाब त्याची रीति दावी. (अध्याय ५७ श्लोक ६ पहा.) ६. येथें कर्ता शतधन्वा, याचा अध्याहार केला आहे. ७. आपल्या घराला. ८. सत्राजिताचा काय. ९. मृत. (पर+असु=गतप्राण.) १०. तैलकटाहांत, तेलाच्या कढईत. ११. दुःखपर्वत. येथें 'काकाक्षिगोलकन्याया'नें 'ठेविला' हें पद योजिलें आहे. दुःखशैल चितांत ठेविला—असें तात्पर्य. १२. हस्तिनापुराला. (श्लोक ८.) १३. संस्कृतांत धातूस 'तृ' प्रत्यय लागून ती क्रिया करणारा अशा अर्थाचीं नामें होतात:—जसें; धृ—धर्ता (धारण करणारा), जि—जेता (जिंकणारा), हु—होता (होम करणारा), दा—दाता (दान करणारा) इत्यादि. १४.बळरामासह. १५.रडून, डोळ्यांत आसवें आणून. १६. श्रुतिगम्य. (कृष्ण.) १७. वेदाचें. 'श्रुति'शब्दाविषयीं पुढील विवेचन मनन करण्यासारखें आहे:—'जिच्या योगानें धर्म ऐकू येतो (समजतो) ती श्रुती, असा 'श्रुति'शब्दाचा मूलार्थ आहे. वेदमंत्र म्हणण्याचे वेळेस पाठकाचे चित्ताची एकाग्रता राहून अर्थानुसंधान राहावें म्हणून पुस्तकावरून पठन करण्याचा निषेध शास्त्रकारांनीं केला आहे. ऐकून म्हणणें यावरून वेदास 'श्रुति' हें नांव पडलें, व 'श्रुति' शब्दावरून प्राचीनकाळीं लेखनकला भरतखंडांत नव्हती, अशीं अनुमानें यूरोपांतील विद्वान् करतात तीं बरोबर नाहींत. याप्रमाणेंच वेदार्थाचें स्मरण करून त्यांत प्रतिपादित केलेल्या धर्माचें ऋषींनीं विस्तारानें ज्यांत कथन केलें आहे, असे जे ग्रंथ त्यांचें नांव 'स्मृति.' असा 'स्मृति' शब्दाचा अर्थ प्राचीन संस्कृत ग्रंथकारांनीं केला आहे. याकरितां 'स्मृति' म्हणजे केवळ 'स्मरणानें पढण्याचे ग्रंथ' असा अर्थ करून स्मृतिकालींही भरतखंडांत लेखनकलेचा अभाव होता असें म्हणणें निराधार आहे. कारण स्मृतींमध्यें न्यायसभेंत मानण्याचीं प्रमाणें सांगितलीं आहेत त्यांत लेखप्रमाण धरलें आहे'. (व्युत्पत्तिप्रदीप—पृष्ठ ६६.) १८. रामकृष्ण. १९. द्वारका हीच गुहा. २०. बंधरहित, मुक्तद्वार. हा उत्प्रेक्षालंकार आहे. २१. बलहीन जो सत्त्वनिकर (प्राणिसमूह) त्यांत. २२. शतधन्वा. २३. कलह. ['कलिः स्त्री कलिकायां ना शूराजिकलहे युगे' इति सुधा.]

आले ते [1]यदुकेसरी, शतधनु त्रासासि पावे [2]करी,
जेव्हां स्पष्ट हरी खरी निजमुखें [3]घातप्रतिज्ञा करी. ॥ १२
हत्या अत्यादरानें करि, अरि गणुनी, [4]दुष्ट सत्राजिताची,
लोभी तो [5]भी स्वचित्तीं शतधनु अधम, प्रेक्षुनी हानि साची; ।
[6]प्राणत्राणप्रयत्न स्वमतिस न सुचे साधुनी [7]काबु [8]जाला,
[9]हाके हा केसरीच्या परिसुनि हरिण [10]भ्रांतवर्त्मा [11]बुजाला. ॥ १३
[12]हार्दिक्यासि म्हणे, 'सहाय मज हो.' [13]तो हात [14]कानावरी
ठेवी, [15]जो [16]अनळीं स्वयेंचि ढकली तो हात कां नावरी? ।
बोले, 'ईश्वर [17]रामकृष्ण, न घडे यांचें मला [18]हेळन' ।
[19]स्वामीचा अपराध जो जन करी तो क्षेम [20]लाहेल न. ॥ १४
ध्याया [21]भारापनोदें प्रभु अवतरले हे प्रमोद [22]क्ष्मेला,
यांच्या द्वेषेंचि बंधुस्वजनसह जरी कंस तो दक्ष [23]मेला; ।
केला त्या [24]मागधाचा परिभव [25]सतरा वेळ, पायीं पळाला,
ज्याचें तेवीस [26]अक्षौहिणिबळ, विजयप्राप्ति कैंची [27]खळाला? ॥ १५
अक्रूराच्या गृहाला [28]सभय शतधनू ये, सहायत्व [29]याची,
हा साधु [30]स्वादु बोले मग, परिसुनियां सर्व विज्ञप्ति [31]याची. ।
'बापा! [32]सर्वेश कीं [33]हे; बळ विदित असे ज्यास यांचें, न तो [34]यां
चित्तीं आणी विरोधा, पळहि न [35]जगति द्वेषितां [36]मीनें [37]तोयां. ॥ १६

१. राम कृष्ण हेच सिंह. २. शतधनु हाच करी (गज). हा रूपकालंकार आहे. ३. शतधनूच्या घाताची प्रतिज्ञा. ४. शतधनु. ५. भय पावे. ६. प्राणरक्षणोपाय. ७. इष्ट कार्य. ८. झाला. जरी शतधन्वा.काबु (इष्ट कार्य) साधुनी (कृतकृत्य) जाला (झाला) तरी त्याच्या मतीला प्राणत्राणोपाय सूचला नाहीं. ९. गर्जनेला. १०. मार्ग भुलणारा, जो रस्ता चुकला आहे तो. ११. घाबरला. १२. कृतवर्म्यास. १३. हार्दिक्य. १४. कानावर हात ठेवणें=कर श्रवणीं ठेवणें= अनंगीकार सूचविणें, माहीत नाहीं अथवा आपल्या हातें होत नाहीं असें दाखविणें. (केकावल १०.) १५. जो हात. १६. अग्नींत. १७. राम कृष्ण ईश्वर आहेत. १८. प्रतिकूलवृत्त, अपराध, १९. हा चरण सुभाषितरूप आहे. २०. न लाहेल, न पावेल. २१. भारनाशानें. (भार+अपनोद= भार+दूर करणें). २२. पृथ्वीला. २३. जरी दक्ष तरी तो (कंस) मेला. २४. जरासंधाचा. २५. श्लोक १३ पहा. २६. पृष्ठ १ टीप ९ पहा. [येथें 'अक्षौहिणी' शब्द ऱ्हस्व इकारांत योजिला आहे. तो अशुद्ध समजला पाहिजे.] २७. दुष्ट शतधनु याला. २८. भयपीडित. २९. मागे. ३०. मधुर, गोड. ३१. शतधन्व्याची. ३२. सकलैश्वर्यसंपन्न. ३३. राम कृष्ण. ३४. अशा विरोधा. ३५. वांचतात. ३६. मासे. ३७. उदकाला. हा चरणांश सुभाषितरूप आहे.

जो[1] हें लीलेकरूनि त्रिभुवन रचितो[2], रक्षितो[3], नाशितोही[4],
चेष्टा[5] ब्रह्मादि ज्याची नुमजति[6] कवि[7], कीं त्यांसि माया विमोही[8]; ।
बाळ[9] छत्राक[10] जैसें धरि, गिरि[11] धरिला, कांपतां वात वर्षे,
गोगोपीगोप[12] रक्षी, करि हरि जइं हें[13] तैं वयां[14] सात वर्षें. ॥ १७
ऐसा जो जगदादिभूत[15] भगवान् कूटस्थ[16] आत्मा[17], कृती[18]
ज्याची अद्भुत हे, अनंत[19], परि[20] हा लीलामनुष्याकृती[21]; ।
झाला साधु असाधु जे असति कीं ते तारणें मारणें,
माझें[22] वंदन सर्वकाळहि असो त्या कृष्णजीकारणें.' ॥ १८
कृष्णें केली प्रतिज्ञा म्हणउनि उरली मृत्युची वेळ थोडी,
साधू[23] रक्षील ऐसें शतधनु समजे, स्वावना[24] हात जोडी; ।
तों तों वर्णूंचि लागे हरिचरित मुखें त्यांत तैसीच गोडी,
हा पापी[25] एकदाचि स्वजनभरंवसा, रत्न, निश्वास, सोडी. ॥ १९
जेव्हां त्यातें म्हणे तो शतधनु, 'करुणा रत्न हेंही असों द्या.'
बोले अक्रूरही हा मृदु, 'बहुत बरें, आप्त आम्हीं असों, द्यां[26]; ।
जातां, जावें, करावें स्वहित, यदुवरा! माधवा! कंसकाळा!
कैसें आतां तपस्वी[27] करिल शतधनू, काय आलें कपाळा!' ॥ २०
समुपगतही[28] अन्न त्यागी, न तो करि भोजन,
प्रणतशिव[29] जें माथां घे तेंहि पादसरोज[30] न; ।

---

१. जो सर्गस्थितिनाशहेतु यथानुक्रम ब्रह्मविष्णुमहेशरूप धारण करून आहे. २. ब्रह्मरूप. ३. विष्णुरूप. ४. महेशरूप. ५. लीला. ६. न जाणती. ७. विद्वान् पंडित. ८. भुलविते. ९. अर्भक. १०. छत्राक=उच्छिलींध्र=पर्जन्यकाळीं जमिनींतून छत्राकृति जो पदार्थ निघतो, ज्यास 'आळंबें, कुत्र्याचें मूत' म्हणतात तो. 'छत्रें म्हणजे पावसाळ्यांत छत्रीसारखीं जीं एक प्रकारचीं झाडें उगवतात तीं. यांस पानें वगैरे कांहीं नसतात. मध्यें देंठ असून वर पालथ्या वाटीसारखी मऊ कवची असते.' (पद्यरत्नावली पृष्ठ ५.) ११. गोवर्धनपर्वत. १२. धेनु, गवळिणी आणि गवळी. १३. गोवर्धनोद्धारण. १४. वयाला. (श्लोक १६.) १५. जगताचा आदिकारण. १६. निर्विकार. १७. व्यापक. १८. ज्याची हे कृति (सर्गादि) अद्भुत. १९. अपरिच्छिन्न. २०. परंतु. २१. लीलेनें मनुष्याकृति झाला असा. २२. अक्रूराचें. २३. अक्रूर. २४. निजरक्षणाकरितां. २५. शतधनु. २६. रत्न देतां तर द्या. २७. गरीब बिचारा (शतधनू.) ['तपस्वीकरुणापात्रम्' इति हलायुधः]. २८. पुढें आलेलें. २९. शरणागतास कल्याणप्रद जें कृष्णपादसरोज तेंही माथा न घे म्हणजे कृष्णाच्या पायास शरण गेला नाहीं. ३०. चरणकमळ.

सजुनि बसला त्या अश्वीं जो पळे शतयोजन,[1]
त्रिभुवनगता[2] वंची,[3] मांडी पलायन तो जन. ॥ २१

पापी मुक्तिपुरीस[4] सोडुनि पळे, लंघी तसा क्षिप्र भू,[5]
मागें धांवति पापनाशक रथीं बैसोनि साक्षी प्रभू;[6] ।
धाकानें शतयोजनें पळविला, लावीचना चाल[7] या,[8]
गेला[9] श्रीमिथिलासमीप हय[10] तो त्या दुर्जनाच्या[11] लया.[12] ॥ २२

गेल्याही शतयोजनें अभयदस्थानस्थिती[13] नाढळे,[14]
एक स्वव्यसनीं[15] सहाय हय जो होता, सखा तो गळे; ।
पायानींच तथापि नीच चरणत्राणेंहि[16] टाकी, पळे,
जेथें लाभ विनाश जंतुस[17] पडे, जाणें न तें हो! टळे.[18] ॥ २३

होय जेंवि शतचाप[19] पदाती,[20] तेंवि सर्वसुखमूर्ति[21] तदा ती, ।
गांठिला[22] मृगचि तो मृगशक्रें[23] तोडिलें शिर सुदारुणचक्रें.[24] ॥ २४

ठावें सर्व, तरी निजाग्रजनिला[25] वंचावयाला[26] हरी
वस्त्रीं शोध करी तदीयमणिचा, कीं तो करी,[27] हा हरी;[28] ।
ऐसा भाव धरी करू प्रबळ हीं[29] न क्रोध दासांवरी,
गेली गोष्टि खरी परंतु सदय स्वामी स्वयें सांवरी.[30] ॥ २५

रथाजवळि ये, म्हणे हरि बळा बळांभोधिला,[31]
'वृथा शतधनुःक्षय, स्वमणि तो नसे, शोधिला.'[32] ।

---

१. शंभर गांवें. २. जगद्व्यापकास. ३. फसवी. ४. द्वारकेस. ५. भूमीचे भाग. ६. राम कृष्ण. ७. साधी चाल. ८. अश्वास. ९. पावला. १०. अश्व. ११. शतधन्व्याच्या. १२. नाशा. १३. भयरहित स्थळ. १४. न मिळे. (न+आढळे.) १५. आपल्या संकटांत. १६. पायांतील जोडे. १७. प्राण्यास. १८. हा चरण सुभाषितरूप आहे. १९. शतधनु. २०. पादचारी. [पद्भ्यां अतति सततं गच्छति पदातिः=जो सतत पायांनीं चालतो तो पदाति.] २१. कृष्ण. २२. या श्लोकाचें वृत्त 'स्वागता'. याचें लक्षणः—'गुरुद्वययुतैरंते रनभैरुपलक्षिता । गदिता स्वागता नाम वृत्तमेकादशाक्षरम्' [सुवृत्ततिलक १।२४]. या वृत्ताविषयीं विवरण आहे तें:—'साकाराद्यैर्विसर्गान्तैः सर्वपादैः सविभ्रमा । स्वागता स्वागता भाति कविकर्मविलासिनी ॥' [सुवृत्ततिलक २।१५]. २३. सिंहानें. २४. भयंकर चक्रानें. (सुदर्शनानें.) २५. ज्येष्ठ बंधु बळराम यास. २६. ठकवायास. २७. गज. (तो शतधनु.) २८. सिंह. (बळराम.) २९. बळराम. ३०. संवरण करी, सांभाळी. ३१. बळसागर जो बळराम त्यास. ३२. मणि शोधून पाहिला पण वस्त्रांत सांपडला नाहीं.

स्ववंचन[1] न कां कळे सकळयोगिवंद्यास[2] तें?
भजत्प्रियकृदीश्वरानुमत[3] सोसि[4], हें भासतें. ॥ २६
स्वभक्त जरिही चुके[5], तदघ[6] मेरुसींही तुके[7],
तरी सदय ठावुके, गुण न सिंधु[8] घर्मीं[9] सुके; ।
जरी न उतरे टुंके[10], इतर भक्त भद्रा[11] मुके,
म्हणोनि हरिपादुके स्तवित साधु झाले मुके. ॥ २७
मनांत समजे बळ[12] स्वजनपक्षपात, क्षमा-[13]
रमापतिस 'जा' म्हणे 'निजपुरीस[14], वृष्ण्युत्तमा[15]! ।
प्रमाण[16] वदतोसि, दे शतधनू मणी यत्करीं[17]
करीं त्वरित शोध तूं, न धरिं दंड त्याही नरीं.' ॥ २८
भक्तीं जाणुनि पक्षपात हरिचा आनंद वाटे बळा,
कीं हा जेंवि तसी न माय पुरवी कुक्ष्युद्भवाचा[18] लळा; ।
त्या प्रेमें निजशुद्ध, भक्त जनक श्रीराम तो आठवी,
'मी जातों मिथिलेंत,' 'जा' हरि असें सांगोनियां पाठवी. ॥ २९
आलें कैवल्य[19] गेहीं[20], निरवधि[21] हृदयीं हर्ष झाला विदेहा[22],
रंकाची स्वःपदेहा[23] पुरलि, गुरुपदीं पुष्पसें ठेवि देहा; ।
होता त्या सन्निवासीं[24] बहुदिवस जसा भृंग[25] पद्मीं[26] सुवासीं[27],
द्रव्येशासीं[28] शिवासीं सहवसति जसी, कीं सतीसीं[29] धवासीं[30]. ॥ ३०
विदेहांचा[31] राजा जनक सुकृती[32] होय विगद[33],
प्रभूच्या[34] शिष्यत्वें कुरुकुळपती[35] होय सगद[36]; ।

---

१. आपली प्रतारणा. २. सर्व योग्यांस वंद्य जो राम त्याला. ३. भजकांचें प्रिय करणारा जो ईश्वर (कृष्ण) त्याचें अनुमत. ४. सहन करी, मानी. ५. या श्लोकांत 'के' या अक्षराची वारंवार आवृत्ति झाली आहे म्हणून हा अनुप्रासालंकार होय. ६. स्वभक्ताचें पाप. ७. तोले. ८. समुद्र. ९. ग्रीष्मकाळांत. १०. ईश्वरकृत संकेतास. ११. कल्याणास. १२. बळराम. १३. क्षमा (पृथ्वी) रमा (लक्ष्मी) यांचा पती कृष्ण यास. १४. द्वारकेस. १५. हे कृष्णा. १६. खरें बोलत असशील तर. १७. शतधनु यत्करीं (ज्याच्या हातीं) मणी देता झाला त्याही नरीं दंड न धरीं. १८. पोटच्या मुलाचा. [कुक्षी+उद्भव=कूस+जन्म.] १९. मुक्ति, मोक्ष. २०. या श्लोकांत 'हा' आणि 'सीं' या अक्षरांची आवृत्ति आहे म्हणून यांत अनुप्रासालंकार झाला आहे. २१. अमर्याद. २२. जनकास. २३. स्वर्गपदाची इच्छा. [स्वः+पद+ईहा=स्वर्ग+स्थान+इच्छा.] २४. उत्तम वसतिस्थानांत. २५. भ्रमर, भुंगा. २६. कमळांत. २७. सुरभि, सुवासयुक्त. २८. कुबेराशीं. २९. पतिव्रतेशीं. ३०. भर्त्याशीं. ३१. विदेहदेशाचा. ३२. पुण्यवान्. ३३. हृद्रोगरहित. ३४. रामाच्या. ३५. दुर्योधन. ३६. गदायुद्धनिपुण. [दुर्योधन बळरामापाशीं गदायुद्ध शिकला—या गोष्टीकडे कविकटाक्ष आहे.]

जसा ज्याचा काम स्वरगम[1] तसा त्यास फळतो,
कृपा त्या दोघांही वरि करि कृपासिंधु बळ[2] तो. ॥ ३१

येऊनि द्वारकेला यदुरमण[3] म्हणे, 'सत्यभामे! प्रयत्न
स्वांगें केला हि, मेला शतधनुहि, परि प्राप्त झालें न रत्न. ।
आलों मी मात्र मागें, सुदति! विदित हें तूज व्हाया, न आर्य[4]
त्वत्संकोचेंचि आला, करिलचि उरलें तो प्रभु क्षिप्र[5] कार्य.' ॥ ३२

वंचूनिही[6] न चित्तातें[7] दुखवी, सुखवी प्रिया[8], ।
सत्राजिताची भगवान् बरवी करवी क्रिया[9]. ॥ ३३

शतधनुवधवार्ता ऐकतां तो पळाला
कुमतिद[10] कृतवर्मा, धैर्य कैंचें खळाला ?।
प्रिय[11]हरिगुणरत्न क्षिप्र देवापगेला[12]
त्यजुनि सकळ[13] सत्वश्रद्ध[14] अक्रूर गेला[15]. ॥ ३४

दैवें भागवताला[16] त्या भेटली अमृतप्रपा[17] ।
ब्रह्याचीही पुरी[18] होय जीस[19] पाहोनि सत्रपा[20]. ॥ ३५

---

१. कल्पतरु. [स्वः+अगम=स्वर्ग+वृक्ष.] २. बळराम. ३. कृष्ण. ४. ज्येष्ठ बंधु बळराम. ५. लवकर. ६. वंचनाकरूनही. ७. रामाच्या व रुक्मिणीच्या चित्तास. ८. या पद्याचें वृत्त 'अनुष्टुभ्' आहे. याचें लक्षण आणि विवेचन श्रीक्षेमेंद्रकृत 'सुवृत्ततिलकां'त आहे, तें येथें उतरून घेतों:— 'पंचमं लघु सर्वेषु सप्तमं द्विचतुर्थयोः । गुरु षष्ठं च सर्वेषामेतच्छ्लोकस्य लक्षणम् ॥१४॥ असंख्यो भेदसंसर्गादनुष्टुप्छन्दसां गणः । तत्र लक्ष्यानुसारेण श्रव्यतायाः प्रधानता ॥१५॥' (सुवृत्ततिलक-प्रथम विन्यास.) 'अनुष्टुप्छंदसां भेदे कैश्चित्सामान्यलक्षणम् । यदुक्तं पंचमं कुर्याल्लघु षष्ठं तथा गुरु ॥४॥ तत्राप्यनियमो दृष्टः प्रबंधे महतामपि । तस्मादव्यभिचारेण श्रव्यतैवगरीयसी ॥५॥' (सुवृत्ततिलक—द्वितीय विन्यास.) या श्लोकांचा भावार्थ:—अनुष्टुप्छंदच्या प्रत्येक पादांत पांचवें अक्षर लघु असावें, द्वियीय आणि चतुर्थ पादांत सातवें अक्षर लघु, सर्व पादांमध्यें सहावें अक्षर गुरु. या छंदाचे असंख्य प्रकार आहेत आणि मोठमोठ्या ग्रंथकारांच्या काव्यांत अनियम आढळतो, तथापि सर्व पादांत पांचवें अक्षर लघु आणि सहावें गुरु हें सामान्यलक्षण आहे. कानांस गोड लागणें (सुखश्रव्यता) हीच या छंदाची मुख्य कसोटी होय. ९. पारलौकिकक्रिया. १०. दुष्ट मसलत देणारा. ११. हरीचे गुण हींच रत्नें ज्याला प्रिय असा अक्रूर. १२. देवाच्या गंगेला. (भागीरथीला.) १३. गृहादि. १४. सात्विकी श्रद्धा धरणारा. १५. पळून गेला. १६. भगवद्भक्ताला. (अक्रूराला.) १७. मोक्षाची पोंवई. [अमृत=मोक्ष. 'अमृतं यज्ञशेषे स्यात् पीयूषे सलिले घृते । अयाचिते च मोक्षे च ना धन्वंतरिदेवयोः ॥ 'इति मेदिनी.] १८. कैलासपर्वतावरील ब्रह्मदेवाची नगरी. १९. ज्या काशीस. २०. सलज्ज.

[1]ज्याचा [2]आकल्प [3]आशीविष, [4]भंजक हरिब्रह्मशक्राग्नि[5]पाशी,
निर्मी[6] पाळीहि नाशी सहज भुवन जो सच्चिदानंदराशी, ।
काळव्याळाहि [7]शासी, फुकटचि [8]अणिमाद्या जयाच्या स्वदासी,
ऐसा जेथें [9]मिरासी, [10]निरखि असि महापुण्य अक्रूर काशी. ॥ ३६
जेथें मोक्ष पिके [11]समर्घचि सदा, सर्वत्र [12]अल्पें [13]विके,
[14]कोकांचेहि [15]निके विलास म्हणति ज्ञाते, सुरांचे [16]फिके, ।
शक्राला घटिकेमधेंचि भय दे जो रंक[17] [18]तेथें टिके,
तीर्थक्षेत्र शिके जिचा [19]गुण बरा, त्या पावला काशिके. ॥ ३७
[20]साध्वी ईशें[21] स्वचित्तीं समजति, नमिती, पूजिती [22]जो वरीती,
[23]मातेचा [24]तात [25]सिंधु प्रथितचि [26]जलधी [27]जी वरी नोवरी ती, ।
शुद्धा कैसी? परंतु त्रि[28]जगदघ हरी चित्र[29] हें, पुण्य संगा
[30]जीच्या सोडीचना [31]श्रीपतिपददुहिता [32]शंभुकांताहि गंगा. ॥ ३८
आराधी [33]आशुतोषा [34]जगदघशमना [35]भूतपा [36]दानयज्ञ-
स्वाध्यायांही, विधिज्ञ[37] प्रणति करि सदा [38]तज्ज्ञपादा नयज्ञ, ।
[39]तत्कीर्तीनें [40]प्रियाली म्हणउनि कथिलें वृत्त हें द्वारकेला,
स्त्री कैसें गुह्य रक्षी? प्रकट मग तिणें मंत्र[41] तो फार केला. ॥ ३९

---

१. ज्या विश्वेश्वराचा. २. भूषण. ३. सर्प. ४. सेवक. ५. वरुण. ६. ब्रह्मविष्णुहररूपांनीं यथानुक्रम सृष्टिस्थितिसंहार करणारा. (विश्वेश्वर.) 'ब्रह्मत्वे सृजते लोकान् विष्णुत्वे पालयत्यपि । रुद्रत्वे संहरत्येव तिस्रोऽवस्थाः स्वयंभुवः ॥'. ७. शिक्षा करी. ८. अणिमा, लघिमा, प्राप्ति, प्राकाम्य, महिमा, ईशिता, वशिता, आणि कामवशायिता अशा आठ सिद्धी. ९. वतनदार. ['मिराशी' हा आरबी शब्द आहे.] १०. पाही. ११. स्वस्त किंवा विपुल. १२. अल्पकृत्यानें. १३. मिळतो. १४. काशींतील कावळ्यांचे. १५. चांगले. १६. न्यून. १७. पामरजन. १८. वाराणसींत. १९. पावनत्वादि. २०. पतिव्रता. २१. स्वामी, ईश्वर. २२. ज्याला वरतात त्याला. २३. लक्ष्मीचा. २४. जनक. २५. समुद्र. २६. लडयोः सावर्ण्यात् जडधी, मंदबुद्धि. २७. दौहित्री जी गंगा नोवरी वरी ती गंगा. गंगा ही विष्णुकन्या; विष्णूची स्त्री लक्ष्मी, तिचा पिता समुद्र हा गंगेचा पति, म्हणजे गंगा ही लक्ष्मीजनकाची (सागराची अर्थात् मातामहाची) पत्नी होते. २८. त्रैलोक्याचें पाप. २९. आश्चर्य. ३०. ज्या काशीच्या संगा. ३१. विष्णूच्या पायांची कन्या. ३२. शिवाची प्रिया. ३३. शिवाला. ३४. जगताच्या अघाचा (पापाचा) नाश करणाऱ्याला. ३५. भूतपति. ३६. दान, यज्ञ आणि स्वाध्याय (वेदाध्ययन) यांहीं आराधी. ३७. विधिज्ञ आणि नयज्ञ असा अक्रूर. ३८. गुरुपादा. ३९. अक्रूराच्या कीर्तीनें. ४०. प्रियसखी. ४१. गुह्यगोष्ट.

नामें दानपती जयासि म्हणती अक्रूर, तो [1]सद्व्रती-
क्षेत्रीं जो वसती करी शुभमती, कीं [2]यज्ञयज्ञाप्रती, ।
[3]स्वर्णाच्याचि [4]अतिप्रशस्त सुकृती वेदी रची हें यती
ज्ञाते [5]संप्रकृती असेंचि वदती [6]त्या रत्न दे श्रीपती. ॥ ४०

हें ऐके [7]सत्यभामा, निजहृदायें म्हणे, '[8]वंचका! सत्य [9]नामा,
कृष्णा! तूं धन्य, रामा [10]गुरुसि ठकविसी, तेथ हे काय [11]भामा? ।
[12]वामाप्रेमा रिकामा, '[13]वैरिवरिच करूं जाणसी संधि सामा,
रे [14]धूर्तांच्या [15]ललामा! तुज अधिक असा [16]क्रूर काका न मामा.' ॥ ४१

बोले राम, '[17]क्रतूंत [18]प्रचुर उधळितो सर्वदा हेम[19], [20]नाहीं
अक्रूरें वित्त नेलें, न पुसत पळतां मानिलें हे मनाहीं; ।
लोकाला कोण वारी, विधि[21]गति न कळे, ताप दे वाद, [22]हानी
भामाप्रेमा न हो, कीं [23]मणिदचि गणिलें वासुदेवा दहानीं. ॥ ४२

संसारांत असे, असें जरि [24]दिसे अक्रूर काका [25]नसे,
अर्थें हानि कळे, पळे, [26]उबगले ते साधु लोभी कसे? ।
मी येथें नव्हतों, 'हरि [27]प्रियतमाहृत्सांत्वनव्यग्र,' जें
लोकांचें म्हणणें मृषा, परि उगें म्यां सोसिजे अग्रजें.' ॥ ४३

कोणी अक्रूर लोभी म्हणति न कळतां तत्व अत्यंत खोल,
ज्ञात्याला ईश्वराचें चरित सुखवि हें ऐकतां येति डोलें[28], ।
प्रेमानें सत्यभामाप्रियकर [29]बळहि [30]स्वानुजा लावि बोल,
स्पष्ट ज्ञानी मणीचें करितिच हरिच्या सद्यशाचें न मोल. ॥ ४४

---

१. सद्व्रतीचें क्षेत्र काशी. २. प्रत्येक यज्ञांत. ३. सोन्याच्या. ४. मोठाल्या. ५. लोकांसहित. ६. अक्रूराला. ७. श्लोक ४० वा व ४१ वा यांत अनुक्रमें 'ति' आणि 'मा' या अक्षरांची आवृत्ति वारंवार झाली आहे म्हणून हा अनुप्रासालंकार होय. ८. हे ठका. ९. वंचक हेंच तुझें खरें नाम अशा. १०. वडिल भावास. ११. मी स्त्री. १२. स्त्रीवरचा प्रेमा. (वामा=स्त्री, नारी.) १३. मनांतून नव्हे. १४. शठांच्या. १५. रे वंचकशिरोमणे. १६. तुला काका मामा अधिक नाहीं असा तूं क्रूर. १७. यज्ञांत हेम उधळितो. १८. पुष्कळ. १९. सोनें. २०. अक्रूरें वित्त नेलें नाहीं. २१. दैवगति. २२. भामेच्या प्रेमाला हानि न हो. २३. अक्रूराला मणि देणारा. (कृष्ण.) २४. संसारांत आहे असा अक्रूर दिसतो, पण तसा खरा नाहीं. २५. संसारांत नसे. २६. कंटाळले. २७. प्रिया सत्यभामा तिच्या सांत्वनाविषयीं उद्युक्त. २८. शिरःकंप. २९. रामही. ३०. कृष्णाला.

[1]अंतर्यामी म्हणे, 'हें [2]कुतुक करुं बरें, [3]साधुची ज्यांत [4]थोरी,
चोरी भक्तास माझ्या तरि [5]सुरधुनि मत्कीर्तिहूनीहि गोरी, ।
मातें प्रार्थूत हे कीं 'कुशलगुण भला पूज्य [6]तो आणवा, हूं'
तेव्हां आम्हीं म्हणो स्वप्रिय न पळविला कां असी आण वाहूं.'॥ ४५
स्वप्नींही [7]स्वाश्रितातें निजमुख न कदा [8]ज्यांतुनी एक दावी,
[9]इच्छा त्यांच्या अरिष्टांप्रति [10]कुतुकसुधासिंधुची एकदा वी, ।
[11]आनर्तीं प्रजांच्या बहुविध वसती तापचित्तीं [12]शरीरीं,
[13]सद्वृक्षांच्या वसंतें नवलचि रचिलें याचि राष्ट्रीं [14]करीरीं. ॥ ४६
जे ज्ञाते वृद्ध ते ते प्रभुसि म्हणति कीं, 'राष्ट्र हें त्या वरिष्ठें
अक्रूरें टाकिलेंसे म्हणुनि बहुविधें येथ आलीं अरिष्टें; ।
ज्या ज्या देशास सोडी दिनकर वरिती त्या [15]तमोघूकरक्षो-
भूतव्रात प्रसिद्ध त्वरित हरि [16]तया आणि हा लोक रक्षो. ॥ ४७
अक्रूरा हीं अरिष्टें सकळ चळचळां कांपती, जेंवि साप,
[17]स्वापद्धेतु द्विजेंद्रा, [18]हरिस गज, [19]गुरूपासकास [20]त्रिताप, ।

---

१. मनांत. "'अंतर्याम'—या शब्दाचा अर्थ 'हृदय' 'अंत:करण' असा आहे; जसें 'अंतर्याम कळकळल्यावांचून असा उद्गार निघायचा नाहीं,' 'अंतर्यामीची गोष्ट सहसा कोणाशीं प्रगट करूं नये,' 'ज्याचें मन त्याला अंतर्यामीं साक्ष असतें.' आतां लोकभाषेंत इतका गाढतर रूढ झालेला जो हा वरील शब्द याच्या स्वरूपाचा जर विचार केला तर ध्यानांत येईल कीं, धड शेंडा ना बुडखा अशासारखा हा शब्द आहे. संस्कृतांत 'अंतर्यामी' हें 'अंत:' (आंत) व 'यामी' (गमन करणारा) असें सिद्ध झालेलें विशेषण आहे. याचा अर्थ 'अंतर्गत,' 'आंतला' असा आहे; जसें 'हृदयांतर्यामी परमेश्वर' 'शरीरांतर्यामी ज्वर' इत्यादि. मराठी भाषेंतही असें म्हणतात कीं 'वर दिसत नाहीं तरी याच्या अंतर्यामीं ताप आहे.' येथें वरील संस्कृत प्रयोगाप्रमाणेंच 'अंतर्यामी'शब्दाचा मूळचा प्रयोग होता;. पण पुढें लोकांचा असा समज होत गेला कीं, 'अंतर्यामी' हें विशेषण नसून सप्तम्यंत नाम आहे, तेव्हां अर्थातच 'अंतर्याम' असें प्रतिपदिक पुढें सिद्ध झालें." (निबंधमाला अंक ४३.) २. कौतुक. ३. अक्रूराची. ४. प्रतिष्ठा. ५. देवापगा, देवनदी, गंगा. ६. अक्रूर. ७. कृष्णाश्रितांतें. ८. ज्या अरिष्टांतून एकही अरिष्ट आपलें मुख दाखवीत नाहीं. ९. कृष्णाची इच्छा. १०. कौतुकामृतसागर जो कृष्ण त्याची इच्छा त्या त्या अरिष्टांस वी (प्रसवे). ११. आनर्त देशांत. १२. प्रजांच्या चित्तीं आणि शरीरीं बहुविध ताप वसती. १३. साधुरूप वृक्षांचा वसंत जो कृष्ण त्यानें. १४. हें राष्ट्र हाच करीरवृक्ष त्याचे ठायीं नवलचि रचिलें. (वसंतऋतु सर्व वृक्षांस पल्लव देतो पण करीरास कांहींच देत नाहीं तद्वत् या राष्ट्रास मात्र अरिष्टें प्राप्त झालीं.) १५. अंधकार दिवांधपक्षी राक्षस पिशाच यांचा समुदाय. १६. अक्रूराला. १७. सर्पांच्या विपत्तीस कारण जो द्विजेंद्र (गरुड) त्यास. १८. सिंहास. १९. गुरूची उपासना करणारास. गुरुभजकास जसे तीन ताप कांपतात. २०. आधिदैविक, आध्यात्मिक आणि आधिभौतिक असे तीन प्रकारचे ताप.

बा! [1]पद्माक्षा! **बळाला हरि!** तुजहि [2]गळद्धैर्यघर्मांबुचाप-
क्ष्मापच्छद्मासुरांचें अमित कटक, कीं **राम**नामास [3]पाप. ॥ ४८
वर्षेना **का**शिदेशीं [4]घन बहुदिन ते, दे [5]अनावृष्टिजन्या
पीडा, याहूनि ताप प्रबळ [6]जवळिल्या दुःख देशा न अन्या; ।
दे [7]**का**शीश [8]**श्व**फल्का विनवुनि जयिं तो **गां**दिनी नाम कन्या,
वर्षे तेव्हांचि तेथें [9]सुरपति असि हे या जगीं कीर्ति धन्या. ॥ ४९
देता झाला [10]**रो**मपाद [11]स्व**शां**ता पुत्री जैसी [12]ऋष्यशृंगा [13]प्रशांता; ।
**का**शीश श्री**गां**दिनीनाम कन्या, तैसी तैशा दे **श्व**फल्काहि धन्या. ॥ ५०
हा **अ**क्रूर **श्व**फल्का समुचित सुहृदानंद [14]संतान, दीपा-
पासूनी दीप, किंवा [15]अमृतकर [16]जगत्तापहंता [17]नदीपा. ।
[18]हा! गेली दूर [19]दृष्टि त्यजुनि तुज [20]विभो! हे चुकी फार मोटी,
जैसा तूं **शौ**रिपुत्र प्रथितगुण वृथा काय दृष्टांत कोटी?' ॥ ५१
ऐसें ऐकुनि आप्तभाषित तदा ते सर्व [21]शोकागद
स्वामी भक्तसहाय **कृ**ष्ण भगवान् **वैं**कुंठ तो [22]कागद, ।
[23]प्रेषी आणवि [24]जाणवि [25]स्वभजका आलिंगितां राहणें,
दूर क्लेशचि साहणें, निरखणें, [26]मोदामृतीं नाहणें. ॥ ५२

---

१. हे कमललोचना हरि. २. गळालें आहे धैर्य, घर्मांबु आणि चाप ज्यांचे असे कपटानें राजे झालेले दैत्य त्यांचें कटक. ३. रामनामाला पाप जसें कांपतें. ४. मेघ. ५. अनावृष्टीनें झालेली. ६. जवळच्या. ७. काशीपति. ८. तन्नामकयादवास. श्वफल्क हा अक्रूराचा जनक. याचें पूजन करून काशीराजानें आपली गांदिनी नामक कन्या दिली, तेव्हां काशींत अनावृष्टि बंद होऊन वृष्टि झाली, व सर्वत्र सुभिक्ष झालें अशी कथा आहे. ९. इंद्र. १०. रोमपाद (लोमपाद) हा अंगदेशाचा राजा. याच्या देशांत सुदारुण अनावृष्टीच्या योगानें लोक त्रासून गेले, तेव्हां यास काळजी पडली. यानें विप्रांच्या विचारानें संकटनिरसनार्थ आपली शांता नांवाची मुलगी विभांडक मुनिपुत्र ऋष्यशृंग याला विवाहविधीनें दिली, तेव्हां अनावृष्टि दूर झाली, अशी कथा आहे. (रामायण—बालकांड सर्ग ९ पहा.) शांता ही दशरथाची मुलगी असून तिला मित्रभावास्तव लोमपादाला दिलें असेंही वर्णन आहे. ११. शांता नामक आपली कन्या. १२. कश्यपाचा पुत्र विभांडक आणि विभांडकाचा ऋष्यशृंग. (रामायण—बालकांड सर्ग ९ श्लोक ३ पहा.) १३. शांतिसंपन्न. १४. पुत्र. १५. चंद्र. १६. जगताचा ताप नष्ट करणारा. १७. समुद्रास. १८. खेदोद्गार. १९. दृष्टांत देण्याविषयींची दृष्टि. २०. हे कृष्णा. २१. शोकरोगाचें औषध. २२. लिखितपत्र. २३. पाठवी. २४. कळवी. २५. अक्रूराला. २६. आनंदसुधेंत.

कवळी बाहुयुग्मानें सन्मानें, मोद देव दे, ।
जवळीच सभेमध्यें बैसवूनि असें वदे. ॥ ९३

'[1]काका! [2]राकापती तूं [3]तृषितनिजसुहृद्वृंदचक्षुश्चकोरां,
बापा! [4]तापापहंता [5]घन अघनगुणा हर्ष या देसि मोरां; ।
काशी राशी सुखाची खरि न विसरतां [6]अन्यथा पोष्यवर्गा,
साची प्राचीन मैत्री म्हणउनिच तुम्हां सोडवेनाचि [7]भर्गा. ॥ ९४

साधो! जेथें वसाल [8]स्वसुकृत सचिवकृतसाहित्य सर्व,
[9]प्रह्व [10]द्रव्येश मुख्य [11]त्रिदशपति [12]जया [13]तो स्मशानीं न शर्व; ।
आम्हांला मात्र [14]युष्मद्विरहतपन हा तापद, स्वैर [15]वांचों,
जातों येतों म्हणेही विधु तरि [16]न तगे धीर त्या [17]कौरवांचा. ॥ ९५

सत्क्षेत्रीं पूजिला तो [18]स्वसुकृतकुसुमीं श्रीमहेश, [19]क्रतूतें,
ऐकों केलें असें कीं [20]सदिगधिप जया आठवी शक्र तूतें, ।
[21]हेमांचे सर्व कांहीं बहुजन म्हणती वेदिकापात्र[22]यूप
स्तंभ स्वर्णासि नाहीं [23]मिति, अति कुतुकें वर्णिती हेचि भूप. ॥ ९६

क्षेत्रीं पात्रीं विधीनें करिति [24]तुजअसे सुज्ञ वित्तव्ययातें,
ज्ञाते जे तेचि [25]एवंविधगुण म्हणती सर्वथा [26]भव्य [27]यातें; ।
या कर्मीं जो सहाय प्रियसख मणि तो भेटवा [28]ज्यासि पात्र,
[29]स्वेच्छाचारा! यदूंत प्रथित समगुण स्पष्ट तूं एक मात्र. ॥ ९७

जाणों पूर्वींच आम्हीं मणि शतधनुनें ठेविला तूजपासीं,
आहे हस्तींच कीं तूं न इतर जरिही तात होता प्रवासीं; ।
[30]मांमाला पुत्र नाहीं म्हणउनि धन तें होय [31]दौहित्रदाय,
प्रेक्षूं तूं मात्र पात्र, प्रकट धरिल [32]त्यां दुर्धरा अन्य काय? ॥ ९८

---

१. हे अक्रूरकाका. २. राकेचा (पौर्णिमेचा) पति=चंद्र. ३. तृष्णाकुळ जे स्वकीय मित्रसमुदायाचे नेत्र तेच चकोरपक्षी त्यांस. ४. तापाचा नाश करणारा. ५. तूं मेघ आहेस. ६. जर सुखाची राशी नसती तर. ७. शिवाला. ८. स्वकीय पुण्यच सहाय त्यानें पुरविलेलें साहित्य. ९. नम्र. १०. कुबेर. ११. इंद्र. १२. ज्या शिवाला. १३. तो शिव. १४. तुमचा वियोग हाच सूर्य. १५. खुशाल असा. १६. न राही. १७. चंद्रविकासी कमलांचा. १८. पुण्यरूप पुष्पांनीं. १९. यज्ञातें. २०. लोकपालांसहित शक्र. २१. सुवर्णाचे. २२. यूप=यज्ञस्तंभ. २३. गणती. २४. तुजसारखे. २५. अशा प्रकारचे गुण ज्यांत आहेत तें. २६. कल्याण. २७. अशा वित्तव्ययातें. २८. ज्या मणीस. २९. हे सदाचारा. ३०. सत्राजिताला. ३१. कन्येच्या पुत्राचें (दौहित्राचें) धन (दाय) होय. ३२. त्या मणीतें.

आम्हीं रामादि बंधु स्वजन मणिस त्या पाहुनि [1]त्यक्तभेद
प्रेमें नादों, सुवस्तु स्व[2]समुचित पदीं अर्पितां दे न खेद[3];' ।
ऐसें ऐकोनि होतें जवळिच [4]सुपटीं वेष्टिलें [5]रत्न सोडी,
अक्रूर [6]प्राप्तचिंतामणिहरिपद, त्या काय हे फार [7]जोडी? ॥ ५९
आम्हां दासांसि [8]पाहो म्हणुनि [9]जपतपोयज्ञ दैत्यादि यत्नी,
ब्रह्मादि [10]श्री असि ते पदभजन करी नित्य होऊनि पत्नी; ।
हे कोठें? काय त्याला सहज मिळविला मोक्ष ज्याच्या सपत्नीं,
प्रेमें ठेवी [11]वदान्य प्रभुवर हरि तो रत्न तें [12]भक्तरत्नीं. ॥ ६०
[13]दयामृतघन श्रीमान् कृष्ण लक्ष्मीपती हरी ।
करी भक्त मयूरातें सुखी, [14]हृत्ताप [15]संहरी. ॥ ६१

---

## अध्याय अठ्ठावन्नावा.

(श्लोक.)

[16]इंद्रप्रस्थासि गेला अमृतघन हरी एकदा, यासमोर
प्रेमें आले पृथेचे [17]सुत सकळहि ते, हर्षले दास [18]मोर; ।

---

१. गतवैमनस्य. २. योग्यस्थानीं. ३. हा चरणभाग सुभाषितरूप आहे. ४. उत्तम वस्त्रांत. ५. रत्न–'जातौ जातौ यदुत्कृष्टं तद्रत्नमभिधीयते'. (नीलकंठ–भारतभावदीप.) ६. प्राप्त आहे चिंतामणिरूप हरिपद ज्याला असा. ७. लाभ, प्राप्ति. हा लाभ फार नव्हे–असा फलितार्थ. ८. लक्ष्मी आम्हांकडे पाहो. ९. 'करितात' या क्रियापदाचा येथें अध्याहार समजावा. १०. लक्ष्मी. ११. उदार. ['वदान्य' या विशेषणानें भगवंताच्या भक्तवरदत्वगुणाचा बोध होतो.] १२. भक्तश्रेष्ठ जो अक्रूर त्याजपाशीं. १३. दयारूप अमृतानें भरलेला घन (मेघ, ढग). [केकावलि १२१.] १४. हृदयाचा ताप. १५. नाहींसा करी. हा अध्याय येथें समाप्त झाला म्हणून पूर्वकालीन कविजनांच्या संप्रदायास अनुसरून शेवटचा श्लोक निराळ्या वृत्तांत लिहिला आहे. १६. इंद्रप्रस्थ–हिंदुस्थानाच्या उत्तरेकडे दिल्ली म्हणून यमुनेच्या कांठीं जें प्रसिद्ध शहर आहे त्याच ठिकाणीं भारतीयुद्धांत प्रसिद्धीस आलेलें इंद्रप्रस्थ नांवाचें शहर होतें. या शहराच्या सभोंवार खांडवप्रस्थ नांवाचें अरण्य होतें. पांडवांचा आपल्या मुलांबरोबर कलह होऊं नये, म्हणून धृतराष्ट्रानें, 'या ठिकाणीं शहर वसवून राहा,' असें पांडवांस सांगितलें. पुढें पांडवांनीं तें शहर वसविलें व त्याची रचना सर्वोत्कृष्ट झाल्यामुळें, त्याला 'शक्रप्रस्थ' असेंही म्हणूं लागले. भारतांतील प्रसिद्ध गोष्टी ज्या मयासुरसभा आणि राजसूययज्ञ, त्या याच ठिकाणीं घडल्या. हस्तिनापुराप्रमाणें इंद्रप्रस्थ हेंही कुरुदेशाच्या राजधानीचें शहर होतें. (भरतस्थलादर्श–पृ० ३१.) (मुक्तेश्वरकृत आदिपर्व–अध्याय ४६ ओंव्या १-२० पहा.) १७. पांडव. १८. हरी अमृतघन म्हणून दास मोर होत असें जाणावें.

आलिंगी अर्जुनातें, [1]यम नमिति पदें, धर्मभीमासि वंदी,
[2]शिष्टाचारप्रवीण प्रभु म्हणुनि यशें वर्णिती [3]वेद बंदी. ॥ १

गृहासि आला भेटाया चंद्र [4]हो, ते [5]चकोर कीं, ।
वसंत हा, ते [6]माकंद, स्पष्ट [7]रोमांचकोरकीं. ॥ २

[8]कृष्णा कृष्णास वंदी प्रथम सुसमयीं धावुनी, दीन [9]वोढा
भेटे निःशंक गंगेप्रतिहि, तसिच त्या [10]मांउलीला [11]नवोढा, ।
पूजी आधीं [12]दृगब्जीं, चरण मग [13]शिरःपाणिपद्मीं वधू ती,
[14]सांधूंची [15]अश्रुनीरें [16]तदनु [17]धव तिचे [18]पादराजीव [19]धूती. ॥ ३

म्हणे, 'मातें वंदा, त्वरित [20]अघवृंदा हरिन मी,'
स्वयें तो विश्वाचा गुरुवर पृथेला [4]हरि नमी; ।
खमातेला तैसा सुखकर [21]परिष्वंगहि [22]वरें
त्रिलोकीचा दे, ये [23]जनकभगिनीला गहिवर. ॥ ४

पुसे कुशल जेधवां प्रभु, तया पृथा ते म्हणे,
'[24]अगा ! [25]प्रणतवत्सला ! [26]सकळवृष्णिचूडामणे ! ।
तयीं च कुशली असे, जन सनाथ हा निश्चयें,
कृपा करुनि धाडिला जइं मदीय [27]बंधु स्वयें.' ॥ ५

---

१. नकुल सहदेव. २. सभ्यसंप्रदायनिपुण. ३. वेद हेच वंदी (स्तुतिपाठक). ४. कृष्ण. ५. चकोरपक्षी. (पांडव.) ६. आम्रवृक्ष. ७. रोमांच हेच कोरक (कळ्या) त्यांच्या योगानें. ८. द्रौपदी. ['कृष्णः सत्यवतीपुत्रे वायसे केशवेऽर्जुने । कृष्णा स्याद्द्रौपदी नीली पिप्पलीद्राक्षयोरपि ॥ मेचके वाच्यलिंगः स्यात्क्लीबे मरिचलोहयोः' इति विश्वः ॥ 'कृष्णः काके पिके वर्णे विष्णौ व्यासेऽर्जुने कलौ । कृष्णा तु नील्यां द्रौपद्यां पिप्पलीद्राक्षयोरपि ॥ कृष्णं तु मरिचे लोहे' इति हैमः.] ९. अल्पसरिता. १०. आईला. उपास्य देवतेचा स्त्रीलिंगेंकरून जो येथें निर्देश केला आहे तो प्राकृत व संस्कृत कवींच्या संप्रदायास अनुसरून आहे. 'विठाई' 'विठाबाई' अशीं संबोधनें सुप्रसिद्ध आहेत. ११. नुकतीच (पांडवांनीं) वरलेली. [नवोढा=नवकारिका=नूतन लग्न झालेली स्त्री, नवरी. 'नवोढायां स्नुषायां च जायायां युवतौ वधूः' इति लिंगाभट्टः.] १२. नेत्रकमलांनीं पूजी (अवलोकन करी). १३. शिरःकमल आणि हस्तकमल यांनीं चरण पूजी. १४. पांडवांची. १५. बाष्पोदकें. १६. तदनंतर. १७. भर्ते, पति. १८. पादकमल. १९. न्हाणिती. २०. पापसमूहास. २१. आलिंगन. २२. त्रिलोकीचा वर=त्रैलोक्यनाथ. (कृष्ण.) २३. कुंतीला. [जनकाच्या–बापाच्या–भगिनीला=कुंतीला.] २४. 'अगा' हें करुणार्थी संबुद्धिदर्शक अव्यय होय. २५. प्रणत (नम्र) असे जे भक्त त्यांजविषयीं कनवाळू. [केकावलि ९ पहा.] २६. समस्तयादवशिरोमणे ! २७. अक्रूर.

युधिष्ठिर म्हणे, 'अहो[1]! सकळचिंतितप्रापण[2]!
क्षणांत[3], न कळे कधीं सुकृत[4] जोडिलें आपण[5]; ।
यदंघ्रिकमळेक्षणा[6] करुनि योगही[7] कष्टती[8],
दिसे विषयलालसा[9] परमसिद्धि विस्पष्ट[10] ती, ॥ ६

राहे वार्षिक[11] चारमास भगवान् तेथेंचि[12], अत्यादरा
भक्ताच्या वश होय, जो हरि हरी नामें असत्या दरा[13], ।
दोघे कृष्ण[14] रथीं बसोनि मृगयाकामें[15] वना एकदा
गेले, पर्व म्हणोनि मेध्यमृग[16] जे त्यां मारिती ते तदा. ॥ ७

भृत्यांहातुनि[17] धाडिले मृग पुरीं[18], त्यांच्या निरोधा[19] वनें-
क्षोणीमंडळ[20] हिंडले, बहु तिहीं केलें वनीं धांवन[21]; ।
लागे फार तृषा तया यदुवरा[22] गांडीवचापा[23], वनें[24]
अंभाच्या[25] तनयातटीं[26] उतरुनी ते प्राशिती[27] पावन[28]. ॥ ८

---

१. आश्चर्य. २. सर्वचिंतितमनोरथप्राप्ति करून देणारे. ३. अकस्मात्. ४. पुण्य. (अध्याय ५८ श्लोक ११ पहा.) ५. आम्हीं. (विषयासक्त असे जे आम्ही त्यांनीं.) ६. ज्या कृष्णाच्या पादकमलाच्या दर्शनाकरितां. ७. योगाभ्यास करूनही. ८. मुनी कष्ट पावतात. ९. विषयासक्ताला. १०. कृष्णचरणदर्शनरूप. ११. पर्जन्यकाळचे. १२. इंद्रप्रस्थनगरीं, पांडवगृहीं. १३. भयातें. १४. कृष्ण आणि अर्जुन. १५. मृगया करण्याच्या इच्छेनें. १६. कर्मार्हपशु व्याघ्र सूकर महिष हरिणादिक मेध्य पशु. १७. सेवकांबरोबर. १८. नगरांत धर्मासाठीं मृग धाडून दिले. १९. त्या मृगांचा निरोध (कोंडणें) करण्यासाठीं. २०. वनसंबंधी भूमिभाग. २१. धांवणें. २२. कृष्णाला. २३. अर्जुनाला. (गांडीव चाप आहे ज्याचें त्याला.) गांडीव नामक धनुष्याची कथा अशी आहे:—हें अग्नीनें वरुणापासून मागून घेऊन, (महाभारत—आदिपर्व, अध्याय २२५ श्लोक १-९) अर्जुनास दिलें. वीरांच्या धनुष्यांस निरनिराळीं नांवें होतीं असें दिसतें:—कर्णाचें 'कालपृष्ठ', अभिमन्यूचें 'रौद्र'. या गांडीव धनुष्याचें वर्णन विराटपर्वांत (अध्याय ४३ श्लोक १-७) केलें आहे, तें असें:—विराटपुत्र उत्तर आणि बृहन्नला यांचें संभाषण चाललें असतां बृहन्नला उत्तरास म्हणते:—हे उत्तरा! तूं मला विचारलेंस, तें हें अर्जुनाचें गांडीव नामक धनुष्य आहे. हें शत्रूचा संहार करण्यास समर्थ आहे; हें लोकांमध्यें प्रसिद्ध आहे; हें सर्व आयुधांहून उत्कृष्ट आहे; हें सुवर्णालंकृत आहे; हें अर्जुनाचें गांडीव नामक धनुष्य मोठें प्रबळ आयुध आहे; याला एक हजार धनुष्यांचें बळ आहे; हें राष्ट्राचा उत्कर्ष करणारें आहे; या धनुष्यानें पार्थ देवांना आणि मनुष्यांना रणामध्यें जिंकतो; हें अनेक प्रकारच्या रंगांनीं चित्रविचित्र केलेलें आहे; हें सडसडीत बारीक आहे, हें लांब व अविद्ध आहे; देवांनीं आणि दानवांनीं याची पूजा सतत अनेक वर्षें केली आहे; पूर्वीं हें धनुष्य एक हजार वर्षें ब्रह्मदेवानें धारण केलें; प्रजापतीनें पांचशें तीन वर्षें; इंद्रानें पंचायशीं वर्षें; सोमदेवानें पांचशें वर्षें, व वरुणानें शंभर वर्षें, धारण केलें; साडेबत्तीस वर्षें हें धनुष्य श्वेतवाहन (ज्याच्या रथाला शुभ्रवर्ण घोडे

[1]कृष्णातटीं दिव्य कन्या [2]कृष्ण [3]श्रीकांत पाहती, ।
कृष्णाज्ञेनें पुसे [4]जो त्या कृष्णा वृत्त वदे [5]सती. ॥ ९

‘[6]कालिंदी नाम माझें रचुनि रवि पिता [7]गेहँ दे [8]याचि तोया-
मध्यें उग्रा तपा [9]हा जन करुनि सदा विष्णुतें [10]याचितो या; ।
देवा! दे दास्य ऐसें निववित [11]नयना चातका [12]तोयदा त्या
केव्हां वाटेल नेणो, [13]अभिलषित कधीं ठाउकें होय दात्या.’ ॥ १०

ऐसें ऐकोनि तीचें [13]अभिलषित म्हणे आदरें [14]जिष्णु, ‘लागे
आम्हांला न [15]प्रयास, [16]स्थिर पळभरि हो, आणितों विष्णुला, गे!’ ।
नेला श्रीकृष्ण तेथें, दिनकर अरुणें पद्मिनीतें, वरा [17]याँ
पाहे, लाहे सुखातें, हरि बसवि रथीं ने पुरातें [18]वराया. ॥ ११

त्रिलोकीचा कर्ता [19]भजकवश तो [20]धर्मवचना-
सवें [21]शक्रप्रस्थीं स्वजनपरितोषार्थ [22]रचना ।
स्वयें वर्षाकाळीं वसत असतां, तेथ बरवी
[23]सुरांच्या शिल्पीतें कथुनि [24]सकळाधीश करवी. ॥ १२

---

असतात अशा) अर्जुनापाशीं आहे; ह्या धनुष्याचा पराक्रम मोठा आहे; हें फार सुंदर आहे; हें उत्कृष्ट व मनोहराकृती धनुष्य अर्जुनाला (अग्निद्वारा) वरुणापासून प्राप्त झालें. २४. उदक. [‘क्लीबं स्यात् कानने नीरे निवासे निलये वनम्’ इति रभसः.] २५. सूर्याच्या. २६. कन्या यमुना तिच्या तटीं. २७. पितात. २८. पवित्र. ‘पावन’ हें ‘वन’ याचें विशेषण.

१. यमुनातटाकीं. २. अर्जुन. ३. कृष्ण. ४. अर्जुन. ५. कालिंदी. [ही कालिंदीविवाहाची कथा पंतांनीं ८३ व्या अध्यायांत वर्णिली आहे. कृष्णविजय—अध्याय ८३ गीति १२५-१३१ पहा.] ६. कालिंदी ही यमुनेची मूर्तिमती देवता होय. ही विष्णु पति मिळावा म्हणून यमुनातटाकीं तप करीत होती. तिचें मनोगत जाणून कृष्णानें तिला इंद्रप्रस्थास आणिलें व नंतर द्वारकेस नेऊन तिच्याशीं यथाविधि विवाह केला. ७. वर. ८. या यमुनेच्या उदकांत. ९. मी. (कालिंदी.) १०. वरण्यास इच्छितो. ११. नयनरूप चातकास निववित असें त्या (तोयद) विष्णुरूप मेघास केव्हां वाटेल नेणो (कळत नाहीं). १२. पक्षिविशेष. [हे पक्षी पाऊस पडूं लागला असतां आ करून बसतात व जें तोंडांत पाणी पडेल तें पितात, व दुसरें पाणी पीत नाहींत अशी कविप्रसिद्धि आहे.] १३. इच्छित मनोरथ. १४. अर्जुन. १५. आम्हांस प्रयास (श्रम) न लागे. १६. क्षणभर दम धर. १७. या वरा (कृष्णाला) [ती कालिंदी वधू] पाहे. १८. विवाह कराया, लग्न लावण्यासाठीं. १९. भक्ताधीन. २०. धर्मराजाच्या म्हणण्याप्रमाणें. २१. इंद्रप्रस्थीं. २२. नगररचना. २३. विश्वकर्म्यातें. (अध्याय ५८ श्लोक २४.) २४. कृष्ण.

मागे रोगार्त वन्हि द्विजतनु[2] अतिथी औषधा खांडवातें[3],
घाया संसारवैद्य[4] क्षम[5], परि यश हें दे सख्या पांडवातें[6]; ।
केल्या विध्वस्त शक्राद्यमरघनघटा[7] उद्भटा[8] कांडवातें[9],
त्या काळीं नारदादि प्रभुजन[10] करिती उत्सवें तांडवातें[11]. ॥ १३

अदेवांचा[12] शिल्पी[13] भयविकळ संहारसमया-[14]
मधें आला कृष्णा शरण अनुकंपारसमया[15]; ।
खळा दाव, प्रव्हा[16] परि अमृतकासारसम[17], या
नता तैसा झाला वरद मधुपा सारस[18] मया[19]. ॥ १४

पार्थाला वन्हि तेव्हां धवल[20] हय, रथ श्रेष्ठ, गांडीव चाप,
स्वापन्नाशप्रमोदें[21] कवचहि धरिल्या जें[22] न व्हावाचि ताप, ।

---

१. ही खांडववनदाहाची कथा महाभारतांत आहे, तिचा सारांश:—श्वेतकी नामक एका प्रख्यात राजानें असंख्य यज्ञ केले; शेवटीं शतसंवत्सरात्मक यज्ञ दुर्वासाऋषीच्या आश्रयानें केला. या अनेक यज्ञांत हविर्भक्षण केल्यामुळें अग्नीला इतकें जाड्य आलें कीं, 'त्याचा प्रतिकार कसा करावा?' असें विचारण्यासाठीं त्याला ब्रह्मदेवाकडे जावें लागलें. अनेक वर्षें घृतधारासेवन केल्यानें अग्नि निस्तेज आणि म्लान झाला. 'खांडववन भक्षण करून अग्नीनें आपलें जाड्य निरस्त करावें' असा उपाय पितामहानें सांगितला. पण हें वन इंद्ररक्षित होतें म्हणून तें अग्नीस सुप्राप्य नव्हतें. तेव्हां पितामहाच्या अनुमतानें अग्नि विप्रवेष घेऊन मनुष्यलोकीं कृष्णार्जुनास शरण आला. त्या उभयतांनीं हें इंद्राचें खांडववन असतांही अतिथिरूप अग्नीला भक्षणार्थ देण्याचें कबूल केलें, पण अर्जुनापाशीं रथादियुद्धसाहित्यांची कांहींशी उणीव असल्यामुळें अग्नीनें वरुणापासून मागून घेऊन अर्जुनाला गांडीव धनुष्य, अक्षय्य इषुधि, कपिध्वजयुक्त दिव्यरथ, इत्यादि सामुग्री दिली आणि कृष्णास वज्रनाभ नामक चक्र आणि कौमोदकी नामक गदा देऊन उभयतांस संतुष्ट केलें. नंतर अग्नि तें वन भक्षण करूं लागला, आणि कृष्णार्जुन रथारूढ होऊन वनाच्या दोन्हीं बाजूंस सर्वप्राणिनाश करूं लागले. हें वर्तमान कळतांच इंद्र अग्नीचें निवारण करण्यासाठीं सकल देवांसह आकाशांत येऊन जलवृष्टि करूं लागला. तेव्हां कृष्णार्जुनांनीं त्यांचा पाडाव करून त्यांस परत लाविलें. नंतर अग्नि तें वन पंधरा दिवस यथेच्छ भक्षून व्याधिनिर्मुक्त झाला. (आदिपर्व—अध्याय २२३-२२५ पहा.) २. ब्राह्मणरूप. ३. इंद्रवनातें. ४. कृष्ण. (संसाररूप रोगांतून मुक्त करून पार पाडणारा म्हणून संसारवैद्य). ५. समर्थ. ६. अर्जुनातें. ७. इंद्रादि देव हेच मेघ त्यांच्या उद्भट (मोठ्या) घटा (समूहा.) ८. मोठ्या. ९. बाणाच्या वाऱ्यानें. १०. कृष्णभक्त. ११. नृत्यातें. १२. दानवांचा. १३. कारागीर. (मयासुर.) अर्जुनानें अग्निप्रलयापासून मयासुराचें रक्षण केलें, हे उपकार फेडण्यासाठीं त्यानें पांडवांसाठीं एक उत्तम सभागृह बांधिलें असें वर्णन सभापर्वांत आहे. [मोरोपंतकृत—सभापर्व अध्याय १.] १४. खांडववनदाहप्रलयसमयीं. १५ दयारसभरित कृष्णास. १६. नम्राला. १७. अमृताच्या तळ्यासारखा. १८. कमळ. १९. मयासुराला. २०. शुभ्र. २१. आपलें (अग्नीचें) संकट (शरीरजाड्य) घालविल्यामुळें झालेल्या हर्षानें. २२. कवच.

कीं शस्त्रास्त्रीं अभेद्य, क्षय[1]चि न कधिंही ज्यांत बाणांस भाते,
ऐसे दे; जींत[2] [3]मोहे [4]कुरुपति मय दे निर्मुनीयां सभा ते. ॥ १५
धर्माच्या चित्तवृत्तिप्रति न दुखवितां युक्तिनें घे [5]निरोपा,
तो पाय [6]क्ष्मापतीचे नमि, विनवि, म्हणे, 'शीघ्र येतों, न कोपा.' ।
गोपाळांचीहि भीड प्रभु धरि, न कसी बं[7]धूंची या [8]उमोपा,?
ओपा[9] योगाग्निमध्यें त[10]नुहि, परि न [11]हा भक्तिवांचूनि सोपा[12]. ॥ १६
कालिंदी नवरी तिला नि[13]जपुरी [14]ने, स[15]न्मुहूर्तीं [16]वरी,
साधी फार बरी वधू, मग [17]हरी तो पांचवी [18]तीवरी, ।
गर्भी जीस धरी [19]स्वतातभगिनी [20]राजाधिदेवी, हरी,
तीचे [21]पुत्र [22]अरी न देतिहि, परी ती मि[23]त्रविंदा [24]हरी. ॥ १७
वै[25]दर्भी प्रभुला जसी अनुसरे, तैसीच ही [26]पांचवी,
लागे बाळपणींच [27]माधवयशःपीयूष पीतां [28]चवी; ।

---

१. कमी होणें, सरणें, ऱ्हास. (अक्षय्य भाते.) २. ज्या मयासुरकृत सभेमध्यें. ३. दृष्टिभ्रमांत पडे. (अध्याय ५८ श्लोक २७ पहा.) ४. दुर्योधन. ५. कृष्ण निरोपा घे. ६. धर्माचे. (क्ष्मा+पति=पृथ्वी+स्वामी.) ७. बळरामाची. ८. फार. ९. ओपणें=सुकत घालणें, ओप देणें, वाळवून शुद्ध करणें. १०. शरीर. ११. हा कृष्ण. १२. सुलभ. १३. द्वारकेला. १४. ने=नेता झाला हें येथें भूतकालदर्शक रूप आहे. 'घे, ने, ये, हो, इत्यादि एकारांत व ओकारांत धातूंचीं कर्तरि विध्यर्थी द्वितीयपुरुषीं एकवचनीं रूपें कवितेंत कधीं कधीं स्वार्थी तृतीयपुरुषीं एकवचनीं वर्तमानकाळीं व कधीं कधीं भूतकाळीं योजितात' असा नियम आहे. [पद्यरत्नावली, पृष्ठ ९० पहा.] याचीं उदाहरणें:-(१) **घे** इक्षु वारण जसा करपुष्करानें, (२) असें देखतां **ये** कृपा माधवातें, (३) हें हायन चवदावें **हो**, (४) न **दे** पाठि कोणीच राया बळी रे, (५) मागून **ये** दूरुनि चक्रपाणी, (६) तदुपरि हरिभेटी **ये** विदर्भेंद्र तेथें. १५. शुभसमयीं. 'मुहूर्त'शब्दाचा मूळार्थ व विद्यमान अर्थ चिंतनीय आहे:—'संस्कृत कालमानाचे कोष्टकाप्रमाणें मुहूर्त शब्दाचा मूळचा अर्थ दोन घटका असा आहे. शुभ कार्यास चांगली वेळ पाहण्याच्या चालीवरून मुहूर्त म्हणजे चांगली वेळ असा अर्थ झाला. पाटाचें लग्न करण्यांत चांगली वेळ पाहण्याचा संबंध असतो म्हणून त्यापासून म्होतूर शब्द झाला.' (व्युत्पत्तिप्रदीप, पृष्ठ ५४ टीप ३ पहा.) १६. स्वीकारी. १७. पांचवी वधू (नायिका मित्रविंदा) हरण करी. १८. तिच्यावर. १९. बाप वसुदेव याची बहीण. २०. या नांवाची. २१. विंद आणि अनुविंद. २२. दुर्योधनपक्षपाती म्हणून शत्रु. २३. या नांवाची कन्या. २४. हरण करी. २५. रुक्मिणी. २६. मित्रविंदा ही कृष्णाची पांचवी बायको होय. ही अवंतीपाल जयसेन नामक राजाची कन्या. हिच्या स्वयंवरार्थ आलेल्या राजांचा पराभव करून कृष्णानें हिशीं विवाह केला. (अध्याय ८३ गीति १३२-१४४ पहा.) २७. कृष्णयशोमृत. २८. गोडी.

जी दुर्योधनबुद्धिवारवनिता[1] ती सोदरां[2] लांचवी[3],
रुक्मी ऐकची[4], दोन हे[5], परि हरी दोघींसही[6] वांचवी. ॥ १८
जे दोघेहि अवंतिकापुरपती विंदानुविंद ‘स्वसा[7]
देऊं ना’ म्हणती ‘हरीस,’ सुजना जो[8] इष्ट सर्वस्वसा[9], ।
तो होय प्रभुही स्वयंवर तिचा[10] ऐकोनि लोल[11], क्षिती-
नाथांदेखत[12] ने[13], न वारितिच कीं ते[14] योग्य तो[15] लक्षिती. ॥ १९
राजा[16] नग्नजिदाख्य[17] कोसलपती, त्याच्या गृहा आपण
ज्ञानिध्येयपदाब्ज[18] जाय, परिसे कीं कौतुकाचा पण[19], ।
प्रेमें पूजुनि पाय, राय[20] विनवी, ‘म्यां काय कीजे? मनीं
नेणे तृप्तिस कामधेनु कवण्या[21] पावेल कीं जेमनीं[22].’ ॥ २०
म्हणे सत्या[23] अत्यादृतमति, ‘मला हा वर[24] वर[25],
स्वताताच्या[26] गोष्टी प्रियसखि! बऱ्या या वरवर[27]; ।
पदीं कन्यारत्नार्पण न कवि मध्यें करकर[28]
स्तुतीची, हा अंबे! त्वरित धरु मोदांकर[29] कर.’ ॥ २१
हें जाणे सर्वसाक्षी[30] नरपतिस[31] म्हणे, ‘क्षत्रिया याचना[32] तें
निंद्य ज्ञातेच ऐसें वदति, तरि तुम्हां मागतों, साच नातें ।
व्हावें, प्रेमा असावा म्हणउनि दुहिता[33] द्या, दुजें तोषलेशा[34]
नाहीं, आम्हीं न देऊं किमपि परि अहो! शुल्क[35] तो, कोसलेशा!॥ २२

---

१. दुर्योधनानें दिलेली बुद्धि हीच वेश्या (वारवनिता) ती. २. तिच्या भावांस म्हणजे विंदानुविंदांस. ३. फितवी. ४. एकच विरुद्ध होता. ५. हे दोन भाऊ विरुद्ध. ६. रुक्मिणी आणि मित्रविंदा यांस. ७. बहीण, मित्रविंदा. ८. जो हरी. ९. सर्वस्वाप्रमाणें इष्ट. सर्वस्व=सकलधन. १०. मित्रविंदेचा. ११. आसक्त, उत्सुक. १२. राजांदेखत. (अध्याय ५८ श्लोक ३१ पहा.) १३. हरण करून घेई. १४. राजे. १५. कृष्ण. १६. हें सहाव्या विवाहाचें वर्णन आहे. [कृष्णविजय—अध्याय ८३ गीति १४५-१६१ पहा.] १७. नग्नजित् नांवाचा राजा. हा सत्येचा पिता. १८. ज्ञानी पुरुषांनीं ध्यान करण्यास योग्य आहेत चरणकमलें ज्याचीं असा. (कृष्ण.) १९. जो कोणी वीरदुर्मदनाशक बलशाली अशा सात वृषभांच्या नाकांत वेसण घालून त्यांस बांधून ठेवील, तो सत्या नामक कन्येचा वर होईल—असा नग्नजिताचा पण होता. २०. नग्नजित्. २१. कोणत्या. २२. भोजनानें. २३. नाग्नजिती. २४. पति. २५. श्रेष्ठ. २६. स्वयंवरानिमित्त केलेला पण इत्यादि गोष्टी. २७. बाह्यात्कारीं, बाहेरून. २८. किरकीर. २९. आनंदस्थान जो कृष्ण तो (माझा कर त्वरित धरु). ३०. कृष्ण. ३१. कोसलपतीस. ३२. याचना करणें क्षत्रियांस निंद्य. (श्लोक ४० पहा.) ३३. नाग्नजिती. ३४. आनंदलेशास. ३५. कन्येचें मोल. ‘शुल्क’ हा शब्द पुंलिंगी आहे.

[1]बोले भूप, 'दुजा [2]वर [3]त्वदुपम स्वर्गादिकीं [4]नाढळे,<br>
इच्छा तूज नसे, परंतु न पदापासूनि [5]पद्मा ढळे; ।<br>
असमद्भाग्य जगत्त्रयीं अतुळ हें कीं मागसी आपण,<br>
स्वामी! शुल्क भवद्वया बहु परि [6]प्रत्यूह कीं हा पण. ॥ २३

वर परमसमर्थ प्राप्त हो कन्यकेला,<br>
[7]पुरुषबळपरीक्षेकारणें यत्न केला; ।<br>
पण [8]वृषभ [9]दमावे [10]दुःसहस्पर्श [11]सप्त<br>
[12]प्रखर असति जैसे कीं [13]अयःपिंड तप्त. ॥ २४

जे होते 'बळवंत [13]आपण असों' ऐशा मदें दाटले,<br>
आले राजकुमार फार, वृष हे नाहीं [14]तयां [15]आटले; ।<br>
शृंगाग्रीं सुकुमारदेह [16]कवळूं जातां बळें फाटले,<br>
गेले [17]भग्नमनोरथ, स्वभुज त्यां ओझें वृथा वाटले. ॥ २५

**चा**णूरांतकरा! अरिष्टदमना! **कं**सांतका! आपण<br>
**श्री**कांता! [18]मधुसूदना! सफळ हा माझा करावा [19]पण; ।<br>
कन्येला नवरा अभीष्ट [20]नवराजीवाक्ष! तूं, [21]सांवरा<br>
आधीं [22]अंबर, [23]आंवरा [24]वृषें, मग स्त्रीरत्न हें या [25]वरा. ॥ २६

[26]प्रतापातें जाणें, दमन वृषभांचें परि करा,'<br>
म्हणे [27]राजा, तेव्हां [28]भुवनपति बांधे [29]परिकरा; ।<br>
स्वयें झाला [30]सप्ताकृति [28]अजित गो[31]सप्तक बळी<br>
धरी जैसा [32]शुद्धक्रिय नर [33]रवें तप्त कवळी. ॥ २७

---

१. अध्याय ५८ श्लोक ४१-४४ पहा. २. पति. ३. तुजसारखा. ४. आढळत नाहीं. ५. लक्ष्मी. ६. विघ्नभूत हा पण. ७. वराच्या बळाची परीक्षा करण्याकरितां. ८. बैल. ९. बळहीन करावे. १०. ज्यांना दुसऱ्याचा स्पर्श दुःसह असे, दुर्दांत, अपरायत्त. ११. सात. १२. तापलेल्या लोहपिंडासारखे प्रखर. १३. आम्ही बळवंत अशा गर्वें जे दाटले होते ते राजकुमार आले. १४. त्या राजकुमारांस. १५. वश झाले नाहींत, आटपले नाहींत. १६. वृषभांस कवळूं जातांत्यांच्या शृंगांनीं राजांचे सुकुमार देह फाटले. १७. हताश. १८. हे कृष्णा. १९. समय, प्रतिज्ञा. २०. नवकमलपत्राक्षा. २१. आटोपून धरा. २२. वस्त्र. २३. बद्ध करा. २४. बैल. २५. अंगीकारा. २६. मी आपल्या पराक्रमातें जाणतों, तथापि या बैलाचें दमन करा. २७. नग्नजित्. २८. कृष्ण. २९. कमरेला. ३०. सप्तमूर्ति ३१. सात बैल. ३२. शुद्ध कर्म करणारा, दिव्य करणारा. ३३. तप्त लोहखंड.

कौतुकें किति अगाध वदावीं ? लावि तो सहज **माधव** [1]दावीं; ।
ओढिती [2]पृथुक [3]काष्ठमयांस, व्यक्त तेंवि [4]विगतश्रम [5]यांस. ॥ २८
[6]रूपमात्र धरिलें परि बैल, [7]प्राकृतासम न, ते [8]कुलशैल, ।
[9]हृत्तमःक्षयकरेश्वरहस्तस्पर्शकामहृतचित्त समस्त. ॥ २९
[10]ज्यांच्या नामेंचि जन्म श्रुत धन कुळ हें सर्वही धन्य, केला
जामाता देव भूपें शुभतमसमयीं अर्पुनी कन्यकेला, ।
[11]हस्त्यश्वस्यंदनादि [12]प्रचुर [13]वसु दिलें, [14]पात्र दुष्प्राप, हाता
ज्ञाता कां आवरील द्रविणसफळता जो [15]प्रदानीं पहाता? ॥ ३०

---

१. अध्याय ५८ श्लोक ४४-४६ पहा. २. बालक. ३. लांकडाच्या बैलांस. ['मय'प्रत्यय नामांस लागून नामप्रदर्शित पदार्थांचा 'केलेला, किंवा त्यानें विपुल प्रचुर' या अर्थाचीं विशेषणें होतात; जसें–पिष्टमय (पिठाचा केलेला), काष्ठमय (लांकडी, लांकडाचा केलेला), मृन्मय (मातीचा), घृतमय (घृतप्रचुर, घृतानें भरलेला), अन्नमय (अन्नानें भरलेला).] ४. श्रमरहित, सहज. ५. या वृषभांस. ६. या श्लोकांचें वृत्त 'स्वागता' आहे. या वृत्तांत र न आणि भ हे गण अनुक्रमें येतात व यांच्या अंतीं दोन गुरु अक्षरें असतात. ७. ते क्षुद्र बैलांप्रमाणें नव्हते. ८. कुलपर्वतासम मोठे. [कुलशैल=कुलाद्रि, कुलाचल, कुलपर्वत=हे मोठमोठे सात पर्वत आहेत. यांचीं नांवें:—'महेंद्रो मलयः सह्यः शुक्तिमान् ऋक्षपर्वतः । विंध्यश्च पारियात्रश्च सप्तैते कुलपर्वताः ॥'.] ९. हृदयांतील अज्ञानाचा क्षय करणारा जो ईश्वर त्याच्या हस्तस्पर्शाची इच्छा तिनें हरिलें चित्त ज्यांचें असें मस्त बैल झाले. [हृत्+तमः+क्षयकर+ईश्वर+हस्त+स्पर्श+काम+हृत+चित्त=हृदय+अंधकार+नाशकारक+ईश (कृष्ण)+कर+स्पर्श+इच्छा+हरण केलें+मन. या सारखीं लांब लांब सामासिक पदें पंतांच्या काव्यांत अनेक आहेत. निबंधमाला–अंक ६६ पृष्ठ २८-२९ पहा.] १०. या श्लोकाचें वृत्त 'स्रग्धरा'. याचें लक्षण:—'युक्तं मरभनैर्यैश्च त्रिभिः सप्ताक्षरैस्त्रिभिः । छेदैश्च **स्रग्धरा**वृत्तमेकविंशाक्षरं विदुः ॥' [सुवृत्ततिलक–१-३७.] 'सुकुमाररसस्यात्र रक्षायै वृत्तमुद्धतम् । वाक्पाकेनैव गलितं कविना नीतमल्पताम् ॥ ४० ॥ आकारगुरुयुक्तादिपर्यंतांतर्विसर्गिणी । अंसस्यूतविरामा च राजते **स्रग्धरा** तराम् ॥ ४१ ॥ आद्यंताकारविरहाद्बंधदोषः स्फुटोऽपि यः । अविलुप्तैर्विसर्गांतैः **स्रग्धरा**यां समीहते ॥ ४२ ॥' [सुवृत्ततिलक–२.] 'शौर्यस्तवे नृपादीनां शार्दूलक्रीडितं मतम् । सावेगपवनादीनां वर्णने **स्रग्धरा** मता ॥' [सुवृत्ततिलक–३-२२] स्रग्धरेच्या प्रत्येक पादांत म, र, भ, न, तीन यगण, असतात. यति प्रत्येक सप्तम अक्षरावर असतो. हें वृत्त रौद्र, वीर, भयानक अशा रसांस अनुकूल आहे. वायुवेगादिक प्रसंगाचे वर्णनास हें वृत्त योग्य असें समजतात. ११. गज, घोडे, रथ, इत्यादि. १२. विपुल. १३. धन. १४. कृष्णासारखें पात्र. १५. दानानें द्रव्याची सफळता पहाणारा ज्ञाता (विचारी पुरुष) हाता कां आवरील? अर्थात् आवरणार नाहीं–असा अभिप्रेतार्थ. हें अर्थांतरन्यास नामक अलंकाराचें उदाहरण होय.

भूपें धेनु देहासहस्र[1] दिधल्या, दासीसहस्त्रत्रय,[2]
स्वर्णालंकृत नाग[3] तैंत्रिगुण,[4] यद्दानीं[5] कधीं न क्षय, ।
नागाहूनि शतांग[6] ते शतगुण[7] श्रीशा दिले, त्याहुनी
वाजी दासहि त्यांहुनी शतगुण, स्वश्रेय[8] हें पाहुनी. ॥ ३१

सस्त्रीक[9] तेथुनि निघे जइं चक्रपाणी
नेत्रांसि आणि बहु कोसलचक्र[10] पाणी; ।
स्नेहें रडे, जरि निजान्वय[11] धन्य[12] केला,
हें जाणती निरवितां[13] जन कन्यकेला. ॥ ३२

मुखातें झांकूनी हसति बहु नाकौकस[14] पटें,[15]
वृषांनींही श्वासें उडविलि लघू जीं कसपटें;[16] ।
पुढें झाले तें[17] कीं न करुनि विलंबा हिरेतणें[18]
वधू दावा देवूं म्हणति न निघों बाहिर तेणें.[19] ॥ ३३

म्हणे सख्या श्रीहरिला धनंजय,[20] 'प्रभो! मला सत्य करीं धनंजय,[21] ।
आहेस पाठीवर, दास मी रणा करीन यांशीं,[22] वरदा! समीरणा![23]' ॥ ३४

कृष्णोक्तासह शीघ्र सज्य करुनी गांडीव घे अर्जुन,
त्रासें जे धरिती मुखीं तृण[24] जन क्लीबां तयां वर्जुन, ।

---

१. हें पारिबर्हाचें (आंदणाचें) वर्णन आहे. (श्लोक ५०-५१.) २. तीन हजार दासी. ३. गज. ४. दासीहून तिपट. ५. ज्या गजांच्या दानोदकीं. [दान=हत्ती उन्मत्त झाला असतां त्याच्या गंड-स्थळांतून वाहतें जें मदोदक तें. '**दानं** गजमदे त्यागे पालनच्छेदशुद्धिषु' इति विश्वमेदिन्यौ.] ६. रथ. [शतांग=शत+अंग=शंभर+अवयव=शतमंगान्यवयवा यस्य.] ७. शंभरपट. ८. आपलें कल्याण, भाग्य. ९. पत्नीसह (सत्येसह). [ईकारांत, ऊकारांत आणि ऋकारांत शब्द बहुव्रीहि समासाच्या अंतीं असल्यास त्याच्या पुढें 'क'प्रत्यय होतो. या नियमास अनुसरून सस्त्रीक शब्द झाला आहे. दुसरीं उदाहरणें:—बहुनदीक देश, बहुकर्तृक ग्रंथ, कल्याणपंचमीक पक्ष, बहुपत्नीक मनुष्य.] १०. कोसल देशांतील लोक. [चक्र=राष्ट्र. '**चक्रः** कोके पुमान्, क्लीबं व्रजे सैन्यरथांगयोः । राष्ट्रे दंभांतरे कुंभकारोपकरणास्त्रयोः ॥' इति मेदिनी.] ११. आपला वंश. १२. श्लाघ्यजीवित. १३. स्वाधीन करून देतां. १४. देव. [नाक (स्वर्ग) आहे ओकस् (गृह) ज्यांचें ते=देव, दिवौकस.] १५. वस्त्रानें. १६. तृणें. १७. राजे. १८. हरून नेणें. १९. तृणें. २०. अर्जुन. २१. अग्नि. २२. या राजांशीं. २३. वायो! २४. मुखीं तृण धरणें=दांतीं—तोंडीं तृण धरणें—घेणें=हार पतकरणें, शरण जाणें, शरणागत होणें, हात जोडणें.

बाणांनीं करि भग्न मग्न [1]रुधिरीं [2]नागाधिरूढां [3]सळी,
रुद्राचेपरि हा [4]समीर [5]जगते [6]जाणों तरू ढांसळी. ॥ ३५
स्वशत्रुस्त्रीच्या जे उरविति न [8]सिंदूर [9]निटिलीं,
शरांनीं पार्थाच्या [10]अंहितकटकें दूर पिटिलीं, ।
कसा साहे वेग [11]प्रबळपवनाचा [12]घनघटा?
[13]घटा [14]हस्तींची ही धरिल [15]हरिच्याही मनगटा. ॥ ३६
नामेंचि जो मोक्षहि दे, वसावा कानीं जयाचा गुण, देव [16]सावा ।
विवाह ऐसा करि अन्य, गेहा ये, बोलती स्त्री, 'सखि धन्य, गे! [17]हा'. ॥ ३७
[18]शौरीची [19]श्रुतकीर्तिनाम भगिनी भद्रा तिची [20]दारिका;
लीला बाळपणींहि गाय हरिच्या प्रेमें जसी [21]सारिका; ।
हे [22]संतर्दनमुख्य आवडि तिची बंधु स्वयें जाणती,
देती श्रीपतिलाचि कीं बहुमता, त्यां जीवनप्राण [23]ती. ॥ ३८

---

१. रक्तीं. २. गजाधिरूढांस. ३. छळी. ४. वायु. ५. जगणारे. ६. हा उत्प्रेक्षालंकार आहे. ७. पाडी. ८. शेंदूर. ९. कपाळीं. १०. शत्रुसैन्यें. ११. प्रचंड वायूचा वेग. १२. मेघसमूह. [घन+घटा=मेघ+समुदाय.] १३. समुदाय (गजांचा). १४. हत्तीची. 'या शब्दावरून अपभ्रंश कसे चमत्कारिक होतात व भाषेंतील शब्दसंग्रह कसा वाढत जातो हें चांगलें लक्षांत येण्यासारखें आहे. मूळ नक्षत्रवाचक शब्द 'हस्त' आहे. 'अश्विनी,' 'मृग' हीं नांवें जशीं आकृतिसादृश्यावरून पडलीं आहेत त्याप्रमाणेंच 'हस्त' हें नांवही हाताच्या आकृतीवरून वरील नक्षत्रास मिळालें आहे. पण अशी मूळ स्थिति नसतां मराठींत प्रयोग पहा कसे दृष्टीस पडतात!—'हत्ती गर्जायाला लागला,' 'कोसळेल हत्ती तर पाडील भिंती.' हा चमत्कार होण्यास दोन तीन कारणें झालीं आहेत. एक तर अगोदर 'हस्त' आणि 'हस्ती' (हत्ती) हें वर्णसादृश्य. दुसरी गोष्ट ही कीं, मधें वीज जी त्रंदींत पडली असते ती वरील नक्षत्र लागतांच पुनः गर्जायाला जाते. तेव्हां गर्जनाची कल्पना साहजिक रीतीनें 'हत्ती'वर बसतेच. तिसरें असें कीं, हत्तीच्या दणक्याप्रमाणेंच वरील नक्षत्राची गर्दी असते. हत्ती मोकळा सुटून जर बोकळला तर गंडस्थळाच्या धडकांनीं जसें कांहीं राहूं देणार नाहीं व सारा विध्वंस करून टाकील, त्याप्रमाणेंच हस्ताच्या अमलांतही धडाधड घरें पडताहेत, वाऱ्याच्या सपाट्यानें मोठमोठे वृक्ष उपळताहेत, विजांचा कडकडाट चाललाच आहे, मुसळासारखे धोधाटे चालून चोहोंकडे जळबंब होऊन गेलें आहे, हा प्रकार चोहोंकडे दृष्टीस पडतो. याखेरीजही ही एक कल्पना लोकांच्या मनांत भिंबलेली आहेच, कीं मेघांचा स्वामी जो इंद्र त्याचे हत्ती समुद्राचें पाणी सोंडेनें शोषून घेऊन चोहोंकडे त्याची वृष्टि करतात!' (निबंधमाला—अंक ५२ पृष्ठ २३.) १५. सिंहाच्याही. १६. सहावा. १७. कृष्ण. १८. वसुदेवाची. १९. श्रुतकीर्ति नांवाची. (हें सातव्या विवाहाचें वर्णन आहे.) २०. कन्या. २१. मैना पक्षीण. २२. संतर्दन ज्या भावांत प्रमख असे तिचे भाऊ. २३. भद्रा.

मद्राधीशसुता[1] जिच्या गुणमणी पोटासि आले, खनी[2],
श्रीची[3], यच्छुभलक्षणीं[4] लव[5] लिहे न ब्रह्मजालेखनी[6], ।
राजे ऐकुनि तत्स्वयंवरमहा[7] एकत्र झाले पणीं
जिंकी कृष्णचि लक्ष्मणा, नृपजना लज्जाचि ज्यां लेपणीं[8]. ॥ ३९

जैसा कीं द्रुपद[9] स्वकीय तनया पार्थासि द्याया रची
रारायंत्र[10], तयापरीस पण हा भारी असे फारची; ।
जेथें अर्जुन ही न शक्त, इतरां तें कर्म कैसें घडे ?
माळा कृष्णगळां स्वयंवरवधूहस्तांबुजींची[11] पडे. ॥ ४०

वैदर्भी[12] मग ऋक्षराजतनया[13] श्रीसत्यभामा सती,
कालिंदी वरुनी हरि प्रभु वरी श्रीमित्रविंदेप्रती, ।
सत्या नाग्नजिती सुनिर्मळमती भद्रा, सुधी लक्ष्मणा,
प्रेमें सेविति अष्ट[14] पट्टमहिषी[15] या नित्य[16] नारायणा[17]. ॥ ४१

---

## अध्याय एकुणसाठावा.

(श्लोक.)

भौम[18] प्राग्ज्योतिषाचा[19] पति नरक[20] बळें तुच्छ शक्रा[21] करूनी,
स्वस्त्रीचे भूषवाया श्रवण[22] अदितिचीं[23] कुंडलें ने हरूनी; ।
वर्षे पीयूषबिंदू[24] म्हणउनि वरुणच्छत्र[25] नेलें बळानें,
क्रीडे जेथें हरी[26] तो मणिगिरि[27] हरि[28] हें कर्म केलें खळानें. ॥ १

---

१. बृहत्सेननृपसुता–लक्ष्मणा. (ही कथा पंतप्रणीत 'कृष्णविजया'च्या ८२ व्या अध्यायांत सविस्तर दिलेली आहे. गीति १७०-१९८ पहा.) २. खाण. ३. शोभेची. ४. जिच्या उत्तम लक्षणाविषयीं. ५. लवमात्र लिहूं न शके. ६. सरस्वतीची लेखणी. ७. तिचा स्वयंवरोत्सव. ८. विलेपनें. ९. द्रुपदनामक राजा. १०. 'रारायंत्र' हा अपपाठ आहे असें दिसतें. 'रारा' म्हणजे कांति, तेज, शोभा, असा अर्थ आहे तो येथें उद्दिष्ट नाहीं. ११. लक्ष्मणेच्या हातची. १२. रुक्मिणी. १३. जांबवती. १४. 'भैष्मी जांबवती भामा सत्या भद्रा च लक्ष्मणा । कालिंदी मित्रविंदा चेत्यष्टौ पट्टमहा स्त्रिय: ॥' हीं या आठ स्त्रियांचीं नांवें. १५. पट्टमहिषी=पट्टराज्ञी, पट्टदेवी, मुख्य राणी. १६. 'अष्टमहिष्युद्वाह' असें या अध्यायाचें नांव आहे. १७. कृष्णा. १८. भूमीचा पुत्र=भौमासुर=नरकासुर. १९. नगरविशेष त्याचा. हें भौमासुराचें नगर. २०. नरकासुर. २१. इंद्राला. [हा इंद्र स्वर्गांतील पुरंदर नव्हे, हा द्वादशादित्यांतील पूर्वदिक्पाल अदितिपुत्र.] २२. कान. २३. इंद्रमातेचीं. २४. जें छत्र अमृताचे बिंदु वर्षतें. २५. वरुण हा दिक्पाल, तेव्हां तो इंद्राचा बंधु. वरुणाचें म्हणजे इंद्रबंधूचें छत्र नरकासुरानें नेऊन इंद्राचा अपमान केला–हें तात्पर्य. २६. इंद्र. २७. अमराद्रिस्थान. २८. हरण करी.

ज्ञानी नारद पारिजातकुसुम स्वर्गाहुनी आणुनी,
दे [1]सत्कल्पतरुप्रति, प्रभुहि [2]तद्भाव स्वयें जाणुनी, ।
[3]श्रीतें दे, कळतां रुसे [4]प्रियतमा [5]भामा [6]महाकोपना,
यत्नें हा [7]वरद [8]प्रियंवद करी [9]तन्मानसंगोपना. ॥ २
भामेच्या सदनिं प्रभूसि कळवी हे [10]तांप नाना शची-
भर्ता कीं [11]हरिच्या पदाविण दुज्या यत्नें जना [12]नाशची, ।
हें आणी मनिं पारिजात [13]दयितेसाठीं असे आणणें,
देवांचा सहजेंचि कंटक तयीं [14]भौमाख्यही खाणणें. ॥ ३
'जा' इंद्रास म्हणे मुकुंद, 'करितों या दुर्जना भस्म, रे!'
ऐसें सांगुनि [15]त्यास, [16]पक्षिपतिला श्रीपद्मनाभ स्मरे; ।
तों आला गरुड क्षणांत, अजित स्कंधीं तयाच्या चढे,
अंकीं स्त्री रुचिनें तिच्याचि [17]चपळा अद्यापि तापें कढे. ॥ ४
पावे जाउनि लोकनाथ अजित प्राग्ज्योतिषाख्या पुरा,
[18]तत्प्राकार [19]गदादिशस्त्रनिवहें तत्काळ केले चुरा; ।
[20]दावीही बहु विक्रम प्रभु परि च्छेदी स्वचक्रें मुरा,
भामा [21]भीतिकरा वधी [22]खरतरा [23]तेणेंचि भौमासुरा. ॥ ५
चक्रें त्या [24]वृष्णिशक्रें [25]खलनरकशिर च्छेदितां, पुष्पवृष्टि
केली हर्षें [26]सुरांहीं, निरुपम पडलें तें महायुद्ध दृष्टि. ।
[27]देवस्व [28]स्वीयपुत्राहृत सकळ पदीं आणुनी ठेवि [29]भूमी
[30]प्रार्थी कीं '[31]आत्मपौत्राप्रति अभय तुम्हां मागतें हे [32]विभू! मी'. ॥ ६

---

१. संतांचा कल्पतरु कृष्ण त्या प्रति. २. त्या नारदाचा अभिप्राय. ३. रुक्मिणीतें. ४. आवडीची. ५. सत्यभामा. ६. मोठी रागीट. ७. कृष्ण. ८. गोड बोलणारा. ९. सत्यभामेच्या मानाचें रक्षण. [ही कथा हरिवंशांत आहे.] १०. नरकासुरापासून झालेले ताप. ११. कृष्णाच्या. १२. केंवळ नाशच. १३. सत्यभामेसाठीं. १४. नरकासुरनामा कंटक. १५. इंद्राला. १६. गरुडातें. १७. विद्युल्लता. १८. त्या पुराचे तट. १९. गदादिशस्त्रसमूहें. २०. मुरदैत्य जरी बहु विक्रम दावी तरी प्रभु त्या मुरातें स्वचक्रें (आपल्या सुदर्शनानें) छेदी—असा अन्वय. २१. भयंकरा. २२. प्रखरतरा, चंडतरा. २३. त्याच चक्रानें. २४. यादवेंद्रें. (कृष्णें.) २५. खळ जो नरकासुर त्याचें शिर. २६. देवांनीं. २७. देवांचें धन. [अदितिकुंडलें, वरुणच्छत्र, वैजयंतीमाला आणि महामणि असें धन.] २८. आपला पुत्र भौमासुर त्यानें हरलेलें. २९. पृथ्वी. ३०. अध्याय ५९ श्लोक २५-३१ यांचा सारांश येथें पंतांनीं एका चरणांत आणिला आहे. ३१. आपला नातू जो भौमाचा पुत्र त्यातें. ३२. श्लोक २५-३१ पहा.

भौमाचा भगदत्त पुत्र, अभय श्रीकृष्ण दे, त्या पुरीं
राज्य प्राज्यहि, जाय हा यदुपती [1]भूनंदनांतःपुरीं. ।
ज्या [2]सिद्धासुरदेवभूपतनया [3]संरोधिल्या त्या खळें,
सोडी [4]द्व्यष्टसहस्र सैकशतही त्या तो प्रभू [5]दोर्बळें. ॥ ७
कन्या चित्तें वरीती [6]शुभगुणमणि जे त्यांचिया [7]आकरा [8]या,
तो सांगे काय [9]आंगें [10]जलधर तृषितां चातकां आ कराया? ।
त्या [11]स्त्री [12]एकेंचि हृष्टा म्हणुनि कुमुदिनी पद्मिनी [13]देव [14]राका-
नाथ [15]ब्रध्न प्रियश्री सुकवि न उपमा आणिखी दे [16]वराका. ॥ ८
[17]स्नपन [18]वसन [19]भूषा योग्य [20]सत्कार केला,
बसवुनि [21]नरयानीं धाडिल्या [22]द्वारकेला; ।
गजहयरथरत्नें कांचनेंहि [23]प्रभूतें
[24]उरवुनि बहु धाडी [25]तच्छुभार्थ [26]प्रभू तें. ॥ ९
तेथूनि [27]पक्षिपतिवाहन हा [28]सदार
[29]स्वर्गासि जाय यदुनायक अत्युदार; ।
तीं कुंडलें नमुनियां [30]जनिदादितीतें
दे, जाणवी [31]तनुजता [32]जगदादि तीतें. ॥ १०
नमी सुरांची हरिला सभा, जिला अभीति दे, [33]देववरें [34]सभाजिला. ।
समर्पिती जिष्णुसि पाय ते, जया उपेक्षितां कोठिल काय तेज या? ॥ ११
भौमें जी भीतिचिंता दिधलि बहु, [35]जिणें सर्वथा नाश, [36]चीप
[37]ग्रीवेची काढिली, कीं [38]उपकृति कसि ती आठवीना [39]शचीप? ।

---

१. भूमीचा नंदन (पुत्र) भौम त्याच्या अंतःपुरांत. २. सिद्ध, असुर, देव, भूप, यांच्या कन्या. ३. कोंडून ठेवल्या. ४. सोळासहस्र एकशें, शतैकाधिक षोडशसहस्र कन्या. ५. भुजबळानें. [दोस्=भुज.] ६. उत्तम गुणरत्नें. ७. त्यांची खाण. ८. या कृष्णातें. ९. स्वमुखें. १०. मेघ. ११. त्या कन्या कुमुदिनी चंद्रविकासिनी, पद्मिनी सूर्यविकासिनी कमलिनी होत. १२. एका मूर्तीनेंच संतुष्ट. १३. कृष्ण हा. १४. राकानाथ=राकापति, चंद्र. १५. सूर्य. १६. नीचा. १७. मंगलस्नान. १८. वस्त्रें. १९. अलंकार. २०. त्या कन्यांचा योग्य सत्कार करून. २१. पालख्यांत. २२. श्लोक ३६ पहा. २३. बहुत. २४. कांहीं ठेवून. २५. त्या स्त्रियांच्या हितार्थ. २६. कृष्ण. २७. गरुडवाहन. (कृष्ण.) २८. सत्यभामासहित. २९. इंद्रभवनास, अमरावतीला. ३०. जन्मदात्री माता अदिति तीतें. ३१. पुत्रता. ३२. जगताचा आदिपुरुष. (कृष्ण.) ३३. इंद्रें. ३४. पूजिला. [सभाजणें=पूजणें.] ३५. ज्या भीतिचिंतेनें. ३६. धोंड. ३७. गळ्यावरची. ३८. कृष्णानें भीतिचिंतारूप गळ्यावरची धोंड काढली ही उपकृति इंद्र स्मरणार नाहीं असें कसें होईल? ३९. इंद्र. (शचीचा पति.)

इंद्राणी सत्यभामेप्रति हृदयिं धरी कीं नसे भेद [1]जावा,
दोघी पूजी [2]सुदूरागमनजनित जो तो म्हणे खेद [3]जावा. ॥ १२
येतां तेथूनि मागें प्रभु हरि [4]हॅरि त्या पारिजाता [5]नगा, ती
वार्ता ऐकूनि, इंद्राजवळि सुर मुखें कीर्ति गातां न [6]गाती; ।
आला युद्धा अशुद्धाचरण शतमख क्रूर तो कोपलाची,
दावी [7]चंद्रोपलाची प्रथम मग कुधी रीति [8]अर्कोपलाची. ॥ १३
पायींही लोळतांही सतत सुरतरू लेश चिंता न वारी,
ती [9]सर्वेष्टप्रदाता हरि हॅरि सहज, प्रार्थितां [10]दानवारी; ।
[11]वृक्षा शिक्षा कराया निजगुरुवर ने, भद्र तें हें न [12]मानी,
[13]कार्यासाठींच भक्ति [14]स्वैरधिप खळ हा दूर पाहे न [15]मानी. ॥ १४
[16]हो [17]सद्विद्य कुलीन मानव सुर ज्ञानी तरी लो[18]भला,
प्रायः प्राज्ञ म्हणोनि [19]मद्य [19]म्हणती द्रव्य, [20]त्यैंजी तो भला. ।
स्वर्गीं इंद्रपदीं [21]यदीयचरणांभोजाश्रयें शोभला,
तो हा शक्र पहा! अहा शिव! शिव! स्वामीवरी [22]क्षोभला. ॥ १५
सर्वेष्टप्रद [23]आपण प्रभु असें, चित्तांत चिंतामणी
हा काय द्रुम [24]मूढमान्य कळवि स्पष्ट प्रतापें [25]धणी ।
स्त्रीचा आग्रह यास्तव प्रिय तिचें व्हाया तिच्या आंगणीं
लावावा, इतुकेंचि इंद्र न [26]मनी, ये प्राण घ्याया रणीं. ॥ १६
सुरवरा [27]हरिभक्तिपरा जय प्रथम, [27]अर्थपराहि पराजय, ।
न उमजे विषयेच्छु [28]वराक [29]वी भुवन त्या, वरि दास्य [30]बरा कवी. ॥ १७

---

१. बंधुभार्या. २. दुरून आल्यामुळें झालेला (खेद). ३. दूर व्हावा. ४. हरण करी. ५. वृक्षातें. ६. कीर्ति न गातां ती वार्ता गाती. ७. चंद्रकांताची रीति. [उपल=दगड.] ८. सूर्यकांताची रीति. हा दृष्टांत मूळांत नाहीं. हा पाद सुभाषितरूप आहे. ९. सर्व इष्ट वस्तु देणारा. १०. दानवशत्रु. (इंद्र.) ११. पारिजाता. १२. भद्र असें न मानी. १३. कामापुरती भक्ति. १४. स्वर्+अधिप=स्वर्गाधिप=इंद्र. १५. अभिमानी म्हणून दूरवर न पाहे. १६. असो. १७. उत्तम विद्यासंपन्न. १८. लोभाविष्ट झालाच. १९. म्हणून प्राज्ञ (जाणते पुरुष) द्रव्याला मद्य म्हणतात. २०. जो भला (सुजन) तो द्रव्यरूप मद्य सजी. २१. ज्याच्या चरणकमलाश्रयें इंद्रपदीं इंद्र शोभला, त्या स्वामीवर तो इंद्र क्षोभला. २२. रागावला, क्षुब्ध झाला. २३. मीच आहें. २४. मूर्खाला मान्य. २५. कृष्ण. २६. न समजे. २७. इंद्र हरिभक्तिपर होता तेव्हां जय मिळाला. तोच अर्थपर झाला तेव्हां पराजय मिळाला. २८. नीच. (इंद्र.). २९. उत्पन्न करी भुवन त्या न उमजे. ३०. जो दास्य वरी तो कवी बरा.

युद्धीं जिंकुनि जि[1]ष्णुला, निजपुरीं [2]श्रीसत्यभामामतें
　[3]उद्यानीं [4]तरु लाविला सुरभि तो[5] तीचें करी धाम तें. ।
[6]फांके द्वारवतीपुरीं [7]परिमळ, श्रीकृष्णजीचें जगीं
　जैसें सद्यश, आवडी परि जसी ये[8]थें न तैसी [9]नगीं. ॥ १८
कन्या द्व्यष्टसहस्र सैकशत [10]तत्संख्यस्वरूपें धरी,
　माता तात नवीनचि प्रतिगृहीं स्वास [11]स्वयोगें करी; ।
लग्नप्रेम जनोत्सवालय वरी, नाहीं [12]भिदा तोंवरी
　श्रीकांत प्रभु जीस जीस म्हणती ती ती नवी नोवरी. ॥ १९

---

## अध्याय साठावा.

(श्लोक.)

[13]पर्यंकीं [14]आपुल्या [15]स्वप्रियतम असतां एकदा त्यास [16]देवी
　वै[17]दर्भी [18]चामरातें धरुनि [19]लसदुरोहार ढाळूनि सेवी; ।
'मी धन्या [20]वल्लभा कीं मजजवळि [21]वसे नित्य' ऐसेंचि मानी,
　[22]साक्षी तत्काळ जाणें करि [23]कुतुकनिधि [24]श्रीश [25]तद्दर्पहानी. ॥ १
　[26]म्हणे विभु, '[27]नृपात्मजे! गुणवती असी तूं बरी,
　　नसें उचित मी पती, [28]गति [29]मतिभ्रमें ही खरी; ।
　[30]स्वरूपअनुरूप तूं सुमुखि! [31]भूप आतां तरी
　　वरीं, हित चुके जरी, [32]कुशळ तें पुन्हा [33]सांवरी.' ॥ २

---

१. इंद्राला. २. सत्यभामेच्या अनुमतानें. ३. घरच्या बागेंत. ४. पारिजात. ५. तो (तरु) तीचें धाम (गृह) सुरभि (सुवासपूर्ण) करी. ६. पसरे. ७. सुवास. ८. कृष्णयशांत. ९. पारिजातवृक्षीं. १०. त्या राजकन्यांच्या संख्ये इतक्या मूर्ति कृष्ण धरी. ११. निजमायेनें. १२. भेद. १३. पलंगावर. १४. कृष्णाच्या. १५. निजपति. (कृष्ण.) १६. राणी. १७. भैष्मी. १८. चवरीतें ढाळूनि. चामर=चमरनामक पशूच्या शेंपटाचें केलेलें व्यजन. १९. लसत्+उरो+हार=जिच्या वक्षस्थळीं हार शोभतो अशी. २०. प्रियस्त्री. २१. येथें 'वसे' या क्रियापदाचा कर्ता 'कृष्ण' अध्याहृत जाणावा. २२. अंत:करणाचा द्रष्टा. २३. कौतुकाची खाण असा २४. श्रीश(कृष्णा). २५. रुक्मिणीच्या गर्वाचा नाश. २६. अध्याय ६० श्लोक १०-२० पहा. २७. हे राजकन्ये. (वैदर्भी.) २८. प्रकार. २९. बुद्धीला भ्रम पडल्यामुळें. ३०. आपल्या रूपाला योग्य असा. (श्लोक १७.) ३१. राजपुत्र. ३२. चतुर. ३३. संभाळून घेतो.

[1]स्वदोष बहु दाखवी, गुण [2]धराधवाचे वदे,
[3]सतीस '[4]चुकलीस तूं' म्हणुनि ताप तो देव[5] दे. ।
नवीन कटु शब्द ते सकळ काळजा लागती
[6]सुतप्तशरसे, मनीं समजली [7]निजत्याग ती. ॥ ३
जयीं ती [8]श्रीमूर्ति [9]श्रवणकटु अत्यंत वदली,
पडे [10]जैसी [11]वातें [12]फळदळभराक्रांत [13]कदली; ।
[14]स्वयें [15]मूर्छामग्ना उचलुनि [16]सती सांत्वन करी,
[10]जसे [17]पंकोद्धारें करुनि [18]करिणीचें [19]वनेकरी. ॥ ४
नेली शीघ्र [20]चतुर्भुजें प्रियतमा आंगें पलंगावरी,
हस्तें [21]तत्कचभार हार वसन [22]स्वाधार तो आवरी, ।
[23]शोकाश्रूक्षित [24]गल्ललोचनकुचद्वंद्वें पुसी हा, बरी
[25]स्वस्था होय, तसी दयाचि करि, [26]कीं झाली सती घाबरी. ॥ ५
[27]दयावनें जरी केला [28]परिहास त्यजावया, ।
गर्वास हेतु[29] तापाही परि हा सत्य जावया. ॥ ६
वैदर्भीस म्हणे प्रियंवद[30], 'अहो! [31]मच्छब्द जे हे तुतें
झाले तापकर प्रतप्तशरसे, मूर्छेसही हेतु तें; ।
कांहींही [32]मृदुमानसे! तव मनें नाहींच कीं साहिलें,
म्यां केला [28]परिहास हा सति! कसी तूं कोपसी पाहिलें. ॥ ७

---

१. कृष्ण आपले दोष दाखवी. २. राजाचे. ३. रुक्मिणीस. ४. वर पाहण्याच्या कामीं तूं चुकलीस. ५. कृष्ण. ६. तापलेल्या बाणासारखे. ७. कृष्ण माझा त्याग करणार असें समजली. ८. कृष्णमूर्ति. ९. कर्णकठोर. १०. हा उपमा अलंकार जाणावा. ११. वाऱ्यानें. १२. फळांच्या व पानांच्या भारानें लवलेली. १३. केळवृक्ष. १४. कृष्ण आपण स्वतां. १५. मूर्च्छित पडलेली. १६. अध्याय ६० श्लोक २५-२८ पहा. १७. चिखलांतून काढण्यानें. १८. हत्तिणीचें सांत्वन. १९. वनगज. २०. कृष्णानें. २१. तिची वेणी. २२. भक्तांचा आधार. (कृष्ण.) २३. शोकाश्रूंनीं भिजलेले. (उक्षित= भिजलेले.) २४. गाल, नेत्र, स्तन, यांचीं युग्में. २५. सावध. २६. कारण. २७. कृष्णें. २८. विनोद. २९. गर्वास तापासही जावया हेतु झाला. ३०. गोड बोलणारा. ['प्रियंवद' हें उपपदसमासाचें उदाहरण होय. जेव्हां समासांतील द्वितीयपद कर्तृबोधक धातुसाधित नाम असतें तेव्हां त्या समासास 'उपपदसमास' म्हणतात; जसें:—कुंभकार, अंशहर, सामग, वृत्रहन् इत्यादि.] ३१. मत्+शब्द= माझे+शब्द. [अनुनासिक व्यंजनाशिवाय इतर व्यंजनापुढें श्कार असल्यास श्च्या स्थानीं विकल्पें छ् होतो, या 'नियमानें 'शब्द' याच्या स्थानीं 'छब्द' असा फेर झाला आहे.] ३२. हे कोमलहृदये.

कसें वदसि पाहसी [1]चलकटाक्षमोक्षेक्षण
प्रिये! [2]भ्रूकुटिशोभि हें मुख तुझें पहावें [3]क्षण, ।
असें अधरपल्लवस्फुरण लोचनीं [4]शोणता ?
गृही [5]जन तयास [6]यापरिस लाभ तो कोणता ? ॥ ८
विनोदरससागरीं रमति मीनसे [7]दंपती,
अशा कलहसांत्वनीं [8]दिवसयामिनी संपती; ।
म्हणोनि [9]परिहास हा सहज आजि केला [10]लसे,
तुझें न मुख, भीतिला न धरिं [11]नायिके! [12]लालसे!' ॥ ९
वैदर्भी [13]त्यागभीति त्यजि, पति पहिले बोलिला जे स्वदोष
[14]स्वांतीं होतेचि त्यांचीं कथुनि [15]समुचितें उत्तरें दे [16]सुतोष; ।
[17]ते कृष्णें बोलवीली [18]प्रियगुण मुरली गोड अत्यंत बोले,
श्रोत्यांचें वृंद [19]वृंदावन [20]हरिहि [21]तयामाजि अद्यापि डोले. ॥ १०

---

## अध्याय एकसष्टावा.

(श्लोक.)

जरी मिळालीं [22]रमणीनदीशतें, त्यजी निजस्थैर्य न [23]तो नदीश [24]तें, ।
[25]रसार्पणें [26]उत्सवदातयाचि [27]त्यां मिळोनि झाल्या [28]पदमात्र याचिता. ॥ १
[29]उदासीन [30]स्वामी [31]सदयवशता दाखवि [32]वैरें
[33]प्रियांतें, हें [34]त्यांच्या समजति कृपेनें [35]कविवर; ।
स्वयें मूर्ख [36]स्त्रैणं प्रभुसि म्हणती, दृष्टि [37]निवळे
न [38]ज्यांची, त्या रोग्यां दिसति [39]दरदुग्धेंदु पिवळे. ॥ २

---

१. 'मुखा'चें विशेषण. कोपानें चंचल पाहणें ज्याचें. २. वक्र भुवयांनीं शोभणारें असें (मुख). ३. क्षणभर. ४. रक्तता. ५. कुटुंबी जन. ६. या प्रेमकलहकौतुकासारखा. ७. जायापती. ८. दिवसरात्र. ९. विनोद. १०. शोभे, तुझें मुख न लसे. ११. हे गृहस्वामिणि. १२. हे मज-विषयीं लुब्धे. १३. श्लोक ३२-३३ पहा. १४. मनांत. १५. अनुरूप. १६. आनंदयुक्त. १७. ती वैदर्भी तीच मुरली. १८. जिचे गुण कृष्णास प्रिय अशी. १९. श्रोत्यांचा समुदाय तें वृंदावन गोकुल. २०. कृष्णही. २१. वृंदावनांत. २२. रमणीरूप नद्यांचीं शतें. २३. तो कृष्णच समुद्र. २४. तें पहिलें निजस्थैर्य. २५. रस=जल आणि शृंगाररस, त्याच्या अर्पणानें. २६. आनंददाता जो कृष्ण त्यासच. २७. स्त्रिया. २८. पदसेवा. २९. वस्तुत: उदासीन. ३०. कृष्ण. ३१. स्त्रीवशता. ३२. बाह्याकारें. ३३. भार्यांतें. ३४. कृष्णाच्या. ३५. ज्ञानी. ३६. स्त्रीलंपट. ३७. ज्यांची दृष्टि न निवळे, त्या रोग्यां दरदुग्धेंदु पिंवळे दिसति—असा अन्वय. ३८. ज्या रोग्यांची. ३९. शंख, दूध, चंद्र.

स्त्रीतें एक [1]सुतारत्न पुत्ररत्नेंहि दे दहा, ।
वेद [2]हा [3]सम हें सांगे [4]तें दावी [5]भेदखेदहा. ॥ ३

प्रद्युम्न प्रभुचा कुमार पहिला जो [6]मूर्त [7]चेतोजनी,
त्या [8]हृद्यासि वरि स्वयंवरवधू [9]रुक्म्यात्मजा, तो जनीं; ।
कोणा स्त्रीस न मोहिल स्वसुगुणें आधींच [10]हा [11]चारुची ?
[12]श्रीकांतात्मजताहि कां न रुचती कन्येसि [13]त्याच्या [14]रुची ? ॥ ४

[15]विच्छाय क्षिति[16]पव्रजेंदु करुनी [17]प्रद्युम्नभानू निवे,
रुक्मी दुष्ट, परंतु लाभ भगिनी संतोष मानूनि वे; ।
मागें [18]भोजकटीं विवाह करणें यालागिं ने [19]यास, [20]ती
अर्पी [21]रुक्मवती स्वयेंहि विधिनें तो [22]भागिनेया सती. ॥ ५

नामें चारुमती श्रीमद्रुक्मिणीची सुता [23]सती ।
प्राप्त झाली महाभाग्यें [24]कृतवर्मसुतास ती. ॥ ६

स्वयेंही रुक्मिणी[25]पौत्रा अनिरुद्धा [26]सुलोचना ।
[27]भगिनीप्रीतिकामें दे रुक्मी [28]पौत्रीहि रोचना. ॥ ७

स्त्रीपुत्रांसह रामकृष्ण [29]ससुहृद्वर्ग स्वपौत्रासि ते
गेले भोजकटासि, घेउनि बळें, जे दुर्जना त्रासिते, ।
झाला तेथ विवाहउत्सव जगीं आश्चर्य तो, टाकली
नाहीं रुक्मिखळें कुबुद्धि, रचिला दाटून मोटा [30]कली. ॥ ८

---

१. कन्यारत्न. २. ईश्वर. ३. समदृष्टि. ४. समत्व. ५. भेदखेदनाशक (कृष्ण.) [भेदखेदहा—हन् (मारणें, नाश करणें, धातु शब्दांस लागून कर्तृवाचक नामें होतात; जसें:—वृत्रहन् (वृत्रहा—इंद्र), मधुहन् (मधुहा—कृष्ण) शोकापह, तमोपह.] ६. देहधर. ७. मदन (ज्याचा जन्म (जनि) चित्तांत आहे असा; मनसिज.) ८. सुंदरासि. ९. रुक्मीची कन्या रुक्मवती ती. ही प्रद्युम्नाची दुसरी स्त्री-हिचाच पुत्र अनिरुद्ध होय. १०. प्रद्युम्न. ११. सुंदरच. १२. लक्ष्मीपतीचें पुत्रत्वही. १३. रुक्मीच्या. १४. लावण्य. १५. निस्तेज, गतप्रभ. [छाया=कांति; 'छाया सूर्यप्रिया कांतिः प्रतिबिंबमनातपः' इत्यमरः.] १६. राजसमुदायरूप चंद्र. १७. प्रद्युम्नरूप सूर्य. [हें रूपकालंकाराचें उदाहरण समजावें.] १८. तन्नामकपुरींत. १९. प्रद्युम्नास. २०. कन्या. २१. ही रुक्मीची कन्या. प्रद्युम्नाचें लग्न मामाच्या कन्येशीं झालें. २२. भगिनीपुत्रास. [भागिनेय—'एय' प्रत्यय अपत्यार्थक आहे; भगिनी—भागिनेय, अत्रि—आत्रेय, रोहिणी रौहिणेय, इत्यादि.] २३. श्लोक २३ पहा. २४. कृतवर्म्याच्या पुत्रास. २५. नातू. (प्रद्युम्नाचा पुत्र अनिरुद्ध.) २६. सुनयना. २७. बहिणीची प्रीति संपादावी या इच्छेनें. २८. रोचना नामक नातीला. २९. आपल्या मित्रसमूहासह. ३०. कज्जा.

जे रुक्मिप्रिय भूप त्यांतहि सखा कालिंग, त्या [१]मांकडा
पाजी दुर्मति मद्य, दे [२]खळ पिशाहातिं स्वयें कांकडा; ।
'बंधो! [३]शौरि अजिंक केवळ रणीं, कीं ठाउकें हे तुला?
याच्या जाणतसें पराभव करायाच्या स्वयें हेतुला. ॥ ९
[४]अक्षज्ञत्व नसे तरि [५]व्यसन तें मोठें; असा [६]सांबळा
हा वृष्णीश पराभवास कपटें देईल फांसा [७]बळा, ।
[८]यों, घेऊं उगवूनि सर्व उसणें, मागील जें आजि तें,
युद्धांतील [९]भवद्विडंबन सदा अस्मन्मनीं [१०]डांजितें'. ॥ १०
व्हावा ईश्वरहस्तानें जाणो वध [११]महाबळा ।
[१२]बाहे असा असाधूक्तें रुक्मी अधम हा [७]बळा. ॥ ११
[१३]वृष्णिव्याघ्रपराभवेच्छु सजला रुक्मी [१४]महातू, [१५]हली
त्या द्यूतीं [१६]शतदिक्शतायुत पण स्थापी [१७]सुकौतूहळी, ।
जिंकी ते [१८]ग्लह तो कलिंग नृपति, [१९]श्रुत्यंतसारा [२०]सभा-
स्तारामांजि हंसे, [२१]तुरंगमपती माने कसा [२२]रासभा? ॥ १२
एकद्वित्रि[१८]ग्लहांतें हरुनि बहु निजोत्कर्ष त्या रुक्मयानें
दावूनी, लक्षसंख्या [२३]स्मय करुनि पणीं लाविलें [२४]रुक्म [२५]यानें, ।
जिंकी [३]ईश ग्लहा तों, खळ अनृत म्हणे, 'बोल तो राम हाही,
जैसें तें जिंकिलें म्यां,' तंव कुपित गमे [३]देवें जैसा [२६]महाही. ॥ १३
रुक्मी द्यूतांत बोले अनृत, 'अजित तो राम ज्या ज्या पणातें
जिंकी त्या जिंकिलें म्यां'. म्हणुनि खळ जनीं मानवे आपणातें, ।
हांसे कालिंग जाणो प्रभुशुचिभजकावांचुनी अन्य कोण
[२७]द्वेषी जिंकील? कोपें नयनयुग तदा होय अत्यंत [२८]शोण. ॥ १४

१. रुक्मी हाच मांकड त्याला. २. कालिंग. ३. कृष्ण. ४. द्यूत करण्याचें निपुणत्व. ५. अक्षद्यूतासक्ति. छंद, नाद. ६. भोळा. ७. बळरामास. ८. येवो. ९. तुझी दुर्दशा. १०. खुपतें, झोंबतें. ११. हें बळरामाचें विशेषण. १२. हाक मारी. (द्यूत खेळण्यासाठीं.) १३. वृष्णिव्याघ्र बळराम त्याच्या पराभवाची इच्छा धरणारा. १४. मोठा बोका. (महा+आतु.) १५. बळराम. १६. शंभर सहस्र दशसहस्रसंख्य. १७. उत्तम कौतुक दाखविणारा. १८. पणद्रव्य. १९. वेदांतसारभूत (रामा.) २०. सभासदांमध्यें. २१. उत्तम घोडा, अश्वरत्न. २२. गाढवास. २३. आश्चर्यहास्य. २४. सुवर्ण. २५. रुक्मीनें. २६. मोठा सर्प. २७. शत्रु. २८. रक्तवर्ण.

जाल्या रक्तचि नेत्रयुग्म विभुचें तें तापलें हेमही[1],
पावे तें[2]तुलना न, भीति धरुनी कांपे तदा हे मही[3]; ।
मांडी आपण हा पण द्रविण दिक्कोटि[4] ग्लहा याहि[5] मी
जेता[6] पाप[7] म्हणे विलंघिलचि जो त्याची न माया हि मी. ॥ १५
जो धर्में[8] जिंकिला रामें सर्वांदेखत हा पण, ।
'जिंकिला म्यां' म्हणे रुक्मी अधर्में जित आपण.[9] ॥ १६
जे तेथें निजपक्ष दुर्जन, म्हणे रुक्मी तयां, 'कां न या
सांगा हो! हळपाणिला[10] बुडवितां जाणोनियां कां नया[11]?' ।
तों तत्काळचि गर्जली असि नभोवाणी[12] 'न रुक्मी, पणा
जिंकी रामचि सत्य हें, खळ वृथा कां दावितो मीपणा?' ॥ १७
ऐसें सत्यचि बोलली जरि नभोवाणी[12] न मानी[13] तिला,
काळग्रस्त खळ स्वयें मग वदे सोडूनियां नीतिला, ।
'अक्षज्ञ[14] क्षितिनाथ[15], गोपचि[16] तुम्ही रानीं कवी[17] रानट,
क्रीडा अक्षशरीं[18] नृपासि उचिता, जिंकी न वीरा[19] नट[20].' ॥ १८
हंसातें हांसिलेंही[21], तरि गुणयश तें नाशिलें काय कोंकीं[22]?
त्याचें अज्ञान तें हें विदित, परि रुचे कोप सन्नायका[23] कीं? ।
सद्धर्मत्राण पापक्षपण[24] पण कसा व्यर्थ होय? क्षमेला
सोडी कारुण्यसिंधू जन म्हणुनि असा याकरें लक्ष मेला. ॥ १९
स्वाधिक्षेप[25], सभेंत हांसति कुधी[26] कालिंगभूपादि जे,
आणी राम मनीं तयांप्रति फळा कर्मानुरूपा[27] दिजे[28]. ।

---

१. सोनें. २. त्याचें साम्य. ३. पृथ्वी. ४. दहा कोटी. ५. या पणाचाही. ६. जिंकणारा. ७. रुक्मी. ८. न्यायानें, नीतीनें. ९. आपण जित असून म्यां जिंकिला असें अधर्में म्हणे. १०. बळरामास. ११. नीतीला. १२. आकाशवाणी. (श्लोक ३२.) १३. रुक्मी तिला न मानी. १४. अक्षकोविद. १५. राजा. १६. गौळी. १७. अरण्यपंडित. १८. फांसे आणि बाण यांहीं. १९. शूराला. २०. शूराचें सोंग घेणारा. २१. काकानें हांसिलेंहि. २२. कावळ्यांनीं. हा चरण सुभाषितरूप आहे. [हें अवज्ञा नामक अलंकाराचें उदाहरण आहे. जेव्हां एका वस्तूच्या गुणांनीं अथवा दोषांनीं दुसऱ्या वस्तूला त्या गुणदोषाची प्राप्ति होत नाहीं तेव्हां अवज्ञालंकार होतो. जसें:—शंकरानें चंद्राला मस्तकीं घेतलें म्हणून सूर्याची काय हानि झाली? कमळें मिटलीं म्हणून चंद्राची काय हानि झाली?.] २३. साधुनायक बळरामा. २४. पापाचा निरास करणें. २५. निजनिंदा. २६. दुर्बुद्धि. २७. कर्माप्रमाणें. २८. दिलें पाहिजे.

घाली रुक्मिशिरावरी [1]परिघ तो तात्काळ 'पापा! मर'
क्रोधें ईश म्हणे 'धरी' परि वरी ना [2]तत्कृपा [3]पामर. ॥ २०
धरी कालिंगातें, [4]खगपति जसा साप [5]दशमीं
पदीं तो, ध्याती [6]यत्पद [7]दलितदासापद [8]शमी, ।
हंसे दावी जो कीं धरुनि हृदयीं उत्सव [9]रद
स्वयें ताडी [10]पाडी सकळ [11]हतसत्कुत्स वरद. ॥ २१
लोळती बहुत [12]भूवरि, घाया पावुनी, [13]विवरें भूप [14]रिघाया, ।
पाहती उदरें कां परिवाया भू म्हणेल कसि भी परिवा या. ॥ २२
न दे जागा पोटीं विनविति जरी भूप [15]महिला
[16]असो [16]जाया, ठेवी पतिस उदरीं काय [17]महिला? ।
कदा न स्पर्शाया [18]पतित पतिला दे वपु [19]सती,
[20]क्षमा हे साध्वी हे म्हणुनि [21]इसे [22]भूदेव [23]पुसती. ॥ २३
मानसीं [24]हरि म्हणे, 'वध मातें मानला, उचित या [25]अधमातें.' ।
[26]साध्वसाधु न वदे, परि साहे, रीति [27]विश्वगुरुची परिसा हे. ॥ २४
'[28]लोभक्रोधानृताचें गृह बुध म्हणती द्यूत, ठावेंचि [29]आर्या,
बाहे दाटूनि रुक्मी खळवध [30]पहिला जन्मलों याचि [31]कार्या; ।
हें [32]साधु [33]स्वाग्रजाचें सुचरित म्हणतां, [34]बंधुशोकार्त [35]योषा,
खोटें केलें म्हणावें, तरि [36]गुरु तुरवी मौन सर्वांहि दोषा'. ॥ २५
वागवि [37]प्रभुहि [38]रुक्मिणीबळस्नेहभंगभय कृष्ण केवळ, ।
आवडी बहुत साधुरीतिची, कीं असे तसिच [39]माधुरी तिची. ॥ २६

---

१. गदा. २. रामकृपा. ३. रुक्मी. ४. गरुड. ५. दहाव्या पावलीं. ६. ज्याचे चरण. ७. दासांची आपत्ति नाशणारें. (पद.) ८. योगी. ९. दांत. १०. दांत पाडी. ११. साधूंची निंदा न होऊं देणारा. १२. भूमीवर. १३. द्वार. १४. शिराया. १५. पृथ्वीला. १६. पत्नी पोटीं जागा देवो. १७. भोग्य स्त्री. १८. पडलेला किंवा भ्रष्ट अशा पतीला. १९. साध्वी. २०. पृथ्वी, भू. २१. भूमीस. २२. ब्राह्मण. २३. आदरिती. २४. कृष्ण. २५. रुक्मीतें. २६. साधु+असाधु=बरें+वाईट. २७. कृष्णाची. २८. लोभ, राग आणि असत्य यांचें सदन. २९. बळरामास. ३०. हाच पहिला खळवध. ३१. खळवध करण्यास. ३२. चांगलें, उत्तम. ३३. आपल्या ज्येष्ठ भावाचें (बळरामाचें.) ३४. भावाच्या शोकानें पीडित. ३५. स्त्री. (रुक्मिणी.) ३६. बळराम. ३७. कृष्णही. ३८. रुक्मिणी, बळराम यांच्या स्नेहभंगाचें भय. (श्लोक ३८). ३९. गोडी.

व्याही रुक्मी, तयाचे प्रियसख नृपही जे वऱ्हाडी, [1]तदंगें
लग्नांतीं खेळ होतां, सहजचि कुतुकें रंगिलीं [2]साधुरंगें, ।
[3]सच्चित्तें तोषवीलीं, हित करुनि बळें यादवेंद्रें [4]अभंगें,
नेली [5]पौत्रांगना ती मग [6]निजनगरा [7]रोचनाख्या [8]स्वसंगें. ॥ २७

---

## अध्याय बासष्टावा.

(श्लोक.)

[9]मागे [10]भूं [11]द्विजबाळरूप हरि [12]ज्यापासीं, असा जो बळी
[13]यत्कीर्ति त्रिजगीं फिरे, जरि शिवे सर्वा, तरी [14]सोवळी. ।
[15]त्याच्या [16]पुत्रशतांत [17]अग्रज [18]बळी [19]बाणाख्य, दे [20]शंभु [21]जो
भक्तालागिं [22]सहस्र [23]वज्रदलनप्रौढप्रतापा भुजा. ॥ १
[24]तो [25]सन्मान्य [26]वदान्य सज्जन सुधी [27]सत्यप्रतिज्ञ [28]व्रती,
आज्ञाधारक देव सेविति सदा दासापरी ज्याप्रती; ।
राहे [29]स्वर्गवरीं [30]स्वशोणितपुरीं जो [31]तांडवीं [32]ईश्वरा
वाद्यें वाजवि तोषवी 'निजपुरीं [33]ये' याचि मागे वरा. ॥ २
कैलास त्यजुनि स्वयें [34]सगण त्या [35]भक्तालया [36]ये क्षण,
[37]स्वांघ्र्यंभोजवियोग दे न [38]भजका [39]वन्हींदुसूर्येक्षण; ।

---

१. त्यांच्याशीं, त्यांच्याबरोबर. २. साधुजनाचीं सभास्थानें. ३. साधूंचीं मनें. ४. अपराजितें. ५. पौत्राची (नातवाची–अनिरुद्धाची) अंगना (भार्या.) ६. द्वारकेला. ७. रोचना आहे आख्या (नांव) जिची ती. ही भीष्मक राजाची प्रपौत्री आणि रुक्मी राजाची पौत्री. ८. आपल्या बरोबर. या अध्यायांत कृष्णाची पुत्रपौत्रादिसंतति, अनिरुद्धरोचनाविवाह, आणि बळरामहस्तें रुक्मिवध यांचा समावेश केला आहे. ९. याची. १०. भूमि. ११. विप्रबालकाचें रूप धारण करणारा बटु, वामन. १२. ज्या बलिराजापाशीं. १३. ज्या बलीची कीर्ति. १४. निर्मल, शुद्ध. १५. त्या बलीच्या. १६. धृतराष्ट्र, सूर्य, चंद्र, चंद्रांशुतापन, गुर्वक्ष इत्यादि शतपुत्र होते. १७. ज्येष्ठ. १८. बलाढ्य. १९. बाणनामक. २०. शंकर. २१. ज्या. २२. सहस्र (भुजा). बाण सहस्रबाहु होता. २३. वज्राच्या फोडण्याविषयीं प्रौढ ज्यांचा प्रताप अशा भुजा. २४. बाण. २५, साधुमान्य. २६. दानशौंड. २७. सत्यसंध. २८. जितेंद्रिय. २९ स्वर्गाहून श्रेष्ठ अशा. ३०. शोणितनामक स्वपुरांत. ३१. नाचांत. ३२. महादेवास. ३३.माझ्या पुरास त्वां यावें हाच वर मागे. ३४.अनुचरांसह. ३५. शोणितपुरा. ३६. येता झाला. ३७. स्व+अंघ्रि+अंभोज+वियोग=निज+चरण+कमल+विरह. ३८. भक्ता. (बाणा.) ३९. अग्नि, चंद्र, सूर्य, हे नेत्र ज्याचे असा. (शिवविशेषण.)

रक्षी बाणपुरा पुरारि[1] भगवान्, दासासि झाला वश,
द्वास्थ[2] श्रीश[3] जया,[4] तदीय[5] सुत जो विख्यात हें तद्यश.[6] ॥ ३
तो एके समयीं नमी शिवपदा साक्षात् सुधेच्या सरा,[7]
जेथें मीन मुनींद्र, कामकपिला,[8] [9]जें ज्याचिया वांसरा[10] ।
भूदेवा[11] उपमन्युला[12] चषकसा[13] श्रीजानिचा[14] सांसरा,[15]
ज्याचा ब्रह्ममुखामरास[16] अथवा विश्वास या आसरा. ॥ ४
'शंभो[17]! जो तुझिया पदीं धरी सदा भावा[18] अमंदा[19] रजें,[20]
यांचीं[21] देति फळें, न देति वरदा! संतान[22] मंदार[22] [23]जें, ।
जेथें अक्षम[24] शेषही, गुण कसे आम्ही वदावे? दया-
सिंधो! मौनें[25] वरी समर्थहि परी गातां पदा[26] वेद यां. ॥ ५
हे शंभो! हे दयासिंधो! हे महादेव! कांसया[27] ।
सहस्रभुज हा भार दिधला सेवकास यां[28]? ॥ ६

---

१. शिव. २. द्वारपाल. ३. लक्ष्मीपति. ४. ज्या बळीला. ५. त्या बळीचा. ६. त्या बाणाचें यश. ७. सरोवराला. ८. कामधेनुरूप. ९. जें पद. १०. भक्ता. ११. विप्रा उपमन्युला. १२. उपमन्यु याची कथा अशी आहे:—"वसिष्ठकुलोत्पन्न व्याघ्रपादनामक ऋषि, त्याच्या दोन पुत्रांतील ज्येष्ठ, धौम्य ऋषीचा ज्येष्ठ भ्राता हा, बाल असतां, आपल्या भ्रात्यासहवर्तमान प्राय: स्वगृहींच क्रीडा करीत असे. एकदां बंधूसहित दुसऱ्या एका ऋषीच्या आश्रमांतील मुलांसमागमें क्रीडा करीत असतां, तेथें यानें धेनूस दोहन करितां पाहिलें, व क्षीर अवलोकन करून, तेथील मुलांच्या मातेनें आपल्या मुलांस तें दिलें, त्यांत यास व याच्या भ्रात्यासही दिलें. तें भक्षण केल्यावर, हा स्वगृहीं आला, आणि मातेपाशीं तसेंच क्षीर मागूं लागला. तेव्हां याच्या मातेनें, आपल्या नित्याच्या क्रमाप्रमाणें उदकांत पिष्ट कालवून, यापुढें ठेविलें. असतां 'हें दुग्ध मला नको, तर, काल जसें मीं अमुक आश्रमीं भक्षण केलें, तसें दे,' असें म्हणूं लागला. तें याचें भाषण ऐकून, माता खिन्न होऊन यास बोलली कीं, 'तसें दुग्ध मिळण्याजोगें तुमचें सुकृत नाहीं; कारण पूर्वजन्मीं तुम्हांस ईश्वराराधन घडलें नाहीं. त्यावरून यानें ईश्वराराधन करून, आकल्प आयुष्य व क्षीरसागराचें आधिपत्य, अशीं संपादन केलीं. याची गणना शैवांत असून, कृष्णानेंही यापासून शैवी दीक्षा घेतली होती. (भारत—अनुशासनपर्व—अध्याय १४ वा.) हा तंडी ऋषीचा शिष्य." (भा. प्रा. ऐ. को.) ही उपमन्युकथा सौरपुराणांतही आढळते. [सौरपुराण—अध्याय ३६ पृष्ठ ११९-१२३.] १३. पानपात्रवत् दिला. १४. विष्णूचा [श्री जाया यस्य स श्रीजानि: असा विग्रह करण्याचा प्रचार आहे.' यास आधार 'जायाया निङ्' (५।४।१३४) हें सूत्र आहे]. १५. क्षीरसागर. १६. ब्रह्मा आहे प्रमुख असे जे अमर (देव) त्यांस. १७. हें बाणाचें नमनपूर्वक भाषण आहे. १८. विश्वास, भक्ति. १९. पूर्ण. २०. रज:कण. २१. या पदाचीं (रजें). २२. कल्पतरु. २३. जें फळ न देती. २४. असमर्थ (वर्णन करण्यास). २५. वेद मौन वरी—असा अन्वय. २६. या पदा. २७. कशासाठीं. २८. या बाणाला. (श्लोक ८.)

असावा [1]प्रतियोद्धा जो तुझियासारखा, [2]जया ।
युद्धीं न मृत्युभी, बाहुसहस्रा फार [3]खाज या. ॥ ७
धाकें [4]दिग्गजयूथ दूरचि [5]दडे, काळासि [6]कंठी, [7]रव
[8]श्रोत्रीं ऐकुनि [9]तें पळेचि, मजला मानूनि [10]कंठीरव, ।
[11]अद्रींचें स्वभुजप्रहारसहनीं भावूनि [12]गाढें कुळ
स्पर्शीं लज्जित जाहलों [13]पुरहरा ! तें काय गा! ठेंकुळ?' ॥ ८
ऐसें [14]निस्तुलवीर्य [15]दुर्मद वदे [16]दोर्दंडवीर्यव्यया
इच्छी, दुर्लभभाग्यनाशचि गमे चित्तीं [17]महाभव्य [18]या. ।
हांसे ऐकुनि मूढभाषण बहु श्रीशंकर क्षोभला,
त्या मत्तासि म्हणे, 'अभीष्ट तुज [19]हें, बाणा! भला हो! भला. ॥ ९
वत्सा! मत्सम वीर धीर समरीं, जो कीं न [20]धाके तुला,
तो भेटेल, घडेल भंग तुझिया या जेधवां [21]केतुला. ।
हेंचि [22]प्रेक्षितें ठाक, [23]भाक तुजला देतों.' म्हणे, 'हा [24]शय
स्वांगें पूर्ण न कां मनोरथ करूं? जाणोनि [25]दासाशय.' ॥ १०
ऐकुनि ऐसें बहु मूढ हर्षला म्हणे, 'सुधेचा घन आजि वर्षला.' ।
जसें शिवाला [26]भवसिंधुसेतुला पाहे सदा बाण, तसेंचि केतुला. ॥ ११
तयाच्या कुळाची [27]महारत्नभूषा असे कन्यका जे, तिचें नाम ऊषा, ।
घडे [28]प्रागदृष्टश्रुतें तीस योगें [29] दिला [30]स्वप्नलब्धानिरुद्धें [31]रतिभोग. ॥ १२
होती हो! [32]तीर्थकीर्ति [33]प्रभुपदकमळा [34]स्वर्धुनी जेंवि, ऊषा
कन्या बाणासुराला, [35]गुणमणिखनि [36]तद्वंशसद्रत्नभूषा, ।

---

१. बरोबर युद्ध करणारा. २. ज्या योद्ध्याला. ३. कंडु. ४. दिशांचे आधारस्तंभ असे गज [गज]ांचा कळप, दिग्गजांचा समूह. ५. लपे. ६. घालवी. ७. शब्द. ८. श्रोत्र=कान. ९. तें गजकुल [पळ]ळे. (श्लोक ९.) १०. सिंह. ११. पर्वतांचें कुळ. १२. दृढ. १३. हे शिवा. १४. निरुपमशौर्य. [१]५. मदोन्मत्त. १६. भुजदंडबलाचा नाश. १७. मोठा लाभ. १८. या बाणाला अलभ्यदैवनाश [क]ल्याणप्रद वाटे. १९. हेंच तुला आवडतें काय. २०. भिई, धाक मानी. २१. ध्वजाला. (श्लोक [१]०.) २२. पहात बै . २३. वचन. २४. हा माझा हात. २५. भक्ताचा आशय. २६. भवसिंधूचा [से]तु जो शिव त्याला. २७. महारत्नाप्रमाणें शोभा देणारी. २८. पूर्वी न पाहिला, न ऐकिला (अ-[नि]रुद्धें.) [हेंच पद मूळांत आहे.] २९. संयोग. ३०. स्वप्नांत प्राप्त झालेल्या अनिरुद्धानें (प्रद्युम्न-[पु]त्रानें). ३१. रतिभोग. ३२. पवित्र कीर्ति. ३३. विष्णुपदकमळा. ३४. गंगा. ३५. गुणरत्नाकर. [३]६. त्याच्या वंशाला उत्तम भूषणभूत अशी.

वर्णावें सद्गुणाची म्हणुनि किति तरी? कीं दहा वेळ लीला-
काळींहि श्री**शि**वांकावरिहि उपजल्यापासुनी खेळलीला. ॥ १३

ऊषेला [1]**अ**निरुद्ध दे रतिसुख स्वप्नांत [2]**आ**र्यावरें,
भोगावी तसि भोगिली [3]सुरुचिरें ती जेंवि भार्या [4]वरें, ।
जागी जों मग होय [5]तोयजमुखी तों [6]तो नसे जे [7]वरी,
पाय प्रेमवतीस ते दिसति त्या गेहीं न [8]सेजेवरी. ॥ १४

'[9]अयि! [10]क्वांसि क्वांसि प्रियतम!' असें गद्गद [11]वदे,
रडे, लाजे, ताप प्रबळ [12]पतिविश्लेषदव दे; ।
[13]प्रभूतस्वेदाश्रुस्नपिततनु ती, सेज भिजली,
उठे [14]भ्रांतस्वांतें गडबडुनि आली, न निजली. ॥ १५

मंत्री **कुं**भांड, त्याची [15]कुशलमति सुता **चि**त्रलेखा [16]तदाली
झाली जागी, उरासीं धरुनि [17]तिसें पुसे, शुद्धि तेंव्हांचि आली, ।
ऊषा [18]स्वस्वप्नवृत्त [19]प्रियतमविरहक्लेश सांगे सखीला,
[20]लीलासौंदर्य वर्णी बहु निजपतिचें [21]बाष्पकंठी सुशीला. ॥ १६

अश्रूतें **चि**त्रलेखा पुसुनि तिस म्हणे, '[22]नीरजाक्षि! प्रयास
स्वांगें भोगीन, सुभ्रू! [23]व्यसन हरिन मी, आणिन क्षिप्र [24]यास, ।
त्रैलोक्यामाजि मात्र प्रियसखि! परि त्या [25]चित्तचोरें असावें,
पत्रीं लोकत्रयींचे पुरुष लिहिन, ते त्वां पहाया [26]बसावें.' ॥ १७

[27]लिहिले देव गंधर्व सिद्ध चारण पन्नग, ।
दैत्य [28]विद्याध्र यक्षादि, मनुष्य लिहिले मग. ॥ १८

ऐसें हें [29]कुशलत्व अद्भुत कसें **कुं**भांडजा लाधली?
[30]**वाणी** [31]**वि**घ्नप **चि**त्रगुप्त इतरा नाहीं कळा साधली; ।

---

१. कृष्णाचा नातू. २. गौरीच्या वरें. ३. सुंदरें. ४. भर्त्यानें. ५. कमलवदना. ६. अनिरुद्ध. ७. स्वीकारी. ८. शय्येवर. ९. हे प्राणप्रिया. १०. कोठें आहेस. ११. ऊषा वदे. १२. पतिवियोगाग्नि. १३. बहुत घाम आणि अश्रु यांनीं जिची तनु भिजली अशी. १४. धावऱ्या मनानें. १५. चतुरबुद्धि. १६. तद्+आली=तिची सखी. १७. ऊषेला. १८. आपल्या स्वप्नांतील हकीकत. १९. दयितविरहदु:ख. २०. क्रीडालावण्य. २१. रडणारी. [बाष्प आहे कंठांत जिच्या अशी.] २२. नीरज+अक्षि=कमल+नेत्रा. २३. दु:ख. २४. तुझ्या प्रियास. २५. चित्त हरण करणारा, मनोहर्ता. (अनिरुद्ध.) २६. श्लोक १८ पहा. २७. श्लोक १९ पहा. २८. विद्याधर. २९. पत्रलेखनपटुत्व, चित्रकलाकुशलत्व. ३०. सरस्वती. ३१. गणपति.

होती त्याचि पुरांत विश्वजननी **गौरी सती**, [1]चाकर
[2]क्षाळाया वरदांस होय बहुधा पायांस तीचा कर. ॥ १९
मनुष्यांच्या ठायीं सकळहि तिनें **वृष्णि** पहिले,
तसा **शौरी**, त्याचे सुत **बळ हरी** तेहि लिहिले; ।
घनश्यामीं **कृष्णीं** कनकवसनीं चित्त जडलें,
[3]त्रपेंत [4]प्रद्युम्नानन निरखितां चित्त पडलें. ॥ २०
ऊषा स्वस्थ स्वचित्तीं, बहुत निरखुनी [5]**श्री**निवासास, राहे,
लाजे **प्रद्युम्न** पाहे, जइं तइं समजे आपुला सासरा हे. ।
[6]स्वप्नप्राप्ता**नि**रुद्धाप्रति मग लिहितां वोळखे, [7]आणिला जे
मानी, ती कां न हांसे? मुख फिरवि, करी कोपही, आणि लाजे.॥२१
**कृष्णाचा अनिरुद्ध** पौत्र[8] कळतां ती [9]योगिनी धांवली,
शीघ्र **द्वारवतींत** [10]अंबरपथें जाऊनियां पावली; ।
होता तो तइं सुप्त, गुप्त उचली पर्यंकचि, त्रासती
ज्याला दैत्यहि घे करीं जसि सुखें निःशंक चित्रास ती. ॥ २२
रक्षी [11]**त्र्यक्ष** तयाहि **शोणितपुरीं बाणासुराच्या** घरीं,
[12]शुद्धांतींहि सखी सखींत निजली होती, तिच्या [13]अंतरीं ।
जो स्वप्नांत शिरे, हरी मन, पळे सिंधूंत [14]दुर्गीं दडे,
त्या चोरासहि चोरिलेंचि मुलिनें, दुःसाध्य योगें घडे. ॥ २३
[15]पर्यंकासह सत्वर प्रिय सखीगेहांत नेला, दिला,
मोठा [16]मोदहि साधिती [17]सुहृद ज्या तो अर्थ संपादिला; ।
'खंडावा [18]दशनीं नखीं, भुजगुणीं बांधोनियां, [19]आलि! या
तूं सोडूंचि नको,' म्हणे स्मितमुखी, 'चोरा [20]करां [20]आलिया'. ॥ २४

---

१. सेवक. २. बहुधा वरदांस (गौरीच्या) पायांस क्षाळाया तिचा कर चाकर होय; गौरीप्रसा- नें ही विद्या तिला प्राप्त झाली होती—हें तात्पर्य. ३. लज्जेंत. ४. प्रद्युम्नाचें मुख. [हा प्रद्युम्न सा- रा होय म्हणून ऊषा लाजली.] ५. कृष्णास. ६. स्वप्नांत मिळालेल्या अनिरुद्धास. ७. समीप ाणिलाच असें जी मानी ती. ८. नातू. ९. चित्रलेखा. (योगप्रभावाचा आश्रय करणारी=योगिनी.) ०. आकाशमार्गें. (श्लोक २२.) ११. शिव. [त्रि+अक्ष=तीन डोळे ज्यास तो, विरूपाक्ष.] २. जनानखान्यांतही. १३. मनांत. १४. दुर्गम किल्ल्यांत. १५. पलंगासुद्धां. १६. हर्षही. ७. मित्र. १८. दांतांनीं. १९. हे सखी. २०. हातीं सांपडलेल्यास.

इच्छाभोजन पान भक्ष्य शयन[1] स्रग्गंध[2] वस्त्रें, उणा
नाहीं एक पदार्थ, कीं बहु दिसां आला सखा पाहुणा. ।
सांगावें नलगेचि, बाणतनया जाणे मनींच्या खुणा,
नेणे काळ[3], मुकुंदपौत्र[4] भुलला प्राणप्रियेच्या गुणा. ॥ २५
करि वश अनिरुद्धस्वांत[5] ती राजकन्या[6],
सकळ चरित जाणे चित्रलेखा, न अन्या; ।
पतिरतिसुखलाभें शोभला फार काय[7],
प्रगटि[8] न परि झांके सौरभोद्गार[9] कांय[10]? ॥ २६
गृहा जे रक्षाया शुचि कुशल होते भट[11], कळे
तयां हें आकारें[12], परहृदय सारें अटकळे[13]; ।
न तें ठावें झालें, परि नृपतिकन्या यदुहिता[14]
वरी, ऐसें भासे; करि परम अन्याय दुहिता[6]. ॥ २७
एकांतीं बद्धपाणी[15] भट[11] कळविति तें वृत्त[16] बाणासुरासी,
प्राशी तो मोह पावे, सुविमळ कुळ कीं, होय वार्ता सुरासी[17] ।
[18]जीं झालीं अग्निकुंडें[19] अभिनव कथितां फार अन्याय दूतीं[20]
नेत्रें[21] जातां पहाति प्रकटचि सदनामाजि कन्या[6] यदू[22] तीं[21]. ॥ २८
[23]श्रीकांतात्मज काम तत्तनुज[24] हा जो वोतिलासा रसें
भूभृद्भिन्मणिकांतिच्याचि[25], नयनें तीं स्वर्णदीसारसें[26], ।
वक्त्रीं[27] कुंतल[28]कुंडलस्मितसुधाशोभा, जरी रांगला[29],
वक्षीं[30] [31]क्षीरधिच्या तरी विधु[32] न त्या आस्यापुढें[33] चांगला. ॥ २९
[34]उत्कर्षासहन स्वयें भुजग[35] जे, [36]त्यांहीं रणीं बांहुनी[37],
केला [38]श्रीपण, तो गमें सुकुतुकें[39] त्या जिंकिला बांहुनीं[40]; ।

१. शय्या. २. माला आणि चंदन. ३. किती दिवस गेले न जाणे. ४. अनिरुद्ध. ५. अनिरुद्धाचें अंतःकरण. ६. उषा. ७. देह. ८. प्रकट करी. ९. सुगंधिक ढेंकर. १०. प्रश्नार्थक अव्यय. ११. शिपाई. १२. दंतक्षतादि चिन्हांनीं. १३. समजे. १४. यादवांचें हित करणारी. १५. बद्धांजलि, हात जोडून. १६. विरुद्धाचरण. १७. मद्यशी. १८. जीं नेत्रें. १९. अग्निकुंडासारखीं लाल. २०. दूतांनीं. २१. तीं नेत्रें. २२. अनिरुद्ध. २३. कृष्णाचा पुत्र. २४. त्या कामाचा पुत्र. २५. इंद्रनील मण्याच्या कांतीच्या रसानें ओतलेला. २६. गंगेंतील कमळें. २७. मुखीं. २८. कुरळ केस कुंडलें आणि हास्यामृत यांची शोभा. २९. खेळला. ३०. हृदयावर. ३१. क्षीरसमुद्राच्या. ३२. चंद्र. ३३. त्या अनिरुद्धाच्या मुखापुढें. ३४. परोत्कर्ष न सोसणारे. ३५. सर्प. ३६. त्या भुजंगांनीं. ३७. बोलावून. ३८. शोभा मिळविण्याचा पण. ३९. कौतुकानें, सहजगत्या. ४०. ज्याच्या भुजांनीं.

वर्ण श्यामळ, पीत वस्त्र कटिचें, तें कांति दावी जशी
[1]स्वर्णाची बहु शोभवी [2]सुरुचि ती त्या [3]नीरदा वीजसी. ॥ ३०
माळा पुष्पमयी विलाससमयीं वक्षस्थळीं लोळली,
कांतेच्या कुचकुंकुमें करुनियां आलिंगनीं घोळली; ।
या भाग्येंचि जरि प्रियाहि उतरे बाव्हंतरीं राहिली,
ती [4]शीता, परि तापदा प्रकट त्या **बाणासुरें** [5]पाहिली. ॥ ३१
ओष्ठीं [6]तांबूलराग, [7]स्मितसुभगमुखीं [8]नर्म, हस्तांत फांसे,
क्रीडासक्त [9]प्रियाहि [10]प्रियतमवचनें हर्ष पावोनि हांसे; ।
[11]भोगस्वेदोदकाचा [12]सुरुचिर मिरवे [13]बिंदुसंदोह [14]भाळीं,
हें पाहे **बाण, बाणासुरमुखहि** [15]यदुव्याघ्र तो त्याचि काळीं. ॥ ३२
आला घेउनि [16]शस्त्रपाणि [17]नृपती हा; तृप्ति [18]या [19]ज्या रसें
तें दावूं श्वशुरासि कीं स्वहृदयीं जाणे मला [20]जारसें, ।
ऐसें तो **अनिरुद्ध** जाणुनि मनीं, [21]प्राणप्रिया भी, तिला
सांगे, ‘धैर्य धरीं, हरील दयिते! [22]शुद्धक्रिया भीतिला.’ ॥ ३३
स्वकन्येच्या ठायीं [23]सदय परि झालाचि [24]विटता,
वृथा कल्पी शुद्धीं [25]नृपति **अनिरुद्धींहि** [26]विटता; ।
धराया [27]रायाचे भट झटत येतांचि जवळी
[28]खेळघ्नाचा [28]नातू [29]परिघ अरिघातार्थ [30]कवळी. ॥ ३४

१. सोन्याची. २. उत्तम कांति. ३. मेघास. ४. शीतळ. ५. हें विभावना अलंकाराचें उदाहरण आहे. कारणाशिवाय जेथें कार्याची उत्पत्ति होते तेथें **विभावना** हा अलंकार होतो. जसें, लाक्षारस न लावतांही पाद आरक्त दिसतो. येथें लाक्षारससेचन हें कारण नसतां रक्तस्वरूप कार्य सांगितलें म्हणून हा विभावनालंकार होय. तसेंच प्रस्तुत पद्यांत माला ही शीत असतां तापद वाटली म्हणजे तापाचें कारण नसतां तसें कार्य उत्पन्न झालें असें वर्णन आहे म्हणून हा विभावनालंकार होय. कारणाचें असमग्रत्व असतां कार्योत्पत्ति, प्रतिबंधक कारण असतां कार्योत्पत्ति, भलत्याच कारणापासून भलत्याच कार्याची उत्पत्ति, आणि कार्यापासून कारणाची उत्पत्ति जेथें वर्णिली असते, तेथें हा विभावनालंकार होतो. [कुवलयानंद–७७-८२.] ६. तांबडेपणा. ७. मंदहास्ययुक्त आणि सुंदर अशा तोंडीं. ८. विनोद, परिहास. ९. ऊषा. १०. पतीच्या वचनें. ११. भोगकाळच्या घर्मोदकाचा. १२. अतिसुंदर. १३. बिंदुसमूह. १४.कपाळावर. १५. अनिरुद्ध बाणासुरमुख पाहे. १६. हत्यारबंद शिपाई. १७. बाणासुर. १८. या बाणासुराला. १९.ज्या युद्धरसें या तृप्ति.२०. मी जार असें समजतो. २१. स्त्री ऊषा. २२. निर्मलाचरण. २३. सकृप. २४. कंटाळता झाला. २५. बाण. २६. जारता. २७. कृष्णाचा. २८. अनिरुद्ध. [नातू (संस्कृत–नप्तृ)=आपल्या मुलाचा किंवा मुलीचा मूल=नातवंड=नातवंड=नातोंड.] २९. गदा. ३०. हातीं घेई.

मर्दी त्यांसि धरावयासि झटतां श्वाना जसा सूकर[1],
क्षोभे नेणुनि सासरा, परि पुढें वर्णील सासू कर ।
तो यत्नांतरदुर्धर[2] स्वरिपु हें जाणोनियां बाण त्या
बांधी घालुनि नागपाश, विधि[3] भाव्यर्थी जसा जाणत्या. ॥ ३५
तो नागपाशीं दृढ बद्ध केला, तातें कृतागस्क[4] धरूनि नेला; ।
ऊषा असी ऐकुनि दुष्ट वार्ता, रडे पडे[5] कांतपराभवार्ता[6]. ॥ ३६

---

## अध्याय त्रेसष्टावा.

(श्लोक.)

गेली हा अनिरुद्ध घेउनि, तयींपासूनि शोकाकुळा
झाली द्वारवती, नसेचि यदुच्या[7] विश्लेष शोका कुळा, ।
गेले वार्षिक मास चार रडतां, आता जनाला गती
कर्तव्या न सुचे, म्हणोनि हरिच्या पायींच[8] ते लागती. ॥ १
ज्याच्या पदीं[9] सर्वहि लोक लागती, देवांसुरीं[10] वाढवि जो कलागती[11], ।
मुनींदु[12] ये, ताप तदा निवे, दिला प्रमोद[13], वृत्तांत मुखें निवेदिला. ॥ २
'आहे हो! अनिरुद्ध शोणितपुरीं[14], स्त्रीबाहुपाशें घडे
आधीं बंधन, संप्रति स्वविधिनें[15] तो नागपाशीं पडे; ।
नामें बाण[16] सहस्रबाहु बळिचा ज्येष्ठात्मज श्रीहर
स्वांगें यत्पुरपाळ[17] तन्निजसुतासंगें[18] बुडालें घर.' ॥ ३

---

१. डुकर. [हाच दृष्टांत मूळांत आहे. श्लोक ३४ पहा.] २. अन्य यत्नानें धरायास अशक्य असा. ३. दैव. ४. केला अपराध ज्याणें असा. ५. या अध्यायांत अनिरुद्धरोधनाचें वर्णन आहे. ६. पतीच्या पराजयानें पीडित अशी. ७. यदूच्या कुळा आणि शोका विश्लेष (वियोग) नसेच. यदूचें कुळ शोकसहित (शोकग्रस्त) होतें—असा भाव. ८. पायीं लागणें=पायीं लवणें (श्लोक ८)= पदीं लागणें (श्लोक २)=नमस्कार करणें, शरण जाणें. ९. पदीं लागणें=वंदन करणें, चरणांवर मस्तक ठेवणें. १०. देव आणि असुर यांत. ११. कलह, तंटा, भांडण. १२. नारद. [मुनि+इंदु= ऋषि+चंद्र=मुनिवर्य. येथें **मुनींदु** हा शब्द हेतुगर्भ आहे म्हणून हा परिकरालंकार होय. जेथें विशेषण सहेतुक असतें तेथें हा अलंकार होतो. १३. आनंद. १४. बाणनगरीं. १५. निजदैवानें. १६. बाण=हा बलिदैत्याच्या शतपुत्रांतील ज्येष्ठ. यास शंकरप्रसादानें सहस्र हात प्राप्त झाले. १७. ज्या नगराचा पालक स्वयें (बाण). १८. त्या बाणाची कन्या ऊषा तिच्या संगानें.

ऐसें नारदवाक्य ऐकुनि उठे आधीं महात्मा[1] हळी[2],
चक्री[3] सात्यकि सांब सारण गद प्रद्युम्न मोठे बळी, ।
गेले सानुग[4] शीघ्र सैनिकें[5] सर्वे अक्षौहिणी[6] द्वादश[7],
क्रोधी रोधिति[8] सर्व शोणितपुर[9], प्रख्यात ज्यांचें[10] यश. ॥ ४

उद्यानें पहिलीं[11] गिळोनि सहसा सेनांबुधी[12] तो पुर-
प्राकारग्रसन क्षणींच चघळी, अट्टालही[13] गोपुरें[14]. ।
हें पाहूनि सकोप तो परचमूतुल्य[15] स्वसेना रची,
बाण प्राण हरावया, यम तसा, ये[16], क्षोभला फारची. ॥ ५

त्या काळीं पुररक्षणार्थ सुभट[17] स्थापूनि आंगें वृषा[18]-
कप्यात्मा प्रमथात्मजादि[19] सह ये युद्धास, कोपे मृषा[20]; ।
साधूंची अतुळें[21] यशोमृतरसें सारी हराया तृषा
लोटी कोटिकरींद्रकेसरिमदप्रध्वंसदक्षा[22] वृषा[23]. ॥ ६

प्रभूही[24] स्वांतीं[25] भी स्वयशउपहासा वरद या,
करी मूढा मत्ता निजचरणदासावर दया; ।
महाविद्यासंपद्बळमद[26] न कोणासि चुकवी[27] ?
न शिक्षी रक्षी जो स्वरगहि[28] न त्या गाति[29] सुकवी. ॥ ७

तो अत्यद्भुत लोमहर्षण[30] रणें[31] ब्रह्मादिकांला[32] नवा[33],
तेव्हां अश्रुतदृष्टपूर्व न कसा अस्मद्विधा[34] मानवा ? ।
भांडे शंकर शौरिसीं[35] न शिवले दोघे तमाच्या[36] लवा,
ऐसे शुद्धयशोमृताब्धि[37] विभु ते, पायीं तयांच्या लवा[38]. ॥ ८

---

१. महाशय. २. बळराम. ३. कृष्ण. ४. स+अनुग=सेवकांसहित. ५. वीर. ६. सेना. बारा. ८. वेढा घालतात. ९. बाणनगर. १०. ज्या वीरांचें. ११. प्रथमतः, पहिल्यानें. १२. या-सेनासमुद्र. १३. उपरमाडी, शिरोगृह. १४. बहिर्द्वार. १५. शत्रुसेनेसीं समान (द्वादश अक्षौ-णी). १६. येता झाला. १७. योद्धे. १८. महादेव. १९. प्रथम गण कार्तिकेयादिकांसह. २०. व्यर्थ. १. अनुपमें (रसें). २२. कोटिशः गज आणि सिंह यांचा मद नासण्याविषयीं समर्थ अशा. ३. नंदिकेश्वरास. २४. महादेवही. २५. मनांत. २६. मोठी विद्या, संपत्ति आणि बळ यांचा ं. २७. सर्वांस चुकवितो—हें उत्तर. २८. कल्पतरुही. २९. हें श्लोकार्ध सुभाषितरूप आहे. ०. आंगावर कांटा उठविणारा. ३१. हा शब्द संस्कृतांत पुंलिंगी आहे. ३२. देव, ऋषि, यक्ष, र्वादिकांला. ३३. अपूर्व. ३४. आमच्या सारख्या. ३५. कृष्णासीं. ३६. तमोगुणाच्या, क्रो-च्या. ३७. शुचियशोरूप अमृताचे सागर. ३८. नम्र व्हा.

त्या बाणासह सात्यकी करि रण, प्रद्युम्न बाहे [1]गुहा,
[2]योगी युद्धविलोकनार्थ सहसा सोडूनि आले [3]गुहा. ।
[4]कुंभांडाव्हय कूपकर्ण सचिव [5]श्रीमद्बळें [6]पाहिले,
[7]हर्यक्षें गजसे उभे धरुनियां धैर्यास ते राहिले. ॥ ९
गांठी बाणसुतास सांब समरीं, [8]द्वंद्वें असीं शोभलीं,
शस्त्रास्त्रें [9]विखरी अरीवरि [10]निजोत्कर्षार्थ जो तो भलीं; ।
[11]देवाधीश [12]चतुर्मुखादिक मुनी सिद्ध स्वयें धांवले,
[13]गंधर्वोरगयक्षचारण रण [14]प्रेक्षावया पावले. ॥ १०
भूत प्रेत पिशाच गुह्यक असे [15]अत्युग्र [16]रुद्रानुग
[17]प्रोद्दाम प्रमथादि त्यांसि सहसा [18]शार्ङ्गच्युतोग्राशुग ।
मेघांतें [19]पवमान, [20]कीं रविकर [21]ध्वांतास तेंवि क्षणें
युद्धीं [22]भंगिति, भीति सत्य [23]हरिच्या हस्तीच ते [24]वीक्षणें. ॥ ११
[25]इच्छाभुक्तिद दुर्लभ स्वसदनीं होते निजेले [26]शर,
क्षुत्तृष्णाकुळ तों उदार सहजें ये [27]अन्नपूर्णावर, ।
आणी बाहिर त्यां बळें उठवुनी [28]सर्वोपकारी कर
श्रोत्रें शार्ङ्गगुणेंहि सत्य म्हणुनी [29]ते [30]प्रेषिले सत्वर. ॥ १२
[31]ते एकाहूनि एक क्षुधित सुतृषित [32]व्याळसे सिद्ध काय ?
[33]क्रव्यासृक्प्राण त्यांला पुरतिल पळती सर्वही [34]विद्धकाय, ।

---

१. कार्तिकेयास. २. योगाभ्यासी मुनिजन. ३. दरी, गुहा. ४. कुंभांड नांव ज्याचें तो. कुंभांड आणि कूपकर्ण हे दोघे बाणाचे मंत्री. ५. बळरामानें. ६. गांठले. ७. सिंहानें. ८. युग्में. ९. फेंकी. १०. आपला अभ्युदय होण्यासाठीं. ११. देवश्रेष्ठ. (इंद्र.) १२. ब्रह्मदेवादिक देव विमानांत आले. १३. श्लोक ९ पहा. १४. विष्णुशंकररणकौतुक पाहण्यासाठीं. १५. अतिभयंकर. १६. रुद्रानुचर. (डाकिनी, ब्रह्मराक्षस, कूष्मांड, वेताल इत्यादि. श्लोक १०-११.) १७. दांडगे. १८. शार्ङ्गधनुष्यापासून निघालेले उग्र बाण. (शार्ङ्ग+च्युत+उग्र+आशुग=धनुष्य+पडलेले+भयंकर+बाण.) १९. वायु. २०. किंवा. २१. अंधकारास. २२. 'भंगिति' या क्रियापदाचा कर्ता 'आशुग.' २३. सिंहाच्या. २४. अवलोकनमात्रें. २५. इच्छाभोजन देणारे दुर्लभ म्हणून. २६. या श्लोकांतील कल्पनेस मूळांत आधार नाहीं, ही पंतांनीं आपल्या प्रतिभाबळानें येथें घालून हें आख्यान समुज्ज्वलित केलें आहे. २७. महादेव. २८. कृष्णाचा हस्त. सर्वांवर उपकार करणारा असा हात. २९. ते शर. ३०. पाठविले. ३१. ते शर. ३२. सर्पसे. ३३. क्रव्य+असृक्+प्राण=मांस+रक्त+जीव. ३४. बाणविद्ध देह.

ज्यांची[1] त्या[2] शक्तिसंख्या न विदित गि[3]ळिती भांडणारांस[4] कोटि
श्रीशाच्या[5] आश्रिताची[6] असि समरमखीं[7] देखिली रीति खोटी. ॥ १३
शंभु ब्रह्मास्त्र सोडी हरिवरि, शमवी कृष्ण तेणेंचि हो! तें,
वायव्याचा[8] हराया बळमद[9] विभुचें सिद्ध गिर्यस्त्र[10] होतें; ।
अग्न्यस्त्रा[11] तोयदास्त्र[12] प्रकटि पशुपती आपुलें अस्त्र[13] अंतीं,
त्याला नारायणास्त्र प्रभुहि, कुतुक तें देखिलें भाग्यवंतीं. ॥ १४
स्वप्रेमें [14]जृंभणास्त्रें हृदयहरगुणें[15] संगरामाजि गौरी-
नाथातें मोहुनीयां, बळितनयबळा[16] ने लयालागिं [17]शौरी, ।
रामानेंहि प्रधान[18] क्षितिवरि मुसळें पाडिले साधुमार[19],
क्रूरेषुव्याप्त[20] बर्हीश्वर[21] म्हणुनि रणक्षोणि[22] सोडी कुमार. ॥ १५
सेनेचा नाशभंग प्रकटचि दिसतां[23], कोपला बाण [24]सोडी
युद्धीं त्या सात्यकीतें, शरहि हरिशिरीं, भूधरीं[25] वृष्टि थोडी. ।
हस्तांनीं पांचशांनीं धरि सुदृढ नवीं पांचशें सज्य[26] चापें,
[27]एकैकीं दोन दोन प्रखर शर, करी युद्ध घोर प्रतापें. ॥ १६
तीं चापें एकदाचि प्रभुवर विशिखव्रात[28] सोडूनि [29]खंडी,
सूताश्वांचेहि[30] आयुर्जळघट[31] [32]घटिकेमाजि सारे [31]उलंडी; ।

---

१. ज्या दासांची. २. त्या शरांस. ३. या श्लोकांतील कल्पनेस मूळांत आधार नाहीं. ही
ांनीं आपल्या प्रतिभाबळानें येथें घालून हें आख्यान समुज्ज्वलित केलें आहे. ४. कोटिशः
ाणारांस (योद्ध्यांस). ५. कृष्णाच्या. ६. बाणाची. ७. रणरूप यज्ञांत. ८. वायु दैवत
ाचें अशा अस्त्राचा. ९. बळगर्व. १०. पर्वतास्त्र. ११. आग्नेय. १२. पार्जन्य. १३. पाशुपतास्त्र.
. जांभई आणणारें अस्त्र. (जृंभण=जांभई.) १५. मन हरण करण्याचा गुण आहे ज्याचा असें.
. बाणासुराच्या बळातें, बाणसेनेतें. १७. कृष्ण. १८. कुंभांड आणि कूपकर्ण. १९. साधुपीडक.
. प्रद्युम्नबाणपीडित. (भयंकर बाणांनीं भरलेला.) २१. मयूरेश्वर. (स्कंदवाहन.) २२. र-
ूमि. २३. दिसला तेव्हां. २४. सात्यकीला सोडून हरिवर शर सोडी. २५. पर्वतावर.
. स+ज्य=सहित+ज्या (गुण, मौर्वी—दोरी)=गुणान्वित. २७. प्रत्येक धनुष्याला दोन दोन
ग लावून. २८. बाणसमूह. २९. चूर्ण करी. ३०. सूत (सारथि) आणि अश्व (घोडे) यांचे.
१. आयुष्यरूप जलाचे घट उलंडी, (उलथे करी, पालथे पाडी) मारी—असा भाव. ३२. अल्प-
ळांत. ‘घटका’ हा शब्द अर्थांतरसिद्ध व ऐतिहासिक होय. ‘घटिका’ हें ‘घटी’ या स्त्री-
गी शब्दास स्वार्थीं ‘क’प्रत्यय होऊनरूप झालेलें आहे. याचा मूळचा अर्थ ‘लहान घडा’
सा होय. पुढें कालमापनार्थ जेव्हां त्याची योजना होऊं लागली तेव्हां मूळ अर्थांत फेर हो-
न सध्यांचा रूढ अर्थ प्रचारांत आला. ‘घट’ व ‘घटी’ या संस्कृत शब्दांचे मराठींत जे अपभ्रंश

वर्षे जैं [1]बाणधाराधर हरि, शिरली बाणदेहांत थंडी,
रक्षावें [2]दोःसहस्रें किति [3]अमितशिरःपाददृग्बाहु दंडी? ॥ १७
रक्षाया प्राण घाली [4]तनुजनिस रणीं [5]पाठिसी [6]कोटरा हे,
[7]पुत्रस्नेहालकैकांबरयुगल धरी, तो उभा [8]कोट राहे, ।
आली सोडूनि [9]अर्धस्नपनविधि, गळे धांवतां वस्त्र [10]वाटे,
कीं वाराया प्रभूही [11]विधि करि उघडें तैं [12]सतीशस्त्र [13]वाटे. ॥ १८
बाणाला जेधवां युद्धीं विश्वाचा [14]राय [15]नागवी, ।
सोडवाया मधें आली कोटरा माय [16]नागवी. ॥ १९
जों [17]तिर्यङ्मुख होय युद्धसमयीं [18]पुंनाग वीर क्षण,
स्वस्थानाप्रति [19]ने [20]सुतासि, करि हें ती नागवी रक्षण; ।
तों [21]माहेश्वर दारुण [22]ज्वर उठे, त्यालाहि शीतज्वर
व्यापी वैष्णव, तो [23]त्रिमस्तक [24]जगन्नाथासि जोडी [25]करें. ॥ २०
जो माहेश्वर दारुण ज्वर, परी [26]शीतज्वरें तापला,
प्रार्थी, त्या अभयप्रद प्रभु म्हणे, '[27]संवाद हा [28]आपुला ।
प्राणी आठविल क्षण स्वहृदयीं, त्याच्या न देहा [29]पळें
स्पर्शे [30]त्वत्करदृष्टिचित्तहि करो, सोडोनि गेहा [31]पळें.' ॥ २१

---

झाले आहेत त्यांतही मूळचा अर्थभेद तसाच राहिला आहे. पहिल्याचा अपभ्रंश 'वडा' हा 'मडक्या'चा वाचक आहे; आणि 'वडि' या शब्दांत वस्तुतः तोच अर्थ असतां रूढार्थ 'घटका' असा कालांशवाचक झाला आहे. 'वड्याळ' व 'सुगड' हे शब्द अनुक्रमें करून 'घट्यालय' व 'सुघट' यांचे अपभ्रंश होत हें सहज ध्यानांत येणारें आहे. (निबंधमाला–अंक ३७ पहा.)

१. बाणमेघ. २. भुजसहस्रानें. [दोस्=भुज, बाहु.] ३. ज्याला शिरें, पाद, नेत्र, बाहु, असंख्य असा जो विष्णु तो (ज्याला) दंडी (शासी) त्याला कितीसें रक्षावें. ४. पुत्रास. ५. पाठिशीं घालणें=आश्रय देणें, संरक्षण करणें. ६. बाणमाता. ७. पुत्राच्या स्नेहामुळें मोकळे केस आणि एक वस्त्र या युग्मातें. ८. आवरण. ९. स्नानविधि अर्धा सोडून. १०. वाटेनें. ११. दैव. १२. स्त्रीरूप शस्त्र. १३. गमे. १४. कृष्ण. १५. ठकवी, फसवी, बुडवी. १६. नग्न. (श्लोक २० पहा.) १७. अधोमुख. (नग्न स्त्रीला पहावयाचें नाहीं म्हणून खालीं मान घालणारा असा.) १८. पुरुषोत्तम. १९. नेती झाली. २०. बाणाला. २१. शैव. २२. माहेश्वरज्वर. २३. ज्वर=याला तीन मस्तकें आणि तीन पाय होते. २४. कृष्णास. २५. कर जोडी=शरण येई. २६. वैष्णवज्वरें. २७. संभाषण, वृत्तांत. २८. कृष्णज्वर व कृष्ण यांचा. (श्लोक २९ पहा.) २९. पळभर. ३०. तुझे हात, नेत्र आणि मन देखील. ३१. पलायन कर.

[1]पराभूतिक्रोधानळमुखकटाहांत [2]कढला,
हटें युद्धोत्साहें नवदढरथीं बाण चढला; ।
सशस्त्रें अत्युग्रें उचलुनि भुजांचीं दशशतें
पुन्हा दावी वीर्य [3]प्रभुहरिपुढें [4]मंद [5]शश तें. ॥ २२
[6]तो ज्या ज्या स्वभुजें [7]गदेषुपरिघाद्यत्युग्र शस्त्रें [8]अरी
सोडी शौरिविरी, [9]हरीच हरिचें त्या त्या भुजाला [10]अरी; ।
[11]जाणो बाण [12]वनस्पती, भुजहि त्या [13]शाखाचि, [14]यज्वा हरी,
छेदी [15]चक्रकुटारपाणि समिधा त्या युद्धयज्ञीं करीं. ॥ २३
पाळी [16]बाणवनस्पतिप्रति सदा जो [16]शंभुमाळी म्हणे
त्या [17]युद्धक्रतुदीक्षिता हरिस, 'हे [18]धर्मज्ञचूडामणे! ।
आंगें वाढविला दयामृतरसें शिंपोनियां [19]तोकसा,
शाखा सर्वहि तोडितां सकरुणा! वांचेल हो! तो कसा? ॥ २४
दास [20]दैत्यपतिचा [21]पणतू तें जाणसी, विनवितों पण तूतें, ।
कीं [22]रजोगुणज जंतुस [23]हा या योग्य तूंहि [24]नतमंतु सहाया. ॥ २५
मत्प्रसाद बहु [25]यावर, दासप्राण मागत असें [26]वरदास, ।
रक्षिसी तरि महाहित साच, [27]स्कंद जेंवि मज, हाहि तसाच. ॥ २६
म्हणे तूझें चक्र प्रकट भुवनीं, आपण [28]अरी,
प्रिय [29]श्रीकांता मी म्हणविल जनीं जो क्षण [30]अरी, ।

---

१. पराभवामुळें जो क्रोधानल त्याचें मुख तीच कढई तींत. २. या श्लोकाचें वृत्त शिखरिणी. याचें लक्षण मागें गेलें आहे. [पृष्ठ ५० टीप ४ पहा.] ३. कृष्णरूप सिंहापुढें. ४. मूर्ख. ५. ससा. येथें बाणाला शश आणि कृष्णाला सिंह कल्पिलें आहे. ६. बाणासुर. ७. गदा, इषु, परिघ, इत्यादि अत्युग्र. ८. शत्रु. (बाणासुर.) ९. हरण करीच. १०. सुदर्शन चक्र. ११. हा उत्प्रेक्षालंकार जाणावा. या उत्तरार्धास मूळांत आधार नाहीं, हें पंताच्या प्रतिभावृक्षाचें फळ होय. १२. यज्ञवृक्ष. १३. खांद्याचि. १४. यज्ञकर्ता यजमान. १५. सुदर्शनरूप कुऱ्हाड हातीं घेणारा. १६. हें रूपकाचें उदाहरण होय. बाणरूप वृक्षाला; शंभुरूप माळी (बागवान.) १७. रणयज्ञाची दीक्षा घेतलेल्या कृष्णास. १८. धर्मपंडितशिरोमणे! १९. मलासारखा. (तोकसा=तोकासारखा. तोक+असा=तोकसा. 'सा' हें 'असा'चें संक्षिप्तरूप आहे. सा=असा हा सादृश्यवाचक प्रत्यय आहे.) २०. प्रऱ्हादाचा. २१. पणतु=नातवाचा मूल=पणतुंड=पणतोंड=पणतवंड=पणत्वंड. २२. रजोगुणापासून झालेल्या प्राण्यास (जंतूस). २३. हा अपराध. २४. नतांचा अपराध. [मंतु=अपराध.] २५. बाणासुरावर. २६. तूं वरद ज्यो त्यास. २७. कार्तिकस्वामी. २८. अरिनामक. २९. मी विष्णूला प्रिय आहें. ३०. शत्रु.

न त्या साहे नामेंकरुनिहि परोत्कर्ष बळ तें
तुम्हां मानें[1] अंगीकृत[2] म्हणुनि आम्हास कळतें.' ॥ २७

महेश्वराची परिसोनि वाणी, स्वचक्र तो आवरि चक्रपाणी; ।
बोले स्वयेंही बहुमानयुक्त श्रोत्यांसि पीयूष[3]चि तें तदुक्त[4]. ॥ २८

'शंभो! विश्वगुरो! तुम्हीं वदतसां जें कीं दयाशेवधी[5],
आम्हीं तेंचि करूं, प्रिय प्रभु तुझ्या कोण प्रियांतें[6] वधी? ।
युष्मन्निश्चय[7] मानला मज, न मी मारीन दासां, बळी
याचा जन्मद[8] हाहि साधु, तुमच्या सद्भक्तिची सांबळी[9]. ॥ २९

पूर्वींच स्वकरें हिरण्यकशिपुप्राणांत केल्यावर;
प्रल्हादासि 'अवध्य अन्वय[10] तुझा' ऐसा दिला म्यां वर; ।
दर्पाच्या शमनार्थ निष्ठुर तसा झालों भुजच्छेदना,
चित्तीं तापद दर्पसर्प[11] न बरा, हे थोडकी वेदना? ॥ ३०

बाणीं[12] बाहु सहस्र शत्रुशमना जे जे तुम्हीं स्थापिले,
अन्यायी मदशत्रुपोषकचि[13] ते या कारणें कापिले, ।
युष्मद्दत्तसुदर्शनें खळवधश्रद्धावशें राखिले
चार[14] त्वद्भजनार्ह[15] मद्भुज जसे शुद्धें यशें माखिले. ॥ ३१

मदें नाश हा भाव या बाणला हो!, तुझ्या पार्षदीं[16] मुख्यता बाण लाहो, ।
भवद्भक्त पावो न भी[17] हा कदापी, न सिंहासि[18] दिग्दंतिची[19] हाक दापी.' ॥ ३२

ये, पावतां अभय, शीघ्र समीप दास, श्रीजानिच्या[20] बळितनूज[21] नमी पदास; ।
वारी मुकुंदपदवंदन वेदनातें[22], सांगे हरूनि हरिशंकरभेद[23] नीतिं[24]. ॥ ३३

---

१. तुम्हांला आवडतें. २. स्वीकारलेलें. ३. अमृत. ४. त्या कृष्णाचें वचन. ५. दयानिधि. (शेवधि=निधि.) ६. भक्तांतें. ७. तुमचा निश्चय. ८. पिता. ९. संबळी. १०. वंश. (श्लोक ४७.) वैरोचन बली माझा भक्त म्हणून सुतत्वानें जो त्याचा वंश तो मला अवध्य होय—असा भाव.) ११. गर्वरूप सर्प. १२. बाणासुराचे ठायीं. १३. गर्वरूप शत्रूला पोसणारेचि. १४. चार भुज. १५. तुमचें भजन करण्यास योग्य असे. १६. पार्षद=सेवक, परिवार. १७. भय. १८. हा चरण सुभाषितरूप आहे. १९. दिग्गजाची. २०. कृष्णाच्या. [ज्याची जाया श्री आहे तो=श्रीजानि (कृष्ण); ज्याची जाया जानकी आहे तो=जानकीजानि (राम). 'जायाया निङ्' ५।४।१३४ या सूत्रानें **जाया**शब्दाच्या स्थानीं बहुव्रीहिसमासांत **जानि** असा आदेश होतो.] २१. बाण. २२. व्यथेतें. २३. विष्णु आणि शिव यांचा भेद हरून. २४. संबंध.

[1] जामाता [2] अनिरुद्ध सोडुनि सुखें सत्कारिला, पाहिला
प्रेमें पुत्रसमान, कांचनरथीं [3] सस्त्रीक तो वाहिला, ।
आंगें भेटविला विभुप्रति दिलें अक्षौहिणी सैन्य, हा
बाणप्राणद दे महोत्सव असा सर्वांशि [4] सद्दैन्यहा. ॥ २४
श्रीकंठास तदंघ्रिपद्ममधुपा बाणास शौरी शतें
कांडांचीं लघु ज्यासि दे सुख असें घेवूनि [5] गौरीश तें ।
आज्ञा देउनियां [6] पुरीप्रति नि[7]जध्येयास त्या पाठवी,
ऐसें [8] स्पष्ट दिसे, परंतु [9] म्हणती ज्ञाते 'मनीं [10] सांठवी.' ॥ २५

---

१. या श्लोकाचें वृत्त 'शार्दूलविक्रीडित' आहे. याचें लक्षण असें आहे:—'मसजैः सततैर्गेन युक्तमेकोनविंशवत् । शार्दूलक्रीडितं प्राहुश्छिन्नं द्वादश सप्तभिः ॥ ३६ ॥' [सुवृत्ततिलक—प्रथम विन्यास.] 'साकाराद्यक्षरैः पादपर्यन्तैः सविसर्गकैः । शार्दूलक्रीडितं धत्ते तेजो जीवितमूर्जितम् ॥ ३५ ॥ विसर्जनीयस्योत्थेन पदैर्निम्नोन्नतैरिव । शार्दूलक्रीडितं याति पाठे सायासतामिव ॥ ३६ ॥ विच्छिन्नपादं पूर्वार्धे द्वितीयार्धे समासवत् । शार्दूलक्रीडितं भाति विपरीतमतोऽधमम् ॥ ३७ ॥ आद्यंतयोर्गुणोत्कर्षकांत्या सर्वातिशायिनोः । शार्दूलक्रीडितं धत्ते मध्ये तद्गौरवोन्नतिम् ॥ ३८ ॥ आद्यांताकारविरहात्पर्यंते चाविसर्गतः । शार्दूलक्रीडितं स्वस्य रूपं नैवोपलभ्यते ॥ ३९ ॥' [सुवृत्ततिलक—द्वितीय विन्यास.] 'शौर्यस्तवे नृपादीनां शार्दूलक्रीडितं मतम् ॥ २२ ॥' [सुवृत्ततिलक—तृतीय विन्यास.] याचा भावार्थ असा:—ज्या वृत्ताच्या प्रत्येक चरणांत १९ अक्षरें असतात आणि बाराव्या आणि त्यानंतर सातव्या अक्षरावर यति असतो आणि ज्यांत म-गण, स-गण, ज-गण, स-गण, त-गण, त-गण आणि एक गुरु अक्षर अशी रचना असते त्यास **शार्दूलविक्रीडित** वृत्त म्हणावें. अकारादिपासून विसर्गापर्यंत प्रत्येक चरणांत अक्षरें गोविलीं असलीं तर तें **शार्दूलविक्रीडित** मोठें भारदस्त आणि सतेज असें समजावें. जागोजागीं विसर्गयुक्त पदें आल्यानें **शार्दूलविक्रीडित** म्हणतांना खालउंच चालण्याप्रमाणें हिसके बसतात. पूर्वार्धांत वेगळालीं पदें असलीं व द्वितीयार्धांत समासयुक्त असलीं तर तें **शार्दूलविक्रीडित** विपरीत आणि **निकृष्ट** समजावें. आरंभ आणि अंत हे सुंदरतम साधतां आले तर गुणोत्कर्षाच्या सौंदर्यानें मध्यभागीं **शार्दूलविक्रीडितास** गौरव आणि श्रेष्ठत्व प्राप्त होतें. आरंभीं आणि शेवटीं 'आ'कार नसला व अंतीं विसर्ग न आला तर **शार्दूलविक्रीडितास** आपलें स्वरूप प्राप्त झालें नाहीं असें **समजावें.** राजे वगैरे भुजबलशाली वीरांच्या शौर्याची प्रशंसा करायाची असली तर **शार्दूलविक्रीडित** योजावें, असें ज्ञात्यांचें मत आहे. २. प्राद्युम्नि. ३. उषासहित, सपत्नीक. ४. **साधूंचें** दैन्य नासणारा. ५. तें सुख घेऊन गौरीश (शिव). ६. द्वारवती राजधानीला. ७. **कृष्णास.** ८. उघड. ९. शंकर कृष्णाला आपल्या मनांत सांठवितो (ध्यान करण्यास्तव कोंडून ठेवितो—द्वारकेस धाडीत नाहीं) असें ज्ञानी पुरुष म्हणतात. १०. मनांत ठेवी.

# अध्याय चौसष्टावा.

(श्लोक.)

[1]प्रद्युम्नादिक एकदा [2]उपवनीं क्रीडोनियां भागले,
[3]तान्हेले यदुवीर [4]नीर मग ते शोधावया लागले; ।
तों [5]निर्जीवन कूप त्यांत [6]सरडा गुंतोनियां राहिला,
[7]सुस्थूळाकृति तो अपूर्वचि [8]तिहीं कौतूहलें पाहिला. ॥ १
प्रद्युम्नादिक ते कुमार सदय ख्यात स्वयें [9]विक्रमी,
[10]त्यांच्या उद्धरणीं प्रयत्न करुनी झाले समस्त [11]श्रमी; ।
[12]दीनोद्धारपटु प्रभूप्रति महाश्चर्यें तदा सांगती,
काढी वामकरें [13]तया सहज, दे जो देव दासां [14]गती. ॥ २
पतितोद्धरणीं झाले [15]भग्नसंकल्प बालक, ।
[16]प्रार्थितां उद्धरी त्यातें [17]लीलेनें विश्वपालक. ॥ ३
[18]तो [19]दिव्याकृति [20]विश्वपावनकरस्पर्शक्षणीं होय जें
[21]पीयूषें न दिजे, दिजे समज त्या [22]पद्मालयातोयजें, ।
त्याचें वृत्त पुसे समस्त विभु, [23]संकल्पेंचि जो [24]नैकें [25]वी
ब्रह्मांडें, हृदयस्थ काय न कळे त्यातें? जना ऐकवी. ॥ ४
तो [26]सांगे सर्व वृत्त प्रभुस निजमुखें जोडुनी भूप हात,
'श्रीमत्पादांबुजाच्या नखमणिकिरणीं स्पर्शली भू पहात, ।

---

१. प्रद्युम्न, सांब, चारुदेष्ण, गद इत्यादि यदुकुमार. [या अध्यायांत नृगराजाच्या शापमोचनाची कथा आहे.] २. बागेंत. ३. तृषार्त, तृषित. ४. उदक. ५. जलरहित. ६. कृकलास अशी सरड्यास संस्कृतांत संज्ञा आहे. ७. फार स्थूलदेह, गिरिसदृश. ८. यदुवीरांनीं. ९. पराक्रमी. १०. सरड्याच्या उद्धारक्रियेंत. ११. श्रांत. १२. दीनांचा उद्धार करण्याच्या कामीं कुशल अशा प्रभूला (कृष्णाला). [हें साभिप्राय (सहेतुक) विशेषण आहे, म्हणून परिकरालंकार होय.] १३. सरड्याला. (नृगराजाला.) १४. सद्गति मुक्ति. १५. हताश, भग्नमनोरथ. १६. प्रार्थिलें तेव्हां. १७. सहज. १८. सरडा. १९. तप्तसुवर्णवर्ण. २०. विश्वातें पावन (पवित्र) करणारा जो (विष्णु-कृष्ण) त्याच्या हस्ताचा स्पर्श होतां क्षणीं. २१. अमृतानें. २२. लक्ष्मीचें कमलरूप वसतिस्थान (कृष्ण.) यानें. २३. मनांत संकल्प (विचार) येतांक्षणींच. २४. अनेक. २५. प्रसवे, उत्पन्न करी. २६. श्लोक १० पहा.

तो मी [१]इक्ष्वाकुराजेश्वरसुत [२]नृग जो [३]स्पर्शतो काय कानीं?
आधीं गाती [४]वैदान्योत्तमनृपतियशें सज्जनीं गायकांनीं. ॥ ५
आज्ञा सर्वेश्वराची म्हणुनि निजमुखें सांगतों वृत्त सर्व,
स्वामी! आम्ही कुलीन, प्रकट न शिवला स्वप्नकाळींहि गर्व; ।
तूं तो [५]भूतात्मसाक्षी, तुज विदित नसे काय बा! [६]यत्युपास्या!
दास्याचा लाभ आहे निजगुणकथनामाजिही या [७]मदास्या. ॥ ६
होतों [८]पूर्वजरीतिनीतिवश मी साधुप्रिया! याच कीं
कीर्तिश्रीखनि! चित्त वित्त हरिलें माझें सदा याचकीं, ।
आधीं मन्मतिला जनस्मृति दयासंयुक्त यावि प्रजा
शब्दें लागति गोड, सांगति कथा दासासि सद्विप्र [९]जा. ॥ ७
सत्पात्रीं साधुकाळीं [१०]सविधि सविनयें सादरें म्यां [११]सदिष्टें
[१२]गोदानें [१३]न्यायलब्धें [१४]सकलशुभगुणें अर्पिलीं बा! [१५]सदिष्टें, ।
[१६]तत्संख्या स्थूलमानेंकरुनि जितकिया केशवा! वृष्टि[१७]धारा
कीं [१८]भूनद्यब्धिमध्यें असतिल [१९]सिकता कीं [२०]नभामाजि [२१]तारा. ॥ ८
[२२]भूवस्त्रान्नेभशय्यातिलरजतगृहस्वर्णरत्नादिदानें,
[२३]इष्टापूर्तेंहि केलीं सकळ निजमनःशुद्धिचीं जीं [२४]निदानें; ।
या [२५]मार्गीं वर्ततां जें मजवरि पडलें संकट, **श्री**धवा! तें
ऐकावें त्वां [२६]स्वनामस्मरणपरजनक्लेशपाथोदवातें. ॥ ९
कोणाएका द्विजाची **यदु**पति! चुकली धेनु[२७], [२८]मद्गोधनीं ती
आली, म्यां ब्राह्मणातें नकळत दिधली, राहिली शोधनीती[२९]; ।

---

१. इक्ष्वाकु राजाचा पुत्र. २. नामविशेष. ३. ऐकून ठाऊक आहे काय. ४. उदार श्रेष्ठ राजांचीं यशें. ५. प्राण्याच्या अंतर्गत व्यापारांस जाणणारा. ६. यतींनीं उपास्य अशा. ७. माझ्या मुखास. ८. वडिलांच्या रीतीस आणि नीतिमार्गास धरून वागणारा. ९. ज्या (कथा). १०. यथाशास्त्र. ११. साधूंस इष्ट अशा म्यां. १२. कपिलवर्ण धेनूंचीं दानें. १३. नीतिसंपादितें (बळजोरीनें संपादित नव्हेत अशीं). १४. शीलरूपगुणसंपन्न अशीं. १५. साधुप्रियें गोदानें, संताला आवडणारीं अशीं. १६. गोदानसंख्या. १७. पर्जन्यधारा. १८. भूमि, नदी, सागर, यांजमध्यें. १९. वालुकाकण. २०. आकाशांत. (श्लोक १२-१३ पहा.) २१. नक्षत्रें. २२. जमीन, वस्त्र, अन्न, गज (इभ), शय्या, तिल, रुपें (रजत), घरें, सोनें, रत्नें, इत्यादि दानें. (रथ, अश्व आदिकरून दानें.) २३. इष्टयागादि पूर्तंवापीकूपतडागादि कर्मेंहि. २४. कारणें. २५. अशा आचारपथीं, अशा दानादिकर्ममार्गांत. २६. भगवन्नामाचें स्मरण करणाऱ्या भक्तांचे क्लेश तेच मेघ (पाथोद=पाथस्–उदक्; द–देणारा) त्यांस वायु अशा त्वां. २७. एकदां पूर्वीं दान दिलेली अशी. २८. माझ्या गाईंच्या कळपांत मिसळून गेली. २९. तिजविषयीं शोध करून परत पोंचविणें ही व्यवस्था झाली नाहीं.

नेतां भेटे पथांत [1]प्रथमपति [2]तिचा ओळखे आपुलीला,
'माझी माझीच' [3]दोघे म्हणत म्हणत ते सिद्ध झाले [4]कलीला. ॥१०
म्हणे [5]स्वामी, 'विप्रोत्तम दिससि, कां पाप करिसी ?
कसा [6]ब्रह्मस्वातें [7]निरयगतिलाभार्थ वरिसी ?' ।
[8]प्रतिग्राही बोले, 'निरय अमृतें सत्य नृग या
धना दे धर्मात्मा, नृप परि करी जो न मृगया.' ॥ ११
आले दोघेहि [9]विप्रप्रवर मजकडे [10]शीघ्र, घेऊनि गाय,
क्रोधें [11]दुःप्रेक्ष्य त्यांचे रविपरि मजला भासले [12]उग्र [13]काय; ।
त्यांचे म्यां [14]स्वासनास त्यजुनि निजशिरीं वंदिले तप्त पाय,
प्रार्थूनि [15]क्ष्मासुरांतें सविनय वदलों, 'या, बसा, [16]कार्य काय?'॥ १२
केला ज्या मुनिनें [17]प्रतिग्रह म्हणे तो, 'त्वां दिली गाय [18]कीं
गावी कीर्ति तुझी [19]पयोधिलहरिस्वच्छा भली [20]गायकीं.' ।
[21]गोस्वामीहि मला म्हणे, 'बहु [22]भला, हा धर्म कीं [23]गौरव ?
[24]ब्रह्मस्वापहरा नृगा ! [25]तुजचि दे, अन्यासि तो [26]रौरव.' ॥ १३

---

१. पहिला मालक. (द्विज.) २. दिलेल्या गाईचा. ३. पहिला मालक व दुसरा मालक. [ही एकवार दिलेली गाय आपली असेंच समजून, न जाणतां, नृगराजानें ती दुसऱ्या विप्रास दिली यामुळें तिला दुसरा मालक झाला.] ४. कलहाला. ५. पहिला घेणारा. ६. विप्राच्या धनातें. (घेनूतें.) ७. नरकगतिप्राप्त्यर्थ. ८. दुसरा घेणारा. ९. थोर ब्राह्मण. १०. त्वरित. ११. पाहण्यास कठिण असे. १२. भयंकर. १३. देह. १४. नृपासनाला. १५. विप्रांतें. [क्ष्मा+सुर=भू+देव=भूमीवरील देव म्हणजे विप्र.] १६. काय काम आहे? १७. पुनः प्रतिग्रह. १८. या कारणास्तव. १९. सागराच्या लाटेसारखी निर्मळ. २०. गायकांनीं, स्तुतिपाठकांनीं. २१. प्रथम प्रतिग्रहकर्ता. २२. फार चांगलें. [हें व्याजस्तुति नामक अलंकाराचें उदाहरण आहे. व्याजस्तुति—बाहेरून स्तुति दिसावी परंतु वास्तविक निंदा असावी; किंवा बाहेरून निंदा असून वास्तविक स्तुति असावी—अशी जेथें निंदास्तुतिद्वारा स्तुतिनिंदेची उक्ति असते तेथें व्याजस्तुति नामक अलंकार होतो. जसें 'शाबास, हा चांगला विचार केलात, रावसाहेब! मुलाला म्हणून शाळेंत धाडावयाचें नाहीं' या वाक्यांत शब्द दिसायाला (बाहेरून) स्तुतिपर आहेत, परंतु वास्तविक निंदा आहे; येथें स्तुतिद्वारा निंदा केली आहे. 'काय वेडा आहे पहा, सोंगट्या पिटायचें टाकून पाठ करीत बसला आहेस, अरे! हा आकाबाईचा पाया, बरें' यांत बाहेरून निंदा आहे तरी आंतून वास्तविकपणें स्तुति आहे. 'धन्य आहे तुमची गोविंदराव! तुमच्या सारखा शहाणा त्रिभुवनांत मिळायाचा नाहीं' या वाक्यांत स्तुतिमिषानें निंदा आहे. या अलंकाराचें लक्षण असें आहे:—'उक्तिर्व्याजस्तुतिर्निंदास्तुतिभ्यां स्तुतिनिंदयोः' [कुवलयानंद. ७०] 'व्याजस्तुतिर्मुखे निंदा स्तुतिर्वा रूढिरन्यथा' [काव्यप्रदीप—दशम उल्लास—२६.] 'आमुखप्रतीताभ्यां निंदास्तुतिभ्यां स्तुतिनिंदयोः क्रमेण पर्यवसानं व्याजस्तुतिः' [रसगंगाधर.] 'उक्ता

कोपले ब्राह्मण ते [1]अधीत, मी भ्यालों, बुडालीच मुहूर्त धी तेमीं;' ।
यां प्रार्थिलें कीं, 'घडला [2]प्रमाद, या दासीं करा जी! प्रभुजी! क्षमादया.॥ १४
कृपा करा जी! यश होइल, [3]क्षमी तुम्ही पिता मायहि, धेनु लक्ष मी ।
समर्पितों, पाय धरून कोप हा सुदुःसह क्षोभ करूं नको, पहा.' ॥ १५

गोस्वामी द्विज आयके जयिं असा हा [6]मंद बोल, [4]क्षती
तेजाची समजे, म्हणे, 'मज नको [5]अन्या असो लक्ष, ती ।
माझी गाय मला न देसि, तरि मी जातों, नृगा! आपला
रक्षावा कुलधर्म' बोलुनि असा गेलाचि संतापला. ॥ १६

[9]प्रतिग्राही बोले, 'नमुनि मज लक्षाहि [10]उपरी
जरी देसी गायी अयुत दुसऱ्याही बहु परी, ।
नको, राहो हेही, '[11]श्रुतिसुरभि टाकूनि, [12]पशुची
स्पृहा केली, हेंचि प्रथम घडलें कर्म [13]अशुची.' ॥ १७

गेले दोघेहि धेनु त्यजुन, मग [14]तनुत्याग ही म्यां हि केला,
[15]यांम्यांनीं [16]दोषरंध्रीं धरुनि [17]यमसभेलागिं हा दास नेला; ।

---

व्याजस्तुतिः पुनः । निंदास्तुतिभ्यां वाच्याभ्यां गम्यत्वे स्तुतिनिंदयोः ॥' [साहित्यदर्पण—दशम परिच्छेद ७०७ का०.] याचीं दुसरीं उदाहरणें:—'बघुनि माझी हे कनकरूप काया, कनकमुकुटादी भूषणें कराया । कशी आशा तुज उद्भवली राया, थोर औदार्या फार दयामाया. ॥' [रघुनाथपंडित—नलदमयंतीस्वयंवराख्यान.] 'सुतयौवराज्यवर मज देउनि गांधर्वविधि करून मला । वरुनि न जाणें म्हणशी, पूरुकुळीं तूंच सुज्ञ साधु भला. ॥' [मोरोपंतकृत आदिपर्व—अध्याय १२ गीति ६८ पहा.] 'पितामह वदे तया, प्रबळ तूं पृथानंदना! रमेश रथिं सारथी चतुर वागवी स्यंदना; । स्वयें गतवयस्क मी, सरस वीर तूं रे! नवा, भिडें रणधुरंधरा!, जय घडो सुखें वा न वा ॥.' [वामन—भीष्मयुद्ध. काव्यसंग्रह—पृष्ठ १५८ श्लोक ८.] या अलंकारास इंग्रजींत Irony असें म्हणतात.

१. वेदवेत्ते. २. दुःखांत. ३. अपराध, चूक. ४. क्षमाशील. ५. प्रथम प्रतिग्रहकर्ता. ६. 'मंदोऽतीक्ष्णे च मूर्खे च' इति विश्वः. ७. नाश. ८. दुसरी गाय. ९. द्वितीय विप्र. १०. अधिक. ११. वेदरूप कामधेनु. १२. सामान्यपशु गाय इची इच्छा. १३. अपवित्र, मलिन. [या श्लोकावरून पंतांस भाषांतरकार असें कोणी म्हणण्याची छाती करील तर करो, पण यांत मूळांतील नेभळेपणास अजीबाद टाळा देऊन पंतांनीं मार्मिकपणानें बरीच भर घालून अपूर्व स्वादुत्व आणिलें आहे.] १४. देहविसर्जन. १५. यमदूतांनीं. १६. पापरूप छिद्रांत. १७. यमालयाला.

देवा! तेव्हां **यमानें** अभिमत[1] पुसिलें कीं, '**नृगा**! सांग बापा!
आधीं तूं भोगितोसि स्वसुकृत[2], अथवा भोगिसी स्वल्प[3] पापा?' ॥ १८
'ठावें पुण्य उदंड[4], अल्प अघ[5], हें ताटीं जसा पापड,
आधीं भोगिन[6] मी' म्हणें, **यम** म्हणे मातें, 'रसापा[7]! पड[8].' ।
तों झालों कृकलास[9] दास गतिला या पावलों हीनता,
दाल्या ब्राह्मणपूजका स्मृति[10] तुझी होती जरीही नता[11]. ॥ १९
उदंड जरि जोडिलें सुकृत तें किती? दर्शन
प्रभो! मज तुझें असे करसरोरुहस्पर्शन[12], ।
अहो! गिरिधरा[13]! खरा सदय तूं हरा[14] सामरा[15],
सुदुर्लभ, परात्परा! सुलभ या[16] नरा पामरा[17]. ॥ २०
प्रभो! तव पदांबुजीं[18] मधुप[19] जे सदा लोळते,
जना निवविति क्षणें सुखसुधाब्धिकल्लोळ[20] ते, ।
स्वनाम[21] कमळें, मुनि भ्रमर ज्यांत, नाशी[22], तळें
तुझें यशचि, ताप, जें हरि[23] रसें मना शीतळें. ॥ २१

---

१. इष्ट. २. निजपुण्य. (शुभ.) ३. सु+अल्प=अतिशयित थोडें. ४. पुष्कळ. ['उदंड' या शब्दाचा अर्थ 'पुष्कळ' असा कसा झाला याची उपपत्ति अशी:—"दंड धातूपासून निघालेल्या शब्दांकडे लक्ष दिलें असतां मूळच्या अर्थाचा थोडा थोडा संबंध ठेवून कशीं अर्थांतरें होतात तें ध्यानांत येईल. दंड म्हणजे शिक्षा, ती करण्याचें साधन म्हणून काठीलाही दंड नांव पडलें, त्यापासून दांडा शब्द निघाला. काठीचा उपयोग आडवी बांधून धोतर वगैरे वाळत घालण्यास करितात त्यामुळें दांडी हा शब्द झाला. आतां उद्दंड याचा अर्थ उंच आहे दांडा ज्याचा तें, म्हणजे उंच छत्री वगैरे. यावरून उदंड म्हणजे पुष्कळ असा अर्थ झाला. 'मी खलदंडें **उदंड** तापतसें' धेनुहरण—मोरोपंत." व्युत्पत्तिप्रदीप—पृष्ठ ३९ पहा.] ५. पाप. ६. अशुभ पाप भोगीन. (श्लोक २३.) ७. हे नृगराजा. (रसापा=रसापते=पृथ्वीपते.) ८. अधोगतीस जा. ९. सरडा. १०. तुझी स्मृति मला होती, तुझी स्मृति नष्ट झाली नव्हती तरी देखील मला ही हीन दशा (कृकलासता) प्राप्त झाली. ११. या श्लोकाचें वृत्त शार्दूलविक्रीडित. याचें लक्षण:—'अंत्यं सप्तदशं चैव षोडशं च चतुर्दशम् । द्वादशं साग्रगं चैव षष्टमष्टममेव च ॥ ८६ ॥ त्रीण्यादौ च गुरूणि स्युर्यस्मिंस्त्वेकोनविंशके । पादे लघूनि शेषाणि **तच्छार्दूलविक्रीडितम्**." ॥ ८७ ॥ [भारतीयनाट्यशास्त्र—अध्याय १५ पहा.] १२. हस्तकमळ. १३. हे गोवर्धनगिरिधारका! १४. महादेवास. १५. इंद्रादिदेवसहिता. १६. या मला नृगाला. १७. नीच, हीन. १८. चरणकमळीं. १९. भ्रमर. २०. आनंदरूप अमृतसागराच्या लाटाच ते. २१. स्वनाम कमळें [होत], ज्यांत (ज्या कमळांत) मुनि [हे] भ्रमर [होत], [आणि] तुझें यशचि तळें [होय]. [तें यशोरूप तळें] ताप (त्रिविधताप—दुःख) नाशी; जें (तळें) [आपल्या] शीतळें रसें (उदकानें—गोडीनें, माधुर्यानें) मना हरि (संतोषवी, रमवी, रिझवी.) २२. ताप नाशी. २३. शीतळें रसें मनातें हरी.

प्रणाम तुजकारणें प्रणतवत्सला[1]! पावना[2]!
भवत्पदसरोरुहस्मृति असो जगद्भावना! ।
पदाब्जयुगुळी तुझी सुरभि[3], मानसा[4] वासरा[5]
नसो विरह[6], नीरजासह[7] जसा नसावा सरा[8].' ॥ २२

आज्ञा घेउनि, वंदुनि प्रभुसि, तो स्वर्गासि गेला नृग,
गंधर्वी विभुकीर्तिगानसुरसीं[9] मोहूनि नेला मृग; ।
ब्रह्मस्वाग्निकणें[10] जळे कुळयश:कर्पूर[11], हें विस्तरें
सांगे कृष्ण यदूंसि कीं न इतरें तीं संकटें दुस्तरें. ॥ २३

## अध्याय पांसष्टावा.

राम[12] द्वारवतीपुरीहुनि सुहृत्संदर्शनाकारणें[13]
गेला सानुग[14] गोकुळासि, घडलें तल्लोचना[15] पारणें[16]; ।
आलें दिव्य अनंत वैभव पुन्हा, दारिद्र्य जाय, व्रजें[17]
स्वर्गा लाजवि, कीं जयांत पदें[18] दे सर्वप्रमोदव्रज[19]. ॥ १

योगी संसृतिसागरांत[20] म्हणती ज्याच्या[21] पदा सांगडी[22],
भेटाया प्रभु ये स्वयें सदय तो त्या गोपदासां[23] गडी, ।
त्या आलिंगिति बंधु धांवुनि, विभू तो तो सुधामेघ[24], ते
साचे भक्तमयूर चातक बळें झाले रथीं वेंधते[25]. ॥ २

१. शरणागतदयालो! २. पवित्र. ३. कामधेनु. ४. चित्ताला. ५. वत्सास. ६. त्या पदाब्जयुगुलीरूप सुरभीचा. ७. कमळासह. ८. सरोवराला. ९. प्रभूच्या यशाच्या गीतांच्या उत्तम रसानें, प्रभुयशोगीतरसानें. १०. ब्रह्मस्वरूप अग्नीच्या कणानें. ११. कुळयशोरूप कापूर ब्रह्मस्वरूप अग्नीच्या कणानें जळतो, ऋणरूप पावक समूल कुल दग्ध करतो. [विप्रधन घेतलें असतां घेणाराच्या कुळांतील तीन पुरुषांचा नाश होतो.] १२. बळराम. [राम म्हणजे बळराम अशा प्रकारचीं कांहीं शब्दांस लहान रूपें असतात:—गोदा=गोदावरी, मथुरा=मथुरापुरी, कविक=कविका, भीम=भीमसेन, सत्या=सत्यभामा. यांचें सविस्तर वर्णन 'शब्दभेदप्रकाशां'त आहे.] १३. मित्रदर्शन व्हावें यासाठीं. १४. कृष्णासह. १५. गोकुलवासी जनांच्या नेत्रांस. १६. तृप्ति, संतोष, भोजन. १७. गोकुळ. १८. स्थान. १९. सर्व आनंदाचा समूह. [हा श्लोक भाषांतररूप आहे असें कोण म्हणेल?] २०. संसारसमुद्रांत. २१. ज्या कृष्णाच्या. २२. दोन होड्या किंवा दोन पगार एकत्र करून जें उदकामध्यें तरण्याचें साधन तें. याला 'चाप' असेंही नांव प्रचलित आहे. २३. गवळ्यांना. २४. अमृतघन. २५. चढणारे.

[1]संतापघ्न [2]वदान्यनाथ वळला प्रेमाचिया जो पिका,
त्या [3]कारुण्यघनासि भेटति तदा विद्युल्लता गोपिका; ।
वृद्धाला नमन स्वयें करि, [4]समां आलिंगिलें बाहुनीं,
यातें वंदिति जे [5]कनिष्ठ गवळी ते श्रेष्ठ सर्वांहुनी. ॥ ३
जेव्हां सप्रेम **राम** प्रणति करि, धरी पाय, [6]त्या **नंद** नाचे
हर्षें भेटे, [7]हृदब्जीं अवयव भरि तो काय त्या [8]नंदनाचे? ।
आलिंगी श्री**यशोदा** दृढ निजहृदयीं आपलें [9]तोकें, थानीं
पान्हा ये, चित्त [10]हिंसें करि, निजविरहें [11]तापलें, तो [12]कथानीं. ॥ ४
अंकीं घेउनि त्यासि [13]तातजननी [14]नेत्रांबुजीं आणिती
आनंदें बहु [15]शीतलामलजलें, अत्यादरें न्हाणिती; ।
शीत स्वच्छ सुगंध सत्य [16]नयनत्वग्घ्राण [17]तर्पू रसा
[18]पीयूषाहि अवार्य ताप हरि जो, तो केंवि कर्पूरसा? ॥ ५
अत्यंतप्रिय गोड शुभ्र भगवान् तो शर्करा [19]मासिया,
गोपीगोपकुमार वेष्टिति रसप्राप्त्यर्थ **रामा**सि या, ।
हा तों सत्य अनंत, अंत घडतो त्या सेवितां [20]शर्करे,
राहे [21]सेवकसेव्यभेदहि न तो येथें खरा तर्क रे! ॥ ६

१. संतापनाश करणारा. २. दानशूरनायक. ३. हा रूपकालंकार आहे. हा राजा कर्ण आहे, तो पंतोजी केवळ यम आहे, हें तोंड चंद्र आहे, हीं सारीं रूपकाचीं उदाहरणें होत. याला इंग्रजींत Metaphor असें म्हणतात. ४. समवयस्कां. ५. यविष्ठ. (सर्वांत वयानें लहान ते.) ६. त्या रामास. ७. हृदयकमळीं. ८. पुत्राचे. या पद्यांत उत्प्रेक्षालंकार झाला आहे. याला इंग्रजींत Simile म्हणतात. या अलंकाराचीं उदाहरणें **पं**तांच्या काव्यांत विपुल आहेत:—वनपर्व–अध्याय १२ गीति १०-१५; विराटपर्व–अध्याय ३ गीति ६३; कर्णपर्व–अध्याय १८ गीति १६, अध्याय १९ गीति ३२ पहा. ९. पुत्र. १०. शीतळ. ११. तापलेलें. १२. कथाद्वारा. १३. नंदयशोदा. १४. नयनकमळीं. १५. थंड आणि निर्मळ उदकें. १६. डोळे, त्वचा, [स्पर्शेंद्रिय] आणि नाक. १७. तृप्त करी. १८. पीयूषानें (अमृतानें)ही ज्या तापाचें निवारण व्हावयाचें नाहीं अशा अवार्य तापाला हरणारा जो त्याला कर्पूर असें कसें म्हणावें? त्याहून अधिक असा राम–हें तात्पर्य. १९. मक्षिका. २०. हें 'व्यतिरेका'चें उदाहरण आहे. जेथें उपमान व उपमेय या दोहोंचें साधर्म्य (सारखेपणा) दाखविलें असून नंतर लगेच वैधर्म्य (भेद-वैलक्षण्यभिन्नत्व) दाखविलें असतें तेथें **'व्यतिरेक'** अलंकार होतो. कधीं कधीं पहिल्यानेंच वैधर्म्य (वैलक्षण्य) दाखविलें असून त्याचें निदान केलेलें असतें तेव्हांही **'व्यतिरेक'** होतो. यांत उपमेयाचें आधिक्य अथवा न्यूनत्व बहुधा असतें, क्वचित् स्थळीं नसतेंही. प्रस्तुत पद्यांत प्रथम साधर्म्य दाखवून नंतर वैधर्म्य दर्शि-

रामातें म्हणती तदाप्त[1] कुशळप्रश्नादि झाल्यावरी,
'शत्रू[3] मारुनि, जिंकुनी भुजबळें, प्रख्याति केली बरी; ।
सिंधूमाजि पुरीहि[4] दिव्य रचिली, ज्ञातीस देतां सुखें,
आम्हांलाहि वियोगतप्तहृदयां[5] या इंदुकांतें[6] मुखें. ॥ ७
अस्मद्विस्मृति[7] तों नसेलचि, परी स्वांतासि[8] वाटे असे[9],
कीं गेले बहु अब्द[10], शब्द विधिला[11] हा, विक्रमी हे असे[12] ।
बाहू कां करिते वियोगदहनग्रस्तव्रजोपेक्षण[13]?
श्रीशक्तीहि दयाहि दीपरुचिसी[14] ज्यांची[15] न लोपे क्षण. ॥ ८
बापा! सांग खरेंच एकचि, तुम्हां दोघांत कोणा किती?
होतें आठवत व्रजांतिल, भवत्कल्याण[16] जे भाकिती. ।
वाटे[17] बा! तुझियाचि संप्रति यशोदा नंद या हे क्रमें
शब्द श्रोत्रपथीं[18] शिरोनि विसरा विध्वंसिती विक्रमें. ॥ ९
कृष्णें येइन भेटि देइन, असी केली प्रतिज्ञा तिचें
केलें ज्येष्ठपणेंचि रक्षण तुवां जैसें निजज्ञातिचें[19], ।

विलें आहे. याचीं अन्य उदाहरणें:—'कथासुरभि या भल्या स्वजननीहुनी वाटती' इत्यादि—केकावली ५८, (२) 'शर जेंवि किरण भंवते जें कौरवकटक तोचि परिवेष' इत्यादि—द्रोणपर्व—अध्याय १० गीति ३७, (३) 'वज्राहुनि कठिण हृदय शोक घनाहत तरी तगे न चिरे' इत्यादि—कर्णपर्व—अध्याय ६ गीति १५, (४) 'या पुष्करापरीसहि सीतेचे नेत्रयुग्म बहु रुचिर' इत्यादि—मंत्ररामायण, (५) 'चंद्रासि लागति कळा उपराग येतो,' (६) 'हे वामनैकपद भूमि नसोनि जंवी,' (७) 'राया! तिचें मुख सुधाकर या द्वयाला,' रघुनाथपंडित—नलदमयंतीस्वयंवराख्यान, (८) 'नवपीयूषसमुद्रीं पतन चकोरींसि जरि घडे विधिनें' इत्यादि—मंत्रभागवत, (९) 'मोठा शुद्धोद असो घनाविना चातकीस तो मरुची' इत्यादि—मंत्ररामायण, (१०) 'सुविद्य धन मेळवी' इत्यादि—केकावली ९४, (११) 'कथा भुवनमोहिनी' इत्यादि—केकावली १०३. या अलंकाराचीं उदाहरणें पंतांच्या काव्यांत विपुल आहेत. २१. हा सेवक आणि हा सेव्य (सेवा करण्यास उचित असा स्वामी) असा भिन्न भाव.

१. त्याचे आप्त जन=स्वजन. २. श्लोक ६-८ पहा. (अध्याय ६५.) ३. कंस. ४. द्वारका. ५. वियोगानें संतप्त आहेत हृदयें ज्यांची त्यांना. ६. इंदु(चंद्रा)प्रमाणें कांत (सुंदर). ७. आमचें विस्मरण झालें नसेलच. ८. अंत:करणास. ९. आहे. १०. वर्षें. ११. ब्रह्मदेवाला. १२. हे बाहू असे. १३. वियोगाग्नीनें गिळिलेल्या व्रजाची उपेक्षा. १४. दीपाची रुचि (कांति). १५. ज्या बाहूंची. १६. तुमचें हित. १७. यशोदा नंद या क्रमें शब्द तुझिया श्रोत्रीं शिरोनि विसरा विध्वंसिती, असें वाटे. १८. कर्णमार्गांत. १९. आपल्या ज्ञातिबांधवांचें.

[1]तो तूं एकचि, बंधुलाभ उघडा, तोटा नसे [2]होवरी,
नेत्रें साधुनि [3]गौरें अर्थ जपती [4]कृष्णार्थ हीं आवरीं'. ॥ १०
गोपी रामविलोकनें बहु सुखी झाल्या, तथापि प्रिया
कृष्णातें पुसती, [4]यदर्थ रुसती ज्यांच्या गृहादिक्रिया, ।
'आहे कीं [5]कुशली? [6]हरी प्रथम या [7]घोषामधें जो दधी,
[8]अस्मच्चित्त मग प्रयाणसमयीं [9]मूर्तप्रमोदोदधी. ॥ ११
देतो कीं [10]पुरसुंदरीजनमनोदृग्वक्त्रपद्माकरा
हर्षे [11]श्रीहरिभानु? योग्यचि तया तें होय [12]पद्माकरा; ।
[13]बंधूतें स्मरतो कधीं तरि? पिता माता तरी आठवी?
हें कैचें? स्मृति [14]ज्यां निरोप तरि तो [15]दूरस्थही पाठवी. ॥ १२
रामा! येइल एकदा तरि [16]हरी मातेसि देखावया?
ऐसें काय म्हणेल 'साय नलगे, लोणीच दे खावया?' ।
आल्या [17]नातसुनाहि, [18]तें वय न हें साचें, परी [19]मावली
तेचि प्रीति दया इची न [20]पहिली ती [21]विक्रिया पावली. ॥ १३
सेवा आठवि आमुची कधितरी गोष्टींत तो काय जी?
[22]ज्यावांचूनि न दे स्मरों [23]गुरुजनागारक्रिया [24]काय जी. ।
ज्यासाठीं त्यजिले [25]सुदुस्त्यजहि जे, आम्हां अशांस त्यजी
[26]अत्याज्य त्यजिले म्हणोनि [27]फळला तो दोष हा सत्य, जी! ॥ १४

---

१. तो कृष्ण आणि तूं एकच आहां. २. या वेळपर्यंत. ३. पांढरा अर्थ मिळवून काळ्या अर्थाचा जप करतात, अशीं नेत्रें तूं आवर. ४. ज्या कृष्णासाठीं. ५. खुशाल. (अध्याय ६५ श्लोक ९ पहा.) ६. हरण करी. हें 'पर्यायोक्ता'चें उदाहरण होय. ७. गायवाड्यांत, गोकुळांत. [हें वर्णन पंतांच्या प्रतिभारूप मुसींतील आहे.] ८. आमचें मन जाण्याच्या वेळीं जो हरण करी. ९. मूर्तिमंत आनंदसागर असा कृष्ण. १०. मथुरापुरसंबंधी सुंदरीजनाचीं जीं मन नेत्र मुखें हींच कमळें त्यांच्या समुदायास. ११. श्रीहरिरूप सूर्य. [कमळातें आनंद देणारा सूर्य होय. सूर्याच्या योगें कमळांचा विकास होतो.] १२. लक्ष्मीकरा. (पद्मा+करा.) १३. श्लोक १० पहा. १४. ज्याला स्मृति असते तो दूरस्थ असला तरी निरोप तरी पाठवितो. १५. दूर असतांही. १६. कृष्ण. १७. येथें आपल्या पदरचें समर्पक वर्णन घालून पंतांनीं मूळ ग्रंथावर ताण केली नाहीं असें कोण म्हणेल? १८. तें लोणी साय दहीं इत्यादि मागून खाण्याचें बालवय आतां नाहीं. १९. आई. (यशोदा.) २०. पहिली प्रीति दया ती विक्रिया पावली नाहीं. २१. विकार, अंतर, फेर. २२. ज्या कृष्णावांचून. २३. गुरुजन+अगारक्रिया=वडिल मनुष्यें+गृहकृत्यें. २४. देह. २५. टाकण्यास अशक्य असे (माता, पिता, भ्राता, पति, पुत्र इत्यादि). २६. टाकण्यास अयोग्य जे गुरुजनादिक ते. २७. फळास आला. [या चरणांतील नीतिशिक्षण कसें आहे याचा विचार वाचकांनीं करावा.]

श्रीमद्वक्त्र [1]सुधाकरस्मित सुधा तद्बिंदुसे वर्णे न
[2]द्राक्षामाक्षिकशर्करारस तसा, त्याचें वृथा वर्णन, ।
ऐसें तें मृदु [3]नर्मशर्मद जयामध्यें असे बोलणें
कोणा स्त्रीस न आवडे, पढविलें जेणें पिका डोलणें? ॥ १५
[4]व्याधाचें गान जैसें [5]त्वद्वरजनिचे गोड तैसेचि बोल,
स्त्री आम्हीं गोपिकाही वनवसति मृगी त्यांसि मानू अमोल; ।
न क्रूर व्याध [6]साधु प्रखरतरशरें काळिजालाच भेदी,
घे [7]प्राणोपायनातें त्वरित [8]सदय तो कीं असें दुःख नेदी. ॥ १६
आम्हीं रानट भूललों, उचित हें कीं ज्यांसि कांजी सुधा
दोनी तुल्यचि, बोलें लावित असों रामा! [10]शठाला [11]सुधा. ।
ज्या हंसी निवडावयासि चतुरा [12]तत्काळ पाण्या दुधा
त्या घेताति कसें [13]कृतघ्नवचन श्रोत्रीं पुरस्त्री [14]बुधा? ॥ १७
हांसेल प्रभु हा मनांत पुसतां हें काय गे! तो कथा
जाणें पुष्कळ [15]चित्रवाक्पटु करी [16]दीप्त [17]स्मितें [18]मन्मथा; ।
होतां दुःसह मानसांत सहसा दुर्वार [19]मारव्यथा
लज्जा भीति विवेक कोठिल न कां येतील अस्मत्पथा? ॥ १८
आम्हांला [20]सखि! तत्कथा बहु अशा [21]कोशास? अन्या [22]कथा,
ज्या [23]जाणेंचि नसे [24]किमर्थ पुसतां ग्रामाचिया त्या [25]पंथा? ।

---

१. चंद्र. २. मधु द्राक्षादिकांचा रस तसा न. ३. नर्म (थट्टा-विनोद) आणि शर्म (सुख) देणारें. ४. व्याध=पारधी. [व्याध आपल्या मधुर गानानें श्वापदांचें मन मोहित करून त्यांस पकडतो—ही गोष्ट सुप्रसिद्ध आहे.] ५. तुझ्या धाकट्या भावाचे. ६. दयाशील, चांगला. ७. प्राणरूप उपायनातें (नजराण्यातें, भेटीतें). ८. येथें उपमान व उपमेय यांचें साधर्म्य दाखवून नंतर वैधर्म्य दाखविलें आहे म्हणून 'व्यतिरेक' अलंकार झाला. ९. दोष. १०.ठगाला. ११. व्यर्थ. १२. त्वरित. (या वर्णनाला मूळांत आधार नाहीं.) १३. त्या कृतघ्नाचे वचनावर कसा विश्वास ठेवितील? १४. बुद्धिमती. १५. चित्रविचित्र भाषण करण्याविषयीं कुशल, चित्रकथनकोविद. १६. क्षुभित. १७. स्मितें=हास्यानें. [स्मिताचें लक्षण 'नाट्यलोचनां'त दिलें आहे तें—'ईषद्विकसितैर्गण्डैः कटाक्षैः सौष्ठवान्वितैः । अलक्षितं द्विजद्वारे सूचमानं स्मितं भवेत् ॥' चारित्रवर्धनकृत 'शिशुहितैषिणी' नामक रघुवंशटीका—सर्ग ९ श्लोक ३७ पहा.] १८. कामाला, स्मराला. (श्लोक १३.) मनाचें मथन करणारा जो तो (काम). १९. कामबाधा. ['मारोऽनंगे मृतौ विघ्ने मारी चंड्यां जनक्षये.'] २०. हे गोपींनो. [असें कित्येक गोपींचें भाषण आहे.] २१. श्लोक १४ पहा. २२. अन्या (कथा) कथा (सांगा, बोला, कथन करा.) २३. जावयाचें नाहीं. २४. कशासाठीं. २५. मार्गास.

आम्हांवांचुनि काळ लोटत असे [1]त्याचा जरी बायि! हो!
जातो त्याविण आमुचाहि तरि तो खोळंबतो कायि [2]हो? ॥ १९
[3]कोणी वर्णिति [4]आस्य हास्य [5]पतिचें, कोणी मनःकल्पित
[6]क्रीडानुग्रहकारि कर्णसुखद [7]**श्री**जानिचें [8]जल्पित; ।
[3]कोणी [9]विश्वमनोहरेक्षण काळा, [3]कोणी सुलीला गती,
[3]कोणी वर्णित [10]वर्णित [11]प्रियपरिष्वंगा रडों [12]लागती. ॥ २०
[13]तयांतें [14]कृष्णाचे [15]सुखकर निरोप [16]प्रियतम
स्वयें सांगे **राम** प्रभु [17]कुमुदिनीचा [18]प्रिय [19]तमें ।
हरी नाशी ताप [20]द्युमणिकरतेजें [21]हिमरुची
तसा [22]स्त्रीसेना [23]हा [24]निववि, [25]घनें [26]भू तीहि [27]मरुची. ॥२१
उरासीं लावूनी धरुनिहि करानें हनु [28]नय-
प्रवीण स्त्रीनेत्रें पुसुनि करि नाना [29]अनुनय; ।
प्रभु स्वात्माही तो म्हणुनि समजावी [30]नतरति-
प्रद स्वांगें नौका [31]विपदुदधिला कां न तरती? ॥ २२
[32]युवतिदृग्भ्रमरीमधु [33]**मा**धव [34]व्रजसुखार्थ [35]वसे, [36]मधुमाधव ।

---

१. त्या कृष्णाचा. २. येथें प्रश्नालंकार आहे. ३. कांहीं गोपांगना. ४. मुख. ५. कृष्णाचें. ६. क्रीडारूप अनुग्रह करणारें. ७. कृष्णाचें. (श्रीः जाया यस्य सः श्रीजानिः.) ८. भाषण. ९. सकल जगताला मोहित करणारें ईक्षण (चारुवीक्षित.) १०. वर्णन करीत असतांना. ११. कृष्णालिंगनास. १२. श्लोक १५ पहा. १३. गोपीजनातें. १४. या पद्याचें वृत्त शिखरिणी. याचें लक्षण:—'आद्यात्पराणि पञ्चैव द्वादशं सत्रयोदशम् । अंत्ये सप्तदशे पादे **शिखरिण्यां** गुरूणि च ॥.' (भारतीयनाट्यशास्त्र—अध्याय १५ वा.) १५. हृदयंगम. १६. आवडता. १७. कमलिनीचा. १८. पति. १९. अंधकार. २०. सूर्यकिरणाच्या तेजें. २१. चंद्र. २२. गोपांगनागणाला. २३. राम. २४. सांत्वन करी. २५. ढग, मेघ. २६. पृथ्वी, जमीन. २७. मारवाड देशाची. (जेथें पाणी नसून पर्जन्य पडत नाहीं अशा देशाची.) 'समानौ मरुधन्वानौ' इत्यमरः. मरु=निर्जल देश. २८. सांत्वननयकुशल. (राम.) २९. प्रार्थना. ३०. भक्तांस प्रिय सुख देणारा. ३१. विपत्तिरूप समुद्राला. ३२. व्रजांगनांच्या दृष्टी त्याच भ्रमरी त्यांस मधुतुल्य. [मधु=मद्य. 'मकरंदस्य मद्यस्य माक्षिकस्यापि वाचकः । अर्धर्चादिगणे पाठात्पुंनपुंसकयोर्मधुः ॥.'] ३३. बळराम. ३४. गोकुलांतील जनाच्या सुखासाठीं. ३५. येथें 'वसे,' 'क्रमि' आणि 'करी' या अनेक क्रियांचा संबंध एकाच कर्त्याशीं (माधवाशीं) आहे म्हणून हा 'कारकदीपक' अलंकार होय. कर्ता एक असून त्या कर्तृकारकाचा संबंध अनेक क्रियांशीं असतो तेव्हां कारकदीपक अलंकार होतो. याचीं उदाहरणें अनेक आढळतात:—(१) 'पायीं भ्रमली, श्रमली, निजली, भिजली निजाश्रुनीरांनीं' वन-

[1]कंमि, करी करुणा स्वजनावरी, वि[2]धु चकोरिं कैं[3]रव्रज नैं[4]ावरी. ॥ २३

वाहे [5]मंद सुगंध शीत पवन श्री[6]सूर्यकन्यातटीं,
क्रीडे स्त्रीगणवेष्टित प्रं[7]भु वनीं मूं[8]र्छद्भपांशुच्छटीं, ।
केलें नृत्य लैं[9]तानटीप्रियतमीं सानंद वृक्षीं नटीं
बंदी गायक [10]भृंग वर्णिति यशें विश्वांत जीं गो[11]मटीं. ॥ २४

से[12]वासादर दास देव वरुण प्रेषी सुं[13]रा सेवना,
ते दें[14]वी तं[15]रुकोटरांतुनि निघे व्यापी सुं[16]वासें वना, ।
तीचा आणुनि गं[17]ध वायु कळवी कीं, 'हे जं[18]गद्भावना !
आहे सिद्ध सुधासखी स्वसमयीं प्या वां[19]रुणी पं[20]ावना'. ॥ २५

गेला वृक्षासमीप त्रिजं[21]गदधिपती तो रं[22]तिप्राणपाजी-
श्रांतस्त्रीतें स्वहस्तें दुं[23]रितहरयशोराशि सेवूनि[24] पां[25]जी, ।

---

पर्व–अध्याय ४ गीति २७३], (२) ज्ञहि अज्ञहि जन तारी नामें कामादि शत्रुही मारी । स्वयशें भवभय वारी करि भक्तमयूरघन दया भारी ॥ ४६ ॥ [मात्रारामायण–काव्यसंग्रह–रामायणें भाग पहिला], (३) जटायु मूर्च्छित क्षतार्त देखतां गळां पडे, रडे पुसे कथी परंतु मृत्यु सांगतां घडे । दडे मुहूर्त पूर्व शोक यापुढें मनीं जडे, अडेचि धैर्य, तोय दे निघे शुगब्धिचे कडे ॥ २२ ॥ [पंचचामररामायण]. पुढच्या अठ्ठाविसाव्या श्लोकाचा प्रथम पाद याच अलंकाराचें उदाहरण होय. याचें लक्षण:—'सकृद्वृत्तिस्तु धर्मस्य प्रकृताप्रकृतात्मनाम् । सैव क्रियासु बह्वीषु कारकस्येति दीपकम् ॥' [काव्यप्रदीप–१० उल्लास १७ कारिका पहा.] ३६. चैत्रवैशाख हे दोन मास.

१. कंठी, घालवी. २. चंद्र. हा चरण सुभाषितरूप आहे. ३. किरणसमूह. ४. आवरीत नाहीं. ५. शैत्यमांद्यसौरभयुक्त. [वायु (मंद, सुगंध, शीत) त्रिविध असतो असा कविसमय आहे. 'वने शैत्यमांद्यसौरभ्याणि कविसमयविशेषणैः' चरित्रवर्धनकृत 'शिशुहितैषिणी' नामक रघुवंश-टीका–सर्ग १ श्लोक ३८ पहा.] ६. यमुनातटीं. ७. राम. ८. मूर्च्छत्+भप+अंशु+छटा=पसरणारे+चंद्र (भ=नक्षत्र, प=पति, स्वामी) किरण+छाया, कांति=ज्या वनांत चंद्रकिरण पुष्कळ पसरले आहेत अशा यमुनातीरीं. ९. लतारूप नटीचे प्रियतम जे वृक्षरूप नट त्यांनीं सानंद नृत्य केलें. १०. भृंग हेच बंदीगायक. ११. चांगलीं. १२. चाकरी करण्यांत दक्ष. १३. मदिरा. (वारुणी–सुधेबरोबर क्षीरसागरांतून उत्पन्न झालेली मदिरा.) १४. वारुणी सुरा. या सुरेला वरुणानें पाठविलें म्हणून 'वारुणी' असें म्हटलें आहे. १५. वृक्षाच्या ढोलींतून. १६. सुगंधानें. (श्लोक १९ पहा.) १७. गंध=सौरभ, सुवास. [**'गंधस्तु** सौरभे योगे गन्धके गर्वलेशयोः । स एव द्रव्यवचनो बहुत्वे पुंसि च स्मृतः ॥' इत्यभिधानात्. शिशुपालवध–सर्ग ८ श्लोक ३० टीका पृष्ठ २३९ पहा.] १८. हे जगद्रक्षका रामा ! १९. मदिरा. २०. पवित्रा. २१. बलराम. २२. रतीचा प्राणप म्ह० प्राणपति काम त्याची आजी युद्ध तेणेंकरून श्रांत ज्या स्त्रिया त्यांतें. २३. पाप (दुरित) हरण करणाऱ्या यशाची रास (ढीग) ज्याची तो. (राम.) २४. आपण सुरा सेवून त्यांना पाजी. बलरामानें स्मरसंगरांत गोपवनितांसह वारुणी प्राशन केलें–असें तात्पर्य. २५. श्लोक २० पहा.

त्या रामाची सुकीर्ति [1]श्रुतिनुत शुचिता लाजवी [2]सत्तपा जी,
[3]तीतें टाकूनि सेवी प्रभु म्हणुनि [4]सुरासक्त जो तोचि पौजी. ॥ २६
लज्जा गेहकुटुंबधर्म[6]रुचि भी देह[7]स्मृतीही गळे,
आधीं हांसति बाळ कर्मठ भले होती तयांवेगळे; ।
तोंडीं शब्द विचित्र, अश्रु नयनीं, [8]पुण्यर्धि सारी ढळे,
कां पीती मदिराचि मूर्ख भगवत्कीर्तिप्रिया नाढळे. ॥ २७
देहातें विसरे, न मृत्युस गणी, हांसेहि, नाचे, रडे,
लज्जा जाय, [10]नुरेशि रीति पहिली, [11]अन्याचि आंगीं जडे, ।
हें [12]पानव्यसनीं असे सुख, तरी तें कीर्ति[13]पानीं घडे,
पायीं विश्व पडे, न जाय नरकीं, कां मद्यपा! नावडे? ॥ २८
कट्वम्लक्षारतिक्तप्रमुख[14]रसें अशा त्या पदार्थास माय
स्वेच्छेनें सेविती कीं [15]तृणेतिलखलि हें जें रुचे तेंहि गाय, ।
[16]तद्वत्स [17]स्तन्यपानें जगति धरितिही तुष्टिपुष्टीस [18]काय,
[19]श्रीशाच्या सद्यशेंही भजकजन जगे, अन्यथा योग्य काय? ॥ २९
झाला तो [20]मंदविव्हलाक्ष भगवान् जाणे न [21]वासोहळा,
जाणो भोगिति गोपिकाहि [22]विभुसीं, त्यां तो नवा [23]सोहळा; ।

---

१. वेदस्तुत. २. उत्तम तपातें. ३. त्या शुचितेतें. ४. मद्यासक्त. ५. या श्लोकाचें वृत्त स्रग्धरा. याचें लक्षण:—'चत्वार्यादौ च षष्टं च सप्तमं च चतुर्दशम्। अष्टादशं सप्तदशं तथा पञ्चदशं पुन: ॥९२॥ अंत्योपांत्ये गुरूण्यत्र लघून्यन्यानि सर्वदा। एकविंशतिके पादे **स्रग्धरा** नाम सा यथा ॥.' ९३ [भारतीयनाट्यशास्त्र–अध्याय १५ काव्यमाला–पृष्ठ १६२ पहा.] याचा भावार्थ:—स्रग्धरेंत प्रत्येक पादाच्या एकवीस अक्षरांत पहिलीं चार अक्षरें, सहावें, सातवें, चवदावें, पंधरावें, सतरावें, अठरावें, विसावें (उपांत्य) आणि एकविसावें (अंत्य) अशीं अक्षरें गुरु असतात आणि इतर अक्षरें लघु असतात. ६. आवड. ७. शुद्धि. (हे मदिरापानाचे आणि कीर्तिपानाचे परिणाम होत.) ८. पुण्यसंपत्ति. (पुण्य+ऋद्धि.) ९. हें 'कारकदीपका'चें उदाहरण जाणावें. १०. न राही. ११. दुसरी रीति. १२. मद्यपानछंदांत. १३. भगवत्कीर्तिचें पान केलें असतां देहविस्मरणादि लक्षणें प्राप्त होतात. १४. रस=भोग्य पदार्थ. ['रस्यंते स्वाद्यंते इति रसा भोग्यार्थाः' रघुवंशटीका–सर्ग २ श्लोक ४ पहा.] १५. गवत व तिळांची पेंड. १६. त्यांचीं वासरें. १७. दुग्धप्राशनें. १८. देह. १९. मातेनें कांहीं खाल्लें तरी तिच्या स्तन्यानें बाळें जगतात तद्वत् ईश्वरानें कांहीं केलें तरी त्याच्या यशानें भक्तजन जगतात–हें तात्पर्य. [या मदिरापानाचें आणि कीर्तिपानाचें वर्णन मूळांत नाहीं. श्लोक २७-२८-२९ हे केवळ पंतांच्या काव्यस्फूर्तीचे ज्ञापक होत.] २०. मदपीडितलोचन. (श्लोक २१ पहा.) २१. वस्त्रनांगर यांस न जाणे. २२. बलरामाशीं. २३. उत्सव.

कर्णीं एकचि कुंडल प्रभुचिया, [1]माळा गळां, [2]आननीं
[3]स्वेदांभःकण, [4]कामिनींसह फिरे जैसा [5]करी [6]काननीं. ॥ ३०
होती [7]यद्ध्यानयोगोचित अमित [8]भवी जोडिल्या सत्तपानें,
तो झाला [9]वारुणीच्या, इतर नर तसा, स्त्रीगणीं मत्त पानें; ।
बोलावी [10]तोयकेलीस्तव [11]बळ कळतां कामिनी [12]कामदासी
[13]कालिंदी ती नये, कीं स्वमनिं समजली मत्त त्या [14]कामदासी. ॥ ३१
कालिंदीच्या मनीं कीं प्रभु परि भुलला [15]वारुणीपानदत्त-
प्राज्यस्पष्टप्रमोहप्रदमदविवशस्वांत हा राम मत्त, ।
या भावें [16]बोलें [17]लंघी, समजलि न तदा तें महापाप, गेला
क्षोभा कारुण्यसिंधु [18]प्रबळ बळ [19]हळें वोढि त्या [20]आपगेला. ॥ ३२
वस्त्राचें करिती [21]करें, करि [19]हळें तैसेंचि आकर्षण,
क्रोधें [22]मेकळकन्यकेप्रति म्हणे लोकेश [23]संकर्षण ।
'पापे! [24]राममनिदेशलंघनपरे! ज्या दंडिलें कालिया
रामाच्या अनुजें [25]गुरुत्व दिधलें त्वां सत्य त्याकालिं [26]यां. ॥ ३३
परम दुःसह हा कुजनां [27]गरज्वलनसा [28]शतधा तुज नांगर ।
करिल [29]तार्क्ष्यचि तूं खरि सापिणी [30]सुकुटिला [31]मलिना वरि पापिणी' ॥ ३४

---

१. वैजयंती माला. २. मुखावर. ३. मुखावर घर्मोदकाचे बिंदु. ४. वनितांसह. ५. हत्ती. ६. वनांत. ७. ज्याचें ध्यान करण्यास योग्य. ८. संसारी जन. ९. मदिरेच्या. ['**वारुणी** गंडदूर्वायां प्रतीचीसुरयोः स्त्रियाम्' इति मेदिनी.] १०. जळक्रीडेकरितां. (श्लोक २३.) ११. बल=बलदेव=हलायुध. ['**बलं** गंधरसे रूपे स्थामनि स्थौल्यसैन्ययोः । पुमान् हलायुधे दैत्यप्रभेदे वायसेऽपि च ॥'.] १२. कामाची दासी. १३. यमुना. १४. काम देणाऱ्या बळरामास, १५. वारुणीच्या पानानें दिला जो प्राज्य स्पष्ट आणि प्रमोह देणारा मद त्याच्या स्वाधीन अंतःकरण ज्याचें असा. मद्यसेवनानें उत्पन्न झालेला जो मोठा स्पष्ट आणि भ्रांतिजनक मद (उन्मत्तपणा) त्याच्या स्वाधीन चित्त ज्याचें असा. (राम.) १६. हलधराचें वचन. १७. उल्लंघी, अनादरी. १८. बलाढ्य. १९. हल=नांगर. २०. यमुनानदीला. [आपगा=नदी. अपां समूहः आपः तेन गच्छति आपगा. मल्लिनाथ–शिशुपालवध–सर्ग ३ श्लोक ७२.] २१. हातानें. २२. यमुनेप्रत. ['रेवा तु नर्मदा सोमोद्भवा मेकलकन्यका' या अमरवचनाप्रमाणें मेकलकन्यका (मेकलमुनीची अथवा मेकलपर्वताची तनया) नर्मदा होय, यमुना नव्हे व बळरामाला 'कालिंदीभेदन' असें नांव आहे, यास्तव येथें मेकलकन्येच्या स्थानीं 'भास्करकन्यके' असा पाठ असावा.] २३. बळराम. २४. बलरामाच्या निदेशाचें (आज्ञेचें) लंघन (अतिक्रम) करण्यास तत्पर. (संबोधन.) २५. वडिलपण, श्रेष्ठत्व. २६. या बलरामाला. २७. विषाग्नीसारखा. २८. शंभर शकलें. २९. गरुड. ३०. स्वभावानें वक्र, वक्रगामिनी, दुराचारिणी, कामचारिणी, स्वच्छंदगामिनी. ३१. कृष्णवर्णा, पापकलुषिता. [यमुनेचें जल काळें आहे.]

धरुनि पाय म्हणे[१] यमुनापगा, 'प्रभुवरा! घडलें मज पाप, गा!।
मदवनीं[२] भुवनीं इतर क्षण क्षम[३] नसे, करिं जीवितरक्षण[४]. ॥ ३५

गोपस्त्रीमणिमंडली[५] गुरुवरा! माझी प्रिया आलि[६], याँ[७]
पायातें भजते, महाहित[८] खरें जन्मासि हें आलिया,।
सेवेला चुकल्यें जडप्रकृति[९] मी दासी तुझी शिक्षिता,
झाल्यें सावध, मुक्तिदा[१०]! नतपरित्राणक्रियादीक्षिता[११]!' ॥ ३६

रामाच्या पदपुंडरीकयुगुळीं[१२] सेवी रसा षट्पदी[१३],
किंवा भक्तसमर्पिता सुतुलसीमालाचि कीं तोरदी[१४],।
लोळे तत्पदशृंखळाचि[१५], अथवा तो देव हंसच्छदी[१६]
छाया[१७] किंबहुना दिसे प्रभुपदीं रम्याचि कृष्णा[१८] नदी. ॥ ३७

रक्षिली कीं धरी माथां आधीं पाय नदी[१९] नता;।
सकृप[२०] प्रभुच्या ठायीं साधी काय न दीनता[२१]? ॥ ३८

कालिंदीसलिलीं शिरे स्वैरमणी[२२] घेऊनि जैसा करी[२३],
क्रीडा तो मदमंथरप्रियतमासंगें[२४] महात्मा[२५] करी;।

---

१. श्लोक २५ पहा. २. मत्+अवनीं=माझ्या+रक्षणीं. ३. समर्थ. ४. प्राणत्राण. ५. गोपांगनांतील उत्तम स्त्रीसमूह. ६. सखी. ७. या=तुमच्या. (बलरामाच्या). ८. मोठें कल्याण. ९. जलप्रकृति, किंवा मूढ. [श्लेषालंकार असेल तेथें ड ल यांचा अभेद (सावर्ण्य) मानतात. 'यमकश्लेषचित्रेषु बवयोर्डलयोर्न भिद्' हेमाद्रिकृत दर्पणनामक रघुवंशटीका. सर्ग ९ श्लोक ४६.] १०. हे मुक्तिप्रदा! ११. हे शरणागतांचें रक्षण करण्याची दीक्षा घेतलेल्या (रामा!). हा छत्तिसावा श्लोक मूळांतील श्लोक २६-२७ यांशीं ताडून पहावा म्हणजे पंतांची करामत दिसून येईल. १२. पादकमलयुग्मीं. १३. भ्रमरी. १४. तोरडी, पादभूषण. १५. त्याच्या पायांतील सांखळीच. १६. हंसपक्षी. १७. सावली. १८. कालिंदी. या श्लोकास मूळांत कांहीं एक आधार नाहीं. पंतांची प्रतिभा जेव्हां भरांत असते तेव्हां ती अशाच समयोचित, अलंकारमय आणि हृदयंगम कल्पनांनीं भरलेल्या श्लोकांस प्रसवते. पंतांला भाषांतरकार म्हणून नादान ठरविण्याची खटपट करणारे पंडितंमन्य आक्षेपक हा श्लोक श्रीमद्भागवतांतील कोणत्या पद्यांचें भाषांतर आहे हें दाखविण्याची कृपा करतील तर किती चांगलें होणार आहे? पंतांच्या सरस्वतीचा हा प्रवाह सुरस आणि प्रसन्न नाहीं असें कोण म्हणेल? कालिंदी बळरामास शरण आली—एवढ्याच गोष्टीला अनुलक्षून, या श्लोकांत 'किंवा' 'कीं' 'अथवा' 'किंबहुना' या शब्दांनीं सूचविलेले जे कल्पनातरंग पंतांच्या सरस्वतीप्रवाहांत उठले आहेत, ते चित्ताकर्षक नाहींत असें कोण रसिक म्हणेल? या पद्यांत उत्प्रेक्षामूलक 'विकल्प' नामक अलंकार झाला आहे. १९. यमुना. २०. सदय, भक्तवत्सल. २१. दीनता काय न साधी (मिळवी, संपादी) सर्व कांहीं साधिते—असा भाव. २२. आपल्या स्त्रिया (करेणु), व्रजसुंदरी, बल्लवललना. २३. हत्ती. हीच उपमा मूळांत आहे (श्लो० २८). २४. सुरापानाच्या मदानें मंद झालेल्या स्त्रियांसहवर्तमान. २५. महाशय, महानुभाव (बलराम).

जाणों माधव[1] हाहि त्या कुमुदिनी[2] साजे, न हे तारका
त्या राकापति[3] **राम**, हेहि उपमा अल्पा जगत्तारका. ॥ ३९
येतां तीरांस[4] नीलांबरयुगळ[5] तया ईश्वरा[6] विश्वपाळा
दे लक्ष्मी[7] कर्णभूषा[8] विनवुनि पहिली हेमपाथोजमाळा[9], ।
स्वीकारी सर्व **राम** प्रभु, धरि दुसऱ्या जेधवां कुंडला जे
पार्श्वींचे[10] पूर्णपर्वी[11] कवि[12] गुरु[13] विधुंही[14] देखतां तुंड[15] लाजे. ॥ ४०
असे गोकुळामाजि त्या दोन मासि[16], व्रजस्त्री करीती प्रभूसीं विलास; ।
तरी मानिती मानसीं एक रात्री भल्या कीं न अर्धक्षणातें सुगात्री[17]. ॥ ४१
जसी ओढिली **सूर्य**कन्या हळानें बळानें[18] जगन्नायकानें **ब**ळानें[19], ।
नदी[20] वक्र तैसीच अद्यापि आहे, कथा सूचवी काय[21] सर्वा जना हे? ॥ ४२
हळें ओढूनि **का**लिंदी आणिलीच कुतूहलें[22] ।
**ब**ळें, तैसी भक्तबुद्धी लावावी भजनीं बळें[23]. ॥ ४३

---

## अध्याय सासष्टावा.

होता ज्यासमयीं[24] असा निजसुखें **नं**दव्रजीं **राम** हा,
कारूषाधिप[25] पौंड्रकाख्य[26] नृप तैं[27] दे वृष्णिवीरां[28] महा[29]; ।

---

१. वैशाख. २. कमलिनी. ३. चंद्र. ४. नदींतून बाहेर येतां. ५. नीलवस्त्राचें युग्म, दोन असित वस्त्रें. ६. बळरामाला. ७. लक्ष्मीनें बळरामास अम्लानपंकजमाला, दोन नीलांबरें आणि दोन दिव्य श्रवणभूषणें दिलीं असें वर्णन 'हरिवंशां'त आणि 'विष्णुपुराणां'त आहे. (श्लो० २९ टीका पहा.) वरुणानें हें उपायन बळरामास पाठविलें होतें. ८. कुंडलें. ९. सुवर्णकमलांची माळा. १०. उभय भागींचे. ११. पूर्णिमादिवशीं. १२. शुक्र. १३. बृहस्पति. १४. चंद्रही. १५. बलरामाचें तोंड. १६. याप्रमाणें बळरामानें दोन महिन्यांतील सर्व रात्री एक रात्रीप्रमाणें व्रजवधूंशीं विलास करण्यांत घालविल्या. १७. तन्वंगी गोपी. १८. सामर्थ्यानें. १९. बळरामानें. २०. वृंदावनांत यमुनेचा प्रवाह अद्याप वक्र आहे, यमुना अद्याप वक्रवाहिनी आहे, यावरून बळरामाचें बळ सूचित होतें. २१. या प्रश्नाचें उत्तर पुढच्या पद्यांत आहे. २२. कौतुकानें. २३. या अध्यायाला 'यमुनाकर्षण' अशी संज्ञा आहे. २४. मागें वर्णिल्याप्रमाणें राम गोकुळांत गोपललनांशीं क्रीडा करीत असतां. २५. कारूषदेशाचा राजा. (करूषाधिपति असें मूळांत आहे. श्लोक १ पहा.) २६. पौंड्रकवासुदेवः—हा पुंड्रदेशाचा राजा होता, हा कृष्णाचा फार मत्सर करी व आपली प्रसिद्धि व्हावी म्हणून कृष्णासारखींच कुंडलें, गरुडध्वज, कौस्तुभ इत्यादि चिन्हें धारण करून मिरवी. एकदां तर त्यानें एका दूताबरोबर कृष्णास असा निरोप पाठविला कीं, 'तूं खरा कृष्ण

आश्चर्य त्रिजगीं करी श्रवण जो कोणी असो तो तया
गंभीरासहि हांसवीलचि [1]भवक्लेशांतही तो[2]तैया. ॥ १
'तूं साक्षात्प्रभु **वासुदेव** [3]धरणीभारास वारावया,
विश्वेशा! अवतार [4]सार धरिला लोकांसि तारावया.' ।
ऐसी मूढजन [5]स्तुती करिति ती झाली [6]सुरा माकडा,
मानी सौख्य खरें, दिसे मधु, न त्या मूर्खत्वधामा [7]कडा. ॥ २
[8]बाळा जेंवि नृपाळ बाळ करिती, तैसाचि तो कीं शता-
मूर्खांमाजि सुमूर्ख आपुलि म्हणे सत्य [9]त्रिलोकीशता, ।
केली [10]दीर्घसटादिवेषरचना ज्या [11]ग्रामसिंहास तो
[12]मत्तेभप्रभुकुंभभंगनिपुणा [13]पंचानना [14]हांसतो. ॥ ३
ऐसा **पौंड्रक** मंद[15] [16]बालिशकृतप्रोत्साहनें [17]मातला,
धाडी दूत बळें [18]जगत्पतिकडे, तो **द्वार**के पातला; ।

---

नसून मीं खरा कृष्ण आहें, म्हणून माझीं चिन्हें धारण करणें तुला योग्य नाहीं. तर तीं चिन्हें धारण न करितां मला शरण ये.' या मूर्खाचा हा निरोप ऐकून सभास्थित कृष्णास व यादवांस फार हसूं आलें व त्यानें त्यास उत्तर पाठविलें कीं, 'मी तुझी शंका निवारण करण्याकरितां येत आहें.' हा निरोप ऐकतांच तो काशीराजापाशीं गेला. पुढें कृष्णाचें व याचें युद्ध झालें, त्यांत हा व काशीराजा मृत्यु पावले. नंतर कृष्ण यादवांसह द्वारकेस आला. ह्याला **'पौंड्रकवासुदेव'** असें नांव पडण्याचें कारण हा पुंड्रदेशाचा राजा होता व ह्याचें नांव वासुदेव असें होतें. (श्रीमद्भागवत—दशमस्कंध, अध्याय ६६ पहा.) २७. त्यासमयीं, द्वारकेंत. २८. यादवांस. २९. उत्सवास.

१. संसारत्रासांत, संसारक्लेश भोगीत असतांही. २. कृत्रिमवेषधारी. ३. पृथ्वीभारातें. ४. श्रेष्ठ. ५. पौंड्रकाची स्तुति मूढ जन करिती. ६. मद्य. त्या माकडा पौंड्रकाला ही मूढजनस्तुति मदिरेप्रमाणें झाली. ७. मूर्खत्वाचें घर जो पौंड्रक त्यास मध दिसे पण कडा न दिसे; मधाच्या लोभानें कड्यावर चढला तर पडतोच ही गोष्ट त्या मूर्ख पौंड्रकाच्या ध्यानांत आली नाहीं. ८. ज्याप्रमाणें बाळ (अज्ञ मुलें) बाळा (मुलाला) [खेळामध्यें] नृपाळ (राजा) करिति (करतात, कल्पितात, मानतात). ९. त्रिलोकीची स्वामिता. १०. लांब मानेवरील केशांची रचना. ११. कुत्र्यास. १२. मत्त गजेंद्राचे गंड फोडण्याविषयीं समर्थ अशा. १३. सिंहास. १४. या पद्यांतील उपमेस आणि सरस व मार्मिक वर्णनास मूळांत बिलकूल आधार नाहीं, यास्तव पंतांनीं भागवतकारांवर ताण केली असेंच म्हणणें भाग पडतें. १५. मूर्ख. १६. मूर्खांनीं केलेल्या स्तुतीनें. (श्लोक २.) १७. माजला. १८. कृष्णाकडे.

सांगे मूढ [1]निरोप, नेउनि जसा दुर्गंध [2]वारा [3]सभा-
    स्थानस्थप्रभुला [4]म्हणे [5]बुधजनीं [6]उच्चैःश्रवा रासभा. ॥ ४
'कृष्णा! मी वासुदेव प्रभु अवतरलों धर्मरक्षार्थ एक
    स्वामी लोकत्रयाचा, [7]मदितर न असे, त्वां धरावा विवेक; ।
[8]मिथ्या [9]मन्नामचिन्हें मिरविसि, न तुला योग्य तें सर्व, सोडीं,
    ये कल्याणार्थ मातें शरण, जरि असे वांचणें [10]हस्त जोडीं. ॥ ५
[11]पूज्यातिक्रमदोषनिष्कृति बरी ही एक आहे, [12]नमीं
    पायांतें, अपराध मागिल [13]दयापाथोधि [14]साहेन मी; ।
तूं मिथ्या मिरवूं नको, [15]मदभिधाचिन्हें तयां सोडुनी,
    ये मातें [16]शरणा [17]करासि, अथवा चापीं शरा जोडुनी.' ॥ ६
ऐसें केवळ [18]बाळकत्थन महा आश्चर्य दे, हासवे
    न श्रोत्यांस, [19]नृपा स्मितींच बहु त्या गांभीर्यगेहा सवे; ।
[20]हासाब्धींत असें न यादवसभे झालें कधीं [21]मज्जन,
    स्वीकारी पळ याचि [22]षड्विधरसा निःशंक [23]धीमज्जन. ॥ ७

---

१. पौंड्रकराजसंदेश. २. वारा जसा दुर्गंध नेतो तसा. ३. सभेमध्यें बसलेल्या कृष्णाला. ४. बुधजनांत रासभाला उच्चैःश्रवा म्हणे असा निरोप सांगे. ५. कविसमाजांत. ६. उच्चैःश्रवा=इंद्राचा अश्व. [उच्चैः श्रवसी यस्य। उच्चैः शृणोति। उच्चैर्महच् श्रवो यशो यस्य। असे भिन्न विग्रह आढळतात. हें हयरत्न श्वेतवर्ण, सप्तमुख, समुद्रजात आणि उन्नतकर्ण होतें असें वर्णन आहे.] ७. मजहून वेगळा स्वामी न असे. ८. व्यर्थ, खोटीं. ९. माझें नांव व शंखचक्राब्ज कौस्तुभादिक चिन्हें. १०. श्लोक ५-६पहा. ११. पूज्याचें उल्लंघनरूप जो दोष त्याचा निरास. १२. नमन करीं. १३. दयासमुद्र. १४. क्षमा करीन. १५. माझें नांव आणि माझीं चिन्हें. १६. रक्षणकर्त्या मातें. [शरण म्हणजे घर आणि रक्षिता—असा अर्थ आहे. 'शरणं गृहरक्षित्रोः' इत्यमरः.] १७. करांसि जोडून अथवा चापीं शरा जोडून ये. १८. मूर्खांचें जल्पन, मूर्खांची बडबड, पौंड्रकाचा निरोप. १९. गांभीर्याचें घर जो उग्रसेन त्याला स्मित म्हणजे किंचित् हास्य करण्याची संवय म्हणून. २०. हसितसागरांत. २१. बुडणें. २२. हास्यरस हाच षड्विधरस त्यातें. हास्यरसाचे सहा भेद आहेत. त्यांचें वर्णन 'रसगंगाधरां'त केलें आहे तें असें:—'आत्मस्थः परसंस्थश्चेत्यस्य भेदद्वयं मतम्। आत्मस्थो द्रष्टुरुत्पन्नो विभावेक्षणमात्रतः ॥ १ ॥ हसन्तमपरं दृष्ट्वा विभावश्चोपजायते। योऽसौ हास्यरसस्तज्ज्ञैः परस्थः परिकीर्तितः ॥ २ ॥ उत्तमानां मध्यमानां नीचानामप्यसौ भवेत्। त्र्यवस्थः कथितस्तस्य षड्भेदाः सन्ति चापरे ॥ ३ ॥ स्मितं च हसितं प्रोक्तमुत्तमे पुरुषे बुधैः। भवेद्विहसितं चोपहसितं मध्यमे नरे ॥ ४ ॥ नीचेऽपहसितं चातिहसितं परिकीर्तितम्। ईषत्फुल्लकपोलाभ्यां कटाक्षैरप्यनुल्बणैः ॥ ५ ॥ अदृश्यदशनो हासो मधुरः **स्मित**मुच्यते। वक्त्रनेत्रकपोलैश्चेदुत्फुल्लैरुपलक्षितः ॥ ६ ॥ किंचिल्लक्षितदन्तश्च तदा **हसित**मिष्यते। सशब्दं मधुरं कायगतं वदनरागवत् ॥ ७ ॥ आकुञ्चिताक्षि

जेव्हां ते [१]परिहासकारणकथा तेथ [२]प्रभूता [३]सरे,
[४]त्रैलोक्याधिपति स्वयें मग म्हणे त्या भूपदूतास 'रे ! ।
जा, त्या हें वद, [५]वेलगना करिसि तूं, ज्यांहीं असे सोडणें
चिन्हें चक्रगदादिकें धरिसि तीं ज्यांहीं तयां तोडणें. ॥ ८
[६]जेणें या कत्थनातें करिसि वदन तें झांकुनी [७]गृध्रकंक-
श्येनादिप्राज्यपक्षिच्छदपटलपटें [८]दीर्घनिद्रा विशंक ।

---

मन्द्रं च विदुर्**विहसितं** बुधाः । निकुञ्चितांसशीर्षश्च जिह्मदृष्टिविलोकनः ॥ ८ ॥ उत्फुल्लनासिको हासो नाम्नो**पहसितं** मतम् । अस्थानजः साश्रुदृष्टिराकम्पस्कन्धमूर्धजः ॥ ९ ॥ **शा**र्ङ्गदेवेन गदितो हासो**ऽपहसिता**ह्वयः । स्थूलकर्णकटुध्वानो बाष्पपूरप्लुतेक्षणः । करोपगूढपार्श्वश्च हासो**ऽतिहसितं** मतम्' ॥ १० ॥ इति । [रसगंगाधर—काव्यमाला १२ पृष्ठें ४३-४४]. याचा भावार्थः—हास्यरसाचे **आ**त्मस्थ आणि **पर**संस्थ म्हणजे **स्व**निष्ठ आणि **पर**निष्ठ असे दोन भेद आहेत. विलक्षण वेष, विपरीत क्रिया इत्यादिक पाहण्याबरोबर पाहणाऱ्या मनुष्याला जें हसूं येतें त्याला **आ**त्मस्थ अथवा **स्व**निष्ठ असें म्हणतात. दुसऱ्या हंसत असलेल्या मनुष्यास पाहून जें हसूं येतें तें **पर**संस्थ अथवा **पर**निष्ठ होय. याप्रमाणें हास्याचे मुख्य दोन भेद झाले. मनुष्याच्या स्वभावावरून त्याचे उत्तम, मध्यम आणि कनिष्ठ असे तीन भेद मानिले आहेत म्हणून हास्याचे एकंदर सहा भेद होतात, ते असेः—उत्तमाचे हसण्याला **स्मि**त आणि **ह**सित, मध्यमाच्या **वि**हसित आणि **उ**पहसित आणि कनिष्ठाच्या **अ**पहसित आणि **अ**तिहसित असें म्हणतात. या सहा भेदांचीं लक्षणें येणेंप्रमाणें:—**स्मित**—दांत न दिसतां व स्वर स्पष्ट न होतां गालांतल्या गालांत जें मधुर हसणें तें. **हसित**—ज्यांत मुख, नेत्र आणि गाल हे किंचित् विकसित होऊन दांतही कांहींसे दिसतात तें. **विहसित**—शब्द कांहींसा मधुर असून व डोळे आकुंचित होऊन जें बरेंचसें स्पष्ट मंदहास्य तें. **उपहसित**—नाक फुगणें, कुटिलदृष्टि, स्पष्ट शब्द व खांद्याचें आणि मानेचें हालणें यांनीं युक्त जें हंसणें तें. **अपहसित**—खांदे आणि केंस हालणें, डोळ्यांस अश्रु येणें, शब्द फारच स्पष्ट होणें या लक्षणांनीं युक्त जें हंसणें तें. **अतिहसित**—बाष्पांचा पूर सुटून डोळे भरून येणें, कर्णकटु असा मोठा ध्वनि होणें, आणि हातांनीं पोट कंवटाळणें या लक्षणांनीं युक्त जें हसणें तें. याप्रमाणें हास्याचे सहा भेद अलंकारशास्त्रज्ञांनीं सांगितले आहेत. पौंड्रकाचा विलक्षण वेष, विचित्र रूप, कृष्णोचित अलंकारांचें आणि भूषणाचें अंगावर घालणें इत्यादि विपरीत क्रिया पाहून अनेक जनांस अनेक प्रकारांनीं हसूं आलें असें सांगण्याचें तात्पर्य आहे. २३. बुद्धिमंत जन.

१. उपहासाला कारणीभूत अशी कथा. २. विस्तृत अशी. ३. संपे, समाप्त होई. ४. कृष्ण. ५. बडबड. ६. या वदनानें. ७. गृध्र, कंक, श्येन इत्यादि जे पुष्कळ पक्षि त्यांच्या पिच्छांचा समूह (छदपटल) तेंच वस्त्र (पट) त्याणें. गृध्र, कंक, श्येन, वायस इत्यादि मांसभक्षक पक्षी तुझे श्रवणनासिकादिक अवयव विदारून मांसानें आणि रक्तानें आपलें प्राणतर्पण करतील, तुला मारून खाऊन टाकतील असा भाव. ८. मरण. या 'मरण' शब्दाबद्दल 'प्रयाण' अथवा 'दीर्घनिद्रा' असें पद योजण्याचा संप्रदाय प्राचीन काव्यग्रंथांत बराच आढळतो. 'मरण'

[1]रक्तार्द्रक्षोणिशय्येवरि करिसिल तूं, सैन्य हो तें [2]हविष्य
[3]क्रव्यादां युद्धयज्ञीं, [4]निजनृपतिस हें सांग, दूता! भविष्य'. ॥ ९
दूतानें [5]कथितां निरोप[6], [7]पृतना [8]अक्षौहिणी दोनि घे[9],
मोठें युद्ध करावया [10]प्रभु निघे, हें ऐकतां तो [11]निघे; ।

---

शब्दाचे ठायीं अशस्तार्थत्व म्हणजे अप्रशस्तार्थकत्व आहे, यासाठीं त्याचा प्रयोग न करणें उचित असें समजतात. येथेंही 'दीर्घनिद्रा' ह्या पदाचा 'मरण' असाच अर्थ आहे. **नान्यदेवकृत 'विबुधरत्नावली'** नामक 'मालतीमाधवा'वरील टीकेंत एक श्लोक दिला आहे, त्यांतही 'दीर्घनिद्रा' हें पद मरणार्थवाचक घेतलें आहेः—'देवव्रते वाञ्छति दीर्घनिद्रां द्रोणे च कर्णे च यशोवशेषे । लक्ष्मीसहायस्य तथैव वत्स वात्सल्यवान्द्रौणिरयं सहायः ॥' + + + + + + अत्र दीर्घनिद्रापदेन मरणम्.' [त्रिपुरारि-नान्यदेव-जगद्धरकृत-टीकासमेतमालतीमाधवम्-नवमोऽङ्कः-पृष्ठ २४१-निर्णयसागर छापख्यान्यांतील आवृत्ति.] रघुवंश-सर्ग १२ श्लोक ८१ यांत 'दीर्घनिद्रा' शब्द आला असून त्याचा अर्थ 'मरण' असा आहे. यास कोशाधारही आहेः—'निमीलनं दीर्घनिद्रा' इति हलायुधः. इंग्रजी भाषेंतही 'मरणाला' 'दीर्घनिद्रा' शब्दासारखा 'long sleep' असा शब्द आहे.

१. रक्त+आर्द्र+क्षोणि+शय्येवरि=रुधिर+ओली, भिजलेली+पृथ्वी+बिछान्यावर. २. हवनीय द्रव्य. ३. राक्षसांस. ४. आपल्या राजाला. (पौंड्रकाला.) ५. पौंड्रकाला कथितां. ६. कृष्णाची उक्ति. ७. सेना. ८. अक्षौहिणी. या संबंधें पुढील कोष्टक लक्षांत ठेवण्यासारखें आहेः— 'अक्षौहिण्यामित्यधिकैः सप्तत्या ह्यष्टभिः शतैः । संख्या युक्ता सहस्राणि गजानामेकविंशतिः ॥ एवमेव रथानां तु संख्यानं कीर्तितं बुधैः । पंचषष्टिः सहस्राणि षट् शतानि दशैव तु ॥ संख्यातास्तुरगास्तज्ज्ञैर्विना रथतुरंगमैः । नृणां शतसहस्रं तु सहस्राणि नवैव तु ॥ शतानि त्रीणि चान्यानि पंचाशच्च पदातयः ॥.'

| सेना | पत्तिः | सेनामुखम् | गुल्मः | गणः | वाहिनी | पृतना | चमूः | अनीकिनी | अक्षौहिणी |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| गजाः,-रथाः | १ | ३ | ९ | २७ | ८१ | २४३ | ७२९ | २१८७ | २१८७० |
| अश्वाः- | ३ | ९ | २७ | ८१ | २४३ | ७२९ | २१८७ | ६५६१ | ६५६१० |
| पदातयः- | ५ | १५ | ४५ | १३५ | ४०५ | १२१५ | ३६४५ | १०९३५ | १०९३०५ |

यावरून १ पत्ति=१ रथ+१गज+३अश्व+५पदाति; ३ पत्ति=सेनामुख, ३ सेनामुख=१ गुल्म; ३ गुल्म=१ गण; ३ गण=१ वाहिनी; ३ वाहिनी=१ पृतना; ३ पृतना=१ चमू; ३ चमू=१ अनीकिनी; १० अनीकिनी-१ अक्षौहिणी. ९. पौंड्रक दोन अक्षौहिणी सैन्य घेता झाला. (श्लोक ११.) १०. कृष्ण. ११. पौंड्रक.

याचा[1] काशिपती सखा[2] स्वबळ[3] घे अक्षौहिणी तीन, यां[4]
झाला युद्धसहाय, साधु समयीं[5] कां पाठि देती नया[6]? ॥ १०
श्रीमद्द्वारवतीगुहेंतुनि[7] निघे श्रीमान् हरी[8] एकटा
गांठी पौंड्रककाशिपादिनृपतिस्तंबेरमांच्या घटा,[9] ।
पाहे कृत्रिमशार्ङ्गनंदकगदाचक्राब्जविद्युत्पटा[10]
मालारत्नकिरीटकुंडलधरा[11] तार्क्ष्यध्वजा[12] त्या नटा[13]. ॥ ११
एवं कृत्रिम[14] तुल्यवेष[15] नृपती[16] तो पाहतां, भासला
सत्य स्वप्रतिबिंब[17], यास्तव जगन्नाथ[18] स्वयें हांसला; ।
जैसें वेडनि भूपरूप[19] रिझवी भूपा नटें[20], श्रीधर-[21]
स्वामीतेंहि तसेंचि हा रिझवितो, जाणों समश्रीधर[22]. ॥ १२
श्रीकृष्णावरि शस्त्रवृष्टि बहुधा केली द्विषत्सैनिकीं[23],
देवांनीं अजितेषुशक्तिकुतुकें[24] संप्रेक्षिलीं[25] तैं निकीं[26]; ।
केल्या[27] चूर्ण, मुहूर्तही न सरतां[28], अक्षौहिणी पांच त्या,
नेल्या रक्तनदींत, राशि गिरिशा[29] कीं येऱ्हवीं सांचल्या[30]. ॥ १३
सेनासंहार[31] आधीं करुनि मग म्हणे तो जगन्नाथ सोंगा[32],
'राया! दूताननें जें स्वमत[33] कळविलें, त्यास आलों असों, गा! ।

---

१. पौंड्रकाचा. काशीपति हा पौंड्रकाचा मित्र, या दोघांनीं मसलत करून कृष्णाला पूर्वोक्त निरोप पाठविला. तेव्हांपासून पौंड्रक हा काशीपुरांत ठाणें देऊन होता. २. मित्र, पाठीराखा. ३. आपलें सैन्य. ४. या पौंड्रकाला सहाय (मदतनीस झाला). ५. संकटसमयीं. ६. नीतीला. या पादांत ज्या नीतितत्वाचें आदरपूर्वक समर्थन केलें आहे त्यास कोण नांव ठेवणार आहे? पंतांच्या काव्यांत अशा नीतिबोधपर सुंदर आणि प्रौढ वाग्रत्नांचा भरणा पुष्कळ आहे, तेव्हां त्यांच्या काव्यांच्या अभ्यासानें वाचकांस उच्च प्रतीचें नैतिक शिक्षण अनायासें मिळणार आहे. ७. शोभायमान. ८. कृष्ण. हरि=कृष्ण; सिंह. ९. पौंड्रक, काशिराजा इत्यादि स्तंबेरमांच्या (गजांच्या) घटेला (समूहाला). १०. खोटें शार्ङ्ग (धनुष्य) नंदक (कृपाण, खड्ग) गदा (कौमोदकी नांवाची) चक्र (सुदर्शन) अब्ज (कमल) विद्युत्पट (विजेसारखें झगझगीत वस्त्र) यांतें धारण करणाऱ्या. ११. माला (वैजयंती—वनमाला) रत्नखचित मुकुट आणि कुंडल (मकराकृति कर्णभूषणें) यांतें धारण करणाऱ्या. १२. गरुडध्वजा. (श्लोक १३-१४.) १३. वेषधारी विष्णूला. १४. कृत्रिमाकृति. १५. सदृशरूपवेष. १६. पौंड्रक. १७. आपली अन्य प्रतिमा. १८. कृष्ण. १९. राजाचें सोंग. २०. बहुरूपी. २१. कृष्णातें. २२. समशोभा धरणारा. २३. शत्रुयोधांनीं. २४. कृष्णाच्या बाणशक्तीचीं कौतुकें. २५. पाहिलीं. २६. खरीं. २७. मर्दिल्या. २८. अल्पकाल देखील न लागतां. २९. पर्वतप्राय. ३०. जमल्या. संचय झाला असतां पर्वततुल्य राशी जमल्या असल्या. ३१. सेनेचा नाश. (श्लोक १७.) ३२. त्या वेषधारी पौंड्रकाला. ३३. मीं हीं आयुधें टाकावीं असें स्वमत.

सांभाळावीं [1]स्वचिन्हें सकळहि तुजला [2]अर्पितों कां रिकामीं
ठेवावीं? तूंचि यांतें उचित असति, हो! न त्यजूं सर्व कां [3]मीं? ॥ १४
[4]मूढा! तूं आपणातें म्हणसि म्हणविसी [5]वासुदेवाभिधान,
त्यागीं [6]तें, [7]सैंहिकेया अमृतहि न [8]जिरे, [9]मंदभाग्या [10]निधान; ।
[11]सेनाब्धी लंघिला, रे! दशवदनहृतस्व[12]प्रियारत्न [13]राम
स्वांगें रक्षी, तसा मी वधुनि तुज रणीं सोडवीन स्वनाम. ॥ १५
'[14]भीतों युद्ध करावया, तरि तुला मी जोडितों हात, रे!
जो [15]सिंधूसि तरे [16]सुखें [17]भुजबळें तो कां न डोहा तरे? ।
मूढा! सावध सावध, स्वकर जों पाशा नसे घातला
[18]काळें, म्यांहि सुदर्शना, स्मर [19]हितें, [20]प्राणांत कीं [21]पातला.' ॥ १६
केला धिक्कार शब्दीं, मग [22]विरथें शरीं, मस्तकच्छेद चक्रें,
तें [23]जाणों पर्वताचें शिखर उडविलें वज्र सोडूनि शक्रें; ।
काशीशाचेंहि बाणीं शिर उडवुनि तें [24]तत्पुरीमाजि पाडी,
जाय श्रीद्वारकेला, निज रिपु यशाही दिव्यलोकासि [25]धाडी. ॥ १७

---

१. गदाचक्रादिक. २. देतों, मी ठेवीत नाहीं. ३. मीं (कृष्णानें) सर्व (आयुधें) कां त्यजूं नये? ४. मूर्खा पौंड्रका. ५. वासुदेवनाम. ६. वासुदेव हें नांव. ७. राहूला. मोहिनीरूप धारण करून विष्णूनें दानवांपासून अमृत आणून देवांस प्राशनास दिलें. तेव्हां राहूनें देवरूप धरून अमृतपान केलें. तें त्याच्या कंठगत होत आहे इतक्यांत चंद्रसूर्यांच्या खुणेवरून विष्णूनें आपल्या चक्रानें राहूचें शिर छेदिलें. तेव्हां राहूला अमृत जिरलें नाहीं. उलट त्या अमृताच्या योगें राहूचा घात झाला. (महाभारत-आदिपर्व, अध्याय १९ श्लोक ४-६.) ८. या क्रियापदाची काकाक्षिगोलकन्यायानें योजना केली पाहिजे. ९. दुर्दैवी नराला. १०. ठेवा. ११. सेनासागर. १२. सीता. १३. हें रामाचें उदाहरण मूळांत नाहीं. (श्लोक २०.) १४. जर भीत असतों तर. १५. सागरास. हा चरण सुभाषितरूप आहे. हा पाद रमणीय आणि प्रौढ उतरला आहे. पंतांनीं भागवतांतील कोणत्या श्लोकाचें भाषांतर या पद्यांत केलें आहे हें दाखविण्याचें काम पंतांस भाषांतरकार म्हणणाऱ्या आक्षेपकारांवरच सोंपविलें पाहिजे. १६. अनायासें. १७. बाहुसामर्थ्यानें. १८. काळें स्वकर पाशा नसे घातला (व) म्यांहि [स्वकर] सुदर्शना [नसे घातला]—असा अन्वय. १९. कल्याण. २०. मृत्यु. २१. ही कृष्णोक्ति मूळांतील श्लोक १९-२० यांशीं तोलून पाहिली असतां पंतांचे प्रतिभेचें वर्चस्व दिसून येईल. २२. रथहीन. २३. हा उत्प्रेक्षालंकार आहे. (श्लोक २१.) २४. काशींत, (श्लोक २२.) २५. हें 'सहोक्ति'चें उदाहरण होय. 'सहोक्ति' अलंकार 'सह' अथवा तत्समानार्थक शब्द न योजितांही होतो असें साहित्यदर्पणकारांचें मत आहे. या ठिकाणीं शत्रुजनांस स्वर्गास पाठविलें आणि त्यांजबरोबर आपली कीर्तिही प्रसृत केली असा येथें कविहृद्गतार्थ आहे.

पावे ज्या गतिला [1]विरिंचिगुरुचा तो दुर्मती [2]मत्सरी
    [3]लोकाधीशगती करूं न शकती त्या [4]सद्गतीची [5]सरी; ।
तीव्र ध्यान [6]करी सदैव हरिचें, जें [7]सर्वबंधा [8]हरी,
    [9]तद्रूपाहि धरी अशास्तव अरी जो, तोहि झाला [10]हरी. ॥
[11]साधेना पद, पुण्यराशि रचितां, जें [12]कोटिसंवत्सरीं,
    तें हस्तावरि ज्याचिया [13]सदभिधावेषग्रहीं [13]मत्सरीं, ।
[14]त्यांची कोण कवी कसी किति कधीं सत्कीर्ति वाखाणिल?
    [15]प्रांतप्राप्ति सुदूर, उंदिर कसा [16]भूभृद्धवा [17]खाणिल? ॥
मूर्धा काशिपुरींत काशिपतिचा बाणें जसा [18]पाडिला
    वातें [19]पंकजकोश, दूत बहुधा सांगावया धाडिला, ।
[20]पौरस्त्रीतनयाप्त शोक करिती जाणोनि [21]नाथक्षया
    संस्कारी विधिनें [22]सुदक्षिण [23]पितृप्रेतक्रियादक्ष [24]यें. ॥
ऐसा निश्चय तो सुदक्षिण करी कीं, 'मी पित्याच्या ऋणा
    [25]तातघ्नासि वधूनि वारिन' असें हस्तें न होतां [26]घृणा. ।
[27]बापाची [28]तनुनिर्विशेषचि असे जी [29]पुत्रपिंडीं [30]घृणा,
    तीतें नाठवि जो, तयासि न बुधीं सत्कार, जो कीं तृणा. ॥

---

१. ब्रह्मदेवाचा बाप जो कृष्ण त्याचा. २. शत्रु. (पौंड्रक.) ३. इंद्रादिलोकपालांच्या ग[तीं]द्व्या. ४. चांगल्या गतीची. ५. बरोबरी. ६. [तो पौंड्रक] करी. ७. सकल पाशांतें. ८. [...] ९. जो अरी तद्रूपाहि धरी [व जो अरी] हरीचें सदैव तीव्र ध्यान करी अशास्तव तोहि हर[ी झाला] असा अन्वय. १०. हरिरूप झाला. (श्लोक २४.) ११. मिळेना. १२. कोट्यवधि वर्षांनीं [...] सत् (कृष्ण) याची अभिधा (नाम) आणि वेष यांचें ग्रहण ज्यांत अशा वैरानें. कृष्णाचें ना[व...] वेष घेतला म्हणून उत्पन्न झालेल्या वैरानें (द्वेषानें). १४. त्या पौंड्रकाची. १५. [...] देशप्राप्ति ही ज्याला दुरापस्त असा उंदीर. १६. मेरुपर्वतास. भूभृत्+धवा=पर्वत+ गिरिपतीला. १७. या १९ व्या श्लोकास मूळांत आधार नाहीं, तो पंतांनीं स्वत: प्रसंगास्त्व अ[...] घातला आहे. १८. जसा वातें पंकजकोश तसा पाडिला. १९. पद्मकोश. २०. नगरवासी [...] राण्या, पुत्र आणि बांधव. २१. काशीपतिमरणा. २२. काशिपतीचा पुत्र. २३. उत्तरक्रिय[ा...] २४. राजशिरातें संस्कारी. २५. पितृवध करणारास. २६. लज्जा. ['घृणा तु स्याज्जुगुप्सायां करु[णायाम्'] इति हैम:.] २७. बापाची तनुनिर्विशेषचि पुत्रपिंडीं जी घृणा असे, तीतें जो नाठवि, तयासि [...] [तो] सत्कार न, जो कीं तृणा [असे]—असा अन्वय. २८. स्वशरीरतुल्य. २९. पुत्रदेहीं. ३[०...]

सो[1]पाध्याय सुदक्षिण स्मरहरा विश्वेश्वरा भू[2]तपा
आराधी; भ[3]जकासि दर्शनहि त्या दे, मान शं[4]भू तपा. ।
'वत्सा! काय अ[4]भीष्ट? माग' म्हणतां मागे सु[5]तुष्टा व[6]रा
साधूंच्या नि[7]जतातघातकवधोपायाख्य दुष्टा वरा. ॥ २२
ज्याच्या सा[8]धुमुमुक्षुसार्थ च[9]रणांभोजार्चना लागतो,
'इच्छा सांग' म्हणे व[10]दान्य भगवान्, त्या व[11]त्सला मागतो ।
तो दु[12]र्धी, त[13]दभिन्नकृष्णनिधनोपाय स्वयें सांगणें;
देणें दुर्घट ईश्वरासहि पडे मा[14]गे असें सांगणें. ॥ २३
'ताताला उठवा' असेंहि म्ह[15]णता, देऊनि तें, 'घे दुजें
वत्सा! इ[16]ष्टवरायुतायुत पुन्हा बा! मागणें हें तुझें ।
थोडें' जो म्ह[17]णणार आपण अशा देवा वदान्या पहा
मागे काय कसें; सु[18]दक्षिणपणीं आणी उणें पा[19]प हा. ॥ २४
बोले तो अ[20]ष्टमूर्ति ज्वलननयन, 'रे! चिंति[21]तीं पाव काजा,
साधील क्षिप्र मूर्त प्र[22]मथसहित त्या आर्जवीं पा[23]वका, जा; ।

१. उपाध्याय बरोबर घेऊन. २. भूतनाथाला. (महेश्वराला.) ३. सुदक्षिणास. ४. वांछित. ५. प्रसन्न झालेल्या शिवाप्रत. ६. नायका साधूंच्या. ७. 'आपल्या बापाचा घात करणाऱ्याच्या वधाचा उपाय' अशा नांवाचा दुष्ट वर मागितला. ८. साधु मुमुक्षु यांचा समूह. ९. पादकमल-पूजनाला. १०. दानशूर. ११. त्या कारुणिक शंभूला. [वत्सल—वत्स आणि अंस या शब्दांपुढें यथानुक्रम काम आणि बल या अर्थीं ल प्रत्यय होतो. 'वत्सांसाभ्यां कामबले' ५।२।९८ या सूत्रानें वत्सल आणि अंसल असे शब्द होतात.] १२.दुष्टमति. १३.तत्सम कृष्णाच्या मरणाचा (निधनाचा) उपाय. १४. तो सुदक्षिण हा 'मागे' याचा कर्ता अध्याहृत समजावा. १५. 'ताताला उठवा' असें जर सुदक्षिणानें म्हटलें असतें तर. १६.इष्टवरांच्या अयुतांचें अयुत. अनंतवर असा अर्थ. १७. जो देव आपण 'हें तुझें मागणें थोडें' इत्यादि म्हणणार त्या वदान्या देवा काय मागे आणि कसें मागे हें पहा. याच्या मागण्यांत कांहींच अर्थ नव्हता—असा भाव. १८. सुदक्षिणपणाला (ह्या चतुरतेला आणि मोठेपणाला) [भलतेंच मागून] उणें आणिलें—असा भाव. १९. पापरूपी हा सुदक्षिण. २०. शिव. अष्टमूर्ति हें शिवाचें नांव आहे. [या आठ मूर्तींचें वर्णन शाकुंतलनाटकाच्या 'या सृष्टिः स्रष्टुराद्या वहति विधिहुतं या हविर्या च होत्री' इत्यादि आरंभींच्या श्लोकांत कालिदासानें केलें आहे. या अष्ट मूर्तींचें वर्णन पुढील श्लोकांत आहे:—'पृथिवी सलिलं तेजो वायुराकाशमेव च । सूर्याचंद्रमसौ सोमयाजी चेत्यष्टमूर्तयः ॥' इति यादवः. तसेंच भविष्यपुराणांत याचें वर्णन आहे:—'शर्वाय क्षितिमूर्तये नमः, भवाय जलमूर्तये नमः, रुद्रायाग्निमूर्तये नमः, उग्राय वायुमूर्तये नमः, भीमायाकाशमूर्तये नमः, पशुपतये यजमानमूर्तये नमः, महादेवाय सोममूर्तये नमः, ईशानाय सर्वमूर्तये नमः । मूर्तयोऽष्टौ शिवस्यैताः'. या प्रमाणेंच या आठ मूर्तींचा उल्लेख पुढील श्लोकांत केला आहे:—'जलं वन्हिस्तथा यष्टा सूर्याचंद्रमसौ तथा । आकाशं वायुरवनी मूर्तयोऽष्टौ पिनाकिनः' ॥]. २१. चिंतिलेल्या काजा (कार्या) पाव—तुझें चिंतित काम सफल होवो. २२. प्रमथ नामक साठ हजार सेवकगणांसहित. [हरिवरदा]. २३. अग्नीतें.

अब्रह्मण्यास[1] कृत्यानळ[2] कवळि[3] पळें, तो महाकोप[4] योजीं
शक्यार्थी[5] तूं, मदुक्तिस्मृति[6] सतत असो हे तुझ्या हृत्पयोजीं[7] ? ॥ २५
कृष्णाच्या निधनार्थ उक्तविधिनें[8] वैश्वानरा[9] तो यजी,
अत्युग्राकृति[10] पूरुष प्रकट त्या कुंडांतुनी होय, जी ! ।
हस्तीं उग्रतर त्रिशूळ[11], नयनें तुंडेंहि[12] अंगार वी[13],
वर्णावें बहु काय? लावि कर त्या तप्ता न अंगा रवी. ॥ २६
धांवे भूतचमूसह[14] ज्वलन[15] तो जाळावया द्वारका,
पावे पावक, पौर[16] पाहुनि तया स्वप्राणसंहारका[17], ।
भीती सांगति, 'रक्ष[18] रक्ष' म्हणती आपद्गतोद्धारका[19]
केलें हें श्रुत अक्षकेलिसमयीं[20] देवा जगत्तारका[21]. ॥ २७
अक्षक्रीडा[22] न मोडी[23] व्यसनिजन[24] तसा तींत[25] नाहींच गोडी,
भीतार्तत्राण[26] जोडी, प्रभुसि विदित कीं शक्ति त्यां[27] फार थोडी, ।
विप्राच्या ज्यांस[28] कोडी[29] प्रणति करुनियां टाकिती सर्व खोडी,
दुर्वासा[30] हात जोडी 'शरण' म्हणुनि ज्या त्या स्वचक्रास[31] सोडी[32]. ॥ २८

---

१. ब्रह्मण्य म्ह० ब्राह्मणाविषयीं दयाळु तसा जो नाहीं त्याला, ब्राह्मणभक्तावांचून इतराला. २. राक्षसी वन्हि, उग्रदेवतात्मक ज्वलन. ३. कवळ करी. ४. अतिकोपनशील. ५. जेथें प्रयोग सफल होईल अशाचे ठायीं योजीं. ६. माझ्या बोलण्याचें स्मरण. ७. हृदयकमळांत. ८. अभिचारविधानानें. ९. अग्नीतें. १०. अतिभीषणाकार. ११. तीन शूल ज्याला असें शस्त्र हातानें (धरी). १२. तुंड=तोंड, मुख. [अंगार उत्पन्न करणारीं नेत्रें आणि मुखें त्या कृत्यानलाला होतीं.] १३. प्रसवे, उत्पन्न करी. १४. पिशाचगणवेष्टित. १५. अभिचारदहन. १६. द्वारकावासी जन. १७. आपले प्राण नष्ट करणाऱ्या त्या अग्नीला. १८. श्लोक ३६ पहा. १९. विपत्तिग्रस्तांचा उद्धार करणाऱ्या (देवा). २०. द्यूत खेळत असतां, सारीपाट मांडून खेळत असतां. २१. जगताचें तारण करणाऱ्या (कृष्णा). २२. फांसे टाकून खेळण्याची कृति, द्यूतक्रीडा. २३. तशीच चालवी, बंद न करी. या श्लोकांत 'डी' वर्णाची आवृत्ति वारंवार झाली आहे म्हणून हा अनुप्रासालंकार होय. २४. ज्यास व्यसन (छंद-नाद) लागलें तो व्यसनिजन. छांदिष्टजनाप्रमाणें. २५. अक्षक्रीडेंत गोडी नसतांही. २६. भ्यालेल्या आप्तांचें रक्षण. २७. त्या कृत्याग्नीला. २८. ज्या सुदर्शनचक्रास. २९. कोटी. ३०. हा कथासंदर्भ असा आहे:—अंबरीष–हा सूर्यवंशोत्पन्न नाभाग राजाचा पुत्र. हा मोठा दानशूर, पराक्रमी आणि भगवद्भक्त होता. एकदां द्वादशीच्या दिवशीं दुर्वास ऋषि यांच्या घरीं अतिथि म्हणून आला. तेव्हां राजानें त्यास भोजनार्थ राहून घेतलें. नंतर मुनि आपलें आन्हिक कर्म करण्यासाठीं नदीतीरीं गेला. या दिवशीं द्वादशी थोडी म्हणजे साधनद्वादशी होती. तेव्हां व्रतभंग होऊं

[1]भ्याला ज्वालाकरालानलहि, विसरला योजिलें [2]काज, [3]व्याला
श्रीमत्[4]कृष्णोदयाद्री [5]अरिरविस, पुसे कोण [6]त्या काजव्याला? ।
त्या चक्राची प्रभूच्या अमित कविजना वर्णवे काय [7]भा? जी
[8]कोट्यर्काहूनि उग्रा, दुरुनिहि शिवतां वन्हिचा [9]काय भाजी. ॥ २९

[10]ज्वलच्चक्रज्वालापटपरिवृतें होरपळती
[11]बळें [12]भूतांचीं तीं [13]जव करुनियां थोर पळती, ।
[14]दवग्रस्तारण्य त्यजुनि [15]सकुळ [16]व्याळ पळतो,
पळे तैसा, थारे न दहन [17]असत्काळ पळ तो. ॥ ३०

पळे [18]मागें, चित्तीं धरुनि भय कोपा [19]दहन, न
[20]क्षण प्रेक्षी, वाटे करिल [21]रथतत्पाद हनन; ।
[22]शिखी तो दुर्वासा द्विज [23]जटिल [24]बव्हाश [25]यजनीं
[26]फळे भीतो[27]पास्य, [28]स्ववश न [29]यदीयाशय जनीं. ॥ ३१

---

नये म्हणून राजानें, तिथि संपली नाहीं तों देवास नैवेद्य समर्पण करून, भोजन न करतां देवाचें तीर्थ प्राशन करून पारणें सोडलें. हें जाणून मुनि संतप्त झाला. त्यानें आपल्या जटेंतील केंसापासून एक अ-क्राळ विक्राळ कृत्या (राक्षसी) उत्पन्न करून राजावर सोडिली. तेव्हां विष्णूच्या सुदर्शनचक्रानें तिचा नाश केला आणि त्या मुनीचा पाठलाग केला. हें पाहून दुर्वास भीतिग्रस्त असा विष्णूस श-रण गेला. विष्णूनें 'परत अंबरीषाकडे जा, तो निराहार आहे, त्याचें समाधान कर म्हणजे चक्र तुला सोडील' असें सांगितलें. त्यावरून निरुपाय होऊन तो अंबरीषाकडे परत आला. दुर्वासास पा-हतांच राजास हर्ष झाला. त्यानें सुदर्शनाची स्तुति करून दुर्वासाला त्यापासून मुक्त केलें आणि य-थेच्छ भोजन दिलें—अशी कथा आहे. (भागवत—नवम स्कंद—अध्याय ४-६.) ३१. सुदर्शनास. ३२. प्रेषी. (श्लो० ३९.) या श्लोकांतील चक्रवर्णनास मूळांत फारसा आधार नाहीं.

१. ज्वालांनीं कराल (भयंकर) असा अनल (अग्नि) त्या चक्राला भ्याला. २. द्वारकादहनरूप इष्ट कार्य. ३. प्रसवला. ४. श्रीकृष्णरूप उदयाचल. ५. चक्ररूप सूर्यास व्याला. ६. त्या कृत्यानलरूप काजव्याला. ७. प्रभा. ८. कोटिसूर्यापेक्षां भयंकर, चंड. ९. देह. १०. जाज्वल्य-मान सुदर्शनाच्या ज्वालारूप पटानें (वस्त्रानें) परिवृत (वेष्टित) अशीं (बळें). ११. सैन्यें. १२. प्रम-थांचीं. १३. वेग. १४. वणव्यानें पेटलेलें अरण्य. १५. सजातीय गणांसह, सपरिवार. 'कुलं जनपदे गोत्रे सजातीयगणेऽपि च' इति मेदिनी. १६. दुष्ट गज किंवा सिंह. १७. असतांचा (दुष्टांचा) काळ [जो] दहन तो पळभर देखील न थारे (थांबे, राही). १८. पळत वाराणसीला परतला. १९. तो अभिचाराग्नि. २०. क्षणभर सुद्धां मागें पाहिलें नाहीं. २१. चक्र. २२. अभिचाराग्नि. २३. जटायुक्त; (पक्षीं) ज्वालामय. २४. खादाड. २५. यज्ञांत. २६. फळ देणारा झाला. भयग्रस्तांचा उपास्य देव (आराध्य देव) शिखी (अग्नि), [स्वभक्तां] फळे (फळ देतो, इष्टकामनापूर्ति करतो), [पण] यदीयाशय (ज्याचा आशय, ज्या अग्नीचा किंवा दुर्वासाचा आशय, मनोभाव) स्ववश न (त्याच्या स्वाधीन

लागे पाठीस चक्र प्रखरतर, पळे धाक घेऊनि कृत्या,
तार्क्ष्यत्रस्ता भुजंगी विषखनि पळती उग्रजाति प्रकृत्या; ।
कैचें उग्रत्व आतां? अरिहरि हरिणी, घे परित्रास गा! ती.
श्रीकृष्णा! विघ्नविघ्ना म्हणुनि कवि तुझ्या सच्चरित्रास गाती. ॥ ३२
चक्रानें भंग केला म्हणउनि खवळे फार, दूरूनि लक्षी,
धांवे वेगें कपोताप्रति झडपि बळें ज्यापरि श्येनपक्षी, ।
व्याघ्री जैसी क्षुधार्ता अशन न मिळतां आत्मतोकास भक्षी,
कृत्या सर्त्विक्स्वभक्ता गिळि, भगवदरी जो तया कोण रक्षी?॥ ३३
आधीं ईश्वरवाक्यलंघन करी, सन्नाशवांछा धरी,
सत्क्षेत्रीं अभिचारकर्महि वरी, कोपे विचारावरी, ।
दे थोरास बळें भरीस कुमती, होय प्रभूचा अरी,
त्याला योग्यचि ती खरी गति, सहायांलाहि झाली बरी. ॥ ३४
द्विजसहित तो कृत्याग्नीनें सुदक्षिण टोळसा
सहज गिळिला, राहे त्याचें न भस्म न कोळसा. ।
दुरितचि तया ग्रासी, होती स्वमित्र रिपू रुषा-

नाहीं—अग्नि किंवा दुर्वास मुनि हे स्वभक्तांस फळें देतात, पण तीं फळें मंगलप्रद असतात असा नियम नाहीं. हे दोघे जसे इतर गोष्टींत समानधर्म आहेत तसे फलदायक कृत्यांतही सारखेच आहेत. पण त्यांनीं दिलेलीं फळें अमुक प्रकारचींच असतात असा नेम नाहीं, कारण त्यांचे मनोभाव स्वायत्त नाहींत). २७. भीतांचा उपास्य देव. २८. स्वाधीन राहिला नाहीं. २९. ज्याचा दुष्टमनोभाव त्यासच फळे.

१. काशीला परत पळत पळत ये. २. कृत्यानळ. ३. गरुडापासून भ्यालेली. ४. सर्पिणी. ५. स्वभावेंकरून. ६. कृत्येच्या ठायीं आतां उग्रत्व कोठचें असणार? ७. चक्र हाच सिंह. ८. ती कृत्या हीच हरिणी. ९. अगा. १०. हरिणी. ११. ही कवीची उक्ति. १२. [ती कृत्या] खवळे=क्षोभे. १३. पाहे. १४. भक्षण, अन्न. १५. आपल्या पोरास. १६. ऋत्विजासहवर्तमान स्वभजकास सुदक्षिणाला, पौंड्रकसुताला. १७. जो कृष्णाचा शत्रु त्याला कोण रक्षी. १८. ब्राह्मण-भक्तावाचून इतरावर अग्निची योजना करावी इत्यादि ईश्वरवाक्याचें अतिक्रमण. १९. साधूंच्या नाशाची इच्छा. २०. द्वारकेंत. २१. दुष्टकर्महि. २२. विचारावर कोप करी. २३. तो कुमति (दुष्टमति सुदक्षिण) थोरांला (ऋत्विजादिकांला) भरीस दे (अभिचारकर्म प्रवृत्त करी). २४. शत्रु. २५. दहनगति. जळून खाक होणें ही गति. या श्लोकांत 'री' अक्षराची आवृत्ति वारंवार झाली आहे म्हणून हा अनुप्रासालंकार होय. २६. काशिपतीचा पुत्र. २७. पातकचि. २८. भक्षी.

कुळ, कुमति जो व्यर्थ द्वेषी जगद्धित[2]पुरुषा. ॥ ३५
अमितरिपु[3]भूपांचे नेले लया असु[4] दर्शनें,
खवळुनि दिले ते त्या वाराणसीस[5] सुदर्शनें; ।
प्रळयगति न स्वप्नीं पाहे प्रिया[6] स्वपुरी, तिला,
कळवि बहुधा चक्रव्याज प्रभु[7] क्षयरीतिला. ॥ ३६
विनिवारुनि विघ्न, वृष्णि[8]शक्रप्रभुपार्श्वस्थितिसक्त होय चक्र, ।
धरि केवळ तेथ सौम्यरूपा[9], भजती जेंवि कुलीन वीर भूपा[10]. ॥ ३७

---

## अध्याय सदसष्टावा.

(श्लोक.)

भौमांचा[11] स्वसखा कपि द्विविद[12], जो सुग्रीवमंत्री बळी,
मैंदाचा निजबंधु, तो सखिवधक्रोधें[13] जगास[14] छळी, ।

---

१. कोपाविष्ट. जो कुमति जगद्धितपुरुषा व्यर्थ द्वेषी [त्याचे] स्वमित्र रोषाकुळ रिपू होती–असा अन्वय. २. जगताचें कल्याण करणाऱ्या पुरुषाला. ३. शत्रुरूप राजांचे. ४. प्राण. ५. काशी. ['वारानसी'ति नद्यौ द्वे पुण्ये पापहरे शुभे । तयोर्मध्यगतत्वात्तु सैषा वाराणसी स्मृता ॥' इति स्कन्दवचनम्. दंडिकविकृत दशकुमारचरित–चतुर्थ उच्छ्वास–लघुदीपिकानामक टीका, पृ० २८३.] ६. [जी] प्रिया स्वपुरी (वाराणसी) स्वप्नींही प्रलयगति न पाहे, तिला चक्रव्याज प्रभु (चक्राचे रूपानें आलेला सदाशिव प्रभु) बहुधा क्षयरीतिला कळवि–असा अन्वय. ज्या वाराणसीला स्वनाशाचें स्वप्नसुद्धां पडावयाचें नाहीं तिला आपला क्षय (नाश) बहुधा (अनेकप्रकारांनीं) होतो आहे असें अनुभवास आलें. ७. सदाशिव. ८. वृष्णिकुलाचा शक्र (इंद्र) जो कृष्ण त्याच्या पार्श्वभागीं सक्त. ९. अनुग्राकृति. १०. या अध्यायांत पौंड्रक आणि काशीराज यांचा वध, अभिचारकृत्याभंग, सखिकुसुदक्षिण-काशीपुरीदहन आणि सुदर्शननिवर्तन असे चार विषय आहेत. ११. नरकासुराचा मित्र. १२. द्विविद–हा सुषेणवानराचा कनिष्ठ पुत्र, मैंद वानराचा कनिष्ठ भ्राता, सुग्रीवाचा सचिव आणि अंगदाचा मातुल. हाच नरकासुराचा मित्र होय. नरकासुरास कृष्णानें मारिलें म्हणून हा दाशरथी रामभक्त असतांही कृष्णाचा आणि बलरामाचा द्वेषी झाला. आपल्या जिवलग मित्राचा वध करणाऱ्याचा सूड उगवावा म्हणून द्विविदानें रामकृष्णांशीं वैरभाव केला. बलराम रैवतकपर्वतीं स्त्रियांसहित स्वैर कंदर्पक्रीडा करीत असतां यानें त्यास पुष्कळ उपद्रव दिला. तेव्हां दोघांचें युद्ध होऊन त्यांत द्विविद मरण पावला. या सप्तषष्टीतम अध्यायांत द्विविदवधाख्यान आहे. १३. भौमवधाच्या क्रोधानें. १४. द्विविदानें पुरें, गृहें, गोठे (घोष) इत्यादि दग्ध करून मोठमोठे पाषाण आणून आनर्तदेशावर टाकावे, मुनिजनांस उपद्रव करावा आणि कुलस्त्रियांचें पातिव्रत्य कलुषित करावें–अशा प्रकारें द्विविद जगतास छळी. (श्लोक ३-७.)

घालावी [1]प्रभुसींच गांठि म्हणुनी दाटूनि [2]काढी कळी
पाहे रैवतपर्वतीं [3]सुहृदरिभ्राता [4]महात्मा [5]हळी. ॥ १
आधीं दूरुनि ऐकिलें [6]सुललितश्रीरामगीतामृत,
स्वर्गींही न तसें, उणें [7]अमृत, [8]कीं झालेचि पीतां मृत. ।
आला वानरता त्यजूनि, [9]वरिता झाला बरी [10]एणता,
कां घेतां [11]हरिता प्रभू? न धरिता [12]त्यक्ता जरी नेणता. ॥ २
होता गात [13]स्त्रियांत [14]प्रभु करुनि [15]सुरापान जैसा [16]सुराप,
क्रीडासक्त [17]स्वभक्तसुरगम भगवान् योगियां जो [18]दुराप; ।
जैसा कीं हस्तिनीसीं [19]कनकनगवनीं [20]वासवाचा [21]करीन
क्रीडे, पाहोनि त्यातें द्विविद मनिं म्हणे, 'नाश याचा करीन.' ॥ ३
नाचे [22]शाखिशिरीं, उडे, [23]किलकिलाशब्दें तया [24]रैवता
तो [25]शाखामृग गाजवी, खळ न भी रामा [26]जगद्दैवता. ।
त्यातें पाहुनि [27]रोहिणेयरमणी [28]हास्यप्रिया हासती,
[29]हालापानमदाकुल [30]प्रियतमा [31]संकोचती कां सती? ॥ ४
जों जों हांसति त्या सती, कपि करी तों तों न [32]चेष्टा उणी,
जैसा [33]सुज्ञसभाप्रसाद दिसतां, दावी गुणातें गुणी, ।
भ्रूभंग [34]द्विज दाखवी, [35]किचकिचे, नाचे जसा [36]भांड ही,
[37]चेष्टा स्वल्प विभूहिदेखत करी सर्वांकडे [38]गांडही. ॥ ५

१. बलरामाशींच. २. कलह उकरून काढी. ३. आपल्या मित्राच्या (नरकासुराच्या) शत्रूचा (कृष्णाचा) भ्राता (भाऊ, बलराम). ४. महामनस्क, महानुभाव. ५. बळराम. ६. अत्यंत रमणीय असें श्रीरामाचें गीतामृत (गायनपीयूष). ७. स्वर्गांतील अमृतही या गीतामृतापेक्षां कमी होय. ८. कारण कीं. ९. स्वीकार करणारा झाला. १०. हरिणता. हरिण गीतास अनुसरतो. ११. सिंहता. १२. (वानरता) टाकणारा जो मूर्ख (नेणता) तो जर एणता न धरता तर प्रभु हरिता कां घेता? प्रभु हरिता न घेता—हें उत्तर. १३. लावण्ययौवनमंडितललनांमध्यें. १४. बलराम. (श्लोक १०.) १५. मद्यपान. १६. दारुबाज. १७. आपल्या भक्तांचा कल्पतरु. १८. दुर्लभ. १९. मेरुपर्वताच्या वनांत. २०. इंद्राचा. २१. ऐरावत. २२. वृक्षस्कंधावर. २३. वानरजातीय शब्दानें, भुभुःकारें, खिखाटशब्दानें. २४. रैवतपर्वताला दणाणून टाकी (गाजवी). २५. वानर. २६. जगताच्या देवाला. २७. रामस्त्रिया. २८. हसित ज्यांस प्रिय अशा. २९. मदिराप्राशनमदाकुल. ३०. रामाला. ३१. हांसावयास कां संकोचतील? ३२. तो वानर कुक्षी खाजवी, डोळे मिचकावून घुलकावी, वांकुल्या दावी, दांत विचकून वेडावी—इत्यादि चेष्टा करण्यांत अधिकाधिक उत्सुकता दाखवी. ३३. विद्वत्सभेची प्रसन्नता. ३४. दांत. ३५. कर्कश शब्द करी. ३६. विदूषक, भाट इत्यादि थट्टामस्करी जो करतो तो. ३७. हेलना. ३८. श्लोक १३ पहा.

भ्यावें जया प्रभुसि [1]निर्जरसत्तमानीं दावी तया गुद कपी [2]मदमत्त [3]मानी; ।
संसारसिंधुतरणें तरि कां न नौका [4]हे आश्रिता, करि [5]निजाहित [6]काननौका.॥ ६
पाहोनि [7]चेष्टा बहु राम कोपला, हाणी [8]कपिप्राणविनाशकोपला, ।
[9]प्रभूत्तमक्षिप्त खडाहि तो [10]पवी, त्यातें चुकावूनि [11]बळासि [12]कोपवी. ॥ ७
चुकवुनि सहजेंचि [13]श्रीबलास्तोपळाला,
कपि हरुनि [14]सुरेचा [15]कुंभही तो पळाला, ।
[16]त्रिभुवनपति जो कीं [17]वंद्य [18]जीवां, [19]कुल्यातें
द्विविद [20]कुमति त्यातें दाखवी वांकुल्यातें. ॥ ८
फोडूनि [21]मद्यघट दाखवि [22]सपरा मीं ऐसा असा कळवि मर्कट [23]दर्प रामीं, ।
जाला कपी [24]अयुतनागबळ [25]प्रभूतें केलीं रणें, गणिल काय [26]बळप्रभू तें? ॥ ९
आधीं फोडुनि [27]वारुणीघट, [28]पट [29]स्त्रीच्या बळांचे [30]हरी,
वृक्षीं नेउनियां बसे खळ, जसे [31]गोपाबलांचे [32]हरी; ।
[33]नामें तुल्य असोत, रूप गुण ते कोठें? [34]मनःकामद
श्रीशाची सरि ये कसी? सुवसनें फाडी धरी कां मद? ॥ १०
[35]धृष्टत्वें कपि तो [36]अतिक्रम करी, भीना मनीं, नावरी
वेडे चार, म्हणोनि राम सहसा त्या ज्ञानहीनावरी ।

---

१. इंद्रादि देवांनीं. २. उन्मत्त. ३. अभिमानी. ४. ही रामरूप नौका. ५. आपलें अहित. ६. कानन+ओकस्=अरण्य+गृह=वन हेंच गृह ज्याचें तो वानर.. ७. वानरचेष्टा. (श्लोक १४.) ८. कपि+प्राण+विनाशक+उपला=द्विविदवानर+जीवित+संहारक+दगडाला=त्या वानराचा प्राण विनाशील अशा दगडाला. ९. प्रभूत्तमानें (बळरामानें) क्षिप्त (फेंकलेला.) १०. वज्र. ११. रामास. १२. क्षुब्ध करी. [बळरामानें अचुक फेंकलेल्या पाषाणाला वानरानें चुकविलें तेव्हां बळरामास राग फार आला.] १३. श्रीबल+अस्त+उपळाला=रामानें फेंकलेल्या खड्याला. १४. मदिराकलश. १५. घट. ['कुंभस्तु कुंभकर्णस्य सुते वैश्यासुते घटे । राशिभेदे द्विपाङ्गे च कुंभस्त्रिवृति गुग्गुलौ ॥' इति विश्वः. ] १६. त्रैलोक्याधिप. (बळराम.) १७. वंदनीय. १८. प्राण्यांना. १९. कटिपश्चाद्भागातें. २०. दुष्टमति. २१. वारुणीकलश. २२. शौर्य. २३. गर्व. २४. दहासहस्र हत्तींचें बळ ज्याला असा. २५. बहुप्रकारचीं. २६. बळराम. २७. मदिराकलश. २८. वस्त्रें. २९. स्त्रीकटकांचे. ३०. हरण करी. ३१. गोप+अबलांचे=गोपस्त्रियांचे. ३२. जसा श्रीकृष्ण गोपींचीं वस्त्रें घेऊन कदंबवृक्षावर बसे तसा. ३३. श्रीकृष्णाला आणि द्विविदाला सारखेंच नाम 'हरि' असें असो, पण त्यांचे गुण सारखे कोठें आहेत? ३४. मनोरथ पूर्ण करणारा. ३५. अविनयानें, दांडगेपणानें. ३६. अमर्यादा. बळरामासमक्ष गोपांगनांचीं वसनें फाडून, त्यांजवर गुरगुरून आणि त्यांच्या अवयवांस बुचकरून दांडगेपणानें त्यांस त्रास देई–अशी अप्रतिष्ठा करी.

स्वीकारूनि [1]सुनंद [2]लांगल करी, चित्तींहि कोप, प्लवा
खाया [3]व्याळ तसा, उठे परिहराया [4]स्वप्रजोपप्लवा. ॥ ११

[5]तोंहि ऊपडुनि घे कपि [6]शाला, मृत्युचा न तिळ धाक पिशाला; ।
ताडितां बळ [7]शिरावरि साहे; साधुची सहनता परिसा हे. ॥ १२

सोसूनि प्रथम प्रहार, मुसळें रामें शिरीं हाणिलें,
आघातें [8]निबिड क्षणार्ध [9]तम [10]तन्नेत्रांगणीं आणिलें; ।
[11]तन्मूर्धक्षतजें रणोत्सवमुखीं त्या [12]मर्कटा न्हाणिलें,
ग्रीष्मांतीं [13]गिरिगैरिकाशिखर तें वज्रें जणों खाणिलें. ॥ १३

उडे रक्त व्योमीं कपिशिरिं पडे जैं मुसळ तें,
जळप्रक्षेपानें [14]क्वथितघृत जैसें उसळतें; ।
अशाही पीडेतें न गणुनि बलाढ्यें मग [15]नगें
तदन्यें आघात प्रभुवरिहि केला [16]गगनगें. ॥ १४

[17]मंदरा धरि विभू मुसळा या, शत्रुसिंधुसि बळें घुसळाया, ।
तद्यशोमृतरसार्थ कराया, तृप्त भक्त करि सार्थक राया! ॥ १५

त्याही [18]नगा मुसळ तें [19]शतकोटि खंडी, फोडील [20]मेरुसहि जो शतकोटिखंडी, ।
'रे! वानरा! तरुचि काय कथा रणा रे? यासीं न [21]लक्ष सुरनायक [22]थोरणारे'. ॥

घेता झाला तथापि द्विविद पुनरपि स्थूलशा [23]पादपाला,
त्याचा काढूनि टाकी सकळहि सहसा तो [24]महानाद पाला, ।

---

१. सुनंदनामक नांगर. २. बेडकास. ३. सर्प. ४. आपल्या प्रजांच्या उपद्रवास. ५. द्विविदवानर. ६. वृक्षातें. (श्लोक १७.) ७. द्विविदानें महातालवृक्ष उचलून बलरामाच्या शिरावर आघात केला, तो त्यानें सहन केला. ८. दाट, पुष्कळ. ['निबिडं निबिरीसं च दृढं गाढं प्रचक्षते' इति वैजयंती.] ९. अंधारी, काळोख. १०. त्या वानराच्या नेत्रांत. द्विविदाच्या डोळ्यांपुढें काजवे चमकले. ११. त्याच्या मस्तकांतून निघालेल्या रक्तानें. १२. माकडा. १३. पर्वताचें गेरुमय शिखर. (श्लो० १८–१९.) गिरिमस्तक जसें गैरिकेनें शोभतें तसें. द्विविदमस्तक रुधिरानें शोभलें. १४. कडकडीत तूप. १५. वृक्षानें. १६. आकाशसंचारी वानरानें. १७. मुसळरूप मंदरपर्वतास. १८. वृक्षाला; (श्लेषेंकरून) पर्वताला. १९. मुसळ हेंच वज्र. २०. मेरु=पर्वतविशेष. ['मेरुस्तु शुशुभे दिव्यो राजवत् समधिष्ठितः । आदित्यतरुणाभासो विधूम इव पावकः ॥ योजनानां सहस्राणि चतुरशीतिरुच्छ्रितः । प्रविष्टः षोडशाधस्तादष्टाविंशतिः ॥ विस्तारात् त्रिगुणस्तस्य परिणाहः समंततः ॥' इत्यादि मेरुपर्वताचें वर्णन मत्स्यपुराणांत आहे. हा पर्वत ग्रीक लोकांच्या आलिंपस् पर्वतासारखा होय. २१. लक्षशः. २२. टिकणारे. २३. वृक्षाला. २४. मोठा शब्द करणारा.

धांवे हाणावयाला, तंव बळ मुसळें, जेंवि नागा[1] शिखंडी[2],
स्पर्शापूर्वींच पूर्वद्रुमसम समरीं दुर्जनागासि[3] खंडी. ॥ १७
ऐसा राहे वनीं न द्रुमवर[4] समरीं[5] आणिलें ज्या न कीशें[6],
पौलस्त्यें[7] प्रेरिलें तें निजबळ[8] मथिलें कीं बळें जानकीशें[9]; ।
[10]एवं केलेचि चूर्ण प्रभुवरमुसळें[11] टाकि जे तो पलाशी[12],
[13]जाणो अद्रि[14] [15]प्रतिश्रुन्मिष करुनि म्हणे, 'कां कपे! कोपलाशी?' ॥
गेले वेचुनि त्या वनांत पडला तोटा[16] अगा[17], [18]राशिला
तेजाच्या मतिकीर्तिनीतिकरुणाश्रीच्या अगारा[19] शिला[20] ।
हाणी, भंग करावया क्षितिधरीं[21] तो मेघ वर्षो पळे-[22]
स्थायी, पुष्कळही न भूभृदहिता[23] होतील वर्षोपळ[24]. ॥ १९
नामोच्चारेंचि खंडी स्वभजक[25] सुकृती सिद्धिला [26]अंत राया!
होतो त्या जेंवि उग्रप्रबळनिजविधिप्रेरिता [27]अंतराया, ।
[28]कीशक्षिप्ताश्मवर्ष प्रभुवर[29] मुसळें तेंवि भंगी क्षणांत,
[30]क्रीडे न क्रोधें[31] जाल्या अरुणरुचि[32] अनुक्रोशसंगीक्षणांत[33]. ॥ २०
कोंदे पाषाणचूर्णीं[34] गगन बहु रणीं, उत्सवीं त्या बुक्यांनीं,
क्रोधें तो कीश तालप्रभुभुज[35] विभुचें वक्ष ताडी बुक्यांनीं[36]; ।

---

१. सर्पास. २. मयूर. ३. दुर्जन+अगासि=दुष्टाच्या वृक्षास. ४. उत्तम वृक्ष. ५. समरीं ज्या वृक्षास कीशें (वानरें) आणिलें नाहीं असा एकही मोठा वृक्ष वनांत राहिला नाहीं. ६. वानरानें. ७. रावणानें. ८. आपलें सैन्य. ९. रामचंद्रानें. १०. या प्रकारें. ११. बळरामाच्या मुसळानें. १२. वृक्ष. १३. यांत उत्प्रेक्षालंकारपूर्वक मिषापन्हुति अलंकार झाला आहे. १४. पर्वत. १५. प्रतिध्वनीचें मिष करून. १६. श्लोक २१ पहा. १७. वृक्षास. १८. तेजाच्या राशीला. (बळरामाला.) १९. मति, कीर्ति नीति, करुणा आणि श्री यांचें अगार (घर) जो बलराम त्याला द्विविद शिला हाणी. या पादांत सुंदर 'पर्यायोक्त' आहे. २०. वृक्षांचा तोटा पडला तेव्हां शिला हाणी. २१. रामरूप पर्वतावर. २२. पळभर टिकणारे. २३. पर्वताचा नाश करण्याकरितां. २४. पर्जन्यकाळीं उदकाची जी गार पडते ती. (करका.) २५. जेंवि स्वभक्त नामोच्चारेंचि अंताला खंडी. २६. जेणेंकरून सिद्धीला अंत होतो अशा अंताला. २७. विघ्नातें. २८. वानरानें टाकलेला शिलावर्ष. २९. बलराम. ३०. केवळ क्रीडा करी, युद्ध न करी. ३१. युद्धोत्साहहेतु क्रोधही नाहीं. ३२. स्वाभाविकरक्तिमा. ३३. कृपारसयुक्त नेत्रांत. ३४. दगडाच्या शकलांनीं. ३५. तालवृक्षासारखे भुज ज्याचे असा. (श्लोक २३.) ३६. मुष्टींनीं.

[1]तेव्हां [2]टाकूनि **रामें** हळ मुसळ बळें [3]अंगुळींच्याचि [4]जत्रु-
स्थानीं पीडूनि लीलेकरुनचि वधिला [5]सत्प्रजादेशशत्रु. ॥ २१
यद्देहीं [6]अयुतद्विपेश्वरबळ क्रीडे असा तोहि तें
साहेना पळ शत्रुपीडन, वमे [7]नासाननीं [8]लोहितें, ।
[9]वज्रच्छिन्ननगेंद्रशृंगसम जें [10]प्रेतत्व पावे गळे,
झाले कंपित [11]रैवतक्षितितरु [12]श्रीवृष्णिपावेगळे. ॥ २२
आले होते विमानीं बसुनि [13]सुर मुनी सिद्ध गंधर्व, युद्ध-
क्रीडा पाहोनि झाले [14]मुदित, जय तिहीं [15]वर्णिला तो विशुद्ध, ।
पुष्पांची वृष्टि केली प्रभुवरि, नमिलें [16]दुष्टसंहारदक्षा,
आज्ञा घेओनि जातां [17]स्वपति विनविला, 'विश्व ऐसेंचि रक्षा.'॥२३
[18]रामाहूनीहि [19]रामस्वभुजविजय तो विक्रमी सत्य लोकीं,
[20]रामें न स्यंदनींही तंव पद विजयें ठेविलें सत्यलोकीं. ।
बैसे आधीं दिगंतीं विजय, [21]मग रथीं देवें[22] विश्रांति पावे,
पूर्वीं विश्वीं [23]जयश्री, बळ तदनु [24]पुरीं, पाय [25]त्यांचे [26]जपावे. ॥ २४

---

१. मुष्टिप्रहार सहन केला तेव्हां. २. श्लोक २४ पहा. ३. तर्जनीमध्यें धरून. ४. गळसरीचे हाडीं. (जत्रु=बाहुकंठाची संधि.) ५. सत्प्रजादेश यांचा शत्रु द्विविद. ६. दहा सहस्र गजांचें बळ. ७. नाकातोंडानीं. ८. रक्तें. 'जत्रु रगडितांच नाकीं तोंडीं । लागली रक्ताची मुसांडी' [हरिवरदा.] ९. वज्रानें तोडलेल्या पर्वतशृंगाप्रमाणें. १०. प्रेतपणा. ११. रैवतपर्वतावरील वृक्ष. १२. बळरामावांचून, म्ह० बळराम मात्र कांपला नाहीं. १३. देव. (श्लोक २६.) १४. हर्षित. १५. देवांनीं जयजयकार केला, सिद्धांनीं स्तवनपूर्वक नमस्कार केला आणि ऋषींनीं 'भला भला' 'साधु साधु' असें म्हणून पूजन केलें. १६. दुष्टांचा संहार करण्याविषयीं समर्थ जो राम त्यास नमिलें. १७. राम. १८. रामापेक्षां रामाचा भुजविजय खरा पराक्रमी. १९. हा श्लोक भाषांतररूप आहे असें कोण म्हणेल ? २०. रामानें रथांत पाय ठेवला नाहीं तोंच विजयानें सत्यलोकीं पद ठेविलें. २१. त्यामागून. २२. बळराम. २३. प्रवेशे—ह्या क्रियापदाचा येथें अध्याहार समजावा. जयश्री विश्वीं प्रवेशे [व] बल पुरीं प्रवेशे—असा अर्थान्वय. २४. द्वारकापुरांत. २५. त्या बलरामाचे. २६. बलरामानें द्विविद वानर मारून सर्वांस सुख दिलें म्हणून त्याच्या पादाचें ध्यान करावें. या अध्यायाला 'द्विविदवानरवध' असें नांव शोभेल.

# अध्याय अडसष्टावा.

(श्लोक.)

[1]संपन्ना [2]शुभलक्षणीं बहु बरी जी [3]लक्ष्मणा [4]विश्रुता
ती [5]सांबें हरिली स्वयंवरगता दुर्योधनाची [6]सुता; ।
साधूंच्या **विधि**च्या मनास रुचलें, तें [7]**कौरवा** नावडे,
[8]यक्षांसीं [9]निधिसाधिल्यांसह जसा अत्यंत दावा [10]पडे. ॥ १
ते दुर्बुद्धि [11]सुयोधनादि म्हणती, 'कन्या [12]अकामा हरी,
बांधा अर्भक [13]दुर्विनीत धरुनी, ही रीति नाहीं बरी, ।
लावावा न धरावया उशिर त्या [14]धृष्टा [15]सुनीचा [16]पळ,
[17]व्रीडा हे तनुजा सुकीर्ति हरिली विस्तारुनी [18]चापळ. ॥ २
[19]ऋक्षीच्या [20]शांवकाला वरिल कसि नरव्याघ्रकन्या? बळानें
नेली आम्हांसमक्ष, त्यजुनि भय, [21]कुलायोग्य केलें खळानें, ।
बांधावा तो धरूनि, त्वरित निजसुता सोडवावी लहानी.
[22]दुष्टाचारीं क्षमा ती निजविमलयशीं स्पष्ट दावील हानी. ॥ ३
ते **वृष्णी** करितील काय धरितां **सांबा** कुमारा? [23]मही
आम्हीं त्यांसि दिली [24]कृपा करुनियां, राजे असें नामही; ।

१. दुर्योधनाची कन्या लक्ष्मणा हिला सांबानें स्वयंवरांत हरण केली ही गोष्ट कौरवांस रुचली नाहीं, तेव्हां त्यांनीं सांबास जिंकून प्रतिबंधांत ठेविलें. हें वर्तमान यादवांस कळलें तेव्हां ते अत्यंत क्षुब्ध झाले आणि त्यांनीं सांबमोक्षणाची तयारी केली. रेवतीरमण बलराम हा कौरवांचा स्नेह संपादून सांबाला सोडवावें म्हणून हस्तिनापुरास आला, तेथें त्याचा अपमान कौरवांनीं केला. तेव्हां क्षोभ पावून बलरामानें हस्तिनापुराचे तट नागरानें फोडून टाकले, यामुळें भीष्मप्रमुख कौरव भयाभीत होऊन बलरामाला शरण आले आणि स्नुषा जी लक्ष्मणा तिच्यासह सांबाला घेऊन हलायुध परत आला—अशी कथा या अध्यायांत आहे. २. शुभलक्षणांनीं युक्ता. ३. सकलशुभलक्षणसंपन्न म्हणून लक्ष्मणा. ४. सुप्रसिद्ध. ५. जांबवतीसुतें. ६. कन्या. ७. दुर्योधनास. ८. धनरक्षकांसीं, निधिरक्षकांसीं. ९. निधि नेणाऱ्यांशीं. १०. या चरणास मूळांत आधार नाहीं. ११. कौरवपक्षीय लोक. १२. वराची इच्छा न करणारी. १३. दांडगा. १४. दांडग्या. (आपल्या बळाचा विचार न करून, स्वयंवरागत राजांची पर्वा न धरून, आणि कौरवांला न मानून सांबानें लक्ष्मणेस हरून नेली म्हणून तो धृष्ट होय.) १५. अतिनीचा. १६. पळभरही. १७. लज्जा. १८. धाष्टर्य. १९. आस्वलीच्या. २०. पोराला. २१. कुलाला अयोग्य. २२. हा पाद सुभाषितरूप असून यांत 'अर्थांतरन्यास' नामक अलंकार झाला आहे. २३. पृथ्वी. (श्लोक ३-४.) २४. आमच्या प्रसादानें यास मही (पृथ्वी) मिळाली आणि त्या पृथ्वीच्या योगें हे राजपद पावले. हे मूळचे राजे (भूपति) नव्हते आमच्या प्रसादानें हे राजपद पावले—असें तात्पर्य.

हा [१]त्यांचाचि महापराध. [२]शिशुला शिक्षा न केली-न या
रीतीनें [३]शिव कीं [४]कुलोत्तमसुता भंगूनि नेली [५]नेया. ॥ ४

येतील [६]स्वसुतार्थ धांवुनि तरी वृष्णि स्वयें [७]सर्वही
वार्ता ऐकुनियां करीं धरुनियां शस्त्रें, मनीं गर्वही, ।

[८]प्राणायामनिरुद्ध [९]इंद्रियगण क्षीण[१०]त्व पावे तसें
[११]त्यां होईल, न साधिली [१२]अविनतें [१३]स्रोतःकृपा [१२]वेतसें.' ॥ ५

[१४]ऐसें योजुनियां [१५]सुयोधन उठे, [१६]तन्मित्र आधीं सजे
राधानंदन, यज्ञकेतु तिसरा, दोघे [१७]महेष्वास जे ।

नामें [१८]भूरि [१९]शल, स्वयें कुरुवर श्रीभीष्म [२०]धांवे, कसा
सर्वज्ञ व्यसनीं उपेक्षिल निज[२१]ध्येयात्मजा लोक[२२]सा? ॥ ६

गेले [२३]सों वीर हस्ती [२४]हरिशिशुवरि ते, [२५]तद्रथांगोत्थ दूर
[२६]ध्वान श्रोत्रीं शिरे, तैं मुरडुनि निरखी [२७]त्यांसि तो सांब [२८]शूर, ।

आले युद्धार्थ ऐसें समजुनि करिता जाहला सज्ज चापा,
ठाके मार्गीं कराया प्रकटतर [२९]अचिंत्यार्भक स्वप्रतापा. ॥ ७

[३०]हरि त्वरित धांवती, तदपि हाकिती सारथी,
'अरे! [३१]शिशु! उभा उभा' म्हणत पावले [२३]सों रथी, ।

---

१. त्या यादवांचा. २. सांब बालाला. ३. कल्याण. ४. लक्ष्मणा. ५. नीतिमार्गास. ६. आपल्या मुलासाठीं. (सांबाला मुक्त करण्यासाठीं.) ७. वृष्णि भोजांध दाशार्ह कुकुर इत्यादि यादव. ८. प्राणायामानें रोधलेला. ९. इंद्रियसमूह. (श्लोक ४.) १०. प्रशम. प्राणायामादि योगाभ्यासानें इंद्रियांस शिक्षा केली असतां तीं मूळचीं जरी अनावर आहेत, तरी प्रशांत क्षीण आणि दुर्बल होतात. ११. प्रवाहाची कृपा न साधिली तर जसें वेतसाला होतें तसें त्यांस (वृष्णींस) होईल. ते वृष्णि भग्नदर्प आणि क्षीण होतील—असा भाव. १२. न वांकणाऱ्या वेतानें. १३. प्रवाहाची कृपा. हा दाखला मूळांत नाहीं. १४. सांबाला बांधून ठेवावा असें, सांबदमनकार्य योजून. १५. दुर्योधन. १६. दुर्योधन-मित्र कर्ण. १७. महाधनुर्धर. १८. बाल्हिकात्मज सोमदत्ताचा पुत्र भूरिश्रवा. १९. शल आणि यज्ञकेतु हे दुर्योधनाचे सहोदर. २०. कुरुवर भीष्म कां धांवला? २१. निजदैवत कृष्ण त्याचा आत्मज पुत्र सांब त्याची संकटीं उपेक्षा न करावी म्हणून धांवला. २२. लोकांसारखा, परक्यासारखा. २३. भीष्मासुद्धां सहा. २४. कृष्णात्मजावर; (पक्षीं) सिंहशावकावर. [हरि=कृष्ण, सिंह.] २५. त्याच्या रथचक्रापासून उठलेला. २६. ध्वनि. २७. त्या कौरवास. २८. महारथ. (श्लो० ६.) २९. अचिंत्य जो कृष्ण त्याचा अर्भक पुत्र सांब. (श्लो० ८.) ३०. घोडे. ३१. श्लोक ७ पहा.

शरप्रकर[1] वर्षती, घन जळें जसीं पर्वतीं;
विलोकिति कुतूहलें[2] समुनि[3] देव गंधर्व तीं. ॥ ८
तो कुमार यदुवंशमंडन स्वाशुगीं[4] करि अरीषुखंडन[5], ।
दाखवी अतुल हस्तलाघव क्रव्यभुग्बलग[6] जेंवि राघव[7]. ॥ ९
वेदांती[8] नास्तिकांनीं, हरिशिशु[9] अथवा वेष्टिला दिग्द्विपांनीं[10],
कीं सेनानी[11] रणांत स्वरधिपरिपुंनीं[12] वेष्टिला निष्कृपांनीं[13], ।
उद्दाम[14] स्वप्रताप प्रकट करि, धरि त्रास[15] कां? सांब लावी
त्यांला[16] लज्जामल[17], ज्या[18] धनुसि, वरि[19] शर क्रोध, युद्धा बलावी. ॥ १०
वर्णावें करलाघव प्रभुंचिया[20] त्या सूनुचें[21] काय कीं?
कर्णाद्यस्तसमस्तबाणनिकर[22] छेदूनियां सायकीं[23] ।
विंधी सर्व तुरंग[24] सारथि रथी अर्धक्षणीं, पारणीं[25]
दृष्टींचीं पुरवी बहु प्रकटुनी बाहुप्रतापा रणीं. ॥ ११
तेज दुःसहचि सिंहशावकीं[26], दाहशक्ति जसि अल्पपावकीं[27], ।
ते[28] मनीं म्हणति, 'कृष्णसा पहा, काळ बाळ, तरि कृष्णसाप हा.' ॥ १२
'वर्षेंही[29] आपणाला यदुपतिसुत हा धर्मयुद्धीं न आटे'
वाटे दुर्योधनाला, बहुतचि कठिन, क्रोध चित्तांत दाटे; ।
वाटेला सज्जनाच्या त्यजुनि करि असें ज्यामुळें कीर्ति कांटे[30],
फाटे धूर्तांहि जेणें कुळकुशळ धरी रुग्ण[31] होऊनि खोटे[32]. ॥ १३

---

['कुतूहलं कौतुके स्यात्प्रशस्तेऽपि च दृश्यते' इत्यमरः.]
१. बाणसमूह. २. कौतुकानें. ५ शत्रूच्या बाणांचें खंडन. ६. राक्षसांच्या सैन्यांत
३. मुनिसहित. ४. निजबाणांनीं. ८. वेदांती पुरुष नास्तिकांनीं वेष्टिला—असा अर्थसंदर्भ. ९. सिंहाचा
स्थित. ७. रामचंद्र. १२. स्वर्+अधिप+रिपुंनीं=स्वर्ग+स्वामी+शत्रूंनीं=इं-
छावा. १०. दिग्गजांनीं. ११. कार्तिकेय. या श्लोकार्धांतील वर्णन पंतांच्या पदरचें आहे. तेव्हां हें मूळांतील
द्रशत्रूंनीं. १३. निर्दयांनीं. कोणत्या श्लोकाचें भाषांतर आहे असा प्रश्न पंतांच्या निंदकांस केला तर त्यांस मौनच धरावें लागेल.
१४. मोठा. १५. भय. १६. त्या कर्णादिक सहा महारथ्यांस. १७. लज्जारूप मल (डाग). भी-
ष्मकर्णादिकांस सांबानें मोठा पराक्रम करून शरांनीं विद्ध केलें आणि लाजविलें—असें तात्पर्य.
१८. ज्या धनुष्यासि लावी. १९. शर आणि क्रोध वरी. २०. कृष्णाच्या. २१. पुत्राचें. (सांबाचें.)
२२. कर्णादिकांनीं टाकलेला समस्त बाणांचा समुदाय. २३. निजबाणांनीं. २४. घोडे. २५. नेत्रांला
आनंद देता झाला. [पारणा=भोजन, अभ्यवहारकर्म.] २६. सिंहाच्या छाव्यांत. २७. अग्नीमध्यें.
२८. सांबाचें अतुल वीरश्रीचें धैर्य पाहून ते भीष्मकर्णादिक महारथी म्हणतात. २९. शस्त्रवृष्टीनेंही.
३०. लिप्त होई. ३१. रोगिष्ट. ३२. बाजेस धरी=कुरुकुळाचें कुशळ क्षयिष्णु झालें—हें तात्पर्य.

चौ[1]घांनीं त्वरित चहूंकडूनि यत्नें **सांबाचों** मग वधिलीं तुरंगरत्नें; ।
सूताचा वध करि ए[2]क, एक चाप छेदी, तैं सुरमुनि पावलेचि ता[3]प.॥ १४
एवं ते **कर्ण दुर्योधन** खळ समरीं धर्म सं[4]योधरीती
त्यागूनि, प्राज्य यत्नें वि[5]रथ म[6]नुवशव्यालसा तो धै[7]रीती, ।
दे[8]वर्षि **द्वारकेंत** प्रभुसि कथि, म्हणे, 'हं[9]से फां[10]सां बकांहीं
काकांहीं बद्ध केला, न त[11]नय गणिला **कौरवीं सांब** कांहीं.' ॥१५
आज्ञापी **उग्रसेन** प्रभु कु[12]रुपतिच्या शासना **यादवांतें**,
आज्ञावात क्षणांत प्रबलतर करी दुःसहा या द[13]वातें; ।
रक्षाया कु[14]र्वरण्य क्ष[15]मिवर करुणामेघ **राम** प्रभू त[16]-
च्छांत्यर्थ क्षि[17]प्र वर्षे स्व[18]जनकुशळकृत्सामनीर प्र[19]भूत. ॥ १६

---

१. चार कौरवांनीं. (श्लो० ११.) २. एक कौरव वीर. ३. या श्लोकाचें वृत्त प्रहर्षिणी. याचें लक्षण:—'समन्वितं मनजरैश्छिन्नं पूर्वाक्षरैस्त्रिभि: । त्रयोदशाक्षरं नाम्ना कीर्तयंति **प्रहर्षिणीम्** ॥ २८ ॥' [सुवृत्ततिलकम्–प्रथमो विन्यास:], 'आकारमंथरै: प्राय: पादे पादेऽक्षरैस्त्रिभि: । शेषाक्षरैर्द्रुततरै: प्रहर्षाय **प्रहर्षिणी** ॥ ॥ १९ ॥' [सुवृत्ततिलकम्–द्वितीयविन्यास:], 'त्रीण्यादावष्टमं यत्र दशमं नैधने तथा । गुरूण्यतिजगत्यां तु त्रिभिश्छेदै: **प्रहर्षिणी** ॥५६॥' [भारतीय नाट्यशास्त्रम्–१५ अध्याय]. याचा भावार्थ:—यांत तेरा अक्षरें असतात. म, न, ज आणि र गण आणि एक गुरु अक्षर अशी अक्षररचना असते. अथवा यांतील पहिलीं तीन अक्षरें, आठवें, दहावें आणि शेवटचीं दोन अक्षरें अशीं गुरु असतात. यांतील प्रत्येक पादाचीं पहिलीं तीन अक्षरें प्राय: मंदगतिक असून अखेरचीं अक्षरें शीघ्रगतिक असतात. ४. सत्+योध+रीती=चांगल्या योद्ध्याची पद्धति सोडून. ५. रथहीन. ६. मंत्रानें मोहित केलेला सर्प जसा धरावा तसा. ७. सांबाला धरून भीष्मादिक सेनानायकांनीं लक्ष्मणेसहित स्वपुरांत प्रवेश केला. (श्लोक १२.) ८. नारद. ९. पक्षिविशेष. ['**हंसो** विहंगभेदे स्यादर्के विष्णौ हयांतरे । योगिमंत्रादिभेदेषु परमात्मनि मत्सरे ॥' इति विश्व:. 'खगयोगिभिदो**र्हंसो** निर्लोभनृपसूर्ययो: । विष्णौ प्राणे चात्मनि च' इति मङ्ख:.] १०.पाशांत. ११. तनय (पुत्र) जो सांब तो कौरवांहीं कांहीं न गणिला. १२.दुर्योधनाच्या. १३.यादवरूप दावानलातें. १४.कौरवरूप अरण्य. या श्लोकांत रूपकालंकार झाला आहे. १५. क्षमाशील जनांत श्रेष्ठ असा बलराम स्वभक्त कौरवकुलसंरक्षक (राम). १६.त्या दावानलाच्या शांत्यर्थ.१७.लवकर.१८. स्वजनांचें कल्याण करणारें सामरूप जल. बलरामानें क्षमापन करविलें याचें कारण त्याच्याच उक्तींत आहे तें असें:—'म्हणे जी यदुचक्र चूडामणि । प्रार्थनापूर्वक माझी वाणी । ऐकून कौरवांवरी ये क्षणीं । सेना क्षोभूनि न धाडिजे. ॥ १९ ॥ काय म्हणोनि कीजे क्षमा । ऐका त्याही वदतों वर्मा । कलह नसावा कौरवां आम्हां । अमरोत्तमामांजिवरा ॥ २० ॥ उतरावया धराभार । दोहीं वंशांमाजी अमर । अवतरले हा दृढ निर्धार । वदला साचार देवर्षि ॥ २१ ॥ भीष्म द्रोण आणि कर्ण । पांडव धर्म भीमार्जुन । उभय माद्रीचे नंदन । केवळ सुरगण अवतरले ॥ २२ ॥ यालागीं यादवां आणि

साधु ब्राह्मण वृद्ध मान्य यदुच्या वंशांत जे शोधक
न्यायाचारसुनिष्ठचित्त समयीं सद्बुद्धिचे बोधक ।
त्यांहीं वेष्टित राम कांचनरथीं बैसोनियां तो निघे,
लज्जाभार शिरीं ग्रहावृत शशी तत्कांति पाहोनि घे. ॥ १७

पावे सत्वर नागसाव्हयपुरा, दूरूनि पाहे, रची
नीतीतें, उतरोनियां उपवनीं तो राम बाहेरची, ।
जाणाया नृपभाव, उद्धव पुढें सांगावया पाठवी,
चित्तीं पुत्रपराभवासहि सुहृद्भावासही आठवी. ॥ १८

वंदी उद्धव वृद्धभूमिपतिस द्रोणास भीष्मा कृपा,
भेटे सादर बाल्हिकास विदुरा, त्याही नृपा निष्कृपा; ।
सांगे त्यांप्रति तो बलागमन, तें ऐकोनि ते, 'तूं जना
देही 'पूर्णतिथिप्रदोष' म्हणती सारूनियां पूजना. ॥ १९

'आला राम कुशस्थळीहुनि' असें सांगे तयां तो यदा
भीष्मादिप्रियभक्तचातकशिखी त्यां भेटती तोयदा. ।

कौरवां । सहसा विरोध न वाढवावा । जाणोनि ऐसिया रहस्यभावा । क्रोध क्षमावा लागतसे ॥ २३ ॥ आपुले दशन आपुले ओष्ठ । उभयसंघटें पाविजे कष्ट । यादव कौरव ते हे स्पष्ट । विरोध अरिष्ट अनुचित यां ॥ २४ ॥ यावरी क्षोभें कौरवांवरी । सहसा राया न कीजे स्वारी । स्वयें जावोनि सांब नोवरी । सामोपचारीं आणीन ॥ २५ ॥' [हरिवरदा.] १९. पुष्कळ.

१. बृहस्पतीचा अवतार जो उद्धव त्यासारखे सुबुद्धिवाद सांगणारे उपदेशक. २. सुवर्णरथांत सूर्यप्रभाभासुर रथांत. ३. रामाची शोभा पाहोनि ग्रहावृत शशी शिरीं लज्जाभार घे. ४. ग्रहांनीं वेष्टित जसा द्विजराज (चंद्र) तसा द्विजांनीं (ब्राह्मणांनीं) वेष्टित (द्विजराज—बलराम). ५. गजपुरास. (श्लोक १६.) ६. योजी. ७. नीत्युपायातें, स्नेहवर्धक सामोपायातें. ८. बागेंत. उपवन, आराम, प्रमदवन, उद्यान इत्यादिकांचें वर्णन पुढील अवतरणांत केलें आहे:—'उपवनलक्षणं वृक्षारोपे । उद्यानोपवनारामा वनं प्रमदपूर्वकम् । पंचधा निष्कुटं चेति वृक्षवाटी प्रशस्यते ॥ राज्ञामेवोपभोग्यं यद उद्यानं तदुदाहृतम् । पुरबाह्ये तु सामान्यं भवेदुपवनं नृणाम् ॥ आरामस्त्वेकभोग्योऽथ वनं प्रमदपूर्वकम् । अंत:पुरैकभोग्यं स्यान्निष्कुटं तु गृहे कृतम् ॥ अमात्यगणिकादीनां सर्वं नानातरूज्ज्वलम् । आरामं त्रिविधा द्रौमं शाकं पौष्पं विदुर्बुधाः॥'रघुवंश—सर्ग ८ श्लोक ३२ हेमाद्रिकृत 'दर्पणा'ख्य टीका.] ९. धृतराष्ट्राचा अभिप्राय. १०. सांबाच्या पराभवासहि. ११. आप्तपणासहि. १२. कौरवसभेंत गेल्यावर उद्धव वंदन करी. १३. धृतराष्ट्रास. १४. दुर्योधनास. १५. भीष्मादिक. १६. हे उद्धवा तूं. १७. आम्हांजनांस. १८. देहधारी. १९. पूर्णिमेचा सायंकाळ. तुझ्या मागून रामरूप चंद्राचें दर्शन होणारहें तात्पर्य. २०. करून. २१. उद्धवाची पूजा करून. २२. द्वारकेहून. २३. येथें रूपक जाणावें. (शिखी=मोर.) २४. रामास. २५. मेघाला.

पूजी शिष्य[1] सुयोधन, प्रभु करी [2]तत्पूजनस्वीकृती,
बोले तें स्वजनीं सुधा त्यजुनि जें [3]पीती [4]मनस्वी [5]कुंती. ॥ २०
'ऐका हो! सर्व आधीं स्थिरमति, मग तें आचरा क्षिप्र, [6]भूमी-
नाथांचा नाथ आज्ञा करि असि सकळां उग्रसेन, प्रभू मी, ।
आलों सांगावया कीं [7]सुहृदहित न हो, हें मनीं वागवावें,
आर्तीं आप्तांस, लावी [8]व्यसन न कर जों तों, बळें जागवावें. ॥ २१
आधीं सांब कुमार धार्मिक, तया एका अनेकीं बळें
[9]धर्मत्याग करूनि जिंकुनि तुम्हीं केलें निबद्ध [10]छळें; ।
हें वृत्त क्षण दुःसह प्रभुमना आम्हां, तरी [11]सोहिलें,
[12]कीं ऐक्य स्वजनीं असो स्थिर, [13]भवद्वृद्धांकडे पाहिलें.' ॥ २२
बोले [14]ईश्वर आपणा उचित जें बोलावया तेंचि, ते
भक्त प्राशिति, हंस मानससरीं मुक्ताफळें वेंचिते, ।
काकीं नित्य [15]अमेध्यसेवन किजे [16]आम्रद्रुमाच्या [17]पिकीं
द्यावें [18]शर्महि [19]मंजु बोलुनि जना द्यावें वसंतीं [20]पिकीं. ॥ २३
जे [12]कीं झांकुनि नेत्र [21]तुंडें पडती पक्षी मृताचेपरी,
त्यांला बोल नसेचि, निष्ठुर [22]विधी हा घात त्यांचा करी; ।
वर्षे चंद्र सुधा, [23]चकोरकुलही पी, वायसांचे [24]अरी
त्या [25]राकारजनींत [26]जागृतहि, [27]त्यां [28]काकास्रवांछा खरी. ॥ २४

---

१. दुर्योधन आणि भीमसेन हे गदायुद्धकलेंत बलदेवाचे शिष्य होत. २. दुर्योधनाच्या पूजेचा स्वीकार. ३. सादर ऐकतात. रामाचें भाषण अमृतापेक्षांही गोड होतें—असें तात्पर्य. ४. विचारशील. ५. पुण्यवान्, भाग्यशाली. ६. राजांचा राजा, राजाधिराज. ७. मित्राचें अहित. ८. संकटानें हात लावण्याच्या आधीं, संकटानें घेरण्याच्या पूर्वीं. ९. अधर्मयुद्ध करून. [तो एकटा, तुम्ही बहुत; तो विरथ, निःशस्त्र व मूर्च्छित, तुम्ही सरथ, सशस्त्र आणि सावधान—म्हणून हें अधर्म युद्ध असें समजावें.] १०. कपटानें. ११. सहन केलें. तुमच्या अधर्माचरणाचीक्षमा केली. १२. अशासाठीं कीं. १३. आपल्यासारख्या वयोवृद्धांकडे नजर दिली. १४. बलदेव. १५. अपवित्र पदार्थभक्षण. १६. आंब्याच्या वृक्षाच्या. १७. पुष्पफलोद्गमीं. १८. सुख. १९. मंजूळ. २०. कोकिलांनीं. २१. तोंड. २२. दैव, किंवा ब्रह्मदेव. २३. चकोरपक्षी चंद्राचीं अमृतकिरणें प्राशन करतो—असा कविसमय आहे. या कविसमयांचा निर्देश मागें पृ० ४३ टीप १३यांत केला आहे. पुढील श्लोकांत कित्येक कविसमयांचा संग्रह केला आहे.—'करीन्द्रजीमूतवराहशङ्खमत्स्याहिशुक्त्युद्भववेणुजानि । मुक्ताफलानि प्रथितानि लोके तेषां तु शुक्त्युद्भवमेव भूरि ॥' [कुमारसंभव—सर्ग १ श्लोक ६ पृ० ४ मल्लिनाथकृत टीका], 'आलिङ्गनैः कुरबकस्तिलकः कटाक्षैः शिञ्जन्नुपुरपदाहननैरशोकः । गण्डूषसीधुपतनैर्बकुलोऽङ्ग-

[1]यद्वाक्यश्रवणीं धृतादरजना सत्यादिकीं गौरव-
प्राप्ति स्पष्ट, [2]तया अनादरिति हो! दुर्बुद्धि ते कौरव; ।
सांबोपद्रववारणार्थ बहुधा [3]पंचाक्षरी [4]तो पती
सिद्धांचा[5] पढला सुमंत्र, म्हणुनी [6]ते भूत कीं कोपती. ॥ २५
अंधाचे सुत बोलती [9]प्रभुपुढें ते मंद ऐसें, '[10]अहा!
काळाची [11]सुदुरत्यया गति खरी, आश्चर्य वाटे महा, ।
[12]पादत्राणहि कीं शिरीं [13]सुमुकुटस्थानीं [14]पहातें [15]चढो,
वांछी विप्रसभेंत बैसुनि पदीं शूद्र [16]श्रुतीतें पढों. ॥ २६
आम्हीं [17]वाढविलें, नृपासन दिलें, कीं सोयरे हे पृथा-
काकीचे निजबंधु, जाय [18]अमृत [19]व्याळांसि देतां वृथा. ।
केले [20]आत्मसमान, मान दिधला शय्यासनीं, भोजनीं,
ते आम्हांसि [21]निर्लोजिरे यदु पहा आज्ञापिती हो! जनीं. ॥ २७

---

नानामभ्येति माधवमये समये विकासम् ॥ १ ॥' [श्रीजगद्धरभट्टकृत—स्तुतिकुसुमाञ्जलि—स्तोत्र १० श्लोक ८० पृ० १३४ टीका पहा.] 'सनुपूररवेण स्त्रीचरणेनाभिताडनम् । दोहदं यदशोकस्य ततः पुष्पोद्गमो भवेत् ॥ २ ॥ पादाहतस्त्यजति शोकमशोकवृक्षः पुष्पं दधाति बकुली मुखशीधुसिक्तः । आलोकितः कुरुवकः कुरुते विकाशमालोडितस्तिलक उत्कलिकी विभाति. ॥ ३ ॥' [कुमारसंभव—सर्ग ३ श्लोक २६ पंडितनवीनचंद्रविद्यारत्नकृत टीका पृष्ठ २४५-२४६ पहा.] २४.घुवडपक्षी. घुबड हे कावळ्यांचे (वायसांचे) वैरी होत, म्हणून यांस 'वायसाराति' (वायस+अराति=कावळा+शत्रु) असें अमरकोशांत नांव आहे. ['उलूके तु वायसारातिपेचकौ' इत्यमरः.] २५.पुनिवेच्या रात्रींत. २६. जागे असतांही. २७. त्या घुवडांस. २८. कावळ्याचें रक्त (अस्त्र) पिण्याची इच्छा. **पंतां**ची सरस्वती रसमय असल्यामुळें अशाच रसाळ श्लोकांस प्रसवून मूळ ग्रंथकारावरही छाप बसवूं पाहते असें पदोपदीं मनांत येतें.

१. ज्याच्या भाषणाच्या श्रवणानें. २. त्या बलरामाला. ३. मांत्रिक. ४. तो बलदेव. ५. मंत्रवेत्त्यांचा. ६. कौरव तेच भूत. ७. हा विचार मूलग्रंथांत नाहीं. **पंत** स्वप्रतिभाबळानें नूतन अलंकार घडवून ते मूलग्रंथकाराच्या सरस्वतीवर घालून तिला कशी साजरी करतात हें पाहावयाचें असेल तर तसें करण्यास हें काव्य उत्तम स्थल आहे. यांत **पंतां**नीं आपल्या पदरचे नग घालून मूलग्रंथकाराच्या वाणीला ठिकठिकाणीं अत्यंत मनोहरत्व आणिलें आहे. ८. धार्तराष्ट्र. ९. बलदेवापुढें. १०. खेदार्थक शब्द. ११. अनुल्लंघनीय. १२. पादुकाहि. १३. मुकुटाच्या स्थानीं, मुकुटसेवित पदीं. (मस्तकीं.) १४. चढूं इच्छितें. १५. हे हीन पामर यादव आम्हा श्रेष्ठ कौरवांस आज्ञा करतात—असा भाव. १६. वेदातें. १७. आपणासमान वाढविलें. १८. दुग्ध. १९. सर्पांस. (श्लोक २७.) २०. आपल्या बरोबरीचे. २१.निर्लज्ज. (श्लोक २७.)

शुभ्रच्छत्र सुचामर [1]व्यंजनही चिन्हें किरीटादिकें
या वृष्णींस पुरें नसे, करुनियां आतां उपेक्षा, निकें, ।
आम्हालाचि विलंघिति, [2]स्वसमते जे आणिले सोयरे,
[3]कर्णा! सर्प [4]सुधासुतर्पित डसे जें तें खरें होय रे! ॥ २८

कर्ण द्रोण [5]पितामहार्जुन इहीं नाहीं दिलें, तें बळें
कैसें सेविल [6]शक्रही? पडति [7]यद्गात्रें [8]भयें [9]बेंबळें; ।
[10]'तो [11]मेष' [12]द्विरदांतकाननगतग्रासग्रहाची [13]स्पृहा
सांगा केंवि धरी? धरी तरि न कां पावे [14]यमाच्या गृहा?' ॥ २९

वंश ख्यात, [15]धराधिपत्यहि, शतभ्राते [16]वरश्रीमदें
[16]मद्यें या खळ माजले, न नमितां त्यां [17]ईश्वराचीं पदें, ।
ऐसें फार [18]अवाच्य बोलुनि गृहा गेले उठोनि, [19]प्रभू
क्षोभे, कांपति तेधवां बहु भयक्रोधेंहि [20]सद्विप्र [21]भू. ॥ ३०

जाल्या [22]कर्पूरदुग्धप्रभ परि परमक्रोधसंतत शोण[23]-
च्छाय [24]श्रीमूर्ति झाली, स्वजनहि भय घे, [25]वक्त्र पाहेल कोण? ।
हांसे कोपांत [26]उच्चैः प्रभु, नवल करी [27]क्रोधबाधार्त, 'राष्ट्र
ग्रासाया [28]वन्हि आला' सुर म्हणति 'कसे वांचती [29]धार्तराष्ट्र?' ॥ ३१

हांसे राम [30]म्हणे, 'अनेकविध जे [31]विद्याकुलश्रीबल
ज्ञात्यादि भ्रमहेतु [32]दुर्मद, [33]ईहीं [34]उन्मत्त होती खल, ।

---

१. पंखा. २. आपल्या बरोबरीस. ३. हे कर्णा. ४. अमृतानें संतोषित. ५. भीष्म. (श्लोक २८.) ६. इंद्रही. ७. ज्या इंद्राचीं गात्रें. ८. कौरवांच्या भयानें. ९. शक्तिहीन. १०. तो बलरामरूप अथवा यादवरूप मेष—असा ध्वनितार्थ. ११. मेंढा. (श्लोक २८.) १२. द्विरद+अंतक+आनन+गत+ग्रास+ग्रहाची=गज+हंता (सिंह)+मुख+गेलेला+घांस+घेण्याची=सिंहाच्या मुखांत गेलेला ग्रास घेण्याची. १३. इच्छा. १४.यमाच्या गृहा म्हणजे मरणा—असा अर्थ. १५.पृथ्वीपतित्व असतां. १६. श्रेष्ठ जो संपत्तीचा मद हेंच मद्य त्यानें. १७. बळरामाचीं. १८. बोलण्यास अयोग्य, हेलनोक्तिमय, परुष. १९. बलराम. २०. साधु ब्राह्मण. २१. पृथ्वी. २२. कापूर दूध यांसारखा श्वेतवर्ण. २३. रक्तवर्ण छाया जीची असी. २४. बलदेवमूर्ति. २५. तोंड. २६. मोठ्यानें. २७. क्रोधाच्या पीडेनें पीडित. २८. बळराम नव्हे, हा मूर्तिमंत अग्नीच. २९. धृतराष्ट्रपुत्र. ३०. श्लोक ३१ पहा. ३१. विद्या, कुळ, श्री, सैन्य, ज्ञाति, इत्यादि जे दुर्मद ते भ्रमहेतु. (भ्रांति उत्पन्न करण्यास कारण असे.) ३२. आभिजात्यमद, श्रीमद, शीलमद, वयोमद, विद्यामद, सत्तामद, लावण्यमद इत्यादि दुर्मद. ३३. या मदांनीं. ३४. दांडगे, उन्नद्ध.

दंडावांचुनि शांतिला न धरिती, [1]ऐकोनि बोलां, [2]कुडें.
तें यत्नांतर, मातले [3]पशु [4]वशा येती अहो! [5]लांकुडें. ॥ ३२
झाले होतेचि सज्ज प्रबळ [6]यदुयुवे, कृष्णही, नाश [7]शांचा
[8]ऐशांचा जो कराया, [9]निपुण [10]हरि जसा शक्तिहीना [11]शशांचा, ।
[12]त्यांतें [13]वारूनि यत्नें [14]कलिदवशमना धांवलों [15]अब्दसा मीं;
तें केलें [16]धार्तराष्ट्रीं विफळ सकळही, आणिला [17]शब्द [18]सामीं. ॥ ३३
[19]ज्यांचीं [20]आकल्प देती [21]निरयगति फळें याप्रकारेंहि खोटीं
[22]ज्ञाताज्ञातेंहि दैवें जरि घडति अवें मेरुहूनीहि [23]मोटीं, ।
साहों तेंहि 'क्षमस्व' स्वरिपु जरि म्हणे, कां [24]सुहृन्मंतु पोटीं
घालूंना? [25]त्यांहिं [26]आम्हा तृणसम गणिलें निंदिलें आजि [27]थोटीं. ॥ ३४
[28]वधिति परि [29]हृत्पद्मीं ऐसे न [30]सायक लागती,
प्रखर वचनें हीं [31]या [32]इष्टाचि काय [33]कलागती? ।
करिति [34]कुमति प्राणत्याग्याचिया [35]अवमानना,
न निरखिति यासाठीं ज्ञाते कधीं [36]अवमानना. ॥ ३५
[37]जो [38]भोजांधकवृष्णिनायक, सदा ज्याची शिरीं वाहती
आज्ञा सादर [39]लोकपाल, न कधीं मानाकडे पाहती, ।

---

१. आमचें सामाचें भाषण ऐकूनही. २. निरर्थक. ३. पशुरूप कौरव. ४. स्वाधीनतेप्रत. काठीनें. ६. तरुण यादव. ७. शत कौरवांचा. ८. मदोन्मत्त विवेकहीन कौरवांचा. . समर्थ, दक्ष. १०. सिंह. ११. सशांचा (नाश कराया निपुण). १२. त्या तरुण यादवांतें आणि कृष्णातें. १३. सामोपायांनीं सांत्वन करून. १४. कलीरूप वणवा शमवायास. १५. मे घासारखा. १६. कौरवांनीं. १७. दोष. १८. सामोपायास. १९. ज्या अघांचीं. २०. कल्पव ल्पपर्यंत, प्रलयकाळपावेतों. २१. नरकगति. २२. समजलेलीं आणि न समजलेलीं. २३. मोठीं करून क्षमस्व [असें] स्वरिपु, जरि म्हणे [तरि] तेंहि साहों (साहूं). २४. मित्रांचा अपरा पोटांत कां घालणार नाहीं?. २५. त्या मंदमति दुर्जन कौरवांनीं. २६. बलरामासह उद्ध २७. नीचांनीं. २८. हाणिती. २९. हृदयकमलांत. ३०. बाण. ३१. या मंदमति ३२. प्रियकर आहे काय? ३३. कलह. ३४. दुष्टबुद्धि. ३५. अप्रतिष्ठा. ३६. अवम+ मुखाला=नीचाच्या तोंडाला. हें 'अर्थांतरन्यास' नामक अलंकाराचें उदाहरण आ सांगून तिचें समर्थन करण्यासाठीं सामान्य गोष्ट सांगितली अथवा विशिष्ट उद बळकटी आणण्यासाठीं सामान्य नियम दिला म्हणजे 'अर्थांतरन्यास' झाला विशिष्ट उदाहरण देऊन चतुर्थ पादांत तशा उदाहरणांपासून अनुमित होणा गितला आहे. ३७. उग्रसेन. ३८. भोज, अंधक आणि वृष्णि य ३९. आठ लोकपाल—इंद्र, अग्नि, वरुण, यम, कुबेर इत्यादि (श्लोक ३ नुवर्ती तो उग्रसेन प्रभु नव्हे काय?

तो नोहे [1]प्रभु उग्रसेन? करुनि [2]स्नेहानुकंपा दिलें
आम्हां हें [3]पद **कौरवीं**!, यश बरें लोकांत [4]संपादिलें! ॥ ३६
[5]स्वर्भूषा [6]शतमन्युपुण्यफळ जी साक्षात् [7]सुधर्मा सभा
जेणें [8]आक्रमिली, जसी [9]दिनकरें [10]पूर्णामृतांशुप्रभा, ।
ज्याच्या [11]स्वस्तरु पारिजातहि वसे [12]कांतानिवासाजिरीं,
[13]त्याला योग्य नव्हे [14]नृपासन म्हणे, हीं बोलणीं [15]साजिरीं! ॥ ३७
[16]जीचे **ब्रह्मादि** दास, त्रि[17]भुवननमिता, [18]संपदाहेतु [19]देवी
[20]**पद्मा** [21]पद्मालयाहि त्यजुनि सतत [22]यत्पादपद्मासि सेवी, ।
तो हीं कीं छत्रशंखव्यजनमुकुट जीं [23]भूपचिन्हें अशांतें
नोहे योग्य, [24]त्रिलोकी तरि मिरवितसे भूषणीं [25]यद्यशांतें. ॥ ३८
[26]ज्याचा [27]पादसरोजरेणु मुकुटीं देवांचिया [28]उल्लसे,
तीर्थो[29]पासक शुद्ध जे मुनि, मनीं [30]त्यांच्याचि जो कीं वसे, ।
[31]आम्हीं **श्री विधि शंभु** सेवित असों, आहोंत ज्याच्या [32]कळा,
तोही देव नृपासनोचित नव्हे! लज्जाचि नाहीं खळा! ॥ ३९
[33]होतें कीं मन उद्धवा! परिसिलें हें बोलणें, **कौरवीं**
**कृष्णाला** [34]निजभूमिखंड दिधलें, हे योग्य या गौरवीं? ।

---

१. तो प्रभु राजा नव्हे काय? २. प्रीति आणि दया. ३. राज्यपद. ४. हें भाषण व्याजस्तुति[illegible]पर
हे. येथें 'यश बरें' म्हणजे अपकीर्ति दुर्लौकिक असा अभिप्रेतार्थ आहे म्हणून हें **विपरी-**
**क्षणे**चें उदाहरण समजावें. ५. स्वर्गास भूषण असी. ६. इंद्राच्या पुण्याचें प्रत्यक्ष फळच.
सभा. ८. द्वारकेंत प्रतिष्ठापून ती व्यापून टाकिली. (श्लोक ३५). ९. रवीनें. १०. पूर्ण-
प्रभा=पूर्णचंद्राची कांति. ११. स्वर्गवृक्ष. १२. लक्ष्मीच्या घरच्या आंगणांत. (अजिर=
३. त्या कृष्णाला. १४. तो कृष्ण नृपासनाला अयोग्य अशी हे जल्पना करतात.
हेंही विपरीतलक्षणेचें उदाहरण आहे. १६. ज्या लक्ष्मीचें (पद्मेचें). १७. भुवन-
संपत्तिकारण. १९. परमेश्वरी. २०. लक्ष्मी. २१. पद्मरूप निजस्थानातेंहि.
कमळातें. २३. नरदेवपरिच्छदातें. (श्लोक ३६.) नृपछत्रचामरादि चिन्हांतें.
या कृष्णाच्या यशांतें. २६. ज्या कृष्णाचा. २७. चरणाब्जरज. २८. शोभे,
तीर्थसेवक. ३०. त्या मुनीच्याचि मनांत राहणारा. ३१. बळराम.
हे उद्धवा! तुझें मन सावधान होतें ना? ३४. आपल्या राज्यांतला

पादत्राण[1] यदु[2], स्वयें शिर कुरु[3], श्रीमंत दानें[4], कवे[5]!
आम्हां दुर्जनशासनव्रतधरां[6] ऐसें[7] कसें ऐकवे[8]?' ॥ ४०
क्रोधावेशें उठे तो[9], क्षणविधृतलयार्काग्निशीलांग[10] लीसी[11]
पादस्पर्शें महीस, प्रभु बल कवळी[12] दुर्धरा लांगलासी[13], ।
तेणें तें दुर्जनाचें नगरचि[14] सगळें उंचलीलें[15] खणोनी,
घालावें पालथें त्या निकटगतटिनीकुक्षिमध्यें[16] खणोनी. ॥ ४१
नौकासीच[17] पुरी तिला बुडविता[18] जैसा असावा तसा
गंगामग्न करावया बळ बळी क्षोभे असा वातसा[19]; ।
ऐसें[20] पाहुनि 'रक्ष रक्ष' म्हणति त्राणेच्छु[21] ते कौरव,
स्वामीचीं[22] नमिती पदें, चुकविती जीं चिंतितां रौरवें[23]. ॥ ४२
करी दया त्या शरणागतावरी, स्वलांगल क्रोधहि राम आवरी; ।
नमस्कृतीचें बळ केवढें पहा, निवे लयार्काग्न्यतुळप्रताप[24] हा. ॥ ४३
दासी दास रथाश्व वारण[25] सुता सांबोचितोपायन[26]
त्याला अर्पुनियां, सुयोधन नमी सोडीहि तो पाय न; ।
रामेंही दिधलें नतासि अभय स्वीकारुनी सर्व तें,
वांचावेंचि कसें पदाशनिपुढें[27] पापाचिया पर्वतें[28]? ॥ ४४
घेऊनि[29] गेला स्वपुत्र[30] स्नुषा, राग टाकूनि, तो देहधारी तुषाराग[31] ।

---

१. चर्मी जोडा. २. यादव. ३. कौरव. ४. भूमिदानानें. ५. हे पंडिता उद्धवा. ६. दुर्जनाच्या शासनाचें व्रत धरणाऱ्या आम्हांस. ७. तृतीय पादांत वर्णिलें आहे तसें. ८. श्लोक ३९ पहा. ९. बळराम. १०. क्षण+विधृत+लय+अर्क+अग्नि+शील+अंग=क्षणभर धरला आहे प्रलयाग्नीचा स्वभाव ज्याच्या अंगानें असा. ११. भाजी. १२. हातीं घेई. १३. नांगरास. (श्लोक ४०.) १४. हस्तिनापुर. १५. उपटिलें. १६. जवळ वाहणाऱ्या यमुनानदीच्या पोटांत. १७. जलयान. (श्लोक ४२.) १८. बुडविणारा. १९. वाऱ्यासारखा. २०. गंगेंत हस्तिनापुर बुडविण्यासाठीं नांगरानें उपटून वक्र करीत आहे असें पाहून. २१. जीवितरक्षणेच्छु. २२. बळरामाचीं. २३. नरक. २४. प्रलयकाळचा सूर्य अग्नि यासारखा अतुल प्रताप ज्याचा असा राम नमस्कारानें निवे. २५. षष्ठ्यायन भद्र जाति हस्ती (हरिवरदा.) २६. सांबाला योग्य असें उपायन (पारिवर्ह). २७. पादरूप वज्रापुढें. २८. पापपर्वतानें. २९. या श्लोकाचें वृत्त **सारंग.** याचें लक्षण:–'**सारंग**संज्ञं समस्तैस्तकारैः'. यांत अक्षरें बारा असून चार तगण असतात. हें वृत्त **पं**तांनीं आपल्या 'कुशलवोपाख्यानां'त कोठें कोठें योजिलें असून 'श्रीरमणीयरामायण' तर याच वृत्तांत रचिलें आहे. हें द्वादशाक्षरात्मक 'जगती'जातींतील एक वृत्त आहे. ३०. श्लोक ५०-५३ पहा. ३१. तुषार+अग=हिम, दंव+पर्वत= हिमाचल. (शुभ्रत्वास्तव.)

पावे निजद्वारकेला, कथी सर्व वृत्त, क्षया ज्यांत नेला असद्गर्व. ॥ ४९

---

## अध्याय एकुणसत्तरावा.

[२]ज्या भौमें [३]नरकासुरें हरुनियां भूपादिकन्या खळें
नेल्या [४]द्व्यष्टसहस्र तो वधुनियां श्रीयादवेंद्रें बळें, ।
त्या स्त्री आणुनियां [५]पुरासि, वरिल्या एकामुहूर्तीं करें
नानारूपधरें जगत्त्रयवरें लीलाकरें [६]श्रीकरें. ॥ १
ऐसें ऐकुनि नारद प्रभुसि त्या देखावया ये, [७]पुरी
पाहे लेशहि जीपुढें [८]सुरपुरीश्रीची न राहे [९]उरी, ।
जीमध्यें [१०]नवलक्ष रत्नकनक[११]प्रासाद, जी योजनें
बारा, जो सुखभोग दुर्लभ [१२]सुरां तो सेविजेतो जनें. ॥ २

---

१. दुष्टांचा अभिमान. 'नानावृत्तमयः क्वापि सर्गः कश्चन दृश्यते' म्हणजे केव्हां केव्हां काव्यांतील प्रत्येक सर्गामध्यें (अध्यायामध्यें) अनेक वृत्तें असावींत–असा नियम आहे, त्यास अनुसरूनच हा अध्याय आहे. यांतील वृत्तें इतकीं गोड आहेत कीं त्या त्या अर्थास तीं अगदीं अनुरूप आहेत असें म्हटलें पाहिजे. तसेंच या अध्यायांत पंताच्या सरस्वतीचा प्रवाह कोठें शांत, कोठें गंभीर, कोठें वेगवान्, कोठें क्षुब्ध आणि कोठें उद्दाम असा चालला आहे असें दिसतें. यांतील व्याजोक्तिपर आणि औपरोधिक भाषणें हीं तर इतकीं सुरेख वठलीं आहेत कीं वक्तृत्वकलाप्रावीण्येच्छु जनांनीं त्यांचें अवलोकन अवश्य करावें. २. कृष्णाचें षोडशसहस्र स्त्रियांच्या मंदिरांतील गार्हस्थ्य पाहून नारद विस्मयान्वित होत्साता त्याचें स्तवन करूं लागला–असा विषय या अध्यायांत आहे. वामनपंडितकृत 'द्वारकाविजया'च्या पहिल्या सर्गांत हाच विषय आहे. [वामनपंडितकृत स्फुट काव्यें–भाग १ पृष्ठ ५१८-५२८पहा.] ३. प्राग्ज्योतिषपुरीचा राजा. याचें नांव नरकासुर. हा भूमीचा पुत्र म्हणून याला भौम (भौमासुर) असें म्हणतात. यानें इंद्राची संपत्ति आणि अदितीचीं कुंडलें हरण केल्यावरून कृष्णानें याच्यावर स्वारी केली. याचा मुरुनामक दैत्य स्नेही होता त्यास कृष्णानें मारलें. या दैत्याचे पांच पुत्र कृष्णावर चालून आले, त्यांचाही कृष्णानें पराभव केला. नंतर नरकासुर स्वतः कृष्णापाशीं युद्ध करण्यास आला, तोही कृष्णहस्तें मरण पावला. याचा पुत्र भगदत्त कृष्णास शरण आला, तेव्हां कृष्णानें त्यास प्राग्ज्योतिषपुरीचा राजा केलें, आणि नरकासुरानें ज्या सोळा हजार राजकन्या बंदींत आणून ठेविल्या होत्या त्यांना मुक्त केलें. त्यांनीं कृष्णास मनेंकरून वरिल्यामुळें, कृष्णानें त्यांस द्वारकेस आणून त्यांच्यांशीं विवाह केला. अदितीचीं कुंडलें व इंद्राची संपत्ति कृष्णानें त्यांस परत देऊन संतुष्ट केलें. ४. सोळा हजार. (द्वि+अष्ट+सहस्र=दोन+आठ+हजार.) ५. द्वारकेला. ६. कृष्णानें. ७. द्वारका. ८. इंद्रपुरीच्या संपत्तीची, अमरावतीच्या ऐश्वर्याची. ९. अवशिष्टता. १०. श्लोक ५ पहा. ११. मंदिरें. १२. देवांला.

सारा असारा निवडूनि चौकस द्वि[1]जांत जे निर्मळ [2]मानसौकस ।
ते सांगती, '[3]काळ सुखें सरो, वरा पुरी न हंस त्यजिती सरोवरा.' ॥ ३
वृंदें श्रीद्वारकेच्या रमति [4]उपवनीं त्या [5]सरंभाप्सरांचीं,
तीरें [6]हंसावतंसें विलसति [7]अमृतैकोपलंभाप्सरांचीं; ।
गातां सप्रेम आम्रीं [8]हरिचरितमया गद्यपद्या पिकांनीं,
गंधर्वश्रेष्ठ, '[9]गाणें' म्हणति 'परिसिलें हें न अद्यापि कानीं.' ॥ ४
उद्यानीं हित सत्य गोड वदती जे तेस्थळीं [10]सारिका,
वर्णाया हरिचीं यशेंचि विधिची झाली तसी [11]दारिका, ।
कानीं आयिकतांचि मूढ विषयी दुर्बुद्धि टाकी, [12]रते
सन्मार्गीं, उपदेशिती उपवनीं ऐसे सदा [13]कीर ते. ॥ ५
नांदे [14]वल्लभपुत्रपौत्रसहित [15]श्री [16]रूपिणी [17]आपण,
[18]द्रव्याधीशसमृद्धिला मिरविती, [19]तेथें न कां [20]आपण? ।
जो तो सादर हस्त जोडुनि म्हणे, 'मन्मंदिरा [21]येंच कीं'
आधीं दुर्लभ भेटतां [22]विधिबळें मोठ्या मिठ्या याचकीं. ॥ ६
लावण्य त्रि[23]दशीं किती? [24]तदधिकश्री पौरें[25] विद्या कळा
सर्वा [26]सर्वहि जाणती, प्रभुपदीं त्या अर्पिती [27]सत्फळा, ।
[28]तें वैकुंठचि, नाममात्र दुसरें स्वीकारिलें द्वारका,
ऐसें आवडलें, जसें [29]तदधिपा [30]वृष्णित्व [31]सत्तारका. ॥ ७

---

१. पक्ष्यांत. २.मानस सरोवर आहे ओकस् (गृह) ज्यांचें असे (द्विज),३. काळ सुखें (सुखानें) सरो (जावो), हंस वरा पुरी (श्रेष्ठ द्वारका नगरी)न त्यजिती,[पण] सरोवरा [त्यजिती]—असा अन्वय. (पृष्ठ १३९ टीप ८ पहा.) ४. बागेंत.५. रंभासहित इतर अप्सरांची वृंदें (समूह).६. हंस अवतंस (भूषण) ज्याचे अशीं (तीरें). ७. अमृत+एक+उपालंभ+अप्+सरांचीं=सुधा+मुख्य, केवळ+निंदा +उदक+कासारांचीं=अमृताची निंदा करणारीं उदकें ज्यांत अशा सरोवरांचीं (तीरें). ['कासारः सरसी सरः' इत्यमरः.] ८. ज्यांत कृष्णचरित भरलेलें अशा गद्या आणि पद्या. ९. पिकगीत. १०. मैनापक्षी. ११. कन्या. (सरस्वती.) १२. उत्तम मार्गांत रममाण होई. १३. शुक. १४. गोपांचे मुलगे व नातू यांसह. १५. लक्ष्मी. १६. मूर्तिमती. १७. स्वतां. १८. कुबेराच्या संपत्तीला. १९. तेथें बाजार कां नसावा? जेथें कुबेरासारखे श्रीमंत लोक आहेत तेथें बाजार पाहिजेच पाहिजे—असा भाव. २०. बाजार. २१. यावेंच. २२. दैववशानें अप्राप्त वस्तु मिळाली म्हणजे तिजवर याचकांची मोठी मिठी पडते. २३. देवांमध्यें. २४. त्रिदशांहून अधिक शोभा ज्यांस असे. २५. पुरवासी जन. २६. सर्वही पौर. २७. उत्तम फळ ज्यांचें अशा. २८. द्वारकापुर. २९. द्वारकेचा अधिप कृष्ण यास. ३०. यादवत्व. ३१. साधूंस तारणाऱ्या.

कांता[1] द्व्यष्टसहस्र[2] साष्टशत[3] ज्या लोकेश्वराच्या[4], नवीं
त्यांचीं कांचनरत्ननिर्मित[5] गृहें, तैसीं सुरीं दानवीं ।
नाहीं आयकिलींहि, निर्जरनदीस्रोतें[6] जया जानवीं[7]
प्रासादांसह[8] तोहि मेरु न तुळे, हें मानिलें मानवीं. ॥ ८

विप्र[9] श्रीमत्तम[10] हरिगृहप्रांगणीं, जेंवि सोम[11]
व्योम त्यागी, हळुचि उतरे तो, भजे ज्यासि[12] सोम[13] ।
तो मर्त्येशापरि[14] मुनिस या पाहतां सेज[15] सोडी,
जोडी हस्त, प्रणतिविषयीं[16] दाखवी फार[17] गोडी. ॥ ९

प्रार्थूनि श्रीमुकुंद त्रिदशमुनिस[18] त्या बैसवी स्वासनींच,
श्रेष्ठत्वा स्थान[19] तोच्चि द्विजवर[20], बहुधा देव तो दास नीच, ।
प्रक्षाळी पाय त्याचे, उदक धरि शिरीं रुक्मिणीच्या हिता तें[21]
अर्पी, ब्रह्मण्यदेवें[22] कुशल शिकविलें[23] स्वर्धुनीच्याहि[24] तातें. ॥ १०

१. स्त्रिया. २. सोळाहजार. ३. एकशें आठ. ४. कृष्णाच्या. ५. सोनें व रत्नें यांनीं तयार केलेलीं. ६. भागीरथीचे ओघ हींच ज्या मेरुपर्वतास अत्युच्चत्वामुळें जानवीं झालीं. ७. यज्ञोपवीतें. ८. राजवाड्याबरोबर. ९. नारद. १०. अतिशोभमान. ११. चंद्र. १२. ज्या कृष्णास. १३. शिव. १४. राजाप्रमाणें. १५. शय्या. श्रीपर्यंक सोडी. (श्लोक १४.) १६. नमस्कार करण्याविषयीं. १७. या श्लोकाचें वृत्त 'मंदाक्रांता'. याला 'श्रीधरा' असेंही नांव आहे. याचें लक्षण:—'चत्वार्यादौ च दशमं गुरूण्यथ त्रयोदशम् । चतुर्दशं तथा पञ्च एकादशमथापि च ॥ ७६ ॥ यदा सप्तदशे पादे शेषाणि तु लघून्यपि । भवंति यस्मिन्सा ज्ञेया **श्रीधरा** नामतो यथा ॥ ७७ ॥' [श्रीभारतीय नाट्यशास्त्र—अध्याय १५.] चतुःषट्सप्तविरतिर्वृत्तं सप्तदशाक्षरम् । **मंदाक्रांता** मभनतैस्तगगैश्चाभिधीयते ॥ ३५ ॥ [सुवृत्ततिलकम्—प्रथमो विन्यासः.] मंथराक्रान्तविस्तब्धैश्चतुर्भिः प्रथमाक्षरैः । मध्यषट्केऽतिचतुरे **मंदाक्रांता** विराजते ॥ ३४ ॥ [सुवृत्ततिलकम्—द्वितीयो विन्यासः.] साक्षेपक्रोधधिक्कारे परं **पृथ्वी** भरक्षमा । प्रावृट्प्रवासव्यसने **मंदाक्रांता** विराजते ॥ २१ ॥ [सुवृत्ततिलकम्—तृतीय विन्यासः.] १८. नारदास. १९. पात्र. २०. नारद. २१. उदक. २२. ब्रह्मणि साधवो ब्रह्मण्यास्तेषां देवः । ब्रह्मण्यश्चासौ देव इति वा. (श्लो. १५ टीका पहा.) ब्रह्मणि वैदिके साधुः [अमरकोष.] या शब्दावर 'हरिवरदा' ग्रंथांत व्याख्यान केलें आहे तें असें:—'ऐसा विप्रपादार्चनादर । असंत देखूनि व्यासकुमर । म्हणे ब्रह्मण्यदेव नामोच्चार । पढती साचार आम्नाय ॥ ४३ ॥ ब्रह्मण्यदेव हें गुणनाम । यथार्थ मिरवी पुरुषोत्तम । त्याच्या पादशौचोदकाचा नेम । धरिती सकाम तीर्थनिचय ॥ ४४ ॥ तीर्थें सकाम पादोदका । गुरुतर गुरुत्वें जगज्जनका । तोही विप्रपदजळपंका । धरी मस्तकावरी मानें ॥ ४५ ॥ ब्रह्मशब्दें बोलिजे वेद । वेदवेत्ता तत्प्रतिपाद्य । ब्रह्मण्यदेव आनंदकंद । श्रीमुकुंद अन्वर्थ ॥ ४६ ॥.' २३. नारदाची यथाविधि पूजा करून कृष्णानें सज्जनाचा आचार कसा असावा हें सर्वांस शिकविलें. भगवद्गीतेंत

प्रेमें पूजुनि, हस्त जोडुनि, म्हणे[1], 'आम्हास हीं पावलें[2]
दावाया अजि! विश्वतारक! तुम्हां स्वामी! बरें फावलें; ।
झाला धन्य कृतार्थ वंश यदुचा, केली दया, वासरा[3]
जोडा नाहिंच, भेटली बहुदिसां हे[4] गाय या[5] वासरा[6]. ॥ ११
तुम्ही कल्पद्रुम स्वामी, पूर्ण हा आमचा करा ।
मनोरथ, स्वयें सांगा स्वसेवा काम चाकरा.' ॥ १२
म्हणे देवर्षी, 'तूं स्वजनसख[7] जागा[8] खलदमीं[9],
असें जाणें, ध्यातों तव पद सुविद्याफलद मी; ।
जगत्पाळा! देवा! विधिहरगुरो! पूजन[10] मना
न दे आश्चर्या, कीं शिकविसि करूं तूज नमना. ॥ १३
वीणा[11]गानरुची, नसे जपतपीं निष्ठा, सदा मोकळी
वाणी सूचकही[12], भ्रमे[13] जनिवनीं, लावी बळें जो कळी[14], ।
ऐसाही[15] परि गौरवार्ह[16] जन हा[17] यद्दासभावें[18], न हो
त्वत्पादांबुजविस्मृति[19] क्षण, सुखा अन्यें[20] न पावेन, हो[21]! ॥ १४
द्यावें हेंचि विभो! अभीष्टवरदा[22]! देवा! तुझीं पावलें[23]
चित्तीं नित्य असोत, सर्व म्हणजे या याचका पावलें. ।
प्रेमें गाइन युष्मदद्भुतयशें[24], नाचेन युष्मज्जनीं[25],
पावो निर्वृति[26] यांद[27] यादवपते! पाथोधिच्या[28] मज्जनीं[29].' ॥ १५

---

'यद्यदाचरतिः श्रेष्ठः' असें म्हटलें आहे त्यास अनुसरूनच कृष्णाची कृति आहे. 'यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरो जनः । स यत्प्रमाणं कुरुते लोकस्तदनुवर्तते ॥' [अध्याय ३ श्लो० २१]. याचा भावार्थः—श्रेष्ठ मनुष्य जें जें कांहीं करतो, तें तें इतर लोक करूं लागतात. तो जें खरें समजतो, तेंच इतर लोक खरें असें समजतात. २४. गंगेच्या तातानें (कृष्णानें.) हें 'पर्यायोक्त' नामक अलंकाराचें उदाहरण आहे.

१. श्लोक १६ पहा. २. चरण. ३. दिवसास. ४. हे नारदरूपिणी गाय. ५. या कृष्णरूप वासरा. ६. वत्सास. ७. सकलभक्तजनमित्र. ८. जागृत. ९. दुष्ट निग्रहाविषयीं (श्लो० १७). १०. त्वत्कृतपूजन. ११. या श्लोकाच्या प्रथमार्धास मूळांत आधार नाहीं. १२. चहाडहि. १३. फिरे. १४. कज्जा. १५. पहिल्या दोन चरणांत वर्णिलेला असा. १६. सत्कारास योग्य. १७. हा नारद. १८. ज्याचें दासपण स्वीकारल्यामुळें सत्कारास योग्य झाला. १९. तुझ्या चरणकमलांचें विस्मरण. २०. उपायांतरानें. २१. अहो. २२. इष्ट वर देणाऱ्या. २३. चरण. २४. तुमचीं आश्चर्यकारक यशें. २५. तुमच्या भक्तांमध्यें. २६. सुख. २७. मासा. २८. सागराच्या. (पाथस्=उदक.) २९. स्नानानें.

ऐसें प्रार्थुनि **मा**धवासि, मुनि तो तेथूनि अन्यालया[1]
गेला, कौतुक तेथही स्वभजका[2] दावी जगत्पाल या. ।
खेळे उद्धव[3]कामिनीसह विभू ढाळूनियां अक्ष[4], तें
पाहे **ना**रद ज्याचिया मनिं मुखीं यांचीं यशें अक्षतें[5]. ॥ १६
अक्ष त्यागुनि पाहतांचि विनय[6]प्रत्युद्गमें वंदनें
ब्रह्मण्यें[7] नव[8]दर्शनोत्सववशें श्रीदेवकीनंदनें ।
पाद्या[9]द्यर्चन आदरें करुनियां, जोडूनियां अंजली,
'स्वामी! काय निदेश[10] यांस[11]' म्हणतां देवर्षिधी[12] रंजली[13]. ॥ १७
पावे विस्मय विप्र, तेथुनि उठे, पाहे गृहीं तो तिज्या,
तेथें खेळविती[14] मुलें, प्रियतमाकर्णी[15] सुधा होति ज्या ।
त्या गोष्टी वदतो, सतोष हंसतो वाखाणितो तन्मती[16],
ज्यांच्या सुश्रवणें सुखें निरुपमें लक्षावधी जन्मती[17]. ॥ १८
कोठें त्या मुनि[18]सत्तमें निरखिला उद्युक्त[19] तो[20] मज्जना[21],
कोठें पंचम[22]खाद्दत प्रभु दिसे, कोठें द्विजा सज्जना ।

---

१. दुसऱ्या घरास. (श्लोक १९.) २. आपल्या भक्ताला. (नारदाला.) ३. श्लोक २० पहा. ४. फांसे. [सारिपाट मांडून उद्धव आणि प्रियस्त्री यांसह कृष्ण फांसे टाकीत आहे असें नारदानें पाहिलें.] ५. अखंड, निर्दोष. ६. विनयपूर्वक आसनावरून उठून उभें राहण्यानें. ७. ब्रह्मसाधु. ८. नारदाचें दर्शन नवीन झालें जसें अशा आनंदाला वश झालेल्यानें. ९. पादप्रक्षालन इत्यादि पूजन. १०. आज्ञा. ११. या कृष्णाला. १२. नारदमति. १३. सुखावली. १४. सुतलालन करतो=एकाला मांडीवर घेतो, एकाचे मुके घेतो, एकाला गोड बोलून हसवितो, एकाचा हात धरून चालवितो—इत्यादि अनेक प्रकारें स्वसुतांचें कौतुक करतो. १५. प्रियतमेच्या कानाला ज्या गोष्टी अमृततुल्य होतात त्या गोष्टी प्रियतमेपाशीं बोलतो. १६. मुलांच्या बुद्धि. १७. उपजती. १८. नारदानें. १९. तयार, सिद्ध. २०. तो कृष्ण. २१. स्नानास. २२. पंचमहायज्ञ करण्यास उद्युक्त. पंचयज्ञ—पंचमहायज्ञ—ब्रह्मयज्ञ, देवयज्ञ, पितृयज्ञ, भूतयज्ञ आणि मनुष्ययज्ञ असे पांच यज्ञ. 'अध्यापनं ब्रह्मयज्ञः पितृयज्ञस्तु तर्पणम् । होमो दैवबलिर्भौतो नृयज्ञोऽतिथिपूजनम् ॥' अर्थ—वेदाध्यापन अथवा वेदाध्ययन यास **ब्रह्मयज्ञ**, अन्नोदकानें तर्पण करण्यास **पितृयज्ञ**, अग्नीचे ठायीं जो होम त्यास **देवयज्ञ**, भूतबलीस **भूतयज्ञ** व अतिथीच्या पूजनास **मनुष्ययज्ञ** अशा संज्ञा आहेत. 'पंचैतान्यो महायज्ञान्न हापयति शक्तितः । स गृहेऽपि वसन्नित्यं सूनादोषैर्न लिप्यते ॥' जो यथाशक्ति नित्य नेमानें हे पंचमहायज्ञ आचरण करितो तो गृहस्थाश्रमांत राहून देखील पंचसूना दोषापासून अलिप्त असतो. [मनुस्मृति—अध्याय ३ श्लोक ७०-७१.] याच संबंधानें पुढील वर्णन पहा:— 'अथातः पंचयज्ञाः ॥ १ ॥ देवयज्ञो भूतयज्ञः पितयज्ञो ब्रह्मयज्ञो मनुष्ययज्ञ इति ॥ २ ॥ तद्यदग्नौ जुहोति स देवयज्ञः, यद्बलिं करोति स भूतयज्ञः, यत्पितृभ्यो ददाति स पितृयज्ञः, यत्स्वाध्याय

भावें तर्पितसे सुधाधिकरसें अन्नें प्रसन्नें मनें,
कोठें तृप्तिस दाखवी उरलिया अन्नाचिया जेमनें. ॥ १९
संध्योपासन मौन मंत्रजप या कर्मींच कोठें असी
मोठी आवडि दाखवि प्रभु, करीं कोठें धरूनी असी ।
सद्धर्मींहि कृपाणमार्गगतिचा अभ्यास दावी, रसा
वीराख्या मिरवी रवींदुकुलजस्वामी, नवा वीरसा. ॥ २०
कोठें भूषित वाजिवारणरथारूढ स्वमित्रांस हा
घेऊनि प्रभु वासुदेव मिरवे आपन्नवित्रासहा; ।

मधीते स ब्रह्मयज्ञः, यन्मनुष्येभ्यो ददाति स मनुष्ययज्ञ इति ॥ ३ ॥ तानेतान्यज्ञानहरहः कुर्वीत ॥ ४ ॥ आश्वलायन गृह्यसूत्र–अध्याय ३ खंड १. याचा भावार्थः—मोठें कल्याण करणारे पांच यज्ञ आहेत. ॥ १ ॥ देवयज्ञ, भूतयज्ञ, पितृयज्ञ, ब्रह्मयज्ञ आणि मनुष्ययज्ञ, अशीं पांच यज्ञाचीं नांवें आहेत. ॥ २ ॥ अग्नींत होम करणें हा देवयज्ञ, बलि देणें हा भूतयज्ञ, पितरांना देणें हा पितृयज्ञ, वेदाध्ययन करणें हा ब्रह्मयज्ञ, मनुष्यांना भिक्षादि देणें हा मनुष्ययज्ञ हीं यज्ञांचीं कर्में झालीं ॥ ३ ॥ हे पांच यज्ञ प्रत्यहीं करावे ॥ ४ ॥

१. भोजन देऊन तृप्त करितसे. २. अमृताहून मधुर अशा रसानें. ३. ब्राह्मण जेवून राहिलेल्या. ४. भोजनानें, भक्षणानें. ५. श्लोक २५ पहा. ६. खड्ग. ७. सद्धर्माचरण करणारा असूनही. ८. तरवार पट्टा इत्यादि फिरविण्याच्या रीतीचा. ९. या स्थळीं 'हरिवरदा' ग्रंथांत पुढील व्याख्यान आहे:—'इतुकें देखूनि नारद । अन्य सदनीं पाहे विशद । खड्ग खेटकधर गोविंद । देखूनि मुग्धवत् राहे ॥ ३५ ॥ छत्तीस दंडावती विद्या । सांदीपनिप्रबोधलब्धा । तत्परिशीलनीं गोविंदा । उत्साह आद्या जगदीशा ॥ ३६ ॥ खेटक धरूनि वाममुष्टीं । दक्षिणकरीं कृपाणयष्टि । तदभ्यासाची कसवटी । दावी सृष्टी खड्गधरां ॥ ३७ ॥ सरक चवंक बैसका ठाण । तिर्यक् वक्र परिवर्तन । वामसव्यप्रहारप्रवीण । अग्रप्रेरण खड्गाग्रें ॥ ३८ ॥ भ्रमण चापल्य मंडळें । अधोर्ध्वप्रहार करकौशल्यें । परप्रहारें खेटकें विफळें । कीजती सकळें अभ्यस्तें ॥ ३९ ॥ इत्यादि असिचर्मैंकरून । खड्गविद्यामार्गीं प्रवीण । विचरतां ऐशातें देखोन । मुनि तेथून परतला ॥ ४० ॥' [हरिवरदा.] १०. वीराख्य रसातें. **वीररस**—सर्व इंद्रियांचा परिपूर्ण प्रहर्ष किंवा उत्साह यालाच **वीररस** असें म्हणतात. याचे **भा**नुदत्त यानें '**र**सतरंगिणीं'त **यु**द्धवीर **दा**नवीर आणि **द**यावीर असे तीन भेद मानिले आहेत. कोणी कोणी साहित्यशास्त्रकार **ध**र्मवीर असा चौथा भेद मानितात. येथें युद्धवीराचाच उल्लेख आहे. युद्धवीराचे ठिकाणीं उत्साह किंवा परिपूर्ण प्रहर्ष उत्पन्न होण्यास स्वबळाचें वर्चस्व, शत्रुबळाचें न्यूनत्व, विजयप्राप्तीची संभावना, मित्रांचें साहाय्य, इत्यादि कारणें आवश्यक असतात. आणि या कारणांनीं उत्साह उत्पन्न झाला म्हणजे शत्रूवर चालून जाणें, शत्रूसैन्याची निंदा करणें, शस्त्रास्त्रांची योजना करून सज्ज होणें इत्यादि क्रिया घडून येतात. प्रस्तुत स्थळींही अनेक शस्त्रांच्या परिशीलनानें कृष्णानें वीररसाचा आविर्भाव दाखविला आहे. ११. सूर्यचंद्रवंशोद्भवराजांचा स्वामी. (कृष्ण.) १२. श्लोक २६ पहा. १३. आपन्न+वित्रास+हा (हन्)= आपद्ग्रस्त+दुःख+हननकर्ता, नाशक=दुःखिताचें दुःख वारणारा.

[१]पर्यंकीं निजला असे हरि, तया बंदी कवि प्रायश
    [२]स्वर्गीसे स्तविति क्षणें, निववि तें त्या [३]साधुविप्रा [४]यश. ॥ २१
मंत्री सज्जन उद्धवादि सुमती नीतिज्ञ, जे तारणीं
    लोकाच्या [५]पटु, [६]मंत्र त्यांसह करी तो [७]शत्रुजेता रणीं, ।
कोठें दाखवि [८]नीरकेलिरस तो घेऊनि [९]योषा [१०]हरी,
    चित्ताला मुनिच्या मुकुंद कलिच्या सर्वांहि दोषा हरी. ॥ २२
हांसावें [११]सेंद्रवित्ताधिपतिस [१२]वरितां एक [१३]गोदान [१४]दीनें,
    [१५]दानोदौघें धरावी बहुत निजमनीं लाज [१६]गोदानदीनें, ।
ऐसें [१७]कोठें उदार [१८]द्विजपरिवृत तो [१९]कौतुकें [२०]श्रीश [२१]यांतें
    दावी, [२२]यत्पादपद्में करिति [२३]सुभगताभाजन [२४]श्रीशयातें. ॥ २३
कोठें ऐके पुराणें [२५]निजचरितसुधाभाजनें [२६]सेतिहासें.
    कोठें [२७]स्त्रीसीं विनोद प्रभु करि, हरुनी स्वांत जे नेति हासें, ।
कोठें [२८]सद्धर्म, कोठें यदुकुळमणि तो अर्थ, कोठेंहि काम
    प्रेमानें सेवि, कोठें [२९]प्रकृतिपरमहोध्यान दावी [३०]निकाम. ॥ २४
कोठें तो करि देवदेवगुरुच्या [३१]भावें [३२]पदाराधना,
    ज्ञाते [३३]यच्चरणीं समर्पिति [३४]गृहक्षेत्रात्मदाराधना, ।

---

१. कोठें मृगनयनेसहित पलंगावर कृष्ण निजलेला असे. २. देवांसारखे. ३. त्या नारदा. ४. तें यश निववी. ५. दक्ष, समर्थ. ६. मसलत. ७. शत्रूंना जिंकणारा. ८. जलक्रीडारस. ९. स्त्रिया. १०. कृष्ण. ११. इंद्रासह कुबेरास. १२. घेतां. १३. धेनुदान–एक गोदान वरितां (घेतां) दीनें (निर्धन ब्राह्मणानें) [संतुष्ट होऊन त्या गोदानाच्या प्राप्तीस्तव] सेंद्रवित्ताधिपतिस (इंद्रासहित कुबेराला) हांसावें (लाजवावें)–असा अन्वय. १४. दरिद्रविप्रानें. १५. दान+उद+ओघें=देणें+उदक+प्रवाहें=दानजलाच्या ओघें करून. १६. गोदेच्या प्रवाहापेक्षां दानजलाचा प्रवाह मोठा–असा भावार्थ. १७. कोण्या एका मंदिरीं. १८. ब्राह्मणवेष्टित. १९. कुतूहल. ['**कौतुकं** मङ्गले हर्षे हस्तसूत्रे कुतूहले' इति शाश्वतः.] २०. श्रीपति. २१. नारदातें. २२. ज्याचीं चरणकमळें. २३. सौभाग्यास पात्र. २४. लक्ष्मीच्या हस्तातें. (पादसंवाहनानें लक्ष्मीचे हस्त धन्यता पावले–असें तात्पर्य) [शय=हस्त. 'पंचशाखः शयः पाणिः' इत्यमरः; 'शयः शय्याहिपाणिषु' इति मेदिनी.] २५. स्वयशोमृताचीं पात्रें. २६. इतिहाससहित पुराणें. (श्लो० २८.) २७. निजहासें स्वांत (अंतःकरण) हरुनि जे नेती त्या स्त्रीशीं प्रभु विनोद करि. २८. उत्तम धर्म. २९. प्रकृतीहून पर जें मह (ब्रह्म तेज) याचें ध्यान. ३०. अत्यंत. ३१. भक्तीनें. ३२. चरणपूजा. ३३. ज्याच्या पदीं. ३४. घर, शेतवाडी, देह, स्त्री आणि वित्त.

कोणासीं करि [1]विग्रहासि, [2]कवणासीं [3]संधिला [4]भाव हा
कोठें दाखवि, सन्मुनी निरखि त्या लीला [5]सुलाभावहा. ॥ २५
[6]कोठें श्रीरामकृष्ण प्रभुवर [7]सदयस्वांत ते [8]भाउ, [9]कास
प्रेमानें आपुली ज्या धरिलि [10]सुभजकीं, त्यांचिया [11]भावुकास ।
होते चिंतीत, कीं जे भजति जन तयां ताप दासां गड्यांतें
बाधों द्यावा न, आले शरण [12]भव तराया पदा [13]सांगड्यांतें. ॥ २६
[14]कोठें अत्युत्सवानें करि यदुपति तो पुत्रपुत्रीविवाहां,
दे हर्षें जांवयातें [15]मणिकनकरथस्तोम [16]सद्वस्ति [17]वाहां; ।
कन्या जाति स्वगेहाप्रति पतिसह, तैं [18]वृष्णिभूशक्र पाणी
आणी नेत्रास, कोठें बहु धरुनि [19]तयां पोटिशीं [20]चक्रपाणी. ॥ २७
[21]इष्टापूर्तींच [22]कोठें यदुपति मुनिनें देखिला, [23]यादवांहीं
कोठें युक्त प्रभू तो करि वनिं [24]मृगया बैसुनी [25]साधुवाहीं; ।
व्हावा भाव प्रजांचा विदित म्हणुनियां [26]गुप्त [27]कोठें फिरे [28]हा,
लीला दावूनि ऐशा पुरवि वरद त्या [29]चिंतकाची चिरेहा[30]. ॥ २८
ऐसें पाहोनि वंदी मुनि विभुसि [31]म्हणे, '[32]योगमायाविलास
स्वामी! हे देखिले म्यां, [33]स्ववैभव सदया! या नता दाविलास; ।

---

१. संग्रामास. २. कोणा राजाशीं युद्ध करावें आणि कोणा राजाशीं स्नेह करावा असा विचार करीत आहे असें कृष्णास नारदानें पाहिलें. (श्लो० ३१.) ३. मैत्रीस. ४. विचार, प्रकार. ५. उत्तम लाभ देणाऱ्या. ६. 'कृष्ण कोठें रामाबरोबर भक्तांचें कल्याण चिंतीत होता इतकेंच मूळांत (श्लो० ३१) आहे. पण त्याच्या ऐवजीं पंतांनीं एक मोठा श्लोक घालून आपली विस्तारप्रियता व्यक्त केली आहे. ७. सकृपमनस्क. ८. दोघे भ्राते. ९. आश्रय. १०. ज्या सुभजकीं आपुली कास प्रेमानें धरिली त्यांचिया. ११. कल्याणास. १२. संसार तराया. १३. चरणरूप सांगडीतें. १४. श्लोक ३२ पहा. १५. मणि, सुवर्ण, रथ यांचे समूह. १६. उत्तम गज. १७. अश्वां. १८. यादवेंद्र. १९. त्या मुलींना. २०. या श्लोकांतही पंतांनीं वर्णनविस्तार केला आहे. २१. यज्ञयागादि कर्मीं रत. २२. श्लोक ३४ पहा. २३. यादवांनीं युक्त. २४. पारध. २५. सुशिक्षित अश्वावर=सिंधुदेशसंभव अश्वावर. (श्लोक ३५.) २६. गुप्तरूपानें. २७. श्लो० ३६ पहा. २८. हा कृष्ण. २९. नारदाची. ३०. चिर+इहा=चिरकाळची+इच्छा. ३१. श्लोक ३७-९३ पहा. ३२. योगमायेचे खेळ. सोळा हजार घरांत कृष्ण भिन्नभिन्न प्रकारांनीं नारदाच्या दृष्टीस पडला हेच योगमायेचे विलास (खेळ) होत. ३३. आपलें ऐश्वर्य.

झालों तूझ्या[1] प्रसादें सफळतनु मनुष्यांत देवासुरांत,
स्वर्धेनूच्याहि[2] ऐवंविध[3] सुख न कधीं भेटि दे बासुरांत. ॥ २९

आहे तूझ्या[1] प्रसादेंकरुनि निरंत[4] हा सर्वदा दास नामीं,
यासाठीं पावला न भ्रम, हरि! करितों कीं पदोपासना[5] मी, ।
जें ऐसें योग[6]मायाविलसित भुलवी योगियांतेंहि[7], राया!
भासे बा! सेवकांच्या[8] सुमतिस न शके सर्वथा तें हराया[9]. ॥ ३०

आज्ञा दे मजला भवच्छुचियशःपीयूषमग्नें[10] सितें[11]
शीतें मीं भुवनें विलोकिन, लया तापत्रया[12] नेसि तें ।
तूझें[1] गाइन सच्चरित्र, अमृता या सेवितां दोंदिलें[13]
झालीं होतिल सन्मनें[14], निजपदीं त्वां ज्यांसि 'नांदों दिलें[15].' ॥ ३१

हांसोनि प्रभु त्या मुनिप्रति म्हणे, 'पुत्रा! गृहस्थाश्रम
स्पर्शेना बहु सेवितां सुखद हा सर्वा गृहस्था, श्रम, ।
या धर्मीं[16] अनुमोदितोंहि कथितों कीं मीच वेदा वितों[17],
आंगें यापरि आचरोनिहि जना ऐसें कवे[18]! दावितों[19]. ॥ ३२

मन्नामें मच्चरित्रें मदुदितनिगमां[20] मत्पदां जे[21] भजा ते,
स्पर्शा[22] स्वप्नीं तुम्हीही न विरसविषयां कीं विटंबोनि जाते, ।
त्यांतें[23] वत्सा! कसें हें स्वजनवशनिजस्वांत[24] ओपीन? माया-
स्वामी मी, स्वस्थ हो, हे तुज पदयुगुळी[25] नित्य सोपी नमाया'. ॥ ३३

---

१. येथें वृत्तसुखार्थ ऱ्हस्व स्वर दीर्घ केला आहे. अशीं उदाहरणें पंतांच्या काव्यांत विरलतम आढळतात. २. कामधेनूच्याहि वासुरांत.. ३. अशा प्रकारचें. ४. रममाण. ५. चरणसेवा, पादसेवन. ६. अघटितघटना कार्य, असंभाव्य गोष्टी घडविणें. ७. जें मायाचरित योग्यांस भुलवितें=जें योग्यास देखील कळत नाहीं, जें पाहून योगी देखील भ्रम पावतात. ८. भक्तांच्या. तें योगमायाविलसित भक्तांच्या मतीला हरण करण्यास समर्थ नाहीं असें वाटतें, कारण तुझ्या पादसेवनानें आम्हीं तुझे भक्त मायाभिज्ञ होतों—असा भाव. ९. हरण कराया. १०. तुमच्या शुद्ध यशोमृतांत बुडालेलीं. ११. अतएव शुभ्रें आणि शीतळें अशीं भुवनें. १२. मागें पृ० ६२ टीप २० पहा. १३. पुष्टें. १४. साधुचित्तें. (श्लोक ३९.) १५. सेवावयास राहूं दिलें. १६. या गार्हस्थ्यधर्मा. १७. प्रसवतों. १८. हे अतीतानागतसर्वज्ञ! हे सर्वार्थदर्शी पंडित! १९. स्वतः आचरण करून लोकांना शिक्षण देतों. २०. म्यां सांगितलेल्या वेदांतें. २१. जे तुम्ही नामादिकांतें भजतां. २२. स्पर्श करीत नाहीं. २३. त्या विरस विषयांतें. २४. स्वभक्ताधीन स्वीयमन. २५. पादद्वय.

ऐसा सत्कारिला हो! मुनिवर, जनकें ज्यापरी तोकें[1], लीला
दावूनि श्रीमुकुंदें, हरि हरिमहिमा वर्णितां तो के[2]लीला. ।
गेला देवर्षि[3] गात प्रभुयश सुकविस्वांतसर्वस्व[4], साहे
स्वर्वल्लीसीं[5] सुधेसी पळभरि न तुला[6] कीर्ति [7]गंगास्वसा हे. ॥ ३४

---

## अध्याय सत्तरावा.

सद्वृत्तद्युतिदारहार[8] धरुनि प्रेमें असावें गळां
रात्रीं, सोडुनि होय हो! विभु उषःकाळीं[9] तयां[10] वेगळा; ।
आत्मध्यान[11] करी करीशगतिद[12] श्रीकांत कांताकृती[13],
ज्याच्या चिंतिति चित्तचोरचरणा[14] हृत्पातकांता[15] कृती[16]. ॥ १
वि ध्युक्त[17]स्नानसंध्याजपशिवचरणब्रह्मगोपूजनातें
[18]संपादी, आन्हिक[19] श्रीयदुकुलपतिचें पुण्य ओपूं जनातें; ।
गोदानें बद्वबद्व[20] प्रतिसदनिं[21] सदा दे, धरी शुद्ध वास[22]-
स्रग्भूषा, सात्यकीस[23] स्वरथिं बसुनि घे सत्प्रिया[24] उद्धवास. ॥ २

---

१. मुलगा, बालक. २. पापाला. ३. नारद. ४. ज्ञात्याच्या अंतःकरणांतील मुख्य धन. ५. कल्पलतेसीं. ६. समता, बरोबरी. ७. गंगेची बहीण. या श्लोकांतील वर्णनास मूळांत आधार नाहीं. ८. चांगलें वृत्त (वर्तन) आणि द्युति (तेज) ज्यांचें असे दार (स्त्रिया) तेच हार (माला). हारपक्षीं चांगली वर्तुल प्रभा ज्यांची ते सद्वृत्तद्युति. या अध्यायांत कृष्णाचा आन्हिकाचार, दूतमुखें कारागृहवासी नृपांची प्रार्थना, नारदागमन, कृष्णनारदभाषण, धर्मराजसूययज्ञ आणि पांडवांचें कृष्णास आमंत्रण असे विषय आहेत. यांत पंतांनीं वर्णनसंकोच केला आहे. मूळांत ४७ श्लोक असून त्यांचा सारांश अवघ्या २० श्लोकांत आणिला आहे. ९. पहांटेस. १०. त्या रुक्मिणी-प्रभृति वनितांपासून वेगळा होई. ११. एक, अनन्य, अव्यय अशा आत्म्याचें चिंतन, ब्रह्मचिंतन. १२. गजेंद्राला गति देणारा. १३. सुंदर आकृति (मूर्ति) ज्याची असा. १४. मन हरण करणाऱ्या पादांस. १५. हृदयस्थपातकाच्या नाशा. १६. धन्य मुनि योगी भक्त इत्यादि. १७. विधिपूर्वक. हें स्नानादि कर्मांचें विशेषण. स्नान, संध्या, जप, शिवचरण, ब्राह्मण, गाई, यांचें पूजन. १८. करी. १९. स्नानसंध्यादिक नित्यकर्म. आन्हिक श्रवण केलें असतां पुण्य देऊं. २०. बद्व म्हणून एक संख्या आहे ती १४१३७८४ (चौदालक्ष तेराहजार सातशें चौऱ्याशीं) अशी गणिली आहे. यास आधार 'चतुर्दशानां लक्षाणां सप्ताधिकशतांशकः । बद्वं चतुरशीत्यग्रसहस्राणि त्रयोदश ॥'. २१. प्रत्येक घरांत म्हणजे सोळाहजार आठशें घरांत. २२. वसनें, वैजयंती इत्यादि माळा आणि भूषणें. (श्लो० ११.) २३. श्लोक १५ पहा. २४. साधूंच्या प्रिय अशा.

ऐसें एकाचिकाळीं **य**दुतिलक निघे सर्व गेहांमधूनी,
प्रस्थानीं स्यंदनस्थ प्रियद[१] निरेखिला[२] आदरानें वधूनीं; ।
व्याजें[३] मागें विलोकि, स्मितमुखललना चित्त चोरूनि नेत्यां[४]
जाया लीलाकटाक्षें शकति वश करूं सुंदरीही न नेत्यां[५]. ॥ ३
मूर्ती सोळासहस्र त्रिभुवनपतिच्या पावती ऐकता[६], तें
त्याचें त्या मात्र ठावें, कुतुक कळविलें हें **शु**काच्याचि तातें[७]; ।
बैसे जाऊनि सर्वेश्वर वरद धणी तो सुधर्मासभेंत[८],
श्रीशाली[९] **वृ**ष्णिवीरव्रज सकळ तदा लोपती तत्प्रभेंत[१०]. ॥ ४
गाती सुस्वर गीतरीतिनिपुण **श्री**शा असे, नाचती
आनंदें नटनर्तकीगण[११], कळा[१२] नाकीं[१३] असेनाच ती, ।
वाद्यें[१४] वाजविती अभिज्ञ[१५] विविधें, **श्री**च्या महासारसा[१६]
देवा अर्पिति तेथ नर्मसचिव स्वप्रेमहासा[१७] रसा. ॥ ५
ज्ञाते[१८] ब्राह्मण शास्त्रयोनि[१९] जवळी श्रुत्यर्थ वाखाणिती,
वाक्यें जीं श्रवणादृताखिळमनोमोहाद्रिला[२०] खाणिती; ।
कोणी सिंधुरवींदुवंशजमहीशांचीं[२१] यशें वानिती,
त्यांतें सच्चरितामृतांबुधिविभुश्रोत्रें[२२] सुधा[२३] मानिती. ॥ ६
तेथें[२४] एक अदृष्टपूर्व[२५] पुरुष द्वास्थें[२६] पुढें आणुनि
श्रीकृष्णासि निवेदिला; अभिमत स्वस्वामिचें जाणुनि, ।
सांगे आगमनप्रयोजन, पद प्रार्थूनि, तो दूत, 'मी
आलों मागधरुद्ध[२७] भूप बुडती ते दीनबंधू[२८] ! तमीं[२९]. ॥ ७

---

१. प्रिय देणारा. (कृष्ण.) २. पाहिला. ३. कांहीं तरी मिषानें. ४. चोरून नेणाऱ्या. ५. नायक कृष्ण त्यास. ६. जो कृष्ण षोडशसहस्रदेहधारी होता तो एक झाला. ७. शुकतातें=व्यासें. ८. सुधर्मानामक सभेंत. (श्लोक १७.) ९. तेजःपुंज. १०. त्या कृष्णाच्या तेजांत. ११. नर्तक आणि नर्तकी यांचे समूह. १२. ही नर्तनगानकला. १३. स्वर्गांत. १४. मृदंग, वीणा, मुरज, वेणु, ताल इत्यादि वाद्यें. (श्लोक २०.) १५. वाद्यविद्यानिपुण. १६. अत्यंत श्रेष्ठ अशा. १७. क्रीडासहाय जो प्रेमरस त्यातें. १८. वेदवेदांतपारंगत आणि श्रौतस्मार्तकर्मनिरत असे. १९. शास्त्र आहे योनि (उत्पत्तिस्थान) ज्याचें असा श्रुत्यर्थ (वेदार्थ). २०. श्रवणाला आदृत म्ह० श्रवणतत्पर जे अखिल लोक त्यांचा मनोमोहरूप अद्रि (पर्वत) त्याला. २१. समुद्रांत राहणारे राजे, रविवंशांतील व चंद्रवंशांतील राजे, त्यांचीं. २२. सच्चरितामृताचा समुद्र जो विभु कृष्ण त्याचीं श्रोत्रें (कर्ण). २३. त्या राजयशांतें सुधारूप मानिती. २४. त्या सुधर्मासभेंत. (श्लोक २२ पहा). २५. पूर्वीं न पाहिलेला. २६. द्वारपाळानें. २७. जरासंधानें कोंडलेले राजे. २८. हे दीनबंधो. २९. दुःखसमुद्रांत.

राजे दिग्विजयीं[1] रणीं लववितीं[2] चापा, न जे मस्तका,
तेथें जोडिति [3]कीर्तिकामुक शरा न [4]क्ष्मापती हस्तका, ।
[5]मानी वीससहस्र आठशत जे जिंकूनि युद्धीं बळें
[6]दुर्गीं सर्वहि कोंडिले [7]मगधभूपाळें [8]महोग्रें खळें. ॥ ८
ऐसे प्रार्थिति दी[9]नबंधुचरणा! ते हे [10]सुभद्र [11]क्षणं,
[12]स्वांतीं चिंतिति जे [13]प्रपन्न करिसी तूं मात्र [14]तद्रक्षण; ।
पूर्वी वांचविला [15]गजें, [16]व्रजेंहि या [17]पूर्णावतारीं, न हो
तूझा दासजन [18]श्रमी, म्हणसिहि '[19]प्रव्हासि तारीन, हो!' ॥ ९
[20]विद्याश्रीदोर्बळांनीं मद बहु चढला, जाहलों अंध नीच,
[21]व्यामोहें तूज देवा! विसरुनि पडलों या अशा बंधनींच, ।
आम्हां [22]अस्मद्विधी दे उचितफळ, न दे हा जरासंध [23]कारा,
कूपाला दोष कैंचा नुघडुनि नयनें पाडितां [24]अंधकारा? ॥ १०
रक्षाया दीनबंधो! [25]प्रणतजनविपन्नाशका! पाव साचा,
[26]त्यां भूपां चातकांला बहुत भरंवसा [27]त्वत्पदापावसाचा; ।
मातें [28]संप्रेषिलें कीं त्रिजगदभयदा! दान हें माग [29]धात्या
विश्वाच्या, यादवेंद्रा! द्रव किमपि नसे निर्दया मागधा त्या.'॥ ११
ऐसें दूत वदे, अशांत उतरे तेथें [30]वशी [31]नारद
[32]तापध्वांतविनाशदक्ष, हसती ज्याचे [33]शशीना [34]रदें; ।

---

१. जरासंधानें दिग्विजय केला तेव्हां. २. जे राजे चापा लववितीं मस्तका न लववितीं. ३. कीर्तीची इच्छा करणारे शरा जोडिति न हस्तका. ४. भूपति. ५. अभिमानी. ६. गिरिव्रज नामक किल्ल्यांत. ७. जरासंधानें (श्लोक २४.) ८. महाभयंकरानें. ९. दीनांचे बंधु असे चरण ज्याचे तो. (संबोधन.)१०. कल्याण करणारे, सुभग. (भूप.)११. क्षणभर.१२.हृदयांत.१३.शरणागत. १४. चिंतन करणाऱ्यांचें रक्षण. १५. गजेंद्रमोक्षाची कथा सुप्रसिद्ध आहे. १६. गोकुळ. १७. या कृष्णावतारीं. १८. श्रमयुक्त. १९. नम्रासि. २०. विद्येच्या, लक्ष्मीच्या व बाहूंच्या बळांनीं. २१. भ्रमानें. २२. आमचें दैव. २३. बंदिशाळा. २४. जो उपजत कवि आहे त्याच्याच प्रतिभेला अशा समर्पक आणि प्रौढ कल्पना सुचणार आहेत. २५. शरणागतजनांच्या विपत्ति दूर करणाऱ्या देवा. २६. ते भूप चातक त्यांस. २७. तुझे चरण पाऊस यांचा. २८. धाडिलें. २९. उत्पादका. ३०. इंद्रियनिग्रहवान्. ३१. श्लोक ३१ पहा. ३२. तापत्रयरूप अंधकाराच्या नाशाविषयीं समर्थ. ३३. शशी+इना=चंद्रसूर्यास. ३४. दांत.

तो पुण्योदयलभ्य[1] सभ्यसहितें[2] सत्कारिला[3] सन्नतें[4],
सद्भाग्यद्वय[5] बैसलें सुखद जें अन्योन्य आसन्न[6] तें. ॥ १२

देवर्षीस म्हणे **मुकुंद**, ‘तुमच्या या दुर्लभा आगमीं
झालों सान्वय[7] आज भाजन[8] सुखा, लोकीं महाभाग[9] मीं; ।
आतां काय असे अशेषकुशलज्ञानाचिया[10] अर्णवा!
सेवा सांगुनि वृष्णिवैभव[11] विभो! विश्वाननीं[12] वर्णवा[13]. ॥ १३

ब्रह्मांडीं तुमची गति द्विजपते! सर्वत्र अव्याहता[14],
तूं लोकां सकळांहि पाहसि[15], तसा न ब्रध्नही[16] पाहता, ।
अस्मन्मानसिं[17] लोकवृत्त अवघें युष्मत्प्रसादें[18] ठसे,
आधार त्रिजगन्मनोरथफळा[19] स्वामी[20]! असा देठसे[21]. ॥ १४

सांगा **पांडववृत्त**, काय करिती? आहेत कीं ते सुखें?
व्हावें तत्कुशळ प्रभो! अमृत या कर्णासि युष्मन्मुखें; ।
जाणा सर्व तुम्हीं, परंतु कथितों बाधे तृषा न क्षुधा,
सर्वज्ञा! विबुधा! असे स्वजनसद्वार्ताचि[22] आम्हां सुधा.’ ॥ १५

देवर्षि प्रभुला म्हणे, ‘**यदुपते**! या बोलण्याच्या रसें
मोहे मानस, हा न सन्नत! मुले, हें जाणतों फारसें, ।
देवा! **पांडववृत्त** जें पुससि तें सांगावया आज गा!
आलों, आइक, सांगतों कुशल मी आनंदवाया जगा. ॥ १६

**धर्में** पाठविलें मला तुजकडे आमंत्रणाकारणें,
नेत्रांचें पुरवीं, स्वपादकमलें दावूनियां, पारणें; ।

---

१. पुण्योदयानें प्राप्त होणारा. २. सभासदांसहित. ३. अभ्युत्थानपूर्वक वंदन करून आणि दिव्यासनावर बसवून पूजिला. ४. साधुवंदित (कृष्णानें). ५. संतांचीं मूर्तिमंत भाग्यें त्यांचें द्वय म्ह० नारद आणि कृष्ण. ६. जवळ जवळ. ७. कुलासहित. ८. सुखास पात्र. ९. मोठा दैववान्. १०. सर्व कुशल आणि ज्ञान याच्या समुद्रा! हे नारदा! हें ‘पर्यायोक्त’ आहे. ११. यादवांचें वैभव. १२. जनमुखांनीं. १३. वर्णन करावा. १४. अकुंठित. १५. येथें एकवचनांत प्रयोग करून मागें पहिल्या चरणांत व पुढें तिसऱ्या चरणांत बहुवचनांत प्रयोग आहे ही गोष्ट चिंतनीय होय. १६. सूर्यही. [सूर्याला ‘लोकचक्षु’ अशी संज्ञा आहे हें लक्षांत असावें.] १७. आमच्या मनांत. १८. तुमच्या कृपेनें. १९. तीन जगतांच्या मनोरथरूप फळाला. २०. आधार आहां. २१. देठांसारखे. २२. स्वभक्तांविषयीं उत्तम वार्ता.

न्याया सिद्धिस राजसूयमख ये, हें प्रार्थिलेंसे तुला
लोकेशास भजन्मनोरथमहापाथोधिच्या[1] सेतुला. ॥ १७
स्वराजसूयें पदतोयजा[2] या इच्छी मनीं पांडव[3] तो यजाया, ।
सद्भक्तकामाप्रति पूरवा हो! यशोमृतांभोनिधिपूर[4] वाहो. ॥ १८
येतील द्विज देव भूपति, मखीं हे पाय शोभा जना
दावूनि प्रभु! नाशितीलचि जगत्तापा[5] यशोभाजना[6]! ।
ऋत्विग्गृष्टि[7] निवेल, तृप्त करितां दुग्धें असाधूरगा[8]
ती चावेचि जसा द्विजातिनयना[9] झोंबे असा धूर[10] गा." ॥ १९
ऐसें कार्यद्वयाचें[11] श्रवण करुनियां वृष्णि[12] कोणी, 'न यज्ञा
जावें, जावेंहि,' कोणी म्हणति, विभु पुसे उद्धवा हें नयज्ञा. ।
नीतिज्ञांमाजि भक्तप्रवर कुशल तो सर्वलोकीं अशाला
सभ्यांमध्यें विचार प्रभु वदवितसे वाढवाया यशाला. ॥ २०

---

## अध्याय[13] एकाहात्तरावा.

देवर्षीच्या[14] मनांत प्रथम यदुवरें यज्ञकार्यास[15] जावें,
सभ्यस्वांतीं[16] प्रपन्नक्षितिपसमवनीं[17] कीर्ति आधीं सजावें, ।
कार्यें दोन्हींहि दासामरतरुसि[18] मतें[19] तें कळे उद्धवास,
प्रार्थी तो प्राज्ञ[20] ऐसें सदभिमत जया मानवे श्रीनिवास. ॥ १

---

१. भक्तांच्या मनोरथरूप महासागराच्या सेतूला (आधाराला-कृष्णाला). २. पादकमलातें. ३. धर्मराज. ४. यशःसुधासागराचा पूर. ५. जगताच्या त्रिविधतापाला. ६. हे यशोभाजना (यशाच्या पात्रा). ७. ऋत्विज् हीच गृष्टि धेनु. ८. असाधु+उरगा=दुष्ट+सर्पाला. ['उरगः पन्नगो भोगी जिम्हगः पवनाशनः' इत्यमरः । उरसा गच्छतीति उरगः । उरानें जो गमन करतो तो उरग.] ९. ब्राह्मणाच्या नेत्रांस. १०. यज्ञकुंडांतील धूर. ११. जरासंधानें कोंडलेले राजे सोडविणें हें एक कार्य आणि धर्माच्या घरीं यज्ञास जाणें हें दुसरें कार्य, या कार्यद्वयाचें. १२. यादव. १३. या अध्यायांत पुढील कथाभाग आहे:–'नारदाचें ऐकोनि वचन । इंद्रप्रस्था कृष्णागमन । देखोनि पांडवीं आनंदोन । उत्साह पूर्ण पैं केला ॥ ६ ॥ राजसूयमिषें हरी । पांडवां धार्तराष्ट्रां माझारीं । कलह रचून भूभार उतरी । अधर्मकारी संहरुनी ॥ ७ ॥ तेथ मखारंभीं जरासंध । मखांतीं नाश पावेल चैद्य । भीमवचनें गांधार क्षुब्ध । धरील विषाद कुलहंता ॥ ८ ॥ [हरिवरदा]. १४. नारदाच्या. १५. धर्माच्या राजसूययज्ञाला. १६. सभ्यांच्या मनीं. १७. प्रपन्न+क्षितिप+समवनीं=शरणागत राजांचे रक्षणीं. १८. भक्तकल्पतरूस (कृष्णाला) १९. मान्यें २०. उद्धव.

'आधीं संतोषवावा मुनिवरवचनें धर्म देवा ! सवातें[१]
न्याया सिद्धीस, मारी मग मगधपती[२], शर्म[३] दे वासवातें[४], ।
जिंकावे सर्व राजे तरिच मख घडे, जों जरासंध नाहीं
मेला, तों न प्रपन्नक्षितिपति[५] सुटती, जे श्रमी बंधनांहीं. ॥ २
ज्याच्या[६] अक्षौहिणीचें शत भय वसवी निर्जरांच्या[७] अनीकीं,
आंगीं नागायुतांचें[८] बळ मगधपती वीर मोठा जनीं कीं, ।
विप्राचा दास, दाता अभिमतसकळांवस्तुंचा, सत्यसंध[९],
न्यायें पावेल कैसा परिभव समरीं तो जरापूर्वसंध[१०] ? ॥ ३
घ्यावा ब्राह्मणवेष[११] भीमहि, गृहा जावें, मुकुंदा ! तया
मागावें मग दानरूप समर[१२] द्वंद्वाख्य[१२] त्या दातया, ।
सान्निध्यें तुझिया वृकोदर जया[१३] पावेल, अन्यायशा[१४]
युक्ती भासति या, परंतु न कधीं देतील अन्या[१५] यशा. ॥ ४
बाळातें खेळवीतां नरवरवनिता[१६] गाति तूझ्या यशातें[१७],
त्या गोपी शंखचूडप्रमथन[१८] अवन स्वीय देवा जशा तें, ।
हस्तीचें[१९] जानकीचें यदुकुळपतिचें[२०] संकटीं मुक्तिदान
ज्ञानी आम्हीहि गातों तव चरित जसें सद्गतीचें निदान[२१]. ॥ ५
बव्हर्थप्रद[२२] होइल क्रतु[२३], तुझ्या मूर्ती महाविप्र ज्या
वेदाज्ञेकरुनि प्रवर्तक, सुखी देखोनि व्हावि प्रजा, ।
अत्याश्चर्य मनीं शतक्रतुसही[२४] वाटेल बा ! पक्ष या
धर्माचा धरितोसि, तीर्थपद तूं नेशील पाप क्षया.' ॥ ६

---

१. यज्ञातें. २. जरासंध. ३. सुख. ४. इंद्रातें. ५. शरणागत राजे. ६. ज्या जरासंधाच्या (मगधपतीच्या.) ७. देवांच्या समुदायांत. ८. दहासहस्र हत्तीचें. (श्लोक ५.) ९. सत्यप्रतिज्ञ. (संधा=प्रतिज्ञा). १०. जरा शब्द पूर्वीं ज्याच्या असा संध म्हणजे जरासंध. ११. ब्राह्मणाचा वेष आहे ज्याचा असा जो भीमसेन त्याला घेऊन जरासंधाच्या गृहाला जावें. (श्लो. ६–७.) १२. द्वंद्वनामक समर (युद्ध). १३. विजया. १४. अन्याय केल्या सारख्या. १५. दुसऱ्या युक्ति. १६. राजांच्या स्त्रिया, देवी, मागध राजानें कारागृहांत ठेविलेल्या राजांच्या देवी. १७. जरासंधवध आणि स्वपतिमोक्षण अशा यशातें. (श्लोक ९.) १८. बृहद्दशम (पूर्वार्ध) अध्याय ३४ पृ० १०३ पहा. शंखचूड हा शापानें राक्षस झाला आणि वृंदावनांत गोपींचें हरण करूं लागला, तेव्हां त्या गुह्यकाला कृष्णानें मारिलें. १९. गजेंद्राचें. गंडकीजळांत नक्राला चक्रानें तोडून गजेंद्राचें मोचन केलें ही कथा सुप्रसिद्ध आहे. २०. कंसानें वसुदेव देवकी यांस बंदिशाळेंत अडकविले असतां त्यांचें मोचन कृष्णानें कंसाला मारून केलें या कथेचा संदर्भ येथें आहे. २१. आदिकरण. २२. बहु अर्थ देणारा. २३. यज्ञ. २४. इंद्रासहि.

[1]ऐसें ऐकुनि नारदादि म्हणती, 'प्राज्ञा! भला हो! भला,
बापा! हा [2]नयराजहंस तुझिया [3]सन्मानसीं शोभला, ।
साधो! उद्धव! तूं यथार्थचि, जगीं विद्वत्सभा मंडिता
झाली या तव [4]शुद्धवृत्तगुणवाङ्मुक्ताफळीं, पंडिता!' ॥ ७
त्या [5]भक्ताच्या विचारें त्रिभुवनपति तो देव वर्ते, जयाचें
जाणो तें बीज वन्हि श्वसनसख तसें सत्सुहृत्तेज [6]यांचें, ।
[7]अंबातातोग्रसेनाग्रजगुरुसमनुज्ञात [8]सापत्यजाया-
सेनानीं सिद्ध होय प्रभु [9]तदवनतांहीं त्रिताप त्यजाया. ॥ ८
आज्ञा दे नारदातें, मग [10]अजित म्हणे [11]भूपदूतास, 'जा, गा!
राजांला सांग ऐसें अभयवचन कीं, जाहला सिंह जागा; ।
बाळांच्या धर्षणातें करि, बहु न गणी [12]जो मदानें [13]निजागा,
त्या होय [14]त्राण कोठें यमवसतिविना प्राप्त विश्रांत जागा.' ॥ ९
गेला दूत [15]गिरिव्रजासि, हरिही भेटे [16]नृपा तो यदा,
झालें पांडवचातकां सुख, [17]पहातां त्या [18]कृपातोयदा; ।
प्राणप्राप्ति [19]सुखर्द्धि इंद्रियगणा, कीं गाय दे वासरा,
आले [20]पल्वलदीनमीन [21]विधिनें ते काय देवा सरा? ॥ १०
सामोरा [22]विप्रपौरानुजसह [23]नृपे ये, जेंवि मेघा [24]शिखंडी,
वंदी धर्मास भीमासहि हरि, नमितां जो [25]महाघाशि [26]खंडी, ।

---

१. हें उद्धववचन. २. नीतिरूप राजहंस. ३. उत्तम अंतःकरणीं; (पक्षी) मानससरोवरीं. हें रूपकाचें चांगलें उदाहरण आहे. ४. हे पंडिता! शुद्ध वर्तन, सद्गुण व वाणी, हींच मुक्ताफळें त्यांनीं विद्वत्सभा मंडित झाली. ५. उद्धवाच्या. ६. उग्रसेनाचें किंवा वसुदेवाचें. ७. देवकी, वसुदेव, उग्रसेन, बळराम, गर्गाचार्य यांस विचारून. ८. मुलें, स्त्रिया आणि सेना यांसह. ९. भक्तांहीं. १०. कृष्ण. ११. कारागृहवर्ती राजांकडून आलेल्या दूतास. १२. जो गज. १३. निज+आगा=आपल्या+अपराधाला. [आगस्=अपराध. 'पापापराधयोरागः' इत्यमरः.] १४. हा श्लोक मूळांतील १९ व्या श्लोकाशीं ताडून पाहिला असतां पंतांची करामत दिसून येईल. १५. जरासंधाच्या पुरास. १६. धर्मराजास. १७. येथें यतिभंग झाला आहे. यति 'हा' या ठिकाणीं असून तेथें शब्द तुटत नाहीं. १८. कृपामेघा (हरिला). १९. सुख+ऋद्धि=सुख+समृद्धि, संपत्ति. २०. पल्वलांतील दीन मासे. २१. दैववशात्. २२. विप्र+पौर+अनुज+सह=ब्राह्मण+नागरिकजन+धाकटे (भीमार्जुनादिक) भाऊ+सहित. (श्लोक २३.) २३. धर्मराज. २४. मयूर. २५. महापातकास. २६. नाशी.

भेटे मित्रास[1], मानी सुरमणिहि[2] यशस्वी[3] मणीसानु[4] ज्याला[5]
यच्छौचांभोग्रलाभप्रभुपद[6] नकुला दे धणी[7] सानुजाला[8]. ॥ ११

आलिंगूनि प्रमोद[9] स्वभजकहृदया दे जसा देववेल[10]
स्वर्गींचे जे अभीष्टप्रद परि न कधीं त्यां[11] तसा[12] देववेल[13], ।
तो साक्षात्तारकांचा पति अमृतकर स्पर्शला चंद्र कांत-
श्रीचा [14]वीतत्रिताप द्रवति बहु जन स्वच्छ ते चंद्रकांत. ॥ १२

इंद्रप्रस्थप्रवेशीं हरिवरि करिती कन्यका वृष्टि लाजीं[15],
झालीं पादांबुजें[16] तीं सुलभ, असुलभ स्वर्वधूदृष्टिला[17] जीं; ।
[18]स्त्रीभृंगी लुब्ध जाल्या रसनिधिभगवद्वक्त्रपाथोजपानीं[19],
यज्ञांनीं सत्तपांनीं बहुभव[20] बहुधा प्रार्थिला तो जपानीं. ॥ १३

[21]जीं दुष्प्रापा[22] पहातां लवति बहुदयापूर्णमेघा[23], तपा[24] तीं
विघ्नें, तैसा वधूंचा करितिच सहसा तो गमे घात पातीं[25] ।
[26]ऐशांच्या निर्मिल्यातें अकरुण[27] विधितें, पाळकाही निमीतें[28]
देती शाप स्त्रिया जें तळतळुनि[29] म्हणे योग्य मध्यस्थ[30] मी तें. ॥ १४

---

१. अर्जुनास. २. इंद्रहि. ३. येथेंही यतिभंग झाला आहे. ४. मेरुपर्वत. [मणि, मणी=रत्न, सानु=शिखर.] ५. ज्या कृष्णाला यशस्वी मानी. ६. यत्+शौच+अंभस्+अग्र+लाभ+प्रभु+पद= ज्या पदाचें शौचांभ भागीरथीतोय तोच मुख्य लाभ सर्वांस असें प्रभुपद. ७. सुखसमृद्धि. ८. सहदेवासहित नकुळाला. (श्लोक २७.) ९. आनंद. १०. कल्पलता. ११. देववेलांस. १२. तसा प्रमोद. १३. देतां येणार नाहीं. १४. गेला आहे त्रिविधताप ज्यांचा. हा श्लोक मूळाशीं ताडून पहावा म्हणजे यास पंतांच्या कल्पनाशक्तीनें कसें मनोहरत्व आणिलें आहे हें समजेल. १५. लाह्यांनीं. (श्लो० ३५.) १६. चरणकमळें. १७. देवकन्यांच्या (देवांगनांच्या) नेत्रांला. १८. पुरस्त्रिया त्याच भृंगी (भ्रमरी). १९. रसाचें स्थान जें भगवंताचें मुख तेंच पाथोज (कमळ) त्याच्या पानाविषयीं म्ह० भगवन्मुख पाहण्याविषयीं. २०. बहु जन्मपर्यंत त्या स्त्रियांनीं यज्ञ, सत्तप, जप, यांहींकरून प्रार्थिला होता. २१. जी डोळ्यांचीं पातीं. २२. दुर्लभ जो कृष्ण त्यास. २३. विपुल दयेनें भरलेला असा जो मेघ (ढग—कृष्ण) त्याला. २४. तपाचा घात विघ्नें जसा करितात तसा. २५. जीं (पातीं) दुष्प्रापा बहुदयापूर्णमेघा पहातां लवति तीं पातीं वधूंचा सहसा तो तैसा घात करितिच [असें] गमे; तपा [जैसा] विघ्नें [घात करिति]—असा अन्वय. २६. अशा पात्यांच्या. २७. निर्दय ब्रह्मदेवातें. २८. पात्यांची रक्षक निमी देवता आहे तीतें. २९. हा शब्द फार समर्पक योजिला आहे. ३०. मध्यस्थ मी असें कवि म्हणतो. हा श्लोक पंतांच्या प्रतिभाशक्तीचा व काव्यस्फूर्तीचा उत्तम दर्शक होय. यांतील कल्पनेस मूळांत आधार नाहीं. पंतांचें हें मनोहर आणि कल्पनाप्रचुर काव्य पाहून मार्मिक वा-

पौरस्त्री[1] म्हणती[2], 'अहो! सुकृत[3] या कृष्णांगनांचें[4] गणी
कोण प्राज्ञहि? याहुनी सुरवधूभाग्यें[5] बहू ठेंगणीं[6]. ।
झाली श्रीच अनेकमूर्ति पतिला सेवावया काय कीं
रूपें आणि गुणें तशाचि परम प्रेमाहि मानायकीं[7].'॥ १५

गेहीं[8] जाऊनि वंदी सविनय चरणा[9] तो, पृथेनेंहि भाचा
प्रेमें आलिंगिला हो! सुरपतिपति[10] तो पाठिराखा[11] इभाचा[12], ।
नेत्रांभोबिंदुवृंदेंकरुनि[13] भिजविलें ब्रह्म[14], हें चित्र पाहे
न प्रेमावासदासप्रणतिपर[15], न त्या भक्ति देचि त्रपा[16] हे. ॥ १६

'गृहा आला आत्मा प्रियगुरु जगन्नायक, वळीं[17]

चकांस महाकवि शेक्सपीयर याच्या सुप्रसिद्ध उक्तीची आठवण झाल्याशिवाय राहणार नाहीं:—

"As the imagination bodies forth,
The forms of things unknown, the poet's pen
Turns them to shapes, and gives to airy nothing,
A local habitation and a name."

याचें भाषांतर:—(ओव्या) "कवीसिं होतां काव्यस्फूर्ति, । प्रसन्नदृष्टीनें देखिती, । आकाश तैशी ही क्षिति, । वारंवार सप्रेमें. ॥ १ ॥ अमूर्त तरंग जे उठती मनीं, । तया प्रसादेंकरूनी, । मूर्तिमंत करिती कवनीं, । नाम, स्थळही देती त्यां ॥ २ ॥." [रा० सा० कृष्णाजी परशुराम गाडगीळकृत संसारसुख–प्रकरण १६, काव्य. पृ० २५३.]

१. नगरांतील बायका. २. श्लोक ३६ पहा. ३. पुण्य. ४. कृष्णस्त्रियांचें, मुकुंदपत्नीचें. (श्लो०३६.) पंतांचा हा श्लोक मूळांतील ३६ व्या श्लोकाशीं ताडून पहावा अशी वाचकांस सूचना आहे. ५. देवस्त्रियांचीं भाग्यें. ६. कमी. ७. मा (लक्ष्मी) तिचा नायक (पति) त्याचे ठायीं. ८.अंतःपुरांत. (श्लो० ३९.) ९. पृथेच्या चरणा. (श्लोक ४१.) १०. इंद्राचाही स्वामी. ११. पृष्ठरक्षक. १२. गजेंद्राचा. या पौराणिक कथेचा निर्देश मागें अनेक ठिकाणीं केला आहे. पंतांच्या काव्यग्रंथांपासून सहजगत्या अनेक चमत्कारिक गोष्टींची माहिती होऊन जाते, हा गुणविशेष ध्यानांत ठेवण्यासारखा आहे. नानातऱ्हेचे दृष्टांत देऊन पंतांनीं आपल्या काव्यास इतकें मोहकत्व आणिलें आहे कीं वाचणारास वाचण्याचे श्रम वाटत नाहींत. ही विषयनिरूपणाची तऱ्हा इतर कवींच्या ग्रंथांत आढळत नाहीं. सामान्य वाचकांस सहजरीत्या अनेक गोष्टींची माहिती करून देणें अथवा तशा गोष्टींचा निर्देश करून त्यांजविषयीं त्यांची जिज्ञासाबुद्धि जागृत करणें—हें उत्तम शिक्षक ग्रंथकाराचें काम—पंतांनीं उत्तम रीतीनें बजाविलें आहे. प्रस्तुत स्थळीं 'सुरपतिपति तो **पाठिराखा इभाचा**' असा उल्लेख करून गजेंद्राच्या पुराणप्रसिद्ध कथेकडे वाचकांचें लक्ष लागून तत्संबंधानें त्याची जिज्ञासा जागृत व्हावी अशी योजना केली आहे. १३. प्रेमाश्रूंच्या बिंदुसमूहानें. १४. साक्षात् ब्रह्म कृष्ण. १५. प्रेमाचा आवास (स्थान) जो दास (भक्त) त्यास प्रणति करण्याविषयीं तत्पर तो हें चित्र न पाहे=चित्र न मानी. १६. लज्जा. १७. इकडे या.

मुली हो! या याचे हृदयकमळीं पाय केवळा[1]' ।
असें सांगे सासू[2] न, परि नमिति स्वर्द्रुपद[3] ज्या
पहातां माहेरा विसरति सुभद्रा द्रुपदजा[4]. ॥ १७
कुंती कृष्णेसि[5] सांगे[6], 'सति! नृपतनये! ठावुकें तूज नातें,
बंधूचे दार[7] हे, कीं कमलमुखि! करीं यांचिया पूजनातें; ।
मूर्ता सिद्धीच लोकत्रयपतिहरिच्या भेटल्या, कीं न द्याया[8]
निर्भाग्या भेटि योग्या, यदुपतिकरुणांभोधिपत्नी[9] नद्या या.' ॥ १८
कृष्णा[10] कृष्णांगनांतें[11] सुरुचिरवसनीं[12] रत्नहारीं नगांनीं[13]
पूजी[14], भू[15] जीस[16] वानी[17] विबुधजनिं[18] जिच्या सद्गुणा मान गानीं[19]; ।
जैसी कीं कल्पवल्ली अमित अभिमत स्वाश्रितां वस्तु दे[20] वी[21],
तैसीच श्रीहरीची प्रियगुणभगिनी द्रौपदी सत्य देवी. ॥ १९
राहे धर्मासमीप स्वजनसह[22] हरी, नित्य याचे नवेंचि
प्रेमें सत्कार राजा करि, विभव[23] सुधी कां सुपात्रीं न वेंची[24]? ।
जो आत्मा निर्निमित्तें[25] प्रियसुहृद गमे भेटला नव्यसाची[26]
क्रीडे नैकप्रकारें[27] वनिं भवनिं[28] सखा घेउनी सव्यसाची[29]. ॥ २०

---

१. दृढ धरा. २. कुंती. ३. कल्पतरुरूप कृष्णपद. ४. द्रौपदी. ५ द्रौपदीस. ६. श्लोक ४२-४३ पहा. ७. रुक्मिणीप्रमुख स्त्रिया. ८. भेटि द्याया योग्या न [अशा] निर्भाग्या (अभाग्याला) मूर्ता सिद्धीच भेटल्या. या श्लोकार्धांतील कल्पना पंतांचीच आहे. ९. कृष्णरूप करुणासमुद्राच्या स्त्रिया अतएव ह्या नद्या. १०. द्रौपदी. ११. कृष्णस्त्रियांतें. १२. अत्यंत सुंदर वस्त्रांनीं. १३. अलंकारांनीं. १४. 'स्वकांतजननीनें प्रेरितां । द्रौपदी अर्ची कृष्णवनिता । रुक्मिणीप्रमुख ज्या समस्ता । पट्टमहिषी वरमान्या ॥ ४१ ॥ सौभाग्यद्रव्यें वृद्धाचारीं । हरिद्राकुंकुमांजनकस्तूरी । भांगीं सिंदूरभा साजिरी । मलयजपिंजरी विलेपनीं ॥ ४२ ॥ कुसुमग्रथनें वेणिका मौळीं । पुष्पमालिका सुपरिमळीं । सुमनहार कुचमंडळीं । आपाद रुळती मघमघित ॥ ४३ ॥ त्यावरी परिमळद्रव्यउधळा । श्रवणीं पौष्पज सुगंध भरिला । दशांग कर्पूरदीपमाळा । फळतांबूला समर्पिलें. ॥ ४४ ॥ इत्यादि उपचारीं रुक्मिणी । पूजिती झाली याज्ञसेनी । तंव जांबुवतीनें अर्जुनपत्नी । पूजी सन्मानी सुभद्रा ॥ ४५ ॥ सत्यभामेतें द्रौपदी । पूजिती झाली यथाविधी । सुभद्रा तैसीच पूजाविधी । कालिंदीतें समर्पी ॥ ४६ ॥ मित्रविंदेतें पूजी कृष्णा । सुभद्रा नाग्नजितीतें जाणा । द्रौपदी भद्रेच्या पूजना । करितां लक्ष्मणा येरी पूजी ॥ ४७ ॥' [हरिवरदा]. १५. पृथ्वी. १६. ज्या कृष्णेला. १७. वर्णी. १८. देवलोकांत. १९. गाण्यांत. २०. देते. २१. प्रसवते, उत्पन्न करते. २२. सानुग, ससैन्य, सहामात्य, सभार्य–इत्यादि. २३. ऐश्वर्य. २४. खर्ची. २५. कारणावांचून. २६. नवासाचि. २७. अनेक प्रकारांनीं. २८. घरांत. २९. अर्जुन. (श्लोक ४६.)

## अध्याय बाहात्तरावा.

बैसे[1] राजा[2] सभेंत स्वजनसह, निजाराध्यपादा[3] सहाया
कृष्णा लोकैकनाथा भजदमरनगा[4] वृष्णिपा[5] दास[6] हा या[7] ।
प्रार्थी कीं, 'राजसूय क्रतु[8] करुनि तुझ्या म्यां यजाव्या विभूती[9]
वांछावल्ली[10] करावी सफळ[11] तव पदें सद्वसंतें[12] विभू[13]! ती.' ॥ १

'तरोचि न बुडो' म्हणे 'मन गणीचना भी[14], तरी[15]
तुझें पदचि या मनोरथमहार्णवाभीतरी[16], ।
त्वदंघ्रि[17] पुरवि स्पृहा, परि रुचे न मंदा रती,
धरी जरि हरी बरी पुरवि काय मंदार[18] ती? ॥ २

जगीं म्हणविती किती सुजड[19] आपणा कामद[20],
प्रसिद्ध महिमा तुझा, तरि न सोडिती का मदें[21]? ।
जरी धवल शीतही धरिल काय कापूर ती
सुधांशुरुचि[22], मूर्खता भुवननायका! पूरती. ॥ ३

पाहो सर्व जग त्वदंघ्रियुगुलीभक्तिप्रभावा[23] सवीं[24],
लज्जा कौतुक हर्ष वाढवु भवत्पादप्रभा[25] वासवीं[26], ।
वाटेही तुज कीं भ्रमावहगुणा[27] अन्या कथा मद्यशा[28],
टाकू कर्णमुखीं[29] पिऊं[30] जन सुखें शुद्धामृता मद्यशा.' ॥ ४

ऐसें ऐकोनि बोले[31] वरदगुरु[32], 'अहो[33]! हे महाराज धर्मा!
आरंभा राजसूय क्रतु, उचित तुला सत्य तूं पुण्यकर्मा; ।
हे भ्राते भीमसेनार्जुन बळजलधी[34] विक्रमी मीहि माद्री[35]-
पुत्र त्वद्भक्त आणूं उचलुनि कथितों कांचनाद्री[36] हिमाद्री[37]. ॥ ५

---

१. या अध्यायांत 'जरासंधवध'वर्णन आहे. २. युधिष्ठिर. ३. भक्तांस आराध्य आहेत पाद ज्याचे अशा कृष्णा. ४. भक्तकल्पवृक्षाला. ५. यादवपतीला. ६. मी धर्मराज. ७. या कृष्णाला. ८. यज्ञ. ९. इंद्रादि देव तुझे अंश. १०. ती वांछावल्ली. ११. फलयुक्त, सार्थकरूप. १२. तुझा पाद हाच उत्तम वसंत यानें. १३.हे विभो. १४. भयातें. १५. नौका. १६. मनोरथरूप महासमुद्रांत. १७. तुझे चरण. १८. कल्पतरु. १९. कल्पतरु चिंतामणि इत्यादि. २०. इच्छित देणारे. २१. गर्व. २२. चंद्रप्रभा. २३. तुझ्या चरणद्वयाच्या भक्तीच्या प्रभावा. (श्लो० ५.) २४. यज्ञांत. २५. तुझ्या चरणाची कांति. २६. इंद्राचे ठायीं. २७. भ्रांति देणारा गुण ज्यांचा अशा अन्य कथा. २८. मद्यासारख्या. २९. कर्णरूप मुखांनीं. ३०. प्राशन करो. ३१. श्लोक ७-११ पहा. ३२.कृष्ण. ३३. या अर्धांत द्वितीय पुरुषाचें बहुवचन आणि एकवचन योजिलें आहे, हें प्रशस्त दिसत नाहीं. ३४. बळाचे सागर. ३५. नकुळसहदेव. ३६. मेरुपर्वत. ३७. हिमाचल.

बंधेना[१] मी कोणासहि न जरि दुर्भाव[२] शमला,
अशाही त्वां केलें सहज[३]गति लोभा वश मला, ।
विना शस्त्रोद्योगें अजित[४] भुवनीं तो वळविला[५],
प्रताप ज्ञात्याला नृपमुकुटरत्ना[६]! कळविला. ॥ ६

आज्ञाशस्त्रास[७] लंघी प्रबल नृप न दे जो करा[८] आज यागा
होय प्रत्यूह[९] ऐसा मज तंव न दिसे या जगीं, राजया! गा[१०]! ।
धाडावे दिग्जयार्थ[११] त्वरित सबळ[१२] हा भीम हा सव्यसाची,
हे माद्रीपुत्रयात्रा[१३] हरिल रिपुयशोजीवनद्रव्य[१४] साची. ॥ ७

नृपा! दावू नानाविधदुरितनाश[१५] क्रतु जगा,
स्वयें वर्णू तृप्त प्रमुदितमना शक्र तुज गा! ।
यशःक्षीरें[१६] सेंदूरगदरसुधागौर[१७] वजनीं
उणा होऊ गौरीजनकहि[१८], घडो गौरवें[१९] जनीं.' ॥ ८

श्रीकृष्णशब्द वरदायक तेधवांची[२०]
कृष्णेचिया सुखविती मति ते धवांची[२१]; ।
देऊनियां मग बरोबरि भीमसेना[२२]
पूर्वेसि[२३] पाठवि युधिष्ठिर भीमसेना. ॥ ९

यच्छस्त्रदावाग्निमुखांत[२४] अर्जुन द्विषन्नृपांचें बळ होय अर्जुन[२५], ।
त्या उत्तरे पाठवि सज्जना महीपती[२६] जयाचें जय सज्ज नामही. ॥ १०

संगरीं[२७] अपटु[२८] ज्यासह देवें[२९], श्रीशपादनत तो सहदेव ।
घेउनी सुमति[३०] भूमिधवाची[३१] जाय जीस अभिधान[३२] अवाची[३३]. ॥ ११

---

१. वश होईना. २. दुष्टपणा. ३. अनायासानें. ४. जिंकला जात नाहीं असा. ५. वश केला. ६. हे नृपश्रेष्ठा धर्मा! ७. आज्ञारूप शस्त्रास. ८. करभारास. ९. विघ्न. १०. गा राजया धर्मा. ११. दिग्विजयाकरितां. १२. सैन्यासहित. १३. माद्रीपुत्रांचें (नकुलसहदेवांचें) शत्रूवर स्वारी करणें. १४. रिपूचें यश, जीवन आणि द्रव्य. १५. अनेक प्रकारच्या पापांचा नाश. १६. यशोरूप क्षीरानें. १७. स+इंदु+उरग+दर+सुधा+गौर=इंदूसहित उरग (शेष) दर (शंख) सुधा(अमृत) तद्वत् गौर (शुभ्र) असा. १८. हिमाचल. १९. गुरुत्व. २०. त्या काळीं. २१. कृष्णेचिया धवांची= पांडवांची. २२. मोठें सैन्य. २३. दिग्विजयाकरितां पूर्व दिशेला. [मोरोपंत–सभापर्व–अध्याय २ गीति १– काव्यसंग्रह पृ० १३.] २४. ज्याच्या शस्त्ररूप वणव्याच्या मुखांत शत्रुरूप राजांचें सैन्य शुष्क तृणासारखें होतें. २५. शुष्क तृण. २६. राजधर्म. २७. युद्धाविषयीं. २८. असमर्थ. २९. इंद्रादि. ३०. आज्ञा. ३१. धर्मराजाची. ३२. नाम. ३३. अवाची=दक्षिण दिशा.

नृपाज्ञेनें झाला नमुनि हरिला सज्ज नकुल,
प्रतापें ज्याच्या भी खलबल, सुखी [1]सज्जनकुल, ।
[2]प्रतीचीला गेला, तइंच [3]विधुचें मंडल मळे,
[4]चमूधूलिस्तोमें [5]अहिपतिशिरीं भू डळमळे. ॥ १२
श्रीमत्पांडव चार मूर्त विभुचे दोर्दंडचि त्रासते
झाले दुर्जन भूप मानिति सुधी जे या न [6]चित्रास ते, ।
आले जिंकुनि दिक्चतुष्टय तिहीं जें वित्त संपादिलें,
तें धर्मा यशहि त्रिलोकपतिला त्या [7]सानुकंपा दिलें. ॥ १३
राजा मागध एकमात्र उरला जिंकावयाचा, ‘कसें
कीजे?’ धर्म म्हणे ‘भ्रमे मन महाचिंताबळें [8]चाकसें.’ ।
त्यातें सांगुनि आपणा शिकविली जी उद्धवें [9]सार धी,
झाला सिद्ध रिपुक्षया मृगवधा जाणो [10]हरी पारधी. ॥ १४
संगें घेऊनि भीमार्जुन [11]अजित निघे सर्व ते [12]विप्रवेश,
क्षिप्र [13]स्वारातिगेहीं करिति, [14]करिवनीं सिंह तेंवि, प्रवेश; ।
[15]ब्रह्मण्या मागधातें ठकविति धरुनि ब्राह्मणाच्याचि सोंगा,
‘[16]अर्थी आम्हीं [17]द्विजाती’ म्हणति ‘तुजकडे आज आलों असों, गा!॥
आलों [18]त्वत्सदनासि दूर अतिथी, कांहीं असे मागणें,
तें देतों म्हणसील तूं तरि वदों, आधीं वृथा सांगणें; ।
जे कीं [19]याचककामपूरक [20]कृती ज्ञाते उदार क्षिति
स्वर्लोकादि यशोमृतें [21]धवळिती, ते [22]त्यों सदा रक्षिती. ॥ १६

---

१. सज्जनसमुदाय. २. पश्चिम दिशेला. ‘प्रतीचीला गेला तइं अहिशिरीं भू डळमळे । चमूधूलिस्तोमें सलिलतनुचें मंडळ मळे’ असा पाठभेद आहे. सलिलतनुचें=चंद्राचें असा अर्थ समजावा. ३. चंद्राचें. ४. सेनेच्या धुळीच्या अतिशयानें. ५. शेषशिरीं. ६. आश्चर्यास. ७. त्या सकृपा (धर्मीला). [अनुकंपा=दया, कृपा.] ८. चाकासारखें. ९. श्रेष्ठ, उत्कृष्ट. [यादवांच्या सभेंत उद्धवानें जो मंत्र कृष्णास सांगितला त्याचें रहस्य कृष्णानें धर्मीला आतां सांगितलें.] १०. हरी हाच पारधी मृगवधा सिद्ध झाला. ११. कृष्ण. १२. ब्राह्मणवेष. क्षत्रियवेष पालटून ब्राह्मणचिन्ह धरून गिरिव्रजपुरास तिघेजण आले. १३. स्वशत्रूच्या घरांत. (जरासंधनृपमंदिरांत.) १४. गजाच्या वनांत. १५. विप्रनिष्ठ. १६. याचक. १७. ‘द्विजाति’ शब्द ब्राह्मण आणि क्षत्रिय यांचा वाचक म्हणून असत्य भाषण नव्हे. १८. श्लोक १८ पहा. १९. याचकांची इच्छा परिपूर्ण करणारे. २०. कुशल, धन्य. २१. शुभ्र करतात, शुचि करतात. २२. त्या वचनास.

जैसें [1]असाधूंसि [2]अकार्य नाहीं, किंवा [3]तितिक्षूंस असह्य कांहीं, ।
न [4]अन्य त्यां ज्यां [5]समदृष्टि मान्या, [6]अदेय तैसेंचि नसे [7]वदान्या. ॥ १७

झालें [8]सत्कुलजन्म, भाग्यहि बरें आलें, कळों लागलें,
कीं ऐसीं फळलें सुदुर्लभ फळें सत्पुण्य जें मागलें, ।
ठावें [9]अध्रुव देह [10]गेह न तरी जो सद्यशा सांचवी
साधूही म्हणती अशा [11]क्षितिभरा कां पांचवी वांचवी ? ॥ १८

विश्वामित्रास राज्य प्रथमचि दिधलें, जोडिती [13]ज्यांसि यत्नें,
दे वित्त स्वस्थचित्त [14]प्रभुवर विकुनि [15]स्वप्रियापुत्ररत्नें; ।
झाला चांडाळदास क्षितिपतितिलक [16]श्रीहरिश्चंद्र, सारे
गाती अद्यापि त्याचें यश कवि, [17]धवळी विश्व जो चंद्रसा रे! ॥ १९

अठ्ठेचाळीस गेले [18]दिवस, मग मिळे यत्कुटुंबा [19]अबन्न,
[20]प्राप्तातिथ्यर्थ तेंही सकळहि सरतां, जो न्हे [21]अप्रसन्न, ।
कां येना आपणातें [22]जगदसुख असीही करी खंति, देव-
स्तुत्य [23]ब्रह्मालया तो [24]सनिजजन सुखें पावला [25]रंतिदेव. ॥ २०

---

१. दुर्जनांला. २. करण्यास अयोग्य. (छळन, हिंसन, परपीडन इत्यादि सर्व कांहीं दुर्जनांला कार्य असेंच वाटतें.). ३. सहनशील. ४. परकीय. ५. समदर्शित्व. ६. द्यावयाचें नाहीं असें. ७. उदारांला. (श्लो० १९.) ८. सत्कुळांत जन्म. ९. अस्थिर. १०. घर. ११. पृथ्वीला भारभूत. १२. जीवंतिका देवी. १३. ज्या राज्याला. १४. हरिश्चंद्र. १५. तारामती आणि रोहित यांला. १६. श्लोक १९-२७ हे मूळांतील २१ व्या श्लोकाच्या आधारानें रचिलेले आहेत. मोरोपंतांस विस्तारभीरु मानणाऱ्या जनांस या श्लोकांवरून त्यांची विस्तारप्रियता दिसून येईल. १७. शुभ्र करी. १८. उपोषणांत, उपवास करण्यांत. १९. अप (पाणी) आणि अन्न. २०. प्राप्त+अतिथि+अर्थ=प्राप्त झालेल्या अतिथीच्या साठीं (तें उदक+अन्न सरलें तरी जो खिन्न होत नसे.) २१. खिन्न. २२. जगाचें दुःख. २३. ब्रह्मलोकास. २४. निजजनासहित. २५. रंतिदेव—हा मोठा शूर आणि परम धार्मिक दशपुरनृप होता. हा अरण्यांत तप करीत असतां पंचमहायज्ञ करून जेवणार इतक्यांत एका पाठीमागून एक असे तीन अतिथि आले; त्यांस अन्न देऊन भोजनास बसणार, इतक्यांत एक अतिशूद्र येऊन राजाजवळ अवशिष्ट असलेलें पाणी मागूं लागला, तें त्यास राजानें मोठ्या संतोषानें दिलें, आणि म्हणाला, 'परमेश्वरा ! मी तुजजवळ मोक्षगति न मागतां एवढेंच मागतों कीं मला दुःख भोगावें लागलें तरी पत्करलें पण प्राणिमात्र सुखी असोत.' तेव्हां ब्रह्मविष्णुमहेशादि देवांनीं प्रसन्न होऊन त्यास मागितल्याप्रमाणें सामर्थ्य दिलें. (भागवत—नवम स्कंध—अध्याय २१.) यानें यज्ञांत गवालंभ केल्यामुळें जी रक्तचर्मराशीपासून एक मोठी नदी उत्पन्न झाली तिला चर्मण्वती (चंबळा) असें म्हणतात. [मेघदूत—श्लोक ४५ टीका.]

भक्षूं संग्रह जाहल्यावरि अशा आशावशें[1] वांचले,
धान्याचे कण यत्कुटुंब मिळवी[2] षण्मास[3] जों सांचले, ।
कांहीं धान्य पुरेलसें शिजविलें तों भोजना उद्दल[4]
प्राप्तार्थीप्रति[5] देउनी विधिपुरीं[6] नांदे सुखें मुद्गल[7]. ॥ २१
पाठीस श्येन[8] लागे, म्हणुनि शरण ये, दावि बाधा कपोत,
त्राणार्थी अंक जैसा वरि निजगुरुचा पावला धाक पोत, ।
त्या श्येनास स्वमांस क्षितिपतिपति[9] दे दे न भीतां खगा तो,
स्वर्गा गेला महात्मा शिबि[10], अतुलयशा ज्याचिया शक्र गातो.॥ २२
ज्याचा सज्जनविश्वविश्रुतगुण[11] प्रल्हाद आजा बळी[12]
श्रीमद्भागवतांत निर्मळयशा जो साधु राजा बळी[13], ।

---

१. आशाबंधनानें. २. उंच्छवृत्तीनें मिळवी. ३. षष्(ट्)+मास=षण्मास, किंवा षड्मास. [कृ० शा० गोडबोलेकृत नवीन व्याकरण—कलम ३६-३९ पहा.] ४. वर मान करून येणारा अतिथि. ५. प्राप्त झालेल्या याचकाला. (मुनि दुर्वासाला.) ६. ब्रह्मनगरीं. ७. या मुद्गल नामक विप्राची कथा महाभारतांत आहे. [वनपर्व— अ० २६०-६१.] ८. ससाणा. ९. राजश्रेष्ठ. (शिबि.) १०. शिबि—हा सोमवंशीय उशीनरराजाचा ज्येष्ठ पुत्र. या राजाविषयीं दोन कथा महाभारतांत आहेत, त्यांतून पहिलीचा येथें उल्लेख आहे. ती अशी:—शिबिराजाची परीक्षा करण्याकरितां इंद्रानें श्येनाचें रूप घेतलें व अग्नीनें कपोताचें रूप घेतलें. नंतर श्येन आपल्या पाठीस लागला आहे अशा मिषानें कपोत औशीनर राजाजवळ आश्रयार्थ आला. त्यास आश्रय मिळाला हें पाहून 'माझा भक्ष्य मला दे' असें श्येन म्हणूं लागला. तेव्हां कपोताचे भारंभार औशीनर राजानें आपल्या शरीराचें मांस श्येनास देण्याचें कबूल केलें. परंतु शरीराचा बराच भाग तोडून तराजूंत घातला तरी कपोत जडच येऊं लागला, तेव्हां औशीनर स्वतःच पारड्यांत बसला. तें पाहून उभयतां इंद्र व अग्नि हे संतुष्ट होऊन आपलीं रूपें प्रगट करून वर देऊन गेले. (महाभारत—वनपर्व—अ० १३०-१३१.) याप्रमाणें प्रथम कथा झाली. द्वितीय कथा आहे ती अशी:—या राजाचें सत्व पाहण्यासाठीं ब्रह्मदेव विप्ररूपानें आला आणि त्यानें राजाच्या पुत्राचें (बृहद्गर्भाचें) मांस खावयास मागितलें. राजानें मांस शिजवून तयार केलें, पण विप्र कोठें दिसेना. तेव्हां मांसपात्र मस्तकावर घेऊन राजा विप्राचा शोध करीत फिरूं लागला. तों तो विप्र राजमंदिरास आग लावीत आहे असें यानें पाहिलें. पण मनांत विकल्प न धरतां राजानें विप्राची प्रार्थना करून 'सिद्ध केलेलें मांस स्वीकारावें' अशी विनंति केली. 'मी तें खात नाहीं, तूंच तें खा' असें प्रत्युत्तर विप्रानें केलें. त्याप्रमाणें राजा तें मांस खाणार तों ब्रह्मदेव प्रसन्न होऊन, स्वरूप प्रकट करून, राजास आशीर्वाद देऊन, त्याचा पुत्र पूर्ववत् सजीव करून अंतर्धान पावला—अशी कथा आहे. (महाभारत—वनपर्व—अ० १९४-१९८.) ११. सज्जनांत आणि विश्वांत प्रसिद्ध गुण ज्याचे असा. १२. सुप्रसिद्ध बलि नामक दानशूर राजा, विरोचनपुत्र. १३. बलवान्.

अपीं [1]ब्राह्मणवेषधारिहरिला [2]सर्वस्व जें [3]नाशतें,
जोडी [4]वस्तु असें अशा पळहि जें [5]श्रीच्या मिळेना शतें. ॥ २३
हे धर्मज्ञ कुलीन विश्रुत हरिश्चंद्रादि दातेचि ते
झाले, राज्य शरीर अध्रुव असें जाणोनियां, [6]वेचिते. ।
राया ! अद्भुत ऐक याहुनि वदान्याच्या [7]वतंसा ! सखा
साजे [8]स्वर्द्रुम ज्या न कीं [9]खग म्हणे [10]व्याधास 'घे मांस, खा.' ॥ २४
[11]अप्राप्तामिष वृष्टिपीडित बहु [12]क्षुत्क्षाम रात्रौ [13]नगा-
खालें व्याध पडे, घडे निरखितां ज्या पक्षियां मौन गा ! ।
तैं सस्त्रीक कपोत त्या अतिथिला आणी [14]शिखी [15]सेकवी,
'इच्छा काय?' असें पुसे, पुसति [16]सत्पात्रास जैसे कवी. ॥ २५
बोले व्याध, 'बुभुक्षु मी, [17]अशन द्या कांहींतरी, रक्षण
प्राणांचें कठिन, क्षुधा बहु, न हें वांचे शरीर क्षण.' ।
ऐसें ऐकुनियां म्हणे खग, 'वडो आतिथ्य हें सांग न'
त्यागी सर्व तदर्थ त्याचि [18]दहनीं हर्षें शिरे [19]सांगन. ॥ २६
झाला स्त्रीसह दिव्यदेह सहसा बैसे विमानीं मग,
स्वर्गाला [20]सुरगीतसत्वगुण तो तत्काळ गेला [21]खग, ।
व्याध प्राप्तविरक्ति दावदहनीं होमी तनू, [22]व्योमगे-
व्रातें सत्कृत पावला [23]सुरपुरा आधीं [24]महासौभग. ॥ २७

१. बटुवेषधारी विष्णुला. अदिति+कश्यप यांनीं तप केल्यावरून त्यांच्या पोटीं विष्णु बटुरूपानें आला—अशी कथा आहे. [रामायण—बालकांड—सर्ग २९.] २. सकलपृथ्वीदान, त्रिपादभूमिदान. ३. नाश पावतें. ४. पाताळांत (बळीच्या) आपल्या घरीं विष्णूनें द्वारपाळ होऊन राहणें. ५. लक्ष्मीच्या शतानें जें मिळणें अशक्य तें वस्तु. (स्वगृहीं विष्णूचें द्वारपालत्व.) ६. अध्रुव (अशाश्वत) राज्य देह असें मानून वेचिते झाले. ७. भूषणभूता राया ! 'वदान्यवतंस' असें सामासिक पद पाहिजे होतें. ८. स्वर्+द्रुम=स्वर्गांतील+वृक्ष=कल्पद्रुम. ९. कोणी कपोतपक्षी. १०. क्षुधितव्याधास. एका कपोत पक्ष्यानें आपलें व आपल्या बायकोचें मांस क्षुधार्त व्याधास देऊन स्वर्गप्राप्ति केली—अशी कथा आहे. ११. ज्याला पक्ष्यादिकांचें मांस मिळालें नाहीं असा. १२. क्षुधेनें कृश. १३. वृक्षातळीं. १४. अग्नि. १५. तापवी. १६. योग्य पुरुषाला. ['योग्यभाजनयोः पात्रम्' इत्यमरः.] १७. अन्न. १८. अग्नींत. १९. स्त्रीसहित. [स+अंगन (अंगना)=सहित+स्त्री.] २०. देवांनीं ज्याचा सत्वगुण गाइला असा. २१. कपोत. २२. व्योमगव्रातें सत्कृत= 'व्योमगव्रातसत्कृत' असें सामासिकपद पाहिजे. व्योमगांच्या (देवांच्या) व्रातानें (समुदायानें) सत्कृत (सत्कार केलेला, आदर केलेला, पूजिलेला.) २३. अमरावतीला. २४. महाभाग्यशील.

नित्यानित्यविवेकनिष्ठित[1] असे जे भव्य त्या साधुनीं,[2]
केले वंश विभूषित स्वजननें[3] सत्कीर्तिला साधुनी,[4] ।
तूं दाता कुलशीलसद्गुणनिधी साधीं यशा, दाविना[5]
जो जन्मोनि विचित्र भारचि धरे[6] तो साधुवादाविना.[7]' ॥ २८

गंभीरस्वर भव्यमूर्ति भुजही[8] ज्याघातलेखाधर,[9]
प्रेक्षूनि स्वमनीं म्हणे नृप,[10] 'न हे भूदेव,[11] हे क्ष्मावर,[12] ।
आले ब्राह्मणवेष घेउनि घरा, होऊनियां मागते,[13]
द्यावा देहहि, अर्थिकामद[14] जगीं या[15] जे महाभाग[16] ते. ॥ २९

पूर्वीं वामन विप्र होउनि मही मागे त्रिपाद छळी,
ऐश्वर्यासि[17] हरी[18] हरी जरि तरी सत्कीर्ति पावे बळी; ।
वारी[19] काव्य[20] गुरु, स्वयेंहि समजे दाक्षायणीभूपधी,[21]
झाली जी द्विजकामितार्पणपरा[22] ती न[23] च्यवे भूपधी.[24] ॥ ३०

वांचावें क्षत्रियानें तरि सकळगुरु ब्राह्मणाच्याच कोजें,[25]
राज्य प्राणादि द्यावे, त्वरित अभिमत क्ष्मासुरा[26] याचका जें, ।
काळ क्रूर, क्षण श्री[27] न वश, मग जगीं कां कवी नाशशीला,[28]
दारागारा[29] शरीरा उबगुनि[30] सुयशें[31] झांकवीना शशीला ? ॥ ३१

१. सारासारविवेक करणारे. २. त्या सत्पुरुषांनीं. ३. आपल्या जन्मानें. ४. संपादून. ५. हें अर्थांतरन्यासालंकाराचें उदाहरण आहे. ६. पृथ्वीला भारभूत होय. ७. बरेपणा मिळविल्यावांचून. ८. ज्याहत प्रकोष्ठ. (श्लो० २२.) ९. धनुष्याच्या दोरीचे घट्टे ज्यांवर पडले असे (भुज). १०. जरासंध. ११. ब्राह्मण. १२. क्षत्रिय. १३. याचक. १४. अर्थि+कामद=याचक+इच्छा पूर्ण करणारे. १५. या जगींच अर्थिकामद तेच महाभाग होत. १६. भाग्यशाली. १७. बलिराजाच्या संपत्तीला. १८. हरण करी. १९. 'वामनाला त्रिपादभूमीदान देऊं नको' असें शुक्राचार्य बलिराजाला सांगे. २०. शुक्राचार्य. २१. दाक्षायणीभू+उपधी=दाक्षायणीपुत्र+कपट=अदितीचा पुत्र असें म्हणविणाऱ्या हरीचें कपट तें. इंद्राचें पद घेणाऱ्या बलिराजाला पराभूत करून इंद्राला त्याचें पद परत देण्यासाठीं कश्यपादितिप्रार्थनेवरून विष्णूनें वामनावतार घेतला—हें कपट. २२. ब्राह्मणाचें कामित (इच्छित) त्याच्या अर्पणाविषयीं तत्पर जी बुद्धि ती. २३. न ढळे, न भ्रंश पावे. २४. बलिनृपमति. २५. विप्रकामना संपादावी या कार्यासाठीं क्षत्रियानें वांचावें. (श्लो० २६.) २६. ब्राह्मणास. २७. लक्ष्मी, संपत्ति. २८. नाश पावणाऱ्या. २९. दार+अगार=बायको+घर. ३०. उबगणें=कंटाळणें. ३१. उत्तम यशानें. (यशाच्या धवलतेनें क्षत्रिय शशीला—चंद्राला खालीं पहावयास कां लावीना ?.)

ऐसें न क्षत्रियत्वीं[1], तरि[2] अवनि भरीं जीवितीं काम कोण ?
ज्ञातीला माय दावी न वदन, वसवी व्रीडिता धामकोण[3]; ।
ब्रह्मण्य ख्यातवंशोद्भव[4] धव[5] महिचा मी, नव्हे रंक, ज्यातें[6],
विप्रांघ्रिस्पर्शवांछा म्हणति जरि दिलें या शिरःपंकजातें[7].' ॥ ३२
ऐसें चित्तांत आणी[8] यदिषुशिखिमुखीं[9] जाहले तूल[10] लक्ष[11]
द्वेषिक्षोणीपती[12], तो मग मगधमहीनायक[13] स्थूललक्ष[14] ।
बोले, सप्रेम डोले, 'अभिलषित तुम्ही विप्र हो ! घ्या, शिराया
संदेहीं[15] कोण हेतु ? प्रिय जरि तरि मी सिद्ध द्याया शिरा[16] या.'॥ ३३
तेव्हां श्रीकृष्ण बोले, 'मगधनृपमणे ! तूं वदान्यांत धन्य,
झाल्या ! राजन्य[17] आम्हीं, तुजसहचि करूं वांछितों द्वंद्वजन्य[18], ।
मागों आलों न विप्र क्षुधित तुजकडे येथ दूरूनि अन्न,
प्राज्ञा ! मागीतलें दे, जरि हृदय तुझें कामदानीं[19] प्रसन्न. ॥ ३४
हा धर्मानुज भीम अर्जुनहि हा रामानुजन्मा[20] अरी[21],
तूझा कृष्णहि मी, नृपा ! तुजपुढें यावी खरी वैखरी[22].' ।
हांसे ऐकुनि, भूप पुष्कळ म्हणे ऐसें मनीं 'मंद हो !
देतों युद्ध यथेष्ट, चित्त तुमचें येणेंचि सानंद हो[23]. ॥ ३५
तो कीं तूं जलधीसही[24] शरण जो गेला, पुरें[25] त्यागुनी
ठाकेनाचि उभा, 'उभा'हि म्हणतां मत्सैनिकीं[26], मागुनी. ।

१. क्षत्रियांच्या धर्मांत. क्षत्रिय कोणास म्हणावें हें पुढील वचनांत वर्णिलें आहे:— (१) 'ब्राह्मणानां क्षतत्राणात् ततः क्षत्रिय उच्यते' इति **भारते**. (२) 'क्षतात् किल त्रायत इत्युदग्रः क्षत्रस्य शब्दो भुवनेषु रूढः' इति **रघुवंशे**. (३) 'स क्षत्रियस्त्राणसहः सतां यस्तत् कार्मुकं कर्मसु यस्य शक्तिः' इति **किरातार्जुनीये**. २. तर काय प्रयोजन आहे ? ३. घराचा कोंपरा. ४. प्रसिद्ध कुलांत जन्मास आलेला. ५. पति, राजा. ६. ज्या मला. ७. शिरःकमलातें. ८. उदारमति जरासंध असें मनांत आणी. ९. ज्याच्या बाणरूप अग्नींच्या मुखांत. १०. कापूस. ११. लक्षावधि. १२. शत्रुरूप राजे. १३. मगधदेशाचा स्वामी. (जरासंध. १४.) महामनस्क, उदार मनाचा, मोठ्या मनाचा. १५. देईल कीं न देईल अशा संदेहांत शिराया. १६. मस्तकाला. (श्लो० २७.) १७. क्षत्रिय. १८. द्वंद्वयुद्ध. १९. 'जरी हें मानेल तुझिया मना । तरी पुरवावी युद्धकामना.' ( हरिवरदा. ) २०. बळरामाचा कनिष्ठबंधु. २१. शत्रु (श्लो० २९.) 'सतरा वेळा समरांगणीं । जिंकूनि सोडिलें तुज लागूनी । तो मी तव रिपु कृष्ण जाणोनी । युद्धदानीं दृढ होई ॥.' ९६ [हरिवरदा.] २२. वाचा. २३. होवो. २४. श्लोक ३१ वा पहा. २५. मथुरा राजधानी टाकून तूं सागराला शरण गेलास. २६. माझ्या शूरांनीं.

भांडों भीतिवशा अशा तुजसवें मी काय हा अर्जुन?
स्पष्ट न्यून वयें बळेंहि मजसीं श्लाघो यशें [1]अर्जुन. ॥ ३६
आहे मत्तुल्य नागायुतबळ जरि न द्वंद्वयुद्धांत भी मी
यासीं भांडेन, [2]देवी जसि खलमहिषीं, मद्वदा होउ भीमीं; ।
रे! [3]पार्था! धर्म [4]तातप्रियकर करितो कीर्तिदा राजसूया,
जासी आमंत्रणातें [5]गुरुपितृपतिच्या, [6]अग्रजीं कीं असूया? ॥ ३७
वृकोदरा! सत्वर सज्ज हो, गदा तुला दिली हे [7]परलोकभोगदा; ।
यमालयाचा पथ चाल दावितों, [8]सर्वेंहि देऊनि यशासि पावितों.' ॥ ३८
त्यातें भीम म्हणे, 'युधिष्ठिरयशें आमंत्रिले लोकप,
स्वर्गी ठेवुनि कोण येइल हरी तैसें न पुत्रीं तप, ।
तूं जातां सुरवर्य येतिल मखा, या धर्मकार्यास जें
साहित्य त्वदधीन हें बळ असे तेथेंचि [9]आर्या! सजें.' ॥ ३९
गिरिव्रजपुरांतुनी त्वरित ते निघाले [10]गदी,
[11]करेणुविषयीं परस्पर वधेच्छु जैसे [12]रदी; ।
न मृत्युभय [13]भाविलें दृढमनें जयश्रीरतें,
विलोकिति [14]सुरें स्वयें करिति युद्ध जें वीर तें. ॥ ४०
भंग [15]क्रुद्धद्विपांच्या प्रथमचि समरीं होय जैसा [16]रदांचा
तैसा वीराधिपांच्या निजविजयरणीं नाश झाला गदांचा; ।
जाणों त्या [17]अर्कशाखा [18]मगधकुरुकुलोत्तंस ते मत्त दंती,
केलें [19]दोर्युद्ध त्यांहीं [20]त्रिणवदिन खरें, हे नव्हे [21]किंवदंती. ॥ ४१

---

१. न संपादू. २. महिषासुरमथिनी भवानी. ह्या श्लोकार्धांतील कल्पना मूळांत नाहींत, त्या पंतांच्याच आहेत. पंतांनीं या अध्यायांत अनेक ठिकाणीं विस्तृत वर्णन करून काव्यास फारच शोभा आणिली आहे. या मोहकगुणानें वाचकांचें मनोरंजन होऊन त्यांस वाचण्याचे श्रम फारच कमी होतात अथवा होतच नाहींत असें म्हटलें तरी चालेल. ३. हे भीमा. ४. बापाचें प्रिय करणारा धर्म. ५. बाप आणि यम यांच्या आमंत्रणास. ६. वडील भावाविषयीं तुला मत्सर कां वाटतो? ७. परलोकाचे भोग देणारी. ८. हें 'सहोक्ति'चें उदाहरण होय. ९. 'कर्तव्यमाचरन्काममकर्तव्यमनाचरन्। तिष्ठति प्रकृताचारे स वै आर्य इति स्मृतः॥.' १०. गदाधारी. ११. हत्तिणीविषयीं. १२. हत्ती. १३. मानिलें. १४. देव. [सुर=ज्यांनीं सुरेचा (मद्याचा) स्वीकार केला ते सुर आणि ज्यांनीं केला नाहीं ते असुर.] १५. रागावलेल्या गजांच्या. (श्लोक ३७.) १६. दांतांचा. १७. रुईच्या ढाळ्या. (श्लोक ३७.) १८. मगधकुल आणि कुरुकुल यांत उत्तंस श्रेष्ठ जरासंध व भीम. १९. भुजयुद्ध. २०. सत्तावीस दिवस. २१. जनवार्ता.

त्या **भी**मा **मा**गधांचें [१]अहितयशउडुस्वामिचे राहु दंड,
[२]श्राद्धेशाचेचि साचे [३]परमददलनीं दक्ष ते बाहुदंड ।
[४]त्यां [५]अन्योन्यप्रणाशीं त्रिणवदिवस हा काय आयास [६]दिष्ट
[७]त्रातें [८]एकास एका [९]पविकवच असे [१०]**पां**डवा या [११]संदिष्ट. ॥ ४२

पहाती तें युद्ध प्रभुहि [१२]**न**र**ना**रायण [१३]दिवे
नटाच्या त्या रंगीं गमति जनधी दृष्टिहि निवे; ।
प्रहारांचा उग्र ध्वनि दिगि[१४]भकर्णाप्रति शिवे
म्हणे **शं**भु, 'प्रेक्षीं [१५]**अ**जभजकदोर्विक्रम [१६]**शि**वे !' ॥ ४३

विलोकितां युद्ध [१७]अनादि साचें, भासे महावैर जना [१८]दिसांचें ।
रात्रौ न तो [१९]मानसखेद राहे, न पावती लेश सखे [२०]दरां हे. ॥ ४४

दोघे शिक्षाबळांहीं सम [२१]समरसवीं दीक्षित ख्यात [२२]हारे
स्पर्शेना त्यांत एकासहि [२३]संहित सखेसे करीती विहार; ।
मोठें आश्चर्य मानी जग जगतिवरी रीति हें तो नवींचि
[२४]क्षीरोदाच्याहि त्यांच्या [२५]भुजभुजगयशा देति [२६]सन्मान [२७]वीची. ॥ ४५

[२८]सांगे **भी**म प्रभूस, '[२९]प्रमथन न घडे **मा**गधाचें, असाध्या
वाटे मातें जयश्री, तरि **ह**रि ! [३०]नयं तूं सिद्धिकारी असा [३१]ध्यां; ।
आम्हाला मुख्य तूझें पदबळ, भुवनीं ज्या न सीमा तुले या,
शत्रूसीं, दासलज्जा धरिसि न हृदयीं तूं कसी [३२]मातुलेया !' ॥ ४६

---

१. शत्रूंचा जो यशोरूप चंद्र त्याचे राहु (गिळणारे, ग्रास करणारे). २. यमाचे दंड. ३. शत्रुगर्वसंहारीं. ४. बाहुदंडास किंवा मागध भीम यांस. ५. परस्परनाशाविषयीं. ६. केवळ दैव. ७. रक्षण करणारें. ८. मागधास. ९. वज्रकवच. १०. भीमास. ११. साधूंचा इष्ट जो कृष्ण तो. १२. अर्जुन आणि कृष्ण. १३. दिव्यासारखे तटस्थ. १४. दिग्गजांच्या कर्णीस. १५. कृष्णभक्तांचा भुजपराक्रम=भीमशौर्य. १६. हे पार्वति. १७. फार दिवसांचें. १८. दिवसांचे. १९. दिवसास युद्ध करणारे मनाचे निष्कपट आणि शुद्ध असल्यामुळें ते रात्रौ मित्राप्रमाणें असत. याप्रमाणें युद्ध सत्तावीस दिवस झालें. [श्लो० ४०.] २०. भयातें. २१. युद्धयज्ञांत. २२. पराभव. २३. हितप्रद. २४. क्षीरसिंधूच्या. २५. भुज हेच भुजग त्यांच्या यशाला. २६. क्षीरोदाच्या वीचि त्या भीमजरासंधांच्या यशाला मोठा मान देती=क्षीरोदाच्या धवलतेपेक्षांही त्यांच्या यशाची धवलता ज्यास्त होती—असा भाव. हा श्लोक फार सुरस आहे, याला मुळांत आधार नाहीं. २७. लाटा. २८. श्लोक ४१ पहा. पंतांचा ४६ वा श्लोक भागवतांतील ४१ व्या श्लोकाशीं ताडून पहावा म्हणजे कोणाची कृति सरस आहे हें तेव्हांच निर्णीत होईल. २९. विनाश. ३०. युक्ति. ३१. मनांत योजून काढा. (नय=युक्ति.) ३२. हे कृष्णा. [हे मातुलाच्या—मामाच्या मुला !]

आणी चित्तीं [1]जरेनें [2]घटिततनु असे तो वधोपाय काया
जो [3]द्वैधीभाव देवा अवघड वदतां **पां**डवा आयकाया, ।
[4]शाखा घेऊनि हस्तीं जइं निजवदना **भी**म पाहे चिरी ती
कीं माराया नियुद्धीं अचुकचि सबळा या [5]नृपा हेचि रीती. ॥ ४७
सत्तावीस दिन श्रमास समरीं जे पावले ते जया
पावावे निजभक्तबाहु म्हणुनी दे आपुलें तेज या, ।
तेणें **भी**म असीम [6]धीमदमरश्रीमन्नुता हा यशा
साधी, [7]ज्यासि पिवोनि [8]रुद्धनृपतिस्त्री जाहल्या [9]हायशा. ॥ ४८
वेगें [10]**भी**मसमीरणें उलथिला [11]शत्रुद्रुम [12]क्षोणितें,
तेव्हां कांपवि तो वमोनि भिजवी क्षीरें तशा [13]शोणितें, ।
जाले [14]प्राणखग [15]स्वकाश्रयनगत्यागाकुळ [16]व्याळसा
जो [17]हृत्कोटरशायि जीवहि निघे सोडूनियां [18]आळसा. ॥ ४९
एका पायास पायीं दडपुनि, धरिला दूसरा पाय हातीं,
ओढी फाडी [19]समानें करि [20]तनुशकलें, [21]वेणुचीं काय हा तीं? ।
त्या काळीं तत्प्रजा त्या म्हणति, '[22]वधि **ज**रासंधराजास, हाय!
क्रूरात्मा **भीम काळ** प्रगट, न नर, कीं दैव नाहीं सहाय.' ॥ ५०
श्री**कृ**ष्णें **वि**[23]जयेंहि शत्रुविजयी आलिंगिला **भी**म ही,
पूजायोग्यचि मारिला खळ, जया उच्छृंखळा भी मही, ।
पावे सद्गति सत्वसागर **ज**रासंधाख्य तो काय न?
ब्रह्मण्यासि सुधार्मिकासि [24]कसुनी दे [25]सर्वलोकायन. ॥ ५१
[26]तत्कुमार सचिवासह देवा, ये भयें शरण, त्या **स**हदेवा ।
राज्य दे वरद सद्य पित्याचें, जिंकिलें सकल यद्यपि त्यांचें. ॥ ५२

---

१. जरानामक राक्षसीनें. २. जोडलेली तनु. ३. दोन भाग होण्याची योग्यता. ४. डहाळी. ५. या जरासंधाला. ६ वुद्धिमंत देव आणि श्रीमान् प्रभु यांहीं स्तुत अशा असीम अगणित यशातें हा भीम सधी. ७. ज्या यशास. ८. कोंडलेल्या राजांच्या स्त्रिया. ९. दुःखरहित. १०. भीमरूप वायूनें. ११. शत्रुरूप वृक्ष. १२. पृथ्वीतें. १३. रक्तानें. १४. प्राणरूप पक्षी. १५. आपला आश्रय जो वृक्ष त्याच्या त्यागानें दुःखित. १६. सर्पसा. १७. हृदयरूप ढोलींत शयन करणारा (निजणारा). १८. या श्लोकास मूळांत आधार नाहीं, यांतील सुंदर कल्पना पंतांच्या प्रतिभेचें फळ होय. १९. समानें तनुशकलें याचें स्पष्टीकरण हरिवरदाटीकेंत आहे तें पहावें. २०. शरीराचे भाग. [श्लो० ४४-४५.] २१. वेळवाचीं. २२. काळ वधी, नर न वधी. २३. अर्जुनानें. [श्लोक १७.] २४. सत्वपरीक्षा. पाहून. २५. कृष्णप्रभु. २६. त्या जरासंधाचा पुत्र सहदेव. [श्लो० ४८.]

आज्ञेनें सोडवी ते निजपदकमलासक्तधी[1] भूप कारा-
वासापासूनि, दीनावरि करि हरि तो यापरी सूपकारा[2]; ।
संसारक्लेश नासे, स्मृति समयिं घडे नाश पापा, यमाचे
दूत त्रासासि वेती, म्हणुनि सुमति ते जोडिती पायमाचे[3]. ॥ ५३

---

## अध्याय त्र्याहत्तरावा.

देवें[4] वीससहस्र आठशतही जे सोडिले राय[5] ते
सर्वेष्टप्रदपाद[6] पाहति उभे तारावया आयते, ।
राहों देति न पाप ताप विनतीं[7] कीं मातृता[8] तातता[9]
ज्यांची[10] केवळ बंधुता[11]हि महिमा कां अन्यथा मातता[12]? ॥ १
श्रीमन्मूर्तिविलोकनीं नृप मनीं बाहेरही हर्षले,
जाणों[13] त्या नतचातकांवरि सुधामेघौघ[14] ते वर्षले; ।
जन्में लक्ष सदंघ्रिपंकजरजांमध्यें सदा घोळले,
त्या पुण्येंचि मुकुंदपादकरुणापाथोद[15] ते [16]ओळले. ॥ २
भूप[17] ते म्हणति, '[18]प्रपन्नविपन्नगैकपविस्तुते!
सद्गते[19]! जगतांपते! यदुदेव! देव! नमोऽस्तु[20] ते, ।
दास राखिसि तूंचि, अन्य नसे सुखप्रद ओसरा[21],
[22]वोसरा जसि गाय, हा जन दीन मीनचि बा! सरा[23]. ॥ ३

---

१. आपल्या पादकमळीं ज्यांची आसक्तबुद्धि असे भूप. २. उत्तम उपकारा. ३. भगवंताचे पाय हेच माचे म्ह० पर्यंक. सुखानें झोंप घेण्याचें स्थान.४. जरासंधानें ज्या राजांस गिरिद्रोणींत कोंडून ठेविलें होतें त्यांस कृष्णानें (देवें) मुक्त केलें व त्यांचा यथायोग्य सन्मान करून त्यांस स्वराज्यीं परत पाठविलें—अशी कथा या अध्यायांत आहे. ५. जरासंधानें कोंडलेले भूप. (राय=राजे.) ६. सर्व इष्ट देणारा जो कृष्ण त्याचे पाद (चरण). ७. शरणागतीं. ८. आईपणा. मातृता व तातता ह्या कृष्णचरणाच्या ठायीं होत्या. जे पाद स्वभक्तांला आईबापाप्रमाणें वात्सल्यानें रक्षण करतात असा भाव. ९. बापपणा. १०. ज्या पायांची. ११.ज्या पायांची बंधुता (बंधुपणा). १२.माजता, वाढता, पसरता. १३. यांत उत्प्रेक्षालंकार आहे. १४. सुधा+मेघ+ओघ=अमृत+घन+समूह. १५. मुकुंदाचे पाद हेच दयामेघ. [पाथोद=मेघ, पाथस्=उदक, द=देणारा=जलद.] १६. वळले. १७. या श्लोकाचें वृत्त 'विबुधप्रिया.' १८. प्रपन्नांची विपत् हाच नग म्ह० पर्वत त्यास एक वज्ररूप स्तव ज्याचा असा (श्लो० ८). १९. साधुजनांस गति (मोक्ष—आश्रय) देणाऱ्या (देवा!) २०. तुला नमस्कार असो. २१. आश्रय. २२. या श्लोकांत 'ते' आणि 'सरा' या वर्णांची आवृत्ति वारंवार झाली आहे. २३. हे दीन मीनाच्या सरोवरा.

[1]दीनरक्षणदीक्षिता ! भवबंधनासहि तोडुनी
सोडवीं जनही, पहा, पद वंदितों कर जोडुनी, ।
दास्य दे, नलगे पुन्हा [2]नरकास्य, राज्यपद क्षया
ने, विवेक नसे, विवेचुनि पुण्य जो हितदक्ष या. ॥ ४
[3]राज्यैश्वर्यमदें न काळ गणिला, न स्वप्रजारक्षण;
स्वार्थीं दृष्टि, जसीच सेवुनि करी चिंता न [4]जार क्षण, ।
स्पर्धा नित्य परस्पर, स्मरहरध्येया तुझ्या या पदा
आम्ही न स्मरलों पळ, प्रभुवरा ! झाली भली [5]आपदा. ॥ ५
'जेणें या न [6]भवाख्यपंककुहरीं हे [7]रेवंती,' दे वरा,
ऐशा, [8]दीनजनावनैकचतुरा ! हे ! [9]रेवंतीदेवरा ! ।
नामें नित्य तुझीं असोत वदनीं, ज्यां [10]मुक्तिसोपानता,
साजे, पाय मनीं वसोत, भजतां या मोक्ष सोपा [11]नता.' ॥ ६
राजांला दीनबंधु प्रभु यदुप [12]म्हणे, 'बोलिलां सत्य, जावें
गेहा, देहादिकीं जें जननमरणद प्रेम, त्यास त्यजावें. ।
गावें भावें मलाचि, श्रुतिविहितकुलाचारधर्म प्रजांतें,
पाळा, [13]गौळा निषिद्धें, म्हणतिल 'न किजे' [14]तत्वविद्विप्र जांतें.॥ ७
दैवें जें सुख दुःख होइल तया भोगूनि सारा खणा,
नामें [15]कामजटा [16]कृषीवळ निजक्षेत्रा तसा [17]राखणा ।
मी आहेंचि, भिऊं नका, मग मज ब्रह्मासि पावा, रितें
जाऊं द्या न वयःक्षण स्मरण जें [18]योगांघ्रिपा वारि तें.' ॥ ८

---

१. दीन जनांचें रक्षण करण्यासाठीं ज्यानें दीक्षा घेतली अशा (श्रीकृष्णा ! हे मधुसूदना !). २. नरकद्वार. ३. राज्य=राष्ट्रशक्ति, राजाचें सामर्थ्य; ऐश्वर्य=सर्व संपत्ति; या दोघांच्या मदानें. ४. ही कल्पना मूळांत नाहीं. (श्लो० १०.) ५. आपत्तिरूप शिक्षा. ६. संसार नामक चिखलाच्या खाचेंत. ७. फसती, बुडती. ८. दीन जनांचें रक्षण करण्याविषयीं चतुरा. ९. रेवती (रामपत्नी) तिच्या देवरा (दिरा) हे कृष्णा ! १०. मुक्तिपदास जाण्याचा पायरीपणा. ११. शरणागताला—नम्र झालेल्या जनांला (नृपांला). [राजाचें भाषण मूळांत ८-१६ श्लोकांत आहे, पण पंतांनीं त्याचा येथें संक्षेप करून तें ४ श्लोकांत समाविष्ट केलें आहे. महत्त्वानुरोधानें पंत वर्णनाचा विस्तार किंवा संक्षेप करतात असें अनेक ठिकाणीं आढळतें.] १२. हें कृष्णाचें राजांस प्रत्युत्तर मूळांत सहा श्लोकांत (१८-२३) आहे. त्याचा सारांश मात्र पंतांनीं येथें दिला आहे. १३. वर्जा. १४. तत्त्वज्ञ द्विज. १५. विषयवासना. १६. शेतकरी. १७. रक्षक. १८. योगरूप वृक्षाला जें माझें स्मरण तें वारि (उदक) आहे.

ऐसें दे अभय प्रभू, चुकविती ज्याचीं यशें रौरवा[१],
राजांच्या करवीं गिरिव्रजवरा[२] आज्ञापुनी गौरवा ।
स्वस्थानाप्रति पाठवी, बसवुनी स्वर्णाचिया[३] स्यंदनीं[४],
दीनीं देव करी दया तसि, जसी माता पिता नंदनीं[६]. ॥ ९

दीनात्राणार्थ धर्मोन्नतिसहि[७] सुखवाया[८] प्रजे हेति[९] घेते
शक्रप्रस्थासि[१०] गेले, तदुपरि विजयी वीर जे हे तिवे ते ।
दुष्टातें लाजवीति प्रकटचि सुहृदां दोर्विलासा[११] दरें[१२]तें
हर्षानें वाजवूनी कळविति विजयाकर्णनीं[१३] सादरांतें. ॥ १०
धर्माचीं[१४] कृष्णभीमार्जुन नमिति पदें, तों महाराज[१५] यांतें[१६]
दे आशीर्वाद, भेटे, मग कळवि विभु[१७] प्राप्त जाल्या जयातें, ।
ऐकाया आप्तसाधुव्रज मिळवि महात्मा जसा क्षिप्र भावा
आठांहीं[१८] सात्विकीं तो नृप मिळवुनि पी विश्वसाक्षिप्रभावा. ॥ ११

---

## अध्याय चौऱ्याहत्तरावा.

धर्म[२०] श्रीपतिला म्हणे, 'यदुपते! आज्ञा तुझी माळसी
माथां वाहति सर्व देवें[२१] मुनिही[२२], जे लौकिकीं आळसी; ।
हा लाभ प्रभुजी! भवादिभजकां[२३] भव्यप्रदा[२४] त्या तुला
आम्हीं दास करूं निदेश[२५] शतशः श्रीच्याहि जीवातुलीं[२६]. ॥ १

---

१. नरकाला. २. जरासंधपुत्रास. ३. सोन्याच्या. ४. रथीं. ५. ही कल्पना मूळांत नाहीं. पंतांचें काव्य वाचीत असतां अशा सुप्रगल्भ विचारांच्या योगानें व्यवहारनीतीची ओळख पटून मनास एक प्रकारची करमणूक होते ही गोष्ट कोणीही अमान्य करील असें वाटत नाहीं. ६. निजपुत्रीं. ७. धर्मयुद्धासाठीं, धर्माची उन्नति (उत्कर्ष) व्हावी यासाठीं. ८. हा चरण यतिभ्रंशाच्या संबधानें चिंतनीय आहे. ९. शस्त्रें. १०. इंद्रप्रस्थ नगरास. ११ निजभुजपराक्रमातें. १२. शंखांतें. (श्लो० ३१-३२.) १३. विजय ऐकण्याविषयीं जे आदरयुक्त त्यांतें. १४. श्लोक ३४-३५ पहा. १५. धर्मराज. १६. त्या तिघांतें. १७. कृष्ण. १८. आठ जे सात्विकभाव कंप रोमांच स्वेदादि तींहीं. १९. या अध्यायांत राजसूययज्ञांत अग्रपूजाप्रसंगीं कृष्णानें शिशुपालाचा वध केला या कथेचें वर्णन आहे. २०. अध्याय ७४ श्लोक २-३ पहा. २१. विधि, हर, शक्र, यम, कुबेर, वरुण, इत्यादि देव. २२. सनकादिक. २३. शिवादिक भक्तांला. २४. कल्याण देणाऱ्या. २५. आज्ञा. २६. जीवनोपाया. [जीवातु=मृतसंजीवनौषध, जीवनौषध; 'ना जीवितुर्जीवनौषधम्' इत्यमरः । 'जीवातुरस्त्रियां भक्ते जीविते जीवनौषधे' इति मेदिनी.]

हा अन्यायचि केवळ प्रभुवरा! होतो अनुज्ञापित्या[1]
त्या दासासि सदा सदाशिवविधिध्येया[2] जगाच्या पित्या! ।
बा! आहे, परि धर्म शर्म[3] पितरां बाळाचिया पाळनीं,
सर्वस्वार्थसमर्पणीं अभिमतें संतर्पणीं लालनीं.' ॥ २
श्रीकृष्णें अनुमोदन[4] 'क्रतु करीं' ऐसें दिलें, त्यावरी
धौम्य व्यास वसिष्ठ जैमिनि अशां तो ऋत्विजांला वरी; ।
विप्र क्षत्रिय वैश्य शूद्रहि नृपें त्यां आणिले बाहुनी,
कीं व्हावें कृतकृत्य यज्ञपतिला श्रीजानिला[5] पाहुनी. ॥ ३
भीष्म द्रोण कृप स्वतात[6] ससुतामात्याप्तवर्गास्त्रिया[7]
त्यांच्या आणवि तो युधिष्ठिर करी सर्वांचियाहि प्रिया; ।
गंधर्वामरशक्रशंकरशतानंदादि यज्ञक्रिया
पाहोनी म्हणती, 'भले बहु भला बा! क्षत्रियश्रोत्रिया[8]!' ॥ ४
व्यासादि द्विजराज याजक[9], करी साहित्य लक्ष्मीपती,
कर्ता धर्म नृपोत्तम, द्रुपदजा पत्नी तयाची सती; ।
विश्वख्यात सदस्य[10] नारद[11]मुख ज्ञानी, स्तवावा सत्रें[12]
श्रेष्ठत्वें किति? आदरी बहु सदिक्पाल स्तवा वासव[13]. ॥ ५
निर्विघ्नक्रतुसिद्धिकाम पुरला, केली मुनींनीं कृपा,
पूजायासि सदस्ययाचकजना उत्साह मोठा नृपा; ।
कोणाचें परिपूजन प्रथम, कीं पूज्यत्व सर्वांकडे?
अग्राचेंविषयीं[14] न निश्चय घडे, राजा विचारीं पडे. ॥ ६
त्याकाळीं[15] सहदेव सत्प्रिय[16] वदे[17], 'मूळ द्रुमाचें[18] जळें
शिंपावें, तरि तृप्त होति सकळें पुष्पें फळेंही दळें[19]; ।

१. आज्ञा करणाऱ्या. २. शंकर आणि ब्रह्मदेव यांनीं ध्यान करण्यास योग्य अशा. ३. सुख. ४. श्लोक ६-७ पहा. ५. कृष्णाला. [श्रीः जाया यस्य स श्रीजानिः=लक्ष्मीभार्यः] ६. धृतराष्ट्रराजा. ७. स+सुत+अमात्य+आप्त+वर्ग=सह+पुत्र—दुर्योधनप्रभृति+सचिव—विदुरादिक+शकुनि, जयद्रथ इत्यादि स्वकी यजन+गण. ८. क्षत्रिय असून दीक्षिता. ९. ऋत्विज्. १०. सभासद. ११. नारदप्रमुख. १२ यज्ञ. १३. लोकपालांसह इंद्र स्तवा आदरी. १४. अग्रपूजेविषयीं. १५. सोमाभिषवदिवशीं. १६. साधूंस आवडायाजोगें. १७. श्लोक १८-२४ पहा. १८. वृक्षाचें. १९. पानें. या सप्तम श्लोकावरून पंतांनीं मूळांतील सहदेवोक्तीचा संक्षेप किती केला आणि कसा केला हें चांगलें कळणार आहे. मूळांतील वेदांतविषयक वर्णन सामान्य वाचकांस पसंत होणार नाहीं असें जाणून पंतांनीं जेवढा भाग सरस होता तेवढाच येथें घेतला आहे.

देवब्राह्मणवेदयज्ञतनु हा विश्वांतरात्मा हरी
पूजावा पहिलाचि, यांत घडते त्रैलोक्यपूजा बरी.' ॥ ७
धौम्यव्यासवसिष्ठनारदभरद्वाजादि सद्विप्र ती
वाणी ऐकुनि '[1]साधु! साधु!' म्हणती त्या [2]धर्मबंधूप्रती; ।
भीष्म [3]ग्रीष्मविरामवारिदघटा गर्जे, [4]शिखीसा [5]सदा-
मध्यें फार निवे, म्हणे, 'स्मृति असो [6]हे श्रीनिवासा! सदा.' ॥ ८
धर्मानें कनकासनीं बसविला, [7]ज्यांच्या शिरोनी रजीं
झालें तीर्थ, जळ स्वयें शिव सदा वाहे [8]शिरोनीरजीं; ।
तीं [9]लक्ष्मीशपदांबुजें [10]मुनिधनें प्रक्षाळिलीं [11]पावनें,
माथां जैं धरिलीं [12]महेशपदवी देती [13]महीपा [14]वनें. ॥ ९
[15]ज्यांचें सद्यश नाशितें [16]शतजनूरूढा [17]कलंका, रितें
राहों दे न तिळ, स्थळ, स्वविभवें विश्वा अलंकारितें, ।
त्या श्रीच्या त्रिजगन्मनोहरमहाभाग्यास भूषामणी
भावें भूषवि भक्त [19]भूप, [20]जनता [21]ज्या [22]मूर्तपूषा [23]गणी. ॥ १०
[24]रमालंकारातें [25]सुकृतसदलंकारनिकरें
महात्मा तो [26]धर्मक्षितिपति अलंकारुनि करें ।
[27]शंकेनाचि [28]प्रेमप्रसरजलरुद्धेक्षणयुग
स्वयें देखाया श्रीमुख निरखितां जें क्षण [29]युगें. ॥ ११

---

१. शाबास. २. सहदेवाप्रत. (श्लोक २५ पहा.) ३. ग्रीष्मऋतूच्या समाप्तीस मेघसमुदाय असा भीष्म. ४. मयूरसा. ५. सभेमध्यें. ६. हे सहदेववाणी. ७. ज्या पदांबुजांच्या (रजीं=धूळींत). ८. मस्तककमळीं. ९. कृष्णचरणकमलें. १०. जीं (पदें) मुनिजनांचीं धनें (संपत्ति होत). ११. पवित्र. याप्रमाणें धर्मानें कृष्णाचें पादावनेजन केलें. (श्लोक २८.) १२. शिवाची योग्यता. (कारण हीं तीर्थजळें मंदाकिनीतुल्य होतीं.) १३. नृपा (धर्मा.) १४. तीर्थजळें. १५. ज्या कृष्णाचें. १६. शतजन्मांत उत्पन्न झालेल्या, वाढलेल्या. १७. पातकास. १८. भूषवितें. १९. धर्मराज. २०. जनसमूह. ['ता'प्रत्यय समुदायवाचक आहे.] २१. ज्या मण्याला. २२. मूर्तिमंत सूर्य. (पूषन्=सूर्य.) २३. मानी. २४. कृष्णातें. २५. पुण्य हेच उत्तम अलंकार त्यांचा समूह आहे ज्याचे ठायीं अशा (करें). २६. धर्मराज. २७. श्लोक २९ पहा. २८. प्रेम+प्रसर+जल+रुद्ध+ईक्षण+युग=प्रीति+अतिशय+उदक+भरले, अडविले+नेत्र+द्वय=प्रेमाश्रूंनीं ज्याचे डोळे (ईक्षणयुग) भरले असा. २९. युग क्षणाप्रमाणें वाटावें.

जन विलोकुनि [1]भूपसभाजिता, यदुवरा नि[2]जभक्तसभाजिता ।
'जय नमो' म्हणती बहु हर्षती, त्रिदश [3]सत्कुसुमोत्कर वर्षती. ॥ १२

[4]भुवनगुरुच्या [5]एवं विद्वन्मताग्रसभाजनीं
पढत असतां स्तोत्र प्रेमें [7]समग्रसभाजनीं ।
खळ खवळला [8]चैद्य [9]क्रोधें करि [10]प्रभुगर्हणा,
मुनिवरनृपांमध्यें सोसे न [11]यांस [12]सदर्हणा. ॥ १३

'[13]काळाचें बळ थोर, ईश, म्हणती तें सत्य हो! [14]अत्यया
[15]यांच्या कोण करील, शक्ति [16]अतुळा आलीच [17]मत्प्रत्यया, ।
कीं हें ऐकुनि [18]बाळभाषण वश [19]ज्ञातेहि झाले, पहा
कीर्तीच्या वदनासि लाविति [20]मषी वाटूनियां लेप हा. ॥ १४

पूज्य ब्राह्मण हे [21]अतिक्रमुनियां, गोपा[22]ळ पूजावया
सांगे [23]बाळ, कळंक [24]शंतनुसुता! हा आज तूझ्या वया, ।
[25]पात्रापात्रविचार कां विसरला? ज्याला सदाचा [26]वेळा.
केला योग्य कसा [27]सुरोचितपुरोडाशास हा कावळा? ॥ १५

शिष्टाचार स्वधर्म स्वपरहित [28]सदा चालवावे दहानीं,
हे विप्र द्रव्यलोभी प्रकटचि करिती सत्क्रियावेदहानी; ।
छत्रा सिंहासनातें उचित न यदुचा वंश, याला ययाती
शापी, शापोक्ति [28]अव्याहतगति [29]गुरुची, भीतसे काय [30]यां [31]ती?'॥ १६

---

१. धर्मानें पूजिता. (सभाजन=पूजन.) २. निजभक्तांची सभा (समुदाय) त्यानें जित (वशीकृत) अशा यदुवरा. ३. उत्तम पुष्पाचे समूह. (श्लोक ३०.) ४. कृष्णाच्या. ५. याप्रमाणें. ६. विद्वानांस मान्य जे अग्रपूजन त्याचे ठायीं. ७. सगळ्या सभासदांत. ८. शिशुपाळ. ९. कृष्णगुणवर्णन ऐकून उत्पन्न झालेल्या कोपानें. १०. कृष्णनिंदा. ११. या चैद्याला. १२. कृष्णाची अग्रपूजा, साधुपूजन. १३. काळाचें बळ मोठें आहे, काळ हा ईश (समर्थ) आहे. १४. नाश. १५. या काळाच्या असया (नाश) करण्यास कोणीही समर्थ नाहीं. १६. या काळाची शक्ति अनुपम आहे अशी माझी खात्री झाली. [हें शिशुपालभाषण आहे. श्लोक ३२ पहा.] १७. माझ्या अनुभवास. १८. मूर्ख सहदेवाचें भाषण. १९. ज्ञानवृद्ध पुरुष. २०. काजळ. २१. अवमानून. २२. गौळी. (कृष्ण.) २३. मूर्ख. (सहदेव.) २४. हे भीष्मा. २५. योग्यायोग्यविवेक. २६. अभ्यास. २७. देवांना योग्य जो पुरोडाश त्याला कावळा कसा योग्य होईल? (श्लो० ३४.). २८. निरंतर चालणारी. २९. वडिलाची. ३०. या कृष्णास. ३१. शापोक्ति.

नाशी [1]यन्नामधेय[2]स्मृतिहि [3]भवगदा, जो यशस्वी सुवैद्य,
श्रीमान् कारुण्यसिंधु प्रभु वरद असा त्यासि नष्टायु चैद्य ।
निंदी, तें काय बोलों ? बुधजनहृदयें भेदिलीं काय ? कानीं
आधीं वेगें शिरोनि [4]प्रबळतरमहादुष्टवाक्सायकांनीं. ॥ १७
[5]साधूंचीं सांठवीति प्रकट [6]पृथुगुणें [7]मंतुच्या कोटि [8]पोटें,
हें जाणे विश्व, यांचें सहनपटुपरा ख्यात विश्वांत मोठें, ।
सोसे [9]स्वाराध्यनिंदा, न परि निमिषही पाप तें फार खोटें,
ज्ञाते गेले कितेक [10]श्रुतियुगवदनामाजि घालूनि बोटें. ॥ १८
निंदी विश्वगुरूसि [11]तत्परजना जो, बोल त्याचे [12]कुडे
ऐके जो नरकांत निंदक जसा तैसाचि तोही बुडे; ।
वारावा खळ शीघ्र तेथ सबळें, कीं दुर्बळें तेथुनी
जावें, यास्तव घालिति श्रुतिपुटीं बोटेंचि मोठे मुनी. ॥ १९
बोलेना देव कांहीं, जरिहि बडबडे फार तो चैद्य पापी,
व्यापी कोप द्विजाची मति [13]सहजमहाशांतिशाला तथापी, ।
[14]निंदावात्याप्रसंगें [15]अगुरुचि चळती, न त्यजी स्थैर्य मेरू.
सिंह क्रोधें न गर्जे, जवळिहि करिती यद्यपि [16]ध्वान [17]फेरू. ॥ २०
भीमादि प्रभुभक्त वीरवर त्या दुष्टावरी कोपले,
[18]कृष्णास्याचिकडे विलोकित तदा [19]आज्ञेच्छु ते थोपले; ।
दापी त्यांप्रति [20]खड्गचर्मधर तो पापी म्हणे, 'टोळसे
[21]भासां बालिश! हो ! [22]प्रतापदहनीं कां होतसां कोळसे ?' ॥ २१
चित्तीं देव म्हणे, 'करील [23]कंदन क्रोधांध हा [24]योधें,
न्यायें प्राप्त उपेक्षण क्षणहि न [25]प्राज्ञेष्ट [26]आयोधन; ।

---

१. ज्या कृष्णाचें नाम. २. स्मरणही. ३. संसाररोगाला. ४. तीव्र आणि दुष्ट जे वाग्बाण त्यांनीं. ५. साधूंचीं पोटें. ६. महत्वगुणानें. ७. अपराधांच्या कोटि सांटविती. ८. साधूंचीं पोटें. ९. स्वपूज्य देवाची निंदा. १०. श्रुतियुग आणि वदन यांमध्यें. (श्लो० ३९.) ११. ईश्वरनिष्ठ जनांस. १२. दुष्ट. जो त्याचे कुडे बोल ऐके तोहि जसा निंदक तैसाचि नरकांत बुडे—असा अन्वय. १३. साहजिक शांतीचें घर असी मति. १४. निंदा हीच वात्या (वातचक्र) त्याच्या योगें. १५. भारहीन, हलके. १६. शब्द. १७. कोल्हे. १८. कृष्णमुखाकडे. १९. प्रभुभक्त. २०. तरवार व ढाल धारण केलेला शिशुपाळ. (श्लोक ४२.) २१. भासतां. २२. प्रतापरूप अग्नींत. २३. युद्ध. २४. योद्धा. २५. ज्ञात्यांस इष्ट. २६. युद्ध.

माझा [1]पार्षद मत्सम स्मृति नसे शापें लया गेलि, हा
   उग्र ग्रासिल शत्रुला [2]खगपती जैसा [3]महालेलिहा. ॥ २२
मातें पावोत [4]जन्मत्रय अनुभवुनी ब्रह्मशापावसानें,
   [5]तापाग्निग्रस्त भक्तद्रुममृति हरिजे म्यां अशा पावसानें.’ ।
ऐसें योजूनि वारी हरि अरिवरि त्या सिद्ध झाले [6]कृपाणी
   [7]शूली [8]प्रासी [9]गदी जे [10]मुसलशरधनुःशक्तिकुंतोग्रपाणी. ॥ २३
वृष्णींचा [11]शक्र चक्र त्वरित मग, नगच्छेदना जेंवि [12]पाक-
   द्वेषी वज्र, [13]स्वकर्मद्रुमफळततिचा भोगवी जो [14]विपाक, ।
सोडी, तोडी क्षणांत, क्षितिवरि सहसा लोळवी [15]चैद्यमस्ता,
   हस्ता जोडूनि वंदी, स्तवि [16]सदभयदा [17]त्यां सभा ती समस्ता.॥ २४
चैद्याच्या तनुपासुनि प्रकट जें झालें निज [18]ज्योति तें
   [19]उल्केच्यापरि तत्क्षणांत [20]दशदिग्वक्त्रें करी [21]द्योतितें, ।

---

१. सेवक. शिशुपाल हा कृष्णाचा सेवक होय. ती कथा अशी:—जयविजय नामक हे दोघे सहोदर बंधु होते. हे ब्राह्मण असून यजन हवन करीत असतां, एका प्रसंगीं यांचें यज्ञदक्षिणेनिमित्त भांडण झालें. तेव्हां त्यांनीं रागाच्या आवेशांत एकमेकांस शाप दिले. एक हत्ती झाला व दुसरा नक्र होऊन गंडकीनदींत राहिला. पुढें श्रीविष्णूनें कृपाळू होऊन त्यांस शापनिर्मुक्त केल्यावर ते उभयतां वैकुंठांत विष्णूचे द्वारपाळ होऊन राहिले. पुढें या जयविजयांनीं ब्रह्मदेवाचे सनकादिक जे मानसपुत्र ते वैकुंठास गेले असतां त्यांस आंत जाण्यास प्रतिबंध केला. तेव्हां त्यांस राग आला, व त्यांनीं ‘तुमचें देवत्व जाऊन तुम्ही तीन वेळ असुरयोनींत जन्म घेऊन नंतर पूर्वपद पावाल’ असा यांस शाप दिला. या शापानुसार **ज**य आणि **वि**जय हे अनुक्रमें **हि**रण्यकशिपु व **हि**रण्याक्ष, **रा**वण व **कुं**भकर्ण, आणि **शि**शुपाळ व **व**क्रदंत असे तीनदां असुर झाले, व नंतर पूर्वपद पावले. २.गरुड. ३.मोठ्या सर्पास. [लेलिह–साप.] ४.तीन जन्म (पहिल्या जन्मीं हिरण्याक्ष, हिरण्यकशिपु, दुसऱ्यांत रावण कुंभकर्ण आणि तिसऱ्यांत शिशुपाल वक्रदंत.) ५. तापाग्नीनें दग्ध झालेल्या भक्तरूप वृक्षाचें मरण. ६. खड्गधारी. ७. शूलधारी. ८. प्रासशस्त्रधारी. ९. गदाधारी. १०. मुसळ, बाण, धनु, शक्ति, भाला, इत्यादि उग्रशस्त्रें ज्यांच्या हातांत असे. ११.यादवेंद्र. (कृष्ण.) १२. इंद्र. १३. निजकर्मरूप वृक्षाच्या फळसमुदायाचा. १४.परिणाम. १५. शिशुपालाच्या मस्तकास. १६. संतांस अभय देणाऱ्या. १७. कृष्णा. १८. तेज. १९. उल्का=तुटणारा तारा, ज्वाला, तेजःपुंज. २०. दशदिशांचीं मुखें. २१. प्रकाशितें.

गंगा जेंवि शिरे [1]पयोधिजठरीं, कृष्णीं प्रवेशे, वधी
न द्वेषें, असि [2]पार्षदीं बहु [3]दया दावी [4]दयाशेवधी. ॥ २५

त्रासानें शिशुपालसेवकबळें सारीं पळालीं पिलीं
[5]वीशात्तास्वहिचीं, न ठाकति जरि [6]क्ष्वेडें सदा लिंपिलीं; ।
[7]दानार्द्रद्विपयूथनायकशिरोमुक्ताफळीं आवडी
सिंहाची, परि [8]सर्व भीति जरि त्या शिंप्या न तो सांवडी. ॥ २६

देवर्षि व्यास इत्यादिक मुनि भगवद्भक्त जे तेचि लीला-
[9]ध्वस्तारातिप्रभूच्या समजुनि कृतिला त्या मखीं [10]दाविलीला ।
आश्चर्य [11]प्राकृतांतें बहुतचि गमलें, तेज कैसें निघालें?
कैसें कृष्णीं? समुद्रोदरिं [12]हिमरुचिचें बिंब तैसें रिघालें. ॥ २७

पूजुनी सकळ विप्र, दक्षिणा देउनी, नृप करि प्रदक्षिणा, ।
हस्त जोडुनि म्हणे, 'निवारिलें पाप, पांडुकुळ सर्व तारिलें.' ॥ २८

मखप्रवर पावला [13]अवभृथांत सिद्धीस हा,
सहाय भुवनत्रयप्रभु रमापती [14]कंसहा; ।
[15]सहानुजनृपस्तुति [16]त्रिजगदाननीं यास्तव,
स्तव [17]श्रितसुरद्रुचा परि मुरारिचा वास्तव. ॥ २९

[18]विप्र क्षत्रिय वैश्य शूद्र सकळ प्रेमें नृपें अर्चिले,
[19]यज्ञोपादित वित्तराशि पहिले ते कोशही खर्चिले, ।

---

१. समुद्राच्या पोटांत. २. सेवकीं. ३. कृष्णानें चैद्याचा वध केला, यांत त्यानें त्याजवर दया केली असें म्हटलें आहे, याचें कारण चैद्यज्योतिचा कृष्णामध्यें प्रवेश झाला हा त्याच्या विरोध-भक्तीचा सुपरिणाम होय. सारांश चैद्य हा कृष्णरूप झाला, तो सरूपता मुक्ति पावला आणि यथापूर्व भगवंताचा पार्षद झाला. ४. दयासागर. [शेवधि=निधि. 'निधिर्ना शेवधिः' इत्यमरः । शेवं (सुखं) धीयतेऽस्मिन्निति शेवधिः.] ५. वि+ईश+आत्त+असु+अहिचीं=पक्षी+प्रभु+ग्रस्त+प्राण+सर्पांचीं=पक्षिश्रेष्ठ गरुडानें ग्रासिले प्राण ज्याचे अशा सर्पांचीं. ६. विषानें. [क्ष्वेड=विष. 'क्ष्वेडस्तु गरलं विषम्' इत्यमरः.] ७. मत्त गजनाथाच्या मस्तकांतील मोत्या-विषयीं. ८. श्वापदें. ९. लीलेलें ध्वस्त (हत) अराति (शत्रु) जेणें अशा प्रभूच्या. १०. दाखविलेल्या कृतीला. ११. सामान्य जनांतें. या २७ व्या श्लोकाला व मागच्या २६ व्या श्लोकाला मूळांत आधार नाहीं. १२. चंद्राचें. १३. यज्ञांतींच्या स्नानांत. [अवभृथ(पु०)=यज्ञसमाप्तीनंतर क्रियेसह दीक्षासमाप्तीसाठीं करतात जें स्नान तें.] १४. कंसहंता. १५. धाकट्या भावांसह धर्मनृपाची प्रशंसा. १६. त्रिजगद्+आननीं=त्रिजगताच्या+मुखांत=सर्वांच्या मुखांत. १७. आश्रितांचा भक्तांचा कल्पतरु जो मुरारी कृष्ण त्याचा स्तव वास्तव (यथार्थ) होय. १८. श्लोक ५३ पहा. १९. यज्ञार्थ नवीन संपादिलेले.

गेले सर्व निरोप घेउनि निज[1]स्थाना, तिहीं गायिला
शौरी[2], यत्पदपद्मरेणु[3] पढवी देवांचिया गायिला. ॥ ३०
सुखी झाले सर्व, स्वमनिं म्हणती, 'स्वस्तरु[4] सेवा[5]
स्वयें मानी दुर्योधनचि करि अत्यंत रुसवा. ।
सदुत्कर्षा साहे, न पळ खळधी दोष[6]कलिला
वृथा वांछी पापी धरुनि हृदयीं रोष कलिला[7]. ॥ ३१

---

## अध्याय पंचाहत्तरावा.

'कां दुर्योधनमात्र पात्र सुमखीं[8] झाला विषादास[9]? तें
सांगा हो! शुकदेव! सेवकमना आश्चर्य हें भासतें.' ।
ऐसा प्रश्न करी परीक्षित, तया लागे कथा सांगणें
तीं वाक्यें स्फटिकांगणें विमल म्यां बाळें[10] न कां रांगणें[11]? ॥ १
पावावा राजसूय क्रतु नृप[12]पतिचा सिद्धिला हा निकाम[13]
प्रेमा चित्तांत घेती म्हणुनि सुमति ते बंधु वांटूनि काम, ।
झाला पाकाधिकारी[14] निजगुरुवचनें[15] भीम काळोपपन्नें[16]
अन्नें सन्नेत्ररम्यें[17] करवि[18] बहु सुधेहूनि शुद्ध प्रसन्नें. ॥ २
नृपें केला दुर्योधन धनपती[19] भाउचि तया
मखीं वित्ताध्यक्षापरिस[20] वरि शोभा उचित या, ।

---

१. श्लोक ५४ पहा. २. कृष्ण. ३. ज्या कृष्णाचा पादपंकजसंबंधी रजःकण देवांच्या गाईला (कामधेनूला) पढवी म्हणजे कामधेनूचाही गुरुभक्त मनोरथ पूर्ण करण्याविषयीं तत्पर असतो. ४. कल्पतरु. ५. यज्ञास. ६. मात्सर्यादि दोषांनीं दूषित (खळधी.) ७. कलहास. ८. यज्ञश्रेष्ठांत, उत्तम यज्ञांत. ९. खेदास. १०. बाळें. (मोरोपंतानें.) ११. वाङ्मयस्फटिकांगणांत म्यां पंतानें कां रांगू नये? अवश्य रांगावें. १२. धर्मराजाचा. १३. अत्यंत. १४. महानसाध्यक्ष. (पाकस्थानाचा अधिकारी.) १५. धर्माच्या आज्ञेनें. १६. योग्यसमयीं प्राप्त झालेलीं. १७. साधुलोचनरमणीय अशीं. १८. पाकक्रियाप्रवीण अशा सेवकांकरवीं तयार करवी. [भीम हा नलराजासारखा सूपशास्त्रकुशल होता व विराटाच्या घरीं तरी त्याची योजना याच कामावर झाली होती हें पुराणांत सुप्रसिद्ध आहे.] १९. धनाध्यक्ष (श्लो० ४). कोषभांडार राखण्याचें आणि राजांनीं आणलेल्या उपायनांचा हिशोब ठेवण्याचें काम दुर्योधनाकडे होतें. विदुराकडे खर्च करणें, कृष्णाकडे विप्रांचे पाय धुणें, अश्वत्थाम्याकडे ब्राह्मणसत्कार, संजयाकडे राजसत्कार, भीष्मद्रोणांकडे अधिकउणें (कृताकृत) पाहणें, दुःशासनाकडे भक्ष्यभोज्य, कृपाचार्याकडे द्रव्याची देखरेख—अशी कामांची व्यवस्था धर्मराजाच्या यज्ञांत होती. २०. कुबेरापेक्षां.

[1]जनाच्या सन्मानीं कुशल सहदेव ऋतुवरीं
करी तैसें नाहीं [2]पटुपण वसंतीं ऋतुवरीं. ॥ ३
दे पूतत्व यदंघ्रि[3]पद्मधुनिची तीर्थव्रजा चाकरी
तो आंगें अधिकार वि[4]प्रचरणप्रक्षालनाचा करी ।
[5]श्रीवक्षोजयुगाहुनी मुनि[6]पदस्पर्श स्वयें तो भलें,
जाणो दे सुख [7]पाणियुग्म विभुचें याकारणें [8]लोभलें. ॥ ४
पांचाली करि [9]परिवेषणाधिकारा, [10]वाराणस्यधिपतिचीच काय [11]दारा, ।
आराध्या [12]सुरलतिकांचियाहि [13]वारा, त्या [14]राज्ञीप्रति सुरभि स्तवी [15]उदारा. ॥५
कर्णासि दे [16]नरपती अधिकार [17]दानीं, तो व्यासकौशिकपराशरनारदानीं ।
वाखाणिला [18]नृप रुचे न तयाच कांहीं मागीतल्याविण अभीप्सित याचकांहीं. ॥ ६
'ज्यांची वार्ता' भल्यांचे म्हणति 'अमृतसी सर्वदा प्यावि' कर्ण
[19]क्षत्ता तो, आणखींही [20]कुरुपसुतशतीं जो [21]महात्मा वि[22]कर्ण, ।
ऐसे कित्येक[23] [24]धर्मप्रियकर सुमती धर्मकृत्यास दाते
ज्ञाते यज्ञप्रसंगीं जपति नृपसखे ज्ञाति बंधू सदा ते. ॥ ७

---

१. आलेल्या लोकांचा पूजाद्रव्यादिक द्वारा सन्मानपूर्वक गौरव करण्याचें कामीं सहदेव नियुक्त होता. २. कुशलपण. ३. गंगेची. यदंघ्रिपद्मधुनिची चाकरी तीर्थव्रजा (तीर्थसमुदायाला) पूतत्व (पावनत्व, पवित्रपणा) दे—असा अन्वय. ४. ब्राह्मणांचे पाय धुण्याचा. ५. लक्ष्मीच्या कुचयुग्मस्पर्शाहून. ६. पादावनेजन (पादप्रक्षालन) श्रीकृष्ण करी. (श्लो० ५.) ७. करद्वय. ८. आसक्त झालें, लुब्ध झालें. ९. पात्रें वाढण्याच्या अधिकारास. (परिवेषण=अन्न वाढणें, वाढप.) १०. विश्वेश्वराचीच. ११. अन्नपूर्णा. १२. कल्पलतांच्या. १३. समुदायास जी आराध्या. १४. त्या (सुप्रसिद्ध अशा) द्रौपदीला. येथें जें द्रौपदीचें वर्णन केलें तें वाचकांनीं मूळाशीं ताडून पाहून पंतांनीं काय ज्यास्त केलें आहे, व भागवतकारांवर चढ केली आहे किंवा नाहीं याचा निर्णय करावा. १५. उदारा सुरभि. १६. धर्मराज. १७. कर्णाच्या दानाधिकारास अनुलक्षून असें वर्णन आहे:—'वदान्य दाता कर्णासम । याचकेच्छाप्रद निःसीम । तुलने एक कल्पद्रुम । किंवा राम दाशरथि ॥ १ ॥ परंतु पांडवांसीं वैर । कौरवस्नेह वाहे सधर । तया कर्णा दानाधिकार । जाणोनि उदार नेमियला ॥ २ ॥ सरावी शत्रूची संपत्ती । म्हणोनि वांटी उदारहस्तीं । तेणें धर्माची यशकीर्ती । झाली पसरती त्रिजगांत ॥ ३ ॥ गांधार देखे धनसंपदा । तों तों हृदयीं पावे खेदा । कर्ण वांटी मानूनि मोदा । सदासर्वदा सरावया. ॥ ४ ॥ अनंत हस्तें पुरवी हरी । अढळ संपदा धर्माघरीं । कर्णें वांटितां नानापरी । त्रिजगीं भरी तत्कीर्ति ॥ ५ ॥' ('हरिवरदा'—अध्याय ७५ श्लो० ५ टीका ओंव्या ५१-५५ पहा.) १८. दुर्योधन. १९. विदुर. २०. कौरवसुत (धृतराष्ट्रपुत्र). २१. महामनस्क. २२. विकर्ण हा दुर्योधनाचा बंधु, हा सरळमनाचा आणि निष्कपट होता. २३. सात्यकि, कृतवर्मा, भूरिश्रवा, संतर्दन इत्यादि. २४. धर्मराजाचें प्रिय करणारे.

झाला यज्ञ समाप्त [1]साप्त नृप तो गंगेंत संगें हरी
घेवूनि, [2]प्रचुरोत्सवें [3]अवभृथस्नान प्रमोदें करी; ।
तीर्थें सर्वहि तेथ एकवटलीं [4]पापर्धिचीं घातकें
[5]पाप्याचीं लय पावतीच करितां स्नानें [6]महापातकें. ॥ ८
वाद्यें [7]वाजति नर्तकीगण तईं अत्युत्सवें नाचती,
बंदी [8]मागध [9]सूत वर्णिति यशें, श्री वर्णवेनाच ती; ।
त्याकाळीं सुर पुष्पवृष्टि करिती, गंधर्व गाती रसें,
शक्राचें [10]पुरं शोभलेंचि न कधीं [11]देवापगातीरसें. ॥ ९
आनंदें [12]कुरुवृष्णिभूपवनिता गंगेंत [13]गंगावनें
तेथें [14]मातुलपुत्रदेवरजना [15]त्यां सिंपिती [16]पावनें; ।

---

१. स्वजनांसह, सदस्य, ऋत्विज, वृष्णिभोजांधक, यादव, सृंजय, कांबोज, कुरुकेकयकामल इत्यादिकांसह. (श्लो० ११-१२ पहा.) २. मोठ्या उत्सवानें. ३. यज्ञांतीचें स्नान. ४. पाप+ऋद्धिचीं=पापवृद्धीचीं. ५. श्लो० २१ पहा. ६. मोठीं पापें. सर्व पापांत पांच पापें मोठीं मानिलीं आहेत. तीं हीं:—'ब्रह्महत्या सुरापानं स्तेयं गुर्वंगनागमः । महांति पातकान्याहुस्तत्संसर्गश्च पंचमम् ॥' याचा अर्थः—ब्रह्महत्या, सुरापान, ब्राह्मणाचें दहा मासे किंवा अधिक सोनें चोरणें, गुरुपत्नीगमन, हीं चार व यांशीं संसर्ग करणें हें एक अशीं पांच महापातकें होत असें मन्वादिक म्हणतात. ७. श्लोक ९-१० पहा. ८. स्तुतिपाठक, भाट इत्यादि. ९. श्लोक १३ पहा. १०. अमरावतीनगर. ११. देव+आपगा+तीरसें=सुर+नदी+तटासारखें=भागीरथीच्या तीरासारिखें. १२. कुरुभूपांच्या आणि वृष्णिभूपांच्या स्त्रिया. १३. गंगा+वनें=गंगानदी+उदकें=गंगेच्या उदकानें. १४. मावळे, पुत्र, दीर इत्यादि जना. १५. 'तया नृपांचिया नृदेवी । धर्मराजाच्या अवभृथोत्सवीं । निःशंक क्रीडत्या साल्या सर्वी । जेंवि सुपर्वी सुरसदनीं ॥ १४० ॥ कनिष्ठ बंधु निजकांताचे । देवर तयांसि म्हणिजेत साचे । मातुळादिपितृष्वसांचे । तनय मेहुणे सुहृद सखे ॥ १४१ ॥ चुलते आता चुलतमामे । ऐसे संबंधी गोत्रनियमें । तत्पुत्र मेहुणे सुहृत्प्रेमें । सखे या नामें बोलिजती ॥ १४२ ॥ ऐसिया सखिवर्गी देवरां- । माजी निःशंक नृपवरदारा । गंगेमाजी शिंपिती नीरा । आर्द्रांबरा प्रगटांगा ॥ १४३ ॥ भूभुजभोग्यें सूक्ष्मवसनें । जळविहारीं भिजलीं क्लिन्नें । त्वचेसमान तनु संलग्नें । अवयव तेणें स्फुट दिसती ॥ १४४ ॥ सखयां सुहृदां देवरांवरी । करचापल्यें शिंपितां वारी । अंबरें न धरतीच शरीरीं । उघडा गात्रीं क्रीडती त्या ॥ १४५ ॥ पादांगुष्ठादि शिरोरुह- । पर्यंत निगूढ वनितादेह । क्रीडाप्रसंगें निःसंदेह । देखती समूह यूनांचे ॥ १४६ ॥ अवयवांमाजी गोपनायोग्य । क्रीडासमयीं भर्तृभोग्य । तेही अवयव दिसती सांग । जळक्रीडेच्या प्रसंगें ॥ १४७ ॥ मध्य म्हणिजे कटिपदसंधी । मांडिया जाणिजे ऊरु या शब्दीं । वक्षोज कुच नामें प्रसिद्धी । कथितां प्रकट जाणिती ॥ १४८ ॥ ऐसे स्त्रियांचे गुप्तावयव । जळविहारीं उघडेचि सर्व । अपरशरीरांमाजी ठाव । उघडे झांकले न पुसावे ॥ १४९ ॥ जयांचे अंगुष्ठ न दिसती

दे उन्मोद विनोद तो, दमविती जैं पुंसमूहा[1], रिघे
त्यांत[2] श्रीपतिही सहाय, तरि ती न स्त्रीचमू[3] हारि[4] घे[5]. ॥ १०
पहातां ते होति स्मरशरवशस्वांत[6] मळधी,
सर क्षोभे पूरें, परि तदयुतेंही[7] न जलधी; ।
रतीशाचीं[8] साचीं धगधगित[9] अस्त्रें न रमणी[10],
न झांकी नेत्रातें निरखुनि तयां तो नरमणी. ॥ ११
झाला यज्ञ समाप्त, विप्र नृपति ज्ञाति प्रजा तर्पुनी
धर्में[11] बोळविले, अलंकृति मणी यानांबरें अर्पुनी; ।

दृष्टी । त्या नृपांगनांच्या सर्वांगयष्टी । अवभृथजळचर्याराहटी । करितां सृष्टी स्फुट दिसती ॥१५०॥ उत्कट क्रीडेचा विशेष । तेणें मुक्त वेणिकाकेश । च्यवती ग्रथित पुष्पघोष । वनिताविलास औत्सुक्यें ॥ १५१ ॥ चामीकराभ गौरा तरुणी । नव्हती दरिद्रा निराभरणी । सालंकृता सर्वभूषणीं । नृपकामिनी कमनीया ॥ १५२ ॥ देखोनि त्याच्या अंगयष्टी । कामविकारें समळ पोटीं । तया नरांच्या जडल्या दृष्टी । लाळ घोंटिती संकल्पें ॥ १५३ ॥ ब्रह्मचारी स्नातक यती । वेदपारंगत सांगों किती । अपक्व साधनीं स्मरमळ चित्तीं । नेत्र न लविती तें पाहतां ॥ १५४ ॥ देवर मेहुणे सखी समाजीं । नृपांगना ज्या क्रीडाभाजी । क्रीडती त्याचें कौशल्य सहजीं । जनपदराजी अवलोकी ॥ १५५ ॥ जलविक्षेपयंत्रें नाना । चर्म निर्मितें वैणवें जाणा । हैमें राजतें शौल्बें कोण्हां । कोण्हां केवळ करांजळी ॥ १५६ ॥ गौरसैक्षवप्रमुख रस । सुगंध सस्निग्ध द्रव्यें विशेष । यंत्रीं भरूनि वनिता तोष । मानूनि यूनां शिंपिती त्या ॥ १५७ ॥ चिपोळ्या चमत्कारें चिरकांडी । लक्षूनि यूनां नाकीं तोंडीं । सोडितां बोडविती ते गांडी । तोंडें वांकुडीं करूनियां ॥ १५८ ॥ ऐसे रुचिर मनोहर । नृपांगनांचे जलविहार । अवभृथ नाहतां युधिष्ठिर । समस्त नागर अनुभविती ॥ १५९ ॥ निगूढा नृपांगनांची क्रीडा । उद्दाम कथिली विगतव्रीडा । सामान्य जनाच्या विलासकोडा । उमजें सुघडा न सांगतां ॥ १६० ॥ धर्मराजा तये काळीं । ऐसी वेष्टित नृपमंडळी । पातला भागीरथीचे कूळीं । तेंही समूळीं परिसावें. ॥ १६१ ॥' ('हरिवरदाग्रंथ'—अध्याय ७५ श्लोक १७ यावरील टीका पहावी.) १६. पवित्रें.

१. पुरुषसमुदायास. २. पुरुषसमूहांत. ३. स्त्रियांची मंडळी. ४. अपजय. ५. हारि घेणें—अपजय, पराभव पत्करणें. ६. मदनाच्या बाणास वश झालें अंतःकरण ज्यांचें असे. ७. पूरांच्या अयुतानेंही. ८. मदनाचीं. ९. प्रज्वलित. या चरणांत 'अपन्हुति' अलंकार झाला आहे. १०. स्त्रिया नव्हत तीं अस्त्रेंच. ११. 'धर्मराजेंसुपूजित । सर्व भूभुज अंगनासहित । बंधु ज्ञाति मित्र आप्त । सुहृद समस्त जनपदही ॥ २१५ ॥ ऐसे स्वर्चित सर्वजन । रुचिराभरणीं शोभायमान । शोभते झाले अमरांहून । मर्त्यभुमीं संमानें ॥ २१६ ॥ जडित मुकुट नृपांच्या मौळीं । इतरां उष्णीषें मौळागळीं । मणिमय कुंडलें श्रवणयुगळीं । मुक्तमाळा रत्नहार ॥ २१७ ॥ कौशेय पीतांबर परिधानें । कंचुकोपकंचुक अंगत्राणें । चरणकंचुक सुरंग वसनें । दिव्य प्रावरणें अमूल्य

राहे सानुज तो सुयोधन नृप भ्रात्याचिया संनिधी
प्रेमें राहविला सदार भगवान् लक्ष्मीपती संनिधी. ॥ १२
पाहे तो धृतराष्ट्रसूनु भगवद्दासाचिये संपदे,
जों जों तों अतिमात्र त्यास रविभा घूका तसी कंप दे; ।
मोठेही नरदेव सेवक तसे आज्ञा शिरीं वाहती,
नानावस्तुकर प्रवेशरहित द्वारीं उभे राहती. ॥ १३
जी संपत्ति अजातशत्रुसदनीं तीला न सीमा, नवीं
नानावस्तु विलोकिलीं न कधिंही स्वप्नीं तसीं मानवीं; ।
देवब्राह्मणसाधुवृंदहि मखामध्यें चमत्कारलें,
ऐसें सज्जनभाग्य गोड, परि त्या झालें खळा कारलें. ॥ १४

---

॥ २१८ ॥ कंठीं आपाद सुमनमाळा । कुसुमावतंस खोंविले मौळा । गंधाक्षता परिमळउधळा । यज्ञशाळा मघमघित ॥ २१९ ॥ अनर्घ्यरत्नमणींचे हार । केयूरांगदें कटकें रुचिर । मुद्रिकामंडित चंचळ कर । स्वर्चित ते नर सुर गमती ॥ २२० ॥ तैशाच नारी दिव्याभरणीं । सुभगा लावण्यललामश्रेणी । दिव्य कुंडलें जडित रत्नीं । श्रवणभूषणीं विराजती ॥ २२१ ॥ अलकग्रथित वेणिका पृष्टीं । ग्रथिल्या दिव्याभरणाभीष्टीं । मस्तकीं मौळभूषणाची थाटी । मुक्ताजालिया उज्वळिता ॥ २२२ ॥ वेणिका मौळें ग्रथिलीं सुमनीं । अमूल्य मुक्ताफळें घ्राणीं । मंगळसन्निभ गोमेदमणी । समुक्त नथनी लेइलिया ॥ २२३ ॥ दंतीं वज्रमणींच्या पंक्ती । तांबूलरंगें सुरंग दीप्ति । माणिक्यप्रभा बोप देती । मंदस्मितीं प्रकाशतां ॥ २२४ ॥ गळसरिया कृतकृष्णमणि । तदनुक्रमें मुक्तश्रेणि । एकावळी कंठाभरणीं । अनर्घ्य पदकें विराजती ॥ २२५ ॥ बाहुभूषणें रत्नजडित । चुडे मनगटीं पुरटघटित । मुद्रिका कराग्रीं झळकत । ते प्रभा फांकत नभोगर्भीं ॥ २२६ ॥ परिधान पीतांबर पट्टकुलें । रत्नें जडिलीं स्वर्णमेखळे । झणत्कारिती वांकी वाळे । अंदु नूपुर रुणझुणिती ॥ २२७ ॥ अणवट जोडवीं पोल्हारें । विरोद्या झिणिया वृश्चिकाकारें । इत्यादि मंडित अळंकारें । वनिताशरीरें विराजती ॥ २२८ ॥ एवं धर्मराजें अध्वरीं । सर्वही पूजिले यथाधिकारीं । शोभती सालंकृत नरनारी । अमराप्सरी पडिपाडें ॥ २२९ ॥' ['हरिवरदा'–अध्याय ७५ श्लोक २४ टीका पहावी.]

१. समीप. २. श्लोक २८-२९ पहा. ३. स्त्रीसहित. ४. उत्तम निधान, ठेवा अथवा संतांचा (साधुजनांचा) निधि (ठेवा) असा. (कृष्ण.) ५. दुर्योधन. (श्लोक ३१-३२ पहा.) ६. पांडवांच्या. ७. सूर्याची कांति. ८. दिवाभीत पक्ष्यास. ९. धर्माच्या घरांत. १०. येथें 'वृंद' शब्द नपुंसकलिंगी आहे म्हणून 'चमत्कारलें' असें नपुंसकलिंगी क्रियापद योजिलें आहे. असे प्रयोग पंताच्या काव्यांत अनेक आढळतात. अशा प्रयोगांच्या संबंधानें 'निबंधमालाकार' लिहितात:–'[अशा प्रकारच्या] सर्व प्रयोगांवरून मोरोपंताचा एकंदर रोख तेव्हांच दृष्टीस पडतो. तो अर्थात् हाच कीं, मराठी भाषेस जितकी व्याकरणशुद्धता आणतां येईल तितकी आणायाची. पण इतकेंच नव्हे; वरील उदाहरणा-

ज्या सत्संपत्सुधेनें [1]निकर निववविले निस्पृहा तापसांचे,
नेत्रीं चित्तीं शरीरीं खल कुरुपतिच्या त्या महाताप साचें; ।
श्रीरामाच्या कथेनें [2]विबुधबुधसभा [3]भद्र [4]भावी [5]प्रभूत,
स्वांतीं भावूनि हानि श्रवण न करिती तापती क्षिप्र भूत. ॥ १५
सम्राट् पांडव एकदां निजसभेमध्यें बसे, जी सभा
दिव्या [6]कांचनरत्नराशि [7]रविची सन्मान दे जीस भा, ।
[8]ही एकाचि पतीस जन्मुनि जगीं दे भोग धर्मास, ती
सेवी [9]वज्रभृदुग्रसेननहुषां कैसी [10]सुधर्मा सती? ॥ १६
सुधर्मेच्या ठायीं [11]सहसुरगुरूपेंद्र [12]बलहा
तसा बैसे धर्म क्षितिपतिसभेंत प्रबळ हा; ।
तयापासीं भीमार्जुन [13]यदुप [14]माद्रेय सुमती,
जयांच्या बाहूंतें [15]अनिश वश जाली [16]वसुमती. ॥ १७
शोभा याची [17]मनोज्ञा यदुकुलपतिच्या पांडवांच्या वधूनी
प्रेमें बैसोनि [18]येथें निरखित असतां [19]सद्गवाक्षामधूनी, ।

---

वरून हेंही सहज लक्षांत येईल कीं, संस्कृतांतील व्याकरणप्रयोगही मराठी कवितेंत आणण्याचा त्यानें यत्न केला आहे. हें [पंतांच्या] पूर्वींच्या एकाही मराठी कवीनें मुळींच केलें नसल्यामुळें या शेवटल्या कवीचा यांत मोठा धीटपणा उघड दिसतो. पण हेंचसें काय; प्रस्तुत मालेच्या [निबंधमालेच्या] चवथ्या अंकांत (पृष्ठ २० यांत) सांगितल्याप्रमाणें आमचे बाकीचे महाराष्ट्र कवि बहुतेक सारे व्याकरणापासून केवळ अलिप्त होते असें म्हणण्यासही कांहीं हरकत नाहीं. त्यांत अगोदर विद्वान् म्हणण्यासारखे तीन चारच निघतील; आणि व्याकरणास बुद्धिपुरःसर अनुसरलेला आम्हांस एक मोरोपंतच दिसतो. बाकीच्यांचा कोणाचीही व्याकरणाकडे तशी करडी नजर दिसत नाहीं.' (निबंधमाला–अंक १० पृ० १६-१७.) ११. कौतुकी झालें. १२. दुर्योधनास. १३. कटुफलवत्.

१. समुदाय. २. देवपंडितसभा. ३. कल्याण. ४. मानी. ५. पुष्कळ. ६. सोनें आणि रत्नें यांची राशी अशी. ७. रविची भा जीस सन्मान दे. ८. ही सभा. ९. वज्रभृत्, उग्रसेन, नहुष, इत्यादिकांस जी सुधर्मा सेवी म्ह० भोग देती सती कैसी. १०. देवसभा. (ही अनेकांस भोग देते तेव्हां ती सती असें कसें म्हणतां येईल, पण मयनिर्मित सभा ही एकट्या धर्मासच भोग देते तेव्हां ती खरोखर सती होय–असा भाव.) ११. सुरगुरु, उपेंद्र यांसहित. १२. इंद्र. १३. कृष्ण. १४. नकुळसहदेव. १५. सदां, नित्य. १६. पृथ्वी. १७. सुंदर, मनोहर. १८. धर्मसभेमध्यें. १९. चांगल्या खिडक्यांतून.

तों आला [1]धार्तराष्ट्र प्रकुपित करित [2]द्वास्थधिक्कार भारी,
धर्मोत्कर्षें जळे तो खल कलि, कलिचा कीं [3]सखा कारभारी.॥ १८
चाले जो [4]मणिपट्टकुट्टिमशुभक्षोणिप्रदेशावरी
मानूनि स्थल तें [5]जलभ्रमभरें [6]वस्त्रांत तो सांवरी; ।
हें होतांचि पुढें जल स्थल दिसे राजा पडे सत्वर,
[7]व्रीडेमाजिहि होय तोयहि [8]शिखी, मोही [9]सभाचत्वर. ॥ १९
हांसे भीम सभेंत मांडलिक[10]भूपालादि जे ते जन
[11]स्त्रीही हांसति, माधव स्मित करी [12]ज्यांचें समुत्तेजन; ।
तो धर्मासहि नावरे [13]रसें, जसा सेतूस पूर [14]क्षणीं,
पेरी बीज[15] मुकुंद [16]भार हरिता जो सिद्ध भूरक्षणीं. ॥ २०
[17]मानी भूप सुयोधन स्वहृदयीं मानी महाहानिला,
स्त्रीनींही अपमानिला, नरवरीं जो नित्य सन्मानिला; ।
लाजे राजसभेपुढें बहु [18]कुढे, कीं दुर्दशा नूतना
प्राशी [19]तोषयशासि, त्याहि [20]शिशुला ती राक्षसी पूतना. ॥ २१
फिरे मागें रागें न पुसत [21]पुरा जाय, पहिला
मनीं दावा ठावा, परि दुखविलें त्याचि [22]अहिला; ।
महामानी मानी मरण उपहासाहुनि हितें[23],
प्रजा मोठे खोटे म्हणति मुनि जे तेचि विहित. ॥ २२
बैसे [24]खिन्न अजातशत्रुचि [25]सुहृत्प्रेमक्षया शोचित,
स्वांतीं कृष्ण हंसे, रचूनि कलह [26]क्ष्माभारनाशोचित; ।

१. श्लोक ३६ पहा. २. द्वारपालांचा तिरस्कार करी. ३. या चरणांत उत्प्रेक्षा नामक अलंकार आहे. ४. रत्नखचित उत्तम भूमीवर. ५. जळभ्रांतीनें. ६. झगा इत्यादि वस्त्रांचे पदर. (श्लोक ३७ पहा.) ७. लज्जेंत तोयहि (पाणी सुद्धां) अग्निप्रमाणें तापद झालें. ८. अग्नि. ९. सभांगण त्या दुर्योधनाला मोहून टाकी. १०. या स्थळीं यतिभंग झाला आहे. ११. श्लोक ३८ पहा. १२. हास्यरसाचें. १३. हास्यरस. १४. त्याच क्षणीं. १५. कलहाचें बीज. १६. पृथ्वीचा भार हरणारा. १७. अभिमानी. १८. खेद करी. १९. संतोष आणि कीर्ति यांचा नाश करी. २०. दुर्योधनरूप बालकास. २१. हस्तिनापुराला. (श्लोक ३९ पहा.) २२. सर्पाला. २३. कल्याणकर. २४. विमनस्क. २५. दुर्योधनाच्या प्रीतिक्षयास. २६. भूभार-नाशास योग्य.

नाचे **ना**रद भव्य **न**व्य यश जें तत्सद्रसां गावया,
जाय [१]**श्रीशिववा**सवस्वजनकां तें [२]भद्र सांगावया. ॥ २३

---

## अध्याय शाहत्तरावा.

**चै**द्याचा मित्र **शा**ल्व [३]प्रथितबलयशा **रु**क्मिणीच्या विवाहीं
लीलेनें **मा**गधादिक्षितिपसहित जो जिंकिला **या**दवांहीं, ।
तो दुर्धी 'सर्व**वृ**ष्णिक्षय करिन करें मी' अशा या पणातें
बोले 'आलेचि [४]पृष्ठव्रण,' पण नुमजे दुर्बळा आपणातें. ॥ १
व्हावा **शं**भु प्रसन्न त्वरित, म्हणुनि तो न स्वराज्यादि लक्षी,
[५]अक्षीणस्थैर्यधैर्य प्रखर तप करी, धूळिची मुष्टि [६]भक्षी, ।
रक्षी [७]पूर्णाब्द ऐसा कृतनियम जपे [८]**आ**शुतोषास, खोटा
पोटामध्यें, [९]वैरीच प्रकट धरि [१०]तपस्वींद्रवेषा चखोटा. ॥ २
प्रसाद न करि प्रभु त्वरित कीं खळें [११]वाग्यतें
तपें अनशनें कसें निरखिजेल [१२]सद्भाग्य तें. ।
तरी चरण दाविले [१३]वरदराज [१४]**भा**लेक्षणें,
जयासि अवलोकितां मुनि कृतार्थ झाले क्षणें. ॥ ३
जेव्हां भेटूनि **वि**श्वेश्वर वरद म्हणे, '[१५]वांछिता माग, राया !'
मागे स्वाभीष्ट **शा**ल्व क्षितिपति कुमती तो दयासागरा या. ।
'[१६]दे देवा ! [१७]यान ऐसें असुरसुरनरा राक्षसांतें डसावी
[१८]यद्भी व्याली [१९]अभेद्य प्रबळ परम जें [२०]**यां**दवां भेडसावी.' ॥ ४

---

१. सदाशिव, इंद्र, ब्रह्मदेव यांस. २. कल्याणवृत्त. ३. प्रसिद्ध आहे बळ व यश ज्याचें असा. ४. पाठीवर घाव. ५. ज्याचें स्थैर्य आणि धैर्य ही परिपूर्ण होतीं असा. (शाल्व.) ६. एक मुष्टिमात्र धूळ भक्षून शंकराला आराधी असा तो नियमशाली होता. (श्लोक ४.) ७. एक पूर्ण वर्ष. ८. सदाशिवास. [आशु+तोष=लौकर+संतोष=स्वल्प सेवेनें (लौकर) संतुष्ट होतो म्हणून शंकराला 'आशुतोष' असें म्हणतात.] ९. बाह्यात्कारीं. १०. मोठ्या तपस्व्याच्या वेषाला. ११. वाणीनें बद्ध. १२. शिवदर्शन. १३. वर देणाऱ्यांचा राजा. (शंकर.) १४. उमापतीनें. १५. इष्ट वस्तूतें. (श्लोक ५.) १६. श्लोक ६ पहा. १७. विमान. (सौभसंज्ञक पुर.) १८. ज्या यानाची भीरूप व्याली (सर्पीण) दैत्य, देव, राक्षस आणि मनुष्य यांना डसावी (चावावी). १९. ज्याचा कशानेंही भेद (भंग) होऊं नये असें. २०. यादवांना भय देणारें. (श्लोक ६.)

आज्ञापूनि [1]मयास यान करवी जें देव तें [2]कामग,
[3]ध्वांतागारचि [4]लोहनिर्मित, न त्या उत्साह दे कां मग? ।
बैसे शाल्व तयांत सैन्यहि भरी, श्री[5]द्वारकेला करी
ध्वस्ता, [6]पुष्करिणीस जेंवि सकुळ ग्रीष्मांत गेला [7]करी. ॥ ५
काळें 'सौभ'विमान लोहमय, तो राहू [8]मृगांका पुरा
आला काय गिळावयासि? अथवा तो वन्हि त्या कापुरा; ।
उद्यानें विमथूनि ती बहुबलोदग्रा चमू ढांसळी,
[9]प्राकारासहि शाल्व दावुनि [10]महामाया विमूढा [11]छळी. ॥ ६
शिळा धूळि [12]व्यालाशनि विटपि [13]वर्षोपळ [14]घनें
क्षणामध्यें वर्षे, अपरिमित जैसें जळ घन; ।
क्षय प्रासादांचा करि खळ, पडे [15]गाढ तमही,
पुरी कांपे, जेंवि [16]त्रिपुर असतां वाढत मही. ॥ ७
भ्याले पौर समस्त, त्यासि अभय प्रद्युम्न दे [17]तातसा,
लोकीं एकचि [18]तारकार्दितसुरां [19]क्रौंचारि देता तसा; ।

---

१. मयासुराला. २. पाहिजे तिकडे जाणारें, इच्छागामि. ३. अंधकाराचें घर, जें केवळ अंधकाराचें आश्रयस्थानच होतें. ४. अयस्मय. ५. द्वारावतीला. ६. ही उपमा मूळांत नाहीं. हें पद्य पंताच्या समर्पक योजकशक्तीचें द्योतक होय. ७. हत्ती. ८. चंद्ररूप द्वारकापुरास. ९. तट. १०. मोठें कपट, इंद्रजालविद्या. ११. छळी. १२. सर्प (व्याल) आणि वज्रें (अशनि). (श्लोक ११ पहा.) १३. वर्षाकालांतील उपल (गारा). १४. निबिड, दाट. १५. दाट काळोख पडे. १६. त्रिपुरासुर. (श्लो० १२.) त्रिपुरासुरानें जशी मही (पृथ्वी) कांपविली तशी शाल्वानें द्वारकापुरी कंपित केली. १७. कृष्णासारखा. १८. तारक नामक असुरानें अर्दित (पीडित) जे सुर त्यांला क्रौंचारि (षडानन) जसें अभय देता. तारक=वज्रांग दैत्यास वरांगीपासून झालेला पुत्र. या दैत्यानें पारियात्रपर्वतावर उग्र तप करून ब्रह्मदेवापासून वर मिळविला. त्यामुळें तो सर्वांस अजिंक्य झाला. शिववीर्योत्पन्न पुत्राच्या हातून याचा मृत्यु होता. हा प्राप्त झालेल्या वराच्या जोरावर देवांस फार त्रास देऊं लागला. तेव्हां त्यांनीं प्रजापतीची प्रार्थना केली, व त्याच्या योगें त्यांना तारकासुराच्या मरणाचें साधन कळून आलें. सातां दिवसांच्या बालकावांचून इतरांच्या हातून मृत्यु नसावा असा याला वर होता व हा बालक शिवपुत्र होय असेंही त्यांस कळलें. पुढें त्यांनीं शिवपार्वतीचा विवाह होऊन पुत्र व्हावा अशी योजना केली. नंतर कार्तिकेयाचा अवतार झाला. त्यानें आपल्या सातव्याच दिवशीं तारकाचा पराभव केला. ही कथा 'कुमारसंभव' नामक सुप्रसिद्ध महाकाव्यांत आहे, ती इष्ट तर तेथें पहावी. १९. कार्तिकस्वामी. क्रौंच+अरि=पर्वतविशेष+शत्रु. क्रौंच पर्वताला बाण मारून मारून स्कंदानें आणि परशुरामानें आरपार भोंक पाडिलें म्हणून त्या दोघांलाही 'क्रौंचारि' 'क्रौंचदारण' 'क्रौंचसूदन' 'क्रौंचाराति' अशीं नांवें आहेत. 'क्रौंच' हा

झाला सिद्ध सयादव प्रभुसुत[1] व्यालावरि व्यालहा[2]
कीं हस्तीवरि सिंह, कीं खवळला दुष्टांतकृत् काल[3] हा. ॥ ८
न धरि लेश मनीं परवा रणीं, शरनखी[4] हरि[5] तो परवारणीं,[6] ।
करि पळांत महाभय दक्ष[7] तें, म्हणति युद्ध भलें जयद[8] क्षतें.[9] ॥ ९
प्रद्युम्नाच्या पहातां असुरसुरनरीं निस्तुळा[10] सौभगातें,[11]
झाली लोलों[12] जयश्री वरुनिहि विटली त्या खळा सौभगातें;[13] ।
सेना सेनों[14] शरार्ता धरि भय, न सुचे तेधवां चेलं[15] काय,[16]
स्वामी ज्याचा न ठाके मृगरिपुसमरीं[17] यूथ[18] वांचेल काय?[19] ॥ १०
मायामेघघटा[20] पळांत उडवी प्रद्युम्न तो वात[21] कीं,
मायाध्वांतरवीच[22] नाम हरिचें तें त्या महापातकीं; ।
व्योमीं[23] दृश्य अदृश्य सौभ न टिके याच्यासमोर क्षण,
स्तोत्रानर्ह[24] जरी, तरी करि असा जो भाव[25] तो रक्षण. ॥ ११

---

हिमालयाचा नातु होय. कोणी कोणी 'क्रौंच' हें हिमालयाचें एक शिखर समजतात. [थोरले शास्त्रीबुवाकृत–मेघदूत–द्वितीय आवृत्ति–पृष्ठ २० साकी १४१-१४२ पहा.] स्कंदानें तारकासुराचा पराभव केला म्हणून त्याला 'तारकजित्' अशी संज्ञा आहे. 'कैलासे धनदावासे क्रौंचः क्रौंचोऽभिधीयते' इति बृहद्धारावली.

१. प्रद्युम्न. २. गरुड. [व्यालहन्=सर्पांचा हन्ता=गरुड.] ३. यम. ४. शर हेच नखें ज्याचीं असा. ५. सिंह. ६. शत्रुरूप गजावर. ७. रणदक्ष. ८. जय देणारें. ९. व्रणें. १०. अनुपमा. ११. सुभगपणातें. १२. आसक्ता. १३. शाल्वातें. [सौभ+गा=सौभनामक पुरांत गेलेला जो शाल्व त्यातें, सौभवर्ती शाल्वातें] १४. पतिसहिता. [स+इन=सहित+स्वामी, प्रभु. 'इनः सूर्ये प्रभौ' इत्यमरः.] १५. वस्त्र. १६. शरीर. १७. सिंहासीं युद्ध करण्यांत. १८. गजसमूह. १९. हा चरण सुभाषितरूप आहे. २०. कपटरूप मेघांचा समूह. २१. वायु. २२. कपटरूप अंधकारास रवीसमान. (श्लोक १७.) २३. सौभाचें वर्णन अन्यत्र आढळतें तें असें:—'प्रद्युम्नप्रमुख यादववीर । पाहती सौभसेनाभार । तंव ते चंचल अत्यंततर । नोहे स्थिर तिळमात्र ॥ ३५ ॥ गगनीं पवनीं अवनीं जीवनीं । अनेक रूपें दिसती नयनीं । एक किंवा अनेक म्हणोनी । निश्चय कोणी करूं न शके ॥ ३६ ॥ क्षणैक दिसे क्षणैक न दिसे । दूर समीप यथावकाशें । तर्किलें नवचेचि मानसें । चांचल्यवशें चमत्कृता ॥ ३७ ॥ मयासुराची दैत्यमाया । यास्तव लक्षिलें न वचे राया! । अतर्क्य नेत्रां यादवांचिया । भ्रमकर झालें ते काळीं ॥ ३८ ॥ क्षणैक भूतळवटीं दिसे । क्षणैक गगनगर्भीं आभासे । क्षणैक पर्वतमौळीं वसे । क्षणैक विलसे सिंधुजळीं. ॥ ३९ ॥ कोलती आंधारीं गरगर । भवंडितां भासे चक्राकार । न दिसे सांधा भिन्न पदर । तैसें सर्वत्र सौभ दिसे ॥ ४० ॥ एके काळीं स्थिर ऐसें । न वचें निर्धारिलें मानसें । मयमायेच्या भ्रमावेशें । लक्षितां दिसे सर्वत्र ॥ ४१ ॥ ऐसें मयमायेचें कपट । तथापि यादववीर सुभट । समरांगणीं महाधीट । शरसंघाट वर्षती ॥ ४२ ॥' [श्रीहरिवरदा]. २४. स्तवास अयोग्य. २५. दृश्यादृश्यपणा.

व्योमीं सौभ अदृश्य केवळ, गळे ज्याज्यांतुनी [१]लोहित
प्रद्युम्नास नभःप्रदेश गमला युद्धांत तो तो हित; ।
बाणांतें तिकडेचि सोडुनि करी द्विट्[२]सैन्यघात क्षणीं,
[३]तक्षा जेंवि कुठार लावि, शर त्या यानाचिया [४]तक्षणीं. ॥ १२
शाल्वाचा [५]पृतनापती हरिसुतें आधीं रणीं पाडिला,
तेणें सावध होउनी निजगदाघातें उरीं ताडिला; ।
झाला केवळ मूर्छित क्षततनु प्रद्युम्न, [६]तद्रक्षणें
जोडी दारुकपुत्र सूत यश कीं होईल [७]भद्र क्षणें. ॥ १३
पळविला रथ तो बहु सत्वर, त्यजुनि दुस्त्यज तें [८]रणचत्वर, ।
समय होय [९]नयस्मृतिद [१०]क्षताकुलधवावनिं हे करि [११]दक्षता. ॥ १४
होतां विमूर्छित मुहूर्त मग [१२]प्रभूतें, यत्नें उठे, न निरखी समर [१३]प्रभू तें; ।
[१४]सूतोक्त वृत्त परिसोनि म्हणे, 'पळावें हें [१५]योग्य काय, कुल ज्याकरितां मळावें?' १५
'अहा! रे! [१६]दुर्बुद्धे! समर करितां कां पळविलें
मज? स्वक्लीबत्व प्रकटचि रणीं त्या कळविलें. ।
कसें दावावें हें वदन बळकृष्णास कळतां?
असे लज्जा मोठी, यश मलिन केलें सकळ [१७]तां. ॥ १६
[१८]भ्रातृस्त्री पुसतील सुस्मितमुखी मातें, 'अहो! धीर! हो!
भावोजी! समरांगणांत घडलें तेव्हां कसें वीरहो! ।
तेव्हां उत्तर कोण [१९]कोण धरुनि क्लीबा! बसावेंचि [२०]तां
केलें हें, मणिमाजि [२१]इंगळ करा आला कसा [२२]वेंचितां?' ॥ १७
बोले [२३]दारुकपुत्र जोडुनि करद्वंद्वा, 'न मी [२४]कातर,
स्वामी! स्वानुचरा म्हणाल रथ हा त्वां काढिला कां तर? ।
[२५]रक्षावा पतिनें रणीं पडतसे कष्टांत जो सारथी

---

१. रक्त. २. शत्रुसैन्याचा नाश. ३. सुतार. ४. तासण्याविषयीं. ५. पृतना+पति=सेना+नायक. ६. त्या प्रद्युम्नाच्या संरक्षणानें. (श्लोक २६-२७ पहा.) ७. कल्याण. ८. समरांगण. ९. नीतीचें स्मरण देणारा. १०. क्षतानें आकुल (व्याकुल) जो धव (पति) प्रद्युम्न त्याच्या रक्षणाविषयीं. ११. सावधपणा. १२. पुष्कळ (यत्नें). १३. प्रद्युम्न. १४. सारथ्यानें कथिलेलें. १५. हें अयोग्य असें म्हणण्याचें धोरण आहे. १६. हे दुर्मते दारुकपुत्र! १७. तुवां. १८. भावांच्या बायका. [अ० ७६ श्लो० ३१.] १९. कोंपरा. २०. त्वां. २१. निखारा. २२. ही कल्पना मूळांत नाहीं, पंतांनीं समय जाणून येथें योजिली आहे. २३. सारथिपुत्र. २४. भितरा. २५. सूतानें स्वामीला आणि स्वामीनें सूताला संकटसमयीं रक्षावें असा न्याय आहे. [श्लो० ३२.]

सूतेंही व्यसनीं स्वधर्म हृदयीं जाणोनि तैसा [1]रथी. ॥ १८
[2]शत्रुक्षिप्त गदा विमूर्छित करी [3]स्वामीस हें [4]वक्ष तें
जें अस्मद्धृदयांतरींहि रचितें लक्षक्षतें [5]स्वक्षतें ।
यासाठीं रथ काढिला, पुनरपि त्वद्दास या स्यंदना
आज्ञा होइल तेथ नेइल, पहा तें, [6]चक्रभृन्नंदना !' ॥ १९

---

## अध्याय सत्याहात्तरावा.

[7]सूतातें [8]जगदीशनंदन म्हणे, '[9]तो [10]शाल्वसेनापती
तेथें ने रथ, दाखवीं मज गदा जी दे असा ताप ती.' ।
आज्ञा घेउनि दारुकात्मज हय प्रेरी जवें, [11]आगळे
जे चित्ताहुनि, [12]भानुवाजिमद ज्यां पाहोनि सारा गळे. ॥ १
तो [13]कार्ष्णि अवलोकिला [14]निजबळीं [15]जैसा मृगीं लांडगा,
किंवा [16]भाग्यमदें करी बडबड [17]ज्ञानिव्रजीं दांडगा; ।
कीं त्या हंसगणीं शिरोनि मिरवी [18]प्रागल्भ्य [19]काकोळसा,
कीं धिक्कारितसे [20]मलीमसगुणें कस्तूरिका कोळसा. ॥ २
त्या [21]शाल्वध्वजिनीधवाजवळि तो [22]कार्ष्णि क्षणें पावला,
मारायास जसा [23]मृगेंद्र [24]गहनीं [25]दानांधदंतावला; ।
अश्व स्यंदन सूत मर्दुनि करी बाणें [26]शिरःकर्तन
[27]व्योमीं [28]निर्जरनर्तकी निरखिती त्यांचें नवें [29]नर्तन. ॥ ३

---

१. रथी (स्वामी) रक्षावा–असा अन्वय. २. शत्रूनें फेंकलेली. ३. प्रमूल. (तुला–प्रद्युम्नाला.) ४. हें तुमचें हृदय. ५. आपल्या क्षतानें. ६. हे कृष्णपुत्रा प्रद्युम्ना! [सुदर्शननामक चक्र धरणाऱ्या कृष्णाच्या पुत्रा!] ७. या अध्यायांत नानामायाविचक्षण शाल्वाचा वध, आणि सौभनामक यानाचा संहार–अशा दोन कथाभागांचें वर्णन आहे. ८. प्रद्युम्न. [जगदीशाचा=कृष्णाचा नंदन–पुत्र.] ९. द्युमान् नामक सेनापति. (अ० ७७ श्लो० १.) १०. जेथें तो तेथें ने. ११. जे (हय=अश्व) चित्ताहुनि आगळे=चित्तांत न समाविष्ट होणारे असे मोठे, ज्यांच्या आगळेपणाची (मोठेपणाची) चित्ताला कल्पना करतां येत नाहीं असे. १२. भानु+वाजि+मद=सूर्य+अश्व+गर्व. १३. प्रद्युम्नानें. १४. स्वसैन्यांत. १५. हा उपमालंकार होय. १६. संपत्तिगर्वानें, शुभदैवगर्वानें. १७. पंडितसमुदायांत. १८. श्रेष्ठत्व. १९. कावळासा. २०. काळेपणाच्या गुणानें. येथें दिलेले दोन्ही दृष्टांत किती समर्पक आहेत हें अभिज्ञ वाचकांस सांगावयास नकोच. २१. शाल्वाच्या सेनापतीजवळ. [ध्वजिनी=सेना.] २२. कृष्णपुत्र=प्रद्युम्न. २३. सिंह. २४. अरण्यांत. २५. मदोन्मत्तगजा. [दंतावल=गज.] २६. शिरच्छेद. २७. आकाशांत. २८. देवांगना. २९. कबंधनर्तन.

ते शत्रुद्विप[1] सांबसात्यकिगदप्रद्युम्नपंचाननीं[2]
केले फार परासु[3], दावदहनीं[4] शाखी[5] जसे काननीं; ।
झालें उल्बण[6] सप्तविंशति अहोरात्रें[7] महायुद्ध तें,
तावत्काल बराच धीर धरिला शाल्वेंहि अत्युद्धतें. ॥ ४
आला देव[8] अशांत घेउनि पृथापुत्राभ्यनुज्ञा[9] पुरा[10],
तों पाहे भववैद्य[11] तो निजजना शाल्वाख्यरोगातुरा[12]; ।
होता ठावुक दुष्ट दुर्विलसित, क्षिप्र स्वकीयावना[13]
झाला सिद्ध, समिद्ध[14] पावक[15] गिळाया शत्रुरूपा वना. ॥ ५
कोपें केशव दारुकाप्रति म्हणे[16], 'तूं हाक वाहांस[17], तो
पाहों शाल्व खळ, स्वकीयविभवें जो यादवां हांसतो. ।
शीघ्र स्यंदन चालवीं, यदुपुरप्रध्वंस[18] सोसे कसा ?
केला ज्या अधमें पराभव, विषाग्नीनेंच जो सेकसा[19].' ॥ ६
शाल्वासीं गांठि घाली हरि तंव, अहितप्रेरिता[20] शक्ति आली,
व्यालीची[21] काय आली[22] विभुविशिखततती[23] तीस पीतां न धाली[24]. ।
श्रीमत्कृष्णाशुगालिक्षतरिपुरुधिरें[25] ती रणक्षोणि[26] न्हाली;
सौभाची[27] शौर्यशालिप्रभुशरनिकरें[28] चाळनी[29] क्षिप्र झाली. ॥ ७
शाल्वानें कृष्णबाहु प्रखरतरशरें विंधिला सव्य[30], थानें
श्रीचीं जेणें त्यजावीं परि न धनु तरि त्यागिलें सव्यथानें[31]; ।
हस्तापासूनि चापच्युति[32] निरखिति जे तत्स्वधैर्य च्युतीतें
पावे, कीं पाहिलें हो नवचि पद[33] पराभूतिचें[34] अच्युतीं[35] तें. ॥ ८

---

१. शत्रुगज. २. पंचानन=सिंह, व्याघ्र. ३. गतप्राण. ४. दाव+दहनीं=वणवा+अग्नींत. ५. वृक्ष. ६. घोर. ७. सत्तावीस रात्रंदिवस. (श्लोक ५.) ८. श्रीकृष्ण. ९. पांडवांचा निरोप. (श्लो० ७.) १०. द्वारकापुरास. ११. संसाररोगहारक वैद्य. १२. शाल्वरूप रोगानें पीडित अशा आपल्या जनांस. १३. स्वजनांच्या अवनासाठीं (संरक्षणासाठीं). १४. पेटलेला. १५. अग्नि. १६. श्लोक १० पहा. १७. घोड्यांस. १८. यदुनगराचा नाश. १९. सेकासारखा. विषाग्नीनें सिंचन करण्यासारखा. २०. शत्रुप्रेषिता शक्ति दारुकावर आली. शाल्वानें दारुकावर शक्तिप्रहार केला. [श्लो० १२ पहा.] २१. सर्पिणीची. २२. सखी. २३. कृष्णबाणपंक्ति. २४. तृप्त न झाली. २५. भगवान् कृष्णाच्या आशुगांच्या (बाणांच्या) आलीनें (पंक्तीनें) क्षत (जखमी झालेले जे) रिपु (शत्रु) त्यांच्या रुधिरें (रक्तानें). २६. समरभूमि. २७. सौभयानाची. २८. पराक्रमी कृष्णाच्या बाणसमूहानें. २९. चाळण. ३०. शाल्वानें कृष्णाचा सव्य भुज बाणांनीं तोडिला. (श्लो० १५.) ३१. व्यथित भुजानें. ३२. शार्ङ्गचापाचें पतन. ३३. स्थान. ३४. पराभवाचें. ३५. श्रीकृष्णीं.

गर्जोनि प्रभुला म्हणे कुमति तो, 'रे! यादवा! पाहिलें
आम्हां देखत [1]मित्रदार हरिले, तें एकदा साहिलें;।
माझा चैद्य[2] सखा सभेंत वधिला दुष्टा! सुहृद्घातका!
आलों मी फळ[3] द्यावया तुज असें जें योग्य या पातका.' ॥ ९
म्हणे हरि, 'विमूढ[4] तूं, करिसि कां वृथा[5] वल्गना[6]?
जना असति ठावुका, करि उगाचि आयोधना[7]।
मनांत समजें खळा! पवन जिंकवेना घना,
स्वनाश नकळे कसा खिर्चिवटूनि[8] कालानना[9]? ॥ १०
आधीं दाविति शूर पौरुष[10] रणीं, मूढा न ते बोलती,
[11]तच्चापध्वनिलाचि ऐकुनि सुखें देवादिही डोलती;।
[12]वाग्व्यापार न या स्थळीं उचित, [13]दोर्व्यापारचि प्रस्तुत[14].'
श्रीमत्कृष्ण असें वदे रिपुसवें गीर्वाणविप्रस्तुत[15]. ॥ ११
सोडी [16]कौमोदकीतें यदुरमण[17], तद्दाघातनिर्भिन्नजत्रु[18]
झाला व्योमांत सौभासकट सकटक[19] क्षिप्र तो गुप्त[20] शत्रु.।
तों तेथें एक आला पुरुष[21], मग जगन्नाथपादीं पडोनी
सांगे, '[22]त्वन्मातृवार्ताहर अनुग[23] असें' मंद आधीं [24]रडोनी. ॥ १२
'हें देवा! देवकीनें तुज निजवदनें दुःख सांगीतलें कीं,
शाल्वें बांधोनि नेला तव जनक, तुम्हीं रक्षिलें काय लेंकीं?।
जैसा नेतो पशुघ्न[25] स्वपशुस घडली त्वत्पित्या[26] तेचि रीती,
हाहा! पुत्रा! परंतु द्रवति[27] कधिंतरी जे पशूतें चिरीती! ॥ १३
तूं विक्रमी पुत्र तथापि त्याची, झाली अशी [28]अंत्यकथा पित्याची,।
टाकी मला निष्कृप हा! वयाचें, झालें पुढें काय पहावयाचें?' ॥ १४

१. मित्र शिशुपाल त्याचे दार स्त्री रुक्मिणी. (श्लो० १७.) २. शिशुपाल. ३. शासनरूप अथवा मृत्युरूप फळ. (श्लो० १८.) ४. मंद. ५. श्लोक १९ पहा. ६. वडबड. ७. युद्धा. ८. खिजवून. ९. यमाच्या मुखास. १०. पराक्रम, शौर्य. ११. त्यांच्या धनुष्याच्या ठणत्काराला. १२. बोलणें. १३. भुजपराक्रम. १४. हें शाल्वकृष्ण यांचें संभाषण फार सुरेख आणि समयोचित असून त्या त्या पुरुषांच्या स्वभावास अनुरूप आहे. १५. देव आणि ब्राह्मण यांनीं स्तुत. १६. कौमोदकी नामक गदेतें. १७. कृष्ण. १८. त्या गदेच्या आघातानें निर्भिन्न झाले जत्रु (बाहुगलसंधि=सुताटी हाड) ज्याचे. (श्लोक २०.) १९. सहसैन्य. २०. अदृश्य झाला. २१. मायामय पुरुष. २२. तुझ्या आईचें वर्तमान आणणारा देवकीचा दूत. २३. सेवक. २४. श्लो० २१ पहा. २५. खाटिक, सौनिक. २६. तुझ्या बापाला. (वसुदेवाला.) २७. दयार्द्र होतात. २८. शेवटली गोष्ट.

ऐसें ऐकुनियां मुनीच म्हणती, 'तो होय शोकाकुळ
ध्यातो [1]या कवि जो, कधींहि निरखी त्याचें न शोका [2]कुळ.' ।
'हाहा!' देव म्हणे 'कसा गवसला माझा यमा तात, मी
पुत्र व्यर्थचि, काढवे न बुडती कीं गाय माता [3]तमीं. ॥ १५
माझा अग्रज राम तो [4]निजपुरी रक्षावया राहिला,
ज्याचा भंग [5]सुरासुरासुकर, न स्वप्नांतही पाहिला. ।
तो [6]दुर्गीं वसतां असह्य असतां, शाल्वें पिता बांधिला,
कोल्यानें [7]हरि [8]रांधिला [9]विधिबळें, भ्याला [10]शिखी [11]'गांधिला.'॥ १६
मायामानुषदेह दे हरिमनीं शोकाग्नितें [12]ठाव कीं,
शाल्वाचीं नसती खरींच मतिला तीं दुर्मतें ठावकीं; ।
चिंता दाखवि भक्तवत्सल निजीं [13]चिंतातमाचा रवी,
मध्यान्हीं मिरवी [14]अलीकतटिनी जैसी [15]धरा [16]मारवी. ॥ १७
तों शाल्वें आणिला तो [17]हरिजनक जसा काय होता तसाच,
प्रेक्षूनि व्याकुलात्मा यदुपतिहि म्हणे, 'हा! अहो! तात साच.' ।
[18]नेत्रीं [19]अस्रापगा या सकरुणविभुच्या ये, मना आंत माया
जाया हृत्ताप, गाया यश, करि विचकी ज्यापुढें दांत माया. ॥१८
श्रीकृष्णासि म्हणे असें कुमति तो, 'रे! [20]बालिशा! बाप हा,
कैंची भेटि पुढें? पुसोनि नयनें जन्मप्रदाला पहा; ।
मी तों [21]मस्तक खंडितोंचि, जरि तूं उत्तीर्ण होसील, हो
[22]त्राणीं सिद्ध; सुपुत्र, शक्ति असतां, हें कोण सोशील, [23]हो!'॥१९
[24]मायावी खळ ऐकवी, मतिस दे जी मोह वाणी असी,
क्रोधें [25]शौरिशिरोधरेवरि बळें तत्काळ हाणी [26]असी; ।

---

१. या कृष्णास. २. जो कवि (पंडित) या (कृष्णाला) ध्यातो त्याचें कुल शोका कधींहि न निरखी—असा अन्वय. ३. दुःखांधकारांत. ४. द्वारका. (श्लो० २४.) ५. देव आणि दैत्य यांना असुकर (करण्यास कठिण). ६. द्वारकेंत. ७. सिंह. ८. भक्षणार्थ शिजविला. ९. दैवबलानें. १०. अग्नि. ११. वनमक्षिकेला, मधुमक्षिकासदृशमक्षिकाविशेष त्याला. हें 'अर्थांतरन्यास' नामक अलंकाराचें उदाहरण आहे. १२. स्थान. १३. चिंतारूप तमाचा (अंधकाराचा) रवि (हर्ता—श्रीकृष्ण). १४. मृगजळाची नदी. १५. भूमी. १६. मरुदेशसंबंधी. या श्लोकांतील कल्पना पंतांच्या स्वतःच्या आहेत, त्यांस मूळांत आधार नाहीं. १७. वसुदेव. १८. डोळ्यांत. १९. अश्रुनदी. [अस्र=नेत्रबाष्प, आपगा=नदी.] २०. श्लोक २६ पहा. २१. या वसुदेवाचें. २२. संरक्षणीं. २३. अहो. २४. कपटी. २५. वसुदेवाच्या मानेवर. २६. खड्ग.

तों तें मस्तकपद्म भूवरि पडे [1]सास्रेक्षणीं बिंदु [2]हा !
स्वर्गींही म्हणती, '[3]च्युतिप्रति अकस्मात् पावला [4]इंदु हा.' ॥ २०
सौभीं [5]शौरिशिरासि घेउनि शिरे तो शाल्व, शोकीं हरी,
स्वामी [6]नम्रजनात्ममोहमहिमा नामेंचि जो कीं [7]हरी; ।
झाला सावध [8]साधुसेव्यपद जों पाहे, न ठाके शव,
ही माया धरि काय शत्रुदमनीं हाही हठा केशव. ॥ २१
माया दाउनि मोहिला अरि बरा, नाहींच हा सावध,
[9]भ्रांतस्वांत असे, अशांतचि म्हणे, 'याचा करावा वध.' ।
वर्षे शाल्व सहस्रशस्त्रनिकरें [10]गोत्रींच [11]पावूससा,
[12]वृष्णिव्याघ्रवधेच्छु [13]चेदिपतिचा तो मित्र [14]भांवू ससा. ॥ २२
गौरीश[15] त्रिपुरावरि, प्रभु तसा शौरी शरीं वर्षला,
शत्रुक्षिप्तसमस्तशस्त्रदलनीं [16]वृत्रारिही हर्षला; ।
सोडी श्रीजगदाश्रय [17]स्वरगदासेव्य स्वयें [18]तो गदा,
ती [19]सौभीं [20]महिषीं जसी [21]भगवती झाली [22]असद्रोगदा. ॥ २३
सौभ पर्वत गदा अशनीच [23]ध्वंसतां स्वपुर [24]भीवश नीच ।
होय यान पडलेंचि [25]नदीपीं भा खळीं न जसि कीं दिनदीपीं. ॥ २४
गेले सर्व सहाय सोडुनि, दिली सौभें समुद्रीं बुडी,
शस्त्रव्रात विभुप्रतापदहनामध्येंचि टाकी उडी; ।
दुःखें [26]वर्म गळे, [27]शिरोमणि पळे, तद्बुद्धि तैसी [28]कुडी
राहे शाल्वकरीं गदा, प्रभुगदे संकोचली बापुडी. ॥ २५
धांवे शाल्व गदा [29]गदाग्रजशिरीं घालावया, राहुला
वेडावी, अथवा उभारुनि निजा अत्युन्नता बाहुला, ।

---

१. आप्तांच्या नेत्रोदक बिंदुसहवर्तमान. [हें 'सहोक्ति'चें उदाहरण होय.] २. हाय. ३. पतन, भ्रंश, अधःपात. ४. चंद्र. ५. वसुदेवमस्तकाला. ६. शरणागतजनांच्या आत्ममोहाचा (आत्माज्ञानाचा) महिमा (मोठेपणा)=भक्तांच्या मनांतील अज्ञानराशीचा मोठेपणा जो नाहींसा करतो—असा भाव. ७. हरण करी. ८. साधुजनांनीं सेवन करण्यास योग्य आहे पद (चरण) ज्याचें असा—श्रीकृष्ण. ९. भ्रांतमनस्क. १०. पर्वतींच. ११. पर्जन्यासारखा. १२. कृष्णरूप वाघाच्या वधाची इच्छा करणारा. १३. शिशुपालाचा. १४. मानू. १५. शंकर. १६. इंद्रही. १७. स्वर्+अग+दास+ईड्य=स्वर्गांतील+वृक्ष+भक्त+स्तुत्य=कल्पतरु आणि भक्त यांनीं स्तुत्य. १८. कृष्ण. १९. शाल्वयानीं. २०. महिषासुरावर. २१. देवी. २२. मृत्युप्रदा, नाशप्रदा. २३. श्लोक ३३ पहा. २४. भयभीत. २५. सागरांत. २६. कवच. २७. श्लोक ३३ पहा. २८. दुष्ट. २९. कृष्णाच्या मस्तकावर.

हांसे एक समुच्चताल गिरिला कीं दंडपाणीस हा
बोले दुर्मद, 'मत्प्रहार समरीं रे! शार्ङ्गपाणी[१]! सहा.' ॥ २६
गदाविषाग्निज्वालोग्रशाल्ववल्मीकबाव्हही[२] ।
कृष्णभल्लपतत्रीशें[३] खंडितां, कांपली मही[४]. ॥ २७

शाल्वाची प्रखरसुदर्शनें शिरोधि[५] छेदी, तच्चरणसरोरुहीं[६] शिरो धी[७], ।
कीं ज्याच्या सुगतिस पावतो विरोधी[८] तल्लीलामृततटिनीधवीं[९] विरो धी[१०].॥ २८

देवांच्या दुंदुभीचे कळविति सकळां, या जयास[११] ध्वनी न
ब्रह्मांडीं हिंडतांही अलस धरिति कीं प्रौढ ते अध्वनीन[१२], ।
दिग्दंतिश्रोत्रशूर्पोत्थितनवपवन[१३] स्पर्शतां, मज्जनातें[१४]
स्वर्गंगासिंधुमध्यें[१५] करुनि निरखिती सूर्यगोसज्जनांतें[१६]. ॥ २९

## अध्याय अठ्याहत्तरावा.

जे कीं पौंड्रकशाल्वकादि वधिले तन्मित्र[१७] कारूषक
क्रोधी दुर्जन[१८] दंतवक्र परम प्रख्यात सद्दूषक[१९], ।
तो आला परलोकगप्रियसखस्वांतप्रियाकारणें[२०]
सर्वोद्योग करूनि यादवकुलोत्तंसास[२१] या मारणें. ॥ १
जातां शाल्ववधोत्तर स्वनगरा[२२] मार्गींच ये आडवा,
देवर्ष्यादि[२३] रणीं सणीं क्षुधित जे त्यांला गमे पाडवा, ।
धांवे सन्मुनिशापमूढमति तो विष्णुप्रतीहार[२४] हो
केला निश्चय हाचि कीं, 'विजय हो कीं संप्रती हार[२५] हो.' ॥ २

---

१. शार्ङ्ग नामक धनुष्य ज्याच्या पाणीमध्यें (हातांत) असतें तो (श्रीकृष्ण). २. गदा+विष+अग्नि+ज्वाला+उग्र+शाल्व+वल्मीक+बाहु+अही= गदा हीच विषाग्निज्वाला तीणेंकरून उग्र जो शाल्वरूप वारुळांतील बाहुरूप सर्प तो. ३. कृष्ण+भल्ल (बाण) पतत्री (पक्षी) ईशें (स्वामीनें)= कृष्णाचा बाण हाच गरुड त्यानें. ४. पृथ्वी. ५. ग्रीवा. ६. त्याच्या चरणकमलीं. ७. प्रवेश करो. ८. शत्रु. ९. त्याच्या लीलामृतसमुद्रांत. (तटिनी=नदी, धव=पति.) १०. लीन होवो. ११. उत्कर्षास. १२. वाट चालणारे, पांथ, पथिक. १३. दिग्गजांचे कर्ण हे शूर्प (सुपें) त्यांचा वारा स्पर्शला म्हणून अपवित्रता कल्पून. १४. स्नानातें. १५. देवगंगेंत. १६. सूर्य, गाई, सज्जन यांतें पाहती (पवित्र होण्याकरितां.) १७. त्या शिशुपालशाल्वपौंड्रक यांचा मित्र. १८. दुर्मति. १९. साधुनिंदक. २०. परलोकस्थ मित्राच्या प्रीत्यर्थ. २१. कृष्णास. २२. द्वारकेला. २३. देव+ऋषि+आदि= सुर+मुनि+प्रमुख. २४. विष्णूचा द्वारपाळ. २५. पराभव.

राहु ग्रासावयाला निजगगनपथीं [1]भास्करा जेंवि रोधी,
तेंवि त्यागूनि चित्तांतुनि मरणभय **श्री**करातें विरोधी; ।
[2]लंघावी या पिशाचें कसि [3]सुमुनिमहाभूतिच्या [4]तायिताची
शक्ती? दीपीं [5]पतंगासम कुमति पडे धांवुनी [6]आयिताची. ॥ ३
रथावरुनि टाकिली प्रभुवरें उडी [7]वारणा,
[8]नगाग्रगमृगाधिपें जसि विलोकितां [9]वारणा. ।
उठे धरुनि [10]दारितस्वरिपुदुर्गवप्राशनी
गिरीवरि [11]हरीच, कीं [12]घटज अर्णवप्राशनीं. ॥ ४
तेव्हां तो **दं**तवक्र प्रभुपतिस म्हणे, 'कामनासिद्धि माजी
झालीच, प्राण तूझे हरिन जरि [13]नयें ठाकसी [14]आजिमाजी; ।
रे! बंधुघ्ना! अमित्रा! स्थिरतनुमति तूं हो [15]सहा या गदेतें,
या देवीच्या प्रसादें [16]अविकळ फळ घे, जें [17]महायाग दे तें.' ॥ ५
ऐसें बोलुनि घातली प्रभुशिरीं दुष्टें गदा [18]आयसी
माळा [19]वारणमस्तकीं तसि पडे तच्छक्ति ते कायसी? ।
हाणी त्या अरिच्या उरावरि तदा **कौ**मोद[20]की लात कीं
क्षोभेना कसि ती सती निजपतिप्राणाचिया घातकीं? ॥ ६
[21]इंद्रक्षिप्ताशनीनें [22]उपलतल फुटे, तें वमे [23]वारिपूर,
स्पर्शीं **कौ**मोदकीच्या तसिच निजगती दावि देवा [24]रिपूर; ।
भूपृष्ठीं बाहुपादासह [25]विखरुनियां भूषणें केश वातें,
[26]शाखी तैसा [27]पडे तो, स्तविति सुरमुनी तेधवां **के**शवातें. ॥ ७

---

१. सूर्याला. २. उल्लंघावी. ३. उत्तम मुनिच्या भस्माची. ४. गळ्यांतील मंतरलेला ताईत त्याची. ५. शलभासारखा. ही पतंगदीपोड्डाणाची कल्पना मूळांत नाहीं. ६. अनायासानें. ७. निवारणार्थ. ८. नग+अग्रग+मृग+अधिपें=पर्वत+शिरोवर्ती+मृग+राजें=पर्वतशिखरस्थ सिंहानें. ९. गजा. १०. विदारित केले निजशत्रुरूप दुर्गवप्र (किल्ल्याचे तट) जेणें असा अशनि वज्र धरून. ११. इंद्रच. १२. अगस्तिमुनि. १३. नीतीनें. १४. युद्धांत. १५. सहन कर. १६. परिपूर्ण. १७. महायागाचें फळ स्वर्गप्राप्ति. १८. लोहमयी. १९. गजशिरावरी. २०. कौमोदकी नांवाची गदा. २१. इंद्रानें फेंकलेल्या वज्रानें. २२. खडक. २३. उदकाचा लोट. [वक्रदंताच्या तोंडांतून पुष्कळ रक्त वाहूं लागलें. श्लोक ९ पहा.] २४. शत्रूचें ऊर. २५. पसरून. २६. वृक्ष. २७. तो वक्रदंत प्राण सोडून समरशय्येवर पडला.

तई सूक्ष्म [1]ज्योति [2]प्रभुदलितदेहांतुनि निघे,
रिघे कृष्णीं, झाले [3]सुगतिस असे [4]भाजन [5]तिघे. ।
[6]अघाला दे मोक्ष प्रथम [7]कमलानायक वनीं,
जनीं न ख्यात श्रीशुकगुरुचिया काय [8]कवनीं ? ॥ ८
त्याचा बंधु [9]विदूरथाख्य विभुच्या [10]चक्रें मुखीं [11]वैरिलों,
देतो मुक्तिच संगरीं, न विजयश्री, देव हा [12]वैरिलों; ।
अंतीं संहरिला **विदूरथ** रणीं, आधीं कुधी **पूतना**,
केल्या या भवसागरांत सुकथा नौका सदा नूतना. ॥ ९
[13]गंधर्वामरसिद्धगीतविजय श्रीकृष्ण गेला [14]पुरीं,
ज्याचें सद्यश लाजवी [15]हिमकरा गंगाजळा कापुरा; ।
कन्या पूजिति सुप्रवेशसमयीं त्या [16]लाजदध्यक्षतीं
जीं [17]तन्मंगलगायनें [18]परिसति [19]स्वःसंसदध्यक्ष तीं. ॥ १०
जेव्हां **कौरवपांडवांत** कलह [20]क्षोणीमुळें लागला,
आप्तांचा गण **धार्तराष्ट्र**मतिला [21]संबोधितां भागला, ।
होतां युद्धविनिश्चय प्रभु [22]**बळ** [23]स्वीयक्षया संप्रति
प्रेक्षावें न, असें [24]विचारुनि निघे [25]सत्तीर्थयात्रेप्रती. ॥ ११
आधीं जाय **प्रभासीं**, मग सविधि करि स्नानदानादि **राम**,
श्रीमान् कल्पद्रुमाचा गुरुवर पुरवी [26]क्षेत्रवासीष्टकाम; ।
हिंडे [27]सब्रह्मवृंद प्रभु **बळ** सदय स्वांघ्रिपद्मप्रतापें
तीर्थांचीं संहराया [28]चिरंतरविधृतें [29]पापिसंसर्गपापें. ॥ १२

---

१. तेज (श्लो० १०). २. प्रभूनें (कृष्णानें) चूर्ण केलेल्या वक्रदंताच्या शरीरांतून. ३. उत्तमगतीस. ४. पात्र. ५. शिशुपाल, शाल्व, दंतवक्र, हे तिघे. ६. अघासुराला. ७. श्रीपति. ८. काव्यांत. (श्रीमद्भागवतग्रंथांत.) ९. विदूरथ आहे आख्या (नाम) ज्याची असा. १०. कृष्णानें चक्रानें विदूरथाचें शिर तोडलें. ११. घातला. १२. शत्रूला. १३. गंधर्व, देव, सिद्ध यांनीं स्तविला विजय ज्याचा असा श्रीकृष्ण. (श्लो० १३-१४.) १४. द्वारकेला. १५. चंद्राला. १६. लाज—लाह्या, दधि—दहीं, अक्षता—तांदूळ यांनीं. १७. कन्यांनीं गाइलेलीं मंगल गायनें. १८. ऐकती. १९. देवसभा सुधर्माख्या तींतील अध्यक्ष श्रेष्ठ देव. २०. राज्यभूमीसंबंधानें. २१. उपदेशितां. २२. बळराम. २३. स्वीयजनांच्या नाशाला. २४. विचार करून. २५. श्लोक १७ पहा. २६. क्षेत्रवासी जे त्यांचा इष्ट काम. २७. ब्राह्मणसमुदायासहवर्तमान. २८. पुष्कळ दिवस चिकटलेलीं. २९. पाप्यांच्या संबंधानें लागलेलीं पापें.

सरस्वती [1]सूर्यसुता [2]सुरापगा तीर्थें फिरे, सद्यश शुद्धि दे जगा; ।
गेला मग श्रीबळ [3]नैमिषाप्रती, जेथें करीती मुनि [4]सत्र सुव्रती. ॥ १३
झाले ज्यास [5]सुरद्रु [6]कामकपिला चिंतामणी [7]सत्रप,
श्रीरामास विलोकितां बहुसुखी होती मुनी [8]सत्रप. ।
भाग्यें भेटति, भावशुद्धि असतां, काळें जया [9]आयतें,
आलें मूर्त अनंतपुण्यफळ तें भेटावया [10]आयतें. ॥ १४
लोकीं आपण पूज्य हें विसरले [11]प्रत्युद्गमें वंदनें
साधू पूजिति, मोहिली मुनिमति [12]श्रीरोहिणीनंदनें, ।
ते [13]भूदेव चकोर चंद्र भगवान् दावि [14]प्रतापा पदा
पीतां पाहति न क्षणांतचि जगीं हे विप्र [15]तापापदा. ॥ १५
होता ब्रह्मसभेंत [16]सूत बसला, नाहीं [17]उभा राहिला,
रामें तो सकळां मुनींपरिसही उच्चासनीं पाहिला; ।
कोपें देव[18] म्हणे, 'मला नगणितां विप्रांत मुख्यासना
कां सेवि [19]प्रतिलोमज प्रभुमतें तो योग्य हा शासना. ॥ १६
व्यासें यास पुराणमात्र कथिलें, ज्या धर्मशास्त्रस्मृती
त्याही सांगितल्याचि, शिष्य म्हणुनि ज्ञानप्रदें याप्रती; ।
साराही इतिहास हा समजला, गेलें वृथा [20]सर्व तें,
[21]सिंधूंतींहि बुडोनि शुष्क असिजे पोटीं [22]शिळापर्वतें. ॥ १७
विद्वत्संन्यासिवेषा नट धरि परि त्या दाविना शांति तोंडा,
हा ! व्यासा ! हा ! किमर्थ श्रम करुनि तुम्हीं कांडिला व्यर्थ कोंडा? ।
[23]वाणी ! त्वद्दोष नाहीं, [24]सुरसरिदुदरीं अंतरीं शुष्क धोंडा
व्हावा लोकीं न दुष्टाभयद बळ दया क्षांति हो [25]कोनकोंडा. ॥ १८

---

१. यमुना. २. भागीरथी. (श्लोक १९.) ३. नैमिषारण्याला. ४. यज्ञविशेष. (श्लो० २०.) ५. कल्पवृक्ष. ६. (इष्ट मनोरथ देणारी) कामधेनु. ७. सलज्ज. [त्रपा=लज्जा.] ८. यज्ञकर्ते. ९. दीर्घ. १०. अनायासानें. ११. सामोरें जाण्यानें. १२. बळरामानें. १३. ब्राह्मण. १४. प्रतापरूप चांदण्यास. १५. ताप आणि आपदा यांला. १६. लोमहर्षण. (व्यासाचा शिष्य.) १७. बळरामास वंदन करण्यासाठीं उठला नाहीं. १८. बळराम. (श्लो० २३-२७.) १९. हीनजातीपासून उत्तम जातींत झालेला, असवर्णजातीय. २०. अनधिकारी मनुष्याला उपदेश केला म्हणून तो व्यर्थ गेला—असा भाव. २१. समुद्रोदरींही. २२. हा अर्थांतरन्यास नामक अलंकार जाणावा. २३. हे वाणी. २४. देवनदीच्या पोटांत. २५. लाजिरवाणा.

ऐसे [1]धर्मध्वजी जे असति खळ जगीं, ते खरे [2]पापिराजे,
त्यांचें [3]रामावतार प्रशमन करुनि स्वप्रतापें विराजे, ।
मारावें दांभिकांतें म्हणुनि **यदु**कुळीं जन्मलों, कां पणातें
सोडूनि ब्राह्मणांत स्वयश मळवुनी लाजवूं आपणातें?' ॥ १९
साधूंचा परिपालक प्रभु, परि क्षुब्धा मना नावरी,
कैसें [4]भावि टळेल? [5]तत्करकुश क्रूरत्व सूतावरी ।
दावी, केवळ होय हो, **यम**, हरी स्पर्शक्षणीं प्राण ते,
[6]ईशक्षोभ करी तृणासि [7]अशनी हें बोलती जाणते. ॥ २०
[8]हाहाकारासि आधीं करुनि म्हणति त्या ईश्वरा[9] विप्र, 'सूतें
आम्हां [10]अस्मन्निदेशें परमशुचियशें युष्मदंघ्रिप्रसूतें ।
**रा**मा! पाजूनि [11]शर्मे [12]अनवरत दिलीं या जनास [13]प्रभूतें,
जाणों आम्हींच बा! तें सुख विदित न हा जेंवि दास प्रभूतें.॥ २१
केला ब्रह्मासनातें समुचित, दिधलें यास आयुष्य, [14]वक्ता
पावावा न श्रमातें म्हणुनि वर दिला [15]अक्लमाख्य स्वभक्ता, ।
आनंदें पीत होतों [16]भवदमृतकथा ज्या [17]पुराणप्रतीता
केलें जें ईश्वरें तें [18]शुभचि, [19]कुशलधी शोचती कां [20]अतीता? ॥ २२
दिलें होतें यातें गुरुपण [21]पुराणप्रवचनीं,
न पावे मिथ्यात्व त्रिभुवनगुरो! विप्रवचनीं ।
तुला कैंचें [22]पाप [23]स्मृतिगत यदंघ्रीहि [24]कलिला
[25]दमी [26]शोधी [27]ज्यांचें रज [28]सुरधुनीच्याहि सलिला. ॥ २३
परि प्रायश्चित्त [29]श्रुतिपथपरित्राणजनितें
करावें त्वां **रा**मा! कुशळ सकळां जाण जनिं तें, ।

---

१. धर्माचा डौल मिरविणारे, दांभिक. २. पाप्यांचे राजे. ३. बलरामाचा (माझा) अवतार. ४. होणारी गोष्ट. ५. त्या बलरामाच्या हातांतील दर्भ. ६. ईश्वराचा कोप झाला असतां तृणही वज्रासारखें भयंकर व अनर्थप्रद होतें—असें पंडित म्हणतात. ७. वज्र. ८. श्लोक २९ पहा. ९. बलरामाला. १०. आमच्या आज्ञेनें. ११. सुखें. १२. निरंतर. १३. विपुलें. १४. पुराणवक्ता. १५. कधीं श्रम होऊं नये असा वर दिला. (श्लोक ३० पहा.) १६. तुमच्या अमृततुल्य गोड कथा. १७. पुराणांत वर्णिलेल्या. १८. चांगलेंच केलें. १९. विद्वान्. २०. झाल्या गोष्टीतें. २१. पुराणकथनाविषयीं. २२. ब्रह्महत्यारूप दोष. २३. स्मृत्युक्त. २४. कलिदोषाला. २५. नाशी. २६. शुद्ध करी. २७. ज्या चरणाचें. २८. गंगेच्या. २९. श्रुतिमार्गाचें रक्षण करण्यासाठीं जात जो तूं त्या तुवां.

तुला आम्हीं काय [1]प्रभु! गुरुवराला शिकवणें?
प्रकाशावा तेजें दिनकर [2]महोराशि कवणें?' ॥ २४
त्यातें राम [3]म्हणे, 'जगद्गुरु तुम्ही, विप्र श्रुतीचे निधी,
प्रायश्चित्त करीन [4]सांग, मजला सांगा [5]तयाचा विधी; ।
हा [6]युष्मत्प्रिय लोमहर्षण उठो [7]सुप्तोत्थिताचेपरी,
आज्ञा द्या मज, [8]हो [9]भवद्यश भवत्पुण्येंचि सर्वोपरी.' ॥ २५
तेव्हां प्रार्थूनि सर्व द्विजवर म्हणती लोकराया बळास,
'स्वामी! कांहींच नाहीं अघटित तुझिया योगमायाबळास, ।
तूझ्या अस्त्रास वीर्यासहि न [10]अनृतता देवदेवा! शिवावी,
[11]काळा [12]अस्मद्वराही तव पद करु हें, [13]यत्सुसेवा [14]शिवा वी.' ॥ २६
म्हणे तेधवां नाथ लोकत्रयाचा, 'पुराणप्रवक्ता असा पुत्र याचा, ।
पित्याहूनि उग्रश्रवा हो विशिष्ट प्रहर्षोत [15]वाग्वैभवें सर्व शिष्ट. ॥ २७
[16]युष्मत्सेवा घडावी मज, मुनिवर हो! काम सांगा कराया,
स्वाधीन [17]क्षिप्र मी जो सफळ न करवे सामरा [18]नाकराया; ।
प्रायश्चित्तप्रकार श्रुतिनिपुण तुम्हीं मुख्य आम्हा कथा जी
संपादूं [19]ब्राह्मणाज्ञा [20]त्रिजगदभिमता रक्षिते [21]सत्पथा, [22]जी!' ॥ २८
रामाला म्हणती मुनीश्वर, 'अगा! बा! तीर्थपादा नवा
त्राता तूं नससी जगत्रयपते! एका [23]महादानवा ।
भीतों सर्वहि विप्र इल्वलसुता पर्वीं सदा [24]बल्वला
शोषावें [25]अतुळप्रतापतपना! त्वां त्या खळा [26]पल्वला. ॥ २९

---

१. हे प्रभो. २. तेजोराशि. ३. श्लोक ३२ पहा. ४. अंगोपांगसहित. ५. त्या प्रायश्चित्ताचा. ६. तुमचा आवडता. ७. प्रथम निजलेला व नंतर उठलेला मनुष्य तसा. (श्लोक ३३.) ८. होवो ९. तुमचें यश सर्वोपरी (सर्वांमध्यें) हो (होवो). १०. खोटेपणा. ११. मृत्यूला. [तुझ्या अस्त्राला, मृत्यूला, आमच्या वचनाला सत्यत्व यावें असें आचरण कर—असा भावार्थ. श्लोक ३५.] १२. आमच्या वरालाही असत्यत्व न शिवावें असें तुझें पद करो. १३. ज्या पायांची सेवा. १४. कल्याणातें वी (प्रसवे). १५. सरस्वतीप्रभावानें. १६. तुमची चाकरी. १७. सत्वर. १८. अमरांसहित इंद्रास. १९. श्लोक ३७ पहा. २०. त्रिजगताला मान्य अशी (आज्ञा). २१. साधुमार्गा. २२. अजि. २३. मोठ्या दैत्याला. २४. इल्वलतनय बल्वल नामक एक घोर राक्षस होता, तो प्रत्येक पर्वीं येऊन यज्ञास विघ्न करी. (श्लोक ३८.) 'मुनिजन म्हणती भो ईश्वरा! । प्रतापसिंधो! रोहिणीकुमरा! । तूंची समर्थ दीर्घ सत्रा । विश्वपरिहाराकारणें. ॥ १ ॥ आमुचा पुसिला अभीष्ट काम । तऱ्ही इल्वलतनय बल्वलनाम । घोर राक्षस क्रूर अधम । तो दे श्रम प्रतिपर्वीं. ॥ २ ॥

येतो [1]दुर्जन सैन्य घेउनि सदा [2]पर्वीं [3]मखक्षोणितें
देवा! [4]दूषितसे [5]समूत्रपललें [6]पूयास्थिविट्शोणितें, ।
शापावा तरि पुण्यहानिसहनीं बा! मानस त्रासतें,
अस्मत्सेवन हेंचि विघ्न झगटो रामा! न [7]सत्रास तें. ॥ ३०
मग [8]भारतवर्षातें त्वां करावि प्रदक्षिणा, ।
द्याव्या ज्या ज्या मागतील क्षेत्रींचें विप्र दक्षिणा. ॥ ३१
जाऊनियां करावीं त्वां सत्तीर्थांप्रति [9]मज्जनें, ।
[10]कृच्छ्रादि [11]आचरावें जें कथिलें [12]मतिमज्जनें. ॥ ३२
[13]एकवर्षव्रताचारें हें पातक सरो वरा ।
घे देवा! भूमिदेवांच्या साधुहंससरोवरा!' ॥ ३३

---

पर्वापर्वाप्रती येऊन । कुत्सित करी यज्ञायतन । अमंगळ अमेध्यवर्षें पूर्ण । दूषी यज्ञ तद्योगें. ॥३॥ कैसा दूषी यज्ञायतना । तेही ऐकें विवंचना । कुत्सित अमेध्यें वर्षे नाना । तें सर्वज्ञा! अवधारीं. ॥४॥ दुष्ट येऊनियां अंबरीं । कुत्सित पूयवृष्टी करी । विष्टामूत्ररक्ताधारीं । वर्षे भारी गर्जोनी. ॥ ५ ॥ तैसाचि अमेध्यासुराघन । मांसवृष्टी करी दुर्जन । दुर्गंधीनें भरे गगन । यज्ञविधान विध्वंसी. ॥ ६ ॥ तया पापिष्टा राक्षसातें । वृष्णिपुंगवा! वधीं निघातें । आमुचें शुश्रूषण हेंचि तूतें । अत्यंत आर्तें कथिलेंसे. ॥ ७ ॥' [श्रीमद्भागवत—अध्याय ७८ श्लोक ३८-३९ यांवरील 'श्रीहरिवरदा' नामक टीका.] २५. अनुपमप्रतापसूर्या! २६. थिल्लरोदका.

१. दुष्टमति दानव बल्वल. २. प्रतिपर्वीं=यज्ञसमयीं. ३. यज्ञभूमीतें, यज्ञायतनातें. ४. अपवित्र करतो, अमेध्यवर्षणानें विटाळवितो. ५. मूत्रासह मांसवृष्टीनें. ६. पूय, अस्थि, विष्ठा आणि रक्त यांनीं. (श्लो० ३९.) ७. यज्ञाला. ८. श्लो० ४० पहा. ९. स्नानें. १०. कृच्छ्रचांद्रायणादिप्रायश्चित्तजात. ११. संपादावें. १२. बुद्धिमान् जनांनीं. १३. 'बल्वलवधानंतर रामा । ब्रह्महत्याविशुद्धीकामा । संकल्पपूर्वक करी नियमा । विधानक्रमा मग आचरें ॥ १ ॥ सुष्टु म्हणिजे बरव्या परी । दृढ समाहित इंद्रियाचारीं । कामक्रोधादि दुर्विकारीं । सर्व प्रकारीं नातळी जे ॥ २॥ ऐसा संकल्पपूर्वक नियम । करूनि नियमिजे भूतग्राम । प्रायश्चित्त पक्ष उत्तम । कथितों सुगम तो ऐक ॥ ३ ॥ ब्रह्महत्यानिरसनार्थ । द्वादशाब्द प्रायश्चित्त । सूक्ष्मार्द्रता विचार त्यांत । तो वृत्तांत अवधारीं ॥ ४ ॥ नेणोनि प्रमादें हत्या घडली । एकाब्दचर्या तिसी नेमिली । नियमपूर्वक करितां भली । विशुद्धी कथिली जातसे ॥ ५ ॥ भारतवर्षाची प्रदक्षिणा । तीर्थोतीर्थीं तीर्थविधाना । संपादितां ब्रह्महनना- । पासूनी मुक्त होसील ॥ ६ ॥ ऐसा संवत्सरपर्यंत । तीर्थस्नायी विधानयुक्त । होतां, ब्रह्महत्या निर्मुक्त । झाली; जाण पां ॥ ७ ॥' [श्रीमद्भागवत—अध्याय ७८ श्लो० ४० वरील 'हरिवरदा' नामक टीका.]

## अध्याय एकुणऐंशावा.

(श्लोक.)

रात्रीं [1]पर्वप्रतीक्षा करितचि बसला [2]विप्रकार्या [3]सुपर्व-
स्वामी तो **राम**, तों तें द्विजविजयकर प्राप्त झालें [4]सुपर्व; ।
आधीं वायु प्रचंड द्रुम [5]उमळि, नभीं कोंदला [6]पांसु, काळी
[7]वाल्या आली अमार्गें [8]**द**शमुखभगिनी काय हो! ती [9]सुकाळीं. ॥ १
आला कराया [10]बहुपापसांचा निष्कारण [11]द्वेषण [12]तापसांचा, ।
दावि स्वमायाविभवा [13]सवांचा [14]द्वेष्टी सुरांचाहि [15]स**वा**सवांचा. ॥ २
तो बीभत्स [16]सकाय काय नरक व्योमीं उभा राहुनी
गर्जे, [17]भीषणवक्त्र वासुनि, जया भ्यावें शतां [18]**रा**हुनीं; ।
वर्षे मूत्र [19]पुरीष पूय [20]मदिरा कीं पाउस, त्रातया
साधूंच्या [21]जगदीश्वरासहि न भी, दोषी सुसत्रांत या. ॥ ३
तेव्हां आठवि [22]**का**मपाल मुसला [23]सच्छत्रुकाला [24]हेला,
[25]ज्यांचा धाक [26]**य**मार्यमाग्निभुजगां वज्रास हालाहला; ।
[27]सत्रध्वंसकरें दिसोंचि न दिलीं कोपांत [28]देवीं [29]परें
जाणो तीं पहिलींच येउनि करीं होतींच [30]सेवापरें. ॥ ४
चित्तीं देव म्हणे, 'भल्यास भय दे जो तोच नाडो, [31]हेळा!
प्रेक्षाया तव विक्रमा बहु असे [32]सल्लोचना डोहळा. ।
रे! [33]वज्रादिवरायुधव्रजपराचार्या! [34]**सु**नंदा! [35]दरा
साधूंच्या नुरवीं, खळक्षयकरा! [36]सत्प्रीत्यमंदादरा!' ॥ ५

---

१. पर्वाची वाट पाहणें. २. मुनिजनांच्या कार्यासाठीं. ३. देवांचा स्वामी. [सुपर्वत्=देव.] ४. उत्तम समय. ५. उपटून पाडी. (श्लो० १.) ६. धुरोळा. ७. वावटळ. ८. शूर्पणखा. ९. रंडा. (ही शिवी आहे.) १०. बहुत घातकांचा संचय. ११. द्वेष करणार. १२. मुनींचा. १३. यज्ञांचा. १४. द्वेष करणारा शत्रु. १५. इंद्रासहित देवांचा. १६. मूर्तिमंत. १७. भयंकर तोंड उघडून. १८. राहुग्रहांनीं. १९. विष्ठा. २०. मद्य. २१. बलरामाला. २२. बळराम. २३. साधुशत्रूंचा काळ अशा. २४. नागरातें. २५. ज्या मुसळहलांचा. २६. यम, सूर्य, अग्नि, शेष, यांस. २७. यज्ञाचा नाश करणाऱ्या (परें–शत्रूनें.) २८. बलरामाला. २९. शत्रूनें. ३०. तीं शस्त्रें सेवापर (सेवानिरत) होतीं. ३१. हे नांगरा! ३२. साधुनेत्रांना. [या श्लोकांतील बलरामोक्ति पंतांच्या पदरची आहे.] ३३. वज्रादि आयुधसमुदायाच्या आचार्या. ३४. हे सुनंद नामक मुसळा. ३५. भया. ३६. साधूंच्या प्रीतीविषयीं अमंद पुष्कळ आहे आदर ज्यास अशा मुसळा.

मुनिमतिसरघांच्या[1] सुप्रिया मोहळानें[2]
प्रबळ खळ बळानें ताडिला तो हेळानें[3]; ।
क्षितिवरि अरि[4] रामें कौतुकें पाडिला, हो!
खरतरमुसळानें मस्तकीं ताडिला, हो! ॥ ६

वज्रें देवाधिपानें[5] गगनग[6] नग[7] तो ताडिला, जेंवि पक्ष-
च्छेदार्त[8] क्ष्माध्र गर्जे बहुतचि वधितां वृष्णिराजें[9] विपक्ष[10]; ।
इंद्रा कांहीं तरीहि श्रम, परि भगवान् हा न लावि प्रयास,
प्रेमें भेटोनि तेंव्हां म्हणति, 'अभयदा! बा! भला' विप्र यास. ॥ ७

वृत्राचा[11] नाश केल्यावरि सुर हरिला[12] पूजिती तेंवि रामा
सत्रीं[13] सत्री[14] मुनी त्या सदभयदपदा[15] बल्वलाच्या विरामा[16] ।
अम्लानांभोजमालासितवसनमणिस्वर्णभूषादिकांहीं,[17]
यांच्या[18] शोभायुतांशासह[19] तुळति न इंद्वग्निपूषादि[20] कांहीं. ॥ ८

(गीतिवृत्त.)

मग घेउनि आज्ञेला, गेला, रक्षूनि विप्रयागाला, ।
श्रीराम कौशिकीला,[21] सरयूला,[22] तेथुनी प्रयागाला. ॥ ९

---

१. ऋषींच्या बुद्धि ह्याच सरघा (मधुमक्षिका) यांच्या. २. मोहळ=मोहोळ=मधमाशांचें पोळें. ३. नागरानें. ४. बल्वल. ५. इंद्रानें. ६. अंतरिक्षस्थित. [गगन+ग=आकाश+गेलेला.] ७. पर्वत. ८. पंखांच्या कर्तनानें पीडित. ९. बलरामें. १०. शत्रु. (बल्वल.) ११. वृत्रासुराचा. १२. इंद्राला. १३. यज्ञांत. (श्लोक ७.) १४. सत्र करणारे. १५. सत्+अभय+द+पद=साधुजनांला अभय देणारें आहे पद ज्यांचें अशा (बलरामाला). १६. नाशका. १७. म्लान न झालेली कमलमाला, शुभ्रवस्त्र, आणि सुवर्णभूषणें, इत्यादिकांहीं. (श्लोक ८.) १८. या बलरामाच्या. १९. शोभेच्या अयुत अंशाबरोबर. २०. इंदु+अग्नि+पूषन्+आदि=चंद्र+अग्नि+सूर्य+इत्यादि. २१. श्लोक ९ पहा. कौशिकीनदीच्या तीरीं त्रिरात्रावस्थान करून तीर्थविधि उरकून ब्राह्मणांसह बलराम पुढें गेला. २२. "बल्ववधानंतर हळी । आज्ञा देतां मुनिमंडळी । यात्रा परिवार घे-ऊनि सकळी । पातला कुळीं कौशिकीचिया ॥ १ ॥ कौशिकी नामें पुण्यसरिता । ब्राह्मणासहित रेवतीभर्ता । तीर्थविधानें स्नानकर्ता । झाला, तत्वतां द्विजवाक्यें ॥ २ ॥ तेथ त्रिरात्रावस्थान । करूनि सारिलें तीर्थविधान । पूजिले देव द्विजवर मान्य । याचक दीन तोषविले ॥ ३ ॥ पुढें सामान्य मार्गीं तीर्थें । श्रद्धापूर्वक रेवतीकांतें । करूनि शरयूच्या उगमातें । जाता झाला अनुक्रमें ॥४॥ म्हणाल कोठूनी सरयूउगम । तरी मानससरोवर जें उत्तम । जेथ क्रीडती अमरोत्तम । मराळसद्म मुनिसेव्य ॥ ५ ॥ अमृततुल्य तेथिंचें तोय । पुलिनें केवळ रत्ननिचय । जेथ वायू मुक्ताफळमाय । मराळनिचय तल्लोकें ॥ ६ ॥ परम सुकृती भ्रमरपक्षी । होऊनि वसती कमळवृक्षीं । मृत्युलोकीं

तेथूनि **गो**मतीला सेवुनिही **गं**डकी **वि**पाशेला ।
जाउनि **ग**येस तर्पुनि पितरांतें पूर्ण करि [1]तदाशेला. ॥ १०

(अनुष्टुभ्वृत्त.)

[2]**शो**णीं न्हाउनियां तारी यत्कीर्ति [3]स्थिरजंगमा ।
तो गेला देव सेवाया **गं**गासागरसंगमा. ॥ ११

**म**हेंद्रपर्वतीं होता भगवान् [4]**भृ**गुनंदन ।
त्या **रा**माकारणें **रा**में केलें साष्टांग वंदन. ॥ १२

तो दासाचा [5]कल्पशाखी [6]मोदामृतपयोनिधि ।
**गो**दावरीस जाऊनी गोदानें दे यथाविधि. ॥ १३

[7]शंपाचलायु न वृथा संपावें म्हणुनी कृती ।
संपादिती यद्गुणा तो [8]**पं**पा पावे जगत्पती. ॥ १४

मंदही पावती [9]भाग्यछंद यत्पदवंदनें ।
[10]**स्कं**द तो नमिला [11]विद्यांकंद [12]श्रीयदुनंदनें. ॥ १५

कैलासही भवाब्धीच्या [13]ऐलीकड त्यजिना **ह**रा ।
**कै**लासाधिक जो त्या [14]श्रीशैला जोडी प्रभू करा. ॥ १६

---

मनुजा चर्क्षीं । देखावयासि दुर्गम जें ॥ ७ ॥ संकर्षणें स्वसामर्थ्यें । समुदायेंसि जाऊनि तेथें । तीर्थविधान सारूनि पुरतें । देवद्विजांतें तोषविलें ॥ ८ ॥ मानससरोवरींहून स्रवली । सरयूनामका सरिता भली । उगमापासोनि तीर्थावळी । अनुलोम केली तत्तीरें ॥ ९ ॥ सरापासूनि स्रवली सरिता । सरयूनामका ते विख्याता । ऐरावताच्या दंतक्षता- । स्तव उद्भवली सुरसेन्या ॥ १० ॥ रघुनामक सूर्यवंशीं । राजा प्रतापतेजोराशी । तेणें स्वशरें सरोवरासी । भेदूनि शरयू निर्मिली॥ ११॥ शरयू म्हणती सरःसंभवा । शरयू शरप्रहरोद्भवा । पात्र झाली दोहीं नांवां । दंततालव्य सशवर्णीं ॥ १२ ॥ ते शरयू घालूनि दक्षिण हस्तें । उगमापासून संगमातें । जातां अनुलोभ जितुकीं तीर्थें । केलीं समस्तें तें ऐका ॥ १३ ॥" [श्रीमद्भागवत—अध्याय ७९ श्लोक ९ कृष्णदयार्णवस्वामीकृत 'हरिवरदा' नामक टीका.]

१. पितरांच्या आशेला. (कोणी पुत्रादि गयावर्जन करील अशी जी पितरांस आशा असते त्या आशेला.) २. शोणभद्रनदांत. ३. चराचर जगताला. ४. भार्गवराम. ५. कल्पतरु. ६. आनंदसुधासागर. ७. शंपा+चल+आयु=वीज+चंचल+जीवित्=विद्युत्सम अस्थिर आयुष्य. ८.पंपासरोवरा. ९. भाग्यकामना. १०. कार्तिकस्वामी. ११. विद्यामूल. १२. बळरामें. १३.अलीकडे.१४. मल्लिकार्जुनास. श्रीशैल्य मल्लिकार्जुन हें सुप्रसिद्ध बारा ज्योतिर्लिंगांपैकीं एक आहे. हें स्थळ निजामाच्या राज्यांत कृष्णानदीच्या कांठीं आहे. हें क्षेत्र आगगाडीपासून वीस पंचवीस कोसांवर आहे.

पावनांत्रि भला गावें सुधाकदवटामळा ।
ज्यास तो चपळालभ्य पावला वेंकटाचळा. ॥ १७

१ या श्लोकांत जीं मोठीं अक्षरें आहेत त्यांणींच चवथा चरण पूर्ण होतो.—'पावला वेंकटाचळा.' २. अमृतरूप उदकाचा शुद्ध घट अशा. ३. 'पावला वेंकटाचळा' हा पाद पंतांच्या कृत्रिम काव्यरचनेचा एक मासला होय. अशी रचना करणें हा एक दोष होय असा पंतांवर अनेकांचा आक्षेप आहे. या आक्षेपाचें निरसन निबंधमालाकारांनीं केलें आहे तें असें:—"आतां वरील कृत्रिमता ही कितपत दोषरूप होय याचा विचार केला असतां प्रथमत: येवढें कबूल करणें भाग आहे कीं, संस्कृत साहित्यांत चित्रकाव्याची गणना शेवटली आहे, व सामान्यत: कोणत्याही भाषेंत पाहिलें असतां तसाच प्रकार आढळेल. यमक व अनुप्रास हे शब्दालंकारही रसदृष्ट्या जर गौण होत, तर अक्षरबंध तर त्या दृष्टीनें फारच हलके ठरतील यांत संशय नाहीं. कां कीं, शब्दालंकार हे अर्थसौरस्यास जितके प्रतिबंधक होत त्यापेक्षां यंत्रें हीं तर फारच असून त्यांच्या योगानें अर्थ जसा काय जखडून टाकलेला असतो. तेव्हां सामान्यत: पाहिलें असतां येवढें खरें आहे कीं, रसैकपर जे कवि व वाचक असतील त्यांची वरील शब्दचित्राविषयीं तादृश भक्ति असणार नाहीं. सर्व भाषांतील अतिप्राचीन जे सर्वमान्य कवि त्यांचीं काव्यें पाहिलीं असतां वरील गोष्टीची प्रचीती येईल. व मोठमोठ्या रसिकांचाही तसाच कटाक्ष आढळेल. आमच्या देशांतील वाल्मीक व व्यास यांच्या काव्यांत तर काय, पण कालिदास व भवभूति यांच्या किंवा जगन्नाथराय गोवर्धनाचार्य यांच्या ग्रंथांतही वरील प्रकार कोठेंही आढळणार नाहीं; तेव्हां कृत्रिम रचनेच्या विरुद्ध येवढा आक्षेप मात्र काय तो आणतां येणार आहे. पण दुसऱ्या पक्षीं जर पाहिलें तर असें आढळून येईल कीं, प्रस्तुत कृत्रिम पदरचनाही मोठमोठ्या सर्वमान्य कवींच्या कृतींतूनही दृष्टीस पडते. 'किरातार्जुनीय' व शिशुपालवध' यांची पंचकाव्यांत गणना आहे हें सर्वप्रसिद्धच आहे. शिवाय 'भारवेरर्थगौरवम्' व 'माघे संति त्रयो गुणा:' हीं वचनेंही सर्वविश्रुत आहेत. पण असें असतां भारवीनें व माघानें आपआपल्या महाकाव्यांत एक एक सगळा सर्ग वरील तऱ्हेचा घातलेला आहे हें या पूर्वी प्रसंगोपात्त अनेक वेळां वाचकांस कळविलेलेंच आहे. 'विदग्धमुखमंडन' म्हणून एक असेंच कूटात्मक प्रसिद्ध काव्य संस्कृतांत आहे. तेव्हां या उदाहरणांवरून पाहतां आमच्या महाराष्ट्र कवीच्या तर्फेनें येवढें सहज म्हणतां येईल कीं, त्यानें वर सांगितलेल्या कांहीं तऱ्हा जरी कोठें कोठें केलेल्या असल्या तरी त्यांबद्दल तो विशेष दोषास पात्र होतो असें नाहीं. निदान त्यांवरून त्याच्या अरसिकतेचें मोठेंसें प्रमाण धरतां येत नाहीं. मोरोपंताच्या कृत्रिम रचनेच्या तर्फेनें केवळ सामान्यत: वरील आधार दाखविण्यांत आला. वस्तुत: पाहतां त्याच्या अष्टोत्तरशत रामायणांस वरील तरफदारीचीही गरज नाहीं. कां कीं, वरील रामायणेंही आमच्या कवीच्या वाग्देवतेची केवळ स्वतंत्र लीला आहे. होमरच्या महाकाव्यांतील वीरयुद्ध आटपल्यानंतर जसे रंगयुद्धांत परस्पर झगडले व नाना तऱ्हेच्या कसरती करून त्यांनीं कर्मणूक करून घेतली, किंवा चितान्यानें मुख्य चित्र तयार झाल्यानंतर जशी भोंवताली नक्षी व वेलबुट्टी काढण्यांत आपली करामत खर्चावी, त्याप्रमाणेंच आमच्या कवीनें 'भारता'दि मोठमोठ्या ग्रंथांनीं आपल्या जन्मभाषेस अलंकृत करून शेवटीं

कावेरीसहि तो शौरी पावे, रीति जिची बरी, ।
करितां स्नान गंगादिसरितांचीं फळें वरी. ॥ १८
श्रीरंगाख्य हरिक्षेत्र नेत्रभृंगाब्ज[1] देखिलें, ।
[2]भक्तकल्पद्रुमारामें रामें[3] वैकुंठ लेखिलें. ॥ १९
केतु[4] रामजयाचा जो हेतु पातकिशुद्धिला ।
दे तुलारहितानंद[5] सेतु[6] माधवबुद्धिला. ॥ २०
प्रळयाग्नि द्विषद्दासीं[7] भलया[8] जो सुचंदन[9] ।
मलया जाय भगवान् बल यादवनंदन. ॥ २१
[10]ज्याला कुंभ तरी जो[11] कीं प्याला पाथोधिला तपें ।
त्याला राम नमी व्हावें ज्याला[12] ज्योत्स्नाचि आतपें. ॥ २२
जो कर्णी सेविला तोचि गोकर्णी शंभु पाहिला, ।
चित्तासह बळें त्या [13]सद्वित्ताला बेल वाहिला. ॥ २३
आर्या द्वैपायनी[14] शंभुभार्या ही पूजिली बळें ।
पापी न बुडवी जी त्या तापीचीं सेविलीं जळें. ॥ २४

---

आपल्या उपास्य देवतेच्या प्रीत्यर्थ आपल्या सरस्वतीचा ओघ जलयंत्रोद्गारांप्रमाणें चित्रविचित्रतेनें प्रगट केला आहे. यास्तव राजमंदिराच्या भोंवताली कारंज्यांची शोभा केली असल्यास कारागिरास नांव ठेवणें जसें शोभणार नाहीं, व जलतुषारांचें वैचित्र्य पाहून तटस्थ राहणाराच्या आंगींही विशेष रसिकता मानण्याची गरज नाहीं, त्याप्रमाणेंच प्रसंगवशात् कृत्रिमतेचा प्रकार केल्यानें व चाहिल्यानें कवि व रसिकही दोषास पात्र होतो असें आम्हांस वाटत नाहीं. सागराचा अफाट विस्तार, नद्यांचे उंच प्रदेशावरून दृष्टिगोचर होणारे सर्पवत् ओघ, नायगारा नदीचा 'रसातलास विदारणारा तटप्रपात', हिमालयाच्या ज्येष्ठ कन्येनें आपल्या 'प्रियपात्र रत्नाकरा' स जेथें सहस्र भुज प्रगट करून सरभसालिंगन केलें आहे तेथला विचित्र व भव्य देखावा, यांच्या अंगीं कवीचें व रसिकाचें मन तल्लीन करून टाकण्याची शक्ति खरी, व वाग्देवतेचीं मुख्य विहारस्थानें हीं होत हेंही खरें. पण सागरावर दूर दूर नजर पोंचवून डोळे दुखूं लागले असतां, व नायगारेच्या धबधब्यांच्या प्रलयगर्जनेनें कर्णविवरें बधिर झालीं असतां, जलयंत्रावर नाचणाऱ्या तुषारांची व त्यांवर मारणाऱ्या इंद्रधनुष्यांच्या लकेरींची शोभा पाहणें व सुखस्पर्श तुषारवृष्टीचा अनुभव घेणें हें त्याच देवीस केवळ तुच्छ वाटेल असें आमचें मन घेत नाहीं." [निबंधमाला—अं० ५२ पृ० ११-१३.]

१. नेत्ररूप भृंग्यांस कमलच. २. भक्तांचा कल्पद्रुमाराम जो त्यानें. ३. हें 'लाटानुप्रासा'चें उदाहरण आहे. ४. ध्वज. ५. अनुपमानंदातें. ६. रामकृत सेतु. ७. शत्रुरूप तृणांस. ८. भल्या मनुष्यास. ९. चंदनासारिखा फार थंड असा. १०. ज्याला कुंभ जरी प्याला. ११. अगस्त्य मुनि. हें 'पर्यायोक्ता'चें सुरेख उदाहरण आहे. १२. ज्याला आतपें ज्योत्स्नाचि व्हावें. १३. साधूंचें निजवित्त जो महाबळेश्वर त्याला. १४. मूकाम्बिका, दुर्गा (श्लोक २०). द्वीप आहे अयन जीचें ती द्वैपायनी.

सेवावा सर्वतीर्थांनीं, ठेवावा मनिं सज्जनीं ।
देवा वाटे त्याहि तोषं[1] रेवावारिनिमज्जनीं[2]. ॥ २५
कर्म दासां न बाधों दे शर्म[3] दावी अपार जें ।
स्वर्मदा[4] नुरवी झाली नर्मदा[5] शुद्ध त्या रजें. ॥ २६
प्रभाव ज्याचा निःसीम, प्रभा शुभ्र हिमाहुनी ।
प्रभानुगुरु[6] तो हर्षे प्रभासाप्रति[7] पाहुनी. ॥ २७

(श्लोक.)

तीर्थीं क्षेत्रीं स्वशिष्य त्रिजगदवगदक्लेशनाशैककामें
होते संस्थापिले जे सकरुणहृदयें साधु पूर्वींच रामें[8] ।
स्वाविद्यारोगवैद्यें[9] निजचरणरजोरूपिणी दिव्य मात्रा[10]
त्यातें द्यायाचि[11] केली स्वसखमुनि सवें घेउनी तीर्थयात्रा[12]. ॥ २८
तेथें[13] कौरवपांडवाहवसवीं[14] झाले पशु क्ष्माधव[15],
क्षेत्रक्षोणिसुरोक्त[16] वृत्त[17] परिसे येतांचि तो माधव[18]; ।
कृष्णें भूभर युक्तिनें उतरिला, जाणे मनीं, हें मतें
केलें आपुलियाचि कीं बहुबरें लोकत्रयक्षेम[19] तें. ॥ २९
म्हातारा[20] अंध आप्त क्षितिपति[21] न बुडो पुत्रशोकांत, गावें
अस्मत्कारुण्य[22] लोकीं, हृतविष[23] अहिचें गोत्र हो कां तगावें[24]? ।

---

१ संतोष. २. नर्मदानदीच्या उदकीं बुडी मारतांच. ३. सुख. ४. स्वर्गाच्या गर्वा. ५. नर्मदा नामक नदी. ६. प्रभानु=कृष्णसत्यभामापुत्र. गुरु=वडील, बाप, काका इत्यादि. ७. ज्या प्रभास-क्षेत्रापासून यात्रेचा आरंभ केला तेथेंच एका वर्षानें बलराम परत आला. ८. त्रिजगाचें अव गद क्लेश यांच्या नाशाचाच एक काम ज्याला अशा रामें. ९. स्वाविद्या माया हाच रोग त्याचा वैद्य त्यानें. १०. रोगनाशक औषध. ११. देण्याकरितांच. १२. या श्लोकाचें वृत्त 'स्रग्धरा.' लक्षण—'मरभनया यौ मुनिमुनिमुनिभिः स्यात्स्रग्धरा विभिन्नांगी' [मन्दारमरन्दचम्पू—वृत्तबिन्दु.] १३. त्या प्रभास क्षेत्रांत. १४. कौरवपांडवांच्या युद्धयज्ञांत. १५. राजे. १६. प्रभास क्षेत्रांतील ब्राह्मणांनीं सांगितलेलें. १७. अनेक राजे कुरुक्षेत्रीं रणयज्ञांत बळी पडले असें विप्रांनीं बलरामाला सांगितलें. त्यांत दुर्योधन पळून लपून राहिला आहे व त्याला मारण्याची प्रतिज्ञा भीमानें केली आहे इत्यादि वार्ता विप्रांनीं बलरामाला कळविली. १८. बलराम. १९. तीन लोकांचें कल्याण. २०. धृतराष्ट्र. २१. राजा. २२. भीमापासून दुर्योधनाचें रक्षण केल्यामुळें माझ्या हातून (बळरामाच्या हातून) झालेलें सदयपण. २३. ज्याचें विष नाहींसें केलें अशा सापाचें. २४. दांत पाडलेल्या सापाचें गोत्र (वंश) जगांत कशासाठीं रहावें?

मारावें हाचि चित्तीं न मंद[1]नुजनिच्या भाव ठाको[2], पैरानें[3]
केलें काय? स्वयेंही मृदु म्हणुनि नये भू[4] खणों कोपरानें. ॥ ३०
या भावें प्रभु[5] जाय तेथुनि कुरुक्षेत्रासि वारावया
अंधातें[6] सुतशोकदुस्तरमहासिंधूंत तारावया, ।
जातां सानुज धर्म कृष्ण नमिती, बोलेल[7] हा काय कीं,
ऐसा धाक पडे तयांसि, गुरुता[8] ऐसीच संन्नायकीं[9]. ॥ ३१
रामें भीम सुयोधन स्वविजयीं बद्धाश ते पाहिले,
युद्धश्रद्ध[10] गदी रदी[11] जयकरेण्वर्थी[12] उभे राहिले. ।
रंगीं नाचति साध्वस[13] त्यजुनियां, जाणो नटक्रीडित
प्रेक्षूनि स्वमनांत होति दिग्गिभ[14] स्वर्मल्लहि[15] व्रीडित[16]. ॥ ३२

(अनुष्टुभ्वृत्त.)

त्यांतें[17] राम म्हणे, 'ऐका हे राजा! हे वृकोदरा! ।
हो दरा न पदाघातें भूसि देऊं नको दरा[18]. ॥ ३३

(श्लोक.)

ऐका हो! हित सांगतों, रण पुरे, ठेवा गदा, या, बसा,
भेटा, वोळखिलें न काय मजला? तो स्नेह गेला कसा? ।
खोटा आग्रह हा ग्रह[19], श्रमचि दे, रे! वीर हो! तामसा[20]
झालां कां वश? ज्यां[21] तमांत न दिसे हा रामही रामसा! ॥ ३४

---

१. कृष्णाच्या. २. न राहो. ३. दुर्योधनानें येवढा अपराध कोणता केला? ४. कृष्णानें धृतराष्ट्रवंश बुडवूं नये असा बलरामाचा हेतु होता. हा चरणांश सुभाषितरूप आहे. 'मऊ सांपडलें म्हणून कोपरानें खणूं नये' ह्या प्रचारांतील उक्तीचें हें पद्यात्मक प्रौढ रूप आहे. साधारण प्राकृत म्हणींचें पंतांनीं असें प्रौढ रूपांतर केल्याचें वारंवार आढळतें. ५. बलराम. ६. धृतराष्ट्रातें. ७. रागें भरेल, टपका लावील. ८. हा चरणांश सुभाषितरूप आहे. ९. साधुनायकांत, बळरामीं. १०. युद्धावर श्रद्धा ज्यांची असे. ११. गज. १२. जयरूप हत्तीण मिळविण्याची इच्छा करणारे. १३. भय. १४. दिग्गज. १५. स्वर्गींचे मल्लही. १६. लज्जित. १७. त्या भीमदुर्योधनांतें. १८. भया. १९. रणाविषयीं आग्रह धरणें हा खोटा ग्रहच (ग्रहासारखा अनिष्टोत्पादक) होय. २०. तमोगुणाला. २१. ज्या तमोगुणांत, ज्या तमोगुणामुळें हा बळराम बळरामासारखा तुम्हाला दिसत नाहीं. त्या तमोरूप अंधकारामुळें तुम्ही मला बळरामाला ओळखीत नाहीं, तुम्ही माझी प्रभुता जाणत नाहीं.

दोघांचें बळ तुल्य ठावुक मला आहे, न कां गा! पहा,
तूं [1]प्राणाधिक एक भीम, दुसरा शिक्षाधिक [2]क्ष्माप हा; ।
राहो निष्फळ युद्ध उद्धतपणें बोला न, द्या कान, या,
ऐकावें [3]सुहृदुक्त युक्त बुध हो! उल्लंघितां कां नया?' ॥ ३५
[4]रामाची करुणावती त्रिभुवनीं मान्या सती [5]भारती,
[6]भीमक्षोणिपतिश्रुतिप्रति मिळों शंके मनीं फार ती; ।
जाणें प्रार्थिलियाविणें परगृहीं कोप प्रसंगीं करी,
स्त्री, पंकांत, जसी तटीं न उदकीं तो भाव अंगीकरी. ॥ ३६
म्हणे मनीं राम, 'चुके न [7]भावि [8]धीप्रदीपिकेची उरवी न भा [9]विधी, ।
[10]अनावरीं विच्युतसायकोपमीं जनीं करूं निष्फळ काय कोप मी'. ॥ ३७
[11]मर्मोद्घाटनमद्य पुष्कळ बळें अन्योन्य जे पाजिती,
ज्यांच्या नित्य हृदंतरीं [12]दुरुदितें मागीलही डाजिती, ।
दुर्द्यूताद्यपकार फारचि सदा दावाग्निसे भाजिती,
ते वीर त्यजितील कां [13]असुपणें आरंभिली [14]आजि ती? ॥ ३८
नाहीं आदरिलें हितोक्त [15]विभुचें त्या दुर्जनें कौरवें,
भीमेंही सुजनें तदेकशरणें कार्याचिया गौरवें; ।
जाया द्वारवतीस राम उठतां हांसे म्हणे, 'बोध कां
आलों यांस करावया न पुसतां आम्हीं अशा [16]शोधकां'? ॥ ३९

१. बलाधिक. २. राजा दुर्योधन. ३. मित्रभाषण. ४. ती रामाची भारती सती त्रिभुवनीं मान्या [आणि] करुणावती [जरी होती तरी] भीमक्षोणिपतिश्रुतिप्रति मिळों फार मनीं शंके—असा अन्वय. जरी बळरामाची वाणीरूप साध्वी स्त्री सर्व जगताला वंदनीय आणि दयापरिप्लुत होती तरी भीम आणि दुर्योधन यांच्या कानाशीं जाण्यास फार शंका पावली. [कारण] प्रार्थिलियाविणें परगृहीं जाणें प्रसंगीं कोप करी (बोलाविल्यावांचून दुसऱ्याच्या घरीं जाणें म्हणजे तें प्रसंगवशात् एकाद्या वेळीं संतापास कारण होतें). स्त्री (एकादी बायको) धड नदीच्या तटीं ही नाहीं आणि धड उदकांत नाहीं, पण पंकीं (चिखलांत) असावी तसा भाव (स्थिति, वर्तन) बळरामाची वाणीरूप स्त्री अंगीकरी (स्वीकारी). ५. वाणी. ६. भीमदुर्योधनांच्या कानाप्रति. ७. होणार. ८. बुद्धिरूप दीपिकेची प्रभा नुरवी. ९. दैव. १०. विच्युतसायकोपमीं (विच्युत+सायक+उपमीं=धनुष्यापासून सुटलेल्या+बाण+उपमा ज्यांस अशा) [आणि] अनावर (आवरण्याचा उपाय नाहीं अशा) जनीं (माणसांवर) निष्फळ असा कोप मीं करूं काय? त्यांनीं माझी आज्ञा ऐकिली नाहीं म्हणून मी व्यर्थ कोप कशास करूं? ११. एकमेकांचीं मर्में बाहेर काढणें हेंच मद्य. १२. दुर्+उदितें=दुर्वाक्यें. १३. प्राणपणानें. १४. संग्राम. १५. बळरामाचें. १६. शहाण्यांस.

तो तेथूनि श्रीबळ द्वारकेला [1]आधीं, पश्चान्नैमिषालाहि गेला, ।<br>
तेथें [2]यज्ञ श्रेष्ठ तद्दक्षिणेला, [3]योगिध्येयांघ्रीश्वरें बोधें[4] केला. ॥ ४०<br>
विप्र [5]रामपदतोयज, मान त्यागुनी, नमिति तो [6]यजमान, ।<br>
धन्य देशसह जें बळ हातें दे न यज्ञशतकीं [7]बळहा तें. ॥ ४१<br>
[8]सुसव वासव वानि असा [9]करी, मुनिजना निजनायक उद्धरी, ।<br>
यश मला [10]शमलापह तें रुचे, [11]ठकवितें कवितें न दुजें सुचे. ॥ ४२

---

## अध्याय ऐशींवा.

(गीतिवृत्त.)

श्रीदामा विप्र सखा होता हो! [12]तापपापकाळाचा ।<br>
पदलीन दीन मीन क्षीरधिचा विश्ववृष्णिपाळाचा ॥ १<br>
ब्रह्मज्ञ ब्राह्मण तो [13]साधु गृहस्थाश्रमी [14]समीचीन ।

---

१. शिष्यद्वयाचें यथाविध गदायुद्ध पाहून राम आधीं द्वारकेस गेला व तेथें समस्तांची भेट घेऊन नंतर नैमिषारण्यीं ऋषिजनाकडे गेला. (श्लो० २९–३०). २. त्या नैमिषारण्यांत त्या रामाच्या दक्षिणेसाठीं मुनिजनांनीं मोठा यज्ञ केला, मुनिजनांनीं मोठा यज्ञ करून आनंदानें त्याची यथाविधि पूजा केली. ३. योग्यांनीं ध्यान करण्यास योग्य असा अंघ्रि (पाद) ज्याचा असा ईश्वर (प्रभु) जो बलराम त्यानें. ४. रामानें मुनिजनाला विशुद्धविज्ञान सांगितलें. (श्लोक ३१.) "तया मुनीश्वरांकारणें । विशुद्ध विज्ञान संकर्षणें । षड्गुणैश्वर्यसंपन्नें । समर्थपणें प्रबोधिलें ॥ १ ॥ जेणें विशुद्धज्ञानेंकरून । परब्रह्म जें अधिष्ठान । त्याच्या ठायीं भेदविहीन । विश्व अभिन्न आत्मत्वें ॥ २ ॥ आत्मा म्हणिजे परब्रह्म । सर्वी सर्वग सर्वत्र सम । आपणें सहित कैवल्यधाम । बोधे सुगम ज्या ज्ञानें ॥ ३ ॥ जया विशुद्ध ज्ञानें करून । विश्वग विश्वात्मा आपण । जाणते झाले ते मुनिगण । संकर्षणप्रबोधें ॥ ४ ॥ तस्मात् धर्मसंस्थापना । सूतहत्येच्या निरसना । भारतवर्षप्रदक्षिणा । तीर्थें नाना करूनियां ॥ ५ ॥ पुढती येऊनि आश्रमा । रामें भेटूनि द्विजोत्तमां । विशुद्धज्ञानें कैवल्यधामा । समरस केला प्रबोध ॥ ६ ॥" [श्लोक ३१ 'श्रीहरिवरदा' नामक टीका.] ५. रामपादकमल. ६. विप्र मान त्यागुनी रामपदतोयज नमिति=विप्रांनीं अभिमान सोडून बळरामाच्या चरणकमलास नमन केलें. धन्य यजमान तो बळ (तो यजमान बळराम श्लाघ्यजीवित होय जो) हातें (आपल्या हातानें) देशसह जें दें तें बळहा (इंद्र) यज्ञशतकीं न दे=बळरामानें आपल्या हातानें भूमि द्रव्य इत्यादि जें दान ब्राह्मणास दिलें तसें दान इंद्रानेंही शंभर यज्ञांत केलें नाहीं. जो शंभर यज्ञ करतो तो इंद्रपद पावतो ही पौराणिकी समजूत सुप्रसिद्ध आहे. ७. इंद्र. (बलहंता.) ८. उत्तम यज्ञ. या पद्यांतील प्रत्येक चरणांत 'लाटानुप्रास' आहे. ९. बलराम करी. १०. शमल+अपह=पाप मलिनता+नाशक. ११. मोहतें. १२. तापाचा [व] पापाचा काळ जो विश्ववृष्णिपाळ (कृष्ण) तोच क्षीरधी (क्षीरसमुद्र) त्याचा पदलीन दीन असा मीन (मासा) (तद्भक्त सुदामा इत्यर्थः). १३. प्रशांतात्मा, जितेंद्रिय. १४. चांगला.

[१]श्री न प्रेक्षी, परि जो मी न स्वांतीं, घरीं नसे दीन. ॥ २
[२]वर्ते [३]दैवोपनतें, मन तें वश, इंद्रियें सदैव [४]नतें, ।
न मितें [५]अनाढ्य, अमितें आत्मधनें जो कुबेर [६]सन्नमितें. ॥ ३
निष्ठा भगवद्ध्यानीं, हा निःस्पृह विप्रसत्तम [७]ज्ञानीं ।
मानी लाभ, न हानी, ग्लानि नसे [८]शांतिसुरभिच्या थानीं. ॥ ४
पत्नीस [९]क्षुच्छमनक्षम न स्वप्नीं [१०]कदन्नही, गमनीं ।
श्रम नीटाही मार्गीं, आच्छादन मूर्तिला जिच्या [११]धमनी, ॥ ५
[१२]शुष्करसा जसि सरिता, तैसी [१३]गतकामकोप विप्रतनु; ।
दुष्कर साध्वी करि तप, [१४]तत्तनु न [१५]स्वार्थ लोपवि [१६]प्रतनु. ॥ ६
दं[१७]डें उदंडचि साहे जैसें [१८]तद्वपु तसेंचि [१९]तद्वसन, ।
व्यसन श्रीशध्यानीं, न स्फुरवि क्लेश तें [२०]सदभ्यसन. ॥ ७
[२१]हतरुचि वसनें मलिनें, कलिनें [२२]अस्पष्ट साधुलोक, मळें ।
कीं जेंवि [२३]मुकुरबिंबें, कीं शेवाळेंहि झांकिलीं कमळें. ॥ ८

---

१. संपदा. २. अनायासेंकरून जें प्राप्त होतें त्यानें गृहस्थाश्रमाचरण करी, प्रपंचाकडे न पाहतां, फार थोडें असें न म्हणतां, संतोषानें संसार चालवी–असा भाव. ३. यदृच्छाप्राप्तवस्तूनें. या अर्धांत 'नतें' या अक्षरद्वयाची आवृत्ति झाली आहे, व उत्तरार्धांत 'मितें' याची ही आवृत्ति झाली आहे. ४. शांत, नम्र. ५. मितें धनें अनाढ्य (दरिद्री नव्हे). ६. साधूंनीं नमित (आदृत) जें अमित आत्मधन (ईश्वररूप धन) त्यानें जो कुबेर (कुबेरसदृश धनाढ्य). ७. ज्ञानीं लाभ मानी. ८. शांति हीच कामधेनु तिच्या थानीं (स्तन्यपानीं) ग्लानि (अनुत्साह) कधींही नसे=सदा शांत असे. ९. क्षुधेचें शांतवन करण्यास क्षम (शक्त). १०. जाडें भरडें अन्नही. त्या सुदामाचे बायकोला क्षुधा निवारण करण्यास पुरेइतकें शिळें पाकें (कदन्न) जाडें भरडें अन्न मिळत नसे, इतकेंच नव्हे, तर स्वप्नांतही कधीं मिळालेलें नाहीं, मग प्रत्यक्ष तर दूरच; गमनीं (जात असतां, चालत असतां) चांगल्या मार्गानें ही तिला श्रम होत असत. ११. नाडी. शिरा हें जिच्या मूर्तींचें आच्छादन होतें. तिला शरीर आच्छादण्यास पुरे इतकें वस्त्रही नसे. १२. जींतील पाणी सुकलें अशी सरिता (नदी.) १३. गेला आहे काम व कोप जीचा (अशी विप्रतनु). १४. तिची तनु. १५. तनुपणा. प्रतनु तत्तनु स्वार्थ न लोपवी=तिची अतिकृश तनु स्वार्थ (आपला कृशपणा) दाखवी. 'तनु' या शब्दाचा जो स्वार्थ (मूळचा अर्थ–कृशपणा) तो सुदामस्त्रीचे तनूनें जगास दाखविला. १६. अतिकृश. १७. दुःख किंवा शिवण. १८. तिचें वपु (शरीर). १९. तिचें वसन (लुगडें). २०. ब्रह्मत्वाचा अभ्यास. २१. शोभारहित. मलिन वस्त्रामुळें सुदामाचें कुटुंब शोभारहित होतें. जसे साधु लोक कलिनें अस्पष्ट (लुप्त–झांकलेले) कीं (किंवा) मुकुरबिंबें मळें (मळानें), कीं (किंवा) कमळें शेवाळें ही झांकिलीं. २२. लुप्त. २३. मुकुरबिंबें=आरशांतील प्रतिबिंबें जशीं मळानें.

साध्वी करि [1]धृतिरक्षण, न क्षणही [2]भावि ताप [3]तोकांचे ।
परि [4]सुगुणेंहि [5]शिलाही साहील किती सुताप तो ? कांचे. ॥ ९
भयकंपिततनु साध्वी बहुतां दिवसींच रीति दावि नवी ।
[6]भावि न वीरासहि भी, पतिच्या [7]अतिचारुमति पदा विनवी. ॥ १०
'अयि ! विद्वन्मुकुटमणे ! स्वामी ! तुमचा सखा [8]रमावर कीं, ।
नरकीं न पडे पापी यन्नामें, सदय तो [9]नतावर कीं ? ॥ ११
अजि ! त्या [10]ब्रह्मण्यातें [11]करुणावरुणालया [12]शरण्यातें ।
त्यजति न सरा जसें बक, सेवकमृग [13]कल्पतरुवरण्यातें. ॥ १२
त्याच्या तुम्हींच गातां प्रेमें नेमें सदा चरित्रास, ।
कीं त्रास [14]हरि [15]भवाचा, भेटा जी ! एकदा स्वमित्रास. ॥ १३
डोळे भरि अवलोका [16]लोकाधारा तया महाभागा, ।
[17]आगारा श्रीच्या मी स्वामी ! म्हणत्यें पहावया [18]भागा. ॥ १४
दीन कुटुंबप्राण[19]त्राण द्रव्याविणें कसें होय ? ।
तो [20]यक्षपेश चित्तें वित्तें देईल, घन जसें तोय. ॥ १५
त्यासम तोचि [21]उदार, [22]स्वात्मार्पणही हरी करी, राजे ।
या जे भूवरि दाते तेहि उणे [23]अर्पिते शरीरा जे. ॥ १६

---

१. धैर्यरक्षण. २. मानी. ३. मुलांचे. ४. उत्तम गुणानें (दोरीनें). ५. परि तो सुताप [ती साध्वी] किती साहील ? शिला ही सुगुणें हि कांचे=चांगला दोर असला तरी त्यानें शिलाही कांचते (कापली जाते). मोठी कठीण अशी धोंड असली तर ती उत्तम दोरीनें कापली जाते. ६. वीराला सुद्धां जशी भावि (होणारी–भविष्यत्) भी न (नसते) तशी भीतिरहित होत्साती. धैर्यानें (आपलें बोलणें नवऱ्यास मान्य होवो अगर न होवो–त्याची काळजी न बाळगतां) सुदामस्त्री त्याला विनविती झाली. ७. सुमती साध्वी. ८. लक्ष्मीपति (कृष्ण). ९. भक्तावर. १०. ब्राह्मणाविषयीं दयालु अशातें. ११. करुणासागरा. १२. शरणसाधुतें. १३. कल्पतरूचें वन अशातें सेवक हेच मृग न त्यजिति. १४. निवारी. १५. संसाराचा. १६. येथें 'लाटानुप्रास' आहे. १७. घरा. १८. जाण्याचे श्रम घ्या. १९. रक्षण. २०. कुबेराचा स्वामी. २१. हें 'अनन्वय' नामक अलंकाराचें उदाहरण आहे. जेथें ज्याची त्यालाच उपमा दिली असते म्हणजे जेथें उपमानत्व आणि उपमेयत्व हीं दोन्हीं एकाच वस्तूवर असतात, तेथें हा अलंकार होतो. जसें:—गगन हें गगनासारखें आहे, रामरावण हे रामरावणोपम होत. याचें लक्षण व उदाहरण—'उपमानोपमेयत्वं यदेकस्यैव वस्तुन: । इंदुरिंदुरिव श्रीमानित्यादौ तदनन्वय: ॥ गगनं गगनाकारं सागर: सागरोपम: । रामरावणयोर्युद्धं रामरावणयोरिव ॥'. आणखी प्राकृत उदाहरणें:—(१) झाले बहु, होतिल बहु, आहेतहि बहु, परंतु यासम हा; । यास महादेवा ! दे जय पाहिन कवि धनंजयास महा ॥ १ ॥ [मोरोपंत–विराटपर्व–अध्याय ४ गीति ७५; काव्यसंग्रह–पृष्ठ ९६], (२) शक्र म्हणे 'बा ! तुजसम तूंचि भला विश्वमहिततर शील, । व्यसनातें बंधूंसह निर्दाळुनि सर्व अहित तरशील.

भजकां कामित[1] जो दे तो देव द्वारकापुरीं आहे, ।
लोक सकाम[2] अकामहि[3] महितगुणा[4] त्याचिया पदा पाहे. ॥ १७
जो मेघ कूप पल्वल वापी कासार[5] शत महासरिता[6] ।
भरि, तारका[7] तयाचा कां राहे चातकाख्य दास रिता?' ॥ १८
दीनाचा बंधु प्रभु विश्वात्मा त्यामुखें[8] असें बोधी, ।
'तो धीरमणि[9] पहावा' भावाची[10] दर्शनोत्सुका[11] हो धी. ॥ १९
विप्र म्हणे, 'बहु बरवें, भेटेल सखा महेंद्रनीलाभ[12], ।
स्त्रीला भव्यचि[13] सुचलें, याहुनि दुसरा[14] नसे जनीं लाभ. ॥ २०
काय उपायन[15] आहे? आणि द्याया सख्यास[16] कल्याणी[17]! ।
'पाणी[18] रिक्त नसावा[19]' स्मृतिकाराची[20] असी असे वाणी. ॥ २१

॥ १ ॥ [मोरोपंत—वनपर्व—अध्याय २ गीति ११४; काव्यसंग्रह—पृष्ठ २७], (३) श्रीरामरावण-समर होय श्रीरामरावणसमरसा । ते वृष्टि जसे न करिति तसि शुचि सशकार रावण समरसा. ॥ १ ॥ [वनपर्व—अध्याय १२ गीति ६६; काव्यसंग्रह—पृष्ठ १७९], (४) होय रामराज्य राम-राज्यसेंचि तोखद, व्याधि जो भवाख्य उग्र हें तयासि ओखद । कीं करी प्रकाशुनि स्वसन्म हा निरंजन, श्रीश बुद्धिचें हरूनि जन्म हानि रंजन ॥ १ ॥ [पंचचामर रामायण—श्लोक ८१; सर्व-संग्रह—पृष्ठ ४०५], (५) यासम हाचि धनुर्धर म्हणतां उपपन्युसुरतरु रुसेना । रण विसरतिल रिपुचमू जेंवि हरिसमक्ष सुरत रुरुसेना ॥ १ ॥ [मोरोपंत—कर्णपर्व—अध्याय ४० गीति ५९; सर्वसंग्रह—पृष्ठ १६५], २२. सच्चित्सुख देई. जो निजभजकांतें स्वात्मार्पण करी. २३. शिबि-प्रभृति राजे—ज्यांनीं स्वदेहार्पण केलें आहे असे.

१. इच्छित. २. सस्पृह. ३. निःस्पृह. ४. पूज्यगुणा (पदा). ५. तळीं. ६. मोठ्या नद्या ७.तारका तयाचा=त्या तारकाचा. तारक अशा त्या मेघाचा चातक नामक दास रिता कां राहे? त्या तारक मेघाचा चातक नामक दास तृप्त कां होणार नाहीं? तृप्त होईल यांत संदेह नाहीं—असा भावार्थ. 'तारका तयाचा'=तया तारकाचा. येथें शब्दांची योजना उलट केली आहे. ८. त्या स्त्रीच्या मुखानें. ९. धीरश्रेष्ठ. १०. बंधु सुदामा याची. ११. कृष्णदर्शनाविषयीं उत्सुक अशी सुदामाची धी (मति) हो (झाली). १२. महा+इंद्रनील+आभ (आभा=कांति)=मोठा+इंद्रनील नामक निळ्या वर्णाचें रत्न+शोभा=इंद्रनील मण्याप्रमाणें कांति ज्याची असा (श्रीकृष्ण). १३. उत्तमश्लोकदर्शनरूप कल्याण. १४. धनादिक लाभ हा दुसरा लाभ, पण हा खरा लाभ नव्हे. १५. भेटीस न्यावयाला वस्तु. १६. कृष्णाला. १७. हे स्त्रिये! १८. हात. १९. गुरु, राजा आणि देव यांच्या दर्शनास रिकाम्या हातानें जाऊं नये, कांहीं तरी त्यांस देण्यासाठीं हातांत घेऊन जावें—असें स्मृतिवचन आहे. 'रिक्तपाणिर्न पश्येत राजानं देवतां गुरुम्' असें एक वचन सुप्रसिद्ध आहे. हाच अर्थ पंतानीं 'पृथुकोपाख्याना'त दर्शविला आहे. 'रिक्तपाणिनें न विलोकावा गुरु ऐशी स्मृतिवाणी' [पृथु-कोपाख्यान-साकी ११]. २०. या उल्लेखावरून पंतांस स्मृतिशास्त्र बरेंच परिचित असावें असें म्हणतां येईल काय?

आपुलिया यदुवीरा दीरा द्यायास काय देतीस? ।
नेती सप्रेम सखे भेटि सख्याला.' असें वदे तीस. ॥ २२
[१]वदतां वचना विप्र, क्षिप्र प्रहसितमुखी म्हणे, '[२]हो! हे ।
पोहे' वि[३]प्रापासीं याची, याचिक्षणीं श्रमी नोहे. ॥ २३
[४]अंशुकखंडीं यत्नें रत्नेंसे बांधुनी दिले पतिला, ।
अतिलाभचि तो केवल, दे बल उत्साह साधुच्या मतिला. ॥ २४
येतांचि मनांत निघे, होती [५]शुभ द्वारकापथीं शकुन, ।
न [६]कुनक्षत्रादि तईं जरी निघतां कृष्ण ये [७]मुखा [८]ठकुन. ॥ २५
प्रकटावे जे सात्विक भाव मुकुंदाचिया [९]परिष्वंगीं ।
अंगीं मुनिच्या दिसती, काय [१०]पंथिक तेहि लुब्ध सत्संगीं? ॥ २६
विप्र म्हणे, '[११]वपु वाहन वाक् विद्या [१२]वरें नसेचि न [१३]सुचेल. ।
होइल भेटि कसी? जरि तो [१४]हों हें त्या सख्यास न [१५]सुचेल. ॥ २७
तो साक्षात् [१६]श्रीजानी, ज्या निर्जित[१७]खलबला [१८]बलावरजा ।
वरजातिकुलज गाति, ध्याति पदींच्या नृदेव देव [१९]रजा. ॥ २८
सर्वज्ञ सखा माझा, वि[२०]श्वात्मा कां न वोळखेल मला? ।
अमलातुलगुण [२१]तोका तो कां [२२]उबगेल न क्षण श्रमला'. ॥ २९

---

१. हें वाक्य संस्कृतांतील 'सति सप्तमी'सारखें आहे. २. 'हो (अहो!) हे पोहे' असें सुदामस्त्री बोले. ३. विप्रापासीं याची=ती शेजारच्या ब्राह्मणाच्या घरांतून पोहे मागून आणती झाली. याच प्रसंगीं मात्र तिला याचना करण्याचे श्रम वाटले नाहींत. ४. विप्राच्या घरीं जाऊन चार मुठी पोहे मागून नवऱ्याच्या जर्जर झालेल्या धोतरांत कृष्णाला उपायन (भेट—नजराणा) म्हणून बांधून दिले. (श्लो० १४.) अंशुक+खंडीं=वस्त्र+भागीं (तुकड्यांत). ५. कार्यसिद्धीचे सूचक असे शकुन साला झाले. (श्लोक १५.) ६. दुष्ट नक्षत्र, दुष्ट वार, दुष्ट लग्न इत्यादि कांहीं असत नाहीं. ७. प्रयाणकाळीं 'कृष्ण' असा शब्द तोंडीं सहज (चुकून) जरी आला तरी दुष्टनक्षत्रादिक नष्ट होतात, बाधा करीत नाहींत. पदोपदीं कृष्णनाम स्मरण करीत सुदामा चालला होता. ८. सहजगतीनें. ९. आलिंगनीं. १०. ते (सात्विक भाव) हि सत्संगीं लुब्ध (साधुसमागमोत्सुक होत्साते) पथिक काय? (मार्गस्थ झाले काय?) साधुसमागमाची प्रीति धरून सुदाम्याबरोबर सात्त्विक भाव ही मार्ग क्रमण करूं लागले काय असें वाटे. ११. या अर्धातील शब्दांचा आरंभ 'व'-कारानें झाला आहे. १२. श्रेष्ठ, शोभन. १३. चांगलें वस्त्र. १४. तो लहानपणचा मित्र हा हें. १५. स्मरेल, आठवेल. १६. लक्ष्मीपती. १७. जिंकिलें खळाचें बल (सैन्य) ज्यानें असा (कृष्ण). १८. बलाच्या (रामाच्या) अवरजा (भावाला). १९. पदींच्या रजा नृदेव देव ध्याति—असा अन्वय. २०.'आभ्यां च ज्ञानकर्मभ्यां विश्वात्मा व्यापनात्स्मृत:' [विष्णुनामसहस्र—विवृतिसहित—श्लो० २४.] २१. येथें 'लाटानुप्रास' आहे. २२. कंटाळेल.

ऐसें चिंतित [1]चिंतकचिंतामणितें मुनि क्रमी [2]वाटे, ।
दाटे श्रीरंग मनीं, [3]गमनीं बाहेरचि श्रमी वाटे. ॥ ३०

[4]भगवच्चरणध्यानें हा नेला साधु न चुकतां नीट, ।
धीर जसा **श्री**सदनीं, [5]सदनिष्टघ्ना न ज्यांत ये [6]वीट. ॥ ३१

तेंव्हां होता अमला **क**मलाशयनीं **मु**कुंद [7]तीसहित, ।
महितप्रताप जो **ह**रि, मोह रिपू नित्य त्यास, तीस हित. ॥ ३२

सदनांगणांत दूरुनि पाहुनि [8]सन्मित्र बंधुला सहसा, ।
सहसात्त्विकभाव प्रभु धांवे तो होय [9]मूर्तसन्महसा. ॥ ३३

राहे हर्षीं न मना [10]नमनाचें भान बंधु [11]पाहूनी, ।
[12]बाहूनि प्रेमानें मानें आलिंगिलाचि [13]बाहूनीं. ॥ ३४

[14]दोघांचेंही होतां आलिंगन [15]हृत्प्रमोदकारि गळे ।
दाटति, दोघांच्याही नेत्रांतूनि [16]प्रभूत [17]वारि गळे. ॥ ३५

बैसविला तो बंधु [18]त्रिजगत्तातें मग [19]स्वपल्यंकीं, ।
आधींच भक्तवत्स [20]स्वकृपासत्कामकल्पवल्ल्यंकीं. ॥ ३६

तोषे तो तीर्थाचा गुरु [21]सेवकपापयवसदव धूतां ।
[22]बंधुपदांतें, दुर्लभ [23]यच्छ्रीपदधूलिलव [24]सदवधूतां ॥ ३७

---

१. भक्तांचा चिंतामणि कृष्ण त्यातें. २. मार्गाला. ३. येथें ही 'लाटानुप्रास' आहे. ४. भगवंताच्या पायांचें ध्यान त्यानें. ५. संतांचें अनिष्ट दूर करणारा जो कृष्ण त्याला. ६. कंटाळा. ७. लक्ष्मीसहित. नित्य त्यास (त्या कृष्णाला) मोह रिपू (वैरी आहे) [आणि] तीस (त्या कमलेला—लक्ष्मीला) हित (मित्र) असा महितप्रताप (पूज्यपराक्रम) जो हरि तो श्रीसदनीं होता. कृष्ण रुक्मिणीमंदिरांत होता, तरी विषयलंपट नव्हता, कारण तो मोहाचा नित्य वैरी होय. मोह हा लक्ष्मीचा मात्र मित्र होय कारण ती मोहाला उत्पन्न करते. ८. कृष्ण. ९. मूर्तिमंत उत्तम आनंदच काय. १०. येथें ही 'लाटानुप्रास' आहे. ११. बंधु पाहूनी हर्षीं नमनाचें भान मना न राहे—असा अन्वय. १२. सख्या ये ये असें म्हणून. १३. भुजांनीं. (श्लो० १८.) १४. हृदयास आनंद. देणारें आलिंगन होतां दोघांचेही गळे दाटति—असा भाव. १५. हृदयाला आनंदप्रद. १६. विपुल. १७. आनंदाश्रु. १८. कृष्णानें. १९. आपल्या मंचकावर. २०. आपली कृपा हीच सत्कामकल्पवल्ली तिच्या मांडीवर आधीं बैसविला. २१. सेवक+पाप+यवस+दव=भक्त+दुरित+तृण+अग्नि=भक्ताचें पाप हेंच तृण त्यातें जाळणारा अग्निच असा कृष्ण. २२. बंधुपदांतें धूतां तो सेवकपापयवसदव [व] तीर्थाचा गुरु तोषे—असा अन्वय. (श्लो० २०.) २३. यत्+श्री+पद+धूलि+लव=ज्याचें+लक्ष्मी+चरण+रज+कण=ज्याच्या उत्तम चरणाचे रजःकण उत्तम योगिजनास अप्राप्य. २४. सद्+अवधूतां=उत्तम साधूला.

[1]यत्पदरज:पवित्रा [2]देवधुनी [3]जगदशुद्धितें वारी, ।
धरि माथां [4]तो पावन [5]जनसंग्रहनिष्ठबुद्धि तें [6]वारी. ॥ ३८
सुर आपणास पूजिति तैसें पूजी **सुदामदेवातें**, ।
ढाळुनि [7]सुव्यजनाला त्या सुख [8]शैब्या [9]निकाम दे [10]वातें. ॥ ३९
'स्वपतिसख द्विज' ऐसें जाणति नातें [11]पुराण न [12]वधू तें, ।
विस्मित होउनि म्हणती, 'या केलें काय पुण्य [13]अवधूतें? ॥ ४०
त्यजुनि **श्री**स पलंगीं, धांवुनि आलिंगिला [14]अधम [15]भिक्षु, ।
[16]छि:, [17]क्षुज्जीर्ण मलिन वरि, परि **हरि** करि लोभ, हा गमे [18]इक्षु.॥ ४१
प्रेमें आलिंगावे जैसे धांवूनि [19]रामभावोजी ।
तो जीवप्राणप्रियभाव प्रभु याहि भिक्षुकीं योजी. ॥ ४२
ऐसा केवळ दीन, [20]श्री न स्वल्पहि, दिसे कुरूप महा, ।
पूजियला [21]सद्गतिनें पतिनें तरि कोण कीं [22]गुरूपम हा?' ॥ ४३
त्या [23]सच्चूडारत्नीं पत्नी **हरि**च्या सुविस्मिता होती, ।
तो तीर्थपद [24]श्रवणप्रवणश्रवणांत [25]वाक्सुधा [26]ओती. ॥ ४४
'[27]श्रीगुरुचरणानुज्ञा झाली आम्हां तुम्हां [28]सहचि [29]आर्या ! ।
केली कीं [30]अनुरूपा [31]कार्यगृहस्थाश्रमार्थ मग भार्या? ॥ ४५

---

१. ज्याच्या पदरजानें (चरणधूलीनें) पूत झालेली. २. भागीरथी. ३. जगत्+अशुद्धितें=जगाच्या+मलिनतेला. ४. शिव. ५. लोकसंग्रहाकडे दृष्टि देणारा. ६. तें पादोदक. (श्लो० २१.) ७. चांगल्या पंख्याला ढाळून. ८. रुक्मिणी. ९. अत्यंत. १०. वायूच्या योगानें. (श्लो० २३.) ११. पुरातन नातें. १२. अंत:पुरवासिनी स्त्रिया. १३. अवधूत=विरक्त, विरागी, संन्यासी, योगी. ['यो विलंघ्याश्रमान्वर्णानात्मन्येव स्थित: पुमान् । अतिवर्णाश्रमी योगी **अवधूत:** स उच्यते ॥' किंवा 'अक्षरत्वात् वरेण्यत्वात् धूतसंसारबंधनात् । तत्त्वमस्यर्थसिद्धत्वा**दवधूतो**ऽभिधीयते ॥']. १४. दरिद्री. १५. भैक्ष्यजीवी. १६. कंटाळ्याचा उद्गार. १७. क्षुधेनें कृश असा. १८. उंस. उंस हा पाणतुटा झाला म्हणजे गोड होतो, वर मलिनही असतो तरी आवडतो; तसा सुदामा ही होतो. १९. श्लोक २६ पहा. २०. कांति. २१. संतांची गति, आधार, आश्रयस्थान, जो कृष्ण त्यानें. २२. गुरु+उपम=आचार्य+सम=गुरूसारखा. २३. साधुश्रेष्ठाविषयीं. २४. कृष्णभाषण ऐकण्याविषयीं तत्पर जो त्याच्या श्रवणांत. २५. वाक्यामृत ओती म्हणजे बोले—असा अर्थ. २६. श्रीकृष्ण त्याजपाशीं बोलूं लागला. २७. श्रीगुरुचरणाची आज्ञा. २८. बरोबर, एकदांच. २९. हे श्रेष्ठा! ३०. योग्या, उचिता. ३१. करण्यास योग्य असा जो गृहस्थाश्रम त्यासाठीं योग्य अशी भार्या तुम्ही केली काय? समावर्तन केल्यावर गृहस्थाश्रमांत भार्या करणें हें प्रमुख कार्य आहे. लग्न केलें काय असा प्रश्न कृष्णानें कां केला ह्याचें कारण असें:—'ऐसा संशयात्मक हा प्रश्न । म्हणाल केला काय म्हणून । तरी म्यां तुमचें देखतां चिन्ह । संशयापन्न मन झालें ॥१॥ यज्ञोपवीतें

पहिलेंचि तुझें नाहीं मन संसारीं, सदा उदासीन, ।
मीन समुद्र त्यागुनि होइल कां पॅल्वलोदकीं दीन? ॥ ४६
चित्त तुझें कामांहीं नाहीं हरिलें, विरक्तिचें सदन, ।
पद न स्थितिचें जैसें जलबिंदूच्या सॅरोरुहच्छद न. ॥ ४७
पूर्वींपासूनि धनीं निधॅनीं प्रेम न तुझें तॅपोनिलया ! ।
जाणसि कीं तें कॅविला चॅवि लावुनि नेतॅसे जपोनि लया. ॥ ४८
हें मज आहे ठावें हृदय तुझें शुद्ध जें दुधापरिस ।
परि सत्यनिधे! कांहीं वदतों मी मित्रॅ तें बुधा! पॅरिस. ॥ ४९
कॅंमास नसति वश, परि टाकाया विषयवासना धीर, ।
क्षीरस्वच्छमतीही कर्में करिती निसर्गगंभीर. ॥ ५०

---

बहुत कंठीं । न दिसे बहिर्वासकासोटी । श्मश्रुकूर्चमूर्धज मुकुटीं । दिसती दृष्टी विसर्जिले ॥ २ ॥ यावरूनी मानूं आम्ही । तुम्ही वर्तता गृहस्थाश्रमीं । आणि भोगवर्जित चिन्हें वर्ष्मीं । जे प्रथमाश्रमीं कीं नेणों ॥ ३ ॥ अभ्यंगसहित अंग मलिन । तांबूलकषायवर्जित दशन । परिमित वाणी गृहीतमौन । व्रतस्थ म्हणून संशय हा. ॥ ४ ॥' [श्लोक २८, 'श्रीहरिवरदा' नामक कृष्णदयार्णवस्वामीकृत टीका].

१. गुरुगृहीं विद्यासंपादन केल्यावर त्याची आज्ञा घेऊन ब्रह्मचारी द्विजानें यथाविधि समावर्तनसंस्कार करून सवर्ण आणि लक्षणान्वित अशी स्त्री वरावी असा शास्त्रमार्ग आहे. (मनु–अ० ३ श्लो० ४.) परंतु सुदामा लहानपणापासून विरक्त होता हें कृष्णास विदित होतें. सुदामदेवाचें आचरण स्मृतिशास्त्रास अनुसरून नसावें असें जाणून कृष्णानें त्यास प्रश्न केला आहे. आत्मज्ञानप्राप्ति करून घेणें हें मुख्य कर्तव्य होय, व गृहस्थाश्रमाचा अंगीकार करणें गौण पक्ष होय, या तात्विक नियमास अनुसरून कृष्णाचा प्रश्न आहे. समुद्राचा त्याग करून लहान खाड्यांतील सांचलेल्या पाण्यांत पडून कोणी मासा दीन होईल काय? असा प्रश्न आहे. समुद्र (आत्मज्ञानलाभरूप सागर) त्यागुनि (टाकून) पल्वलोदकीं (या तुच्छ अल्प संसारांत) मीन (आत्मज्ञानाची गोडी समजणारा विवेकी मनुष्य) दीन (तुच्छ) कां होईल ?=अर्थात् होणार नाहीं. हें उत्तरार्ध सुभाषितरूप आहे. २. सरोरुह+छद=कमल+पत्र=कमलपत्र जसें जलबिंदूच्या स्थितीचें पद न तसें. ३. निधन=वंश, कुल. येथें 'लाटानुप्रास' आहे. ४. तपःसदना! ५. पंडिताला, विद्वानाला. ६. गोडी. ७. कृष्ण सुदामदेवास म्हणतो:—तें (धन+अपत्य) कविला (ज्ञात्या पुरुषाला) चवि लावुनि (गोडी लावून) जपोनि (मोठ्या काळजीनें, निःसंशय) लया (नाशा) नेतसे (नेत असतें) [हें] जाणसि कीं (तूं जाणतोस–तुला माहीत आहे कीं धनानें मनुष्याचा नाश होतो). ८. मी मित्र म्हणून सांगतों. ९. ऐक. १०. धीर [पुरुष] कामास वश नसति (धनकामिनीसदनादिविषयासक्त नसतात), परि (परंतु) विषयवासना (विषयकामना) टाकाया निसर्गगंभीर (जात्या विचारशील) [व] क्षीरस्वच्छमतीही (दुधासारखें विमल मन असून ही) (लोकसंग्रहार्थ सहज) कर्में करिती—असा अन्वय.

जैसीं कर्मे करितों [1]मी ठेवुनि लोकसंग्रहीं दृष्टी, ।
सृष्टिस्थितिसंहारहि जीवार्थचि, [2]सागरीं वृथा वृष्टी. ॥ ९१
श्रीमद्गुरुवरसदनीं होतों, करितोसि कीं गुरुस्मरण ? ।
चरणप्रसाद ज्याचा [3]अद्भुतरवि करि [4]गुहातमोहरण. ॥ ९२
[5]कीरापरी पढविलें, बाळा जसि माय पाजिति क्षीरा, ।
धीरा ! [6]गुरुपदनौकाश्रित तो पावे [7]भवाब्धिपरतीरा. ॥ ९३
गुरु आद्य [8]पिता, दुसरा [9]विद्याप्रद मत्समान गुरु लोकीं, ।
शोकीं [10]तारक तिसरा, तो मीचि ज्ञानदानपटु जो कीं. ॥ ९४
गुरु [11]कर्णधार, त्याची सुदृढा [12]तत्त्वोपदेशवाक् [13]सुतरी ।
धरुनि भवांबुधि तरले बहु बुध, तत्कीर्तिही जना उतरी; ॥ ९५
[14]वर्णाश्रमधर्मीहीं नाहीं मज होत फार परितोष, ।
जो [15]षट्पद गुरुच्या पदपद्मीं दे तोचि तोष गतदोष. ॥ ९६

---

१. मी (कृष्ण—ईश्वर) अकाम आणि कर्मफलाशारहित असूनही लोकांचें—संग्रहण जसें होईल तसें व्हावें म्हणून कर्माचरण करतों. (श्लो० ३०.) २.हा चरणांश सुभाषितरूप आहे. ३. विलक्षण सूर्य. ४. गुहेंतील अंधकार नाशितो, हाच विलक्षणपणा. गुहा म्हणजे हृदय असें समजावें. ५. पोपटासारखें. ६. येथें 'रूपक' झालें आहे. ७. जो गुरुपासून परमात्मतत्त्व जाणतो तो संसाराच्या पैलतीराला जातो. (श्लोक ३१.) ८. आत्मज्ञानप्रद जो गुरु तो पूज्यतम होय असें निरूपण करण्यासाठीं गुरुत्रयाचें वर्णन या पद्यांत केलें आहे. ज्यापासून जन्मलाभ होतो तो (पिता) प्रथम गुरु होय. ९.उपनीयवेदाध्यापक हा दुसरा गुरु. उपनयनादि संस्कारकार्य,वेदाध्यापक, स्वकर्माचारदर्शक मंत्रोपदेष्टा हा दुसरा गुरु. १०. संसारशोकापासून तारण करणारा, भवभ्रमपरिहारक, अमृतत्वदायक, भवभयहारक, ब्रह्मविद्याप्रद हा तिसरा गुरु, हाच पूज्यतम होय. ज्ञानोपदेष्टा गुरु श्रेष्ठ आणि जन्मकर्मप्रद गुरु कनिष्ठ—असें तात्पर्य. 'ज्ञानोपदेष्टा गुरु तो श्रेष्ठ । जन्मकर्मप्रद कनिष्ठ । ऐसें विवरूनी एकनिष्ठ । दास्यीं दृढिष्ठ ते धन्य ॥ १ ॥ वेदवेदार्थी अतिप्रवीण । त्यांचेनि जन्म परम धन्य । त्यांचेनि सकळ कर्माचरण । जिहीं सद्गुरुचरण दृढ धरिले ॥ २ ॥ मूत्रद्वारें जन्मविते । लक्षचौऱ्यायशींमाजी पिते । किती झाले असती त्यांतें । असे कोणातें गुरुत्व पैं ॥ ३ ॥ वर्णाश्रमकर्मनिष्ठे । मंत्रयंत्राचे उपदेष्टे । इहामुष्मिक फळें मिष्टें । बोधूनि कष्टें श्रमविती जे ॥ ४ ॥ याहूनि तृतीय गुरु जो कां । अध्यात्मबोधें कैवल्यसुखा । वोपूनि निरसी अशेष दुःखा । तो निजसखा जे भजती ॥ ५ ॥ जो भवसागरींचें तारूं । भ्रांतालागीं कल्पतरू । शरणागता वज्रपंजरू । ऐसा उपकार ज्याचा ॥ ६ ॥ तयाहूनि ब्रह्मांडमठीं । दुसरा श्रेष्ठ न दिसे दृष्टी । यालागीं ज्याचिये पादपिठीं । सुरवर कोटी नत होती. ॥ ७ ॥' [श्लोक ३३, 'श्रीहरिवरदा' नामक टीका]. ११. नौका चालविणारा. येथें सुरेख 'रूपक' झालें आहे. १२. आत्मतत्त्वबोधवाणी. (श्लोक ३३.) १३. उत्तम नौका. १४. जे वर्णाश्रमधर्माचरण करतात ते मला फार आवडतात असें नाहीं, तर जे वर्णाश्रमधर्माचरण करून सद्गुरुनाथचरणीं लीन असतात तेच मला फार प्रिय असतात. मी गुरुशुश्रूषा पाहून जसा संतुष्ट होतों तसा वर्णाश्रमधर्माचरणानें होत नाहीं. १५. भ्रमर.

[1]स्मरतें कीं तें जें श्रीगुरु[2]दारांहींच [3]इंधनानयना ? ।
पाठविलें विपि[4]नाला, माझ्या दिसतें तपोधना ! नयना. ॥ ५७
तें रज, ती वृष्टि तसी, त्या [5]कारका, तें [6]तमिस्त्र, तो पवन, ।
लोप वनस्थलमार्गज्ञानाचा, काय तैं सकोप वन ? ॥ ५८
हिंडों धरुनि परस्पर कर, [7]खरकर तिळहि न करि [8]अनुकंपा, ।
[9]शंपा दे भय [10]तमही न मही पथ, पावल्या स्वतनु कंपा. ॥ ५९
[11]भार शिरीं, अंधसम भ्रमतचि होतों तमांत, मग [12]सूर ।
दूर [13]ध्वांत कराया ये, चित्तांतील तमहि गुरुशूर, ॥ ६०
पाहे आम्हां [14]आर्त[15]छात्रांतें करुनि बहु वनीं शोध, ।
तो धर्मज्ञ दयार्णव गुरु वर दे, [16]ज्यांत आत्महितबोध. ॥ ६१
आलिंगुनि आम्हातें, माथा हुंगूनि, तो वदे [17]साधू, ।
[18]माधुर्य [19]तें म्हणे, 'रे उपमेच्छो ! अमृतकरमळा जा धू.' ॥ ६२
श्रीगुरु म्हणे, 'अहो ! हे पुत्रक हो ! [20]अस्मदर्थ या [21]गहनीं ।
[22]दहनीं मृगशावकसे श्रमलां [23]दुःसहमहाविपत्सहनीं. ॥ ६३
प्राण्यास प्रिय परम [24]स्ववपु, तुम्हीं तेंहि मानिलें तुच्छ, ।
[25]सुच्छत्र काष्ठभारहि [26]सुरसुमनाचेचि [27]भाविले गुच्छ. ॥ ६४

---

१. हें 'भाविक' नामक अलंकाराचें उदाहरण आहे. जेथें भूत (झालेल्या) आणि भावी (होणाऱ्या) अर्थाचा साक्षात्कार वर्णिला असतो तेथें 'भाविक' नामक अलंकार होतो. २. गुरुपत्नीनें. ['दार' शब्द पुल्लिंगी अनेकवचनी आहे.] ३. इंधन+आनयना=सर्पण+आणायाला=काष्टें आणायास. (श्लो० ३५.) ४. वनाला. (श्लो० ३५.) ५. गारा. ६. अंधार. ७. सूर्य. (खर+कर=उष्ण+किरण=तिग्मांशु, सूर्य]. ८. दया. ९. वीज. १०. श्लोक ३७ पहा. ११. सर्पणाचा भार. १२. सूर्य. १३. अंधकार. १४. पीडित. १५. शिष्यांतें. १६. ज्या वरामध्यें. १७. तो फार फार चांगलें व गोड बोलला. १८. निर्मळ मधुरतर वाक्य. १९. तें माधुर्य म्हणे:–रे उपमेच्छो ! अमृतकरमळा जा धू=पूर्वार्धातील वर्णिलेलें मधुरपण उपमा देणाऱ्या मनुष्याला म्हणे (अमृतकराची–चंद्राची उपमा माधुर्याला देऊं इच्छिणाऱ्या जनाला म्हणे) अरे, चंद्राच्या कलंकाला धू जा (जाऊन धुवून टाक). चंद्र निष्कलंक केला तर तो उपमेस योग्य होय. तें माधुर्य चंद्रापेक्षांही श्रेष्ठ होय–असें तात्पर्य. २०. आमच्यासाठीं. २१. अरण्यीं. २२. अग्नीमध्यें. २३. सोसण्यास कठीण अशा मोठ्या संकटाच्या सोसण्यामध्यें. २४. स्व+वपु=निज+शरीर. २५. काष्ठभार हि सुच्छत्र [व] सुरसुमनाचेचि गुच्छ भाविले–असा अन्वय. सर्पणाचे भार हे मस्तकावर धारण केलेल्या उत्तम छत्राप्रमाणें मानिले व तसेच कल्पवृक्षाच्या पुष्पाप्रमाणें इष्ट मनोरथपूरक आणि शोभाप्रद असे गुच्छ (स्तवक) मानिले. २६. देवतरुपुष्पाचे. २७. मानिले.

तुमचें मन गुरुभजनीं निपटचि लंपट तुम्हींच गुरु लुटिला, ।
उठिला [1]अंतःकरणादर्श, भला लाभ हा नसे कुटिला. ॥ ६५
[2]धर्माद्यखिलपुमर्थप्राप्तीचें मुख्य मूळ हें [3]देह, ।
[4]स्नेह न धरितां गुरुच्या पदपद्मीं अर्पिलें असंदेह. ॥ ६६
हाचि प्रत्युपकार प्रेमें करिती असाचि [5]सच्छात्र, ।
पात्र [6]ज्ञाना होती, तेचि गुरु, द्वैत धरि मृषा [7]गात्र. ॥ ६७
मी सुप्रसन्न झालों द्विजवर हो! जीं तुम्हा [8]दिलीं [9]छंदें ।
तीं अप्रणष्ट [10]सारें इहपरलोकीं स्फुरोत [11]हृच्छंदें. ॥ ६८

---

१. अंतःकरणादर्श (अंतःकरणरूप आदर्श आरसा) उठिला=स्पष्ट झाला, निर्मळ केला. अंतःकरणरूप आरसा जसेंच्या तसें प्रतिबिंब ग्रहण करण्यास समर्थ झाला. हा भला लाभ कुटिला नसे=हा उत्तम लाभ अंतःकरण निर्मळ नाहीं अशा मनुष्याला घडत नाहीं. २. धर्म+आदि=अखिल+पुमन्+अर्थ=धर्म+प्रभृति+सर्व+पुरुष+अर्थ+धर्मादिक सर्व पुरुषार्थ. (श्लोक ४१.) ३. ह्या अर्थाचें वचन कालिदासाच्या 'कुमारसंभवां'त आहे:—'शरीरमाद्यं खलु धर्मसाधनम्'. ४. 'स्नेह त्यागुनि गुरुच्या' असाही पाठ आहे. ५. उत्तम शिष्य. ६. सच्छात्र ज्ञाना पात्र होती, तेचि गुरु; गात्र मृषा द्वैत धरि—असा अन्वय. जे चांगले शिष्य ज्ञानास अधिकारी होतात तेच गुरु होतात, तेच गुरुरूप होतात. शरीर जें द्वैत धारण करतें तें मृषा (मिथ्या) होय. गात्र (शरीर) गुरुशिष्यभेद धारण करतें तें व्यर्थ, खरें पाहिलें असतां, शिष्य हे गुरुरूप झाल्यामुळें द्वैत राहिलें नाहीं असें म्हटलें पाहिजे. ७. दुजाभाव जें गात्र (शरीर) धरतें तें मृषा (व्यर्थ) होय. ८. जीं छंदें गुरुनें द्विजांस दिलीं व जो वर दिला त्याचें वर्णन 'हरिवरदा' ग्रंथांत आहे. तें असें:—'येथूनि तुमचे मनोरथ । मद्वरदानें सत्य होत । इतकें बोलूनि सद्गुरुनाथ । वर वोपीत कृपेनें ॥ १ ॥ वाजसनेयादि कण्वपठितें । छंदें अयातयाम समस्तें । तैत्तिरीयादि शाखाधीतें । यातयामें मुनि म्हणती ॥ २ ॥ कण्वशास्त्रीं जाणूनि कुमरां । अयातयामा छंदोनिकरा । कृपेनें स्पर्शून आमुच्या शिरा । वोपिली गिरा गर्जुनी ॥ ३ ॥ अयातयामें मद्वरदानें । छंदें प्रकटती तुमच्या वदनें । इहामुत्र साफल्य तेणें । आशिर्वचनें पैं माझ्या ॥ ४ ॥ अयातयामाची व्युत्पत्ती । परिसा व्याकरणसंमती । शिजलीं अन्नें प्रहरा अंतीं । निःसार होती विरसत्वें ॥ ५ ॥ धगधगीत उष्ण वाफा । निघती अन्नांतूनि थपथपां । कव्ययज्ञीं तें उष्मपां । पितरां प्रियतम सरसत्वें ॥ ६ ॥ यातयाम जें विगतसार । हव्यकव्यीं निर्जर पितर । न सेविती नीरसतर । ऐसें साचार श्रुतिगदित ॥ ७ ॥ यातयामान्न विगतसार । तैसे निःसार पदार्थमात्र । यातयाम हा नामोच्चार । वदती कविवर गौणत्वें ॥ ८ ॥ तस्मात् अयातयाम छंदें । संसारबीयोत्तरें जीं विशदें । प्रसन्न होऊनि परमानंदें । देशिकें वरदें प्रबोधिलीं ॥ ९॥ तियें तत्काळ हृदयकमळीं । प्रकटलीं जैसा अंशुमाळी । स्वप्रकाशें नभोमंडळीं । त्रिजग उजळी उगवूनी ॥१०॥ तैसे निगमागम अवग्र । हृदयीं प्रकाशले समग्र । ऐसा अनुग्रहचमत्कार । द्विजोत्तमा! तुज स्मरतो कीं ॥ ११ ॥' [श्लोक ४२ टीका.] ९. वेद. १०. सारभूतें छंदें. ११. तुमच्या मनाच्या इच्छेनें. (श्लो० ४२.)

कर्मीं वसा, नसो परमर्मीं लोचन, असो दया धर्मीं, ।
नर्मींहि[1] मृषोक्ति[2] न यो, शर्मीं[3] नांदा, शिरा क्षमावर्मीं[4]. ॥ ६९
मजहूनि त्रिजगांत प्रख्यात यशें असाल, कविराजे[5] ।
गातिल, कां मत्करुणाश्रीचें लोकीं न बालक विराजे? ॥ ७०
मी न बहु प्रकट[6] जगीं, व्हाल तुम्हीं सर्ववंद्य[7], न ख्यात[8] ।
तांत[9] क्षीरधि, परि हरचूडारूढ[10] प्रसिद्ध तज्जात[11].' ॥ ७१
ऐसा श्रीमद्गुरुनें केला आम्हांवरि प्रसाद, बुधा[12] ! ।
तन्मधुरता न जननिस्तन्यास[13] न कामधेनुच्याहि दुधा. ॥ ७२
गुरुगृहनिवासवृत्तें तुजहि सकळ विदित असति, अनुरक्ता ! ।
वक्ता किति वर्णिल बा ! परि वरिते शुद्ध शांति गुरुभक्ता[14].' ॥ ७३
विप्र म्हणे[15], 'गा ! बापा ! या पायांनीं समागमें देवा ! ।
जे वागविले सेवक, त्या आम्हां सुरलताचि[16] गुरुसेवा. ॥ ७४
तूं त्रिजगद्गुरु, तूझा कल्याणाधार वेदमय[17] काय[18], ।
जनसंग्रहाविना तुज गुरुच्या सेवेंत अभ्युदय काय[19]?' ॥ ७५

---

## अध्याय एक्यायशींवा.

त्या शुद्धसत्वतनुला[20] भेटे गुरुबंधु[21] ज्यांत[22] तो वार[23] ।
फार प्रियकर, जैसा हंसाला **मा**नसाख्य कासार[24]. ॥ १

---

१. थट्टेमध्यें सुद्धां. २. असत्यवचन. ३. सुखांत. ४. क्षमाकवचीं. या आर्येतील शब्दरचना आणि अर्थरचना ह्या दोन्हीही चित्ताकर्षक आहेत. सुंदर पदें आणि सुंदर अर्थ यांची येथें कविनें जोड घालून दिल्यामुळें ही गीति फार हृदयंगम उतरली आहे. हिनें ज्याचें मनोरंजन होणार नाहीं असा कोण रसिक आहे? ५. कविराजे (कविश्रेष्ठ) गातिल (तुमचीं यशें वर्णन करतील, यांत कांहीं नवल नाहीं) मत्करुणाश्रीचें (माझ्या कृपारूप लक्ष्मीचें) बालक (मूल) कां न लोकीं विराजे?=जनसमूहांत शोभा कां पावणार नाहीं? ६. हें 'प्रतिवस्तूपमा' नामक अलंकाराचें उदाहरण आहे. [अलंकारमीमांसा–पृ० २८.] ७. सकल जनांस वंदनीय. ८. प्रसिद्ध. ९. जनक क्षीरसमुद्र. १०. शिवमस्तकीं वसणारा. (चंद्र.) ११. क्षीरधिसंभूत. (चंद्र.) १२. या पद्यांतील अलंकारास 'तुल्ययोगिता' असें नांव आहे. [अलंकारमीमांसा–पृ० ३२.] १३. आईच्या दुधाला. [ही सरस कल्पना मूळांत नाहीं, पंताच्या पदरची आहे.] १४. जो गुरुभक्त आहे त्याला शांति वरते, गुरुपरिचर्येपासून पुरुषाला शांति प्राप्त होते–असा भाव. १५. श्लोक ४४-४५ पहा. १६. कल्पलता. १७. छंदोमय. १८. देह. १९. या अध्यायाला 'द्विजाधोक्षजसंवाद' अथवा 'भगवद्ब्राह्मणसंवाद' अशी संज्ञा आहे. २०. शुद्धसत्व आहे तनु (देह) ज्याचा तो–कृष्ण–त्या कृष्णाला. २१. सुदामा. २२. ज्या दिवसांत. २३. तो दिवस. ज्या दिवशीं सुदामदेव कृष्णाला भेटला, तो दिवस फारच आनंदाचा झाला. २४. सरोवर.

झाल्या प्रथम कथा, मग चित्तज्ञ प्रभु म्हणे, '[1]धरादेवा! ।
दे, वाट पाहिली बहु, काय मला आणिला असे [2]मेवा? ॥ २
भक्तीं [3]स्वल्पहि दिधलें तें प्रेमें होय मज सख्या! कोटी, ।
मोटी प्रीति तयाची, गोष्टी तुजसीं वदों नये खोटी. ॥ ३
दिधलें बहुहि अभक्तीं, तरि तें माझ्या न होय [4]परितोषा, ।
[5]दोषाभिज्ञा न रुचे अत्यनुकूलाहि जारिणी [6]योषा. ॥ ४
[7]जल दल फल पुष्पहि जो देतो मज भक्तिनेंचि जें त्याचें ।
[8]साचें प्रेमार्पित तें सेवितसें मी विशुद्धचित्ताचें.' ॥ ५
ऐसें वदे, परि [9]द्विज [10]पृथुकप्रसृति प्रभूसि [11]अर्पीना, ।
[12]सर्पी नाहिं बहु म्हणुनि भक्ति [13]प्राघुणशिखीस तर्पीना. ॥ ६
बोल कसा लावावा? लक्ष्मीपतिच्या करीं कसे तो हे ।
पोहे देइल? [14]लज्जाभक्तिविसंवाद म्हणुनिही मोहे. ॥ ७
[15]लज्जाभरनम्रशिरा प्रभुपासीं होय तो [16]कविप्रवर, ।
[17]नवरम्यनीरजानन चिंति, न पाहे सशंक विप्र [18]वर. ॥ ८
चित्तीं देव म्हणे, 'हा पूर्वी मोक्षेच्छु मत्सखा भजला ।
मजला न [19]श्रीकामें, साध्वीचें प्रिय [20]करावया सजला. ॥ ९
आला बंधु मजकडे याचा इतकाचि यत्न हा लक्ष ।
[21]त्र्यक्ष प्रसन्न झाला [22]उपमन्युस, यास मीहि [23]सत्पक्ष. ॥ १०
मी [24]विश्वसुहृत्सत्यचि, परि [25]हाचि सखा भला मला साजे, ।

---

१. हे ब्राह्मणा. २. भेट, उपायन.(श्लोक ३.) ३. सु+अल्प=अतिशयित+थोडें. ४. संतोषाला. (श्लोक ३.) ५. स्त्रीचे दोष जाणणाऱ्या पतीला. हा दाखला पंतांनींच आपल्या पदरचा दिला आहे. ६. स्त्री. ७. श्लोक ४ पहा. ८. खरें. ९. सुदामा. १०. पोह्यांची गांठोडी. ११. देईना. (श्लोक ५.) लज्जेनें खालीं मान करून पोहे दिले नाहींत. १२. घृत. १३. अतिथिरूप अग्नीला. १४. भक्ति म्हणे द्यावे, लज्जा म्हणे न द्यावे, असा लज्जा व भक्ति यांचा विसंवाद (विरुद्ध वाद) चालला म्हणून सुदामा मोहांत पडला. १५. लज्जाभारानें नत केलें आहे शिर ज्यानें असा. १६. श्रेष्ठ साधु. १७. नवें आणि म्हणूनच रमणीय असें जें नीरज (कमळ) तद्वत् शोभायमान कृष्णमुख तें. १८. मनांत शंका येऊन सुदामदेवानें वर मान केली नाहीं, लज्जेनें खालीं मान घालून होता. १९. संपत्ति मिळविण्याच्या इच्छेनें पूर्वी हा मला भजला नाहीं. याचें आतां येण्याचें कारण साध्वीचें (पत्नीचें) मनोगत सफळ करावें हें होय. २०. श्लोक ७ पहा. २१. महादेव. [त्रि+अक्षि (अक्ष)= तीन+नेत्र=ज्याला तीन डोळे आहेत तो महादेव. सूर्य चंद्र आणि अग्नि हे महादेवाचे तीन नयन होत. स्तुतिकुसुमांजलि—स्तोत्र २ श्लोक ६ पहा.] २२. मागें पृ० ८८ टीप १२ पहा. २३. साधुपक्षपाती. २४. जगन्मित्र. २५ सुदामदेव.

लाजे त्याच्या[1] प्रेमा रामहि, तद्वैभवा[2] जसे राजे. ॥ ११
मज विप्र विप्रपत्नी बहुमान्या रामरेवतीसमही,[3] ।
मी न म्हणे कीं वंदी या सखया आर्यदेव[4] तीस[5] मही. ॥ १२
श्रीचाहि[6] पावतो कीं भाग्या मणिसानुकंपदा[7] दास, ।
मग[8] काय न देईन मीं? तीचा[10] धणि सानुकंप[11] दादास[12].' ॥ १३
आणुनि चित्तीं ऐसें शोधि श्रीकर[13] करद्वयें चिंध्या,[14] ।
त्या सत्वश्रीभूषा[15] प्राकृत निंदोत, न खयें निंद्या. ॥ १४
जों जीर्णमलिनवस्त्रीं सांपडली श्रीकरासि गांठोडी, ।
[16]जोडी द्रव्याची जसि चुकली कृपणास, हे तुला[17] थोडी. ॥ १५
'हें काय सख्या!' ऐसें [18]बोले, डोले, हळूच मग सोडी, ।
'गोडी याची मज बहु, [19]भेटि उदारा! तुला गमे थोडी. ॥ १६
निर्मळ पुष्कळ केवळ अमृतरसाचे नवे रवे[20], पोहे ।
नोहेत स्वल्प, सख्या! मज विश्वात्म्याहि[21] फार साधो! हे. ॥ १७
झालों मी तृप्त सख्या! हे पोहे पाहतांचि, कां आणा[22] ।
प्राणाच्या लटिक्या बा! वाहेन, तुम्हां बरें मनीं आणा.' ॥ १८
श्रीवदनीं[23] लौकरि भरि हरिहरि[24]! हरि संतुष[25] पृथुककणमुष्टी[26], ।
तुष्टिप्रेमें भाजी व्रजपशुपांचीहि[27] सेविली उष्टी. ॥ १९

---

१. याचें जसें मजवर प्रेम तसें बलरामाचें नाहीं. २. रामाच्या वैभवास. ३. रामरेवतीतुल्य असेंही मी म्हणत नाहीं, त्यांपेक्षां अधिक मान्य. ४. श्रेष्ठ बलराम देव. ५. विप्रपत्नीस मही वंदी. ६. लक्ष्मीचाहि. ७. मेरुपर्वतास कांपविणाऱ्या भाग्याला. ८. मी केवढें मोठें संपद्भाग्य सुदामदेवाला देईन हें सांगतां येत नाहीं, कारण मी श्रीचा धनी आहें. ९. पंतांनीं या ठिकाणीं वर्णनविस्तार फारच केला आहे असें मूळ पाहिलें असतां दिसतें, तेव्हां पंतांला 'विस्तरभीरु' हें विशेषण लावणें कितपत यथार्थ आहे याचा विचार करण्यासारखा आहे. १०. श्रीचा. ११. दयालु. १२. ज्येष्ठ भ्रात्यास. १३. लक्ष्मीपति. १४. सुदामदेवाच्या काखेंतल्या चिंध्या. १५. सात्विक संपत्तीला भूषण अशा, अत्यंत सात्विक स्वभावाच्या मनुष्याला भूषणास्पद अशा चिंध्या. जो अत्यंत सात्विकमनस्क असतो तो अत्यंत निर्धन असतो, तथापि तें निर्धनत्व त्यास भूषणप्रदच असतें, मात्र प्राकृत (नीच, क्षुद्र लोक, अशा गरीबीची अविचारानें निंदा करतात. खरोखर ती स्थिति निंद्य नव्हे. १६. यांत फार सुरेख आणि समर्पक उपमा आहे. हिचा वासही मूळांत नाहीं. १७. उपमा. १८. कृष्ण बोले, डोले (आनंदानें मान डोलवी–नाचे). १९. नजराणा. २०. रवा=तुकडा. २१. मज विश्वात्म्याला हे पोहे पुष्कळ आणि परमप्रिय आहेत. २२. शपथा. २३. आपल्या मुखांत. २४. परमाश्चर्यें, आनंदें. २५. स+तुष=सह+तूस, त्वचा=टरफलांसह. २६. मूठभर पोहे. २७. गवळ्यांची.

मुष्टि भरी [1]दुसरी जों भक्षाया देव [2]भक्तवर्याप्त ।
[3]श्री कर धरी म्हणे, 'हा राहो पहिलाची [4]मुष्टि [5]पर्याप्त. ॥ २०
लोकद्वयींहि [6]एकचि बहु सर्वसमृद्धिकारणें मुष्टी, ।
जें [7]भक्तभाग्य पाहुनि होइल [8]वरदर्षभा! तुम्हां तुष्टी. ॥ २१
मुष्टि दुजी सेविसि, तरि तुज काय असे अदेय वरदासी? ।
विरहीं धरुनि [9]असूंतें कंठीं [10]कंठील कोठवर दासी?' ॥ २२
या भावें धरि [11]वरकरसरसिज [12]निजशययुगें [13]सरोजाक्षी, ।
त्या [14]क्षीरधिजाहृदया समजे तीचाचि पति जगत्साक्षी. ॥ २३
[15]ब्राह्मण त्या रात्रींत प्रभुनें [16]मणिकनकमंडिता पाटीं ।
बैसविला सन्मानें, जेवविला [17]कांचनाचिया ताटीं. ॥ २४
स्वकरें साक्षात् लक्ष्मी या भावोजीस आग्रहें वाढी, ।
काढी प्रभु [18]गुरुगोष्टी, [19]मुखकर्णयुगाहि तृप्ति दे गाढी. ॥ २५
दे स्वकरें करुनि विडा [20]निबिडानंद प्रभु [21]प्रभूतनया, ।
तनयापरिस स्वजनीं भजनीं [22]लोलस, न रीति नूतन या. ॥ २६
मागति मुनि पादरजा सादर ज्या प्रभुसि तो [23]सदार गडी. ।
निजवुनि [24]निजशयनावरि, [25]शये नावरि, बंधुच्या पदा रगडी. ॥ २७
मानी मुनि वैकुंठाविण [26]हरिजन भूमिवरि असेना कीं, ।
[27]प्रभुपदपद्मस्पर्शप्राप्तामितपुण्य हा असें [28]नाकीं. ॥ २८

---

१. श्लोक १० पहा. २. भक्तश्रेष्ठांचा आप्त असा. ३. रुक्मिणी. ४. 'मुष्टि'शब्द स्त्रीलिंगी आणि पुल्लिंगी आहे. ५. पुरे. ६. एकचि मुष्टी सर्वसमृद्धिकारणें पुरी आहे. ७. भक्तैश्वर्य. ८. वरद+ऋषभा!=वरदवरा! ९. प्राणांतें. १०. (दिवस) घालवील. यांतील 'क'वर्णाची आवृत्ति लक्षांत ठेवण्यासारखी आहे. हा 'क'काराचा 'वृत्त्यनुप्रास' होय. ११. पतीचें करकमल. १२. निज+शय+युगें=स्वीय+हस्त+द्वयें=आपल्या दोन हातांनीं. १३. कमलाक्षी.(रुक्मिणी.) १४. रुक्मिणीच्या अभिप्रायास. १५. श्लोक १२ पहा. १६. 'पाटाला' 'मणिकनकमंडिता' हें विशेषणपद झेंपण्यासारखें नाहीं. १७. सोन्याच्या. १८. प्रभु(कृष्ण)गुरुविषयीं गोष्टी काढीत होता. १९. तोंडाला आणि दोन कानांला. २०. निबिड (पुष्कळ) आहे आनंद झाला ज्याला तो. २१. प्रभूत+नय=विपुल+नीति=जो मोठा नीतिमान् त्याला, सदाचारसंपन्नाला (विप्राला). २२. आसक्त. २३. स्त्रियांसह. २४. हें दोन चरणांस जोडणारें यमक आहे. २५. हात. २६. हरिभक्त हा वैकुंठांतच असतो, इतर ठिकाणीं असत नाहीं, भूमीवर असत नाहीं असें मानी. २७. प्रभूचें पदपद्म त्याचा स्पर्श त्यानें प्राप्त अमित पुण्य ज्याला असा मी. २८. स्वर्गांत.

प्रातःकाळींच हरि प्रियसखविप्रोत्तमांघ्रिला[1] लागे, ।
'बा! गेहा[2] जरि जातां, तरि मज विसरों नको' असें मागे. ॥ २९
'अन्योन्य प्रेम खरें, याच्या[4] पोटांत लाभ कोटि, कवे[6]! ।
मज तुज विरह लव नसे, भस्मीं मीनासि काय हो! टिकवे? ॥ ३०
सर्वस्व तुम्ही माझें, मी तुमचें, हें नकोचि बोलाया, ।
डोलाया पुनरपि द्या दर्शन मज साधुसंगलोला[8] या.' ॥ ३१
धरुनि कर स्वकरानें गेला पावावयासि[9] दूरवर, ।
ब्रह्मण्यदेव[10] सेवकजनचिंतितकामदानशूरवर[11]. ॥ ३२
आलिंगुनि वंदुनियां मुरडे मागें सखेद यदुराय, ।
पाय न वाहति[12], झाली वत्सवियुक्ताचि काय ती गाय? ॥ ३३
चालोनि द्वित्रि[13] पद प्रभु माघारां फिरोनियां पाहे, ।
राहे उभा क्षणक्षण, धीर[14] तरी नीर[15] लोचनीं वाहे[16]. ॥ ३४
मुदित[17] व्रीडितचित्त[18] द्विज निजसदनाचिया धरी वाटे[19], ।
दाटे कंठ[20], स्वंगतहि[21] परि अंतरला सखा हरी वाटे. ॥ ३५
मुदित द्विज या भावें कीं गुरुपदवी[22] दिली सुसन्मानें, ।
जो[23] नाहींच मिळाला पुत्रा विधिलाहि अग्रजन्मानें[24]. ॥ ३६
विप्र मनांत म्हणे[25], 'म्यां प्रभुची ब्रह्मण्यता[26] असीमा[27] जी ।
ती पाहिली, सपर्या[28] केली जगदीश्वरें असी माजी. ॥ ३७

---

१. ब्राह्मणाच्या चरणावर मस्तक ठेवी, नमस्कार करी. २. घराला. ३. पृथुकोपाख्यानांत 'सखे! बंधो! चित्तीं मज न विसरावें पळभरी' असें आहे. ४. याची. ५. या प्रेमाच्या पोटीं अनंत लाभ आहेत. ६. हे कवे. ७. हा चरण सुभाषितरूप आहे. ८. सज्जनसंगतिभक्ता. ९. कृष्ण पोंचविण्यासाठीं गेला. १०. ब्रह्मण्यवर्य. ११. सेवक जनांनीं चिंतिलेला काम देण्याविषयीं मोठा शूर. भक्तकामपरिपूरक असा. (कृष्ण.) १२. सुदामदेवास सोडून परत जाण्यास त्याचे पाय घेईनात, तरी बळानेंच परतला. १३. दोन तीन पावलें. १४. धैर्यशाली, विचारशील. १५. पाणी. १६. 'रडला' असें न म्हणतां पर्यायानें 'नीर लोचनीं वाहे' असें वर्णन केलें आहे, बाकी अर्थ एकच. १७. हर्षित. याचें कारण पुढें ३६ व्या गीतींत आहे. १८. लज्जितांतःकरण. स्वचित्तकार्पण्यानें लज्जित असा, कृष्णापासून कांहींच द्रव्य मिळालें नाहीं म्हणून लज्जायमान असा. १९. मार्गास. २०. 'विरहें बाष्प निरुद्ध कंठ झाला' असें तात्पर्य. २१. आपल्या हृदयांत आहे असाहि. २२. श्रेष्ठ स्थान. २३. जो सन्मान. २४. पहिल्या जन्मानें, वडीलपणानें. २५. श्लोक १६-१९ पहा. २६. ब्रह्मवात्सल्य. २७. निःसीम. २८. पूजा.

परिचय बाळपणींचा त्यांत असा नीच मी दरिद्र, वला ।
[1]आत्माग्रजापरिसही मानुनि गुरु आप्त तो हरि द्रवला. ॥ ३८
कोठें दरिद्र हा मी ! कोठें [2]लक्ष्मीनिवास तो स्वामी ! ।
आलिंगिलें भुजांहीं प्रेमें वक्षःस्थळीं [3]रमाधामीं. ॥ ३९
बंधु म्हणावें या मज नीचा सर्वोत्तमें रमानाथें! ।
हे [4]चरण प्रक्षाळुनि घ्यावीं माथांहि काय तीं [5]पाथें? ॥ ४०
श्रीच्या पर्यंकीं हा बैसविला दास रामसा, यासीं ।
वदला प्रेमें, ज्याचें यावें वदनास नाम सायासीं. ॥ ४१
लोकीं न पाविजेलें जन्मुनियां [7]काय या [8]सुभव्य जनें? ।
स्वकरेंचि [9]वीजिलें मज [10]महिषीनें प्रभुचिया शुभव्यजनें ॥ ४२
[11]यत्पदरजोर्थि योगी वसविति गिरिविवरगहनपर्णकुटी, ।
तो दे मज सीतळ [12]वरमलयजरसशीतपाणि देव उटी. ॥ ४३
किंबहुना [13]प्रथमरचितसत्कृतियश याचि एकलें नेलें ।
[14]सुरगुरुनें [15]किंकरपदसंवाहन आपुल्या करें केलें. ॥ ४४
[16]देवत्व मला देउनि आपण घे श्रीनिवास दासत्व, ।
जिव्हाश्रुति हो! त्याचें गाउनि ऐकुनि निवा सदा [17]सत्व. ॥ ४५
[18]सहसिद्धिपुमर्थांचा हेतु [19]प्रभुपादुकार्चन स्पष्ट, ।
[20]नष्टप्रज्ञचि ऐसें सत्य न मानूनि भोगिती कष्ट. ॥ ४६

---

१. आपल्या अग्रजाहूनही (ज्येष्ठ भावाहूनही, गुरु (श्रेष्ठ) मानून.) २. हें 'विषम' अलंकाराचें उदाहरण आहे. [अलंकारमीमांसा—पृ० ४३-४६.] ३. श्लोक १६ पहा. ४. रमेचें स्थान जें वक्षस्थळ तेथें. ५. हे माझे दरिद्र ब्राह्मणाधमाचे (ब्रह्मबंधूचे) चरण (पाद). ६. चरणाचीं उदकें. ७. कोणतें. ८. या जनें जन्मुनियां काय सुभव्य (कल्याण) न पाविजेलें, सर्व पाविजेलें. ९. वारिलें, वारा घातला. १०. पट्टराणी वैदर्भी तिनें मला हातांत शुभ व्यजन (मंगलप्रद पंखा) घेऊन वारा घातला. ११. ज्याच्या चरणरजाचे याचक योगी. १२. उत्तम चंदनरसापरी शीतळ हस्त ज्याचा असा देव तो. १३. पहिल्यानें केलेल्या सत्काराचें यश. १४. देवांचा स्वामी जो कृष्ण त्यानें. १५. चाकर जो मी या माझ्या पायांचें मर्दन. १६. यांत 'परिवृत्ति'नामक अलंकार झाला आहे. जेथें दोन पदार्थांची अदलाबदल (विनिमय) झाली आहे असें वर्णन असतें, तेथें 'परिवृत्ति' अलंकार होतो. या दोन पदार्थांत एक पदार्थ न्यून व एक अधिक असा असतो. [अलंकारमीमांसा—पृ० ४६.] १७. धैर्य, स्वभाव. १८. अष्टसिद्धींसह चार पुरुषार्थांचा. १९. भगवत्पादार्चन हें मोक्ष, दिव्य भोग, ऐश्वर्य, अष्टसिद्धि यांचें मूळ होय. २०. हतबुद्धि, हतमतिजन.

निजपदपूजक[1] हा जन भाजन[2] दुर्लभवरप्रसादास, ।
केला स्वल्पाही कां धनदानास न कुविप्रसा[3] दास? ॥ ४७
वंदावे पूजावे पाय चुरावे दयालयस्वांतें[4] ।
शांतें अधनास धन स्वल्पहि द्यावें न कां रमाकांतें[5]? ॥ ४८
मोहुनिही करि बद्ध न, सद्धन तत्पदचि[6], भाग्य लक्ष्मीचें, ।
ज्यास न वेंच, नवेंच प्राभव[7] दे, नुरवि लौल्य पक्ष्मींचें. ॥ ४९
कां न दिलें धन मज, तो देणार, परंतु विसरला काय? ।
राय ज्ञानिजनांचा विसरेना सत्य चित्कृपाकाय. ॥ ५०
देतचि होता धन, परि भ्याला प्रबळा मदीय[9] दिष्टास, ।
शिष्टास श्राव्य नव्हे, अंगीं रागहि न त्या संदिष्टास[11]. ॥ ५१
हां! हां! कळलें कळलें, केली करुणा[12] सख्या रमारंगें, ।
संगें कळे भल्यांच्या, झालीं रोमांचितें[13] पहा अंगें. ॥ ५२
हा जन्माचा निर्धन, पावुनि मोहक धनास मोजेल[14], ।
विसरेल आपणासहि मग सुजनीं न प्रसाद साजेल. ॥ ५३

---

१. आपल्या पदांची (पायांची) पूजा करणारा. २. पात्र, योग्य. ३. कुत्सित ब्राह्मणासारखा. ४. दया+आलय+स्वांतें=करुणा+सदन+चित्तें=दयेचें घर असें स्वांत ज्याचें त्या (कृष्णानें). ५. येथें 'रमाकांत' सहेतुक योजिला आहे, म्हणून 'परिकर' अलंकार झाला आहे. ६. तत्पदचि मोहुनिही बद्ध न करि=त्या कृष्णाचें पद असें आहे कीं तें मनुष्यास मोहित करतें पण त्यांस बद्ध करीत नाहीं. [इतर पदार्थ मोह उत्पन्न करून प्राण्याला बद्ध करतात, मुक्त करीत नाहींत पण कृष्णपदाचे ठिकाणीं उत्पन्न होणारा मोह प्राण्याला बद्ध न करतां मुक्त करतो.] लक्ष्मीचें भाग्य=हें पद लक्ष्मीला श्रेष्ठ पदवीला पोंचविणारें असें, याच्या योगानें लक्ष्मीचें भाग्य उदयास आलें असें. सद्धन=संतांचें—साधुजनांचें धन, साधुजन ज्या पदाला धनासारखे जपतात असें. या प्रकारचें जें तत्पद [तें] ज्यास वेंच न [व जें] नवेंच [असें] प्राभव दे=हें कृष्णपद ज्याला वेंच (खर्च—व्यय—नाश) नाहीं असें, जें नूतन आहे, अपूर्व आहे असें प्राभव (प्रभुत्व, वैभव) दे (देतें) [आणि] पक्ष्मींचें लौल्य नुरवि=जें डोळ्यांच्या पापण्यांचें(लौल्य—चंचलत्व)उरवीत नाहीं; जें डोळ्यांच्या पापण्यांना हालूं न देतां तटस्थ, स्थिर करतें; जें पद पाहून मनुष्य चकित आणि तटस्थ होतो; जें पद पाहून डोळ्यांच्या पापण्या हालण्याचें विसरतात. ७.प्रभुत्व. ८.ज्ञानकरुणादेह. ९.माझ्या दुर्दैवास. १०.अपराधीं. ११.सद्+इष्टास=साधु+आवडत्या=साधुजनाचा आवडता जो त्याला. १२. माझा भक्त सुदामदेव हा धन मिळाल्यावर कदाचित् मत्त होईल व तेणेंकरून त्याचा नाश होईल असें मनांत आणून सदय कृष्णानें मला धन दिलें नाहीं ही मजवर कृपाच केली असें सुदामदेवानें मानिलें. (आर्या ५३.) १३. भक्तांविषयीं प्रभूचें अत्यंत प्रेम पाहून सुदामदेवाचें शरीर रोमांचयुक्त झालें. १४. श्लो० २० पहा.

हेंचि तुझें मत म्हणुनचि, भरलें विद्वत्सभेंत [1]कोटिगुणें ।
अधिक [2]भवद्यश, [3]सुरतरुचिंतामणिसुरभियश तसेंचि उणें. ॥ ९४
ने [4]वित्तमद [5]श्वभ्रा, तापवि परि निर्धना यदा दभ्रा ।
त्रा करुणेच्या अभ्रा! **श्री** [6]दासी संपदा करी [7]बभ्रा. ॥ ९५
'गांठि न पडलि प्रभुची' म्हणतां साध्वी कशास कोपेल ? ।
सोपे लक्ष उपाय [8]प्रतारणीं, परि न हर्ष लोपेल. ॥ ९६
येणार तुज पहाया [9]सहदार उदार तोचि **[10]मां**कांत ।
हें म्हणतों, परि [11]अनृतें कोणाचाही न लागला प्रांत. ॥ ९७
निष्कृपकृपणपणाचा लावील कलंक [12]लोकपाळास, ।
छी ! हें सती करीना, ती ठेविल बोल तो कपाळास[13]. ॥ ९८
[14]तोचि तिच्याही चित्तीं, स्यां कां चिंता करूनि भागावें ? ।
[15]लज्जा सोडुनि सादर त्या [16]शतमखनीळसन्निभा [17]गावें.' ॥ ९९

---

१. सुदामदेव म्हणतो:-[हे देवा!] हेंचि तुझें मत (हाच तुझा अभिप्राय), म्हणुनचि (याच कारणास्तव). भक्तांची तूं इतकी काळजी वाळगतोस यामुळेंच विद्वत्सभेंत (ज्ञानी जनांच्या समुदायांत) भवद्यश कोटिगुणें अधिक भरलें (तुझें यश कोट्यवधिपटीनीं अधिक योग्यतेचें ठरलें आहे-तुझ्या यशाचें वजन कोटिपटीनें ज्यास्त भरतें) तसेंचि (त्याप्रमाणें विद्वानांच्या सभेंत) सुरतरु-चिंतामणिसुरभियश (कल्पवृक्ष, चिंतामणि, आणि कामधेनु या त्रयीचें यश) उणें [भरलें] (कमी योग्यतेचें ठरलें आहे. या तिघांच्या यशाचें वजन कृष्णाच्या यशाच्या वजनाहून कमी भरलें. २. तुमचें यश कोटिगुणानें अधिक. ३. कल्पतरु चिंतामणि सुरभि (कामधेनु) यांचें यश कमी. ४. धनमद. ५. अधोगतीस. ['गर्तावटौ भुवि श्वभ्रे' इत्यमरः.] ६. बटीक. (दासीरताची दुर्दशा होते—असा भाव.) ७. बोभाट. ८. प्रतारण=फसविणें, ठकविणें. ९. बायकांसह. १०. लक्ष्मीकांत. ११. असत्यानें. १२ कृष्णाला. [साध्वी—सुदामपत्नी—हा कृष्ण अकरुण आणि कृपण आहे असा दोष त्याला लावील.] १३. 'हें आक्षेप' नामक अलंकाराचें उदाहरण आहे. जेथें निजोक्तीचा प्रतिषेध विचारपूर्वक केलेला असतो तेथें हा अलंकार होतो. येथें पूर्वार्धांत सुदामदेवाची स्वोक्ति (आपलें वचन) आहे आणि तिचा प्रतिषेध समजून उमजून उत्तरार्धांत केला आहे म्हणून येथें 'आक्षेप' अलंकार झाला. याचें दुसरें उदाहरण:—'किंवा तुज गुंतविलें भजकीं, परि ते दयार्द्र या रंकीं । उद्धरि त्यासि न सज्जन गुंतविती गाय कष्टतां पंकीं ॥' [मोरोपंत—संशयरत्नमाला—गी० १०१, काव्यसंग्रह—मोरोपंत—स्फुटकाव्यें—भाग १ पृ० ३५९ टीप १३ पहा.]१४. तो विश्वव्यापक परमेश. १५. या सुदामोक्तींतील पुष्कळसा भाग पंताच्या पदरचा आहे. यांत भक्तिरसाची कमाल झाली आहे. यांतील कल्पना सुंदर, प्रौढ आणि मोहक आहे. १६. इंद्रनीळसंनिभकांति ज्याची त्यास. १७. स्तवावें. ही सुदामोक्ति हृदयास द्रव आणणारी आहे.

ऐसें चिंतित चिंतित[1], सेवित [2]हरिनामशर्कराकवळ, ।
श्रीद्वारकापुरीहुनि आला मुनि आपुल्या वराजवळ. ॥ ६०
[3]द्वारवतीभगिनीच प्रभुनें दिधली सख्यास नांदाया, ।
प्रभु दीनबंधु, [4]भूसुर हा दीन, न होय पात्र कां [5]दाया? ॥ ६१
[6]ती क्षीरसागरीं, [7]ही आनंदसुधार्णवीं, तिचा कर्ता ।
नामेंचि [8]विश्वकर्मा, ईचा [9]साचा स्वयें [10]जगद्भर्ता. ॥ ६२
त्या दीनवत्सलाची करुणा, झाली पुरी बरी मोटी, ।
होय प्रसाद तोचि [11]प्रासाद, [12]ज्यांत कौतुकें कोटी. ॥ ६३
हरिनें हरिविभवाहुनि दिधला तो विभव सेवका [13]सार ।
[14]त्या उपवनास नंदन लज्जित, सरसीस देवकासार. ॥ ६४
ज्याचा संकल्पचि हें अद्भुत ऐसें अतर्क्य विश्व रची, ।
अत्यद्भुत पुर तें कां नोहे शिल्पी जयासि [15]ईश्वरची? ॥ ६५
[16]स्वजनसुरद्रुम भगवान् [17]प्रियसखहंसा करावया क्रीडा ।
[18]नीडा रची, तयातें पाहूनि धरी [19]चतुर्मुख व्रीडा. ॥ ६६
[20]निधि [21]सिद्धि दास दासी राबति आंगें घरोघरीं, सद्में ।
पद्में तीं लक्ष्मीचीं [22]मुनिभाग्यसरोवरीं [23]गृहच्छद्में. ॥ ६७

---

१. श्लोक २१ पहा. २. हरिनामरूप साखरेचा घांस. ३. द्वारकेची बहीण. ४. भूमिदेव–विप्र. ५. बंधूच्या वांट्यास. ६. ती द्वारका. ७. सुदामाची नगरी. ८. विश्वकर्म्यानें द्वारका नगरी बांधली–या गोष्टीकडे कविकटाक्ष आहे. ९. खरा विश्वकर्मा. १०. जगताचें भरण (पोषण) करणारा. ११. मंदिर. १२. यांत 'हेतु' नामक अलंकार आहे. कार्यासह (हेतुमत् सह) कारणाचें (हेतूचें) कथन जेथें असतें तेथें 'हेतु' नामक अलंकार होतो. उ०–'हा चंद्र सुंदर स्त्रियांचा मान छेदण्यासाठीं उगवतो.' या वाक्यांत चंद्रोदय हें कारण असून सुंदरीमानच्छेद हें कार्य आहे व त्या दोहोंचेंही कथन वरील वाक्यांत झालें, म्हणून हें 'हेतु'अलंकाराचें उदाहरण होय. १३. श्रेष्ठ. १४. त्या सुदामदेवाच्या नगरींतील उपवनास (बगीचास) नंदन (नंदन नांवाचा देवांचा बगीचा) पाहून लज्जित होई. तसेंच सुदामदेवाच्या नगरींतील सरसीस (सरोवरास) देवकासार (देवांचें क्रीडासरोवर) पाहून लज्जित होई. १५. या गीतेंत 'काव्यलिंग' नामक अलंकार झाला आहे. [अलंकारमीमांसा–पृष्ठ ४२.] यांत कार्यकारणभावाचा स्वीकार केला आहे, अत्यद्भुत पुर हें 'कार्य' आणि शिल्पी ईश्वर हें 'कारण' समजावें. १६. भक्तकल्पतरु. १७. आवडत्या मित्ररूप हंसाला. (सुदामदेवाला.) १८. हंसपक्ष्याचें कोट्यास. १९. ब्रह्मदेव. २०. नऊ निधि. २१. अष्ट सिद्धि. २२. सुदाममुनीचें भाग्य हेंच सरोवर त्यामध्यें. २३. गृहमिषानें.

जों मुनि दृष्टि करी वरि, तों [1]हरिकरुणाविलासिनीकुंज ।
पाहे पुर [2]हर्म्यशत [3]स्त्रीनरभूषणमणिप्रभापुंज. ॥ ६८
प्रथम म्हणे, 'हें काय? [4]द्युतिमंडल? काय उतरला [5]भानु? ।
[6]सानूरु वरिहि दिसतो, जाणो चालत असेल [7]मणिसानु.' ॥ ६९
मग नगरी हें कळतां [8]ठाकोनि करी विचार उज्ज्वलधी, ।
'श्री[9]द्वारका नव्हे हे, आलिंगुनि कां इला नसे जलधी? ॥ ७०
नाहीं [10]सिंधु, नसेना, [11]प्रभुपुरवप्रप्रदेश [12]वाचाळा ।
सुटला बहुधा, संतत कैसा सोसेल केशवा [13]चाळा? ॥ ७१
परि माझ्या वसतीच्या मार्गाच्या दिसति कीं उदंड खुणा, ।
त्या सत्य, तरी कैंची अन्यपुरी [14]विभुपुरीसमानगुणा? ॥ ७२
भ्रमली दृष्टि म्हणावी, तरि हे [15]हरिपादनीरजभ्रमरी, ।
[16]भ्रमरीति ही निराली, नायकिली [17]भूतपीडिता [18]अमरी. ॥ ७३

---

१. कृष्णकृपारूप विलासिनीचें क्रीडास्थान असें पुर. २. मंदिरशत. ३. पुरुष व स्त्रिया यांच्या अलंकारांच्या प्रभांचें पुंज ज्यांत असें. (हें 'पुर' या शब्दाचें विशेषण.) ४. तेजाचा गोळा. ५. या आर्येत 'संदेह' नामक अलंकार झाला आहे. जेथें वर्णनीय पदार्थाच्या सादृश्यामुळें उत्पन्न होणारा संशय कवीनें खुबीदार रीतीनें वर्णिला असतो तेथें 'संदेह' नामक अलंकार होतो. पुढील ७० वी आर्या ही याच अलंकाराचें उदाहरण आहे. ६. स+अनूरु=अनूरुसह (सूर्य). ७. मेरुपर्वत. ८. थांबोनी, उभा राहून. ९. पंतांनीं मूळांतील संक्षिप्तवर्णनाचा विस्तार केल्याचें हें (गीति ७०-८१) एक ठळक उदाहरण आहे. १०. सिंधु नाहीं, नसेना=येथें द्वारकेच्या समीपचा समुद्र नाहीं तर नसो, तो नसला तरी कांहीं हरकत नाहीं. वाचाळा (सिंधूला) प्रभुपुरवप्रप्रदेश बहुधा सुटला=माझी अशी कल्पना धांवते कीं द्वारकेचा कोट त्या वाचाळ (सदा गर्जना करणाऱ्या) समुद्रापासून बहुधा मुक्त झाला, ठीक झालें असेंच असेल तर. केशवा सतत चाळा कैसा सोसेल?=या समुद्राची सर्वकाळची ओरड कृष्णाला कशी सहन होईल. अर्थात् होणार नाहीं, तेव्हां समुद्र येथून गेला हें बरें झालें म्हणावयाचें. पण येथें माझ्या घराला जाणाऱ्या मार्गाच्या खरोखर अनेक खुणा दिसतात, यावरून ही द्वारकेसारखी सर्वगुणांनीं समान अशी ही दुसरी एखादी नगरी असावी काय? पण ती तरी येथें कोठून यावी? छे! असें नव्हे, माझ्या दृष्टीला भ्रम झाला असावा, पण तसेंही खरें नव्हे, कारण माझी दृष्टि हरिचरणकमळीं भ्रमरस्त्रीसारखी रत होणारी होय, तेव्हां तिला भ्रम कोठून होणार? पुन: भ्रमाचा प्रकार कांहीं निराळा असतो, तसा हा प्रकार नाहीं. देवस्त्रियांना पिशाचबाधा झाल्याचें अद्याप कोणी आयकिलें नाहीं, तशासारखा हा प्रकार दिसतो. ११. द्वारकेचा कोट. १२. वडवड करणारा सिंधु यास. १३. वाचालपणा. १४. द्वारकातुल्यगुणा. १५. कृष्णचरणकमलभ्रमरी. १६. भ्रमाची (भ्रांतीची-प्रमादाची) रीति (पद्धति). येथें 'प्रथम यमक' आहे. १७. पिशाचग्रस्ता. १८. देवस्त्री.

झाली काय गती? ती येथेंचि [1]ब्राह्मणी सती होती, ।
नाहीं कीं या भावें झालें [2]विक्षीण [3]तत्तपोज्योती? ॥ ७४

होती सुचिर सुतृषिता एक सती चातकी असें कळलें, ।
फळलें भाग्य तिचेंचि, [4]श्रीमत्करुणामृताभ्र हें वळलें.' ॥ ७५

श्रीपतिसख मुनि ऐसें तर्की जों, तोंचि धांवले पौर, ।
गौरविती निजपतिला, गाती यश [5]अमृतदुग्धशशिगौर. ॥ ७६

पौरजनीं वास करी [6]निर्जरसौंदर्य [7]हरिपदादेशें ।
कीं स्वर्गाचें हरिलें यश भाग्य समग्र त्या तदा [8]देशें. ॥ ७७

[9]इंद्रसभवनें स्तवनें होती गीतेंहि जीं मतें [10]गीतें, ।
[11]भरतमुनिप्रतिपाद्यें [12]वाद्यें नृत्येंहि चित्तहरकृत्यें. ॥ ७८

बैसविला गजयानीं स्वस्वामी भक्तपौरलोकांनीं, ।
[13]हरिहरिदासयशातें ऐके सप्रेमचित्त तो कानीं. ॥ ७९

[14]कुसुमाक्षतलाजांची वृष्टि करिति पौरकन्यका पत्नी ।
रत्नींहि वर्षती, जीं रक्षावीं [15]अन्यदुर्लभें यत्नीं. ॥ ८०

तो उत्सव, [16]हा ग्रंथहि, सुखकर भगवत्प्रसाद बहु वाढे, ।
[17]काढेच हे तयां जे सांपडले [18]भवगदाचिया दाढे. ॥ ८१

---

१. पत्नी. २. नष्ट, लुप्त, गलित. ३. स्त्रीचें तपोज्योति. ४. हें श्रीमत्करुणामृताभ्र चातकीकडे वळलें, कारण त्या चातकीचें भाग्य उदयास आलें. ५. अमृत, दुध आणि चंद्र (शशी) यांसारखें शुभ्र. ६. देवांची शोभा. ७. कृष्णाच्या आज्ञेनें. देवांची कांति नगरवासी लोकांत वास करूं लागली. ८. त्या प्रदेशानें. ९. उत्तम रसांचीं भवनें (गृहें) अशीं स्तवनें=फार रसाळ अशीं स्तवनें. १०. वाणी देवीतें. ११. नाट्याचार्यानें प्रतिपादित असीं. १२. वाद्य तत, अवनद्ध (आनद्ध), घन आणि सुषिर असें चतुर्विध आहे. [भारतीय नाट्यशास्त्र–अध्याय २८,२९,३०,३१.] १३. हरि आणि हरिदास यांच्या यशातें. १४. कुसुम+अक्षत+लाजांची=पुष्पें+अक्षता–तांदूळ+लाह्यांची. राजा नगरांत प्रवेश करूं लागला म्हणजे पौरकन्यांनीं त्याजवर लाह्या उधळाव्या असा आचार प्राचीनकाळीं प्रचलित होता त्यास अनुसरून हें वर्णन आहे. [रघुवंश–सर्ग २ श्लोक १०, सर्ग ४ श्लोक २७, सर्ग ७ श्लोक १५; कुमारसंभव–सर्ग ७ श्लोक ६९-८० पहा.] १५. इतरांना अप्राप्य अशीं रत्नें. १६. हा पंतकृत 'कृष्णविजय' ग्रंथ त्या उत्सवाप्रमाणें वाढत चालला आहे. पंतांनीं या ग्रंथाला 'बृहद्दशम' (मोठा–विस्तृत दशमस्कंध) असें जें नांव दिलें आहे त्यावरून प्रतीयमान होणारा अर्थ हाच कीं यांतील कथाभाग विस्तारपूर्वक वर्णिला आहे. या गोष्टीचा अनुभव मूळ संस्कृत ग्रंथाशीं हा ग्रंथ ताडून पाहिला असतां सहज येणार आहे. जेथें वर्णनाचा विस्तार केला आहे अशा अनेक स्थलांचा निर्देश यापूर्वी केला आहे. १७. कषायच. १८. संसाररोगाच्या.

आला कां[1]त असें ती ऐकोनि स्त्री सती पुढें आली, ।
स्वपति सखा **श्री**पतिचा, **श्री**ची साध्वीहि कां न्हे आली? ॥ ८२
अमरीसम रीतिगुणीं ऐशा तीच्या सहस्र वॅ[3]रदासी ।
भक्तिहि सख्यास दिधली, हें काय असे अदेय वॅरदासी? ॥ ८३
नेत्रद्वारां हृदयीं नेउनि भेटे पतीस एकांतीं, ।
स्वां[5]तीं म्हणे, 'सतीनें सेवे[6]तर वर वरूं नये कांतीं.' ॥ ८४
दा[7]रिद्र्यग्रीष्मार्कें [8]जी होती वाळली जसी उसरी, ।
दुसरी **श्री** झाली ती, वर्षलि वरि ह[9]रिदयासुधांबुसरी. ॥ ८५
विप्रें विलोकिली ती अमरींमध्यें जसी श[10]चीची देवी, ।
जे वीजि[11]तां सुचामरसुव्यजनीं, स्त्रीसहस्र जिस सेवी. ॥ ८६
मूर्तिमती सकळकळा गानकळा यांत काय ती आ[12]र्या, ।
कीं मा[13]त्रावर्णगणच्छंदोजातींत काय ती आ[14]र्या. ॥ ८७

---

१. सुदामपति. २. सखी. ३. श्रेष्ठ दासी. ४. देवास. ५. मनांत. ६. सेवेहून अन्य. ७. दारिद्र्य+ग्रीष्म+अर्क=निर्धनता+उष्णकाल+सूर्य. ८. सुदामभार्या. या पद्यांत 'रूपक' आहे. ९. हरिदया हीच सुधांबुसरी वृष्टि करिती झाली. १०. इंद्राणी, पौलोमी. (श्लो०२७.) ११. वारा घातलेली (चांगल्या चामरानें आणि चांगल्या पंख्यानें). १२. पूज्य सुदामभार्या. १३. मात्रागणांनीं वर्णगणांनीं रचित ज्या छंदोजाती त्यांत. १४. आर्याछंद. आर्यावृत्ताची महती पंतांनीं अनेक ठिकाणीं गाइली आहे. पंतांचें आर्यावृत्तावर प्रेम किती होतें हें पुढील आर्यावरून दिसून येईल:—आर्या आर्यासि रुचे ईच्या ठायीं जशी असे गोडी । आहे इतरा छंदीं गोडी, परि यापरीस ती थोडी. ॥ १ ॥ [मोरोपंत—भीष्मभक्तिभाग्य—गीति १०], पुरुषा आर्यावृत्तें जैसी ग्रंथा जया तसी मोटी । शोभा आर्यावृत्तें आली भुलतील यासि कवि कोटी. ॥ १ ॥ [मोरोपंत—भीष्मपर्व—अध्याय १२ गीति ७९], छंदःशास्त्रीं आद्या सन्मान्या जसि सतीगणीं आर्या । आर्या हे सद्रसिका जेंवि शिवा ती तसी प्रिया आर्या. ॥ १ ॥ अष्टादश पर्व जयग्रंथकथा आपणांत आर्यांनीं । आणिलि जसि आणावी, आर्या वहुमान करुनि आर्यांनीं ॥ २ ॥ शुद्धें अचंचळ मनें अवलोकाव्या बुधें जशा आर्या । निःशेष पापताप व्यापत्प्रशमार्थ या तशा आर्या ॥ ३ ॥ ज्यांच्या गानें व्हावें प्रेमाश्रु क्षपित चंदन मयूरें । आर्या समर्पिल्या हरिचरणीं श्रीरामनंदन मयूरें ॥ ४ ॥ बहु मानीलचि पूर्वप्रेमातें न त्यजूनि ओव्याही । आर्यांसि म्हणेल रसिक अभिनव विहिणींस जेंवि ओ व्याही ॥ ५ ॥ [मोरोपंत—स्वर्गारोहण पर्व—अध्याय २, गीति ५२-५६], प्रकटी प्रथम भगीरथ नृप लोकीं सुरनदीस ती आर्या । तसि हे मयूर नाहीं तरि सर्वांला न दीसती आर्या ॥ १११ ॥ उचित प्रकार भासो रसिकांस प्राकृतांत आर्यांचा । युष्मद्वरेंचि होतो सत्कार प्राकृतांत आर्यांचा. ॥ ११२ ॥ सुखद प्रचार रसिकां वाटेल प्राकृतांत आर्यांचा । तुमच्या वरेंचि जेंवि व्रजवासिप्राकृतांत आर्यांचा. ॥ ११८ ॥ आर्यावृत्तक्षीरीं युष्मन्नुतिशुद्धशर्करा प्राज्य । वरि ओतिलें यथेच्छ स्वच्छ श्रीरामनाम भव्याज्य. ॥ ११९ ॥ [मोरोपंतकृत स्फुटप्रकरणें—भाग १, नामसुधा—काव्यसंग्रह—पृ० ३२३.]

कीं [1]तारांच्या वृंदीं मूर्तिमती रोहिणीच ती, अथवा ।
ती हरिकीर्ति, [2]तदनुचरजनकीर्तीचाचि तूर्त काय [3]थवा ? ॥ ८८
कीं [4]कविजनोक्तिनिकरीं कविनृप[5]वाल्मीकिविप्रवरवाणी ।
त्या [6]भक्तराजराजें ऐसी ती देखिली [7]सतीराणी. ॥ ८९
काय पुन्हा तो वरिला हरि लालसमानसें [8]वर श्रीनें ? ।
स्त्रीनें हस्तीं धरिला पति, लाजविलें तिला [9]वरं[10]श्रीनें. ॥ ९०
दिव्य [11]प्रासादांत [12]प्रभुसखविप्रप्रवेश ज्या लग्नीं ।
कौतुक पहात होते [13]सग्रेह [14]मणिदंभ [15]भास्वदिंद्वग्नी. ॥ ९१
[16]दीप [17]श्रीपतिमित्रप्रासादींचे [18]पतंगसख सारे, ।
[19]अस्नेह न [20]तापकरहि, तम न क्षणभरिहि ज्यांपुढें थारे. ॥ ९२

---

१. तारकांच्या (नक्षत्रांच्या) पुंजकांत समुदायांत. २. हरिभक्तजनांच्या कीर्तीचाचि. ३. समुदाय. ४. इतर कविजनांच्या कवितांत. ५. वाल्मिकीची कविता. ६. सुदामानें.. ७. पतिव्रताशिरोमणि. ८. समुद्रमथनानंतर भगवान् स्वपति लक्ष्मीनें पुन्हा वरिला जसा तसा इनेंही. ९. या स्थलीं (गीति ८६-९०) जें पंतांनीं प्रेमळ आणि रसाळ वर्णन केलें आहे तें त्यांच्या कल्पनाचातुर्याचें फळ होय. यास मूळग्रंथांत कांहीं आधार नाहीं. मूळांतील २७ वा श्लोक आणि हें गीतिचतुष्टय जो कोणी ताडून पाहील त्यास असें खास वाटेल कीं पंतांनीं भागवतकारांवर ताण केली आहे. मूळांतील रूक्ष श्लोक कोठें ? आणि हें सरस पद्यचतुष्टय कोठें ? शिवाय पंतांनीं या स्थलीं एका श्लोकाच्या ऐवजीं चार आर्या घालून वर्णनविस्ताराची आवडही प्रकट केली आहे असें होतें. हा अध्याय वाचून कोठें कसा संक्षेप करावा आणि कोठें कसा विस्तार करावा हें पंत चांगलें जाणत असत, असें स्पष्ट होतें व त्यावरून त्यांची मार्मिकताही अधिक व्यक्त होते. १०. पतिशोभेनें. ११. मंदिरांत. १२. प्रभु (कृष्ण आहे) सख (सखि–सखा–मित्र) ज्याचा असा जो विप्र (सुदाम) त्याचा गृहप्रवेश. [गृहप्रवेश सुमुहूर्ते पहावा लागतो. गृहप्रवेश तीन प्रकारचा आहे—अपूर्व प्रवेश, सुपूर्व प्रवेश आणि द्वंद्वाभयप्रवेश. गृहप्रवेशास लग्नशुद्धि अवश्य आहे. जेव्हां जन्मलग्न शुभगृहयुक्त असतें तेव्हां गृहप्रवेश करावा असा नियम आहे. सूर्य चंद्र इत्यादि अनुकूल असले पाहिजेत. [मुहूर्तमाला–श्लो० ५३-५७; बृहत्संहिता–अध्याय ९८ श्लो० १८.] सूर्य, चंद्र आणि अग्नि हे इतर ग्रहांसहित कौतुकानें पाहत होते यावरून ते या लग्नीं (या वेळीं) अनुकूल होते असेंच निष्पन्न होतें. सुदामदेवाच्या मंदिरांतील मणी (रत्नें) पाहून असें वाटलें कीं मण्यांच्या रूपानेंच सर्व ग्रह सकौतुक (अनुकूल होत्साते) पाहत होते.] १३. ग्रहांसहित. १४. रत्नाच्या मिषानें राहणारे. १५. भास्वत्+इंदु+अग्नी=सूर्य+चंद्र+अग्नि. १६. रत्नदीप. १७. कृष्णमित्राच्या (सुदामभक्ताच्या) मंदिराचे. १८. पतंगाला न भाजणारे. पतंग (सूर्य) सख (मित्र)=सूर्यासारखे तेजःपुंज. १९. तैलरहित. २०. तापकर नव्हत.

[1]तेजस्वीहि [2]स्नेहें [3]स्त्रीकरगत [4]मलिनवदन [5]मळवीती, ।
[6]तापवितीही, हें [7]हरिजनगृहमणिदीप [8]तत्व कळवीती. ॥ ९३
[9]मणिललनाकरपद्मीं मणिदीप तसे विराजती गेहीं ।
जनबुद्धिवृत्तिमध्यें शुचि चित्[10]प्रतिबिंबकें [11]जैसीं देहीं. ॥ ९४
हरिभक्तमंदिरीं त्या केवळ मणिदीप [12]मात्र [13]अस्नेह, ।
शांत तमःक्षयपटु शुचि याचिगुणें स्वजठरीं भरी गेह. ॥ ९५
[14]पूर्णसुधांशुज्योत्स्ना लाजति त्या स्फटिकरत्नभित्तींतें, ।
प्रतिबिंब दाविती जें बिंब गमे सुकविच्याहि चित्तीं तें. ॥ ९६
प्रासादीं रत्नाचे सुस्थूळ अखंड आणि बहु लांब ।
खांब सहस्त्रावधि रविकरनिकरा [15]म्हणति जे 'शिशो ! थांब.' ॥ ९७
[16]दुग्धाब्धिफेनपांडुरशय्यामंडित [17]करींद्रदंतांचे ।
[18]पर्यंक शत विराजति, जैसे मृदुशुद्धभाव संतांचे. ॥ ९८
[19]वरपद्मरागमरकतहीरकहरिनीलमणिमयागारा ।
[20]गारा [21]मृगमदकेसरकर्पूरांचा जयास जळ [22]गारा. ॥ ९९
रत्नाचीं च विचित्रें कनकाचींही कित्येकही [23]खचितें ।
दंतें[24] प्रवाळ चंदन यांचींही अमित आसनें रचितें. ॥ १००
मणिकनकदंडमंडित शतसंख्य सुरम्य चामरव्यजनें ।
ज्यांच्या विलोकनासहि पात्र न व्हावें कधीं [25]अभव्यजनें. ॥ १०१

---

१. तेजोयुक्त (पुरुष); (पक्षीं) प्रकाशक दीप. २. लोभानें;(पक्षीं)तेलानें. ३. स्त्रियांचे करपाशांत पडलेले; (पक्षीं) स्त्रियांनीं हातांत धरलेले. ४. काळीं तोंडें झालीं ज्याचीं असे; (पक्षीं) ज्याच्या ज्योतीपासून काजळ निघतें असे. ५. कृष्णकृत्यें करतात; (पक्षीं) मलिनपणा आणतात. ६. ताप देतात, दुःख देतात; (पक्षीं) तप्तता प्राप्त करवितात. ७. हरिभक्तसदनरत्नदीप. ८. भगवद्भक्त जो सुदामदेव त्याच्या गृहांतील मणिदीप हें तत्व कळवितात. ९. रत्नमय पुतळ्यांच्या हातांतील. १०. चैतन्याचीं प्रतिबिंबें. ११. जसीं चित्प्रतिबिंब नित्य होत तसे मणिदीप नित्य प्रकाशित होत–असा भाव. १२. या पद्यांत 'परिसंख्या' अलंकार झाला आहे. [अलंकारमीमांसा–पृ० ४८.] १३. स्नेहरहित, तेलरहित; (पक्षीं) सप्रेम इतर सर्व जन, इतर जन सस्नेह (प्रेमयुक्त). १४. पूर्ण+सुधांशु+ज्योत्स्ना=सकळा+चंद्र+चंद्रिका, कौमुदी. १५. सहस्त्रावधि सूर्यकिरणांपेक्षां रत्नस्तंभ तेजस्वी असल्यामुळें रविकिरणांस म्हणतात–'अहो शिशो. (रविकिरण बाळ हो !] थांब (आमच्यापुढें आपलें तेज दाखवूं नको.)' रत्नस्तंभ रविकरांस तुच्छ मानतात–हा भाव. १६. दुग्धाब्धि+फेन+पांडुर=दुग्धसागर+फेण+श्वेत. (श्लो० २९.) १७. ऐरावताच्या दांतांचे. १८. पलंग. १९. उत्तम माणकें, पाचा, हिरे, इंद्रनीळ अशा रत्नांनीं खचित गृहास. २०. चिखल. २१. मृगमद (कस्तूरी) केसर (केंशर) आणि कर्पूर (कापुर) यांचा. २२. वर्षोपल.. २३. रत्नखचितें. २४. दंत=हस्तिदंत. २५. दुर्दैवजनानें.

मुक्ताजाळें[1] रचिलें निववी जननेत्रसारसें[2] वितान[3], ।
जेथें तेथें, वाटे तेंवि सुधाकर[4] न सार[5] सविता[6] न. ॥ १०२
निरुपम संपत्ति असी पाहुनि सद्विप्र तो करी तर्का[7], ।
'अर्का[8] मधुर फळ कसें? जें मुरडी नाक[10] अमृतसंपर्का. ॥ १०३
होती सुचिर सुतृषिता एक सती चातकी असें कळलें, ।
फळलें दैव तिचेंचि, श्रीमत्करुणामृताभ्र हें वळलें. ॥ १०४
जन्मदरिद्र सुदुर्भग मी, मजवरि हे सुवर्णमणिवृष्टी ।
कां हो! न पडे? पडल्या दुर्लभ लक्ष्मीशपादुकादृष्टी. ॥ १०५
कांते! साध्वि! सख्याचें औदार्य पहा, समक्ष न वदे तो, ।
हे तोयजाक्षि[11]! जरि बहु यापरि हरि याचका विभव देतो. ॥ १०६
जरि सागरपरिपूरक[12] धाराधर[13] कर्षकांस[14] लाजेल[15], ।
रात्रौ क्षेत्रक्षितितळ[16] भरिल जळें, मंदही न गाजेल[17]. ॥ १०७
दृष्टांत संकटास्तव मत्सखयासी क्षणार्ध साजेल, ।
परि बहुवत्सर कविवरहृदयीं तें निजदुरुक्त डाजेल. ॥ १०८
आपण मेरु समर्पुनि[18], मानितसे अणुपरीसहि स्वल्प, ।
कल्पतरु स्वजनाचा, मत्सख मुनिहृदयनागपतितल्प[19]. ॥ १०९

---

१. मोत्यांच्या जाळ्यानें रचिलेलें (वितान). २. प्रेक्षकलोचनकमळाला (श्लो० ३०.) ३. छत. ४. चंद्र. ५. श्रेष्ठ. ६. सूर्य. ७. श्लोक ३२ पहा. कोणत्या कारणानें ही संपदा मला अकस्मात् प्राप्त झाली याविषयीं अव्यग्रमानसानें त्या साधुविप्रानें तर्क केला. ८. रुईला. ९. रुईच्या झाडाला गोड फळ आलें कसें? जी गोष्ट कधीं व्हावयाची नाहीं ती कशी झाली? १०. जें फळ अमृताच्या संपर्का (स्पर्शास) नाक मुरडतें (तुच्छ मानतें), जें फळ अमृताचा संसर्ग, हीनत्व आणणारा, तुच्छत्वप्रापक, असें समजून त्याचा धिक्कार करतें. नाक मुरडणें=अवमानना करणें—तुच्छ मानणें, हलका मानणें, अनादरणें. ११. तोयजाक्षि=कमलाक्षि! १२. सागरालाही भरून टाकणारा. १३. मेघराज. १४. शेतकऱ्यास. १५. या संबधानें पुढील विवेचन पहा:—'पर्जन्याचा दृष्टांत येथ। द्विज वदला तो इत्थंभूत । वाखाणिजेल साव चित्त । श्रोते समस्त परिसोत पैं ॥ १ ॥ बहुभोज सभाग्य पर्जन्य कैसा । समुद्र संपूर्ण भरी ऐसा । वदान्यतेचा निःसीम उसा । देतां सहसा न कडसी॥२॥कदाचित् बहुतेकही वर्षोनि जळ । मानी अल्पचि हें केवळ । लज्जित देखोनियां कृशीवळ । म्हणे म्यां प्रेमळ न तर्पिलें ॥ ३ ॥ मग लज्जेकरूनि रात्रभागीं । कर्षकाचीं क्षेत्रें अवघीं । जळें परिपूर्ण करूनि वेगीं । न धरी आंगीं स्फुंजातें ॥ ४ ॥ प्रकट न वंदोनि कर्षकापुढें । समृद्धि ऐश्वर्य प्रवृद्ध गाढें । देऊनि मानी हें थोडें । येणेंचि पाडें श्रीकृष्ण ॥ ५ ॥' [श्रीहरिवरदा]. १६. शेताच्या भूमीचा पृष्ठभाग. १७. गर्जेल. १८. श्लो० ३५ पहा. १९. मुनींचें हृदय हाच शेष यावर निजणारा.

[1]सुहृदर्पित अणुमात्रहि तें ब्रह्मांडापरीस करि थोर, ।
तो रक्षक विश्वाचा, दीनाचा बंधु [2]साधुहृच्चोर ॥ ११०
[3]मद्दत्तपृथुकतंडुलकण कृपणपणें पडों नदे, [4]वेंची, ।
जन्मोजन्मींहि असो मज एक प्रेम त्या सख्याचेंची. ॥ १११
तत्सख्य भवशतींही असतां न 'पुरे' म्हणेल, हा दीन; ।
हीनश्री त्याहुनि बहु, [5]दुग्धासहि हात जोडितो मीन. ॥ ११२
[6]तन्मैत्रीसचि हा जन भुलला मी तोय, तो सखा दुग्ध, ।
[7]आण प्रमाण झाले बाई श्री! जग म्हणो न मज 'मुग्ध.' ॥ ११३
भाग्य तुलाचि म्हणतसें जन्मसहस्रींहि हेंचि [8]हरिर्दास्या! ।
[9]आस्या येइल, होइल पात्र न हा जन चुकोनि [10]जनहास्या. ॥ ११४
भक्तासि रत्नकांचनपर्वत ऐश्वर्य सुत कलत्र असे ।
संसारहेतु मोहक देत नसे [11]प्रभु, दिले मलाचि कसे? ॥ ११५
भक्त म्हणवितों, परि मी भक्त नव्हे, भक्ति जरि [12]संती असती, ।
तरि संपदा न येती, [13]साध्वीदयितालया न ये [14]असती. ॥ ११६
कृष्णा! सख्या! उदारा! सदया! पद या मनांत राहों दे, ।
पाहों दे मग हा द्विज कर्मफळें, भवनदींत वाहों दे. ॥ ११७
भार्ये! वस्तु नको तें ज्याचें त्यालाचि युक्तिनें द्यावें, ।
व्हावें वस्तु [15]अनश्वर तरि हें गोब्राह्मणासि दे भावें. ॥ ११८
मज भक्तमयूरा जें करुणाघनकृष्णदर्शनीं प्रेम ।
तें मत्सख्यास ठावें, न रुचे हें होय तोय मणि हेम.' ॥ ११९

---

१. मित्रानें दिलेलें. २. साधुहृदयास लोभविणारा. ३. मीं दिलेल्या पोह्यांचे कण. ४. टिपून घेई. ५. दुग्ध जरी चांगलें आहे तरी तें उदकासारखें सुखस्थान नसल्यामुळें तें मीनाला नको असतें. हात जोडणें=कोणतीही वस्तु अग्राह्य, असेव्य असली, नकोशी असली, अहितकर असली म्हणजे तिला दुरूनच हात जोडून (नमस्कारपूर्वक आदर करून) अस्वीकार सूचविणें, असा अर्थ आहे. 'दुर्जनं प्रथमं वंदे' यांतील वंदनही याच मासल्याचें होय. हीनश्रीकत्व हें भगवत्सख्यराहित्यापेक्षां अधिक प्रिय होय, मात्र हीनश्रीक अवस्थेंत भगवत्सख्य असलें म्हणजे झालें. ६. त्या भगवंताच्या मित्रत्वाला. ७. हे लक्ष्मी! तुझें सख्य नको. ८. हे भगवद्दास्या. ९. मुखाला, तोंडाला. १०. लोकांच्या उपहासाला. ११. श्लो० ३७ वा पहा. १२. जर पतिव्रता अथवा खरी असती तर. १३. पतिव्रतेचा आवडता (पति) त्याच्या घराला किंवा पतिव्रतेच्या आवडत्या घराला. १४. कुलटा. १५. चिरंतन, नित्य, सनातन.

ऐसी कथा यथामति अतिसुरसा प्रेमपद्ममित्राची ।
मित्राची श्रीपतिच्या दासांनीं गायिली पवित्राची. ॥ १२०

## अध्याय ब्यायशींवा.

सूर्योपरागपर्वस्नानास्तव पुंडरीकदलनेत्र ।
सकुटुंब यादवांतें नेउनि पावन करी कुरुक्षेत्र. ॥ १
पर्वस्नान कराया नृप पांडवकौरवादि बहु आले, ।
न्हाले श्रीरामाच्या न्हदतीर्थीं, धूतपाप ते झाले. ॥ २

---

१. पृथुकाख्यानरूप कथा. या शिवाय पंतांनीं 'पृथुकोपाख्यान' नामक दोन प्रकरणें लिहिली आहेत त्याचा समावेश 'मोरोपंतकृत स्फुट काव्यें—भाग २' यांत होईल. यांतील एक साकीवृत्तात्मक आहे, व दुसरें अनेक श्लोकवृत्तात्मक आहे. २. प्रेमरूप कमलाचा उत्कर्ष करणारा सूर्य अशाची. ३. सुदाम देवाची. ४. सूर्य+उपराग+पर्व+स्नानास्तव=सूर्य+ग्रहण+कालविशेष+स्नानासाठीं=सूर्यग्रहणसमयीं स्नानासाठीं. ५. कमलदललोचन (कृष्ण). ६. कुरुक्षेत्रांतील स्यमंतपंचक नामक तीर्थीं सूर्य ग्रहणाच्या महापर्वानिमित्त अनेक राजे स्नानदानादिक कर्में करण्यासाठीं आले होते. ७. मत्स्य, उशीनर, कौसल्य, सृंजय, विदर्भ, कांबोज, त्रिगर्त, सैंधव, केरळ (श्लोक १२-१३. ८. श्रीरामाच्या=परशुरामाच्या ह्रदतीर्थामध्यें. या ह्रदतीर्थाची कथा:—"पुढें हैहय कार्तवीर्य । तेणें जमदग्नि द्विजवर्य । छळूनि आचरला अनार्य । जें अकार्य सद्रूपां ॥ १ ॥ रेणुके पक्षास्तव भृगुपति । क्षोभला जैसा चंडदीधिति । प्रळयकाळीं भूतव्यक्ती । भंगी स्वशक्ती प्रज्वळोनी ॥ २ ॥ इषुधिकोदंडकुठारपाणि । वदनीं विश्रुत आम्नायखाणी । उत्पथ निर्दळी समरांगणी । बाणीं बाणीं सरोष जो ॥ ३ ॥ तेणें मारूनी हैहयपती । प्रकट दाविली पितृभक्ती । पुढें सहस्रार्जुन-संतती । सारोनी चित्तीं दुर्वैर ॥ ४ ॥ समित्पलाशकुशप्रसूना । भृगुवर सबंधु गेला वना । जाणोनि जिहीं जमदग्निहनना । केलें ध्यानस्थ लक्षूनी ॥ ५ ॥ ग्लानि करितां रेणुका सती । तीतें निर्भर्त्सूनि ते दुर्मती । जमदग्निमस्तक घेऊनि हातीं । गेले निघोनि स्वपुरातें ॥ ६ ॥ रेणुकेनें एकवीस वार । केले निजह्रदयावरि प्रहार । भार्गवें ऐकोनि आर्तस्वर । आला सत्वर धांवोनियां ॥ ७ ॥ हैहयांचें अनार्य दृष्टी । देखोनि क्षोभला जगजेठी । माहिष्मती उठाउठीं । भंगूनि कपटी निर्दाळिले ॥ ८ ॥ वाहिले रुधिराचे कल्होळ । अरिशिरांचे केले अचळ । क्षत्रियरहित वसुधातळ । क्षोभला प्रबळ करावया ॥ ९ ॥ करीत होत्साता निःक्षत्री भू । राम शस्त्रधरामाजी अपर शंभु । नृपरुधिरौघें निर्मी प्रभु । न्हद स्वयंभ कुरुक्षेत्रीं ॥१०॥ एकवीस वेळां कुटिला उर । यास्तव पृथ्वी एकवीस वार । करीन निःक्षत्री हा क्रूर । संकल्प केला भृगुवर्यें ॥ ११ ॥ भूमंडळींच्या क्षत्रियश्रेणी । कुरुक्षेत्रीं समरांगणीं । वधूनि रुधिरें नाहाणिली धरणी । पितरां तर्पणीं तोषविलें ॥ १२ ॥ क्षत्रियरुधिराचे अगाध । रामें निर्मिले प्रचंड न्हद । तेथिंच्या तर्पणें अमरवृंद । पावती मोद मुनिपितर ॥ १३ ॥ पूर्वींच पावन विर्धातें मही । निर्मिली तेथ कुरुनृप

मग तीर्थ[१]पदप्रभुला भेटति सप्रेम लोक ते सर्व; ।
गर्व [२]प्रथमाचा हरि हरिदर्शननाम दूसरें पर्व. ॥ ३
धृतराष्ट्रभीष्मविदुरद्रोणकृपप्रभृति आप्त वसुदेवा ।
दे[३]वाधिपा जसे सुर, भेटति म्हणती 'पदें शि[४]वों दे बा !' ॥ ४
जैसी शांति प्रीतिहि वसुदेवा भेटली तया [५]भ्रात्या ।
कुंतीही[६] आलिंगी प्रेमानें [७]तत्सुता [८]दयाभ्रा त्या. ॥ ५
भेटाया करुणाघनकृष्णाला जाय मोरसा नंद, ।
होय विलोकुनि जैसा पर्वहि[९]मकरा चकोर सानंद. ॥ ६
वसुदेव पुढें धांवुनि आलिंगी त्या सख्यास नंदास, ।
'वंदा सप्रेम' म्हणे 'रामास तयाहि मोदकं[१०]दांस.' ॥ ७
श्रीरामकृ[११]ष्ण वंदिति नंदपदें, एकदांचि दोघांतें ।
आलिंगी तात महाभाग्यें चिरकाल त्या [१२]मुदौघांतें. ॥ ८
मग मातेच्या चरणा नमिती [१३]शमितीर्थरूप ते, त्यांतें ।
भेटे जननी, गंगायमुनौघालागिं लाज दे[१४]त्यांतें. ॥ ९
भवजलधि[१५]मथनमंदर मंद रडति बैसुनी पित्याजवळी, ।
कवळी माय [१६]यशोदा, लुटिती तें साधुध[१७]न सखे गवळी. ॥ १०
नील[१८]रजतनगनंदन नंद न तो घनचि अश्रुजळ वर्षे, ।

---

पाहीं । स्वनामक्षेत्र लोकीं तिहीं । प्रसिद्ध केलें अघहरणा ॥ १४ ॥ पुढें ते स्थळीं परशुराम । क्षत्रियरुधिरें अगाध परम । न्हद निर्मूनि विशुद्धकाम । यजिता झाला यज्ञातें ॥ १५ ॥ [श्लो० ३, श्रीकृष्णदयार्णवस्वामीकृत 'श्रीहरिवरदा' नामक टीका.] ९. धुतलें आहे पाप ज्यांचें असे.

१. तीर्थ आहे पदीं ज्याच्या तो (श्रीकृष्ण प्रभु.) २. पहिलें पर्व सूर्योपराग त्याचा गर्व कृष्णदर्शनरूप दुसऱ्या पर्वानें हरण केला. सूर्योपरागपर्वापेक्षां हरिदर्शनपर्व अधिक उत्सवप्रद झालें. ३. इंद्राला. ४. पदें शिवणें=प्रणिपात करणें, हस्तानें अथवा मस्तकानें पादवंदन करणें. ५. वसुदेवास. ६. श्लो० १७ पहा. ७. वसुदेवपुत्रा. ८. करुणाघना कृष्णा. ९. पूर्णिमेच्या चंद्राला. या आर्येंतील दोन्ही उपमा फार सुंदर आणि हृदयंगम आहेत. १०. आनंदकंदाला=कृष्णाला. ११. श्लोक ३४ पहा. १२. मुदा+ओघातें=आनंदाचे ओघ अशांतें. १३. यतिजनांत अत्यंत श्रेष्ट असे रामकृष्ण शमी=शांतिशील जितेंद्रिय यति. १४. गंगा आणि यमुना यांच्या सितासित प्रवाहाला आपल्या अंगवर्णानें लाजविणारे जे रामकृष्ण त्यांतें. १५. संसारसागराचें मथन करणारा जो मंदर पर्वत त्या सारखे संसारनाशक(रामकृष्ण). १६. श्लोक ३५ पहा. १७. साधुजनांचें धन, साधु ज्याला धनासारखा अमोलिक समजतात तो (कृष्ण.) १८. एक नील पर्वत, एक रजत पर्वत असे नंदन (पुत्र) ज्याचे तो (नंद). येथें कृष्ण नीलनग आणि राम रजतनग असें समजावें.

मोरचि तदधरपल्लव [1]बल्लववन [2]विरहदावहत हर्षें. ॥ ११
भेटे [3]व्रजेश्वरीतें भावें श्रीदेवकी जसी अनुजा, ।
श्रीरोहिणीहि भेटे, भेद प्रेमीं न दाविती [4]तनु जा. ॥ १२
या [5]दोघीही [6]धात्री दिसती, माता सती यशोदाची, ।
प्राचीन प्रेमा तो म्हणे, 'पिता नंद माय हे साची'. ॥ १३
वसुदेवस्त्री म्हणती, 'आइक बाई! [7]व्रजेश्वरी! बोल, ।
हो लक्ष [8]भवत्प्रत्युपकृति, उपकृतिला तुझ्या नसे मोल. ॥ १४
स्मरति तव [9]स्तन्यास [10]न्यांस तुझे [11]हे, तुम्हींच पितरांहीं ।
केलें सादर [12]पाळनें लालन, करिजेल काय इतरांहीं? ॥ १५
तव मैत्रीहुनि आम्हां शक्राचीहि प्रिया नसे पदवी, ।
[13]मदवीती काय बरी? त्वत्प्रीति असेंच सर्वदा वदवी. ॥ १६
आधीं [14]म्हणति 'यशोदे!' मग येतें नाम आमचें बाई! ।
बा! ईश्वरा! कळो तुज, आम्हीं दाई, व्रजेश्वरी आई. ॥ १७
कां [15]खेदें आमचा कीं याचा प्रेमा गमो जुना न मना, ।
दे आशीर्वाद, पहा बाई! करिती तुला सुना नमना. ॥ १८
त्वां आरोग्य [16]पुसावें आधीं, मग अश्रु रामकृष्णाचें, ।
तव [17]धन्यस्तन्यरसानूनोक्तिसुधारसीं सतृष्णाचें. ॥ १९
गायीसीं वत्सासीं दैवबळें गांठि बहुदिसां पडली, ।
स्थान[18]भ्रमविकळहृदयकृपणाची ठेवि काय सांपडली?' ॥ २०

---

१. गोपवन, गवळ्यांचें अरण्य. २. विरहरूप दावानें (वणव्यानें) हत (नष्ट) असें. ३. यशोदेतें. व्रजाच्या (गोकुळाच्या) ईश्वरीतें (स्वामिणीतें.) ४. जा प्रेमीं तनु (अल्प) भेद न दाविती. ५. रोहिणी व देवकी. ६. उपमाता. ७. हे यशोदे. ८. तूं केलेला उपकार. ९. दुधाला. १०. ठेवे. ११. हे रामकृष्ण. १२. श्लोक ३८ पहा. १३. गर्वाला विणारी अशी इंद्र पदवी खरेंच बरी नव्हे. तुझी साधी प्रीतिच बरी असें आमच्या मनास वाटतें. १४. वसुदेवाच्या स्त्रियांचें भाषण हें वर्णनविस्ताराचें उदाहरण आहे. प्रस्तुत पद्यास मूळांत आधार नाहीं. परंतु प्रसंग मनांत आणून पंतांनीं अनुरूप अशा अनेक कल्पनांची योजना केली आहे. प्रत्येक आर्येंत कांहीं ना कांहीं रामकृष्णांच्या बालपणांतील प्रसंगास अनुलक्षून वर्णन केलें आहे. १५. बाई कष्टी कां होतां? १६. 'पुसावें' हा शब्द येथें दोन अर्थांनीं योजिला आहे. पुढें गीति २३ वी हींतही या शब्दाचा असाच द्व्यर्थक प्रयोग केला आहे. १७. धन्य+स्तन्य+रस+ अनून+उक्ति+सुधारसीं=तुझ्या धन्य स्तन्य रसाहून अनून (तुल्य) जो तुझा उक्तिसुधारस त्याचे ठायीं सतृष्ण (आसक्त) जे रामकृष्ण त्यांचें अश्रु पुसावें. १८. (ठेव्याचें) स्थान चुकल्यामुळें (स्थानाचा भ्रम झाल्यामुळें) विकल (व्यथित) आहे हृदय ज्याचें अशा कृपणाची ठेवी.

एकांतीं दर्शन दे गोपींतें हरि तसाचि तत्[1]प्रेमा, ।
क्षेमालिंगन झालें, लाजविलें सेंद्रनील[2]मणिहेमा. ॥ २१
तो विद्यु[3]न्नवजलधरतरंगिणीसिंधुसंगमापरिस ।
धरि सैच्छ्री[4] संगें[5], बसति जेव्हां वेष्टूनि गोपिका हरिस. ॥ २२
पुसिलें नयं[6]नास्यकमल अं[7]नामय श्रीकरें स्वं[8]आलींचें ।
आलींचें[9] [10]लतिकांच्या काय वसंतें गृहास आलींचें[11]? ॥ २३
'सखिया हो! कां होतां आतां अं[12]न्यत्रदत्तदृष्टि, पहा ।
शोधित होतां ज्यां[13]तें विरहीं सर्वत्र तोचि निष्कृप हा. ॥ २४
'सत्वर येतों' ऐसें वदलों होतों मनांत ती लाज, ।
काज सरेना, नव नव रिपुं[14] बहु, तीर्थास पाहिलें आज. ॥ २५
झालें पुण्यक्षेत्रीं प्रियदर्शन हेंचि सद्य फल हो! कीं ।
शोकीं पडल्या चित्ता दे बोधकं[15]राशि तो सखा[16] लोकीं. ॥ २६
मजला अकृतज्ञ तुम्हीं सखिया हो! काय मानिलें चित्तीं? ।
वित्तीं कृपण विटेना, दृष्टि न दे तद्विरक्तिदं[17]निमित्तीं. ॥ २७
नोहें कृतघ्न[18] निर्दय मी, विश्वासार्थ आण वाहीन, ।
नाहीं नष्टपण कसी हें सखियांसिच पुसोन पाहीन. ॥ २८
गेलों टाकुनि यास्तव निष्ठुर मी भासलों असेन मना, ।

---

१. आपला प्रेमा गोपींतें दे. २. इंद्रनीलमण्यासारखा वर्ण कृष्णाचा आणि हेमासारखा वर्ण गोपींचा. गोपी व कृष्ण यांच्या आलिंगनानें इंद्रनीलमणियुक्त हेमास (सुवर्णास) लाजविलें. गोपकृष्णाश्लेष हा सुवर्णेंद्रनीलमणिसंयोगाहून अधिक मनोहर भासला. ३. विद्युत्+नव+जलधर+तरंगिणी+सिंधु+संगमापरिस=विजा आणि मेघ किंवा नद्या आणि सागर यांच्या संगमापेक्षां. ४. उत्तम शोभा. ५. तो संग सच्छ्री धरि—असा अन्वय. ६. नयन+आस्य+कमल=नेत्र+मुख+कमल. ७. आरोग्याविषयीं पुसिलें अन्+आमय=न+रोग=क्षेम कुशल आहेना? असें पुसिलें (श्लो० ४०.) ८. सखींचें. ९. पंक्तींचें. १०. लतांच्या. ११. आलेल्यांचें. १२. अन्य स्थळीं दिली दृष्टि ज्यांनीं अशा. १३. ज्या मला (कृष्णातें). १४. अनेक शत्रुजनांचा क्षय पुनः करावयाचा होता म्हणून शत्रुपक्षक्षपण हें काज सरेना. १५. बोधरूप हस्ताश्रयास. १६. जो शोकग्रस्त चित्ताला उपदेशाचा हात देऊन सांभाळतो तो लोकांत सखा होतो—तोच खरा मित्र होय. या अर्धांत 'सखा' कोणाला म्हणावें हें फार सुरेख रीतीनें स्पष्ट करून सांगितलें आहे. हें अर्ध सुभाषितरूप आहे. १७. त्या वित्ताची विरक्ति (कंटाळा) उत्पन्न करणाऱ्या कारणाच्या ठायीं. १८. उपकार करणारास अपकार करणारा, गोपीजनातें वियोगानें दुःख देणारा.

श्रम नाठवूनि ऐका गुरुमातेतें करूनियां [1]नमना. ॥ २९
संयोगवियोगातें पावति [2]अनिळेंचि धूळि तृण तूळ, ।
मूळ ईश्वरसत्ता, तैसीं भूतें तयासि अनुकूळ. ॥ ३०
[3]पशुपाधीन पशु जसे, तैसीं [4]भूतें [5]महेश्वराधीनें, ।
[6]आधीनें कृश झालां, वरिला [7]सुविचारधर न हो! [8]धीनें. ॥ ३१
[9]प्रियविरहज्वर रिपुसहि लवहि स्वप्नांतरींहि न शिवे तें ।
करुणानिधे! करीं हें मीं मागतसें सदाशिवशिवेतें. ॥ ३२
तो [10]ज्वरदाव मृदुलतनुजनहृदया मामकात्म[11]शुकनीडा ।
पीडा दे, न मला हें म्हणणारालाचि लाजती व्रीडा. ॥ ३३
परि विरहक्लेशांतहि लाभ सती हो! तुम्हांस हा मोटा ।
[12]खोटा नेणें, झाला मत्प्रेमातिशय काय हा तोटा? ॥ ३४
नुसती भक्तिच माझी [13]अमृतप्राप्तीस हेतु, मग साच्या ।
या चारुस्नेहें ये कोण द्वारा न [14]मन्निवासाच्या? ॥ ३५
या [15]प्रेमें मज शुद्ध [16]ब्रह्माला पावलांचि गोपी हो! ।
ओपी होमीं तनु, परि भलत्या हे [17]गति नसेचि सोपी हो! ॥ ३६

---

१. गुरु मातेतें (नंद व यशोदा यांतें) नमना करुनियां (नमस्कार करून) श्रम नाठवूनि (त्यांनीं माझ्यासाठीं आपला देह झिजविला यांचें स्मरण न करून) [व त्यांना] टाकूनि मी गेलों यास्तव [तुमच्या] मना (अंतःकरणास) निष्ठुर भासलों असेन, [पण त्याचें कारण] ऐका. [हें कारण पुढच्या पद्यांत सांगितलें आहे.] २. वायूनें जसें रजःकण तृणें अथवा तूळ (कापुस) एकत्र होतात (संयोग पावति) अथवा भिन्न होतात (वियोग पावतात) तसें ईश्वरसत्ता ही भूतांतें संयुक्त अथवा वियुक्त करते, म्हणून मला दोष देणें अन्याय होय—असा भाव. ३. गवळ्याच्या स्वाधीन. ४. पिशाचें. ५. महादेवाच्या स्वाधीन. ६. चिंतेनें. ७. उत्तमविचारपर्वत. ८. बुद्धीनें. ९. प्रिय पुरुषाच्या विरहानें उत्पन्न झालेला ज्वर माझ्या शत्रूंना देखील स्वप्नांतही बाधूं नये असें मी महादेव व पार्वती यांजपाशीं मांगणें मागतों. १०. ज्वराग्नि. ११. माझ्या जीवरूप शुकाचें घर अशा कोमलतनु ज्या तुम्ही त्या तुमच्या हृदयास तो दवाग्नि (वणवा) पीडा देतो आणि मला मात्र पीडा देत नाहीं, असें जो म्हणणारा असेल त्याला पाहून व्रीडा लाजते. तो मनुष्य अत्यंत निर्लज्ज होय, लज्जेलासुद्धां असें म्हणणाराची लाज वाटते. सारांश विरहदुःख जसें तुम्हाला पीडा देतें तसेंच मलाही देतें असा भाव. १२. तुम्हाला मोठा लाभ झाला असें मीं खरेंच समजतों. खोटा नेणें=खरा जाणें. माझ्या ठिकाणीं तुमचें प्रेम अतिशयित झालें हा तुमचा तोटा झाला काय? हा खरोखर तोटा नव्हे, तर मोठा लाभच होय. १३. मोक्षप्राप्तीस; कैवल्यपदलाभास कारण (श्लोक ४४). १४. माझ्या घराच्या, माझ्या वसतीच्या. १५. मजवरील प्रेमानें. १६. परम कैवल्यपदाला. १७. शुद्धब्रह्मत्वप्राप्ति.

आदीं मध्यें अंतीं भूतांच्या[1] आंत आणि बाहेर, ।
वाहे रश्मि[2] जळ तसें, जग जें तें जोडिलेंचि माहेर.' ॥ ३७
विनविति गोपी जेव्हां विधिगुरु[3] तो आत्मतत्व[4] उपदेशी, ।
'दे[5] शीतांशुनखपदस्मृति[6] जरि भवसागरांत[7] कर देशी. ॥ ३८
भवगदवैद्य प्रभुजी! प्यालों विरहज्वरघ्न हा काढा,[8] ।
वाढाया वरि निजपदनलिनस्मृति शुद्धशर्करा काढा.[9] ॥ ३९
निजचरणस्मृतिहस्तीं[10] दासीजन हा दयानिधे! निरवीं ।
फिरवीं[11] शिरीं कर, स्मर खावो मांसें न आमुचीं हिरवीं.' ॥ ४०

---

## अध्याय त्र्यायशींवा.

गोपींवरि[12] करुनि दया तो भगवान् वृष्णिराज[13] सावरज्या[14] ।
धर्मसुतासहि[15] तारी, दे त्यांस[16] तसा रुचे जसा वर ज्या ॥ १

---

१. श्लोक ४५ वा यास अनुसरून हें वर्णन आहे. या संबंधानें 'हरिवरदा'कारांचें विवेचन पहा:— "म्हणे वो साजणी । सर्व भूतें मजपासूनी । यालागीं आदि मी त्यालागुनी । अंत:करणीं हें समजा ॥१॥ मजपासूनि भूतें झालीं । होऊनि परतीं कोठें गेलीं । मजमाजीच व्यवहारलीं। यास्तव बोली मध्य मी हे ॥२॥ मान पुरलिया पावती अंत । तेही मजमाजी होती निवान्त । स्वप्नद्रष्टा जेंवि जागृत । स्वप्न समस्त एकाकी ॥३॥ आदिमध्यान्तबहिरंतरीं । सर्व भूतीं निर्विकारी । यदर्थीं म्हणे गोपींतें हरी । ऐका सुन्दरी दृष्टान्त ॥४॥ जडें भौतिकें शरावादिकें । त्यांमाजि पंचभूतें व्यापकें । साद्यन्त सबाह्य जेंवि अचुकें । कदापि पृथकें नव्हती तीं ॥ ३ ॥ पृथ्वी शरावा कारण झाली । नाहीं पृथ्वीपणा मुकली । पृथ्वीमाजी व्यवहारली । अंतीं मिनली निजरूपा ॥ ६ ॥ तरंग झाला जळापोटीं । तरि काय जळासी पडली तुटी । व्यवहारला जळा पोटी । जळाचिये पोटीं सांठवला ॥ ७ ॥ तेंवि अंडजादि चारी खाणीं । माजि जितुक्या जीवश्रेणी । त्या माजि सबाह्य व्यापकपणीं । आदि निदानीं मी तैसा ॥८॥तयामाजि तुम्हासि प्राप्ती । विरह प्रेमें जाली संती। येथ शंका कराल चित्तीं । जे सर्वभूतीं सम कीं तूं ॥ ९ ॥" [श्लोक ४५ टीका.] २. रश्मि (सूर्यकिरण) जल (मृगजळास) वाहे (धारण करतो) तसें जग जें वाहे (जगतास जें आपल्या ठायीं धारण करतें तें परब्रह्म) तुम्हीं माहेर (आश्रयस्थान) जोडिलेंचि (संपादन केलेंत.) ३. विधीचा (ब्रह्मदेवाचा) गुरु (तात–विष्णु–कृष्ण.) ४. श्लोक ४७ पहा. ५. हें गोपी वचन आहे. ६. चद्रतुल्य नखें ज्याचीं अशा पदाची स्मृति. दे. ७. संसारसागरांत पडलेल्या जनाला हात (आश्रय)देशी (श्लो० ४८.) ८. कषाय. ९. बाहेर काढा.१०.तुझा चरणाचें स्मरण सदां या दासींला व्हावें, तें तुझें नामस्मरण आम्हां दासींला तारील— असा भाव. ११. आपला वरदहस्त आमच्या मस्तकावर ठेव, म्हणजे आम्हाला मदनबाधा होऊन आमच्या देहाला पीडा व्हावयाची नाहीं.१२.या अध्यायांत द्रौपदीला कृष्णभार्यांनीं स्वकरपरिग्रहाची (स्वविवाहाची) कथा सांगितली तिचें वर्णन आहे. १३. कृष्ण. १४. स+अवरज=सह+धाकटे बंधु (मागून जन्मास आलेलें). १५. यमधर्मपुत्राला (युधिष्ठिराला.) १६. राष्ट्र दुर्ग कोश सेना इत्यादि नृपसचिववधूदासदासी यांना त्यांच्या मनाप्रमाणें देता झाला.

यदुकुरुभार्या कुशल[1]प्रश्नालिंगन करूनियां बसती, ।
हरियश गातां पळे[2]विति कोकिलशुकसारिकांसि लांब सती. ॥ २
श्रीमद्रुक्मिण्यादिप्रभुपत्नीतें अजातरिपु[3]भार्या ।
प्रश्न करि प्रेमें जें[4] मित्र नै[5]नांदा प्रिया सखी आर्या. ॥ ३
'हे वै[6]दर्भि! स्वमुखें स्वविवाहोत्सवकथा मला सांगें, ।
कैसें वरिलें तुजला श्रीकृष्णें दीनवत्सलें आंगें? ॥ ४
भा[7]मे! या[8] मेघानें कैसें सौदा[9]मिनीस तुज वरिलें? ।
हे जां[10]बवंती! त्वत्[11]करसरसिज कैसें रमाधवें धरिलें? ॥ ५
कालिंदि! मित्रविंदे! सत्ये! भद्रे! वदा सदाधारा[12] ।
या रा[13]कानाथासीं योग कशा पावलां तुम्ही तारा? ॥ ६
वद लक्ष्मणे! स्वयंवरवृत्त मज स्व[14]जनकल्पवृक्षातें ।
वरिलें कैसें लतिके! सति! केतकवर्णि! या स[15]दृक्षातें? ॥ ७
सर्वांहीं सांगावे स्व[16]करग्रहणोत्सव स्वयें सर्वा ।
पर्वा आलां, तृषिता द्या अमृत, त्यजुत चंद्रि[17]का गर्वा.' ॥ ८
प्रथम म्हणे वैदर्भी, 'बा[18]ई! होतें लहान मी कन्या, ।
धन्या कृष्णकथा मज तेव्हांचि रुचे, न आवडे अन्या. ॥ ९

---

१. "क्षेमालिंगन परस्परें । जालीं स्वागत प्रश्नोत्तरें । हरिचरिताच्या श्रवणादरें । करिती आदरें सुखचर्चा ॥ ७४ ॥ तेथ द्रौपदी श्रीकृष्णभगिनी । हरिवनितांसि ज्येष्ठ रुक्मिणी । नणदा भावजया मिळोनी । हरिगुणकथनीं प्रवर्तल्या ॥ ७५ ॥ [श्रीहरिवरदा.] २. गोड गाण्यानें. कोकिलादिकांस लाजविलें असा भाव. ३. अजात+रिपु+भार्या=अनुत्पन्न+शत्रु+पत्नी=ज्याला रिपु उत्पन्न झाला नाहीं असा जो धर्मराजा त्याची पत्नी=द्रौपदी. ४. 'जें मित्र' हा नपुंसकलिंगी प्रयोग संस्कृतास अनुसरून आहे. [पृ० १८९ टीप १० पहा.] ५. नणंद. ६. रुक्मिणि! ७. हे सत्यभामे! ८. कृष्णरूप जलदानें. ९. विद्युल्लतेस. १०. श्लोक ६-७ पहा. ११. तुझें करकमल (सरसिज=कमळ.) १२. सत्+आधारा=साधुजन+आश्रयभूत अशा. १३. राका+नाथ=पौर्णिमा+पति=चंद्र. १४. स्वभक्तांचा कल्पतरु जो भगवान् कृष्ण त्यातें. १५. अनुरूपातें. १६. निजपाणिग्रहणाचे (विवाहाचा.) उत्सव. १७. चंद्रिकांना तुमचें कथामृत पाहून आपला अमृतमयकरगर्व टाकण्याची पाळी येवो, तुमचें विवाहकथामृत चंद्रकरामृतास तुच्छ करो. १८. मूळांत वैदर्भीकथा एकाच श्लोकांत आटपली आहे. (श्लो० ८) परंतु त्या एका श्लोकाच्या स्थानीं पंतांनीं अनेक आर्या योजून विवाहकथा विस्तृत वर्णिली आहे, यावरून व या अध्यायांतील इतर वर्णनांवरून पंत हे प्रसंगानुरूप कथेचा संक्षेप अथवा विस्तार करीत असत—असें म्हणणें सयुक्तिक दिसतें. त्यांना कथासंक्षेप जसा आवडे तसाच कथाविस्तारही आवडे—असें विधान करण्यास कांहींएक हरकत दिसत नाहीं.

भद्भगवक्त ब्राह्मण जे येती [1]मत्पित्याच्चिया गेहा, ।
ते [2]हारि हरियशोमृत पाजिति, तें मात्र चालवी देहा. ॥ १०
सेवाया अमृतमधुर निर्मळ पुष्कळ मुकुंदयश धन्य ।
[3]स्तन्य त्यागुनि धांवें, काय मनाला रुचेल मग अन्य? ॥ ११
हरिगुणगायक सज्जन ते धनलोभी नव्हेत, परि [4]हार ।
मुद्रा कंकण द्यावें, न करिति माता पिताहि [5]परिहार. ॥ १२
ज्या दिवशीं हरिचरितश्रवण नसे त्यांत मज दहा दुखणीं, ।
[6]दुखणी काय नवखणी माडी नलगे, धरा [7]नखेंदु खणी. ॥ १३
पितृसदनीं मी वाढें, जैसी तैसीच मन्मनीं [8]प्रीती, ।
रीति प्रेक्षुनि ऐसी ‘दैव बळी’ म्हणति तेचि जन भीती. ॥ १४
श्रीकृष्णाला द्यावी, श्रीरामा जानकी तसी [9]दुहिता, ।
ऐसी गुरुबुद्धीनीं केली बाई! [10]विचारणा [11]सुहिता. ॥ १५
कृष्णीं माझें अर्पण चित्ता आलेंचि [12]साधुभावांच्या, ।
कृष्णगुणीं [13]श्रुत्यर्पण ये जेंवि मनास [14]सत्स्वभावांच्या. ॥ १६
रुक्मी माझा दादा जो आम्हां [15]साजणांमधें मोठा, ।
खोटा नव्हेचि, परि हरिचरितरसीं तो भिजे न, [16]मणिगोटा. ॥ १७
त्या [17]स्वगुरुविचारातें निंदुनियां, मोहरोग[18]वैद्यातें, ।
मजला देऊं केलें दादानें हठ धरूनि [19]चैद्यातें. ॥ १८

---

१. माझ्या बापाच्या घरीं (कुंडिनपुर येथें.) २. मनोहर. ३. दूध. ४. हार इत्यादि भूषणें हरिगुणगायकांला द्यावीं. ५. प्रतिषेध, निषेध. मीं विप्रांस अलंकार देत असें व माझीं मातापितरें विप्रांस अलंकार देऊं नको असा कधीं निषेध करीत नसत. ६. दुमजली दोन खणाची अथवा नऊ खणांची माडी मला नकोशी असे. ७. नखेंदु धरा (भूमि) खणी=उकरी. (हें दुःखाचें लक्षण.) ८. माझ्या मनांत प्रीति (वाढे.) ९. कन्या. १०. मसलत, योजना. ११. उचित, योग्य, उत्तम हित करणारी अशी. १२. साधु+भावांच्या=उत्तमशील+सहोदरांच्या, बंधूंच्या=उत्तम स्वभावाचे जे भाऊ होते त्यांच्या. १३. श्रुति+अर्पण=कान+देणें. सावधानपणें ऐकणें. १४. सत्+स्वभावांच्या=उत्तम+आचरणांच्या=ज्याचा स्वभाव साधा, उत्तम, आहे अशा जनांच्या. १५. सहाजणांमध्यें; भीष्मकराजाला पांच पुत्र व एक कन्या (रुक्मिणी) अशीं सहा अपत्यें होतीं, त्यांत रुक्मी हा ज्येष्ठ. रुक्मरथ, रुक्मबाहु, रुक्मकेश, आणि रुक्ममाली हे त्याचे धाकटे बंधु होत. या चौघांस रुक्मिणीला कृष्ण पति असावा ही गोष्ट रुचली होती. १६. रत्न परंतु दगड. १७. आपल्या बापाच्या योजनेला. १८. मोह (अज्ञान) रोग (व्याधि) त्याचा निरास करणारा वैद्य जो कृष्ण त्यातें. १९. शिशुपाळातें.

केला लग्नाचाही निश्चय, चै[1]द्यासि धाडिलें मूं[2]ळ, ।
गूळ क्ष्वेडेचि वाटे, मज तातविचार होय पांगूळ. ॥ १९
न चले कांहीं तेथें जननीचें, बंधुचें, स्व[3]ताताचें, ।
होय ल[4]वांत दहादां फळ इष्ट अनिष्ट आ[5]त्मघाताचें. ॥ २०
[6]आधिसमुद्रीं बुडतां दे क[7]र एक प्रियासखी बुद्धी, ।
मजवरि ती बहुसदया हरिकीर्तिसुधाब्धिलब्धसंशुद्धी. ॥ २१
एक ब्रा[8]ह्मण केवळ साधु दयामूर्ति तत्पदीं नमनें ।
केलीं पाय धरुनि म्यां, एकांतीं विनविला सुदीनमनें. ॥ २२
कां तो द्रवता, माझा असता जरि भा[9]व पाहिला खोटा? ।
जेणें अभयवर दिला, त्या गुरुहस्तांत म्यांहि ला[10]खोटा. ॥ २३
स्वकरें **‘वसंततिलका’**[11]वृत्तें पत्रांत सात मोजूनी, ।
लिहिलीं होतीं तींही लिहितां लिहितां क्षणांत योजूनी. ॥ २४
काय ल्याहावें म्यां सखि! ज्याचे संपूर्ण वेद नि[12]श्वास, ।
वि[13]श्वास ज्ञानप्रद परि माझा हरिपदींच वि[14]श्वास. ॥ २५
गेला धांवत घेउनि मत्पत्र द्वारकेस सद्विप्र, ।
या प्र[15]णतवत्सलाला आणाया आण घालुनि क्षिप्र. ॥ २६

---

१. बोलाविण्यासाठीं मनुष्य. २. विषच. ३. भीष्मकराजाचें रुक्मीपुढें कांहीं चालेना. ४. अल्प काळांत, निमिषार्धांत. ५. आत्मघात करणें ही गोष्ट एका लवांत (पळांत) दहादां (अनेकवेळा) इष्ट आणि अनिष्ट अशी वाटे. ६. मनश्चिन्तासागरांत. ७. कर दे=हात दे, आश्रय दे. ८. सुदेव नामक ब्राह्मण. ९. कृष्णावरचा प्रेमभाव. १०. लाखोटा दिला—असा अन्वय लावावा. ११. ‘वसंततिलका’ हें वृत्ताचें नांव आहे. याचें लक्षण:—‘उक्ता वसंततिलका तभजा जगौगः’ [वृत्तरत्नाकर ३. ७९] याचें लक्षण अन्य ग्रंथांत असें आहे:—‘‘वसंततिलका प्रोक्ता तभजा जगगा यदि । न वा पादेऽपि विरतिः सप्तसप्ताक्षरैर्मता.’’ ।। [मन्दारमरन्दचम्पू—वृत्तबिन्दु-१४] या वृत्ताला काश्यप गोमानस आणि रामकीर्ति हे सिंहोद्धता, मधुमाधवी आणि चेतोहिता असें यथानुक्रम नांव देतात. [मन्दारमरन्दचंपू-टीका]. रुक्मिणीनें ‘श्रुत्वा गुणान्भुवनसुंदर’ इत्यादि सप्तश्लोकी लिहून ती सुदेव नामक एका चतुर विप्राच्या हस्तें श्रीकृष्णाकडे पाठवून आपला मनोगतार्थ त्यास कळविला, आणि तो साध्य न झाला असतां आपला प्राणार्पण करण्याचा दृढ निश्चय त्यास जाणविला, असें वर्णन या प्रकरणांत आहे. म्हणून याला ‘रुक्मिणीपत्रिका’ म्हणजे ‘रुक्मिणीनें श्रीकृष्णास धाडलेली पत्रिका’ असें नांव दिलेलें आढळतें. १२. वेद हा ईश्वराचा निश्वास असें वर्णन प्राचीन ग्रंथांत आढळतें. पुढील श्लोक पहा:—‘यस्य निश्वसितं वेदा वेदेभ्यो योऽखिलं जगत् । निर्ममे तमहं वन्दे विद्यातीर्थं महेश्वरम्.’ ॥ पंतांनीं ही असेंच वर्णन अन्यत्र केलें आहे:—‘निश्वास वेद ज्याचे [रामरीति—गी० ३] ‘ज्याचे निश्वास सर्वही वेद’ [द्वितीय शिवरामायण—गी० ५१ काव्यसंग्रह—रामायणें—भाग २ पृ० ९५.] १३. जगास. १४. भरंवसा. १५. शरणागतांविषयीं दयाळु अशा.

तों आला [1]शाल्वमगधपतिसख तो चैद्य, मांडलें लग्न, ।
झालें पुर [2]तद्बलजलनिधींत, [3]आधींत मन्मनहि, मग्न. ॥ २७
तांतडि बहु दादाची, कैचा अवकाश? लागली हळद, ।
[4]खलदर्पघ्न दिसेना, जो [5]नतचातकदयासुधाजलद. ॥ २८
[6]गरलविलेपन वाटे, लाविति अंगांस जी [7]हरिद्रा तें, ।
सखि! [8]सुकृपणकृत [9]शुष्कोपचरण निववील कसें दरिद्रातें? ॥ २९
त्या कुंडनीं समुत्सव [10]वांढे, माझ्या मनीं [11]असुखशैल, ।
होय सखींत [12]मदुक्तें अश्रुप्रति हेतु बापुडें तैल[13] ॥ ३०
शतदां [14]ध्वजाचि झाल्यें प्रासादशिरीं [15]पुरेक्षणच्छद्में, ।
द्वारवतीपथ पाहति नयनें, [16]हरिदिङ्मुखा जसीं पद्में. ॥ ३१
घटिकार्धपादपललवकालस्थैर्यार्थ विनविला मित्र[17], ।
चित्र प्रियसखि! झालें रथ नो[18]वरि निमिषही कसा मित्र[19]? ॥ ३२
परि मज गमलें गेला धांवत मत्ताप हरिस कळवाया ।
[20]अन्वर्थनामधेय ब्रह्मण्यप्रभुमनास वळवाया. ॥ ३३
आली रात्रि, [21]सुगात्रि! द्रौपदि! अवकाश तीच [22]लग्नासी, ।
झाली [23]यष्टी कष्टी जें मन [24]त्यां आधिभा[25]रभग्नासी. ॥ ३४

---

१. शाल्वाचा आणि मगधपतिचा मित्र (चैद्य=शिशुपाल). २. त्या चैद्याच्या सैन्यरूप सागरांत. ३. मानसिक चिंतेंत. ४. खल+दर्प+घ्न=दुष्टजन+गर्व+नाशक=दुष्टांचा गर्व नाश करणारा (कृष्ण.) ५. नम्रजनरूप जे चातक पक्षी त्यांला दयारूप अमृताचा मेघ. ६. विषाचा लेप, विष आंगास चोपटणें. ७. हळद आंगाला लावणें हें विषलेपन वाटे. ८. अतिकृपणानें केलेला. ९. कोरडा उपचार. १०. 'वाढे' या क्रियेची योजना काकाक्षिगोलकन्यायानें उभयचरणाकडे केली पाहिजे. ११. असुख+शैल=दुःख+पर्वत. १२. माझ्या भाषणानें. १३. माझ्या भाषणानें माझ्या मैत्रिणी रडूं लागल्या, पण त्यांच्या अश्रुपातास तैल हें बाह्य कारण झालें, खरें कारण माझी दुःस्थिति होय. १४. ध्वजाप्रमाणें वर चढून गेलें. १५. पुर पाहण्याच्या मिषानें. १६. कृष्ण येण्याच्या मार्गाकडे; (कमलपक्षीं) पूर्व दिशेकडे. हरि+दिक्+मुख=इंद्र+दिशा+मुख=पूर्व दिशेच्या मुखा (सूर्योदयाच्या समयीं) जशीं पद्में (कमळें) पाहती. १७. सूर्य. ["मित्रं सुहृदि न द्वयोः । सूर्ये पुंसि स्त्रियां गंधद्रव्ये दैत्यान्तरे पुमान्' इति मेदिनी.] १८. आंवरीना, थांबवीना, एक सारखा चालवी. १९. सुहृत्. २०. यथार्थनामधारी. २१. हे सुंदरि. २२. लग्नाला तेवढीच रात्र कायतो अवकाश होता. दुसऱ्या दिवसीं लग्न व्हावयाचें होतें. लग्नाला एकरात्र अवकाश होता. २३. आधारार्थ काठी. २४. जें कष्टी मन त्या आधिभारभग्नासी (मनासी) [ती रात्री] यष्टी झाली. दुःखित असें जें माझें मन (जें चिंताभारानें आधींच भग्न झालें होतें) त्याला ती रात्र आधार देणारी काठी झाली. त्या रात्रीस लग्न होणार नाहीं अशी मनाची खात्री असल्यामुळें ती रात्र माझ्या मनाला थोडासा धीर देती झाली. २५. दुःखभरानें भग्न जें मन त्यास.

चिंताज्वरांत रात्रौ[1] माझा नाहींच लागला डोळा,[2] ।
जायासाठीं कंठीं शतवार प्राण जाहले गोळा. ॥ ३५
लावियला म्यां दुःखीं बाई! त्या ईश्वरासही बोलें,[3] ।
यत्पदपद्मरजाचें[4] चिंतामणिकोटिही[5] न्हे मोल. ॥ ३६
निजदासवासरांला[6] बहु पाजुनिही दयादुधास[7] रिते ।
न्हति गुणस्तन जीचे,[8] गणिलें अतिकठिण त्या सुधासरिते.[9] ! ॥ ३७
वत्स क्षुद्विकळ[10] रडे झोंबे जरि माय कंचुकी[11] सोडी, ।
गोडी आपुलि पानीं नुमजे, दानीं तिची[12] म्हणे थोडी. ॥ ३८
ब्राह्मण[13] अलस[14] प्रणतीं, देव उदासीन, नियतिमन खोटें, ।
शिव अदय[15] गमे, त्यांचीं फुगलीं असतील हांसतां पोटें. ॥ ३९
तों प्रियकंठीं[16] आपण पडोन, [17]हेही सुखांत पाडावी, ।

---

१. रात्रीच्या समयीं. (रात्रौ—हें सप्तमीचें एकवचन). २. या पद्यांत पंतानीं रुक्मिणीची स्थिति हुबेहुब चितारली आहे. ३. बोल लावणें=दोष लावणें, टपका लावणें—ठेवणें. ४. ज्याच्या चरणकमलधुलीचें. ५. चिंतामणिरत्नासारखीं कोटि रत्नेंही. ६. आपला भक्त हा स्ववत्स त्याला. ७. स्वभक्तरूप वत्साला दयारूप दूध पाजूनही जिचे गुणस्तन रिकामे होत नाहींत अशी जी सुधासरिता तिला अतिनिर्दय असें मानिलें! ८. ज्या सुधासरितेचे. ९. अमृताची सरिता, कामधेनुरूप कृष्णमूर्ति तिला. १०. क्षुधेनें व्याकुळ झालेला. ११. जरी आई चोळी सोडून मुलाला दूध देते, तरी भुकेनें व्याकुळ झालेलें मुल अधिकाधिक रडतें आणि दूध पिण्यासाठीं स्तनाला झोंबते. १२. पानीं आपुलि गोडी नुमजे, तिची (मातेची) [स्तन्य]दानीं गोडी थोडी म्हणे—असा अन्वय. दूध पिण्याविषयीं आपली ग्रहणशक्ति तें मूल जाणत नाहीं, असें असूनही आई दूध पाजण्यास कसूर करते असें म्हणतें. १३. 'अलस द्विज विधि खल हरि, नतीं उदासीन नियतिमन खोटें' असा अन्य पाठ आहे. १४. ब्राह्मण अलस प्रणतीं=शरणागताविषयीं ब्राह्मण आळशी असतात, तेव्हां त्यांच्या हातून माझ्या कार्यसिद्धिस मदत होण्याची आशा कायशी आहे? देव उदासीन=कृष्ण उदासीन आहे म्हणून तो मलाच वरील अशी आशा कशी धरावी? नियतिमन खोटें=नशीबाचें मन खोटें आहे, नशीबाला मनच नाहीं, म्हणून त्याची आशा धरणें व्यर्थच! शिव अदय गमे=ईश्वर मोठा निठुर आहे, जेथें दया करणें योग्य त्यास्थळीं त्या शिवाची निर्दयताच आढळते—म्हणून त्या शिवाचा तरी कांहीं उपयोग मला होईल अशी आशा बाळगणें व्यर्थच. इतकी निराशा असतांही या सर्वांवर भरंवसा ठेवून मी आहे असें पाहून त्या प्रेक्षकाचीं पोटें [माझ्या मूर्खपणा मनांत येऊन] हसतांना फुगलीं असतील. ज्यांवर भरंवसा ठेवूं नये त्यांवरच मी पक्का भरंवसा ठेवून आहे म्हणून मी लोकांच्या उपहासास पात्र झाल्यें असेन. १५. 'शिव! शिव! अदयें त्यांचीं' असा अन्य पाठ आहे. १६. पतीच्या कंठांत. १७. रुक्मिणीही.

या भावेंचि स्फुरली[1], करि माझी भुजलता कृपा डावी. ॥ ४०
नेत्रभुजोरुस्फुरणें[2] चिंतेची सोडिली मनें बाज[3], ।
मांज[4] प्राणांनींही, गेल्या धैर्येंहि[5] यावया लाज. ॥ ४१
तोंचि समूलाधिज्वरहरमात्रा[6] आणुनी, उषःकाळीं[7] ।
आला द्विज धन्वंतरि[8], सदय पिताही तैसा[9] नसे बांळीं[10]. ॥ ४२
आधीं विप्रमुखश्री कळवी येतांचि माधवागमन, ।
मग मुनि सांगे मज, तों 'ऊठ' म्हणे 'गुरुपदास लाग' मनें[11]. ॥ ४३
द्यावें काय तयास[12]? प्रत्युपकारार्ह[13] तों नसे वस्तु, ।
स्वस्तुत्यादर[14] न गुरुसि[15] मन सांगे, तेंचि मी म्हणे 'अस्तु[16]'. ॥ ४४

---

१. डावी भुजलता स्फुरली=डावा बाहु स्फुरण पावला. सव्यनेत्राचें अथवा सव्य बाहूचें स्फुरण झाल्यास स्त्रियांची इष्टकार्यसिद्धि होते असें ग्रंथांतरीं वर्णन आहे. यास आधारः-(१) 'वामभागस्तु नारीणां श्रेष्ठः पुंसां तु दक्षिणः । दाने देवादिपूजायां स्पंदे कुंकरणेऽपि च ॥' [इति निमित्तनिदाने], (२) 'अंगविस्फुरणं नृणां दक्षिणं सर्वकामदम् । तदेव शस्यते सद्भिर्नारीणामप्रदक्षिणम् ॥', (३) 'दृगंतमध्ये स्फुरणेऽर्थसंपत् सोत्कंठता स्यात्स्फुरिते च कर्णे । पुंसां सदा दक्षिणदेहभागे स्त्रीणां तु वामावयवे प्रजातः ॥ स्पंदः फलानि प्रदिशत्यवश्यं । निहंत्यनुक्तांगविपर्ययेण' इति वसंतराजः. या उताऱ्यावरून असें निष्पन्न होतें कीं, स्त्रियांचें दक्षिणाक्षिस्फुरण (उजवा डोळा लवणें) अशुभसूचक आहे आणि वामाक्षिस्फुरण (डावा डोळा लवणें) शुभसूचक आहे. या शकुनांविषयीं विशेष माहिती बृहत्संहिता—अध्याय ८६-८८-९० यांत आणि मुहूर्तमाला—यात्राप्रकरण श्लो० ९६-१०५ यांत पहावी. २. नेत्र+भुज+ऊरु+स्फुरणें=डोळे+बाहु+मांड्या+स्फुरणानें. ३. चिंतारूप बाजेवर मन निजलें होतें ती बाज. ४. निघून जाण्याकरितां प्राणांनीं माज म्हणजे कंबर बांधली होती ती सोडली. ५. धैर्य गेलें होतें त्यानें परत येण्यास लाज सोडली म्हणजे धैर्य परत आलें. ६. समूळ+आधि+ज्वर+हर+मात्रा=मूळासह+व्याधि+ताप+हरण करणारी+औषधी=मुळासहवर्त्तमान मनोव्यथा ज्वराला हरण करणारी, सर्व प्रकारच्या व्याधींना व तापाला हरण करणारी मात्रा (श्रीकृष्णरूप मात्रा). ७.प्रातःकाळीं ८. वैद्य. ९. हें 'व्यतिरेक' नामक अलंकाराचें उदाहरण आहे. १०. मुलाच्या ठिकाणीं. ११. मन म्हणें, 'उठ, गुरुपदाला (तातचरणाला) लाग'=उठून बापाच्या चरणाला वंदन कर—असें तेव्हां मन सांगे. १२. त्या सुदेव विप्राला. १३. प्रत्युपकार करण्यास योग्य—केलेला उपकार फेडण्यास समर्थ असें (वस्तु). १४. स्व+स्तुति+आदर=आपण केलेल्या स्तुतिचा आदर. १५. गुरुसि स्वस्तुत्यादर न [असें] मन सांगे=गुरुला स्वप्रशंसेची गोडी—प्रीति—नाहीं असें माझें मन मला सांगे, सुदेवाला स्तुतीची आवड नाहीं असें समजून माझें मन त्याची स्तुति करण्यास प्रवृत्त झालें नाहीं. तोंचि मी म्हणे 'अस्तु' 'अस्तु'=जें माझें मन मला सांगे तें तसें असो असें मीं म्हटलें, तें मी मान्य केलें व स्तुति केली नाहीं. मी त्या विप्राला कांहीं दिलें नाहीं व त्याची स्तुतिही केली नाहीं, परंतु शिरःकमल त्याच्या चरणीं वाहिलें. १६. असो.

[1]अश्रुजलप्रक्षालितगुरुचरणीं वाहिलें शिर:कमल, ।
वरि ढाळिलें [2]निजालकचामर; मग कां उरेल शोकमल? ॥ ४५
[3]प्रणतक्लेश हरावे, दुसरी गुरुच्या नसे मनांत रुची, ।
[4]पादोपासककामापूर्त्यर्थ स्थिति सुरांचिया तरुची. ॥ ४६
विप्रें कथिलें मज कीं, 'वत्से! लिहिलेसि उत्तम श्लोक, ।
ज्यांच्या अर्थश्रवणें आला धांवोनि, [5]उत्तमश्लोक.' ॥ ४७
कोणालाहि न पुसतां, स्वरथीं द्विज बैसवून सूतातें ।
'हूं, कुंडिनमार्ग' म्हणे, प्रभुवाक्य कथी दया [6]प्रभूता [7]तें. ॥ ४८
एका रात्रींतचि ये, मध्यें ते देश काय हो! थोडे? ।
जोडे त्याले [8]पविचे, कीं बाई! वायुमित्र ते घोडे. ॥ ४९
[9]भावोजींला कळतां तेही सहसैन्य धांवले आले, ।
झाले एक [10]मरुदनल, लोकांचें काय त्यांपुढें चाले? ॥ ५०
आले प्रभु, हें कळतां सामोरा शीघ्र धांवला बाप, ।
हा [11]पर्जन्यप्रियसख [12]शिखि सुख सेवी, उरेचिना ताप. ॥ ५१
तातें पूजा केली, गेली चिंता विलोकितां [13]नखरें, ।
प्रणतांचें तापत्रय हरि, [14]हरिपदनीरुहवितान खरें. ॥ ५२
[15]कृष्णागमनानंदें हृदयांतुनि [16]ज्यां बळेंचि घालविलें, ।
[17]चैद्यादिमनें द्याया स्थळ त्यां चिंतादिकांसि [18]पालविलें. ॥ ५३
[19]मित्रोदयभीततमा आश्रय देणें जसा [20]बिळीं लागे, ।
[21]प्रभुभीतास्मत्तापा [22]चैद्याद्याश्रय तसा मिळाला गे!. ॥ ५४
अंबेच्या नमनाला न्यावी जीचा विवाह नवरी ती, ।
धरि हरिशंका दादा, देवीयात्रा कुलीं न नव रीती. ॥ ५५

---

१. आंसवांच्या पाण्यानें धुतलेल्या विप्रपादावर. २. निज+अलक+चामर=आपले केश हीच चवरी ती. ३. शरणागताचे श्रम. ४. पाद+उपासक+काम+आपूर्ति+अर्थ=चरण+भजक+मनोरथ+सफलता+साठीं=चरण सेवा करणाऱ्यांच्या मनोरथाची पूर्ती करण्यासाठीं (सुरांचियां तरुची=कल्पवृक्षाची स्थिति आहे.) ५. उत्तम आहे कीर्ति यश (श्लोक) ज्याची तो. (कृष्ण.) 'पद्ये यशसिच श्लोक:' इत्यमर: ६. पुष्कळ. ७. तें प्रभुवाक्य दया प्रभूता असें कथी (सुचवी.) ८. वज्राचे. ९. बलरामाला. १०. मरुद्+अनल=वायु+वन्हि. ११. पर्जन्य आहे आवडता मित्र ज्याचा असा. १२. मोर. १३. पादनखें. १४. हरीचें पदकमलरूप (छाया करणारें) आच्छादन. १५. कृष्णाच्या आगमनाच्या आनंदानें. १६. ज्या चिंतादिकांस. १७. चैद्यादिकांच्या मनानें. १८. बोलाविलें. १९. सूर्योदय पाहून भ्यालेल्या अंधकारास. २०. गुहेला. २१. कृष्णापासून भ्यालेल्या आमच्या संतापाला. २२. चैद्य+आदि+आश्रय=शिशुपाळ+प्रभृति+स्थान.

मग बाई! दादाचे मागधशाल्वादिकांहि मेल्यांचे[1] ।
सैनिक[2] मज रक्षाया आले, धाकें विरोनि[3] गेल्यांचे. ॥ ५६
हस्तीं शस्त्रें, दंशित[4], रथतुरगगजाधिरूढ ते कोले ।
ओले वरि वीररसें, वीरश्री केंवि त्यांसवें बोले? ॥ ५७
स्वसखीधात्रीजननीविप्रस्त्री मंडळी न ती पेटी[5], ।
तींत मणी[6] मी नेलें शुभविधिनें[7] श्रीशिवेचिये भेटी[8]. ॥ ५८
नमिलीं श्रीपदपद्में जीं मधुपां[9] देति आंसरा[10] जीवां, ।
गंगेच्याहि[11] नसे ती मृदुता न श्री न वास राजीवां[12]. ॥ ५९
पूजुनि पाय विनविली[13], 'कन्यांतें प्रसवताति ज्या माता ।
त्या लटिक्या, तूंचि खरी, तुज कृष्णचि योग्य होय जामाता[14]. ॥ ६०
हीं तुझीं कीं हरिचीं पदपद्में सेव्य म्हणुनि, देहा तीं ।
स्वीकारुत, दयेनें तूंचि मला शौरिच्याचि दे हातीं[15].' ॥ ६१
ऐसें प्रार्थित होतें चित्तांतचि मी अशांत विप्रसती[16] ।
'फलितं[17] सर्वं' म्हणती, पूजा सांगों समीप ज्या असती. ॥ ६२
सर्वसतीपूजा म्यां केली, घेऊनि तत्प्रसादाशी[18], ।
दासी हरिची, परि पळ झाल्यें भटमीनमंडळा[19] दाशी[20]. ॥ ६३
देवीप्रासादांतुनि[21] निघतां घाया करासि आलीला[22] ।
आलीला[23] धरुनि करीं दाखविली त्या गतींत[24] आलीला[25]. ॥ ६४

१. हें भाषण व अशाच प्रकारचीं अन्य भाषणें हीं पंताच्या मार्मिकपणाची द्योतक होत. पात्राच्या स्वभावाला अनुरूप भाषा योजून त्याचा प्रकृतिविशेष स्पष्ट करणें हा गुण पंताच्या काव्यांत आढळतो. २. शिपाई—वीर. ३. पळून, नाहींसे होऊन धाकानें नष्टधैर्य झालेल्या दादादिकांचे. ४. सिद्ध, कवच धारण केलेले. ५. संदूक. ६. रत्नकला. ७. सुदैवानें, मंगलविधिनें. ८. देवीच्या दर्शनास. ९. जीव हेच मधुप (भ्रमर) त्यांस. १०. आश्रय, थारा. ११. श्रीपादपद्मांत जी मृदुता (मार्दव—कोमलता) असे ती गंगेच्या राजीवांत (कमलांत) नाहीं. तसेंच त्याची श्री (शोभा [व] वास (सुगंध—परिमल) हींही गंगेच्या कमलांत नाहींत, सारांश श्रीपदपद्माला गंगेच्या कमलाची उपमा शोभणार नाहीं. १२. गंगेंतील कमलांस. १३. श्रीदेवी प्रार्थिली. १४. जांवई. १५. तूंच माझें कन्यादान कर—असा भाव. १६. ब्राह्मणपत्नी. १७. मनोरथपरिपूर्ति असो. 'फलेन फलितं सर्वम्' अशा पूजामंत्रानें. १८. तत्+प्रसाद+आशी=तिचा प्रसाद आणि आशीर्वाद. १९. रक्षक योद्धे हेच मीन (मत्स्य) त्यांच्या समुदायास. २०. धीवरी, कोळीण, ढीवरीण. २१. देवीच्या देवळांतून. २२. आलेलीला. २३. सखीला. २४. त्या प्रसंगीं चालतेवेळीं थोडी लीला प्रकट केली. २५. आ+लीला=ईषत् (किंचित्)+लीला=किंचित् लीला. ['आ' याचे अर्थ अनेक आहेत. 'आङीषदर्थेऽभिव्याप्तौ सीमार्थे धातुयोग जे' इत्यमरः]

अवलोकनांत[1] माझ्या नसती जरि साजणी! कृपा मरते, ।
खड्ग प्रथम मग क्षितिपृष्ठीं पडले गळोनि पामर[2] ते. ॥ ६५
त्या मेल्यांस कशाला पाहों मी? प्रियतमास अवलोकीं, ।
कीं आला कीं नाहीं, होय तडित्स्फुरण[3] काय तवँ[4] लोकीं? ॥ ६६
ऐतां[5] ऐसें नाहीं, हें कां जातांचि[6] जाहलें साचें? ।
याचें कारण बाई! मी पात्र शिवाकृपाकटाक्षाचें[7]. ॥ ६७
पत्रीं लिहिलें होतें 'देवीयात्रेंत मज पदें दावा[8],' ।
दावा[9] बहुतांसीं हा भाव कळों दुर्जनासि नेदावा[10]. ॥ ६८
नयनावरि येति सये! नलिनीवरि[11] भृंगबालिसे[12] बाल[13], ।
त्यांसि[14] म्हणे, 'साधु कसे? पूजिन जरि काय गाल[15] सेवाल'? ॥ ६९
प्रभुसि पहाया पूर्वींपासूनि मन्नेत्रपद्म[16] बहु लोल[17], ।
तो लग्नसमय ते उपवासहि लावील कोण सखि! बोल.? ॥ ७०
तों आला हरि[18], सुंदरि! जोडा नाहींच त्या महा[19], भांगा[20] ।
आपुलिया ध्याया, ते कोले वारिति कसे महाभागा[21]? ॥ ७१
हरि रवि, मी नलिनी[22], स्त्री कैरविणी, वीर वायसाराती[23], ।
आनंदाची वेळा सांगों तुज साध्वि! काय सारा[24] ती? ॥ ७२
माझा मूर्त मनोरथ तो रथ आला प्रियास घेऊन, ।
दर्शन नयनें घेती, जैसें शिशिरीं[25] दरिद्र घे ऊन. ॥ ७३

---

१. मीं अवलोकन करतांच, त्यांचे खड्ग प्रथम खालीं पडलें, नंतर ते दुष्टही जमिनीवर पडले. हे साजणी! सखि द्रौपदि! माझ्या अवेलाकनांत जर कृपा (दया) नसती (मी जर प्रखर दृष्टीनें पाहिलें असतें तर) तर ते तेंव्हांच मरण पावले असते. २. नीच. "विवर्णः पामरो नीचः प्राकृतश्च पृथग्जनः" इत्यमरः] पामर=पामानं रातीति पामरः । यद्वा पा धर्म म्रियते येन स पामरः । ३. तडित्+स्फुरण= विजेचें चमकणें. ४. तों, त्यासमयीं. ५. देवळांत येतांना तडित्स्फुरण झालें नाहीं. ६. बाहेर जातांनाचि. ७. शिवेच्या (देवीच्या) सदय प्रेक्षणाचें. ८. दाखवा. ९. वैर. १०. कळूं न द्यावा ११. कमलावर. १२. लहान भ्रमरसे. १३. केश. १४. त्या बालांनां (केशांना.) १५. नयनावर न येतां गालांवर याल तर हे केश हो! तुमची पूजा करीन, माझ्या डोळ्यांवर येऊन दृष्टी बंद करूं नका—असें तात्पर्य. १६. माझे नेत्रकमल. १७. चंचल. १८. सिंह; (पक्षीं) कृष्ण. १९. उत्सवास. ['महस्तूत्सवतेजसोः' इत्यमरः] २०. वांद्याला. २१. महानुभावा श्रीकृष्णा. २२. बिसिनी पद्मिनी. २३. वायस+अराति=काक+शत्रु=घुबडपक्षी. ['उलूके तु वायसारातिपेचकौ' इत्यमरः]. २४. श्रेष्ठा. २५. थंडीच्या दिवसीं.

तों आलि[1] म्हणे मज, 'सखि! सुमनोमाला[2] वरा[3] वहायास, ।
हा यासमयीं विधि, मग नित्य असेचि प्रिया पहायास'. ॥ ७४
माळा ऊचलितां[4], प्रिय आपणहि रथावरूनियां लवला, ।
लव लागेना तों, घे अंकीं, करुणासमुद्र कालवला. ॥ ७५
हरिनील[5]निभवरांकीं बसल्यें, न श्री तसी घनीं चपळे[6], ।
गेला घेउनि हरि निजभाग सुखें, त्यासि म्हणति नीच 'पळे.' ॥ ७६
मज नेल्यावरि रक्षक वीरांनीं उघडिले बळें डोळे, ।
लोळे जरि धूळिमधें केतुच्छायेंत तरि तनू पोळे. ॥ ७७
हंसें मुक्ता[7] नेली, मग केला कलकलाट काकांनीं, ।
हाकांनीं नभ[8] भरलें, जाय सुरांच्याहि नाद हा कानीं. ॥ ७८
कन्या कीर्तिहि हरिली देखत असतां बळेंचि गोपानें[9], ।
'सोपानें[10] वीरशिरें केलीं' कीं म्हणति भूप कोपानें. ॥ ७९
शाल्वजरासंधादिक चैद्याचे जे सहाय[11] ते रागें ।
मागें धांवत आले, तळमळती अंतरीं दिल्या डागें. ॥ ८०
पुष्कळ खळ बळ घेउनि हरिवरि आले नृपाळ ते कुतरे, ।
उतरे एकहि न कसीं[12] कनकासीं कोटि भांडतां धुतरे[13]. ॥ ८१
प्रथम कटक[14] मज भासे कल्पांतक्षुब्धसिंधुचा[15] लोट, ।
मन्मति चिंतेंत बुडे पळभरि सखि! वापिकेंत[16] जसि मोट. ॥ ८२
मज आलिंगुनि हांसुनि विभु म्हणती, 'कातराक्षि[17]! नेत्रास ।
उघडुनि निजयदुभटभुजकुतुक[18] पहा, धरिसि कां मनें त्रास[19]? ॥ ८३

---

१. सखी. २. पुष्पमाळा किंवा उत्तम मनोरूप माळा. [सुमनस्=(१) पुष्प. (२) शोभन मन.] ३. पतीला स्वीकारण्यासाठीं उत्तम पुष्पांची माळा असावी असा या समयींचा विधि आहे. ४. 'उचलीतां' असा अन्य पाठ. ५. इंद्रनीलमण्यासारिखा जो कृष्ण नवरा त्याच्या मांडीवर. ६. विजेला. [चपला=वीज. 'चपला कमलाविद्युत्पुंश्चलीपिप्पलीषुच.' इति मेदिनी] ७. मोतीं. ८. आकाश. ९. गवळ्यानें. १०. पायऱ्या. ११. सहचर, सोबती. १२. कसोटीस, बरोबरीस. १३. धोत्रा. हें अर्ध सुभाषितरूप आहे. एककोटि धोतरे (आमचें नांव 'कनक' आहे असें म्हणून) कनकाशीं (सोन्याशीं) जरी (बरोबरी करण्याच्या उद्देशानें) भांडले, तरी ते सोन्याच्या कशास कधीं ही उतरावयाचे नाहींत. [कनक=(१) सुवर्ण (२) धत्तर, "कनकं हेम्नि पुंसि स्यात्किंशुके नागकेसरे। धत्तूरे कांचनारे च कालीये चम्पकेऽपिच" इति मेदिनी.] १४. सैन्य. १५. प्रलयकालीं क्षोभ पावलेल्या सागराचा. १६. विहीरींत. १७. कातर (अधीर, सकंप) अक्षि (नेत्र) जिचे. १८. आपल्या यादव वीरांच्या भुजांचें कौतुक पहा. १९. भय.

[1]खलबलजलधिप्राशन करितिल [2]यदुवाडव क्षणामाजी, ।
[3]आजिप्रिय दीर तुझा बलभद्र अगस्त्य होतसे आजी'. ॥ ८४
पाहें मी तों बाई! [4]अरिहरिणींमाजि [5]वृष्णिशार्दूळ, ।
[6]तूल ज्वलनासीं जरि भांडे, तेजासि होय अनुकूळ. ॥ ८५
भावोजींचा [7]विक्रम काय वदों? खलबलांत हे [8]रुद्र, ।
[9]मुद्रत्नाकर सुजनीं, यांसीं कां भांडती नृप क्षुद्र? ॥ ८६
[10]यांच्या काय न दुर्लभ मेळविलें भाग्य सज्जनीं चरणीं ।
मरणींच कोण लाभ? द्वेषें कां होति सज्ज नीच रणीं? ॥ ८७
ज्याचें ज्याचें [11]मस्तकपंकज [12]मद्देवराशुग छेदी, ।
भेदी तो [13]रविमंडल, [14]रणभून्यूनाचि [15]वाजिमखवेदी. ॥ ८८

---

१. दुष्टसैन्यसागराचें पान. यांत 'रूपक' आहे. २. यादवरूप वडवाग्नि. ३. युद्ध ज्याला प्रिय असा. ४. शत्रुरूप मृगांमध्यें. ५. यादवरूप व्याघ्र. हें रूपकाचें. उत्तम उदाहरण आहे. ६. कापूस. ७. पराक्रम. ८. रुद्रासारखे भयंकर, उग्र, संहारकारक. ९. मुद्+रत्नाकर= आनंद+सागर. जे सुजन आहेत त्यांस हे बळराम भावोजी आनंदसागर देतात. १०. यांच्या चरणीं सज्जनीं दुर्लभ भाग्य मेळविलें न काय? असा अन्वय. जे यांच्या (रामकृष्णांच्या) चरणास शरण आले त्यांनीं अप्राप्य असें भाग्य मिळविलें नाहीं काय? ११. शिरःकमल. १२. मत्+देवर+आशुग=माझ्या+दीर+बाण=माझ्या दिराचे बाण. १३. ज्याचें शिरःकमल कृष्णाच्या बाणानें छिन्न केलें तो पुरुष रविमंडल भेदतो. रणांत पाठ न दाखवितां, सन्मुख उभें राहून जे वीर धारातीर्थीं प्राण देतात त्यांच्या गळ्यांत अप्सरा माळ घालतात अथवा ते सूर्यमंडळास भेदून वर ब्रह्मलोकास जातात असें शास्त्रांत सांगितलें आहे, या गोष्टीवर येथें लक्ष ठेवून वर्णन केलें आहे. असें वर्णन संस्कृतांत वारंवार आढळतें:—(१) उद्दंडे भुजदंडे तव कोदंडे परिस्फुरति । अरिमंडलरविमंडलरंभाकुचमंडलानि वेपंते ॥, (२) सूचीमात्रविभेदसंभ्रमगुणः क्षोणीशवामभ्रुवामुत्तुंगस्तनमंडलेषु लभते लीलारतिं कंचुकः । नाराचैर्निबिडैर्विभिन्नवपुषां पुंसां महायोधने स्वर्गश्रीकुचकुंभसंभ्रमपरीरंभः कथं दुर्लभः ॥, (३) विपक्षशस्त्रक्षपणैः पुनः पुनः क्षताखिलग्रंथि निजास्थिपंजरम् । चकार चंडद्युतिमंडलोदरे सुखप्रवेशार्थमिवापरो भटः ॥, (४) द्वाविमौ पुरुषव्याघ्र सूर्यमंडलभेदिनौ । परिव्राड् योगयुक्तश्च रणे चाभिमुखो हतः ॥. यांचा भावार्थ:—(१) हे राजा! तुझ्या बलाढ्य बाहूदंडावर धनुष्य चढलें असतां, शत्रुमंडल, सूर्यमंडल आणि रंभाकुचमंडल हीं कांपूं लागतात. (२) केवळ सुईनें टोंचून घेतल्यामुळें जर कंचुकाला नृपांगनांच्या उन्नत स्तनमंडलावर विलास करायास मिळतें, तर रणांगणांत छिन्नगात्र झालेल्या योद्ध्यांस देवांगनांच्या कुचकुंभालिंगनाचा लाभ घडला, त्यांत आश्चर्य कसचें (३) एक वीर आपणास सूर्यमंडळांत प्रवेश करतां यावा म्हणूनच काय शस्त्रांनीं आपल्या अस्थिपंजराच्या ग्रंथि तोडिता झाला. (४) दोघे सूर्यमंडळाचा भेद करणारे होत; एक योगी व एक धारातीर्थीं मरण पावलेला वीर. याच अर्थाचीं प्रसिद्ध कवींचीं वचनें अनेक आढळतात. १४. रण+भू+न्यूना=संग्राम+भूमि+

तुटकीं असतांहि शिरें, हांसति, [3]नाचति, रणांगणीं वीर, ।
प्रभु सांगे मज कीं '[2]जनिसाफल्यें [3]मुदितचित्त हे धीर.' ॥ ८९
वीर बसोनि विमानीं गेले, बहु [4]येंच्छरीरपात रणीं, ।
तरणी झाले वृद्धहि, त्यांच्या अंकीं प्रिया नवी [5]तरणी. ॥ ९०
स्वर्गासि [6]अप्सरांहीं नेले [7]भटमणि, विचित्र तें काय? ।
रक्तनदी भेटीला नेती [8]रत्नाकराचिया [9]काय. ॥ ९१
अमरींनीं [10]भटवरमणि घेउनियां, [11]हार निजगळां केले, ।
रक्तनदीनीं [12]मध्यममणि [13]खनिला दाखवावया नेले. ॥ ९२
[14]रणहट्टीं बहु [15]गेले वीरमणी, त्यांत राहिला गाळ, ।
[16]काळ ग्राहक आला नव्हता, नेती फिरोनि [17]तत्पाळ. ॥ ९३
मग आला गे! बाई! दादा मज सोडवावया कोपें, ।
तो पेंव [18]वृश्चिकांचें लोकां, परि या [19]खगध्वजा सोपें. ॥ ९४

---

कमी, हलकी=रणभूमीहून हलकी. १५. वाजिमख+वेदी=अश्वमेध+वेदिका, अश्वमेधाची वेदिका समरांगणाहून हलकी होय. अश्वमेध केल्यानें जो लोक प्राप्त होतो त्याहून श्रेष्ठ असा लोक रणांगणीं मरण पावल्यानें मिळतो असें तात्पर्य.

१. येथें 'कारकदीपक' नामक अलंकार आहे. २. जन्म सफळ झाल्यानें, जन्माच्या सफळपणानें. [जनि=जन्म.] ३. सानन्दमनस्क. ४. ज्यांचा शरीरपात (देहनाश) झाला ते. ५. युवति. ६. अप्सरा ह्या समुद्रमंथनकाळीं अप् म्हणजे उदक यापासून उत्पन्न झाल्या:—'अप्सु निमर्थनादेव रसात्तस्माद्वरस्त्रियः । उत्पेतुर्मनुजश्रेष्ठ तस्मादप्सरसोऽभवन ॥'. ह्या गंधर्वांगना असून स्वर्वेश्या आहेत. ह्या इंद्राच्या दासी असून त्याला कोणाच्या तपाचें भय वाटलें म्हणजे तपोभंग करण्याच्या कामीं मोठ्या कुशल, म्हणून त्याच्या आज्ञेनें ह्याच जावयाच्या आणि कार्यसिद्धि करून परत यावयाच्या. उर्वशी, मेनका, रंभा, घृताची, तिलोत्तमा सुकेशी, मंजुघोषा इत्यादि प्रमुख सुरवेश्या होत. बाणकवीनें यांचीं चवदा कुळें असल्याविषयींचा उल्लेख कादंबरी ग्रंथांत केला आहे. अप्सरा आपल्या नृत्यविलसितानें विजांस लाज आणतात असें त्याचें वर्णन संस्कृत ग्रंथांतून आढळतें. ७. वीररत्नें. ८. सागराच्या. ९. देह. १०. भट हींच उत्तम रत्नें. ११. पतित्वानें स्वीकार केला. १२. हलकीं रत्नें. मृत वीरांला देवांगनांनीं नेलें आणि त्याचीं शरीरें रक्तनदींत वाहून समुद्रांत गेलीं असें वर्णन आहे. प्राण आणि देह हे भिन्न आहेत. प्राणाची योग्यता देहापेक्षां अधिक आहे म्हणून प्राण हे 'वरमणि' आणि देह हे 'मध्यम मणि' होत. देवांनीं उत्तम रत्नें वर नेलीं व मध्यम रत्नें रत्नाकरांत (सागरांत) गेलीं. १३. खाण समुद्र याला. १४. संग्रामरूपबाजारांत. १५. खपले. १६. काळरूप गिराईक. १७. त्याचे रक्षक (उरलेले पळून गेले असा भाव.) १८. वृश्चिक=विंचू. १९. गरुडध्वजा (कृष्णा.)

अक्षौहिणीबल [1]ज्वलदग्निप्रभ वीर सोडिले मागें, ।
रागें [2]गाळी देतचि ये, घाली गांठि [3]शौरिसीं आंगें. । ९५
[4]समनोरथरथशस्त्र प्रभुनें केला पळांत तो भग्न, ।
नग्न [5]स्वखड्गहि वधा, तों मन्मन होय शोकविनिमग्न. ॥ ९६
[6]अभयप्रदपदपद्मीं म्यां तेव्हां घातली मिठी घट्ट, ।
[7]धट्ट क्षणभरि झालें, केली स्वाभाविक [8]त्रपा [9]गट्ट. ॥ ९७
केला न [10]वध, तदधिका श्यालाची दुर्दशा सये! केली; ।
[11]केली [12]हरि जरि करि, तरि [13]करिमदशोभा दिगंतरा गेली. ॥ ९८
[14]त्यांतें सोडुनि, देवा लावुनि शब्द, स्वयें मला बोधी ।
तो धीर दीर माझा, [15]वागमृतें मलिनबुद्धिला शोधी. ॥ ९९
द्रौपदि! असी कथा हे लग्नाची, फार मी वदों काय? ।
पाय प्रभुचे संतत पूजावे तरिच सफळ हा [16]काय.' ॥ १००
भामा सांगे, 'माझा सत्राजितनाम तात [17]रविमित्र, ।
[18]मित्रें प्रसन्न झाला, निजकंठींचा दिला मणी [19]चित्र. ॥ १०१
सुमणि [20]स्यमंतकाव्हय रविचा [21]मूर्तानुराग [22]तद्वर्ण ।
[23]स्वर्ण प्रसवे पुष्कळ, [24]शशिमणि चंद्रोदयीं जसें [25]अर्ण. ॥ १०२
[26]चिंतकचिंतामणि त्या मणिला मागे, दिला न [27]मज्जनकें; ।
[28]जन केंवि भ्रांत नव्हे? भ्रमला [29]रविमित्र [30]मत्पिता कनकें. ॥ १०३
मणिला कंठीं बांधुनि माझा सख्खा [31]प्रसेन जो चुलता ।

---

१. ज्वलत्+अग्नि+प्रभ=जाळणारा अग्नि+कांति=प्रदीप्त अग्नीसारखे. २. शिवी. ३. कृष्णाशीं. ४.मनोरथ, रथ, आणि शस्त्र यांसहवर्तमान. ५. वधासाठीं आपला खड्ग नग्नही केला तों.६. अभय देणारें पादकमल ज्याचें तो कृष्ण, त्याच्या चरणकमळीं. ७. धीट. ८. लज्जा. ९. गिळंकृत. यांतील शब्दयोजना लक्षांत ठेवण्यासारखी आहे. १०. श्यालाचा (मेहुण्याचा) वध केला नाहीं, पण वधापेक्षां अधिक त्याची दुर्दशा केली. ११. क्रीडा. १२. सिंह. १३. हत्तीच्या मदाची शोभा. १४. त्या श्यालातें (माझ्या दादातें.) १५. वाच्+अमृतें=वाणी+सुधेनें=वाचारूप अमृतानें. १६. देह. येथें रुक्मिणीविवाहोत्सवकथा समाप्त झाली. १७. सूर्याचा सखा. १८. सूर्य. स्नेही, सुहृद. १९. चित्रविचित्र. २०. स्यमंतक आहे आव्हा (नाम) ज्याची असा. २१. मूर्तिमंत प्रेमा. २२. त्याचाच वर्ण (रंग) असा. २३. सोनें. २४. चंद्रकांत. २५. उदक. २७. चिंतकांचा (भक्तांचा) चिंतामणि (उत्तम रत्न कृष्ण.) २८. माझ्या पित्यानें (सत्राजितानें.) २९. कनकाचा मोह पडून कोण मनुष्य भ्रांत होणार नाहीं? धनानें भुलणार नाहीं असा कोण मनुष्य आहे? ३०.सत्राजित्. ३१. प्रसेन हा निघ्नाचा मुलगा आणि सत्राजिताचा बंधु.

तो गेला मृगयेला,[1] मणिकांतिस[2] सिंह जाहला[3] मुलता.[4] ॥ १०४
मणिलोभें सिंहानें बाई! व्यापादिला वनीं काका, ।
त्या काय होय मोतीं सिकेंथ[5] क्षण भासलें मनीं काका[6]? ॥ १०५
त्या सिंहाला मारुनि गेला घेऊनि ऋक्षराज[7] मणी, ।
रमणीया रत्नातें बालक्रीडेस[8] योजिती रमणी.[9] ॥ १०६
भ्रांता[10] आला नाहीं तेव्हां माझ्या पिता करी शोक, ।
तो कश्मलांत[11] बोले जें तें वदती घरोघरीं लोक. ॥ १०७
म्हणती[12] कृष्णें मृगयागत [13]मणिकंठ प्रसेन मारविला, ।
सारविला शिशुनीं[14] करकज्जलजळडाग[15] हा कसा रविला. ॥ १०८
'घोका नीट' न म्हणतां स्वगुरुनिगदसाधुशिष्यतोकानीं[16] ।
लोकानीं दृढ केला प्रभुच्या अपवाद जाय तो कानीं. ॥ १०९
पौरजनातें घेउनि आपण गेला करावया शोध, ।
क्रोध प्रभुवर न करी, न घडे इतरांस कोपसंरोध.[17] ॥ ११०
मोठें अरण्य बाई! अश्वाचा प्रथम काढिला माग,[18] ।
लाग [19]प्रसेनतनुचा लावी, हरिचांहि[20] मग महाभाग.[21] ॥ १११

१. मृगया=शिकार. [मृग्यतेऽत्र इति मृगया. 'आच्छोदनं मृगयं स्यादाखेटो मृगव्या स्त्रियाम्' इत्यमरः]. २. स्यमंतकमण्याच्या प्रभेला. ३. मारिला. ४. चुलता. ५. भाताचें शीत. ६. कावळा. ७. ऋक्ष+राज=रीस, अस्वल+स्वामी=जांबवान्. ८. मुलांच्या खेळण्यासाठीं. ९. त्याची स्त्री. १०. प्रसेन. ११. दुःखांत. १२. लोक म्हणती. १३. मणि आहे कंठांत ज्याचा असा. १४. शिशुनीं (अज्ञ बालांनीं) करकज्जलजलडाग (हातांतील काजळाचा आणि पाण्याचा डाग) रविला कसा सारविला (सूर्याला कसा लाविला.) भांड्यांतील उदकांत हातानें काजळ कालवून द्यावें व उदकांत जें सूर्याचें प्रतिबिंब दिसतें त्याजवर तो काजळाचा हात लावून सूर्यालाच जणूं काय लाविला असें समजावें त्यासारखें कृष्णावर प्रसेनघाताचा आणि स्यमंतरत्नापहाराचा दोषारोप करणें होय. हा कृष्णावरचा अपवाद व्यर्थ होय असा भाव. १५. आपला हात मात्र मळविला, न सूर्य. १६. स्व+गुरु+निगद+साधु+शिष्य+तोकांनीं=निज+अध्यापक, आचार्य+वचन+निपुण, कुशल+छात्र+बालकांनीं=आपल्या आचार्याचें वचन ग्रहण करण्याविषयीं कुशल अशा शिष्य बालकानीं 'नीट घोका' (चांगलें म्हणा) असें आचार्यानें सांगितलें नसतांही ज्याप्रमाणें अल्पवयस्क देखील शिष्य आपल्या गुरुचें वाक्य दृढ पाठ करतात त्याप्रमाणें लोकांनीं हा अपवाद [कोणी न सांगतां] दृढ केला व तो कृष्णाच्या कानीं गेला. १७. कोपदमन. १८. पत्ता, मार्ग. १९. प्रसेनदेहाचा. २०. सिंहाचा. २१. महादैवशाली (कृष्ण).

धरिली ऋक्षपदांची[1] पद्धति[2] ती दाखवूनि दे विवरा,[3] ।
बाहेर लोक ठेवुनि, शिरणें लागें बिळांत देवि! वैरा.[4] ॥ ११२
जिंकुनि ऋक्षपतीतें मणि त्यापासूनि आणिला गेहा, ।
लोकीं स्तवनवनें[5] अपवादमलिन[6] काय न्हाणिला गे! हा. ॥ ११३
जेव्हां सभेंत हरिच्या रत्न करीं जाहला पहाता तें, ।
'हा!' तातें म्हणुनि, पुढें ओढविलें ध्यवयासि हातातें. ॥ ११४
जो बहु अदर्शनें दे, देइल कां अल्प दर्शनीं ताप? ।
बाप स्वमनांत म्हणे 'कोण्यापुण्यें जळेल हें पाप?' ॥ ११५
देऊं केलें होतें अन्यवराला परंतु देवास ।
कन्यारत्नार्पण करि तात, पदीं[7] मज मुकुंद दे वास.' ॥ ११६
श्रीजांबवती सांगे, 'विवरीं जातांचि देव मत्तातें[8] ।
नाहीं ओळखिला, सखि! जैसें न कळे निजेष्ट[9] मत्तातें. ॥ ११७
सत्तावीस दिवस सखि! दोघांसीं युद्ध तें न पळ राहे, ।
साहे तातचि विभुभुजदंडपदाघात, रक्त जरि वाहे. ॥ ११८
असतील असोत बळी मत्तातासारिखा नसे योध, ।
शोध ज्ञाते याचा चित्तांत करा करून, न क्रोध. ॥ ११९
म्यां वर्णावा काय? श्रोत्याच्या शीघ्र जी भवा[10] खोणी,[11] ।
श्रीमद्वाल्मीकीची[12] माझ्या बापास जीभ वाखाणी. ॥ १२०
अतिवृद्ध बहुयुगांचा, परि बळवेगें तसा न वात[13] रणा, ।
तरणारांत समर्थ, प्रियसखि! भासे जसा नवा तरणा. ॥ १२१
श्रीसीतापति निजपति ऐसें जाणे पिता कवी चरणीं ।
ठेवी शिर, कीं झाली गात्रांची विकलता नवीच[14] रणीं. ॥ १२२
मग कैंचा श्रम बाई! प्रभुपदवंदन[15] सुधाब्धिमज्जन कीं ।
पूर्वींपासुनि मोठा रघुयदुवीरप्रसाद मज्जनकीं.[16] ॥ १२३

---

१. अस्वलाच्या पायांचीं. २. मार्ग. ३. गुहेला. ४. माझ्या पतीला. ५. स्तुतीरूपजळानें. [वन=जल. 'वने सलिलकानने' इत्यमरः । 'क्लीबं स्यात् कानने नीरे निवासे निलये वनम्' इति रभसः] ६. आपवादानें मलिन झालेला (काय) देह. ७. निजपदीं. ८. माझ्या बापातें. ९. स्वहित. १०. संसारा. ११. खणून टाकी. १२. वाल्मीकिच्या रामायणांत जांबवताचें वर्णन पुष्कळ आहे तिकडे कविकटाक्ष आहे. १३. वायु. १४. पूर्वीं कधीं झाली नाहीं अशी. १५. प्रभुपदवंदन हेंच अमृतसागरांत मज्जन (स्नान) होय. १६. माझ्या बापावर.

निजगुरुदेवप्रभुप्रदपूजासमयीं उभारुनी बाहे[1] ।
बाहे[2], मणिसह[3] वाहे मज, 'पददासी असो' म्हणे 'बा! हे[4].' ॥ १२४
द्रौपदि! बाई! प्रभुची दासी मी हेंचि भाग्य देवि! भवीं[5] ।
ठेवि भवींच[6] भवानी चित्त, स्वप्नींहि पद न दे विभवीं[7].' ॥ १२५
कालिंदी[8] सांगे, 'मी चिंतित होतें सदैव सुरवर्या[9], ।
केली प्रभुपददास्यप्राप्तीसाठीं महातपश्चर्या. ॥ १२६
रचिलें होतें उपवन[10] यमुनातीरासि पत्रपुष्पार्थ[11] ।
मृगयाकेलिश्रांत[12] प्रभुला जळ न्यावयासि ये पार्थ. ॥ १२७
तोय भराया विसरे, वृत्त पुसे सर्व मज, 'तुझा नवरा?' ।
नवराजीवदलाक्षा[13] सांगे तें साधु वर्तमान वरा[13]. ॥ १२८
सुचवी पूर्वींच शुभ[14] स्फुरणें भुज नेत्र सव्य[15] साची तें, ।
'स्वोक्ति करूं' मनिं म्हणतां, पाहे सहसाचि सव्यसाचीतें[16]. ॥ १२९
म्या वेंचिल्या फुलांची बाई! तत्काळ गुंफिली माळा, ।
तोंळा[17] पडला दैवें, आला घेऊनि पार्थ[18] यदुपाळा. ॥ १३०
माळेला आपुलिया कंठीं, अंकीं मलाहि, दे जागा; ।
यागा[19] योगा न वळे, वश करिते भक्ति या महाभागा. ॥ १३१
गृहमार्जनीच[20] होइन विभुपदरज[21]भाग्य झाडुनीच बरी, ।

---

१. बाहू. २. बोलवी. ३. स्यमंतक मणीसह देई. ४. ही जांबवती. ५. या संसारांत. ६. शिवाचे ठायीं. ७. ऐश्वर्यांत. येथें जांबवतीविवाहोत्सवकथा समाप्त झाली. ८. कालिंदी=ही कृष्णाच्या अष्टनायिकांतील एक. ही कृष्ण पति मिळावा म्हणून यमुनातटाकीं, उग्र तपश्चर्या करीत होती. अशा स्थितींत एकदां चातुर्मास्यांत अर्जुनासह कृष्ण इंद्रप्रस्थीं असतां मृगयेच्या निमित्तानें यमुनातीरीं आला. तेव्हां त्यानें येथें तपोधर्मपरायण अशा तिला पाहिलें. नंतर उभयतांचें भाषण झाल्यावर, तिचें मनोगत जाणून, तिला समागमें घेऊन कृष्ण इंद्रप्रस्थास आला. तेथें चातुर्मास्य संपेपर्यंत राहून तिच्यासह द्वारकेस येऊन त्यानें तिचे यथाविधि पाणिग्रहण केलें. (भागवत–दशमस्कंध–अध्याय ५९.) कृष्णाच्या अष्टनायिकांचीं नांवें–'भैष्मी जांबवती भामा सत्या भद्रा च लक्ष्मणा । कालिंदी मित्रविंदा चेत्यष्टौ पट्टमहास्त्रियः ॥' ९. सुर+वर्या=देव+श्रेष्ठा (कृष्णाला.) १०. बाग. ११. पानें व पुष्पें यांसाठीं. १२. शिकार या क्रीडेला करून थकलेल्या कृष्णाला. १३. नव+राजीव+दल+अक्ष=नूतन+कमल+पत्र+नेत्र=नूतन कमलाच्या पत्रासारखे सुंदर डोळे ज्याचे त्या वरा (पतिला) कृष्णाला. १४. मंगल, कल्याण. १५. डावा. १६. पार्थातें. सव्य हातानें जो बाण जोडतो तो सव्यसाची. १७. नेत्रभुज-स्फुरणानें सूचविलेल्या शुभाचा अनुभव आला. १८. अर्जुन. १९. जो महाभाग (कृष्ण) यागाला (यज्ञाला) किंवा योगाला न वळे (न वश होई) त्याला भक्ति वश करते. २०. केरसुणी (श्लो० ११.) २१. कृष्णचरणधूलिभाग्य.

नीच बरी म्हणतिल, परि न नृपशिरीं अधिक ईहुनी चवरी.[1] ॥१३२
स्वविवाह मित्रविंदा[2] सांगे, 'बाई! स्वयंवरांत मला ।
अमलाकारगुण[3] प्रभु कैरविणीलीं[4] सुधांशुसा[5] गमला. ॥ १३३
रूपद्रव्याढ्यहि[6] जे आले होते मदर्थ[7] ते भूप ।
कूप[8], प्रभु रत्नाकर[9], किंवा, ते तेल, देव हा तूप. ॥ १३४
रुक्मी, माझे भ्राते, एका शाळेंत हे पढों[10] शिकले, ।
टिकले सहजचि गुणीं कुचले[11] हिरवे जसे तसे पिकले. ॥ १३५
कुलज गुणाढ्यहि होते परि नृप ते मज नकोत, बळें[12] काय? ।
पाय[13] प्रिय तपनाचे[14], हिमकरकर[15] पद्मिनीस[16] विष[17] काय? ॥ १३६
जेव्हां कृष्णग्रीवा मन्माळा, या युगासि[18] गांठि घडे, ।

---

१. राजांच्या शिरावरील चवरी या गृहमार्जनीहून कांहीं ज्यास्त नव्हे. कृष्णचरणरज झाडणारी केरसुणी ही चवरीपेक्षां श्रेष्ठ होय–असें तात्पर्य. येथें कालिंदीविवाहोत्सवकथा समाप्त होते. २. मित्रविंदा ही जयसेन राजाची मुलगी. हिचे दोघे भाऊ विंद आणि अनुविंद हे दुर्योधनमित्र होते म्हणून त्यांनीं आपल्या भगिनीला कृष्णाशीं विवाह करूं दिला नाहीं. तथापि नंतर हिचा स्वयंवर होत असतां, जमलेल्या राजांच्या समक्ष कृष्णानें हिचें हरण करून हिशीं विवाह केला. ही कृष्णाची पांचवी नायका होय. ३. सुंदर आहे आकार (आकृति व गुण ज्याचे असा प्रभु (कृष्ण.) ४. चंद्रविकासिनी कमलिनीस. ५. चंद्रसा. ६. रूप (सौंदर्य)+द्रव्य(संपत्ति)+आढ्य (संपन्न–ख्यात.) ७. माझ्यासाठीं. ८. ते भूप कूप (विहीर) होत. ९. सागर. १०. हे सर्व एकाच शाळेंतील विद्यार्थी होते म्हणून कृष्णाशीं विरोध करावा असें त्यांस शिक्षण होतें. एका शाळेंतील शिक्षण सारखेंच असतें म्हणून त्यांतील विद्यार्थ्यांचे विचार सारखेच असतात. रुक्मी व विंद आणि अनुविंद हे खरोखर एका शाळेंत होते असें नाहीं, परंतु त्यांचें विचारसाम्य असल्यामुळें असें वर्णन केलें आहे. ११. काजरे. कुचले (काजऱ्याचीं फळें) हिरवे असोत किंवा पिकलेले असोत, त्यांच्या सहज गुणांत (स्वाभाविक गुणांत) बदल होत नाहीं, तो तसाच टिकतो. इतर फळांचा गुण बदलतो. आंबा कोंवळा असतां तुरट असतो, बांठा धरून जून झाल्यावर आंबट लागतो आणि पिकल्यावर गोड लागतो असा बदल काजऱ्याच्या फळाच्या स्थितींत होत नाहीं, तें फळ सदा कडू असतें, मग तें हिरवें असो किंवा पिकलेलें असो. माझे भ्राते या कुचल्यासारखे होते. 'सहजचि गुणीं'=जन्मापासून जो कृष्णद्वेषस्वभाव त्यांस जडला तो तसाच टिकला, त्यांत बदल झाला नाहीं. १२. येथें आग्रह कशास. १३. किरण. १४. सूर्याचे. तपनाचे पाय पद्मिनीस प्रिय काय?=सूर्याचे किरण सूर्यविकासिनी कमलिनीस प्रिय आहेत काय? होय प्रिय आहेत. हिमकरकर पद्मिनीस विष काय?=चंद्राचे किरण कमलिनीला विषासमान वाटतात काय? होय वाटतात. कमलिनीस जसा सूर्य प्रिय तसा मला कृष्ण प्रिय होय, ही नैसर्गिक प्रीति होय. १५. चंद्राचे किरण. १६. सूर्यविकासिनी कमलिनीस. १७. विषच होतात काय. (म्हणोन स्पर्शक्षणी म्लानता). १८. या दोहोंचा योग झाला.

त्याचि क्षणांत बाई! खल[1]भूपभ्रूलतांसि गांठि पडे. ॥ १३७
मजलाचि सये! न [2]हरी भूप[3]मुखश्रीसही [4]असत्काळ, ।
ते नृप [5]चापलताचि न, सेनाही सज्ज करिति तत्काळ. ॥ १३८
[6]श्वगणांतूनि जसा [7]हरि निजभागा हरि, तसाचि अतिधीर ।
अबलखलांतूनि प्रभु मजला घेऊनि जाय यदुवीर. ॥ १३९
आले उत्साहें, परि समरीं यदुनाथ सिंह [8]ते [9]कलभ, ।
बलभद्रानुज [10]खगपति सति! [11]अतिगतिहीन भूप ते [12]शलभ. ॥ १४०
[13]ग्रीष्मीं दावाग्नीतें जिंकुनि जय जोडितील काय [14]तणें? ।
मुकुटाच्या पदवीतें कैसीं हो पावतील [15]पायितणें? ॥ १४१
खलबल आलें होतें आधीं मोठे धरूनि [16]आवांके, ।
[17]प्रभुवरशरततिपदभर माथां पडतां करूनि [18]आ वांके. ॥ १४२
[19]भटमुकुटरत्नकैटभरिपुपटुशरपटलपट रणीं [20]फांके, ।
कां [21]केवळ कटकचि सखि! [22]घटजठरीं दीपसा रवी झांके. ॥ १४३
[23]खळवळ [24]खळवळ करि सखि! सकळ विकळ धरिति न पळ बळ मळधी,।
म्हणति सुर, 'पळति जळचर, विभुशर[25]शुचि कढवि रिपु[26]कटकजळधी.' ॥
करुनि कृपा मजवरि वरि हरि [27]हरि खळभूपबंधुविघ्नातें, ।
चरण क्षाळुनि सेविन बहुजन्में त्याचि भक्त[28]निघ्नातें.' ॥ १४५

---

१. दुष्ट राजांच्या भोंवयांना आंठी पडल्या. २. हरण करी. ३. राजाचें मुखसौंदर्य. ४. दुष्टांचा शास्ता कृष्ण. ५. धनुर्लता. ६. कुत्र्यांच्या कळपांतून. ७. सिंह. ८. भूप. ९. गजशावक. ['कलभः करिशावकः' इत्यमरः. १०. गरुड. ११. अत्यंत विकल चालण्यास अतिशयित अशक्त. १२. टोळ. १३. हें 'दृष्टांत' नामक अलंकाराचें उदाहरण आहे. १४. तृणें. १५. पायांतील जोडे. १६. धैर्य 'आवांके—आ वांके' हें पंताचें आवडतें यमक आहे. १७. कृष्णाच्या शरपंक्तीच्या पायांचा भार. १८. तोंड वासून. १९. भट+मुकुटरत्न+कैटभरिपु+पटु+शर+पटल+पट+योध=शिरोभूषणरत्न, अग्रेसर, शिरोमणि+कृष्ण, कैटभाचा शत्रु+कुशल+बाण+समुदाय+वस्त्र. २०. फडकत होता. २१. केवळ कटक (सैन्य) झांकलें असें नाहीं, तर भांड्यांतील दिव्यासारखा सूर्यही लोपून गेला. २२. घटाच्या पोटांत. २३. चळवळ, प्रक्षोभ, घाबरेपण. २४. खलसैन्य. २५. कृष्णाचे बाण हा वडवानल तो. (शुचि=अनल, अग्नि. 'शुचिः शुद्धे सितेऽनले' इति हेमचंद्रः.) २६. शत्रुसैन्यरूप सागर. २७. हरण करी. २८. भक्तपरतंत्रातें.

सत्या[1] सांगे, 'माझ्या तातें केला असा नवा पण[2], ज्या ।
तरवे कोणाच्याही न पित्या न पितामहा[3] न वा[4] पणज्या. ॥ १४६
ज्या वीरगंधदर्शन उत्तेजक, पावका[5] जसें तैल, ।
शैल[6]प्रतिम क्रोधी[7] बलशाली असति सात खळ बैल, ॥ १४७
[8]तो कन्यावर[9] जो हे जिंकुनि घालील वेसणा नाकीं; ।
ऐकति भूपति कुतुकें, देवहि ताताचिया पणा नाकीं[10] ॥ १४८
सांगों बहु काय तुम्हां? कोणी अत्युक्ति[11] तों म्हणाना कीं, ।
बहु भूप भग्न होतां, भ्याले सुर दुर्घटा पणा नाकीं. ॥ १४९
आला वीरमुगुटमणि[12] हा लावण्यामृताब्धि थोरपणें, ।
याला विलोकितां सखि! भ्याला मत्तात साधु घोरपणें[13]. ॥ १५०
सत्यचि सांगावें तुज, कथित्यें अपराध[14] जोडुनी हात, ।
तात क्रूर गमे मज, पण केला व्हावया सुताघात[15]. ॥ १५१
पूजा करूनि तातें पण कथितां, प्रभु म्हणे, 'वधू पाहों. ।
आहों उत्सुक बहु, मग वृषमददलनासही[16] उभे राहों'. ॥ १५२

---

१. कोसलदेशाधिपति नग्नजित् नामक राजाची सत्या नामक कन्या. हिच्या स्वयंवराची प्रतिज्ञा ऐकून कृष्ण स्वसैन्यासह कोसलपुरास आला. तेथें कृष्णाला पाहून सत्येचें मन कृष्णावर बसलें. इकडे स्वयंवरास आलेल्या राजांपैकीं वृषभांला वांधण्यास कोणीही समर्थ नव्हता. नग्नजिताचेही मनांत कृष्णाला कन्यादान करावें असें होतें. पण कन्यावरपरीक्षणपण व्यर्थ गेला असें न व्हावें या हेतूनें श्रीकृष्णानें स्वलीलेनें सात वृषभांला दाव्यांनीं बांधून ओढून आणिलें तेव्हां राजपत्नीप्रमुख सर्वजनांस आनंद झाला. नंतर कृष्णाचा तिच्याशीं विवाह झाला. नंतर राजानें कृष्णाला आणि मुलीला गोहयरथादि संपत्ति देऊन संतुष्ट केलें. वाटेंत प्रतिस्पर्धी राजांनीं कृष्णाला अडविलें तेव्हां त्यांचा पराभव अर्जुनानें केला. (दशमस्कंध—अध्याय ५९ श्लोक ३२-५५ पहा.) २. आयोध्येचा राजा नग्नजित् यानें आपली कन्या सत्या हिच्या स्वयंवरप्रसंगीं अशी प्रतिज्ञा केली होती कीं जो कोणी राजा वज्रासारख्या दिसणाऱ्या दुर्धर्ष आणि वीरगंधासह अशा सात श्रेष्ठ वृषभांला एकदम बांधील त्यास ही कन्या देईन. ३. बापाचा बाप. ['पितामहः पितृपिता' इत्यमरः । 'पितामहः पद्मयोनौ जनके जनकस्य च' इति हैमः । 'मातृपितृभ्यां पितरि डामहच्' 'मातरि षिच्च' (वा० ४।२।२६) मातामह=मातेचा बाप; प्रपितामह=बापाचा पितामह; प्रमातामह=मातामहाचा बाप.] ४. किंवा. ५. अग्नीला. ६. पर्वतसम मोठे. ७. रागीट, कोपशील. ८. गीति १४७-४८ याचें युग्मक आहे ९. तो कन्येचा (माझा सत्येचा) वर (पति) होईल. १०. स्वर्गीं. ११. अतिशयोक्ति. १२. कृष्ण. १३. भयंकर पणानें. १४. मी आपला अपराध सांगतें. १५. मुलीचा घात. १६. वृष+मद+दलनास=बैल+गर्व+नाशासाठीं.

लाजें मी, परि बसवी मज तातांकीं[1] वैराभिमुख[2] दाई, ।
बाई! स्वेदसलिलकणमौक्तिककंचुकित[3] होय सुखदायी.[4] ॥ १९३
मग खळ वृषभ दमाया बंधु तुझा[5] वृष्णिराय[6] कास कसी,[7] ।
वश वृषशक्ति[8] न होइल बाई! त्या लोकनायकास कसी? ॥ १९४
ज्याच्या अतुळ श्रीच्या दिग्गजशुंडा[9] खऱ्याखुऱ्या बटकी, ।
कंटकी[10] वरांगदी[11] तो बाहु उभारूनि त्या वृषां हटकी ॥ १९५
पाहुनि विभुसि खवळले सातहि वृष धांवले विदाराया.[12] ।
तो सप्तमूर्ति त्यांसहि [13]धरि हरि, न दिसे गुणीं भिदा[14] राया! ॥ १९६
त्या सर्वांच्या घाली लीलेनें दुष्टदमन गुणें[15] नाकीं, ।
देवांच्याही कानीं, वदनीं भवतापशमनगुण[16] नाकीं. ॥ १९७
बांधुनि फिरवी वृषभां जैसे खेळांत बाळ अजतोकां,[17] ॥
मज दासीस उपेक्षिल भक्तपराधीन[18] करुण अज[19] तो कां? ॥ १९८
वरुनि मला विमलामृतकथ[20] रथरत्नीं बसोनि घे अंकीं, ।
रंकीं वृषविजितनृपीं[21] रथपथ[22] धरिला मदर्थ निःशंकीं. ॥ १९९
होता पार्थ त्वत्पति सत्पतिसह,[23] त्यांसि तेधवां नणंदे[24]! ।
क्षण देवें[25] आवरी, मग आज्ञा स्वमुखें करावया रण दे. ॥ १६०
युद्धस्वयंवरीं वरि त्यांसि पराभूतिनाम[26] नवरी ती, ।

---

१. बापाच्या मांडीवर. २. वराकडे तोंड करून. ३. घर्मोदक कणिकारूप मोत्यांनीं व्याप्त (देह) असा. ४. माझा सुखदाता कृष्ण. ५. द्रौपदीचा. ६. कृष्ण. ७. घाली. (कांसोटा मारी, कंबर बांधी). ८. बैलांची शक्ति. ९. दिग्गजांच्या शुंडा ह्या बटकी (दासी) होत. १०. कडीं ज्यास आहेत असा. ११. उत्तम बाहुभूषणें ज्याला आहेत असा. १२. प्रभूला फाडायाला. १३. सात मूर्ति धरून सात वृष धरिले. १४. सप्त मूर्ति झाला तरी गुणांचे ठाईं भेद दिसला नाहीं. १५. वेसण. १६. संसारतापाचा नाश करण्याचे गुण. १७. शेरडांस, कोंकरांस. १८. स्वभक्तांच्या अत्यंत अधीन झालेला, भक्तपरायण. १९. कृष्ण. २०. शुचि अमृतासम आहे कथा ज्याची तो (कृष्ण). २१. त्या वृषांनीं जिंकिलेल्या राजांनीं. २२. माझ्या रथापाठीमागून मला धरण्यासाठीं राजे धांवत आले. २३. सत्+पति+सह=साधु+प्रभु+सह=साधुजनांचा स्वामी जो कृष्ण त्यासह. २४. ['ननांदा तु स्वसा पत्युः' इत्यमरः 'ननांदा तु स्वसा पत्युर्ननांदा नंदिनी च सा' इति रभसः । याचा विग्रह असा:—न नंदति न तुष्यति । न नंदयति भ्रातृजायाम्, इति वा.] २५. देव (कृष्ण) त्या राजांला आवरी. २६. पराजय नांवाची.

[1]न वरीति क्षितिपति, परि धरि सकळीं [2]तुल्यकाम नव रीती. ॥ १६१
जन्मोजन्मीं बाई! हा ईश्वर चरणदास्य देउ मज, ।
[3]विभवांतर [4]मधुमोहक आत्महिताचा पडों न दे [5]उमज'. ॥ १६२
[6]भद्रा म्हणे, 'असो सखि! [7]सुभगा तरिहि न रमा तुळे यास, ।
प्रेमें मात्र वरावें मज दे [8]मत्तात [9]मातुळेयास. ॥ १६३
बाळपणींच प्रियसखि! [10]भाने कोणीहि न नवरा [11]जीवा. ।
बहुदिवसांची तृषिता [12]मधुपी सोडील न नव [13]राजीवा. ॥ १६४
शतमखनील[14]मणीची मूर्ति [15]प्रभुमूर्तिसीच मज [16]जनकें ।
करवुनि दिधली होती सेवाया, भूषवूनि मणिकनकें. ॥ १६५
[17]सति! अतिनतिरति [18]पतिमति भजनीं नैवेद्य मूर्तिचा खावा, ।
राखावा अर्पाया प्रथम न आपण पदार्थ चाखावा. ॥ १६६
चामर ढाळित पार्श्वीं विनय प्रेमें सदा उभी राहें, ।
पाहें **श्री**पद, नेणें बसल्यें मी काय कीं उभी आहें. ॥ १६७
माहेरीं बाळपणीं मज झाली रत्न[19]मूर्ति परि [19]पाटी ।
शिकलें तीवरि बाई! [20]साध्वीची कांत[21]भक्तिपरिपाटी, । १६८

---

१. नवऱ्या मुलीनें स्वयंवरांत एका वराला वरावें ही जुनी रीति आहे, पण या रणस्वयंवरांत पराभूति नामक वधूनें [जुनी रीति टाकून] सकळ राजांविषयीं वरण्याची सारखीच इच्छा धरून नवीन पद्धति स्वीकारली. या पराभूति नामक वधूला वरण्याला क्षितिपति (राजे) इच्छित नव्हते असें असतांही तिनें सर्वांस वरिलें. २. समेच्छ. ३. अन्य वैभव. ४. मधुसारखें मोह उत्पन्न करणारें. ५. बोध, मोहक वैभव हें आत्महित कळूं देत नाहीं. ६. भद्रावती (भद्रा)=ही केकयदेशराजकन्या. ही वसुदेवाच्या भगिनीची (श्रुतकीर्तिची) मुलगी. ७. भाग्यशालिनी. ८. कैकेयदेशराजा धृष्टकेतु. ९. मातुलेय=मामाचा मुलगा. शूरसेनाची मुलगी—श्रुतकीर्ति ही वसुदेवाची भगिनी, तेव्हां वसुदेव हा भद्रेचा मामा व त्याचा मुलगा कृष्ण हा मातुलेय. (अ० ५८ श्लोक ३८–पृ० ७५.) १०. आवडे. ११. मनाला. १२. भ्रमरी. १३. नव्या कमलाला. १४. इंद्रनीलरत्नाची कृत्रिममूर्ति. १५. कृष्णमूर्तीसारिखीच. १६. माझ्या बापानें. १७. हे सति द्रौपदी. १८. हाच माझा पति अशी मती जीची. १९. रत्नाची मूर्ति परंतु तीच मला पाटी झाली. २०. साध्वी='पतिं या नाभिचरति मनोवाग्देहसंयता । सा भर्तृलोकानाप्नोति सद्भिः **साध्वी**ति चोच्यते ॥' [मनुस्मृति–अध्याय ९ श्लोक २९]. याचा भावार्थ:—जी (स्त्री) मनानें, वाणीनें व देहानें पतीच्या मर्जीविरुद्ध कांहीं कृत्य करित नाहीं ती मरणोत्तर भर्तृलोकास जाते व तिला इहलोकीं शिष्ट लोक **'साध्वी'** असें म्हणतात. २१. पतिभक्तीचा अनुक्रम.

कर्में[1] करूनि जन्में व्हावीं होणार तीं न कंपावें, ।
जें स्वकृत[2] सुकृत दुष्कृत तें तों भोगाविणें न संपावें. ॥ १६९
वाइट फळ कां म्हणवुनि विधिसीं कोणी करूं नये झगडा[3] ।
प्रभुचरणस्पर्श घडो मी जें होईन त्या तृणा दगडा'. ॥ १७०
आत्मस्वयंवराची सांगे श्रीलक्ष्मणा[4] कथा[5] मोटी; ! ।
हो[6] टीकाकारांची श्रोत्यांची या रसीं सुखी कोटी[7]. ॥ १७१
'कृष्णाबाई! माझा तात बृहत्सेन साधुजनदास, ।
त्यास श्रीनारद ये भेटाया जेंवि शंभु धनदास[8]. ॥ १७२
त्याच्या पूजासमयीं साहित्यांत स्वयेंचि मी बाला ।
माळा अर्पुनि कंठीं, नमन करीं, सर्वयोगिजनपाला[9]. ॥ १७३
लीलाकमल स्वकरीं घेउनि होत्यें पुढें उभी कन्या, ।
अन्या गोष्टी न रुचति, मोठी मुनिवर्यवाक्[10]सुधोदन्या. ॥ १७४

---

१. या संबधानें 'हरिवरदा'कारांचा लेख असा आहे:—"अक्षौहिणी सेनेसहित । सखिया किंकरी शतानुशत । आंदण वोपोनि पदार्थ बहुत । श्रीकृष्ण कान्त मज केला ॥ १ ॥ त्याचा पादस्पर्श मज । जन्मोजन्मीं हो हें गुज । पांचाळतनये! कथिलें तुज । ऐकें बीज याचेंही ॥ २ ॥ त्रिगुणात्मकें बहुविध कर्में । तिहीं निर्दिष्ट अनेक जन्में । विविधा योनीमाजि भ्रमें । भ्रमणार मी जयावरी ॥ ३ ॥ तें या पादस्पर्शेंकरून । कर्मभ्रमणाचें निरसन । होउनि श्रेयस निज कल्याण । कैवल्यसदन पावेन ॥ ४ ॥ तरि तो पादस्पर्श मज । जन्मोजन्मीं असो सहज । परम पुरुषार्थाचें बीज । हे अधोक्षजपदसेवा ॥ ५ ॥" [१६ व्या श्लोकावरील टीका.] २. स्वतः केलेलें पुण्य आणि पाप. ३. ब्रह्मदेवानें वाईट फळ दिलें म्हणून त्याजपाशीं भांडण करूं नये. मी माझ्या कर्मामुळें दगड अथवा गवत (तृण) झाल्यें तरी ब्रह्मदेवानें मला असें कां बनविलें म्हणून भांडणार नाहीं, मात्र त्या गवताला अथवा दगडाला प्रभुचरणस्पर्श घडावा. त्या विधीनें इतकें मात्र माझ्या नशिबीं लिहिण्यास चुकूं नये. ४. श्रीलक्ष्मणा—ही मद्राधिप बृहत्सेनाची कन्या आणि कृष्णाची अष्टम भार्या. हिचा पति कृष्ण होईल असें नारदानें सांगितलें होतें. पुढें बापानें मत्स्यभेदपण केला तेव्हां स्वयंवरासाठीं अनेक राजे आले. पण मत्स्यभेद करण्यास कोणीच धजेना. मग कृष्णानें चाप घेऊन मत्स्याचा भेद केला. तेव्हां जयजयकार होऊन लक्ष्मणेनें कृष्णाच्या गळ्यांत माळ घातली—अशी कथा आहे. ५. अध्याय ५८ श्लो० ३९ पहा. ६. होवो. ७. कोटि टीकाकार आणि श्रोते या कथारसानें सुखी होवोत. ८. कुबेराला. शंकरकुबेरांची मैत्री सुप्रसिद्ध आहे. ९. सकल योग्यांच्या पालका (नारदाला.) १०. या पद्यांत 'न्या' अक्षराची आवृत्ति झाल्यामुळें अनुप्रासालंकार झाला आहे. अशीं उदाहरणें पंतांच्या काव्यांत विपुल आहेत:—(१) देवि! अहल्याबाई! झालीस जगत्रयांत तूं धन्या । न न्याय धर्मनिरता अन्या कलिमाजि ऐकिली कन्या. ॥ २ ॥ [मोरोपंतकृत स्फुटप्रकरणें—भाग पहिला—अहल्यास्तुति—काव्यसंग्रह—पृष्ठ २७३], (२) ध-

मज पाहूनि मुनि ह्मणे, 'रा[1]या! दु[2]ग्धाब्धिबंधु तूं काय? ।
मा[3]य त्रिजगाची तसि कन्या हे शुद्ध यशहि उ[4]डुराय. ॥ १७५
रूपें गुणें असीच क्षी[5]रधिजा लो[6]कपालका न वरी, ।
चवरी नृपासचि बरी, जगदीशालाचि ती रमा नवरी. ॥ १७६
अवतरला यदुवंशीं तोचि जगन्नाथ त्यास हे[7] साजे, ।
राजे खद्योत, नृपा! [8]त्यांची श्री कृ[9]ष्णभानुला लाजे'. ॥ १७७
ऐसें सांगुनि गेला मुनि मज मग तोचि लागला छंद, ।
कंदर्प[10]ज्वरहि पिता समजे, जाणेल काय तें मंद? ॥ १७८
तुझिया स्वयंवरीं पण करि जैसें म[11]त्स्यभेदन द्रुपद, ।
म[12]ज्जनकहि तेंचि रची व्हाया कन्येसि वर सुरद्रु[13]पद. ॥ १७९
[14]तो स्तंभलग्न दृष्टिस वरि मीन दिसे, तसा न हा, यास ।
स्तंभाच्या मूलीं जळ, तें साधन भेदनीं पहायास. ॥ १८०

---

मी धर्मवळावळवार्ता तों दुर्लभाचि अन्या या; । कन्या या पायांची जाणें न्याया, तथैव अन्याया ॥ ३४ ॥ [मोरोपंत—आदिपर्व—काव्यसंग्रह—पृष्ठ ३४], (३) अन्या, धन्या, कन्या, अन्यायन्याय-जाणत्या मागें । गांधर्वेंचि वरातें भजल्या; तद्गुरुहि न भरले रागें ॥ ४२ ॥ [मोरोपंत—आदिपर्व—काव्यसंग्रह—पृष्ठ ७६], (४) न चुके, कन्या अन्या धन्या कवणा वरासि अर्पावी? । क्षितिधर एकचि, न दुजा, कद्रूहि तशा दुज्या न सर्पां वी ॥ ६७ ॥ [मोरोपंत—आदिपर्व—काव्यसंग्रह—पृष्ठ २१६]. ११. नारदाच्या वाक्सुधेची उदन्या तृष्णा—उदकेच्छा, पिपासा. 'उदन्या तु पिपासा तृट् तर्ष:' इत्यमरः.

१. हे बृहत्सेना! २. क्षीरसागराचा भाऊच काय तूं? ३. माता (लक्ष्मी.) ४. चंद्र. (उडु+राय=नक्षत्र+पति) ५. लक्ष्मी. ६. अष्टलोकपालकांना. ७. ही साजते (शोभते.) ८. त्या खद्योतरूप राजांची शोभा. ९. कृष्णरूप सूर्याला. १०. कामज्वरही. ११. राधायंत्र. [श्रीमदमरचंद्रसूरिप्रणीत बालभारत—आदिपर्व, सर्ग ५ श्लोक ९२ यांत 'य: कश्चन स्पृहयति द्रुपदात्मजायै राधां स विध्यतु धनुर्धरधैर्यधुर्य:' असें वर्णन आहे. काव्यमाला—पृ० ६२.] १२. माझा पिता बृहत्सेनही. १३. कल्पतरुस्थान. १४. तो (सुप्रसिद्ध) तुझ्या विवाहपणांतील मीन (मासा). याचें स्पष्टीकरण असें:—"अवो पांचालराजतनये! । तव स्वयंवरीं जैसा माये । पार्थप्राप्तीचा उपाये । लक्षूनि यंत्र उभविलें ॥ १ ॥ गगनचुम्बित रोवूनि स्तंभ । तयाचे मूळीं स्थापूनि कुंभ । स्तंभावरी अत्यंत लांब । वंश स्वयंभ उभारिला ॥ २ ॥ तया वंशाच्चिया अग्रभागीं । मत्स्याभास पार्थालागीं । अभेद्य पार्थाविण जो त्रिजगीं । स्वयें शार्ङ्गी निर्मवी ॥ ३ ॥ बाह्य वस्त्राची जवनिका । यास्तव न लक्षे इतरां लोकां । यंत्रभेदनीं आवांका । नुपजे सकळिकां भूपाळां ॥ ४ ॥ तें यंत्र भेदूनि पार्थवीरें । तुज जिंकिलें चमत्कारें । याहूनि दुर्घटि बहुप्रकारें । माझेनि जनकें निर्मि-

ऐकुनि धांवत आले सर्वहि भूप स्वयंवरा सुसरा[1] ।
तृषित पथिक, कीं पद्मा मधुकर[2], दृष्टांत हा असो दुसरा. ॥ १८१
तातें सर्वनृपांचा केला सत्कार फार आगमनीं, ।
बाहेर सम प्रेमा[3], परि धरिला देवें[4] भूरिभाग[5] मनीं. ॥ १८२
जैसा तो पण दुस्तर, दुर्धर तैसेंचि मांडिलें चाप, ।
क्ष्माप[6] प्रबळहि, परि गुण चढवाया फार पावले ताप. ॥ १८३
सज्ज करुनि ऊचलितां चापभरें कंप सखि! शिरे अंगीं, ।
रंगीं पडले नरवर. हर! हर! मरणीं न दुःख बहु, भंगीं[7]. ॥ १८४
कोणी भूपति म्हणती, 'नृपकन्या दूर, दुर्दशा जवळी, ।
कवळील वीरवृंदीं[8] दुर्वहचापासि तो खरा गवळी[9]. ॥ १८५
भीमं[10] सुयोधन कर्ण ख्यात महावीर चापधर दक्ष ।
लक्ष-क्षत्रिय-संमत परि त्यांसहि तें न सांपडे लक्ष. ॥ १८६
रंगीं श्रीकृष्णसख त्वत्प्रिय कृष्णहि[11] उठे महाभागे! ।
भागे, परि शर सोडी तो त्या मीनासि वातसा[12] लागे[13]. ॥ १८७
श्रीकृष्णें 'साधु[14] सखे[15]! साधु' असें ह्मणुनि पोटिसीं धरिला, ।
अरि लाजले समस्तीं, स्तुतिकन्येनें तुझाचि पति वरिलें[16]. ॥ १८८

---

यलें ॥ ५ ॥ हें ऐकूनि तुझिया चित्तें । ह्मणें मानिजेल पांचालसुते! । जें नृपांमाजि अर्जुन तेथें । पातला नव्हता कीं काय? ॥ ६ ॥ अर्जुनें तेंही भेदूनि यंत्र । कां न केलें तुज कलत्र । तरी अर्जुनासही अभेद्यतर । तोही प्रकार अवधारीं ॥ ७ ॥ तुझिये स्वयंवरींचा मास । बाह्य न लक्षे प्राकृतांस । परि स्तंभमूळीं ऊर्ध्व लक्ष । धरितां नेत्रास गोचर तो ॥ ८ ॥ तैसा नोहे येथींचा मत्स्य । सबाह्य गूढत्वें अनिच्छ । यास्तव भूभुज झाले तुच्छ । श्रीवत्सांकावांचूनीं ॥ ९ ॥ स्तंभमूळीं सजळकुंभा । माजि लक्षूनि ऊर्ध्व नभा । मत्स्यभेदना भूपति उभा । पंकजनाभाविण न ठके ॥ १० ॥ तो एक सर्वज्ञ सर्वद्रष्टा । अभेद्यभेदनीं न मनी कष्टा । अपर भूपति रहित चेष्टा । कोण्ही प्रतिष्ठा न भोगिती ॥ ११ ॥ तया भूपांचा समस्त । कथितें संकेतें वृत्तान्त । तो तूं ऐकें इत्थंभूत । पांचालकनाथनंदिनीये ॥ १२ ॥ [अध्याय १९, 'श्रीहरिवरदा'नामक श्रीकृष्णदयार्णवस्वामीकृत टीका]

१. उत्तम सरोवराला. २. भ्रमर. ३. बाह्यतः सर्व नृपांवर सारखें प्रेम दाखविलें. ४. कृष्ण. ५. महाभाग (भूरि=पुष्कळ–विपुल). ६. राजे. ७. भंगीं=पराभवीं. ८. वीरसमाजांत. ९. मूर्ख (पक्षांतरीं) तो गवळी (कृष्ण) कवळील खरा, दुसऱ्याची शक्ति नाहीं. १०. श्लोक २३ पहा. ११. अर्जुन. १२. वायूप्रमाणें लागे=फक्त स्पर्श करी असा भाव. १३. श्लोक २४ पहा. १४. शाबास मित्रा! शाबास! १५. मित्रा! अर्जुना!. [या १८७ व्या आर्येला मूळांत कांहीं आधार नाहीं हें वाचकांनीं लक्षांत ठेवून पंतांच्या योजकत्वाची योग्यता–ठरवावी.] १६. तुझ्या पतीला स्तुति मात्र मिळाली.

मीनातें भेदाया रंगीं कृष्णे! सजेचिना कोणी, ।
[1]क्षोणीपति दुर्बळ, पण भारी, वाहेल वत्स कसि गोणी? ॥ १८९
मग जगदीश्वर [2]कार्मुक घेउनि पाहे जळीं [3]झषाभासा ।
मासा बाणें भेदी, तोषवि वीरांत अर्जुना दासा. ॥ १९०
क्षितिवरि समकाळ पडे मत्स्य, प्रेमळजनाश्रु, [4]सुमवर्ष, ।
हर्ष ब्रह्मांडघटीं कोंदे, तो देव गाति उत्कर्ष. ॥ १९१
होती जयजयकार स्तुतिवाद्यध्वान गायनें नृत्यें. ।
कृत्यें वर्णिति बंदी, स्तविले पार्थें मुकुंदपद भृत्यें. ॥ १९२
येतां रंगीं [5]हांसे, लाजे हंसी [6]स्वराजहंसातें, ।
[7]अंसातें वरि माळा, बाळा [8]हे वीर[9]जनवतंसातें. ॥ १९३
माळा यादवपाळा बाळा हे जेधवां सये! अर्पी, ।
[10]सर्पी [11]दहनीं पडलें, खवळे खलभूपमंडळी [12]सर्पी. ॥ १९४
स्वरथीं अंकीं घे जरि, तरि माझी पावलीच तनु कंपा. ।
होय चतुर्भुज मजवरि करि हरि [13]अरिकरिहरी [14]सदनुकंपा. ॥ १९५
जाय मृगांतुनि [15]मृगपति घेउनि निजभाग काय त्या अटक? ।
[16]भटकद्रूतनयांचें सद्गुरुगरुडापुढें किती [17]कटक? ॥ १९६
जे निर[18]पत्रप खळ नृप धरिति पथ प्रथम [19]दुष्टदमनाचा ।
[20]शमनाचा मग धरिती, भुजविक्रम अतुळ [21]गरुडगमनाचा ॥ १९७
प्रभुशर सदय प्रभुहुनि कीं मारुनि [22]भूमिवल्लभ द्रवती, ।
[23]कन्यार्थिवीरहस्तीं दिधल्या [24]सुरकन्यका [25]सुभद्रवती. ॥ १९८

---

१. भूप. २. धनुष्य. ३. मत्स्याच्या आभासा (प्रतिबिंबा). झष=मासा. ४. पुष्पवृष्टि. (श्लोक २७.) ५. मी हांसे. (श्लो० २८.) ६. आपल्या राजहंसासें. ७. खांद्याला. ८. ही मी. ९. वीर+जन+वतंसातें= योध+समुदाय+भूषणातें=वीरश्रेष्ठ अशा कृष्णातें वरि (स्वीकारी). १०. घृत. ११. अग्नींत. १२. सापीण. नागीण. १३. शत्रुगजसिंह. १४. चांगली दया. या पद्याच्या उत्तरार्धांत 'रि' अक्षराची आवृत्ति वारंवार झाल्यामुळें त्यास मनोहरत्व प्राप्त झालें आहे. १५. सिंह. यांत 'दृष्टांत' नामक अलंकार आहे. १६. शत्रुरूप सर्पाचें. कद्रू ही सापांची माता होय. १७. सैन्य. गरुडापुढें सर्पाच्या सैन्याचा काय पाड? १८. निर्लज्ज. १९. दुष्टांचें दमन करणाऱ्या कृष्णाचा. २०. यमाचा. २१. कृष्णाचा. २२. राजे. २३. कन्यायाचक अशा वीरांच्या हातांत प्रभुशर सुरकन्यका देतात म्हणून ते शर प्रभुहून सदय होत. २४. अप्सरा रणांगणीं मरण पावलेल्या वीरांस वरतात या पुराणप्रसिद्ध गोष्टीस अनुलक्षून हें वर्णन आहे. २५. कल्याणवती.

ऐशा झालों दासी[1] होऊंहि[2], दुजें मना नको यांच्या[3]; ।
कल्पशतींही पोटीं आम्रत्वाचेंचि भान कोयांच्या[4].' ॥ १९९
जरि अष्टपट्टमहिषीपाणिग्रहवृत्त[5] आयके कृष्णा, ।
कृष्णाच्या चरितामृतपानें वाढे शमेचिना तृष्णा. ॥ २००
षोडशसहस्र[6] महिषी, त्यांमध्यें एक सुंदरी[7] बोले, ।
तो लेश रस वदावा, अमृतरसहि ज्यासवें न पळ तोले. ॥ २०१
'कृष्णे! आम्ही कन्या सत्कुलजख्यातवृत्त[8] भूपांच्या ।
भौमव्यसनीं[9] पडलों जैशा कीं कीर्ति तीर्थरूपांच्या. ॥ २०२
भौमव्याध[10] स्वकपटपाशीं गोंवूनियां[11] मृगी कोंडी, ।
बुडवी शोकीं, कंठीं बांधुनि चिंताभिधा[12] महा धोंडी. ॥ २०३
देवसपत्नें[13] भौमें हे कन्यामंडली[14] बलानीता[15] ।
सीता दशकंठहृता जैसी तैसीच जाहली भीता. ॥ २०४
अंतःपुर कारागृह अश्रुश्वासानिलें[16] भिजे वाळे ।
सेवाळे[17] मणिभूतळ, धुपति[18] व्यजनोदरांत जे वाळे. ॥ २०५
श्रीकृष्णपदस्मरण स्वांतीं[19] आम्हीं करूं म्हणों काय? ।
'पाय प्रणतीं संप्रति निष्ठुर झाले,' 'नमोऽस्तु सकृपाय.' ॥ २०६

---

१. आत्माराम कृष्णाच्या दासी. २. सर्वसंगपरित्याग करून व निष्काम तपश्चर्या संपादून त्या कृष्णाच्या दासी होऊं. ३. या दासींच्या. ४. हें गीतार्थ सुभाषितरूप आहे. आंब्याच्या कोया रुजत घातल्या असतां आम्रवृक्ष उत्पन्न होतात. त्यांजवर आलेल्या फळांतील कोया पुनः रुजत घातल्या तरी आम्रवृक्षच उत्पन्न होतात. असें कितीदांही केलें तरी आम्रवृक्षच उत्पन्न व्हावयाचे, कोयांना आम्राचें भान सदासर्वदां राहावयाचें, तसेंच आम्हां दासींलाही जन्मोजन्मीं कृष्णाचेंच भान असावयाचें. ५. आठ पट्टराण्यांच्या विवाहाची कथा. ६. सोळा हजार स्त्रिया. ७. सुंदर स्त्री. ८. उत्तम कुलांत उत्पन्न झालेल्या व सदाचारसंपन्न अशा राजांच्या. ९. भौमासुरनिर्मित संकटांत. (मागें अध्याय ५९ पहा.) १०. भौमासुररूप पारधी. हें 'रूपक' नामक अलंकाराचें उदाहरण आहे. ११. कारागृहांत ठेवून. १२. चिंता आहे अभिधा (नांव) ज्यांची अशा दगडी. १३. देवांच्या शत्रूनें. १४. नृपनंदिनीसमाज. १५. जबरीनें आणलेली. १६. बाष्पांनीं भिजे आणि श्वासवायूनें शुष्क होई. १७. तें मणिभूतळ सेवाळे—त्या रत्नखचित भूमीचा तळ वारंवार पाणी पडल्यामुळें शैवालयुक्त होई. [दगडावर पाणी वारंवार पडलें असतां सेवाळी धरते—ही गोष्ट सुप्रसिद्ध आहे.] १८. व्यजनाच्या (पंख्याच्या) उदरांत (पोटांत) जे वाळे होते ते धुपत असत. (सर्वकाळ भिजून ओले राहत असत.) १९. स्वांतीं—आपल्या अंतःकरणांत.

रिपु[1] वधुनि सोडवाया सीता तद्वल्लभा[2] उशिर लागे, ।
अंतःपुरीं हतारि[3] क्षणांत तव देवि! भाउ शिरला गे! ॥ २०७
मारुनि मुरनरकांतें भगदत्ता[4] अभय राज्य दे वरद, ।
आम्हां ताप हरुनि सुख देती अमृतांशुबंधु[5] देवरद[6]. ॥ २०८
अस्मन्मन या अमृतीं होउनि विनिमग्न आपदे[7] विसरे, ।
अवलोकनसमयींच स्वप्न तसा सर्व ताप देवि! सरे. ॥ २०९
द्वारवतींत प्रभुवर आम्हां नवपद्मिनीसि हा मित्र[8], ।
एका लग्नींच वरी नानारूपें धरूनि, हें चित्र. ॥ २१०
तुमच्या आशीर्वादें जन्मोजन्मीं घडो असी सेवा, ।
हे वाङ्मनःशरीरें करितों विज्ञापना सदा देवा!' ॥ २११

---

## अध्याय चौऱ्यायशींवा.

तेथें अत्रि वसिष्ठ द्वित गौतम देवलासित व्यास, ।
ध्यास प्रभुचा ज्यांला ते पाहों येति मूर्त[9] भव्यास. ॥ १
नारद विश्वामित्र त्रित एकत याज्ञवल्क्य भृगुराम ।
मार्कंडेय अंगस्त्य[10] प्रेक्षिति येऊनि सांवळें[11] धाम. ॥ २
कश्यप सनकादि मुनि च्यवन शतानंद[12] अंगिरा जीव[13], ।
गालव[14] पुलस्त्य मधुप[15] प्रेक्षिति जगदीशपादराजीव[16]. ॥ ३
वाल्मीकि शुक पराशर कण्व भरद्वाज[17] धांवले मोर, ।

---

१. रावण. २. तिच्या वल्लभा. (नवऱ्याला—रामाला.) ३. हत (मारिले आहेत) अरि (शत्रु) असा कृष्ण. ४. भौमासुराच्या पुत्राला. ५. चंद्राचे सोबती. ६. प्रभूचे दंत. ७. दुःखातें. ८. सूर्य. ९. मूर्तिमंत कल्याण कृष्ण यास. १०. घटात् जायते इति घटजः. कुंभजन्मा अगस्त्य इत्यर्थः. घटांत वीर्यपात केल्यामुळें अगस्त्यमुनीचा जन्म कुंभांतून झाला त्यामुळें त्याला 'घटज' किंवा 'कुंभयोनि' हें नांव पडलें. कल्पांतरांत ह्या मुनीची उत्पत्ति सूर्य व वरुण यांपासूनही सांगितली आहे म्हणून त्याला 'मैत्रावरुणि' असेंही म्हणतात. ११. श्यामकांति. (कृष्ण.) १२. अहल्यापुत्र. १३. बृहस्पति. १४. श्लोक ३-५ पहा. १५. मुनिरूप भ्रमर. १६. कृष्णाचें पादकमल. १७. भरद्वाज हा ऋषि बृहस्पतिपासून तज्ज्येष्ठ भ्राता उतथ्य याचे पत्नीचे (ममतेच्या) ठायीं झाला. ममतेच्या उदरांत गर्भ (दीर्घतमा) असतांही बलात्कारानें बृहस्पति मैथुन करण्यास प्रवर्तला. तेव्हां आंतील गर्भानें (दीर्घतमानें) या नव्या गर्भाला पायानें बाहेर लोटून दिलें. या गर्भाचें पोषण करण्याची ममतेची इच्छा नव्हती, त्यावेळीं आकाशवाणी झाली कीं, 'ह्या अर्थी हा दोघांचा पुत्र (उतथ्याचा क्षेत्रज व बृहस्पतीचा औरस) आहे त्या अर्थी याचें (पोषण) तुला केलें पाहिजे.' यास्तव त्याला 'भरद्वाज' म्हणूं लागले. भर=बिभृहि, यतो द्वाजः.

थोर प्रेम दयाघनकृष्णीं, विसरति विधूसि[1] न चकोर. ॥ ४
त्या सन्मुनिवृंदातें[2] वंदी **गोविंद** सुप्रसन्न मनें, ।
ब्रह्मण्यदेव[3] लोकां कळवी कल्याण होय सन्नमनें[4]. ॥ ५

स्वकरें पूंजा[5] करुनि स्तुतिहि करी देवदेव[6], ती धाटी[7] ।
पाटी सर्व कवींची[8], कर्णांची अमृतपूरिता[9] वाटी. ॥ ६
'हे तीर्थ तीर्थरूप श्रीचरण विलोकिले अहो[10]! दिष्टें[11]. ।
शिष्टस्तुत्यचि[12] झालों कीं झाला सुप्रसन्न जगदिष्ट[13]. ॥ ७
झालें जन्म[14] सफळ हें, संसारीं लाभ हा जना सत्य, ।
रुग्णा[15] भेटों आले[16] करुणाकर वैद्यराज **नासत्य**[17]. ॥ ८
दर्शन देवां दुर्लभ तें आम्हां सुलभ भाग्य हें मोठें. ।
हरिलें आजि क्षीरधियश सारें माउलीचिया पोटें. ॥ ९
[18]प्रतिमाचि देव म्हणती तीर्थत्वें मुख्य ज्या जना तोयें[19], ।

---

१. चंद्राला. २. साधुमुनिसमुदायातें. ३. ब्रह्मनिष्ठ. ४. सत्+नमनें=साधु+नमस्कारें=साधुजनांस नमस्कार केल्यानें. ५. श्लोक ६-७ पहा. ६. कृष्ण. ७. चाल, रीत. ८. बुधजनांची. ९. अमृतानें भरलेली. १०. 'अहो' अव्यय येथें हर्षोत्कर्ष सूचवितें. ११. दैव, मोठें भाग्य. १२. शिष्टांनीं स्तवन करण्यास योग्य. १३. जगताचा इष्ट (प्रिय, आवडता असा). १४. योगेश्वराचें दर्शन झालें म्हणून जन्मसाफल्य झालें. (श्लो० ९.) १५. रोग्याला. १६. ही पंक्ति मूळांत नाहीं, ही **पं**तांच्या पदरची आहे. अशा पंक्तिरत्नांचा निर्माता भाषांतरकार होय, असें कोण म्हणेल तें म्हणो, पण हा केवळ जिव्हेचा दुरुपयोग होय. १७. नासत्य=अश्विनीकुमार, आश्विनेय, वडवा (अश्विनी) रूपधारिणी सूर्यपत्नी **संज्ञा** (त्वाष्ट्री) हिला अश्वरूपधर सूर्यापासून झालेल्या दोन पुत्रांस अश्विनीकुमार असें म्हणतात. यांतील ज्येष्ठाचें नांव **नासत्य** आणि कनिष्ठाचें **दस्र.** हे देवांचे वैद्य होत, म्हणून यांस 'स्ववैद्य' अशी संज्ञा आहे. हे सप्तविध देवांपैकीं होत. हे दोन भाऊ असल्यामुळें यांस नासत्यौ, अश्विनौ, दस्रौ, आश्विनेयौ, वाडवेयौ असें साधारण नांव आहे. हे नकुलसहदेव यांचे जनक होत. १८. धातुशिलादि मूर्तिलाच. "तीर्थस्नानमात्रीं ज्यांची । तपोवुद्धि वर्ते साची । ऐसिया अल्पता पशूंची । निष्ठा कैंची सत्पुरुषीं ॥ १ ॥ पाषाणादि प्रतिमामात्रीं । देवताबुद्धि ज्यांचे नेत्रीं । तयांची निष्ठा योगीश्वरीं । सुकृतकारी न संभवे ॥ २ ॥ योगीश्वराचें दर्शन । अंगसंवाहनस्पर्शन । नम्रता प्रश्न पादार्चन । सुकृत साधनसें न वटे ॥ ३ ॥ कीं ते स्थूल दृष्टि मूढ । देहात्मवादी जे कां दृढ । तीर्थप्रतिमा तपादि ज्वड । कर्मकावाड श्रेष्ठ गमे ॥४॥ योगीश्वरांच्या ठायीं ज्यांची । मानुषी प्रतीति वर्ते साची । यास्तव दर्शनस्पर्शनाची । पादार्चनाची असंभावना ॥ ५ ॥ जैसे आपण मनुष्यदेही । योगीश्वर ही तैसेचि पाहीं । भासती आणि त्यांच्या ठायीं । निष्ठा न बणे पूज्यत्वीं ॥ ६ ॥ त्यांच्या दर्शनें कल्याणप्राप्ती । स्पर्शनें समस्ताघनिवृत्ति । नम्रप्रश्नें आत्मसंवित्ति । अमृतावाप्ति पादार्चनें ॥ ७ ॥ ऐसी भावना नुपजे तयां । स्थूल

जो यत्न तो विषय[1]पर ऐसे जे त्यांसि काय हें होय? ॥ १०
घडलें दर्शन पादस्पर्शन[2] पूजनहि, धन्य जीवित कीं ।
नेणों किति जन्मांहीं सुकृतें[3] संपादिलीं कसीं इतकीं? ॥ ११
योगीश्वरदर्शन हें भलत्याला तों कधीं न संपादे, ।
घडतांचि अकृतसुकृतां[4] घूकांला[5] मित्र[6] तेंवि कंपा दे. ॥ १२
म्हणती तीर्थें उदकें देवहि मृद्धातु[7] लांकडें धोंडे, ।
सत्य ब्रह्मचि सारे, वेद[8]स्मृतिकृन्मतीं सुधी कोंडे. ॥ १३
ते देती बहुकाळें नियमें भजतां जनास पावनता, ।
गुरु हो! तत्काळचि ती[9] युष्मत्पद[10]देवपादपावनता. ॥ १४
अग्न्यादि[11] हरिति दुरितें भजकांचीं, परि न नाशती भेद[12], ।
हे[13] दक्षोदार[14]गुरू युष्मत्पददेव नुरविती खेद[15]. ॥ १५
देह[16]कलत्रसुतजळीं जो आत्मस्वीय[17]तीर्थबुद्धि धरी, ।
न तसी तत्वज्ञजनीं तो गोखर[18] 'जंतु[19] भार भूमिवरी.' ॥ १६

---

बुद्धि ज्या प्राणियां । असंभावना करूनियां । दृढनिश्चया अनुसरती ॥ ८ ॥ परि ते तारतम्य नेणती । स्थूलबुद्धि मंदमति । तेचि तारतम्याचे रीती । स्वमुखें श्रीपति वाखाणी ॥ ९ ॥ अम्मयें म्हणजे जलमय तीर्थें । पापक्षालनीं नव्हती समर्थें । मृत्तिकापाषाणमय दैवतें । जीं असमर्थें फळदानीं ॥ १० ॥ योगीश्वरांच्या कृतसंकल्पें । उदकें होती तीर्थरूपें । मृत्तिका पाषाण सुरप्रतापें । स्फुरती जल्पें त्याचेनी ॥ ११ ॥ तया तीर्थप्रतिमाप्रति । भजतां चिरकाळें फळें देती । साधुदर्शनें सफळ होती । मनोरथ मात्र भजकांचे ॥ १२ ॥" [श्रीहरिवरदा.] १९. उदक.

१. विषयप्राप्त्यर्थ. २. श्लो० १० पहा. ३. पुण्यें. ४. ज्यांनीं पुण्य जोडलें नाहीं त्यांस. ५. घुबड पक्ष्यांस. ६. सूर्य. ही दिवाभीतसूर्याची उपमा मूळांत नाहीं. ७. मृद्+धातु=माति+धातु. ८. वेद स्मृति करणाऱ्यांच्या मतीं. ९. ती पावनता. १०. तुमचे चरण हेच देवपादप (कल्पतरु) त्यांस जो अवनत (शरणागत) त्यास ती पावनता तत्काळ (लागलीच) प्राप्त होते. ११. अग्नि, सूर्य, चंद्र, पवन इत्यादि देव आपल्या उपासकांचीं पापें हरण करतात, परंतु भेदबुद्धीचा नाश करीत नाहींत; अग्नि इत्यादि देव पापमूल अज्ञानाचा नाश करूं शकत नाहींत, साधु मात्र समूल पापाचा नाश अल्पसेवेनें करतात. (श्लोक १२.) १२. द्वैतभाव, द्वैतबुद्धि, अज्ञानभेद. १३. तुमचे पायरूप देव. १४. दक्ष, उदार आणि मोठे असे. १५. अज्ञान. १६. देहाच्या ठायीं आत्मबुद्धि, स्त्रीपुत्रादिकांचे ठायीं स्वकीयबुद्धि आणि उदकीं तीर्थबुद्धि [प्रतिमेच्या ठायीं देवताबुद्धि—असें मूळांत ज्यास्त आहे. श्लोक १३.] १७. तत्त्वविद् सुजनाच्या ठायीं तशी आत्मस्वीय तीर्थबुद्धि ज्याची नाहीं तो गोखर (अत्यंत अविवेकी, वृषभाहूनही नीच) होय. १८. गाढव. १९. प्राणी.

सुमुनि स्तवनें, पवनें जैसे गगनांत तोयद[1] भ्रमती[2], ।
मग[3] पळमात्रें जाणति जनसंग्रह[4] हा असें अदभ्रमती[5]. ॥ १७
ब्राह्मण म्हणति, 'स्वामी ! करितां जनसंग्रहास्तव[6] स्तवन, ।
निज[7]भोगमूर्तिगौरवयुक्त श्रीमंत पूजिती भवन. ॥ १८
बहु वर्णि स्वापत्या[8] अत्यादृत तात भूमिप[9]ाहूनी, ।
आनंद न होय तसा मुकुरांत[10] स्वाननाहि पाहूनी. ॥ १९
तीर्थांच्या माहेरें पदपद्में मोहिलें रमागेहें, ।
वरदास दाससेना[11] हे नाथा ! वेतनांत[12] मागे हें. ॥ २०
देणें हेंचि पदाचें, विरह नसो आमच्या मना यांसीं[13], ।
येणेंचि बा मुकुंदा ! भववारिधिला[14] तसें अनायासीं.' ॥ २१
ऐसें विनवुनि वाडववरवृंद[15] निजाश्रमासि जायाची ।
आज्ञा स्वाज्ञानतमोमिहिरप्रभुच्या[16] पदांबुजा याची. ॥ २२
तों वसुदेव तयांतें विनवूनि म्हणे, 'भवांत[17] मज तारा[18] ।
ताराधिपचूड[19] तुम्ही, उचित नतोद्धरण[20] युष्मदवतारा[21].' ॥ २३
नारद म्हणे, 'अहो[22] ! हें चित्र[23] नव्हे, पुत्र कृष्ण, हा तात, ।
[24]तीर्थांतरासि गंगा सोडुनि काशिस्थ लोक जातात. ॥ २४
बहु सहवास अनादरकारण[25], नारायणासि नेणे हा, ।

---

१. मेघ. २. प्रत्युत्तर देण्यास असमर्थ होतात, विचारविवरणांत भ्रांतबुद्धि होतात. ३. विचार केल्यावर. ४. लोकांस मार्गाला लावणें. ५. प्रौढमति. ६. लोकांस चांगला मार्ग लागावा म्हणून. [भगवद्गीता–अध्याय ३ श्लोक २० पहा. ७. आपली तसबीर ज्यांत ठेवली असें भवन. ८. आपल्या अपत्यास. ९. राजापेक्षां. १०. आरशांत. ११. दासमंडळी. येथें 'लाटानुप्रास' आहे. १२. सेवामौल्यांत हें मागते. १३. पदाशीं. १४. भवसागरास. १५. ब्राह्मणश्रेष्ठांचा समूह. १६. स्व+अज्ञान+तमः+मिहिर+प्रभुच्या=निज+मौर्ख्य+अंधकार+सूर्य+प्रभुच्या=आपल्या अज्ञानाचा सूर्य जो प्रभु त्याच्या. आपल्या अज्ञानाला नाशिणारा जो सूर्य त्याची. १७. संसारांत. १८. जें कर्म केल्यानें कर्मांचा निहार (निरास) होईल तें सांगा असें मूळांत आहे. कर्मांचा निरास होणें म्हणजे संसारापासून तारण होणें होय. (श्लो० २९.) १९. साक्षात् सदाशिव. येथें 'दामयमक' झालें आहे. २०. शरणागतांचा उद्धार. २१. तुमच्या अवताराला. २२. अहो मुनि हो ! २३. वसुदेव श्रीकृष्णाला टाकून आम्हाला (मुनिजनाला) विचारतो–यांत कांहीं आश्चर्य नाहीं, कारण कृष्ण मुलगा आहे व वसुदेव त्याचा तात आहे अशी वसुदेवाची समजूत आहे. २४. अन्य तीर्थाला. २५. बहु सहवासानें अनादर उत्पन्न होतो, संनिकर्षानें मनुष्याच्या मनांत अनादर उद्भवतो (श्लो० ३१) हा समज सार्वलौकिक आहे. 'Familiarity breeds contempt.' 'अतिपरिचयादवज्ञा संततगमनादनादरो भवति.' 'अति तेथें माती'.

येणें हास नयो, [1]वरमणिपरिसहि [2]जानकीस [3]एणेहा. ॥ २५
कर्में [4]कर्मनिरासा पुसतो **वसुदेव** यासि तें [5]बोधा, ।
शोधा उपाय, लागो शरणागत '[6]मोहसिंधुपररोधा.'' ॥ २६
मुनि [7]म्हणती, '**वसुदेवा!** तूं ब्राह्मणभक्त साधु [8]वरशील, ।
[9]यज्ञाहीं यज्ञेश्वर **विष्णु** [10]यजावा, सुखेंचि [11]तरशील.' ॥ २७
[12]**आनकदुंदुभि** तेहां त्याचि मुनींतें [13]वरी, करी [14]यज्ञ, ।
ज्यातें पाहुनि हर्षें वाखाणिति [15]शतमखप्रमुख [16]तज्ज्ञ. ॥ २८
सत्कृति [17]विप्रप्रमुखां वर्णांची निरुपमाचि महिवर ती, ।
[18]आज्ञा घेतां देतां मुनिनृपयदुदेवदेव गहिंवरती. ॥ २९
[19]**व्यासीं भीष्मीं**हि दिसे जी पतिगृहगमनरीति कन्यांची ।
अन्यांची काय कथा? ती प्रेमा धीरताहि धन्याची. ॥ ३०
गेले **पांडुसुत**हि, परि पाहत [20]हरिपादसारसा **नंद** ।
'[21]आज उद्यां आज उद्यां' म्हणत वसे [22]सपरिवार सानंद. ॥ ३१

---

१. उत्तम रत्नापेक्षां. २. सीतेला रत्नापेक्षां कनकमृग फार प्रिय वाटला. ही कथा सुप्रसिद्ध आहे. ३. एण+इहा=मृग+इच्छा. ४. कर्मांच्या नाशा. (श्लोक ३०.) ५. बोध करा. ६. मोहसमुद्राच्या परतीरास. ७. श्लोक ३४-३५ पहा. ८. उत्तम स्वभाव. ९. फलेच्छारहित यज्ञकर्मांनीं. १०. तृष्णारहित होऊन पूर्णश्रद्धेनें यजन (पूजन) करावें. ११. जो कोणी यजन करतो तो देवांच्या ऋणापासून मुक्त होतो अशी समजूत आहे. 'जायमानो वै ब्राह्मणस्त्रिभिर्ऋणवा जायते ब्रह्मचर्येणर्षिभ्यः यज्ञेन देवेभ्यः प्रजया पितृभ्यः', 'एष वानृणः यः पुत्री यज्वा ब्रह्मचारिवासी' इत्यादि वचनांवरून ऋषींचें ऋण, देवांचें ऋण, आणि पितरांचें ऋण अशा तीन ऋणांचा बोध होतो व याच तिन्ही ऋणांचा उल्लेख वारंवार आढळतो. (रघुवंश–सर्ग ८ श्लोक ३०. शास्त्राध्ययनानें ऋषींचें, यज्ञानें देवांचें, पुत्रोत्पादनानें पितरांचें ऋण फिटतें असें वर्णन प्राचीन ग्रंथांत आहे. महाभारतांत (आदिपर्व–अध्याय १२०, श्लोक १६-२०) चार ऋणांचा निर्देश घेतला आहे. चवथें ऋण मनुष्यांचें, तें आनृशंस्यानें (दयालुपणानें) फिटतें. [यज्ञैस्तु देवान् प्रीणाति स्वाध्यायतपसा मुनीन् । पुत्रैः श्राद्धैः पितॄंश्चापि आनृशंस्येन मानवान् ॥' अध्याय १२० श्लोक १८ पहा.] १२. वसुदेव. ['आनकैर्दुंदुभिभिश्चोपलक्षितः । वसुदेवजन्मनि देवैरानकदुंदुभिवादनात्.'] १३. अंगीकारी. १४. ऋणमोक्षण करण्यासाठीं यज्ञ करी. (श्लोक ३९ वा पहा व त्याजवरील टीका पहा.) १५. इंद्रप्रमुख [देव]. १६. यज्ञकर्मकुशल. १७. विप्र इत्यादि चार वर्णांचा सत्कार अनुपम असा त्या यज्ञांत झाला. या पृथ्वीवर चारी वर्णांचा उत्तम सत्कार झाला–असा भाव. १८. जातांना अथवा प्रमाणसमयीं आज्ञा घेतां व देतांनां मुनिजनांला, राजांला आणि यादवांला मोठा गहिंवर आला. १९. कन्याची रीति व्यासांत व भीष्मांत दिसून आली, सासऱ्यां जाणाऱ्या मुलीसारखी व्यासाची व भीष्माची स्थिति झाली. २०. हरिचरणकमलाला. २१. आज जाऊं, उद्यां जाऊं, असें म्हणत नंद राहिला, गेला नाहीं. २२. सहगोपाल.

शौरि[1] म्हणे नंदातें, '[2]बंधो! हा स्नेह ईशकृत पाश, ।
याचा शूरांस बळें, ज्ञानें योग्यांसही नव्हे [3]नाश. ॥ ३२
या [4]अकृतज्ञजनीं बहु मैत्री [5]साधूत्तमीं तुम्हीं केली, ।
पाषाणशिरीं जैसी वृष्टि तसी सर्वथा वृथा गेली. ॥ ३३
फळ नसतांही मैत्री न विटे, दुष्टात्मजीं जसी माता, ।
बा! [6]तामसपतिभजनीं, [7]साध्वी नाटोपिती मना हाता. ॥ ३४
[8]प्रत्युपकारा [9]कारावासीं पूर्वीं नसेचि अवकाश ।
आतांहि [10]प्रियमधुपा बा! नीरस मी प्रफुल्ल नव [11]काश. ॥ ३५
[12]भाग्यमदें मी झालों नेत्रें असतांहि अंध [13]गोपेना ।
सोपे नाश, [14]मदीया श्रीवरि कां साधुलोक कोपेना? ॥ ३६
तुमच्या उपकारांला संख्या नाहींच, काय बोलों मी? ।
त्यांच्या कोट्यंशाची कांहींसी [15]त्वद्व्रजस्थगोलोमीं. ॥ ३७
[16]विपदर्णवांत तरलों, [17]भरलों भाग्याचिया भरीं [18]मंद ।
तुज सेतुला विसरलों, परलोकीं ख्यात तूं भला नंद. ॥ ३८

---

१. श्लोक ६१-६४ पहा. २. हे बल्लवराया! ३. या स्नेहरूप पाशाचा नाश ज्ञानानें योगी आणि बलानें शूर करूं शकत नाहींत, हा पाश दुस्त्यज आहे, कारण हा ईशकृत आहे. या स्नेहपाशाचें छेदन दुर्घट होय. या स्नेहबंधनापासून वेगळें होण्याचें सामर्थ्य शूरांस अथवा योग्यांस नाहीं. ४. कृतोपकारातें न जाणणारा असा जो मी त्या मजवर सज्जनशिरोमणि जे आपण त्यांनीं मोठी मैत्री (अकृत्रिम स्नेह) केली. ५. सत्तमीं. ६. कोपनशील नवऱ्याच्या सेवेंत. ७. हा साध्वीच्या अकृत्रिम व निरपेक्ष आचरणाचा दाखला मूळांत नाहीं. पंतांची कविता वाचित असतां लोकव्यवहाराचें जें ज्ञान होतें तें अशाच स्थळीं होय. पंतांचे काव्यग्रंथ हे एक प्रकारें उत्तम शिक्षक होत, ते चांगल्या वाईटाचा बोध करून वाचकांचें मन सुसंस्कृत करतात. यांत साध्वीचें आचरण कसें असतें हें पंतांनीं चांगलें व्यक्त केलें आहे. ८. कंसाच्या कारागारीं पूर्वीं होतों म्हणून प्रत्युपकृत (उपकाराची फेड) करण्यास मी असमर्थ होतों. कंसाचें भय न धरतां तुम्ही माझें रक्षण करून जो उपकार केला त्याची फेड करण्यास मला शक्ति नव्हती. ९. बंदिशाळेंत असतां. १०. प्रिय मधुकरा! (भ्रमरा.) हा मधुपाचा आणि काशतृणाचा दाखला मूळांत नाहीं, तेव्हां हें भाषांतर नव्हे हें स्पष्ट आहे. ११. तृणविशेष. १२. श्रीमदानें. (श्लो० ६३.) राजमदानें मी डोळे असतांही अंध झालों त्यामुळें मित्रत्वाचें व उपकाराचें स्मरण राहिलें नाहीं—असा भाव. १३. गोप+इना=गवळी+प्रभो=गोपपते नंदा. १४. माझ्या लक्ष्मीवर. १५. त्वत्+व्रजस्थ+गो+लोमीं=तुझ्या+गोकुळांत राहणाऱ्या+धेनु+केशीं=तुझ्या गोकुळांत असणाऱ्या गाईच्या केशांत कांहींशी संख्या आहे. १६. विपद+अर्णवांत=संकट, दुःख+सागरांत. १७. भरीं भरणें=नादीं लागणें. १८. मूढ.

बा! गा! चुकलों, आतां उपकार असें मुखासि आलें कीं ।
माझें तातपण मृषा, सत्य तुझें सन्मतेंचि या लेंकीं. ॥ ३९
पालन लालन बाल न पावे मज जवळिही न होता तें ।
सर्वहि तुलाचि घडलें, केलें म्यां अधिक काय हो! तातें? ॥ ४०
तूं बाप खरा, '[1]नंदन तूझे हे रामकृष्ण, मी चुलता, ।
भेद[2] न हाही, नाहीं तरि विरहें उर[3] पळामध्यें उलता. ॥ ४१
डाव्या उजव्या अंकीं बसतां तो स्पर्श वेगळा काय? ।
जाय स्तनद्वयीं मुख एकीं शिशुची न ती दुजी माय[4].' ॥ ४२
ऐसें बोलुनि रडे[5] वसुदेव, तयासि तातसा नंद ।
समजावी, तेथ वसे मासत्रय[6] तत्प्रियार्थ सानंद[7]. ॥ ४३
गोपीगोपयशोदानंदीं दिव्यांबरीं[8] ललामगणीं[9] ।
आधीं मध्यें मगही गौरव सम करि जसें भला मगणीं[10]. ॥ ४४
विसरति गोपी बाळें, ज्यासमयीं नंद सिद्धता[11] करवी, ।
मग आठवेल कोणा लोणी दहिं दूध तूप ताक [12]रवी? ॥ ४५
जपहोमभुक्त्यलंकृति, विधिमध्यें रामकृष्णही चुकले ।

---

१. मुलगे. [जो आनंद देतो तो नंदन=पुत्र.] २. बाप चुलता असाही भेद नाहीं. ३. हा शब्द प्राकृतभाषेंत पुल्लिंगी आहे. ४. येथें पंतांनीं वर्णनविस्तार केला आहे. गीति ३२-४२ यांना आधार मूळांतील ६१-६४ श्लोक होत. ५. नंदाचें मित्रपण स्मरून वसुदेवाच्या नेत्रांतून टपटपां अश्रु पडले. ६. तीन महिनेपर्यंत. (श्लो० ६६.) ७. आनंदसहित. ८. उत्तम वस्त्रांनीं. ९. भूषणसमुदायांनीं. अनेक उत्तम वस्त्रें अलंकार इत्यादि वसुदेवानें नंदादिकांस दिलें. "अनार्घ्य नानाविधोपकरणें । गोपोपयोग्य दिव्य भाजनें । क्षौमकौशेयें रोमजें तार्णें । व्रजपाकारणें समर्पिलीं ॥ १ ॥ अग्निधौतें हेमदुकूलें । अमरेंद्रभोग्यें जियें पट्टकुळें । कुबेर लोकींचीं मुक्ताफळें । मंडित वसनें महार्हें ॥ २ ॥ वरुणलोकींच्या पदार्थश्रेणी । नंदादि बल्लवां समर्पूनी । सर्व मनोरथ तिहीं करूनी । पूर्ण केले व्रजपाचे ॥ ३ ॥ व्रजनिवासी जे बल्लव । आप्त स्वजन बंधु सर्व । तिहीं सहित बल्लवराव । पारिबर्हें गौरविला ॥ ४ ॥ देवकी रोहिणी मुख्य करूनी । अष्टादश वसुदेवपत्नी । यशोदेसहित व्रजकामिनी । वस्त्राभरणीं गौरविल्या ॥ ५ ॥ रेवती रुक्मिणीप्रमुख प्रेमें । अनर्घ्य दुकूलें दिव्य ललामें । अर्पूनि पूजिती स्नेहकामें । यशोदादिकां गौळणींतें ॥६॥ ऐसें दिधलें जें जें उचित । नंदें घेऊनि तें समस्त । समस्तां पूसुनी स्वगणासहित । जाता झाला व्रजभुवना ॥ ७ ॥" [श्रीहरिवरदा.] १०. मगणाचीं सारीं अक्षरें गुरु असतात हें सुप्रसिद्ध आहे. मगणाचें आद्य, मध्य आणि अंत्य अक्षर गुरु असतें. ११. निघण्याची तयारी. १२. मंथनदंड.

[1]भवपाशहरासहि न प्रेमगुण च्छेदवे न वा उकले. ॥ ४६
देव यशोदाकंठीं घालुनि मिठी [2]किशोरसे रडले, ।
[3]अमृतस्रावि [4]सितासितमणिकंठे [5]काय ते गळां पडले. ॥ ४७
[6]नंदें धरिलें सुतयुग [7]मृगमदकर्पूरपूरसे [8]रुचिर, ।
[9]वर्षाशरदभ्रश्रिततटकनकनगोपमा [10]न ही सुचिर. ॥ ४८
नंद कुरुक्षेत्रांतुनि गेला, यदुवीरही [11]निजावासा; ।
या सार कथा गातां आवरितो [12]ग्रंथविस्तरचि [13]दासा. ॥ ४९

---

## अध्याय पंचायशींवा.

[14]जगदीश्वरप्रसादें झाला वसुदेव एकदा जागा, ।
या गातहि [15]बोधकरें मुनि [16]थोपटिती, [17]तया महाभागा. ॥ १
तो रामा कृष्णातें प्रार्थूनि म्हणे, 'तुम्ही [18]जगत्तात, ।
या तत्वा [19]मायावश मी नेणें, आज जोडितों हात. ॥ २
[20]अवतरलां विश्वंभर [21]भूभरहरणार्थ [22]वृष्णिसंतानीं, ।
[23]अंता [24]नीचां [25]न्याया, कथिलें मज नारदादि संतानीं. ॥ ३

---

१. संसारबंधछेदका (भगवंताला—कृष्णाला). २. बालकवत्. ३. अमृत स्रवणारे असे. ४. एक शुभ्र रत्नाचा आणि एक नील रत्नाचा असे दोन कंठे (हार.) ५. 'हारचि' असाही पाठभेद आहे. ६. या उत्तरार्धाला मूळांत आधार नाहीं, हें पंतांच्या कवित्वस्फूर्तीचें उत्तम द्योतक होय असें विधान करण्यास कांहीं हरकत नाहीं. पुढील गीतिही अशाच मासल्याची आहे. ७. कस्तूरी आणि कर्पूर यांचे पुंज असे. ८. सुंदर. ९. वर्षाकालीन मेघ आणि शरत्कालीन मेघ म्हणजे नील मेघ, शुभ्रमेघ यांनीं ज्याचे तट आश्रित असा मेरुपर्वत त्याची उपमा. १०. ही उपमा क्षणिक आहे, चिरकाल राहाणारी नव्हे. ११. द्वारवतीला. १२. पंतांला ग्रंथविस्ताराचें भय वाटत असे या विधानाचें हें उदाहरण आहे. १३. कविला. [या अध्यायांत कुरुक्षेत्रयात्रा, वसुदेवमखवर्णन आणि नंदवसुदेवसंवाद अशीं तीन प्रकरणें आहेत.] १४. या अध्यायांत वसुदेव रामकृष्णांची प्रार्थना करतो, ते त्याला ज्ञानोपदेश करतात, देवकीलाही बोध करून कृष्ण तिचे मृतपुत्र आणून देतो, असा कथाभाग आहे. १५. बोधरूप हस्तानें. १६. सावध करिती. १७. त्या सुप्रसिद्ध अशा. १८. जगज्जनक. १९. अज्ञानवेष्टित. २०. श्लोक १८ पहा. २१. पृथ्वीचा भार नाहींसा करण्यासाठीं. २२. यादवकुलांत. २३. नाशाप्रत. २४. दुष्टां. २५. दुष्टांचा संहार करण्यासाठीं. 'परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् । धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ।। ८ ।।'—'साधूंच्या रक्षणासाठीं, आणि दुष्टांच्या संहरणासाठीं, आणि धर्माची चागली स्थापना करण्यासाठीं युगीं युगीं मी जन्म घेतों.' [सुबोधचंद्रिका—टीका.]

कारागारीं प्रथम [1]प्रादुर्भावीं [2]चतुर्भुजाकारा, ।
हा रात्रीं [3]भानुनिभा पाहे कीं तुज [4]पयोब्धिजाहारा. ॥ ४
तेव्हां तत्वहि कथिलें, परि नेणें, [5]धारणासि मी मुग्ध, ।
[6]बाळा न दिलेंचि दिलें, त्याच्या अंजलिपुटांत तें दुग्ध. ॥ ५
[7]कंसनिदेशें जीतें अतिकष्टें [8]लोहकारही फेडी, ।
बेडी तुटली, तुजला शिवतां, ते बुद्धि विसरली वेडी. ॥ ६
तुज गोकुळासि नेतां [9]बद्ध कपाटेंहि उघडलीं वाटे, ।
वाटेना भय, [10]घनतम तव पदनखचंद्रकांतिनें फाटे. ॥ ७
वृष्टीमध्येंहि दिला एकानेंही न ताप थेंबानें, ।
तें काय रक्षिलें तुज रात्रौ म्यां चालतां पथें [11]बानें? ॥ ८
[12]नेलासि जेधवां या दासानें तूं [13]भवाटवीदमुना, ।
झाली होती [14]संपन्मदमत्ता [15]कुलजधी तसी यमुना. ॥ ९
[16]तीही जैसी दासी, स्वामिपथांतील केरसा पूर, ।
दूर क्षिप्र करी बा! लाजे या [17]त्वद्यशासि कापूर. ॥ १०
हें चित्र दुजें मोठें [18]यां दीनाही तसीच दे [19]पदेवी, ।
पद विश्वगुरो! तुझें दासाला देतसे [20]महापदवी. ॥ ११
नंदें स्वमुखें कथिलें मज कीं सा कोश [21]पूतनाकाय, ।
लीला अशाचि मागें केल्या त्वां, याचि नूतना काय? ॥ १२

---

१. प्रथम प्रादुर्भाव (उद्भव) झाला तेव्हां. २. चार भुज आहेत असा आकार ज्याचा त्याला. ३. सूर्यसमा. [सूर्याची प्रभा ही तुझीच शक्ति होय असें सूचविलें.] ४. लक्ष्मीच्या कंठींचा हार अशा तुज. ५. समजशक्तीस. ६. ही पंक्ति पंतांच्या व्यवहारज्ञानाची सूचक आहे. ७. कंसाच्या आज्ञेनें. ८. लोहार. ९. लावलेलीं. १०. दाट अंधकार. ११. म्यां बापानें तुज काय रक्षिलें? १२. 'नेलासि तूं दासानें' हा प्रयोग चिंतनीय आहे. अशा प्रकारचे कर्मणि प्रयोग मोरोपंताचे काव्यांत बरेच आढळतात. ते 'निरंकुशाः कवयः' या न्यायानें आदरणीय होत. या संबंधानें पुढील पंतांचीं पद्येंही चिंतनीय आहेत:—'**वरिलासि** मत्सखीनें; म्यांही **वरिलासि** तूं मनें; मातें। पापापासुनि रक्षीं या माझ्या चालवूनि नेमातें. ॥ १ ॥ जाउनि तो सूत म्हणे, कृष्णे! द्यूतांत तूं स्वयें धर्में । **हारविलीस** सुयोधनसदनाप्रति ये करावया कर्मे. ॥ २ ॥.' १३. संसारअरण्याचा अग्नि असा तूं. [दमुनस् (पु०) अग्नौ शुक्राचार्ये च.] १४. लक्ष्मीच्या मदानें माजलेली. १५. कुलीनाची बुद्धि. १६. ती यमुना नदी. १७. या तुझ्या यशाचें शुभ्रत्व कापूराहून ही श्रेष्ठ आहे— असा भाव. १८. या दीन वसुदेवाला. १९. मार्गे परतून जातांना. २०. मोठें ऐश्वर्य. २१. पूतनेचा देह.

विधि[1]जनकाच्या ठायीं केली सु[2]तदृष्टि म्यां सुमंदानें, ।
[3]नंदानेंही, मनिं हें न धरावें त्वां दयैककंदानें. ॥ १३
[4]मायादेवीनें हें वेड मला लाविलें तुम्ही काढा, ।
वाढा बोध[5]सुधारस, तुमचा महिमा जगत्रयीं गाढा. ॥ १४
मोहांधकूपपतिता अतितापार्ता विवेक[6]दृग्हीना, ।
[7]जीना [8]असहाया मज उद्धरिलें दीनबंधुंनीं दीना. ॥ १५
लावा निजभक्तिपथीं, न पुन्हा मोहांत हा पडो अंध, ।
'[9]बंध छेदा स्वकरें, कीं [10]भक्तकरें जसा जरासंध.' ॥ १६
देव तया [11]उपदेशी, दे [12]शीतमरीचि अमृत तृषितातें, ।
[13]जनरीतिहि रक्षविली शौरिकरें सर्व देव[14]ऋषितातें. ॥ १७
जननीजनकपदातें नित्य नमस्कारिति [15]प्रभू तनय, ।
शिकवी गुरुभक्ति जना [16]देवांचा करि हित [17]प्रभूत [18]नय. ॥ १८
एकासमयीं त्यांतें [19]तन्माता देवकी [20]म्हणे, '[21]अज हो ! ।
ईश तुम्हीं कळलें मज, [22]वरदायक [23]युष्मदंघ्रितोयज हो. ॥ १९
[24]श्रीसांदीपिनिगुरुसुत [25]यमलोकाहूनि आणिला [26]तूर्ण, ।
केला [27]गुरुदारमनोरथ [28]सच्छात्रीं तुम्हींच संपूर्ण. ॥ २०
[29]अघटितघटनापटु बहु भावीही हें घडेचिना तरुणा, ।
[30]अरुणानुज लाजविला, अमृत हरी, परि असी नसे करुणा. ॥ २१

---

१. विधीचा (ब्रह्मदेवाचा) पिता जो विष्णु त्याला मीं आपला सुत (मुलगा) असें मानिलें. २. श्लोक १९ पहा. ३. नंदानें ही सुतदृष्टी केली. ४. ईश्वराच्या उपाधीनें. ५. उपदेशामृतरस. ६. विचारदृष्टिरहिता. ७. वृद्धा मज. ८. निराश्रिता. ९. संसारबंध. १०. भीमहस्तें. ११. श्लोक २२-२५ यांत हा कृष्णाचा उपदेश आहे. १२. शीत (थंड) आहेत मरीचि (किरण) ज्याचे तो शीतमरीचि=चंद्र. १३. आत्महितार्थ गुरूस शरण जाणें, प्रार्थना करणें, इत्यादि. १४. कृष्णानें. १५. प्रभु असून जे तनय (पुत्र) होते ते, रामकृष्ण. १६. रामकृष्णांचा. १७. पुष्कळ हित करि आणि गुरुवरभक्ति करावी हें लोकांला शिकवी. या वाक्यांत 'नय' हा कर्ता आहे. १८. नयनीति. १९. त्यांची आई. २०. श्लोक २९-३३ पहा. २१. जन्मरहित हो. २२. वर देणारें. २३. तुमचें चरणकमल. २४. श्रीसांदीपिनि नामक आचार्याचा मुलगा. २५. यमगृहीं गेलेला पुत्र यमापासून आणिला. २६. त्वरित. २७. गुरु आणि त्याचे दार (बायको) यांचा मनोरथ. २८. खरे शिष्य जे तुम्ही यांनीं. २९. अघटित (कृत्य) घडविण्यांत पटु (कुशल, दक्ष). ३०. अरुणाचा धाकटा बंधु, गरुड. हें अर्ध पंतांच्या पदरचें आहे.

कंसें वधिले तुमचे [१]अग्रज शि[२]शु उपजतक्षणीं [३]सा जे, ।
ते दावाल मला, तरि तुमच्या काय न भलेपणा साजे? ॥ २२
पाहूंही न दिलें [४]मुख, कैसें त्या संकटांत [५]पाजावें? ।
तें स्मरतां मज गमतें हें सर्व त्यजुनियां तपा जावें. ॥ २३
हा! हा! देवा! माझीं [६]गर्भश्रमपात्रमात्र तीं बाळें, ।
[७]व्याळें [८]हंसीतोकें तैसीं गिळिलीं सुनिर्दयें काळें. ॥ २४
बाई! [९]रोहिणि! मजला वधिता जरि कंस तरि बरें होतें, ।
तो तें न करि, कसें विधि [१०]शोकविषें भरिल चित्त हें पोतें?' ॥ २५
[११]सुरमणि नंदन जीचे मृतबाळक आठवूनि [१२]तेहि रडे, ।
अमृतफळ मिळे, नाशे [१३]गद, तरि शोची [१४]गमावले हिरडे. ॥ २६
मातेच्या आज्ञेनें गेला [१५]साग्रज [१६]मुकुंद त्या [१७]सुतळा, ।
जेथें बळि भक्तिदयादानरसाचाचि ओतिला [१८]पुतळा. ॥ २७
[१९]श्रीरामकृष्णदर्शनसंमद भुलवी [२०]कवीश्वरा बळिला, ।
[२१]नवपुंडरीककुवलययुग जैसें [२२]चिरतृषाकुळा [२३]अळिला. ॥ २८
[२४]गुरुपूजा [२५]निर्माल्यें बळिनें केली, न लंघिलें [२६]विधिलें, ।
प्रेम [२७]तयांचें निर्मळ, [२८]मानें तीं साग्रजा [२९]दयानिधिला. ॥ २९
वंदुनि बळि [३०]हलिचक्रिस्तव करि सप्रेम, दे मन [३१]श्रीप, ।
भी [३२]पद्मा, नतवश विभु, तोहि प्रऱ्हादभक्तकुलदीप. ॥ ३०

१. पूर्वी झालेले, आधीं जन्मास आलेले. २. श्लोक ३३ पहा. ३. सहा. ४. त्या सहा मुलांचें (मुख). ५. (त्या मुलांला थान) पाजावें. ६. केवळ गर्भवासाच्या श्रमाला पात्र झालेलीं. ७. सर्पानें. ८. हंसीचीं पिलें. ९. त्या वेळेस रोहिणी जवळ होती तिला म्हणते. १०. शोकरूप विषानें. या पद्यांत 'रूपक' अलंकार झाला आहे. ११. देवश्रेष्ठ. १२. ती देवकीही. १३. रोग (नष्ट होतो). १४. गमावलेल्या हरड्यांविषयीं शोक करते. १५. बलरामासह. १६. योगमाया अवलंबून व मनुष्यदेह धरून रामकृष्ण पाताळीं गेले. १७. सुतल नामक पाताळाला. हें बलिराजाचें स्थान होय. १८. ओतलेला पुतळा बळि नामक दैत्यराज होता. १९. राम व कृष्ण यांच्या दर्शनाचा आनंद. २०. पंडितवर्याला. २१. नवें पांढऱ्या कमळाचें द्वय (पुंडरीक=पांढरें कमळ; कुवलय=कमल; युग=द्वय) तें. २२. फार दिवसांच्या तान्हेनें व्याकुळ झालेल्या. २३. भ्रमरास. २४. श्लोक ३६-३७ पहा. २५. पूर्वनिवेदित पदार्थांनीं. २६. विधीचें (उत्तम आचारपद्धतीचें) उल्लंघन केलें नाहीं. २७. त्या बलिराजाचें. २८. मानवली, पसंत झाली. २९. कृपासागरा. (कृष्णाला). ३०. रामकृष्ण यांचा स्तव. [श्लोक ३९-४६ यांत बलिकृत रामकृष्णस्तव आहे.] ३१. कृष्ण त्या स्तवाकडे मन देता झाला. ३२. लक्ष्मी भय पावली, कारण प्रभु (कृष्ण) नतवश (शरण आलेल्या जनांस वश) असतो [आणि] शरणागतांत ही बलि म्हणजे सामान्य नव्हे, सुप्रसिद्ध जो भक्त प्रह्लाद त्याचा कुलभूषण.

'देवा! सेवा जे वाक्कायमनीं[1] यांस[2] योग्य ते सांगा, ।
कां गाय स्तन्य न दे? परि वत्स सतृष्ण झोंबता आंगा.' ॥ ३१

कृष्ण म्हणे, 'राजेंद्रा! ऐक कथा सांगतों जुनी आधीं, ।
मग आज्ञा संपादुनि रामपदाब्जप्रसाद तूं साधीं. ॥ ३२

पूर्वी[3] निजकन्येला[4] भोगाया[5] एक धांवला बाप[6], ।
पाप प्रेक्षुनि हांसति[7], त्याहि मरीच्यात्मजांसि[8] दे शाप. ॥ ३३

पुत्र हिरण्यकशिपुचे झाले ते देव उग्रशापानें, ।
भ्रमले साधुहि नयपथविच्युत पूज्योपहासपापानें[9]. ॥ ३४

त्यांलाचि योगमाया[10] देवक्युदरांत नेउनी ठेवी, ।
ते वीरा! कंसानें वधिले अद्यापि शोचिती देवी[11]. ॥ ३५

ते हे आहेत विभो! तुजपाशीं साजण स्मरप्रमुख[12], ।
द्यावे माझ्या हातीं, पाहों दे देवकीस पुत्रमुख. ॥ ३६

---

१. वाक्+काय+मनीं=वाणी+शरीर+चित्तीं,=वाचिक, कायिक आणि मानसिक सेवा. २. या बलिला. ३. स्वायंभुव मन्वंतरांत. ४. सरस्वतीला, वाग्देवीला. ५. मैथुनद्वारा भोगाया. ६. ब्रह्मदेव. ७. मरीचिपुत्र हांसति. ८. मरीचीच्या सहा पुत्रांस 'तुम्ही दैत्ययोनी पावाल' असा ब्रह्मदेवानें शाप दिला. [मरीचि हा विरंचिपुत्र, याला ऊर्णा नामक पत्नीच्या ठायीं हे सहा पुत्र झाले होते.] ९. सन्मान्य ब्रह्मदेवाचा उपहास केल्यानें. १०. श्लोक ४८ पहा. "तया पापास्तव पाहीं। तत्काळ मरीचिपुत्र साही । जन्मले दैत्ययोनीच्या ठायीं। गेहीं हिरण्यकशिपूचि गे ॥ १ ॥ झणें म्हणसी पाप तें कोण। तरी श्रेष्ठाचें उपहासन ।कनिष्ठीं केलें यास्तव जाण । अधःपतन त्यां झालें ॥ २ ॥ प्रह्लादाचा सापत्न ज्येष्ठ । हिरण्यकशिपूचा पुत्र वरिष्ट । कालनेमि नामा दुष्ट । त्याचे जठरीं जन्मले ते ॥ ३ ॥ कीर्तिमंतादि नामाथिले । महा प्रतापी दैत्य भले । देवकीजठरा कैसे आले । तेंही कथिलें जातसे ॥ ४ ॥ तारकामयसमरांगणीं । कालनेमीतें चक्रपाणी । वधिता झाला तये क्षणीं । निर्जरश्रेणी आनंदल्या ॥ ५ ॥ महामायावी काळनेमी । द्वेष धरोनी पुरुषोत्तमीं । भोजकुळीं जन्मला भूमी । कंसनामा प्रतापी ॥ ६ ॥ तयाच्या वधाकारणें पुढती । पृथ्वी विधि हर निर्जरपंक्ती । जाऊनि क्षीरसमुद्राप्रती । स्तवनीं श्रीपति प्रार्थियेला ॥ ७ ॥ तयासि देऊनि वरदान । कंसा सूचिलें आसन्नमरण । देवकी अष्टमगर्भ जाण । वधील म्हणे नभोवाणी ॥ ८ ॥ कंस वधील गर्भषट्क । भावी जाणोनी हें निष्टंक । साही कालनेमीचे तोक । देवकीगर्भी योजविले ॥ ९ ॥ ते पूर्वीचे मरीचिकुमर । श्रेष्ठोपहासें जाले असुर । मायेसि आज्ञापूनि श्रीधर । देवकीजठरीं त्यां घाली ॥ १० ॥" [श्रीहरिवरदा.] ११. देवकी. १२. 'स्मरोद्गीथः परिष्वंगः पतंगः क्षुद्रभृत् घृणी । षडिमे मत्प्रसादेन पुनर्यास्यंति सद्गतिम् ॥' इति मूले दर्शितत्वात् स्मरादयः षट मरीचिपुत्राः. यांचीं नांवें:—स्मर, उद्गीथ, परिष्वंग, घृणी, क्षुद्रभृत् व पतंग.

त्यांचा शाप, सतीचा तापहि, राया! सरेल, या कार्या, ।
[1]आर्यासह मी आलों, आम्हा आज्ञा तिची [2]शिरोधार्या.' ॥ ३७
जैसे [3]ते [4]स्वशिरासह निजचरणीं क्षिप्र [5]दैत्यभूपाळें, ।
तैसेच देवदेवीं जननीचरणीं समर्पिलीं [6]बाळें. ॥ ३८
बाळें जेव्हां पाहे, [7]पान्हा श्रीदेवकीस्तना दाटे, ।
आटे [8]शोकांभोधि, [9]स्वांताला [10]हायसें तिच्या वाटे. ॥ ३९
भेटे त्या पुत्रांतें, [11]पाजी, चुंबी, रडे, सुखें हांसे, ।
जाणो ते मायेनें [12]मोहांचे घातले गळां फांसे. ॥ ४०
[13]श्रीपतिजननीस्तन्यप्राशन होतांचि जाहलें ज्ञान, ।
कां न ग्रीष्मजतापा हरि [14]दुरिताराति [15]हरिपदीस्नान? ॥ ४१
[16]झाले दिव्यशरीर श्रीरमणाच्या पदप्रसादानें, ।
दानें ऐसींचि दिलीं बहुतां दीनासि [17]तीर्थपादानें. ॥ ४२
वसुदेवदेवकीबलकृष्णांतें नमुनि ते [18]वियद्यानीं, ।
बैसुनि गेले गात प्रभुचें यश [19]हृद्यगद्यपद्यांनीं. ॥ ४३
श्रीकृष्णाची माता लाजे चित्तीं म्हणे, '[20]स्वैनाकद्रु, ।
हा सुत, कां मी व्यालें? कुमनोरथ जेंवि [21]दुर्जना [22]कद्रु? ॥ ४४

---

१. रामासह. २. शिरसा मान्य. ३. ते सहा पुत्र. (स्मरादिक.) ४. आपल्या मस्तकासह. ५. बलिराजानें. ६. श्लो० ५२ पहा. ७. श्लो० ५४ पहा. ८. शोकसागर. ९. मनाला. १०. विश्रांति झाली असें. 'हायसें' या शब्दाचा हा प्रयोग कोषकारांच्या फार उपयोगाचा आहे. ११. 'कारकदीपका'चें उदाहरण आहे. १२. हें 'उत्प्रेक्षा' नामक अलंकाराचें उदाहरण आहे. या उत्तरार्धाला कविता हें नांव शोभणार नाहीं असें कोण रसिकशिरोमणि म्हणेल? १३. कृष्णाच्या मातेचें दुग्ध प्राशन केल्यामुळें त्या बालकांला खरें ज्ञान प्राप्त झालें. "देवकीचे स्तनींचें पय । पवित्र सुस्निग्ध अमृतप्राय । अमृतोपमा केंवि लाहे । हेतु काय यदर्थीं ॥ १ ॥ जगत्पति जो गदाभृत । तत्पीतशेषस्तन्यामृत । लाजवी परमामृता निश्चित! । तर्पिले स्वसुत तत्पानें ॥ २ ॥ नारायणाचा अंगसंग । लाधले म्हणोनी एनसभंग । झाला आणि प्रत्यय चांग । आत्मस्मृतीच त्यां झाला ॥ ३ ॥ म्हणाल कैसें आत्मदर्शन । जे मरीचिपुत्र साहीजण । श्रेष्ठोपहासें पावले पतन । हें प्राचीन त्यां सरलें ॥ ४ ॥ कृष्णें पूर्वी प्राशिलें स्तन । तें त्या देवकीचें स्तनपान । घडलें तेणें निष्पाप पूर्ण । होऊनि स्वभुवन पावले ॥ ५ ॥ नारायणाचा अंगसंग । तेणें जाला एनसभंग । पूर्वस्मृतीचा लाधला योग । पावले स्वर्ग तें ऐका ॥ ६ ॥" [श्रीहरिवरदा.] १४. पापशत्रु. १५. हरिपदी+स्नान=गंगा+स्नान. १६. ते मरीचिपुत्र. १७. कृष्णानें. १८. विमानांत. १९. हृदयाभिराम अशा गद्यांनीं व पद्यांनीं. २०. स्वभक्तकल्पतरु. २१. सर्पकुळास. २२. सर्पमाता.

लोकत्रयांत केवळ वेडी मी एक बायको नीच, ।
विटल्या असतील सती मुक्तीसहि [1]हेंचि आयकोनीच. ॥ ४५
ईश्वर पुत्र असोनि प्राकृतपुत्रस्पृहा अहा! चतुरा! ।
देवकि! धन्या बाई! [2]बालिशमंडळि! तुलाहि [3]हेंच तुरा. ॥ ४६
प्रभु हो! सुरतरु मागे पतिला [4]माझी सखी उमा, ताकीं ।
इच्छा अमृतहि पीतां तुमची वेडी परंतु माता कीं. ॥ ४७
हें वेड बरें याच्या लोकाचें वेड जावया पोटा, ।
माझ्या तुम्ही तसे यश आलें मज जग हंसो नसे तोटा.' ॥ ४८
इत्यादि देवकी मृदु बोले चित्तीं, प्रभूसि कर जोडी, ।
गोडी कथेंत बहु, परि विस्तरभीरूक्ति मानिली थोडी. ॥ ४९

---

## अध्याय शायशींवा.

तीर्थें हिंडत गेला धर्मानुज अर्जुन [5]प्रभासाला, ।
आप्तमुखें [6]निजमातुलकुलवृत्तांतासि ऐकता झाला. ॥ १
[7]कृष्णानुजा [8]सुभद्रा लग्नाला योग्य [9]जाहली आहे, ।
तीतें स्वमतें [10]हलधर [11]धृतराष्ट्रसुतासि द्यावया पाहे. ॥ २
[12]तातादिक म्हणति मनीं, 'सुमति खलाला, [13]अचक्षुला रत्न, ।
शूद्रास [14]श्रुति देतो रांम, न चालेचि यापुढें यत्न.' ॥ ३
ऐकुनि मनीं [15]म्हणे, 'मज [16]तीर्थस्नायीस जाहली शुद्धी, ।
या [17]सुकृतें [18]हे व्हावी प्राप्त, विरक्तासि जेंवि सद्बुद्धी. ॥ ४

---

१. मत्पुत्रानयनरूप भगवच्चरित्र. २. हें संबोधन आहे. ३. मीच. ४. 'ती मत्सखी' असा पाठ आहे. ५. द्वारकेजवळील तीर्थाला. ६. आपल्या मातुलाच्या (मामाच्या—वसुदेवाच्या) कुलवृत्तांतास (यादववंशवृत्तांतास). याचें वर्णन पुढच्या आर्येत आहे. ७. कृष्णाची धाकटी बहीण. ८. ही अर्जुनाच्या मामाची मुलगी. ९. या आर्येविषयीं 'निबंधमाले'त पुष्कळ विवेचन केलेलें आहे तें इष्ट तर पहावें. ही आर्या अगदीं सुगम असून तिच्या अर्थाविषयीं अशी ओढाताण व्हावी हा मोठा चमत्कार होय. [निबंधमाला—अंक ५३ पृ० ३०-३१; अंक ५८ पृ० १६-१७; अंक ५९ पृ० ३१-३२.] १०. बळराम. ११. दुर्योधनास. १२. वसुदेवादिक. १३. अंधाला. १४. वेद. १५. अर्जुन म्हणे—असा संबंध. १६. तीर्थांत स्नान करणाऱ्या मला. १७. तीर्थस्नानपुण्यानें. १८. ही सुभद्रा.

निजसुखसिद्धि[1] सुभद्रा साधाया होइन त्रिदंडियती[2], ।
प्रिय तीहूनि नसे मज, ती[3], कीं ही रीति, गति[4] अहो! नियती![5]' ॥ ५
पार्थ त्रिदंडिवेष स्वीकारी हलधरासि वंचाया[6], ।
युक्तीनें स्वपरविहितहित[7] करितां कपटदोष कंचा[8] या? ॥ ६
द्वारवतींत वसे तो यति वार्षिक चारमासपर्यंत[9], ।
हर्यंतःकरणासचि[10] ठावा तद्योग[11] जो सपर्यंत[12]. ॥ ७
मौन, सदा एकांतस्थिति, साधुसमाधियोग, सुविरक्ती[13], ।
सक्ति न लोकसमाजीं, लागे पौरांसि पार्थयतिभक्ती. ॥ ८
मोठेमोठेहि[14] मठद्वारांतुनि भेटि घेति पायांची, ।
असमशरज्वरभर[15] खर[16] करपवि, वरिवरि समाधि वायांची[17]. ॥ ९
रामासहि कळलें कीं, 'योगी मोठा असे.' म्हणे, 'पाहूं, ।
आहों ब्रह्मण्य[18], तया आणूं भिक्षेसि, शिर पदीं वाहूं.[19]' ॥ १०
तो यति एकेदिवसीं बलदेवें आणिला स्वगेहास, ।
पूजुनि सुश्रद्धेनें[20] जेववितां माधवास ये हास. ॥ ११

---

१. आपल्या सुखाची सिद्धि अशी. २. त्रिदंडी संन्यासी. [याच्या उजव्या हातांत तीन दंडांचा एक झालेला असा दंड असतो. मन, वाणी आणि देह यांचें दंडन (शमन) ज्यानें केलें असा संन्यासी. ज्याच्या वाणीनें, मनानें आणि देहानें यथानुक्रम निषिद्ध कथन, असत्संकल्प आणि निषिद्ध व्यापार यांचा त्याग केला आहे असा संन्यासी; मनोदंड, कायदंड आणि वाणीदंड करणारा पुरुष. 'वाग्दंडोऽथ मनोदंडः कायदंडस्तथैव च । यस्यैते निहिता बुद्धौ त्रिदंडीति स उच्यते ॥' मनुस्मृति—अध्याय १२ श्लो० १०.] ३. ती सुभद्रा. ४. ती (सुभद्रा) कीं (किंवा) ही रीति (त्रिदंडी यति होऊन राहणें) [हीच] गति (परिणाम) अहो! नियति—असा अन्वय. सुभद्रा प्राप्त होईल तर बरेंच आहे, नाहीं तर संन्यासीच राहणें बरें. प्रारब्धीं काय लिहिलें असेल कोण जाणे! ५. दैव. ६. ठकवायास. ७. आपलें आणि दुसऱ्याचें योग्यहित. ८. कोणता, कशाचा. ९. चातुर्मासापर्यंत. १०. हरीच्या अंतःकरणाला. ११. त्या पार्थाची मसलत, युक्ति. १२. संपूर्ण. स+पर्यंत=सहित+अंत=अंतासहित, सकल. १३. तीव्र वैराग्य. १४. श्रेष्ठजन. येथें विशेषणाची द्विरुक्ति करून गुणाचें आधिक्य दाखविलें आहे. १५. असम+शर+ज्वर+भर=विषम (पांच)+बाण+ताप+आधिक्य=कामशराचा ज्वरभर. १६. तीव्र. १७. व्यर्थच. १८. भक्तिमान्, भजनशील. १९. त्या यतीच्या चरणीं शिर (मस्तक) वाहूं (समर्पण करूं). [शिर वाहणें=फुल देवास जसें वाहतात तसें चरणरूप देवतेला शिरःकमल वाहणें, नमस्कार करणें, अतिथीचा चांगला आदरसत्कार करणें हा शिष्टसंप्रदाय होय, त्यास अनुसरून बलरामाची उक्ति आहे.] २०. उत्तम भक्तिभावानें.

यतिदर्शना सुभद्रा येउनि बैसे [1]निजाग्रजाजवळ, ।
न बल प्रेक्षी, परि यतिहस्तींचा [2]पाहतां गळे कवळ. ॥ १२
घाली घृतांत सैंधव, दुग्धीं [3]जंबीर, पायसीं [4]कथिका, ।
[5]मंथि कामशर जया त्या राम म्हणे 'साधु' [6]मोक्षसत्पथिका. ॥ १३
[7]आर्यास निजसुरी ती उत्तरदानांत कन्यका यतिला ।
पाहूनि भुले, स्मर तो रति ती, दृष्टांत अन्य काय तिला? ॥ १४
जीच्या [8]प्रवृत्तिनें वश केला आधींच [9]सर्ववीरमणी ।
त्यास कटाक्षप्रेक्षणबाणीं मोहील कां न ती [10]रमणी? ॥ १५
कन्यारत्न हराया अवसर पाहे जसा खरा चोर ।
घोरप्रताप, परि भी भीमानुज, कीं [11]अनंतबळ थोर. ॥ १६
[12]दामोदर [13]दासा दे अनुमोदन ती हरावया नवरी, ।
[14]दादास देव दावी [15]दारकरीति स्वयें सदैव [16]वरी. ॥ १७
ताताला मातेला एकांतीं गुह्य [17]वृत्त हें कळवी, ।
[18]बळवीरभीति [19]कोपोपशमोपायासि सांगुनी पळवी. ॥ १८
अनुकूल [20]ब्रह्म तसें तों [21]झालें तन्मनोरथा पर्वें, ।
तीर्थस्नान कराया पुरवासी लोक चालिले सर्व. ॥ १९
नरहयरथगजशिबिकारूढ सकळ [22]वृष्णिदारजन चाले, ।
झाले सिद्ध वऱ्हाडी, तैसे [23]यदुभट; [24]धरा बळें हाले. ॥ २०
दिव्यरथांत सुभद्रा बैसुनि सेनेंत तेधवां शोभे, ।

---

१. आपल्या ज्येष्ठ भावापाशीं. २. (सुभद्रेला) पाहतां. (श्लो० ७.) ३. लिंबु. ४. कढी. ५. मथन करी. ६. मोक्षमार्गाच्या वाटसरूस. ७. आर्यास (बलरामास) उत्तरदानांत (प्रत्युत्तर देण्यांत) जी निजसुरी (निद्राकुळ) ती कन्या. ८. वृत्तांतानें. ९. सकल शूरजनांचा मणि (अग्रणी)=अर्जुन. १०. सुंदरी (सुभद्रा). ११. अनंताचें (शेषाचें—बलरामाचें) बल (सामर्थ्य). बलराम हा शेषाचा (अनंताचा) अवतार होय. १२. कृष्ण. १३. स्वभक्ता (अर्जुना). १४. बलरामाला. १५. लहान मुलाची रीत. १६. बाहेरून, बाह्यात्कारीं. १७. हा यति नव्हे, तर पृथातनय अर्जुन होय व हा सुभद्राहरणार्थी होय, असें कळविलें. १८. बलवीराचें भय. १९. राग शांत होण्याचा उपाय. २०. परब्रह्म (कृष्ण). २१. ज्याप्रमाणें कृष्ण त्याच्या मनोरथास अनुकूल झाला त्याप्रमाणेंच एक पर्वही त्याचा हेतु सफळ करण्यासाठीं त्याला अनुकूल झालें. २२. यादवांच्या स्त्रियांचा समूह. २३. यादववीर. २४. पृथ्वी बळें (सैन्यानें) दणाणून गेली.

य[1]न्मुखसुधाकरें न[2]रवरपार्थाशयपयोनिधि क्षोभे. ॥ २१
तेव्हां धांवुनि बैसे पा[3]र्थ सुभद्रारथीं, जसा पाटीं ।
सु[4]चिरक्षुधित ब्राह्मण 'हां[5]हां' म्हणतांहि वाढिल्या ताटीं. ॥ २२
समयज्ञ चतुर सेवक धनु तू[6]ण तशांत [7]देति आणोनी, ।
धांवति रक्षक सैनिक [8]कपटयतिकृतात्यनर्थ जाणोनी. ॥ २३
त्यातें म्हणे, 'सु[9]भद्रामुक्ताहरवीर अर्जुनम[10]राल ।
समरा लक्षहि या परि काक तुम्ही गति विसर्जुन मराल. ॥ २४
धर्मानुज मी अर्जुन सिंह, तुम्ही शशकिशोर, आ[11]टोपा, ।
या टोपा कवचाच्या भीमा वें[12]गा उगेचि आ[13]टोपा'. ॥ २५
ऐसें नीट दटावुनि जाय सुभद्रा हरूनि तो पार्थ, ।
मारिति हांका केवळ, नागविला वनिं जसा [14]वणिक्सार्थ. ॥ २६
सार्थक पार्थ करी, ती कै[15]रविणी तो सु[16]धांशु गौरविता, ।
[17]सविता बि[18]सिनीसि वरी, कीं भेटे तो[19] गुणज्ञ ती[20] कविता. ॥ २७
श्रुतिस[21]त्क्रिय धर्मपथा शोभविती दंपती तसे स्वरथा, ।
अन्योन्यप्रिय संगम, तो प्रेमळ भक्त, ती मुकुंदकथा. ॥ २८
[22]झटिति [23]भटकटक बहु करि 'कन्या नेली' म्हणोनि बोभाट, ।

---

१. जिच्या मुखरूप चंद्रानें. २. नरवर जो पार्थ त्याचा आशय (मन) तो पयोनिधि (समुद्र) तो. चंद्राच्या योगें समुद्रास भरती येते ही गोष्ट सृष्टिशास्त्रांत सुप्रसिद्ध आहे. चंद्रोदयीं समुद्र उचंबळतो असें वर्णन 'रघुवंशां'त अनेक ठिकाणीं आहे. [रघुवंश—सर्ग ३ श्लो० १७; स० ५ श्लो० ६१; स० ७ श्लो० १९; स० १० श्लो० ८२; स० १६ श्लो० २७.] 'नदीशः परिपूर्णोऽपि चंद्रोदयमपेक्षते' असें 'पंचतंत्रां'त आहे. चंद्रदर्शनानें सागराला आनंद होतो असें वर्णन संस्कृत काव्यांत वारंवार आढळतें ही गोष्ट शोधक वाचकांस सांगावयास पाहिजे असें नाहीं. ३. अर्जुन. ४. पुष्कळ दिवसांचा भुकेलेला. ५. निषेध करीत असतांही. [हां हां—हें निषेधवाचक अव्यय.] ६. भाता. ७. कृष्णानुमतें देती. ८. कपट यति+कृत+अत्यनर्थ=कपटी संन्यासी+केलेला+मोठा अनर्थ=खोट्या यतीनें केलेला सुभद्राहरणरूप मोठा अनर्थ, कामिनीहारक संन्यासी असें जाणून. ९. सुभद्रा हीच मुक्ता (मोतीं) तिचें हरण करणारा वीर (शूर) अर्जुन हाच मराल (हंस). हें रूपकाचें उदाहरण आहे. १०. हंस. ११. मरा. १२. घोड्याचे लगाम. १३. आवरा. १४. व्यापारी लोकांचा तांडा. १५. कमलिनी. १६. चंद्र. १७. सूर्य. १८. पद्मिनीस. १९. अर्जुन. २०. सुभद्रा. २१. उत्तम क्रिया (वर्तन) करणारा—सत्कर्म मार्गानें जाणारा. २२. सत्वर. २३. योधसैन्य.

वाटे [1]बळासि सांगे जो जो त्या [2]दस्युचाचि तो [3]भाट. ॥ २९
[4]प्रस्फुरदधरदल प्रभु बलभद्र म्हणे, ‘खरेंचि सांगा, रे! ।
कोठें तो कपटपटु? गांठितसे जो [5]पटांत आंगारे. ॥ ३०
कोठें रथ? [6]मुसळ पुरे, कवच कशाला? धनुष्य राहों द्या, ।
वत्सेला [7]निजधर्षणकरखलदंडोत्सवासि पाहों द्या. ॥ ३१
[8]छळ या बळदेवासीं, खळ बालिश, [9]‘कुंतिनृपसुते! आते! ।
[10]हां तेजस्वी पंचम, गुरुवंचक योग्य तुज नव्हें माते!’ ॥ ३२
[11]पर्वीं [12]अर्णव तैसा भगवान् बलभद्र पुष्कळ क्षोभे, ।
[13]संध्यारागसुरंजितशरदभ्राहूनि फार तो शोभे. ॥ ३३
कोप[14]ज्वरभरकंपितकाय [15]प्रभु लोचनें करी [16]शोणें, ।
होणें पुढें [17]सुदुर्घट, वारावें त्या महेश्वरा कोणें? ॥ ३४
जाय हळूच [18]विनयनतकाय चतुर वृष्णिराय देव हरी, ।

---

१. जो जो (पुरुष) बळासि (बळरामाला) (ही वार्ता) सांगे तो तो त्या दस्युचा (चोराचा—अर्जुनाचा) भाटच (स्तुतिपाठकच) वाटे. प्रत्येक सुभद्राहरणवार्ता सांगणारा पुरुष अर्जुनप्रतापाचेंच वर्णन करूं लागला. २. चोर, अर्जुन याचा. ३. स्तुतिकर्ता. ४. प्रस्फुरत्+अधर+दल=कांपणारे+ओंठ+पत्र=क्रोधावेशानें ज्याचे ओंठ कांपतात असा. ५. ‘गुणांत’ असाही अन्यपाठ आहे. सुतांत किंवा वस्त्रांत निखारे बांधणारा. ६. त्या चोराचा खरपूस समाचार घेण्यास नुसतें मुसळ पुष्कळ आहे. ज्यास्त आयुधांची आवश्यकता नाहीं. [बलरामाचें आयुध ‘मुसल’ होय म्हणून त्याला ‘मुसली’ अशी संज्ञा आहे.] ७. आपणास बलात्कारानें धरून नेणारा, जो खळ त्याच्या दंडरूप उत्सवास, वत्सेला पाहूं द्या. ८. कपट. ९. कुंतिनृपाच्या कन्ये! हें इंग्रजी साहित्यशास्त्राप्रमाणें Apostrophe नामक अलंकाराचें उदाहरण आहे. उपस्थित नसणाऱ्या मनुष्याला तो उपस्थित आहे असें समजून संबोधन केलें असतां ‘परोक्षजनसंबोधनोक्ति’ नामक अलंकार होतो. या अलंकाराचा उपयोग पंतांनीं अन्यत्रही केलेला आहे. ‘गे बाई कौसल्ये! संसाराला न हे वृथा आली, । झाली तुहिनकरकुळीं उत्पन्न तुजी तुझी पृथा आली. ॥’ [सभापर्व—अ० ७ गी० ५२ पृ० ६७.] १०. मी तुझा पांचवा पुत्र होईन (अर्जुन मारून). ११. अमावास्या व पौर्णिमा या दिवशीं. (श्लो० ३१.) १२. सागर. १३. संध्याकाळीं तांबडें झालेलें जें शरत्कालीन अभ्र त्याहून; सायंकालच्या लालपणानें रंगविलेल्या शरत्कालीन मेघापेक्षां अधिक शोभे. (बलराम रागानें फार लाल झाला—असा भाव.) १४. अतिशयित कोपानें ज्याचें काय (देह) कांपत आहे असा. १५. बलराम. १६. आरक्त. १७. (त्याच्या—बलरामाच्या) पुढें होणें (देखील) सुदुर्घट [मग] त्या महेश्वरा कोणें वारावें? त्या बलरामाच्या पुढें जाऊन उभें राहणें सुद्धां फार कठीण, मग त्याचें निवारण कोणी करावें? त्या महेश्वराचें निवारण करण्यास कोण समर्थ आहे? १८. विनयानें नम्र आहे काय (देह) ज्याचा असा (कृष्ण).

माय सुतार्थ पतीचे[1] काय? गुरूचे नमूनि पाय[2] धरी. ॥ ३५
नमनीं प्रकटवि सहभव[3] सद्गुण शांतिक्षमानुकंपादी[4] ।
कंपा दीनसख नुरवि अधरीं, प्रणतींहि भव्य[5] संपादी. ॥ ३६
हांसे **बलभद्र** म्हणे, '**कृष्णाक्रूरो**द्धवा! अहो! कळलें, ।
वळलें मन, मत्पद[6] भय सोडा, आदान[7] बंधुचें[8] टळलें. ॥ ३७
जा जा, उठा, मुलीला पाहूं वाहूं,[9] वरां[10] घरा आणा, ।
प्राणाधिक[11] तो येना, तरि घालाव्या मदंघ्रिच्या[12] आणा[13]. ॥ ३८
अथवा कशास? शासनभय धरुनि मनीं पळेल तो दूर, ।
शूर ख्यात पळेना नेऊं द्या पारिबर्ह[14] **अक्रूर**. ॥ ३९
धाडा भूषावसनें दासीदासाश्वहस्तिरथरत्नें, ।
झाला **भगीरथाचा पार्थ** सखा आजि या महायत्नें. ॥ ४०

---

१. मुलासाठीं माता जणूं काय नवऱ्याचे पाय धरते तशी कृष्णाई अर्जुनासाठीं बलभद्राचे पाय धरी—असा भाव. २. दीनांचा मित्र (कृष्ण) बलरामाचे पाय धरी. "जेणें सुभद्राहरण केलें । त्यातें नाहीं ओळखिलें । म्हणूनि क्रोधाचें भरतें आलें । तें उपसंहरिलें पाहिजे ॥ १ ॥ कुढावला जो अमरेंद्र । तो प्रत्यक्ष अर्जुन वीर । पितृष्वसेचा तृतीय कुमर । सुहृद साचार जिवलग हा ॥ २ ॥ अणिक एक ऐकें मात । परम गुह्य जो वृत्तांत । जेणें होय दोषलिप्त । तो संकेत अवधारीं ॥ ३ ॥ सुभद्रा जन्मली यादवघरीं । परि हे शची पौरंदरी । यास्तव अर्जुनालागिं वरी । विघड न करीं पैं यांचा ॥ ४ ॥ इचा करिसी मनोभंग । तरी हे करील स्वतनुत्याग । तेणें अपकीर्तीचा डाग । लागल्या अभंग मग न वचे ॥ ५ ॥ भो भो स्वामी संकर्षणा । तुझे अंतरींची वासना । सुभद्रा द्यावी दुर्योधना । ते अर्जुना केंवि देणें ॥ ६ ॥ तरी तूं ऐकें इयेविशीं । सुरेंद्र जाणोनी अर्जुनासी । इनें वरिला निश्चयेसी । दुर्योधनासी हे न वरी ॥ ७ ॥ कलिपुरुषाचा अवतार । तो हा प्रत्यक्ष गांधार । सुभद्रा याचा न शिवे कर । हा निर्धार मी जाणें ॥ ८ ॥ बलात्कारें अघटित घडतां । सुभद्रा करील आत्मघाता । कृष्णें ऐसें स्मरण देतां । रामें तत्वता जाणितलें. ॥ ९ ॥" [श्लो० ११ वरील 'श्रीहरिवरदा'नामक श्रीकृष्णदयार्णवस्वामीविरचित टीका.] ३. स्वाभाविक नैसर्गिक सद्गुण. ४. शांति, क्षमा, दया इत्यादि सात्विक गुण. ५. कल्याण. ६. मत्पद सोडा व भय सोडा. ७. धरणें, मोठें भय. ८. अर्जुनाचें. ९. यथाविधि अर्पण करूं. १०. वराला (नवऱ्याला) घरा (द्वारकाभवना) आणा. ११. प्राणाहून अधिक (प्रिय) असा वर. (अर्जुन.) १२. मत्+अंघ्रिच्या=माझ्या+पायांच्या. १३. शपथा. १४. आंदण, भेट, नजराणा.

हें रसिककर्णतर्णकशत[1] तर्पायासि कामधेनु[2] कथा ।
करिती प्रभुवर अनुचरपरसुखकर अनुसरोनि लोकपथा. ॥ ४१

---

## अध्याय सत्यायशींवा.

श्रीश्रुतदेव ब्राह्मण होता मिथिलेंत भक्त देवाचा, ।
सेवा चालवि भावें, मूर्त प्रेमाचि वासुदेवाचा. ॥ १
श्वश्रूवशासीच[3] नियति[4] सौहित्य[5] करी, न संग्रहीं कवडी, ।
शमधनकनकनग[6], न मन विषयीं, सोडूनि माधवा[7], दवडी. ॥ २
त्या राष्ट्राचा[8] पालक राजा बहुलाश्व[9] तोहि हरिदास[10], ।
ज्या सज्जनमित्रास[11] त्रास न दे राज्यदारसहवास[12]. ॥ ३
बहुलाश्व श्रीमंत, श्रुतदेव दरिद्र, परि सम प्रेमा, ।
ते मातेस सुत तसे प्रिय विभुस[13], भुले न भूतिपति[14] हेमा[15]. ॥ ४
त्या चातकां घनपावन[16], चकोर कां यादवेंदु[17] हरि दोघां ।
भेटाया जाय दयासागर[18] त्या प्रेमभक्तिसरिदोघां[19]. ॥ ५
प्रभुसह नारद[20] अत्रि व्यास असित वामदेव राम शुक ।
कण्व च्यवन गुरु असे बहु, देव सुरद्रु[21], ते मुनींद्र शुक[22]. ॥ ६
त्यजिते कृष्णसुरद्रुम[23] मुनिशुक[24] वरिते प्रपंचकिंशुक[25] ते, ।
थुकते जरि न विषयफळ, मुकतेचि सुखासि, समय हा चुकते. ॥ ७
अक्षय अमृतकलश विभु सकरुण मुनिवैद्य कविमना[26] वाटे, ।

---

१. रसिक कर्णरूप वत्सांचें जें शत तें. २. प्रभुवर (बलराम व कृष्ण) लोकपथा (जनमार्गी) अनुसरोनि, रसिककर्ण (रसिक लोकांचें कान) हेंच तर्णकशत (बालकशतक) तर्पायासि अनुचरपरसुखकर (भक्तांना अत्यंत सुख देणाऱ्या) कथा (लीला) कामधेनु करिती—असा अन्वय. ३. सासूच्या आज्ञेंत जशी सून तशी. ४. दैव. ५. गृहकृत्य चालवी. ६. शम हाच वित्तमेरुपर्वत ज्याचा असा. ७. माधवा सोडूनि विषयीं मन न दवडी—असा अन्वय. मन विषयसुखांत न घालतां माधवचरणपद ध्यानांत ठेवी. ८. विदेहदेशाचा. ९. नामविशेष. १०. हरिभक्त. ११. साधुजनांच्या मित्राला. १२. राज्य आणि स्त्री यांचा सहवास. १३. कृष्णाला. १४. कृष्ण. १५. राजाच्या ऐश्वर्यास. १६. चातकांस मेघ. १७. किंवा चकोरांस चंद्र. १८. कृपोदधि. १९. प्रेमभक्तिरूप जी नदी तिचे ओघ जे बहुलाश्व श्रुतदेव त्यांतें. २०. अ० ८६ श्लो० १७-१८ पहा. २१. कल्पवृक्ष. २२. पक्षिविशेष (पोपट). २३. कृष्णरूप कल्पवृक्ष. २४. मुनिरूप कीर (पक्षी). २५. प्रपंचरूप पळस. २६. बुधमना.

भवरोगियासि वांटुनि जोडिति पुष्कळ यशोधना वाटे[1]. ॥ ८
जनपदजन[2] पदपंकज[3] परपुरुषाचें[4] पहावया येती, ।
घेती आकंठ अमृत, सुतृषित उद्गार[5] फारसे देती. ॥ ९
अन्नप्रदसदनातें दूरुनि धांवोनि येति दुष्काळीं, ।
तैसे चतुर्विधहि[6] जन मज्जति[7] अमृतऱ्हदीं जगत्पाळीं[8]. ॥ १०
कृष्णागमनश्रवणीं झाल्या स्नानाशनक्रिया[9] शिथिला, ।
मिथिला सीतोपयमावरि[10] पाहे या सुखप्रदा तिथिलीं[11]. ॥ ११
मिथिलापुरीस जातां, करि पुष्कळ मुक्तिमूर्ति[12] उत्सव ती[13], ।
जसि काय[14] जाय माय[15] स्वसुतेसि पहावयासि भाग्यवती. ॥ १२
त्या पुष्पवाटिकेला[16] शोभेची काय दे वसंत धणी[17]? ।
भक्तपुरी गौरविती, लीलानरकाय[18] देव संत धणी. ॥ १३
मिथिलोदरांत[19] होते जे सात्त्विकभाव[20] तीं अनादि सलें[21] ।
तद्वृद्धिसुखप्रसवें[22] यश कृष्णीं वैद्यसज्जना दिसलें[23]. ॥ १४
बहु दिवसीं पति येतां करि बहु मिथिला पतिव्रता साज[24], ।
आज द्वारवती[25] तज्ज्येष्ठसपत्नी मनीं धरी लाज[26]. ॥ १५
धाडी पुढें स्वजनसुत शृंगारुनि ती पतिव्रता मिथिला, ।
जाऊं पाहे, परि गति लज्जाभूषाभरोत्सवें[27] शिथिला[28]. ॥ १६

---

१. वाटेस, मार्गांत. २. जनपदांतील (देशांतील) लोक. ३. चरणकमल. ४. पुरुषोत्तमाचें. ५. ढेंकर. ६. चार वर्णांचे लोक. ७. न्हाती, मज्जन करतात. ८. जगताचें पालन करणारा कृष्णरूप अमृताचा डोह त्यांत. ९. स्नान+अशन (भक्षण)+क्रिया=स्नान करणें+भक्षण करणें इत्यादि कार्यें. १०. सीता+उपयमावरि=सीतास्वयंवरोत्सवानंतर; उपयम=विवाह. ११. ही कल्पना मूळांत नाहीं. १२. मुक्तिदात्री. १३. ती मिथिला. १४. काय जाय माय—यांतील अनुप्रास पहाण्याजोगा आहे. यांत उत्प्रेक्षालंकार झाला आहे. १५. आई. १६. फुलबागेला. १७. तृप्ति. १८. लीलेनें मनुष्याचा देह ज्यानें धारण केला आहे असा. १९. ही पंक्ति पंतांची आहे. २०. सात्त्विक भाव आठ आहेत. २१. पोटांत गर्भ धारण झाल्यावर कांहीं कारणानें गर्भाची वाढ खुंटते. अशा गर्भाला मराठींत 'सल' म्हणतात. २२. स्त्रीगर्भांतील सलें जशीं वाढून प्रसवतात तसे अष्टसात्त्विकभाव बाहेर प्रकट झाले. २३. याचें यश कृष्णीं आलें असें सज्जन वैद्यास वाटलें. पूर्ण रूपक फार चांगलें साधलें आहे. २४. थाट माट, अलंकार भूषणें घालून नटणें. २५. ही कल्पना मूळांत नाहीं. २६. त्या मिथिलेची वडील सवत. २७. मिथिलेच्या मतीला शिथिलत्व कां आलें याचीं तीन कारणें पतिव्रतेला अत्यंत साजतील अशीं मोठ्या मार्मिकतेनें पंतांनीं दिलीं आहेत. पहिलें—लज्जा म्हणजे मर्यादा. दुसरें—भूषाभर म्हणजे अलंकारांनीं लादल्यामुळें झालेलें ओझें. तिसरें—

मिथिलापुरवासिजनें [1]निजनेत्रसरोरुहें [2]उदश्रुजळें ।
प्रक्षाळिलीं प्रथम, मग भगवच्चरणीं समर्पिलीं [3]उजळें. ॥ १७
बहुलाश्व श्रुतदेव प्रेमें धांवोनि वंदिती पाय, ।
काय उपायन दुसरें? अर्पिति चरणीं [4]स्ववाङ्मनःकाय. ॥ १८
दोघेहि एकदाचि प्रार्थिति भक्त स्वगेहगमनास, ।
[5]नमनास एकदाचि प्रथम करिति, [6]भेदभाव न मनास. ॥ १९
भक्तांस हरिहरांची, [7]भक्तांची भीड तसि पडे देवा, ।
'सेवा समान आपण दोघांचाही' [8]म्हणे 'खरा ठेवा. ॥ २०
[9]वर्णगुरु ब्राह्मण हा श्रुतदेव प्रथम सर्वथा पूज्य, ।
[10]जनसंग्रहधर्मपथीं घालावें यासि लंघितां [11]पूज्य. ॥ २१
[12]निमिकुलकुमुदकलानिधि बहुलाश्व प्रेमळ [13]क्ष्मापाळ ।
[14]मी वृद्ध तात, सुत हे, [15]कवि एक, दुजाहि गोजिरें [16]बाळ. ॥ २२
[17]षोडशसहस्र सदनीं लग्नीं केलें तसें करायास ।
तदधिक भक्तप्रेमा कथितो मज आज लोकरायास. ॥ २३
स्त्रीच्या तोषा केलें, भक्ताच्या तेंहि जरि करीना मी ।
तरि 'दीनबंधु' 'भक्तप्रिय' [18]या [19]अंकित वृथा हरी नामीं. ॥ २४
श्रीशिव [20]अनंत [21]विधि [22]निजरूपहि न प्रिय जसा मला भक्त, ।
व्यक्त [23]स्ववचनतदवन न घडे, तरि [24]सदवनीं कसा शक्त?' ॥ २५

---

उत्सव म्हणजे पुष्कळ दिवसांनीं पतिदर्शन होणार म्हणून झालेला आनंदातिशय. हीं तीनही कारणें गतिशिथिलत्वाला किती अनुकूल आहेत हें सहजही समजण्याजोगें आहे. २८. गति कुंठित झाली.

१. स्वलोचनकमळें. २. प्रेमाश्रुजळानें. ३. उज्वळें. हें नेत्रसरोरुहाचें विशेषण. ४. निजवाणीचित्तदेह. ५. नमस्कारास. ६. भिन्नता. ७. त्या दोघां भक्तांची. ८. देव हा अध्याहृत कर्ता आहे. ९. चार वर्णांचा गुरु. १०. लोकसंग्रहरूप धर्माच्या मार्गांत. ११. शून्य. १२. निमिवंशरूप कुमुदाचा (कमलाचा) कलानिधि (चंद्र). चंद्र जसा कुमुदांला आनंदवितो तसा निमिकुलांस आनंद देणारा व अलंकारभूत असा (बहुलाश्व). १३. भूमिपाळ. १४. देव–कृष्ण. १५. एक शहाणा बाळ. १६. एक गोजिरवाणा बाळ. १७. कृष्णाच्या १६००० विवाहित स्त्रिया होत्या त्यांचे घरीं. [यांचे घरीं कृष्णानें भिन्न भिन्न रूपें घेतलीं होतीं. प्रत्येकीच्या घरांत कृष्ण होता.] १८. या नामांनीं मी हरि वृथाच अंकित म्ह० ख्यात झालों असें होईल. १९. चिन्हित. २०. बलराम. २१. ब्रह्मदेव. २२. आत्ममूर्तीहि. २३. त्या स्ववचनाचें रक्षण. २४. साधुरक्षणीं.

तो देव दाय[1] दासहि दायाद[2] सदर्थ दोन करि वांटे, ।
वांटे तें धन त्यासचि अर्ध न करि सर्व देव वरि सांटे[3]. ॥ २६
समुनिजन प्रभु मूर्तिद्वय धरि, करि कुतुक थोर सांगाया, ।
रसिककविजना प्याया पुष्कळ दे देव तो रसां गाया. ॥ २७
दोघां प्रिय[4]भक्तांच्या जाय गृहातें कळों न दे त्यांस ।
प्रभुपदघनां[5] नमूं नत चातकिं हा रस वळोन देत्यांस. ॥ २८
बहुलाश्व मुनिजनासह घेउनि जाय स्वमंदिरा हरिला, ।
करि[6] लास्य[7] हास्य, हर्षवि न रिपुयशोराशिही रणीं हरिला. ॥ २९
श्री[8]वरचरणरज पडति, शत[9] न तसा विभव[10] भवसखावासीं[11], ।
तो[12] भवभक्त[13] असो परि विरळचि यांच्या[14] तुळेल भावासीं[15]. ॥ ३०
रत्नासनें मनोरम सुस्पर्शें[16] त्यांवरी द्विजांसहित ।
बैसविला बहुलाश्वें नमुनि श्रीचरण सर्वदासहित[17]. ॥ ३१
चरण प्रक्षाळुनि तीं तीर्थजळें घे कुटुंबसह माथां, ।
सकुटुंब होय शिव नृप शिवहि धरी त्यांचि[18] मस्तकीं पाथां[19]. ॥ ३२
पूजन करुनि प्रेमें कर जोडुनि तो म्हणे, 'अहो! नाथा! ।
पाथा या पायांच्या कोणा पुण्यें सुपात्र हा माथा? ॥ ३३
या तुमच्या दासाच्या भाग्यास नसे जगत्रयीं जोडा, ।
दोडों[20] अर्कतरूचा[21] अमृतफलस्वाद दावितो थोडा? ॥ ३४

---

१. पितृधन. २. भाऊ. ३. सांठवला गेला. ४. बहुलाश्व आणि श्रुतदेव या दोन आवडत्या भक्तांच्या घरीं जाण्यासाठीं देवानें दोन भिन्नरूपें धारण केलीं, परंतु ही गोष्ट त्या उभयतांस कळूं दिली नाहीं. (अध्याय ८६ श्लो० २६.) ५. हें अर्धं कव्युक्ति आहे. अन्वय—हा (भक्तांवर दाखविलेलें प्रेम त्याचा) रस नत चातकिं (नम्र प्रभुपदीं लीन झालेले लोक—भक्तजन हेच कोणी चातक त्यांस) वळोन (वळून—मुद्दाम मागें फिरून) देत्यांस (रस देणाऱ्यां) प्रभुपदघनां (कृष्णाचे पाय हेच मेघ त्यांस) नमूं (कवि व वाचक असे मिळून आम्ही नमन करूं या). रूपकालंकार. ६. अन्वय–[तो=बहुलाश्व) लास्य करि [व] हास्य करि [व त्याला] [आपल्या घरीं कृष्ण आला म्हणून इतका कांहीं आनंद व हर्ष झाला कीं] रणीं हरिला (हरण केलेला) रिपुयशोराशिही (शत्रूंच्या यशाचा ढीग देखील) तितका न हर्षवि (आनंदवी). ७. नृत्य. ८. कृष्णाची चरणधूळ. ९. शंभर. १०. ऐश्वर्य. ११. भव+सख+आवासीं=शिव+मित्र+गृहीं=(कुबेर हा शंकराचा मित्र होय) कुबेराच्या घरांत. १२. कुबेर. १३. शिवभक्त. १४. बहुलाश्वाच्या. १५. भक्तीशीं. १६. सुखस्पर्शें. १७. श्रीकृष्ण सर्व दासांस (भक्तांस) हितकर. १८. जीं उदकें बहुलाश्वानें सकुटुंब शिरीं घेतलीं तींच शंकर आपल्या शिरावर घेत असतो, म्हणून सकुटुंब बहुलाश्व शिवस्वरूप झाला—असा भाव. १९. उदकांस. २०. कोंवळें फल. २१. रुईचा.

श्रीपदकें [१]पदकें हीं अंकीं माझ्या अहा! महा चित्र! ।
हे [२]करुणावरुणालय! [३]अरुणानुज काय या [४]मला मित्र[५]? ॥ ३५
त्वत्पदसुरतरु पुरविति भक्ताच्या मनिं शिरोनि आवडिला, ।
सुकविजनीं म्हणउनि [६]भवदंघ्रिसरोरुहपराग [७]सांवडिला. ॥ ३६
बंधु [८]अनंत, [९]तनुज [१०]विधि भार्या श्री, [११]त्यांपरीस [१२]कोटिगुणें, ।
भक्त प्रिय परम; खरें आतां या किंकरासि काय उणें? ॥ ३७
[१३]स्फुरलें पादस्पर्शें हें देणें तों तुझें नव्हे देवा! ।
हें फळ फळली [१४]कळली कल्पलता [१५]भूमिदेवपदसेवा. ॥ ३८
येथें बहुदिवस रहा [१६]चरणनखामृतकरांशु सेवूं दे, ।
या तृषितचकोरांला, देवा! [१७]उद्गार फार येवूं दे. ॥ ३९
हे [१८]पाय माय काय प्राय:[१९]स्वायत्त बाळ सोडील? ।
'[२०]जोडी लक्ष त्यागुनि आधीं संसारबंध तोडील.' ॥ ४०
पाहे आवडि मोठी, राहे **मिथिलेंत** देव दासवश, ।
परिसे स्वयेंहि सादर हरि [२१]सेवकवृंदगीत आत्मयश. ॥ ४१
श्रुतदेवहि मुनिवृंदासह ये [२२]आत्माश्रमास, '[२३]सुखकंदा ।
वंदा' म्हणे निजजना '[२४]वंदारुसुरद्रुमा [२५]निजानंदा.' ॥ ४२
तो उत्तरीयवस्त्र प्रेमभरें [२६]उडवुनी करी नृत्य, ।

---

१. भूषणें. २. हे दयासागरा. ३. गरुड, अरुणाचा धाकटा भाऊ. ४. बहुलाश्वाला. ५. जोडीदार, गडी बरोबरीचा, कृष्णानें पदकमलें बहुलाश्वाच्या मांडीवर ठेवल्यामुळें बहुलाश्वाला आपण गरुडाचे बरोबरीचे आहों, असें वाटलें. गरुड हा विष्णुवाहन असल्यामुळें त्याच्या मांडीवर विष्णूला पाय ठेवणें वारंवार भाग पडतें या गोष्टीकडे कटाक्ष आहे. ६. भवत्+अंघ्रि+सरोरुह+पराग=तुझ्या+पाद+कमल+रज:कण=तुझ्या पादकमलांतील पराग. ७. गोळा केला. ८. बळराम. ९. मुलगा. १०. ब्रह्मा. ११. बायको, मुलगा व भाऊ या तिघांही पेक्षां. १२. कोटी (शंभर लक्ष) पटीनें. १३. आठवलें. १४. समजली, तें लक्षांत आलें. १५. ब्राह्मणांचें पादपूजन. अपन्हुति अलंकार. १६. तुमच्या चरणाचीं नखें हेच अमृतकर (चंद्र) त्यांचे अंशु (अमृतमय किरण) ते. १७. ढेकरा, तृप्तिसूचक वायूर्ध्वगमन. १८. याचा अनुप्रास पाहण्याजोगा आहे. १९. स्वतंत्र. २०. लाभ 'हेचि सुकृताची जोडी' (तुकाराम). २१. चाकरांच्या समूहानें गाईलेलें आपलें यश. २२. आपल्या आश्रमास. २३. श्रीकृष्णाला. २४. भक्तकल्पतरूला. २५. स्वात्मानंद—आपल्याच ठिकाणीं आनंदांत असणारा. २६. नाचतेवेळीं किंवा आनंदाचे भरांत रुमाल किंवा इतर वस्त्रें उडवायाची चाल सर्वत्र रूढ असल्याचें दिसतें. आनंदप्रदर्शनाचे व सन्मानदर्शनाचे वेळीं cheers

भृत्य प्रभुचा झाला [1]अमित भवांत भ्रमोनि कृतकृत्य. ॥ ४३
भेटे [2]करुणाब्द विभु श्रुतदेव मयूर [3]संमदीं नाचे, ।
दीनाचे श्रम सरले, ऱ्हद बुडतां आटले [4]नदीनाचे ॥ ४४
व्याघ्रमृग[5]ाजिनकंबळ तृणकाष्ठ [6]कुशासनें तयां मांडी. ।
पूजी [7]सिद्धपदार्थीं प्रेम [8]पुरें, सर्व [9]गडबडी सांडी. ॥ ४५
श्रुतदेवाच्या दृष्टी [10]अर्पूनिही अश्रुजल पुढें होती, ।
जेव्हां श्रीचरणावरि [11]साध्वी शुचि शीतलें जलें ओती. ॥ ४६
[12]समुनिविभुपद क्षालुनि करि सादर मान सत्वरा शिशिरें ।
तीर्थजलें स्वकुटुंबा न्हाणुनि धरि तोहि सत्वराशि शिरें. ॥ ४७
नाचे श्रुतदेव पुन्हा, पूजेचा राहिला विधी अर्धा; ।
गंगाधर करि तांडव, [13]त्यांसीं यासींच लागली [14]स्पर्धा. ॥ ४८
पूजाक्रम स्फुरेना प्रेमभरें जें घडे न तें थोडें, ।
[15]केवळें अडे [16]तयाहुनि [17]चाळींत [18]मनस्वि तें बरें घोडें. ॥ ४९
दे मुनि अमृतफलप्रद भगवद्धस्तांत आंवळे बोरें, ।

---

(आनंदघोष) देण्याचे प्रसंगीं मंडळी उभी राहून 'Hip! Hip!! Hurrah!!!' असे शब्दोच्चार करतांना रुमाल उडवीत असते, हा पाश्चात्य प्रकार बहुतेक नागरिकांनीं पाहिला असेलच. आपलेकडे हा प्रकार मर्यादित आहे, म्हणजे देव किंवा देवतुल्य व्यक्ती यांच्या उत्सवप्रसंगीं चामर मोरचेल व रुमाल उडविणें किंवा वारणें याची चाल सर्वत्र रूढ आहे.

१. अगणित, असंख्यात. २. दयावन. ३. अत्यानंदाचे भरांत. ४. समुद्राचे. ५. अजिन=चर्म. ६. दर्भासनें. ७. तयार असलेल्या. ८. भरपूर, संपूर्ण. ९. चित्ताची धांदल. १०. श्रुतदेव व त्याची साध्वी स्त्री हींच कायतीं कृष्णाचे आदरार्थ तत्पर होतीं असें नव्हे. पण श्रुतदेवाचीं बाह्यांगें सुद्धां तत्पर होतीं. हा भाव या आर्येंत सुरेख प्रतिपादिला आहे. ११. श्रुतदेवस्त्री. १२. अन्वय—तो सत्वराशि (श्रुतदेव) समुनिविभुपद क्षालुनि सादर मान करि शिशिरें तीर्थजलें (तृतीया) स्वकुटुंबा (स्वस्त्रीस) न्हाणुनि तोहि (स्वतः) शिरें (मस्तकानें—मस्तकीं) [तें जळ] धरि. अर्थ स्पष्ट आहे. १३. त्या गंगाधराशीं आणि या गंगाधराशीं. १४. सामना, बरावरी. शंकराचें तांडव सुप्रसिद्ध आहे. त्या शंकराशीं जणुं श्रुतदेव आपल्या नाचण्यानें स्पर्धा करूं लागला. सोत्प्रेक्षातिशयोक्त्यलंकार. १५. हें उत्तरार्ध किती तरी मजेदार आहे! यांतील उपमेनें श्रुतदेवाच्या प्रेमातिशयामुळें पूजाविधींत उडालेली धांदल जितकी व्यक्त होते इतकी दहा पांच पद्यांनीं ही इतर कवीचे हातून व्यक्त झाली नसती. यांतील उपमा इतकी साधी व व्यवहारांतील आहे कीं श्रुतदेवाच्या त्यावेळच्या स्थितीचें चित्र अगदीं आपल्या डोळ्यापुढें हुबेहुब उभें राहतें. १६. श्रुतदेवाहून. १७. चालण्यांत. १८. अतिशय.

थोरें[1] तयांत बीजें परि देवा नीरसें[2] न, न कठोरें. ॥ ९०
विमल उशीर[3]सुवासित हिमें[4] मधुर प्राशनासि दे तोय, ।
तत्प्रेमरससतृष्णा कृष्णाला सत्य अमृत तें होय. ॥ ९१
होती जीर्णा कांहीं कस्तूरी लाविला तिचा टिकला[5], ।
शोभे श्रीपतिभाळीं, मधुकर[6] इंदीवरीं[7] जसा टिकला[8]. ॥ ९२
घाली कुशपिंजूलग्रथित[9] पवित्रें[10] स्वबंधुच्या बोटीं, ।
[11]मोठीं रत्नें ज्यांवरि त्या मुद्रा फार लाजल्या[12] पोटीं. ॥ ९३
सात्विक भावें कांपे[13] श्रुतदेव पवित्र[14] घालितां बोटीं. ।
तो वरदवर पसरि[15] करसरसिज[16] निजकिंकरीं कृपा पोटीं. ॥ ९४
बहु कोमळ तुळशीची अर्पी कंठांत मंजरीमाला ।
बाला[17] तद्भक्ति तदा वरि जाणों त्या जगत्त्रयीपाला[18][19]. ॥ ९५
चरणीं कमल समर्पी, तें जाणों आपुलेंचि हृत्कमल, ।
शमलघ्न[20]प्रभुचें मग गद्गदगल साधु गाय यश अमल. ॥ ९६
भगवद्रूप[21]मुनीतें भगवंतासह समर्चुनी भक्तें ।
आकंठ तर्पिले जो मूर्त विशद आत्मभाव त्या भक्तें[22]. ॥ ९७
तैं तर्क करी मुनि कीं, 'मी दीन गृहांधकूपभेक[23] मला ।

---

१. बहुवचनाचें रूप. 'बीजें' याचें विशेषण. २. रसहीनें. ३. वाळ्यानें सुवासिक. ४. थंड. ५. टिळा. ६. भ्रमर. ७. कमलांत. ८. बसलेला, राहिलेला, धांवलेला. 'टिकला' या हिंदी धातूचें भूतकालीन विशेषण. 'टिक' धातूचा अर्थ राहणें, उतरणें, धांवणें. ९. दर्भाग्रनिर्मित. १०. संध्यादिसमयीं हाताच्या अनामिकेंत दर्भाचें जें पवित्रक घालतात त्याला पवित्र म्हणतात. ११. अतिशयोक्ति. १२. आम्हांला हें बोट मिळालें नाहीं म्हणून. १३. कंप हा एक सात्विक भाव आहे. त्याचें वर्णन या आर्येंत आहे. १४. दर्भपवित्रक. १५. पुढें करी. १६. निजकरकमल. १७. भक्तिरूप स्त्री. १८. कृष्णास. १९. सविरोधोत्प्रेक्षालंकार. २०. पापनाश करणारा. २१. रूपक व सहोक्ति यांचा संकर. मूर्तिमंत स्पष्ट दिसणारा जो आत्मभाव (परमात्म्याविषयींची भावना, भक्ति) तोच भात (भक्त) त्यानें (त्या योगानें) तर्पिले (तृप्त केले.) २२. भातानें, सद्भावरूप भातानें. २३. पहिल्यानदां अंधार कुवा, त्यांतून घरांतला, तेव्हां उजेडाचें म्हणून नांव देखील नको अशा ठिकाणचा बेडूक. प्रथम 'कूप मंडूक' हा निंदावाची शब्दच पुरे होता. त्यांत विशेष दाखविण्याकरितां 'अंधकूप' शब्दाची योजना, त्याहीपेक्षां विशेष दाखविण्यास्तव 'गृहांधकूप' शब्दाची अत्यंत मार्मिक योजना केली आहे ती अवश्य लक्षांत घेण्याजोगी आहे. **'बह्वर्थ जनमनोहर स्वल्पाक्षर'** लेख किंवा वचन असावें असा पंतांचाच नियम किती सुरेख ते पाळतात याचा हा एक शब्दच उत्तम मासला पुरेसा आहे. प्रस्तुत भाषणांतील सर्वच रूपकमाला याच नियमाची उत्कृष्ट उदाहरणें आहेत.

मानससरोवरींचें हंसत्व अलभ्य लाभ हा [1]गमला. ॥ ५८
तीर्थांच्या व्यवहारा चालविती साहुकार जे आद्य, ।
ते मुनिचरण दरिद्रा मज देती मान घेउनी [2]पाद्य. ॥ ५९
या मुनिधनिकांचेंही [3]मूर्तमहाभाग्य मद्गृहा आलें ।
हें [4]सर्वज्ञ न चुकलें मार्गातें; हें असें कसें झालें!' ॥ ६०
तो सकुटुंब प्रभुचे पाय चुरी तेधवां म्हणे, 'देवा! ।
जे श्रवणादिपर जन प्रकटसि त्यांच्या मनींच तूं ठेवा. ॥ ६१
तें मज कांहींच नसे, घडलें प्रत्यक्ष दर्शन स्वामी! ।
येतिल काय दयाळा! [5]नवनिधि [6]आलसदरिद्रजनधामीं. ॥ ६२
आलें असेल काय प्रेमभरें या मुखा तुझें नाम, ।
कीं एखाद्या जन्मीं क्षण सादर पाहिलें तुझें धाम! ॥ ६३
होय प्रसन्न जेणें मन भजनरहस्य तें पुन्हां बोला. ।
[7]कुक्षींत क्षेत्राच्या अर्पावें बीज जों असे वोला.' ॥ ६४
देव म्हणे, 'श्रुतदेवा! आले घेऊनि हे मुनी मजला, ।
भजला यांसि सुधी जो तो मोक्षपदासि जावया सजला. ॥ ६५
झाले प्रसन्न यास्तव हें [9]निजधन बांधिलें तुझ्या पदरीं, ।
सांचविलें [10]वृत्ति करुनि पक्वापक्वीं [11]उदुंबरीं बदरीं. ॥ ६६
कष्टें जोडुनि वांटिति, निजधन हे मुनि उदारकर सर्व. ।

---

१. रूपकोत्प्रेक्षालंकार. २. पादक्षालनार्थ जल. ३. मूर्तिमंत महाभाग्य म्हणजे कृष्ण. ४. हें (महाभाग्य) सर्वज्ञ (या ठिकाणीं व्यवहारज्ञ एवढाच अर्थ घेतला पाहिजे) [असून] मार्गातें (माझ्या दरिद्राच्या वाटेस) न चुकलें. हें (होऊं नये) असें कसें झालें [असेल बरें!] व्यवहार रीति अशी आहे कीं पैसा पैशाकडे जातो. तो पैसा दरिद्राकडे त्याच्या घराची वाट न चुकतां गेला असतां आश्चर्यच मानायाची गोष्ट, असा श्रुतदेवाच्या भाषणाचा भाव. या एवढ्याशा स्वल्पावकाशांत किती तरी अर्थ सांठविला आहे हें पाहण्याजोगें आहे. ५. महापद्म, पद्म, शंख, मकर, कच्छप, मुकुंद, कुंद, नील, खर्व, हे नऊ निधि. ६. आळशी आणि भिकारी जो जन त्याच्या घरास. ७. अर्थांतरन्यास. ८. जों कुक्षी ओला आहे तों. ९. निज=स्वतःचें, स्वसंपादित, स्वकष्टार्जित धन=संपत्ति. या मुनींनीं स्वकष्टानें (तपश्चर्येनें) संपादन केलेलें धन=मद्रूप. १०. देहनिर्वाह. ११. उंबरें, बोरें, हे शब्द केवळ स्वार्थवाचकच नसून तपःश्चर्येची दिशा दाखवितात. वायुभक्षण, पर्णाशन, लोहपिष्टभक्षणादि सर्व प्रकार या शब्दांनीं द्योतित करण्याचा पंतांचा घाट लक्ष पुरविण्याजोगा आहे.

करिती काय कळेना हरिती जो [1]सुरभिकल्पतरुगर्व. ॥ ६७
सदय उदार शुचिव्रत यास्तव यांच्या धना नये तोटा, ।
करिति क्षणांत राजा रंक चमत्कार हा जगीं मोटा. ॥ ६८
ते दानपात्र उत्तम जो जन यांच्या पदावरी लोळे, ।
निजपदपूजन घेउनि देती सर्वस्वदान हे भोळे. ॥ ६९
हिंडति हे मज घेउनि निजचरणरजें [2]जगन्मळा धूती, ।
[3]देवक्षेत्रें तीर्थें मिरविति यांहींच जी दिली [4]भूती. ॥ ७०
सर्वप्राणिश्रेष्ठ ब्राह्मण जन्मेंचि काय सांगावें ! ।
[5]सद्योजात [6]मराल स्तुत्य न [7]वृद्धांहि [8]वायसां गावें. ॥ ७१
ब्राह्मण [9]उगाचि गुरु जरि [10]तुष्टितपश्रुत सुगंध तो [11]हेमीं ।
श्रुतदेवा ! समज मनीं हित कथितों 'तो [12]मनुष्य नोहे' मी. ॥ ७२
[13]दयित ब्राह्मण मजला कौस्तुभ हा [14]दृष्टिमणि खरें समज, ।
[15]जगदिष्ट श्री प्रिय हि स्वचतुर्भुजरूप हें तसें न मज. ॥ ७३
मंत्रमय ब्राह्मण हे मज देवमयासि सत्यता हेतू, ।
श्रुतदेवा ! विप्रांचे पायचि संसारसागरीं सेतू. ॥ ७४

---

१. अतिशयोक्ति. अत्युदार जे कल्पवृक्ष त्यांचा गर्व हरण करतात म्हणजे हे उदारतम झाले. २. जगताच्या मलाला (पापाला). ३. देवक्षेत्रें (धर्मक्षेत्रें) व तीर्थें यांना जें मोठेपण (भूति) मिळालें आहे तें त्यांस या साधुलोकांनीं दिलें आहे म्हणून, वस्तुगत्या त्यांना स्वतंत्र मोठेपण नाहीं. ४. ऐश्वर्य. ५. नुकता जन्मलेला. ६. हंस. ७. 'गुणाः पूजास्थानं गुणिषु न च लिंगं न च **वयः**' याचाच वरील गीत्यर्ध पर्याय आहे. अर्थांतरन्यास. ८. हेंच यमक उद्योगपर्व–अध्याय ३ गीति ८१ यांत आहे. ९. जातित्वकरून. १०. संतोष, तप, आणि वेदाध्ययन हें असेल तर. ११. जसें सोनें असून सुगंध. १२. ब्राह्मण हा मनुष्य नव्हे तर देव आहे. असें मी (कृष्ण) हित कथितों. १३. प्रिय. १४. काचमणितुल्य, दृष्टीची बाधा होऊं नये म्हणून जो काचेचा तुकडा अलंकार म्हणून घालतात तो. मोठमोठ्या राजांच्या घोड्यांचे पागेंत एक माकड 'दृष्टिमणि' म्हणून बाळगण्याची चाल आहे. तेव्हां ज्याला किंमत नाहीं तो पदार्थ. १५. ब्राह्मणापेक्षां मला कांहीं प्रियकर नाहीं असें कृष्ण म्हणाला. त्याला पुष्ट्यर्थ मला कौस्तुभ हा दृष्टमणि वाटतो, सर्व जगाला अत्यंत आवडणारी (जगदिष्ट=जगत्+इष्ट) श्री देखील मला प्रिय नाहीं. इतकेंच नव्हे. माझें मला रूप देखील ब्राह्मणापुढें आवडत नाहीं. 'ब्राह्मणो मम दैवतम्' याचा ही गीति खुलासा आहे.

विप्रार्चन तें माझें[1] माझेंचि[2] बरेंहि नावडे मजला, ।
आज्ञा न करि करि स्तुति दास[3] तसा ब्राह्मणां न जो भजला.' ॥ ७५
विप्रभजन सन्मार्ग स्वमुखें सांगोनि ते भजक[4] तारी; ।
मग मिथिलेहुनि गेला निजनगरीस[5] त्रिलोकहितकारी[6]. ॥ ७६

---

## अध्याय अठ्यायशींवा.

अद्भुत चरित जगत्त्रयपापापह[7] सर्वभक्तपाळाचें[8] ।
श्रीशुकमुखसुकविप्रिय[9] गावें भावेंहि दुष्टकाळाचें[10]. ॥ १
होता एक असुर वृकनामा[11] तो मति धरी तपश्चरणीं, ।
जातां वनासि, नारद भेटे, ठेवी शिरोब्ज[12] तच्चरणीं[13]. ॥ २
त्या मुनिवरा पुसे तो, शिष्य जसा गुरुपदांबुजप्रवण[14], ।
'सांगा, जी! विधि हरि हर[15] यांमध्यें आशुतोष[16] तो कवण?' ॥ ३
सांगे नारद, 'भगवान् गिरिश[17] जसा पुससि तूं, तसा आहे, ।
भज[18]; शीघ्र सिद्धि होइल, देतां मागेंपुढें[19] न तो पाहे. ॥ ४
स्वल्पेंहि गुणें होतो भजकीं[20] भगवंत शंभु तो तुष्ट, ।
स्वल्पें दोषेंहि बहु स्मरहरहर[21] देव होतसे रुष्ट. ॥ ५
होय प्रसन्न. करिती स्तुति, दशमुख बाण ते जसे [22]बंदी, ।
नंदीहुनि आवडले, केले प्रभु, ज्यांसि इंद्रही वंदी. ॥ ६
करुनि प्रसाद आपण संकट त्यापासुनि प्रभू[23] पावे ।

---

१. ब्राह्मणाचें अर्चन तेंच माझें अर्चन. २. साक्षात् जें माझें अर्चन तें. ३. कोणी दास यजमानाची स्तुति करितो, पण आज्ञा पाळीत नाहीं जसा तसा मला वाटतो, जो ब्राह्मणानें भजला तो. ४. भक्त. ५. द्वारकेला. ६. तीन लोकांचें कल्याण करणारा. ७. तीन जगतांच्या पापाचें नाश करणारें. (अपह=नाशक.) ८. सकल भक्तांच्या पालकाचें. (कृष्णाचें.) ९. श्रीशुक+मुख+सु-कवि+प्रिय=शुकाचार्य+प्रमुख+उत्तम पंडित+आवडतें=शुकाचार्य आहे प्रमुख ज्यांच्यामध्यें अशा कविलोकांस प्रिय. चरित्राचें विशेषण. १०. श्रीशंकराचें. ११. शकुनिनामक असुराचा पुत्र. (अ० ८८ श्लो० १४.) १२. शिरस्+अब्ज=मस्तक+कमल. १३. त्या नारदाच्या पायांवर. १४. गुरूच्या चरणकमलीं प्रवण (नम्र) असा. १५. अध्याय ८८ श्लो० १० पहा. १६. त्वरित प्रसाद करणारा. १७. महादेव. १८. अध्याय ८८ श्लोक १६ पहा. १९. मागेंपुढें पाहणें=कांकू करणें, धरसोड करणें. २०. भक्तावर. (श्लो० १५.) २१. स्मराचा (कामाचा) संहार करणारा हर (शिव.) २२. स्तुतिपाठक. २३. शिव.

कै[1]लासोत्पाटनपुररक्षणइतिहास हे जना ठावे.' ॥ ७
ऐसें सांगुनि गेला मु[2]निवर, मग दुष्ट [3]तोहि के[4]दारीं ।
वर घ्यावया बसे खल, यवन भिकारी जसा टिके दारीं. ॥ ८
त्या क्षेत्रीं जातांचि त्यागुनि तो तोयअन्न, होमातें ।
नि[5]जमांसेंचि करि, म्हणे, 'दे[6]वा! शीघ्र प्रसन्न हो! मातें.' ॥ ९
होम करी सा[7] दिवस, स्वकरें शस्त्रें स्वमांस तो कापी, ।
पापी निष्ठुरता त्या क[8]रुणानिधिच्या शिरावरि स्थापी. ॥ १०
सप्तमदिवसीं जेव्हां उ[9]द्यत झाला स्व[10]मस्तकच्छेदीं ।
दे [11]दीनबंधु दर्शन ज्याचें वात्सल्य वर्णिलें वेदीं. ॥ ११
कुंडांतूनि निघूनि प्रभु धरि त्या श[12]स्त्रपाणिचा पाणी, ।
'प्राणी मरो' म्हणे त्या साधु निवारी अवें मनीं नाणी. ॥ १२
प्रभुपाणिस्पर्शें तो झाला दिव्याकृती जसा मित्र[13], ।
अमृतप्रवाह वाहे वरि तरि भस्महि उठे न हें चित्र. ॥ १३
त्यातें वारूनि म्हणे क[14]रुणार्णव तो, 'पुरे, पुरे कां गा[15]!, ।
सांगाया गुरु नसतां स्वमतें त्वां खंडिलें वृथा आंगा. ॥ १४

---

१. रावणबाणासुरांच्या कृत्यांचा मासला. या पुराणकथेचा सारांश असा आहे:—'रावणें कैलासभुवन । अंगप्रतापें उत्पाटन । करितां, झालें कंपायमान । तैं भयोद्विग्न पार्वती. ॥ १ ॥ भीरु स्त्री स्वभावें गौरी । कवळी शंकरास भयभारीं । तेव्हां बाबरा त्रिपुरारी । क्षोभला अंतरीं सक्रोधें. ॥ २ ॥ आणि बाणासुरें पुररक्षण । याचिलें उद्धतपणें जाण । यास्तव सांडूनि कैलासभुवन । केलें अवस्थान तन्नगरा ॥ ३ ॥ त्यानंतरें तो उन्मत्त पूर्ण । म्हणे मजसीं करीं समरंगण । मम भुजांचें कंडूशमन । तुजवीण आन करूं न शके. ॥ ४ ॥ ऐसें उफराटें संकट । प्रसन्न होवोनि नीलकंठ । पावला त्याचें फळ उद्भट । झालें प्रकट तयासी. ॥ ५ ॥ दाशरथिहस्तें दशानन । ऐश्वर्यें सहित ससंतान । क्षय पावला निपटून । जाणती जन प्रसिद्ध हें. ॥ ६ ॥ आणि कंडूयमान बाणभुज । श्रीकृष्णचक्रें भंगले सहज । ऐश्वर्यच्युत अति सलज्ज । झाला बाज स्वजीविता. ॥ ७ ॥' [श्रीहरिवरदा]. २. नारद. ३. वृकासुर. ४. संस्कृतांत हा शब्द सामान्यनाम असून त्याचा अर्थ 'क्षेत्र, शेत' असा होतो. पण मराठींत तो शब्द विशेषनाम होऊन त्याचा अर्थ स्थानविशेषवाचक झाला आहे, जसें—बद्रिकेदार. या शब्दाचें मूळ स्वरूप 'बदरीकेदार'=बोरींचें शेत, पण हल्लीं एका देवक्षेत्राचें नांव झालें आहे. हें स्थान हिमालयावर आहे. ५. आपल्या मांसानें. (श्लो० १७.) ६. हे अग्निमुखा हरा! ७. सहा. ८. शिवाच्या मस्तकावर निष्ठुरतादोष स्थापी. ९. उद्युक्त. १०. आपलें मस्तक तोडण्याविषयीं. ११. शिव. (दीनजनांचा भाऊ.) १२. शस्त्र आहे हातीं ज्याच्या त्याचा पाणी (हात). १३. सूर्य. १४. दयासागर, महाकारुणिक. १५. अगा!

वेड्या! हें काय कळे, सोपें मद्भजन साधुसहवासें, ।
दासें जळेंचि आम्हां [1]जोडावें, होमिलीं वृथा मांसें. ॥ १५
बहु पत्र पुष्प फळ जळ केवळ मज जरि सुशील दे, वश मी ।
झालों, होतों, होइन, हें जाणति साधु [2]भूमिदेव [3]शमी. ॥ १६
भक्तांस उथळ केवळ, आहें मी कोटि योजनें खोल[4], ।
लोल त्वन्मन कोठें वर द्यावा कोण तो स्वयें बोले.' ॥ १७
ऐसा प्रसन्न झाला, [6]वरदर्षभ [7]भक्तभाग्यभर भोळा ।
तोळा द्यावा त्याला ब्रह्मांडाहूनि थोर दे गोळा. ॥ १८
असुर म्हणे, 'मी [8]युष्मत्पदपद्मपरागपूत, हा [9]पाणी ।
ज्याच्या ज्याच्या माथां ठेविन तो सर्वही मरो [10]प्राणी.' ॥ १९
[11]अमृतप्रद परमेश्वर 'माग' म्हणे त्यासि. मागतो [12]गरळ. ।
[13]परळ श्रीमंतातें मागे [14]हतविधि. [15]शिजे कसा [16]हरळ? ॥ २०
[17]कुमति स्वार्थहि न करी, होय वरद [18]अप्रसन्न तें मागे, ।
लागे त्याहुनि बहु घे, सुमति न [19]दाताहि द्यावया भागे. ॥ २१
मूर्ख [20]स्वाहित करि, परि कळकळतो साधु जरि उदासीन, ।
दासीं न भ्रंशावें प्रभुमनिं व्हावें [21]स्वसत्पदासीन. ॥ २२
पडली गांठि खळासीं वचनींही आपुल्याचि [22]ओकळला. ।
[23]कळला [24]स्वच्छेदेच्छुहि तरि तीक्ष्ण कुठार कल्पतरु फळला. ॥ २३

---

१. सेवकानें मला नुसतें जल देऊन साध्य करावें, प्रसन्न करावें. (मी भक्तांच्या जलदानानेंच प्रसन्न होतों—असा भाव.) २. ब्राह्मण. ३. शांतचित्त. ४. जरी मी इतका खोल तरी भक्तांस उथळ. ५. अध्याय ८८ श्लो० २० पहा. ६. वरद+ऋषभ=वर देणारा+अग्रणी, श्रेष्ठ=वरदश्रेष्ठ. ७. भक्तांचा भाग्यातिशय. ८. तुमच्या चरणकमळाच्या धुळीनें पवित्र. ९. हात. १०. श्लो० २१ पहा. ११. सुधाप्रद किंवा मोक्षप्रद. १२. विष. 'गरळ'शब्द 'अमृतप्रद'शब्दाशीं विरोध दाखविण्याकरितां योजिला आहे. 'गरळ'शब्दानें येथें विष समजायाचें. १३. खापर. १४. दुर्दैव (मनुष्य). १५. हरळ कसा शिजे?—जो जातिवंत दगड आहे तो शिजून मऊ कसा होईल? होणार नाहीं. या पद्यांत अर्थांतरन्यास व प्रश्न असे अलंकार आहेत. १६. खडा. १७. गीति २१ व २२ यांतील व्यवहारदृष्ट सिद्धांत किती सुरस वठविले आहेत ते पाहण्याजोगे आहेत. १८. जेणेंकरून वर देणारा असंतुष्ट होईल असें मागणें दुष्ट मनुष्य मागतो. १९. दाता कोणाला म्हणावें हें विठ्ठलकवीनें सांगितलें आहे:—'दाता त्यासचि वदती, भूतांची ज्यास येतसे करुणा' [विठ्ठलकृत काव्यें—काव्यसंग्रह—पृष्ठ २४७.] २०. आपलें अकल्याण. २१. आपल्या चरणीं तत्पर. २२ बांधला गेला. २३. येथें 'दामयमक' आहे. २४. आपला छेद करूं इच्छिणारा.

'दिधला' म्हणे वरद वर अतिदुर्लभ, जाय कुमतिच्या हाता, ।
त्या तामसभुजगाला[1] अमृत[2] दिलें काय आपुल्या घाता ? ॥ २४
वृक[3] करि विचार चित्तीं, 'श्रम मी होमांत भोगिला मोठा, ।
तोटा मान्य करीना, पाहों वर हा खराच कीं खोटा.' ॥ २५
स्ववरपरीक्षार्थ कर स्थापूं पाहे शिरीं स्वदात्याच्या[4], ।
बहुधा गौरीचाही अभिलाष मनांत ये तदा त्याच्या. ॥ २६
झाला, धर्म ध्वंसुनि, सिद्ध कुधी जो वधास बापाच्या[5], ।
मातेचा[6] अभिलाषहि कां ये ना मानसांत पापाच्या ? ॥ २७
स्वशिरीं कर ठेवाया ये जेव्हां वृक वृकस्वभाव[7] खळ, ।
भवभयहर हर भगवान् भीमहि[8] भी कीं वरीं तसेंचि बळ. ॥ २८
धांवे पिसाळला वृक सभय तपस्वी[9] महेश एकाकी, ।
हांकी[10], साम[11] करी प्रभु, मागें स्वाभयद[12] पद हळू टाकी. ॥ २९
जों जों भय धरि तों तों श्रीमन्मृत्युंजयासि[13] तो दापी[14] ।
पापी बहु निर्दय निजमांस चरारां स्वयेंचि जो कापी. ॥ ३०
भक्ताला[15] वर न दिला, तो पुच्छीं पाय काय नागाच्या ? ।
पाठी लागे यास्तव खळ, देव पळे भयें कृतागाच्या[16]. ॥ ३१
सात्विकभावें पावे येतां वर द्यावयासि तनु कंपा, ।
वरद[17]शिरोरत्नाची मगहि कृतघ्नीं करूनि अनुकंपा[18]. ॥ ३२
दासत्रासहरहि हर दासापासुनि धरी परि त्रास, ।
तो साधु हरिहराच्या प्रकट अशा या करी चरित्रास. ॥ ३३

---

१. सापाला. २. श्लोक २२ पहा. ३. गौरीहरणलालस वृकदैत्य. ४. वर देणारा शिव त्याच्या शिरीं. ५. शिवाच्या. ६. गौरीचा. ७. दुष्टस्वभाव. ८. भीम=भयंकर. हें एक शंकराचें नांव आहे. विरोधार्थ ह्या नामाचा मुद्दाम उल्लेख केलेला आहे. भीम असून भ्याला. असें झालें कसें ? याचें उत्तर 'वरीं तसेंचि बळ'=वराचें सामर्थ्यच तसें होतें, कीं भीमाला भित्रा करण्याचें बळ त्याच्यांत होतें. ९. 'तपश्चर्या करणारा शिव' असा सामान्य अर्थ, परंतु दुर्दैवी, दीन, हताश असा जो तपस्वी शब्दाचा अर्थ संस्कृतांत आहे तो प्रस्तुत स्थलीं युक्त दिसतो. १०. हाक मारी. 'अरे वृका ! हें असें तूं काय करतोस ?' असें मृदु बोले. ११. सामोपचार करी. १२. भक्ताला अभय देणारा तो भिऊन हळू हळू मागें पाय टाकी. १३. शंकर. 'मृत्युंजय' हाही शब्द विरोध दाखविण्याकरितां योजिलेला आहे. १४. दाबी, भिववी. १५. अपन्हुतिअलंकार. १६. केला आग (अपराध) ज्यानें त्याच्या. १७. शिवाची तनु प्रथम सात्विकभावें कांपली, मग भयानें कांपली. १८. दया.

[1]बहु लाडका भजकशिशु पाठी लागोनि ओं[2]वळा शिवतो, ।
स्पर्शभयें काय पळे [3]ब्रह्मांडगृहांत सों[2]वळा **शिव** तो? ॥ ३४
[4]उडवी ती [5]भयवाल्या जिकडे त्या **शं**भुपुंडरीकास ।
तिकडे **वृ**कभृंग फिरे. [6]सद्भक्त खरा वरीं धरी कास. ॥ ३५
[7]इंद्राद्यमरपतींचे कांपति भुजदंड नष्टबलभांचे, ।
[8]हरिभीतयूथनाथाहुनि बहु शतकोटि कष्ट [9]कलभांचे. ॥ ३६
[10]भूषाभुजंग भक्ताभीतिद भव्यप्रभाव तुज भार ।
भावी भयें **भ**वानीभर्ता भगवान् भुले भला फार. ॥ ३७
[11]सुटल्या [12]सटा समस्ता सुरसरितासलिल सर्प सोमसुधा ।
सांडिति [13]सरणींत म्हणे **सूतशुकव्यास** सर्व [14]सत्य बुधा. ॥ ३८
स्वप्नांतहि नव्हता [15]हा विदित परंतु प्रभूस दाखविला; ।
भक्तें पाजुनि पुष्कळ, शेष रस त्रिभुवनास चाखविला. ॥ ३९

---

**१.** या गीतींतील सोत्प्रेक्षोपमा इतकी कांहीं सरस आहे कीं कवीच्या योग्यतेबद्दल मन अधिकाधिक संतुष्ट होतें. कवीचें सहृदयत्व तें हेंच. २. ह्या दोन्ही शब्दांवर अनुस्वार कां देतात हें आम्हांस कळत नाहीं. ज्या मूळ संस्कृत शब्दांवरून प्राकृत शब्द निघाले असतील व त्यांत जर अनुनासिक किंवा अनुस्वार असेल तर मात्र प्राकृत शब्दांवर अनुस्वार द्यावा असें आम्हांस वाटतें. जसें; नाम–नांव, ग्राम–गांव. अस्तु. आमच्या मतीं **ओ**वळा व **सो**वळा असे शब्द लिहावे. या शब्दांची व्युत्पत्ति पाहतां यांचें संस्कृत मूळ **उज्वल** व **सोज्वल** असें आहे. आतां मूळ शब्दांच्या अर्थांत फारसा फरक नाहीं. परंतु मराठींतील त्यांच्या अपभ्रष्ट रूपांचे अगदींच विपरीत व संकुचित अर्थ झाले आहेत, हें पाहण्याजोगें आहे. या शब्दांचा मराठींतील रूढार्थ अन्य पर्याय शब्दांनीं व्यक्त होण्याजोगा नाहीं. शुचि व अशुचि, पाक व नापाक, किंवा pure व impure या शब्दांनीं सोवळा व ओवळा या शब्दांचीं भाषांतरें केल्यास या मूळ शब्दांचा अर्थ व्यक्त होत नाहीं. ओवळा शब्दाचा विपरीतार्थ कसा सिद्ध झाला असावा हें चिंत्य आहे. हे शब्द **'अमंगळ'** व **'सुमंगळ'** यांचे अपभ्रंश होत असें मानल्यास अनुस्वार युक्त होईल. पण सुमंगल आणि अमंगल यांचे अपभ्रंश सोंगळ आणि ओंगळ होत, तेव्हां अनुस्वाराविषयींचा प्रश्न वादग्रस्तच राहतो. ३. अ० ८८ श्लो० २४ पहा. ४. येथें रूपक अलंकार झाला आहे. ५. भयरूप वाहुटळ. ६. हा **वृ**क खरोखरच सद्भक्त, कारण हा वरीं कास धरी=वराचा विश्वास धरून त्याची पाठ सोडीना. ७. 'इंद्राद्यमरपतीं'चें विशेषण. नष्टं बलं च भा च येषां ते नष्टबलभाः. ८. सिंहापासून भ्यालेल्या गजपतीपेक्षां. ९. बालगजांचे. १०. या आर्येतील **'भ'**चें प्रासानुप्रासत्व पाहण्याजोगें आहे. **११.** या आर्येंत **'स'**चें प्रासानुप्रासत्व पाहण्याजोगें आहे. शिवाची भीतीनें उडालेली धांदल या वर्णनानें फारच हृदयंगम झाली आहे. १२. जटा. १३. मार्गांत. १४. खरें. १५. भीतिरस.

जेथें जेथें जाय प्रभु, तेथें भक्त वृक उभा रागें ।
राहे, कसें भरावें अनुचर[1] चुकल्याविना महाभागे? ॥ ४०
स्ववचनलंघनमात्र त्रासप्रद ईश्वरा नसे अन्य ।
रक्षकहि आपणाला आपण कळवी स्वतत्व हें धन्य. ॥ ४१
जो जन कृतघ्न त्याचें स्पर्शन दर्शन अभद्र हें कळवी ।
मळवी ईशयशासहि अहित न तो तो न ईश्वरा पळवी. ॥ ४२
[2]क्षुद्रास अतुलवैभवमद बालोदित[3]हि तत्क्षणीं मोही, ।
तो हीन क्षय पावे स्वकरें स्वगुणेंचि जो गुरुद्रोही.[4] ॥ ४३
बहु भव्यभाव[5]रत्नाकरचरित स्मरहर[6] प्रभु प्रकटी, ।
मिरवाया[7] वेंचिल मणि[8] किति कविमति सुंदरी मृगेंद्रकटी. ॥ ४४
भागेना प्रबळखळव्याळ, बहु पुराणपुरुष तो थकला; ।
दुःखितचित्तें वोझें मानी बहुधा सुधांशुच्या शकला[9]. ॥ ४५
श्वेतद्वीपीं[10] स्वसखा[11] आपण जैसा तसाचि भवें[12] हरतो, ।
या भावें त्राणार्थी गेला यश द्यावयासि भवहर तो. ॥ ४६
दंतीनेंचि[13] स्वबळें काढावा पंकमग्न जो दंती[14], ।
साधूनेंचि हरावी बोधें जे साधुच्या मनीं खंती[15]. ॥ ४७
संकट पतिव्रतेचें पतिव्रतेनेंचि कीं निवारावें, ।
नौकेनें नौकेला बुडतां यादोनिधींत[16] तारावें. ॥ ४८
रणयज्ञीं भूपाला व्हावें अंगें सहाय भूपानें, ।
सागरतृषा हरावी कैसी स्वादूदकेंहि[17] कूपानें? ॥ ४९
वामें[18] दक्षा द्यावी, वामाहि भुजा तसी उटी दक्षें, ।
पूजावा हरिनें हर, हरिहि हरें सदवनक्रियादक्षें[19]. ॥ ५०

---

१. सेवक. २. त्या वृकासुरास. ३. बटुवाक्यही, मूर्खाचें बोलणें देखील. ४. हें गीत्यर्थ सुभाषितरूप आहे. ५. मोठाले भाव म्हणजे अभिप्राय हींच रत्नें त्यांची खाण असें चरित. ६. शंकर. ७. लोकांत दाखवाया. ८. भावरत्नें. ९. चंद्रकलेला. शंकराचे मस्तकावर चंद्राचा एक तुकडा आहे. तो तुकडा देखील ओझ्यासारखा वाटूं लागला असावा. १०. वैकुंठीं. ११. नारायण. १२. संसार. १३. गीति ४७, ४८, ४९ व ५० यांत अर्थ एकच आहे, परंतु निरनिराळ्या हृदयंगम दृष्टांतांनीं तो कसा खुलविला आहे तो पाहण्याजोगा आहे. १४. गज. १५. संशय. १६. समुद्रांत. १७. स्वादु आहे उदक ज्याचें अशाही कूपानें. १८. जशी डाव्या हातानें उजव्या हातास उटी द्यावी तसी उजव्यानें डाव्यास द्यावी. १९. साधूंच्या रक्षणाविषयीं दक्ष, अशानें.

कळतां [1]वैरद्व्यसन प्रभु पटु [2]बटु होय [3]योगमायेनें, ।
ये धांवत वैद्य जसा नासाया बंधुरोग मायेनें. ॥ ९१
झाला बालाकृति हरि, आला घालावया खळीं घाला।
जेंवि बळिच्छळसमयीं धरि [4]मौंजीकृत्तिदर्भदंडाला. ॥ ९२
मुनिमंडलीमहित मधुसूदन मत्ता वृका गमे मुंजा ।
गुंजाराशि म्हणे शिशु [5]शिखितें [6]ज्यांच्याहि दाहका पुंजा. ॥ ९३
बटुवेश विभु वृकाला शिष्य जसा [7]श्रोत्रियां तसें [8]वंदी, ।
जपले [9]गुरुकार्या यापरि न कधीं [10]स्कंद गणपती [11]नंदी. ॥ ९४
कुशपाणि बटु प्रभु करकमळें जोडूनि त्या खळास म्हणे, ।
'दिति[12]कुलकमलद्युमणे! हे [13]शकुनिसमुद्रचंद्र! वीरमणे! ॥ ९५
श्रमलां कीं [14]तामरसीं [15]प्रालेय तसा दिसे मुखीं घाम, ।
[16]सामर्थ्यें मानाना झाला श्रम. कोणतें असें काम? ॥ ९६
आम्हांस मात्र वाटे आलां सोडूनि देश बहु दूर, ।
परि तुमचें क्षिति मंदिर [17]रत्नाकर [18]अजिर कीं तुम्ही शूर. ॥ ९७
क्षणभरि वसा. असा श्रम न महाप्रभुला तुला विभो! साजे. ।
हा [19]काय काय कष्टोचित? पूजिति [20]ज्यांसि देव नर राजे. ॥ ९८
देह सदा [21]रक्षावा. [22]दक्षा! वाढी न [23]कामकपिला जे ।
ते रस [24]हा, न सहाय श्रेष्ठ असा. [25]यास [26]रामकपि लाजे. ॥ ९९

---

१. शिवाचें संकट. २. ब्रह्मचारी. (श्लो० २७.) ३. योगमाया ही प्रकृतीचें एक स्वरूप आहे. योगशास्त्रानुसार लहान मोठें होण्याची, संकोच प्रसारण करण्याची जी विद्या—कपटविद्या ती योगमाया. योगमायेनें बटूचें लहान रूप धारण करून व आपलें रूप लपवून क्लेशहर्ता नारायण प्रकट झाला. ४. मेखला, मृगाजिन (कृत्ति), कुश, दंड, कमंडलु कौपीन, कुंडलें, इत्यादि चिन्हांनीं युक्त. ५. अग्नीतें. ६. गुंजाच्याही पुंजाला दाहक अशा शिखितें. ७. आचार्यास. ८. अभिवंदन केलें. श्लो० २८ पहा. ९. वडिलांचे व यजमानांचे कामीं. 'गुरु'शब्दाचे येथें दोन अर्थ लक्षांत ठेवण्याजोगे आहेत. १०. षडानन, कार्तिकस्वामी. ११. नंदी हा शंकराचे गणांपैकीं एका गणाचा नायक म्हणजे जमादार आहे. हा शंकराच्या प्रीतींतला असल्यामुळें व सदा त्याची नोकरी हुजुरांत असल्यामुळें त्याचें नांव वारंवार पुढें येतें. १२. हे दितिकुळ कमळाच्या सूर्या! १३. शकुनि नामक पिता तोच समुद्र त्याला आनंद देणारा चंद्र. १४. कमलीं. १५. हिम. १६. तुम्हाला श्रम फार झाले आहेत; पण तुम्ही सामर्थ्यवान् असल्यामुळें ते श्रम तुम्ही मानीत नाहीं इतकेंच. मूर्ख धनिकाची कशी गोड गोड स्तुति केली जाते याचें हें भाषण एक नामी मासला आहे. १७. सागर. १८. आंगण. १९. देह. २०. ज्या देहास. २१. देह रक्षावा, कारण तो सर्वपुरुषार्थहेतु आहे. (श्लो० २९.) २२. हे चतुरा! २३. कामधेनु. २४. हा देह. २५. या देहा. २६. मारुती.

व्हावें सिद्ध [1]समीहित चित्तीं येतांचि कीं अहो आर्य ! ।
सांगा आंगानें जें करणार तुम्हींच कोणतें कार्य ? ॥ ६०
हा जन [2]कार्यश्रवणा योग्य असें जरि तुम्हांस भासेल, ।
तरि सांगावें. [3]सुहृदीं कथिला जो मंत्र[4] तो न नासेल. ॥ ६१
प्रायः सहाय सज्जन संपादुनि साधिती स्वकार्यास ।
अखिलहि असेंचि [5]अवगत अगणितगुणसागरास आर्यास.' ॥ ६२
[6]त्रैलोक्यगुरुद्रोहें होता आधींच मूढ तो भ्रमला, ।
[7]कमलामोहनवचनासवपानें भ्रांतचित्त वि[8]श्रमला. ॥ ६३
यन्मायादासीनें वेडे केले मुनींद्रही थोर, ।
तेथें विश्वगुरुपुढें मदमद्यभ्रांत काय हें पोर ? ॥ ६४
श्रीप्रमुख स्त्री, ब्रह्मप्रमुखपुरुष, त्यांसि मूर्ति ते [10]हाला ? ।
रूपें चरितें वचनें मोही कां या न [11]मोहगेहाला ? ॥ ६५
सांगे निजवृत्त वृ[9]क. प्रभुवर हांसे, म्हणे, 'असें काय ? ।
नारदवाग्विश्वासें [12]भूतपतीचे उपासिले पाय. ॥ ६६
काय तुम्हांस म्हणावें आम्हीं [13]यांचा धरूं न वि[14]श्वास, ।
अजि दक्षशाप कीं हा हें आहे विदित वृत्त वि[15]श्वास. ॥ ६७
झाला पिशाचवृत्ति [16]प्रेतपिशाचपति दक्षगुरुशापें ।
विधि सोडुनि मागावा वर सेवा करुनि काय ऐशापें. ॥ ६८
[17]पितृवनवसति [18]भसितधर हर कीं [19]कंसभूष नागवा हा तें ।
जाणति बुध कलहप्रिय नारद वर्णील [20]नागवाहातें. ॥ ६९
वरद जगद्गुरु, यास्तव वर सत्य, असा असेल जरि [21]भाव, ।
[22]साव परंतु दिवाळें निघतां कोठें खरेपणा ठाव ? ॥ ७०
कैंचा वर ? वेडा हर. [23]माथां कर आपल्या न कां ठेवा ? ।

---

१. इच्छित. २. श्लोक ३० पहा. ३. मित्रापाशीं. ४. गुह्यगोष्ट. ५. माहित. ६. शिवाच्या द्रोहानें. ७. कमला=लक्ष्मी, इला मोहणारा जो कृष्ण, त्या कृष्णाचें भाषण हेंच आसव (मद्य) त्याच्या पानानें. ८. विशेष कष्ट पावला. आधींच भ्रांतचित्त, त्यांत हें मद्यपान, त्यामुळें कष्ट पावला. ९. वृकासुर. १०. मद्य. ११. मोहाच्या घरास. (वृकासुरास.) १२. शिवाचे. १३. शिवाचा. १४. भरंवसा. (श्लो० ३२.) १५. जगास. १६. भूत, प्रेत, व पिशाच ह्या योनि निरनिराळ्या आहेत. पण हल्लींच्या व्यवहारांत एक समजतात. पंत त्यांस भिन्न भिन्न समजत. १७. स्मशानीं वास. १८. भस्म धारण करणारा. १९. अस्थिभूषण. २०. शिवातें. २१. विश्वास. २२. साहुकार. ही उपमा किती समर्पक आहे हें पाहण्याजोगें आहे. २३. श्लो० ३३ पहा.

हे वाचा लटकी हा प्रत्यय येतां वधा महादेवा. ॥ ७१
आज तुम्हांस ठकविलें दुसऱ्यास उद्यां ठकील हें खोटें ।
[1]साधुप्रतारकाला जिंका गातील लोक यश मोठें. ॥ ७२
स्वशिरीं कर ठेवुनि हें सत्य मृषा प्रत्यया बरें आणा, ।
अजि दानवेंद्र! साधो! वाहेन तुम्ही म्हणाल तरि [2]आणा.' ॥ ७३
बोल मधुर बहु अमृतहि विरस मग किती सिता मधु [3]क्षुद्रा? ।
लटिके घटिकेंत गमे ठकवी ठक विश्वमोहन [4]क्षुद्रा. ॥ ७४
[5]कटु परि पटु हरि बटु वरि अमृताधिक मधुर बोलणें बोले, ।
पळभरि [6]खलकरिबलहरि वदला, परि आज कविसभा डोले. ॥ ७५
आत्मा शिव तन्नाशीं इच्छा धरि होय आत्मशिवनाश, ।
[7]सदहितपाशकरकपटिकंठीं घाली जपोनि यम पाश. ॥ ७६
प्रभुवचनभ्रांत वृक स्थापी निजमस्तकावरी हात, ।[8]
[9]पविहत गिरिशिखर तसें फुटलें, खळ आपुला करी घात. ॥ ७७
तेव्हां वर्षति [10][11]सुमनें नतसुरमुनि देवदेव यश गाती ।
प्राशिति बहुचरितामृतसिंधु प्रभुमूर्ति भक्तवशगा ती. ॥ ७८
मग तो भगवंत म्हणे भगवंताला, 'अहो महादेवा! ।
हे वांया स्तविति मला. ऐका हो! क्षणभरी स्तुती ठेवा. ॥ ७९
विश्वगुरो! वरदपते! शंभो! हा पाप आपुल्या पापें ।
मेला दुष्ट. सुत क्षय पावेचि न शापिला जरी बापें. ॥ ८०
पूज्यातिक्रम करितो जो तो [12]हो मर्त्य कीं सुर [13]क्षेमी ।
नोहे कधींच आंगें. असमर्थ तयाचिया [14]सुरक्षे मी. ॥ ८१
पूज्य चतुर्दश लोकीं जे त्या सर्वांस पूज्य तूं पहिला ।
[15]महिला आश्रय ज्याचा आश्रय युष्मत्पदेंचि त्या [16]अहिला. ॥ ८२
विश्वगुरूच्या ठायीं अपराध करूनि कोण वांचेल? ।
भग्नकलश खल [17]शस्तहि [18]जीवन न कदापि त्यांत सांचेल. ॥ ८३

१. साधूला ठकविणारा शिव याला. २. शपथा. ३. द्राक्षा. ४. तुच्छ वृकातें. ५. येथें 'टु' व 'रि' या दोन अक्षरांचा अनुप्रास पाहण्यालायक आहे. ६. खळ हाच गजबळ त्याचा सिंह. ७. साधूचा द्वेष्टा हाच पाशकरकपटि म्ह० फांसेपारधी त्याच्या कंठांत. ८. श्लो० ३५ पहा. ९. वज्राहत. १०. 'मस्तक' हा अध्याहृत कर्ता. ११. पुष्पें. (श्लो० ३७.) १२. होवो, असो. १३. क्षेमवान्. १४. चांगल्या रक्षणाविषयीं. १५. पृथ्वीला. १६. शेषाला. १७. प्रशस्त, मोठा. १८. उदक; (पक्षीं) वांचणें.

केलें तप बहु दुष्कर. वर उग्र वरोनि पावला अंत. ।
हे सत्कृपा! तुज शोकद तरि गातिल तव यशस्करा संत.' ॥ ८४
ऐसें हरिहरचरित प्रेमें विस्तरभयें यथाशक्ती ।
गाउनि हरिहरचरणीं अर्पुनि मी मागतों सती भक्ती. ॥ ८५

---

## अध्याय एकुणनव्वदावा.

पूर्वी सर्वमुनीश्वर [1]जनसंग्रहशुद्धिकाम एकत्र ।
होउनि करीत होते बहुकाळ [2]सरस्वतीतटीं सत्र. ॥ १
सत्रीं साधुसमाजीं संशय [3]सुरसत्तमत्रयीं होय, ।
विधि हरि हर गुरुवर परि भक्ताची कोण जाणतो सोय? ॥ २
म्हणति 'ब्रह्मज्ञसभाभाग्य' [4]ज्या साधुलोक विप्रवर ।
प्रेषिति त्या भृगुमुनिला विधि[5]सदना जाय तो कविप्रवर. ॥ ३
ब्रह्मसभेला गेला, ठेला केला न मान [6]बापाचा, ।
[7]सत्वपरीक्षेस्तव न स्तवन करी लेशही न पापाचा. ॥ ४
उत्सव [8]ज्यांत न माया निजनंदनभृगुमुनीश्वरागमनीं, ।
नमन न केलें यास्तव धरि त्या समयांत दे[9]वें राग मनीं. ॥ ५
आला कोप पित्याला स्वसुत म्हणोनि स्वयें [10]तया शमवी, ।
उदकें अग्नीस जसें परि पूर्वी पळ पि[11]तामहा भ्रमवी. ॥ ६
मग तेथुनि कै[12]लासीं गेला भृगु या [13]स्वबंधुला शिव तो ।
भेटों उठे तदां मुनि दावी [14]भावासि, [15]अशुचि कीं शिवतो. ॥ ७

---

१. लोकसंग्रह करण्याला लागणारी जी शुद्धि तिजविषयीं काम म्हणजे इच्छा आहे ज्यांना ते मुनीश्वर. २. सरस्वती नदीचा खरा ठिकाण लागत नाहीं. कित्येकांच्या मतीं ती पंजाबांत होती, कित्येकांच्या मतीं ती वायव्यप्रांतांत असून प्रयागास (अलाहाबादेस) गुप्तरूपानें गंगायमुनेस मिळते, व कित्येकांचे मतीं अमदाबादेच्या उत्तरेस सिद्धपूर (गायकवाडाचें गांव) म्हणून जें क्षेत्र आहे तेथें असणारी नदी जी सरस्वती तीच यज्ञभूमीजवळील सरस्वती होय. या सिद्धपुरासच मातृगया किंवा कपिलगया म्हणतात. कित्येकांचे मतीं सरस्वती हा शब्द सामान्यनाम असून त्याचा अर्थ कोणतीही एक नदी असा समजावा असें आहे. एकंदरींत सरस्वती नामोच्चारानें स्थाननिर्देश नीट होत नाहीं. ३. ब्रह्मदेव, सदाशिव, आणि विष्णु या तिघां देवांविषयीं. ४. ज्या भृगूला. ५. सत्यलोकीं ब्रह्मसभेला. ६. ब्रह्मदेवाचा. ७. विधीच्या सत्वाची परीक्षा करण्यासाठीं. ८. ज्या समयांत. ९. ब्रह्मदेव. १०. त्या कोपाचें शमन केलें. ११. ब्रह्मदेवाला. १२. अध्याय ८९ श्लो० ५ पहा. १३. भृगुमुनीला. १४. अभिप्रायासी. १५. ओंवळा.

होय वधोद्यत[1] कोपें शूळकर[2] प्रभु. तदा पदें कवळी,[3] ।
देवी शिवा[4] शिवाची मूर्तिमती जी दया सदा जवळी. ॥ ८
तेथुनि वैकुंठातें गेला भृगु तेधवां रमोत्संगीं[5] ।
निजला होता निश्चळ जैसा ब्रह्मात्मबोधसत्संगीं. ॥ ९
ब्रह्मण्यत्व मिरवितो, प्रत्युत्थानोद्गमक्रिया भंगी,[6] ।
'या बैसाही' न म्हणे पाहेना दुर्मद प्रियासंगीं. ॥ १०
दूषी दोषारोपें त्यातें ज्याची जगत्रयीं सत्ता, ।
मत्तापरि निजबोधा[7] मानुनि हाणी उरावरी लत्ता. ॥ ११
लत्ताप्रहार होतां जगदुत्पत्तिस्थितिक्षयक्रीड[8] ।
शीघ्र उठोनि उतरला पर्यंकावरुनि देव सव्रीड.[9] ॥ १२
नमन करुनि त्या मुनिला अत्युत्सव देव दे वंदे,[10] वसती ।
ब्रह्मांडें यज्जठरीं, जेंवि समुद्रीं तरंग उल्लसती. ॥ १३
'प्रभुजी! चुकलों. तुमच्या नव्हतों मी सावधान आगमनीं, ।
यावरि कधीं चुकेना, न धरावें हें मदीय आग[11] मनीं. ॥ १४
या आसना सनाथ[12] क्षणभरि देवा! करा. करा[13] स्वामी! ।
बापा! या पायाला लावूं द्या, दुखवला अहा! स्वा[14] मी. ॥ १५
बापा! पापापह[15] हे पाय तुझे मृदुल मत्करापरिस[16]; ।
परि सज्जना[17] दुरितनगदलनें[18] लाजविति पविधरा[19] हरिस.[20] ॥ १६

१. भृगूला मारण्यास सिद्ध. २. शूलपाणि. (शंकर.) ३. पायांस विनयपूर्वक नमस्कार करी, प्रार्थना करी. ४. पार्वती. ५. लक्ष्मीच्या मांडीवर. ६. न करी. ७. श्रीविष्णूस. ८. जगाच्या उत्पत्त्यादिक्रिया ज्याचा खेळ असा विष्णु. ९. सलज्ज. १०. येथें 'लाटानुप्रास' आहे. ११. अपराध. ['आग' शब्द संस्कृतांत नपुंसकलिंगी आहे.] १२. सनाथ करा=ज्याला यजमान, स्वामी आहे असें करा. या आसनावर बसा. हें रिकामें पडलें आहे, त्याला कोणी धनी नाहीं, तेव्हां त्याचे धनी व्हा. १३. हस्तास. १४. स्वा=आत्मा. 'स्वो ज्ञातावात्मनि स्वं त्रिष्वात्मीये स्वोऽस्त्रियां धने' इ-त्यमरः. कृष्ण म्हणतो कीं, 'मी भृगूच्या पायाला दुखविलें नाहीं किंतु माझ्या अंतरात्म्याला मीं दुखविलें आहे. 'स्वा' हें पुल्लिंगीं 'स्व'शब्दाचें प्रथमेचें एकवचन आहे. कर्मणि प्रयोग. १५. पापाला दूर करणारे. १६. पेक्षां. १७. 'सज्जना' हा शब्द संबोधन समजावा किंवा 'हरिस' या शब्दाचें विशेषण समजावा. उभयपक्षीं ही या शब्दाच्या योजनेंत कांहीं विशेष स्वारस्य दिसत नाहीं. १८. पापपर्वतनाशानें. १९. वज्रधारण करणारा. 'वज्रादपि कठोराणि मृदूनि कुसुमादपि' या भवभूतिकृत 'उत्तररामचरितां'तील उक्तीचा आशय प्रस्तुत आर्येंत पंतांनीं गोंविला आहे तो पाहण्याजोगा आहे. २०. इंद्रास.

[1]मदुरीं [2]विराजलें क्षण तुमचें पद, [3]तीर्थभूतिचें [4]पद कीं, ।
उरला न गर्व कौस्तुभरत्नीं, शोभा असीच या पदकीं. ॥ १७
झालें पवित्र हें उर, उरला न मळ; प्रभो! असा वास ।
श्रीला दुर्लभ; भक्तीं याचिपरी सदय तूं असावास. ॥ १८
[5]भुललों होतों परि बा! भाग्यें झालें भलें मला स्मरण, ।
[6]मद्गत लोक तरावे देवूत निजावनेजनें चरण. ॥ १९
नव्हताचि मुनिश्रेष्ठा! [7]अपराधनदीधव [8]क्षमावासा. ।
काय प्रसाद वर्णूं? केलें हें उचित [9]वक्ष [10]मांवासा.' ॥ २०
ऐसें प्रार्थुनि पूजी, तेव्हां भृगु काय तेथ बोलेल! ।
[11]सत्रीं [12]सत्वनिधीचें यश गाउनि डोलवील डोलेल. ॥ २१
सत्रीं येतां नाचे. [13]वाचेला बोलवेल काय? कवी ।
तो भृगु मुहूर्तमात्र स्तब्ध बसे, मग समस्त [14]आयकवी. ॥ २२
ते मुनि म्हणति, 'प्रभुजी! [15]प्रणतांच्या [16]कल्पपादपा! देवा! ।
'दे वासना सुनिर्मळ, सत्वसमुद्रा! करूं तुझी सेवा.' ॥ २३
[17]जी ती कथा सुखाची [18]सरिता [19]हरि ताप तापस श्रोते ।
कवि मीन आंत बाहिर दिसति विचारें परस्परां हो! ते. ॥ २४
[20]नवल हरिकथा सरिता वाहविति स्थिति न मोडिती दूर, ।
आधीं बुडविति मग तन्नेत्रांत भरे हळूहळू पूर. ॥ २५
[21]द्वारावतींत ब्राह्मणपत्नीचें [22]जन्मतां मरे तोक, ।
तें शव [23]राजद्वारीं ठेवुनि करि फार विप्र तो शोक. ॥ २६

---

१. माझ्या उरावर. २. शोभलें. ३. तीर्थरूप ऐश्वर्याचें. ४. स्थान, ठाणें. ५. विसरलों. ६. अन्वय:—'मद्गत लोक तरावे [म्हणून तुझे] चरण निजावनेजनें देवूत.' अर्थ:—कृष्ण भृगूस म्हणतो, 'माझ्या वेड्यांतील लोकांचा उद्धार व्हावा म्हणून तुझे पाय (त्यांस) आपलें तीर्थ देवोत.' निज=आपलें, अवनेजन=धुवण, धुण्याचें पाणी. पादतीर्थ, पायवणी. निज्=धुणें, शुद्ध करणें. ७. अपराधसागर. ८. सोसावा असा. ९. हृदय. १०. लक्ष्मीच्या निवासास. ११. यज्ञप्रसंगींची बैठक. १२. धैर्यसागर विष्णु याचें. १३. वाणीला, सरस्वतीला. १४. हें पंतांचें आवडतें यमक आहे. १५. नम्र, लवलेले. १६. कल्पतरो. १७. रूपकालंकार. हें रूपक खमंगांपैकीं आहे. १८. नदी. १९. हरण करते, नाश करते. २०. 'रूपक' व 'अद्भुत' या अलंकारांचा संकर. २१. अ० ८९ श्लो० २२ पहा. २२. उत्पन्न झाला तोंच, जातमात्र. २३. कृष्णप्रभृति यादवांच्या सभागृहाच्या दरवाज्यांत.

'[1]ब्रह्मद्वेषकपटमति [2]लुब्ध विषयकामभूपपापानें ।
रडतों निष्पापहि मी विप्र [3]मृतापत्यशोकतापानें. ॥ २७
[4]अजितेंद्रिय दुःशील क्षिति[5]पति हिं[6]साविहार जो पाप, ।
त्याच्या प्रजा द[7]रिद्रक्लीबांधवधूचि पावती ताप.' ॥ २८
करितां विलाप विप्र, प्रभुला निंदी समस्त लोकांत, ।
[8]तो कां तप्तस्वांतें [9]आत्माधिक्षेप न करि शोकांत? ॥ २९
दुसराहि कुमार मरे, तेव्हांहि विलाप करि असाचि रडे, ।
टाकी बाळक, जाणो तो अहिदंष्ट्रांत आंगठा चिरडे. ॥ ३०
तिसरा चवथा ऐसे मेले हो! उपजतांचि शिशु आठ, ।
[10]मुक्तिपुरींतहि शोकें सद्विप्राचीहि पुरविली पाठ. ॥ ३१
[11]राजद्वारीं सोडी नवमसुतासहित तत्पिता [12]श्वास, ।
कृष्णासमीप असतां कळलें द्विजवृत्त तें [13]सितांश्वास. ॥ ३२
पार्थ म्हणे, 'बा! साधो! रोदन करितोसि कां अरण्यांत? ।
वैद्यांत रोग आर्तें उघडावा, शोकही शरण्यांत. ॥ ३३
या त्वत्पुरीं धनुर्धर केवळ [14]राजन्यबंधुही नाहीं, ।
हे यदुसत्रीं ब्राह्मण रक्षावे काय शस्त्रहीनाहीं? ॥ ३४

---

१. ब्रह्मद्वेषादिक जें राजाचें पाप त्यानें. २. लोभी. (श्लो० २४.) ३. मेलेल्या मुलाबद्दल झालेला जो शोक त्याच्या संतापानें. ४. ज्यानें आपलीं इंद्रियें जिंकिलीं नाहींत असा. विषयवासना ज्याच्या प्रबळ आहेत असा. ५. क्षत्रियाधम. ६. हिंसेविषयीं गोडी ज्यास आहे असा, किंवा हिंसा हीच आहे करमणूक ज्याला. (श्लो० २५.) ७. दरिद्री, नपुंसक व अंध अशा दोषत्रयानें युक्त अशा नवऱ्याच्या बायकोप्रमाणें. या सामासिक शब्दांतील तीनही विशेषणें नुसतीं समर्पक आहेत इतकेंच नव्हे परंतु त्यांतील प्रत्येक विशेषण असें कांहीं योग्यस्थळीं योजिलें आहे, व प्रत्येक दुसऱ्याचें असें कांहीं अर्थपोषक आहे कीं त्यांतील कोणतेंही काढून टाकिलें असतां कवीनें योजिलेल्या अर्थाची रसहानी एकदम होते. उदाहरणार्थ, एखादा नवरा दरिद्री आहे तर त्याच्या बायकोला दुःख तर होणारच, पण त्यांतून तो जर क्लीब असेल व आणखी अंधही असेल तर त्या बाईच्या दुःखाला पारावारच नाहीं. ८. अन्वयः—तो (विप्र) शोकांत (दुःखाच्या आवेशांत) तप्तस्वांतें (पोळलेल्या अंतःकरणानें) आत्माधिक्षेप (स्वतःची निंदा) कां न करी? अर्थात् करिता झाला. ९. आपला तिरस्कार. १०. मुक्तिपुरी=द्वारका. येथें 'मुक्तिपुरींतहि शोकें' या चरणांत विरोध दाखविण्याकरितां बळानें 'मु[क्ति]' हा शब्द योजिला आहे. ११. सहोक्त्यलंकार. १२. दुःखोद्गार. १३. अर्जुनास. १[४.]
राजा, क्षत्रियाधम.

धनपुत्रदारविरहें ज्यांदेखतहि प्रजा बुडे शोकीं, ।
राजन्यवेष घेउनि [1]नट भरिती पोट [2]थोट ते लोकीं. ॥ ३५
निर्भय निर्दय काळव्याळ तुझ्या बाळकां नवां चावे, ।
साधु धनुर्धर रक्षक असतां तें बाळ कां न वांचावें? ॥ ३६
यावरि मी सत्य तुम्हा दीनाच्या संततीस रक्षीन, ।
नाहीं तरि [3]शिखिकुंडीं तनु [4]होमाया न [5]काळ लक्षीन.' ॥ ३७
विप्र म्हणे, 'अनिरुद्ध **प्रद्युम्न मुकुंद रा**म हे त्राणीं ।
न क्षम, **द**क्ष महारथ [6]ईशहि, तरती [6]यदीक्षणें प्राणी. ॥ ३८
जें [7]ईश्वरीं न केलें, कैसें करिशील कर्म [8]दुष्कर तें? ।
कामीं साफल्य पणें तसें जसें वंध्यदारशुष्करतें. ॥ ३९
[9]मुग्धपणें पंगु म्हणे जरि करितों [10]हेमभूधरारूढ, ।
तद्विश्वासें जो जन '[11]परिकर बांधील तो खरा मूढ.' ॥ ४०
**पा**र्थ म्हणे, 'भूदेवा! विदित असें [12]सत्यसंध विश्वा मी, ।
**रा**म नव्हें, **कृ**ष्ण नव्हें, **प्र**द्युम्नहि मी नव्हें, बरें स्वामी! ॥ ४१
मज नाहीं ओळखिलें [13]**भी**मानुज [14]**ध**र्मसूनु **पां**डव मी, ।
देता झालों [15]भेषज [16]रोगार्तानलमुखांत **खां**डव मी. ॥ ४२
**गां**डीवनाम माझें कोदंड, [17]उदंड दंडिले दुष्ट ।

---

१. श्लो० २९ पहा. २. ठक. ३. अग्निकुंडीं. ४. होमाया=होम करण्यास, जाळून घेण्यास. ५. श्लो० ३० पहा. ६. ज्या शंकराच्या ईक्षणें (पाहण्यानें). ७. राम वासुदेव प्रद्युम्न अनिरुद्ध इत्यादिकांनीं जें दुष्कर. (श्लो० ३०.) ८. मोरोपंत–उद्योगपर्व–पृष्ठ ५७ गीति ३८ यांतही हेंच यमक आहे. ९. वेडेपणानें. १०. मेरुपर्वतारूढ. पंगु मनुष्यानें मेरुपर्वतारोहण करण्याची इच्छा धरणें इत्यादि वर्णन मूळांत नाहीं, हें पंतांच्या पदरचेंच आहे. ११. कंबर. मराठीमध्यें या शब्दाचा 'परकर' असा अपभ्रंश झाला असून अर्थांतही फरक झाला आहे. १२. सत्यप्रतिज्ञ. १३. भीमाचा धाकटा बंधु. १४. धर्माचा धाकटा बंधु. [सुनु=धाकटा बंधु. 'सुनुः पुत्रेऽनुजेऽर्के ना' इति मेदिनी.] १५. औषध. १६. रोगानें पीडिलेल्या अग्नीच्या मुखांत. १७. 'दंड्' धातूपासून निघालेल्या शब्दांकडे लक्ष दिलें असतां मूळच्या अर्थाचा थोडथोडा संबंध ठेवून कशीं अर्थांतरें होतात तें ध्यानांत येईल. दंड म्हणजे शिक्षा, ती करण्याचें साधन म्हणून काठीलाही दंड नांव [illegible] त्यापासून दांडा शब्द निघाला. काठीचा उपयोग आडवी बांधून धोतर वगैरे वाळत घाल[illegible]तात त्यामुळें दांडी हा शब्द झाला. आतां उद्दंड याचा अर्थ उंच आहे दांडा ज्याचा तें [illegible]ी वगैरे. यावरून उदंड म्हणजे पुष्कळ असा अर्थ झाला. 'मी खलदंडें उदंड ता[illegible]ानुहरण. (व्युत्पत्तिप्रदीप–पृष्ठ ३७.)

म्यां [1]चंद्रखंडमंडन केला [2]चंडीश देवही तुष्ट. ॥ ४३
[3]लुटिला कुटिला काळें चोरें घोरें वनांतरीं [4]सार्थ, ।
नव्हता पाळक बालकधन जोडा, रक्षिता पुढें पार्थ. ॥ ४४
स्वस्थ असावें स्वामी! हा मी त्वद्दास संगरीं काळ ।
स्वबळें जिंकुनि वोढुनि काढिन कालाननांतुनी बाळ.' ॥ ४५
ब्राह्मण म्हणे, 'भला बा! जगदीश करू तुझ्या पणा सत्य. ।
त्वां तरि यश जोडावें संरक्षुनि दुर्बलद्विजापत्य.' ॥ ४६
विप्र स्वगृहा गेला, अर्जुनही द्वारकापुरीं राहे, ।
विप्रस्त्रीप्रसवाच्या समयाची वाट [5]त्याहुनी पाहे. ॥ ४७
भार्याप्रसूतकाळीं कळवी पार्थासि विप्र ती [6]वार्ता, ।
तत्काळीं तो अर्जुन पुनरपि दे अभय त्या द्विजा [7]आर्ता. ॥ ४८
[8]वंदुनि [9]महेश्वरातें दिव्यास्त्रांतें स्मरोनि तो पार्थ ।
[10]गांडीवदंड उचली [11]निजभुजदंडाहिराजकोपार्थ. ॥ ४९
[12]नानास्त्रमंत्रितेषुप्रकरें मुनिगृहशुकासि [13]पंजरची ।
पवनप्रवेश न घडे [14]ज्यांत असें [15]पार्थपाणिकंज रची. ॥ ५०
[16]शरपंजरांत झाला विप्रस्त्रीला कुमार जो दशम, ।
तो तीस दे सुख क्षण, जेंवि अजितबुद्धिस प्रमोद शम. ॥ ५१
झाला कुमार सुंदर, होतां पहिलें जसें तसा [17]रडला, ।
पडला स्वप्नीं [18]निधिसा दृष्टिस, मग तो [19]नभांत आरडला. ॥ ५२
'शव तरि रहात होतें पहिल्यांचें, हा [20]सदेहही नेला,' ।
रडतां म्हणे द्विजस्त्री, 'मज दुर्लभ शवहि भाग्यहीनेला.' ॥ ५३

---

१. चंद्राचा खंड (तुकडा) हा आहे मंडन (भूषण, अलंकार) ज्याचा, म्हणजे शंकर. 'चंडीश' याचें विशेषण. २. चंडी पार्वती तिचा ईश सदाशिव. ३. मारला. ४. व्यापाऱ्यांचा तांडा. ५. ब्राह्मणाहून. ६. प्रसवसमयवार्ता. ७. पीडिलेल्याला. ८. श्लोक ३७ पहा. ९. शंकराचें स्मरण करण्याचें कारण त्यापासून अर्जुनाला पाशुपतास्त्र मिळालें होतें. अर्जुनानें कृष्णाला वंदन करून व त्याचा विचार घेऊन वर्तन करावयाचें होतें, पण तसें न केल्यानें कृष्णाची अवज्ञा केल्यासारखें झालें. १०. गांडीवाला दोरी लावून सज्ज केलें. ११. निजभुजदंड तोच अहिराज त्याच्या कोपार्थ. १२. ही गीति रूपकोत्प्रेक्षेचें उदाहरण आहे. अनेकप्रकारचीं अस्त्रें व मंत्रप्रोक्षित बाण यांच्या समूहानें त्या ब्राह्मणाचें घर हाच कोणी शुक (राघू) त्याकरितां पिंजराच जणूं काय अर्जुन रचिता झाला. १३. पिंजराचि. १४. ज्या पिंजऱ्यांत. १५. पार्थाचें करकमल. १६. शरपंजरयुक्त सूतिकागृहांत. १७. जन्मतांच टाहो फोडला. १८. पैशाचा ठेवा. १९. श्लोक ३९ पहा. २०. सशरीर.

ब्राह्मण म्हणे, ‘प्रिये! या वीरें केला बराचि सांभाळ, ।
पौत्र[1] तुझा हा धार्मिक, फळलें बहु थोडक्यादिसां भाळ[2]. ॥ ५४
शवसंनिधान न बरें, शोकाला हेतु, भूमिला भार, ।
सार्थक[3] पार्थ करी हा पौत्र विवेकी विधी[4] नैराकार[5].’ ॥ ५५
कृष्णापासीं होता पार्थ, तयातें म्हणे, ‘भला भ्राता ।
भीमाधर्माचा तूं, भीतांचा संकटीं खरा त्राता. ॥ ५६
[6]तूं अर्जुन, तृण दत्तच्छात्र[7] म्हणे वृद्ध मी, नसे तर्क, ।
भ्रांत तमीं बाळ तया भानु गमे वृक्ष म्हणति ज्या अर्क[8]. ॥ ५७
सर्वश्रुतिशास्त्रांतें पढलों परि मी पहा महामुग्ध[9]; ।
तर्कासि[10] दोष कैंचा? शुभ्रपणें म्यांचि मानिलें दुग्ध. ॥ ५८
[11]क्लीबाचें कत्थन[12] कां मानावें सत्य? मूढ मीच पण, ।
स्वाघ[13] न पाहे कोणी दूषी[14] दुसऱ्यासि हेंचि नीचपण. ॥ ५९
रक्षील कोण दुसरा? झाले न मदात्मजावना[15] शकते ।
प्रद्युम्न[16] राम कृष्णहि, जे इंद्राचाहि गर्वनाशक ते. ॥ ६०
आम्हां साधूंपाशीं बोलावें कां मृषा[17] असें पाप? ।
धिक्कार तुला, तुझिया गांडीवालाहि; दान दे चाप[18]. ॥ ६१

---

१. उपरोधानें अर्जुनास पौत्र म्ह० नातू असें म्हटलें. २. कपाळ, दैव. ३. आपल्या पित्याचें सार्थक म्ह० योग्य क्रिया. ४. शास्त्रविधी. ५. विप्राचें भाषण मूळाशीं ताडून पाहिलें असतां पंतांची कृति फार सरस आहे असें मार्मिक वाचकांस कळून येईल. ६. सहस्रार्जुन तुला खरा अर्जुन आणि तो सहस्रार्जुन तृण असें मी म्हणे. कां कीं मी वृद्ध. मला तितका तर्क नाहीं. ७. दत्तात्रेयाचा शिष्य सहस्रार्जुन. ८. रुईचें झाड किंवा सूर्य. ही सर्व गीति लक्षपूर्वक पाहण्याजोगी आहे. अन्वय व अर्थ:—वृद्ध म्हणे तूं अर्जुन, दत्तच्छात्र तृण, असें म्हणें [कारण] मी वृद्ध, तर्क नसे. तमीं भ्रांत बाळ तया ज्या अर्कं वृक्ष म्हणति [तो] भानु गमे. वृद्ध ब्राह्मण म्हणाला, ‘हे अर्जुना! तूं खरा अर्जुन, दत्तच्छात्र (दत्ताचा शिष्य सहस्रार्जुन) हा तृण आहे. मी वृद्ध ब्राह्मण असल्या कारणानें मला तर्क नाहीं, म्हणून कांहीं तरी बोलतों. याला उदाहरण—आंधारांत चुकलेल्या मुलांस ‘अर्क’शब्दाचा उच्चार ऐकिल्याबरोबर ‘वृक्ष’ हा त्याचा अर्थ न करितां ‘सूर्य’ असा करितो तद्वत्. ‘अर्जुन’शब्दाचा ‘यवसं तृणमर्जुनम्’ इत्यमरः हा अर्थ सोडून भलताच अर्थ समजावयास लागलों. शब्दश्लेषालंकार. ९. मोठा मूर्ख, मूर्खशिरोमणि. १०. हें अर्ध उत्तम सुभाषित आहे. अर्थांतरन्यास आणि भ्रांतिमान् असे दोन अलंकार ह्यांत आहेत. ११. श्लोक ४० पहा. १२. खोटी बडबड. १३. आपला दोष. १४. हें अर्ध सुभाषितरूप आहे. १५. मद्+आत्मज+अवना=माझें+पुत्र+रक्षणा. १६. श्लोक ४१ पहा. १७. खोटें. १८. चाप देऊन टाक.

करणार हा महाबल[1] देवांचें आपुल्या भुजीं मथन, ।
धन रक्षणार माझें लाजें मीही करावया कथन. ॥ ६२
सत्य हरप्रतिभट[2] तूं, केलें मन्नियतिनें[3] तुज क्लीब[4], ।
पण चिंता न करावी, बडबडती काय काम[5] न क्षीब[6]? ॥ ६३
सुतशोकार्त ब्राह्मण वदला त्याचा धरूं नको कोप, ।
वृकभय[7] वारिल, परि हरिपासुनि[8] रक्षी असा नसे गोप[9].' ॥ ६४
गेला ब्राह्मण तो मग पार्थहि विद्याबळेंचि यमलोका[10], ।
तेथें शोध करी परि धर्म[11] म्हणे, 'आणिलें न त्या तोका.' ॥ ६५
अष्टौलोकपतींच्या[12] लोकांला जाय तो महायोध, ।
पाताळादि स्थानीं गांडीवी वायुसा करी शोध. ॥ ६६
केला शोध उदंडचि, विप्रसुताचा न लागला माग[13]; ।
आला मग परतोनि द्वारवतीलाचि तो महाभाग. ॥ ६७
योगी हो[14], योगिगुरु प्रभुची जाणेल कोण हो! माया? ।
गतगर्व पार्थ झाला सिद्ध ज्वलनांत[15] देह होमाया. ॥ ६८
रक्षावया प्रतिज्ञा बांधी परिकर, तया स्वभजकास[16] ।
रक्षाया त्यापूर्वी घाली सत्यप्रतिज्ञ अज[17] कास. ॥ ६९

---

१. मोठा बळवान्. २. शिवाशीं युद्ध करणारा. ३. माझ्या दैवानें. ४. नपुंसक. ५. यथेष्ट. ६. मत्त. हा पाद सुभाषितरूप आहे. ७. लांडग्याचें भय. ८. सिंहापासून. ९. गोरक्षक. १०. यमाच्या संयमनी नामक नगरीला. (श्लो० ४३.) ११. यमधर्म. १२. आठ दिक्पाल. यांजविषयीं पुढील कोष्टकांत सविस्तर माहिती आहे ती पहा:—

| दिशा. | दिक्पाळ. | दिग्ग्रह. | दिग्गज. | दिग्गजस्त्रिया. |
|---|---|---|---|---|
| पूर्वा | इंद्र | सूर्य | ऐरावत | अभ्रमु |
| आग्नेयी | अग्नि | शुक्र | पुंडरीक | कपिला |
| दक्षिणा | यम | मंगळ | वामन | पिंगळा |
| नैर्ऋती | राक्षस | राहु | कुमुद | अनुपमा |
| पश्चिमा | वरुण | शनि | अंजन | ताम्रकर्णी |
| वायवी | वायु | चंद्र | पुष्पदंत | शुभ्रदंती |
| उत्तरा | कुबेर | बुध | सार्वभौम | अंगना |
| ऐशानी | महादेव | गुरु | सुप्रतीक | अंजनावती |

(नामलिंगानुशासन–पृष्ठ १०.) १३. शोध. (मार्ग्–शोधणें.) १४. असो. १५. अग्नींत. (श्लो० ४५.) अग्निप्रवेश करण्यास सिद्ध झाला. १६. त्या अर्जुनास. १७. कृष्ण.

गीतेंत ‘[1]न मे भक्तः प्रणश्यति’ प्रभु म्हणेल ज्यापासीं, ।
होईल उदासीनस्वांत कसा देव त्या सख्या दासीं ? ॥ ७०
भक्त जळेल ज्वलनीं, कौतुक पाहेल देव तो काय ? ।
माय प्रभु वत्स भजक हेंहि उणें, वेगळा न तो [2]काय. ॥ ७१
कृष्ण म्हणे, ‘रे वेड्या! चाल करूं शोध, हो धनुष्पाणी, ।
तूं [3]मद्धनासि कैसा मजला न पुसोनि सोडिसी पाणी ? ॥ ७२
एकाची काय कथा ? सर्व द्विजबाळ दावितों चाल, ।
आम्ही नसों, प्रतिज्ञा न घडे तरि पावकीं उडी घाल. ॥ ७३
आतां निंदा करिती परि यश गातील बा! तुझें लोक ।
हो [4]कश्मल सोडुनि तूं निर्मळ, देऊं नको मला शोक. ॥ ७४
बैस रथावरि, तूं मी दोघे जाऊं, नको तिजा [5]सूत. ।
मी मातली तुझा बा! तूं वीर रथीं समर्थ [6]पुरुहूत.’ ॥ ७५
चंद्रार्क तसे ते नरनारायण शोभले रथीं [7]जवनीं, ।
[8]कीं ज्ञान भक्तियोग [9]श्वसनसुतीं [10]रघुवराचिया भवनीं. ॥ ७६
जाति प्रभु [11]प्रतीचीप्रति विप्राशा करावया पूर्ण, ।
ते [12]सप्तसिंधु[13]सप्तद्वीप [14]सप्ताद्रि लंघिती तूर्ण. ॥ ७७
[15]लोकालोकगिरीतें लंघुनि रथ तो पलीकडे गेला. ।

---

१. ‘क्षिप्रं भवति धर्मात्मा शश्वच्छांतिं निगच्छति । कौंतेय प्रतिजानीहि न मे भक्तः प्रणश्यति ॥ ३१ ॥ (गीता—अ० ९.) त्याची बुद्धी धर्माकडे त्वरित लागते, आणि त्याला सर्वकाळची शांति प्राप्त होते । कौंतेया, पक्केंपणें ध्यानांत ठेव कीं, माझा भक्त नष्ट होत नाहीं. । (सुबोधचंद्रिका) २. अर्जुनाचा देह. ३. त्वद्देह तेंच मद्धन त्यास. ४. दुःख. ५. सारथी. ६. इंद्र. ७. वेगवंतीं रथीं. ८. ‘कीं रामलक्ष्मणप्रभु बसले एकींच कवितनूपवनीं’ असाही पाठ आहे. ९. हनुमंतीं. १०. श्रीरामाच्या. ११. पश्चिमदिशेस. (श्लो० ४७.) प्राची, अवाची, प्रतीची आणि उदीची ह्या अनुक्रमें पूर्व, दक्षिण, पश्चिम आणि उत्तर दिशा होत. १२. सप्तसागर:—क्षारसमुद्र, इक्षुरसोद, सुरासमुद्र, घृतोद, क्षीरोद, दधिसमुद्र आणि शुद्धोद. १३. सप्तद्वीपें:—‘जंबुप्लक्षाह्वयौ द्वीपौ शाल्मलश्चापरो द्विज । कुशः क्रौंचस्तथा शाकः पुष्करश्चैव सप्तमः ॥’ (विष्णुपुराण.) १४. सप्तपर्वत:—‘महेंद्रो मलयः सह्यः शुक्तिमान् गंधमादनः । विंध्यश्च पारियात्रश्च सप्तैते कुलपर्वताः ॥.’ १५. सप्तमहाद्वीपें आणि सप्तसमुद्र यांस पोटांत घेऊन मेरुपर्वताच्या आसमंतात् बाराकोटि पन्नासलक्ष योजनांवर असणारा वर्तुलाकार महापर्वत. याच्या आंतल्या भागास ‘लोक’ (प्रकाश) व बाहेरल्या भागास ‘अलोक’ (अंधकार—अप्रकाश) असल्यामुळें याला ‘लोकालोक’ असें नांव पडलें.

तेथें तमें[1] तमोहरहरिहरिवरवेग[2] रुद्ध पळ केला. ॥ ७८
चक्राला[3] आज्ञापी प्रभु तें कोट्यर्कसम तमा निर्वटी[4], ।
चाले पुढें रथाच्या जाणो धरिली सुदर्शनें दिवटी. ॥ ७९
तिमिरघटेसि[5] विदारी तैसें प्रभुचक्र तें महाप्राण[6], ।
राक्षससेनेसि जसा श्रीरामधनुर्विमुक्तसद्बाण[7]. ॥ ८०
हरिरथतुरग[8][9] सुदर्शनदर्शित मार्गेंचि त्या तमीं तरती, ।
सद्दर्शितभक्तिपथें जेंवि सुमति कृष्णकीर्तिगीतरती[10]. ॥ ८१
तें तम तरोनि जातां भगवतज्योति[11] अर्जुना भिववी[12], ।
शिव वीर[13] म्हणे ज्याला[14] तद्दृष्टि हरूनि अंतरीं निववी. ॥ ८२
तापघ्न शांत परि ज्या तेजा पाहों शके न तो वीर[15] ।
विद्युज्ज्योति प्राकृत तेंहि पहाया उरों न दे धीर. ॥ ८३
उदकीं रत्नभवन[16] जें दिव्य महाकाळपुर तयामाजी, ।
स्वशिरोमणिदीपांहीं[17] स्वसुखहरिप्रभुपदासि[18] नीरांजी[19]. ॥ ८४
भगवद्दत्ताभयवर अर्जुन उघडी हळूच नयनांतें, ।
पाहे अनंतसुखकरपदपद्मा त्या अनंतशयनातें[20]. ॥ ८५
हिमधवलभोग[21] भगवान् दशशतफण शेष देखिला भीम[22], ।
तत्तनुसुखासनीं[23] प्रभु, ज्याचें सौंदर्य तेज निःसीम. ॥ ८६
सांद्रघनश्याम[24] कनकवर्णांबर सुप्रसन्नमुखपद्म[25] ।

---

१. अंधकारें. (श्लो० ४८.) २. तमोहर जो हरि त्याचे हरिवर (शैल्य, सुग्रीव, मेघपुष्प, बलाहक हे उत्तम अश्व) त्यांचा वेग पळभर रुद्ध केला. ३. सुदर्शनाला. ४. नाशी. ५. अंधकाराच्या दाटीस. [तिमिर=अंधकार; घटा=समूह.] ६. महाशक्ति. ७. श्रीरामाच्या धनुष्यापासून सुटलेला उत्कृष्ट बाण. 'सद्बाण' ह्यांतील 'सत्' या विशेषणाचा उपयोग नित्य आहे. तसेंच 'सदसि' 'सद्रथ' इत्यादि स्थळीं समजावें. ८. श्लो० ५१ पहा. ९. कृष्णरथाचे अश्व. १०. कृष्णाच्या यशकीर्तनीं ज्यांची रति (आवड). ११. ईश्वरी तेज. १२. अर्जुनाचे नेत्र दिपून गेले—असा भाव. अर्जुन प्रताडिताक्ष झाला. (श्लो० ५२.) १३. येथें किरातार्जुनीयांतील प्रसंगावर कविकटाक्ष आहे. १४. ज्या अर्जुनाला. १५. अर्जुन. १६. रत्नखचित मंदिर. (श्लो० ५३.) १७. निजमुकुटरत्नदीपांनीं. १८. सुखावह ईश्वरपदास. १९. ओंवाळी. २०. शेषशयनातें. २१. बर्फासारखा शुभ्र देह ज्याचा. २२. महाभयंकर. २३. त्या शेषाच्या अंगावरील सुखासनावर. (श्लो० ५५.) २४. पाण्यानें गच्च भरलेल्या मेघाप्रमाणें काळाकुळकुळीत. २५. सुविकसितमुखकमल.

[१]अनुकंपालक्ष्मीचें [२]रुचिरायतलोचनाब्जयुग [३]सद्म. ॥ ८७
[४]सन्मणिकिरीटकुंडलरुचिपुंजसुरंजितालकस्तोम ।
वोंवाळुनि सांडावे [५]श्रीवदनावरुनि कोटि [६]रविसोम. ॥ ८८
[७]सांगद [८]मणिकटकांचित [९]मुद्रारम्य [१०]प्रलंब भुज आठ ।
वरदानसाधुपालन खलबलदलनादि कर्म ज्यां पाठ. ॥ ८९
श्रीवत्सश्रीकौस्तुभवनमालाधर मनोहराकार ।
सार श्रुतिशास्त्रांचें [११]मूर्त ब्रह्म प्रमोद दे फार. ॥ ९०
[१२]पार्षद नंदसुनंदप्रमुख सुदर्शनमुखायुधें [१३]सांगें ।
प्रभुसी उपासिती तें पाहे त्याच्याचि तो [१४]कृपापांगें. ॥ ९१
पुष्टि [१५]अजा कीर्ति श्री [१६]अणिमादि विभूति दासिका सेवा ।
करिती ज्याची वंदी [१७]कृष्णासह कृष्ण त्या महादेवा. ॥ ९२
त्याला जिष्णु प्रभुच्या तेजें, सत्पुत्र जेंवि ताताच्या, ।
स्वामिप्रसाद बहु, परि भय शोभे [१८]नंदनींहि वाताच्या. ॥ ९३
आज्ञा करि परमेश्वर दोघां कृष्णांसि ‘वत्स हो! आलां ।
आम्हीं हरिले द्विजसुत यास्तव लोकांत घाबरे झालां. ॥ ९४
त्यांचि तुम्हांसि पहाया केली हे युक्ति मुक्तिच्या पतिनें, ।
अवतरलां अंश तुम्ही माझे [१९]धर्मावनार्थ [२०]मन्मतिनें. ॥ ९५
हरुनि क्षितिभार तुम्ही नरनारायण ऋषी वसा धर्मीं, ।
[२१]शर्मीं लोक पडों द्या मोजा जा आचरोनि सत्कर्मीं. ॥ ९६

---

१. दया हीच लक्ष्मी तिचें. २. सुंदर व विस्तृत जीं लोचनें तींच कमळें त्यांचें युग्म (जोडपें). ३. घर. लक्ष्मीचें घर=कमल म्हणून ‘पद्मालया’ असें तिचें नांव आहे. ४. रत्नखचित मुकुट आणि कुंडलें यांच्या कांतिपुंजानें शोभित आहेत कुटिल केश ज्या प्रभूचे. हें सर्व अर्थ एक सामासिकशब्दाचें आहे. ५. श्लो० ५६ पहा. ६. सूर्य व चंद्र. ७. बाहुभूषणांसहित. ८. मण्यांच्या कड्यांनीं युक्त. ९. आंगठ्यांमुळें रम्य दिसणारे. १०. लांबलचक. ११. ब्रह्माची मूर्तीच. १२. सेवकगण. १३. अंगांसह, सगळीं. १४. कृपाकटाक्षानें. [अपांग=नेत्रप्रांत, डोळ्याचें टोंक.] १५. माया. १६. ‘अणिमा महिमा चैव गरिमा लघिमा तथा । प्राप्तिः प्राकाम्यमीशित्वं वशित्वं चाष्ट सिद्धयः ॥’=बारीक होणें, मोठें होणें ज्याच्या योगानें सिद्ध ब्रह्मांडांत मात नाहीं, जड होणें, हलकें होणें, करांगळीच्या टोंकानें चंद्रादिक घेणें, इच्छेचा भंग न होणें, प्रभुत्व याच्या योगानें स्थावरही आज्ञाधारक होतात, आणि स्वातंत्र्य ज्याच्या योगानें सिद्ध जमिनींत सुद्धां डी मारून वर निघूं शकतो, ह्याप्रमाणें आठ सिद्धि आहेत. [नामलिंगानुशासन–पृ० ६.] १७. अर्जुनासह. १८. हनुमंतींहि. १९. धर्माचे रक्षणासाठीं. २०. मदाज्ञेनें. २१. सुखांत. शर्म=सुख.

सत्वर या मजपासीं न्या हे द्विजबाल जा स्मरा मजला ।
आज्ञा केली आहे मुक्त करा जो सदंघ्रिला[1] भजला.' ॥ ९७
ऐसा प्रसाद होतां, वंदुनि परमेश्वरासि ते क्षिप्र ।
आले, दश बालार्पण[2] करुनि सुखी करिति तो भला विप्र. ॥ ९८
अर्जुन म्हणे, 'जनीं जें पौरुष तें याचि कृष्णनाथाचें, ।
पल्वल[3] नदी सरोवर मिरविति तें भाग्य मेघपाथाचें[4]. ॥ ९९
प्रभुचीं अमितें चरितें जरि तें यश वर्णितां नसे अंत, ।
गातां दुर्गति चुकवी सुकविप्रिय हेंचि वर्णिती संत. ॥ १००

## उपसंहार.

(श्लोक.)

श्रीव्यासें स्वसुता शुका पढविलें, तो बोलिला बोल ते,
पीयूषाहुनि[5] गोड, सज्जनसभा आकर्णितां[6] डोलते, ।
संतांचें यश थोर, मोर[7] पढला नाहीं, नव्हेही पटु
तद्भक्तीं यश गाववूनि रसिकीं पीयूष केलें कटु[8]. ॥ १

## अध्याय नव्वदावा.

(श्लोक.)

श्रीकृष्ण द्वारकेंत स्वजन सुखसुधासागरामाजि[9] घाली,
न्हाली लोकत्रयी ही सुगुणखनि[10] सखी कीर्ति गंगेसि झाली; ।
धाली सन्मंडळीही मधुरतरयशें नित्य आकंठ प्याली,
व्याली[11] गीतें, तसी भू भुलविलि चरितें रत्नराशीच व्याली. ॥ १
स्वाराम[12] निष्काम नारायण क्षोणिच्या राजसेनाघभारा हरी
सारा कथा अत्युदारा विशुद्धा अपारा सुपीयूषधारा परी, ।
तारा[13]घसा विश्व तारावया वी[14] शिवाराध्य जो श्रीस थारा हरी
द्वारावतीमाजि दारासमूहीं विहारा अनेकप्रकारा करी. ॥ २
सामी प्रियेच्याचि धामीं वसे नित्य कामी तसा चित्तसामी हरी
ज्या याचिती प्रेम जाया सुरांगा[15] अजा यादवेंद्रा भजाया वरी[16], ।

१. सज्जनपदांला. २. श्लो० ६१-६२ पहा. ३. डबकें. ४. मेघोदकाचें. हें अर्थ सुभाषितरूप आहे. ५. अमृताहून. ६. ऐकतां. ७. कवि मयूर. ८. कटु समजून अमान्य. ९. सुखामृतसमुद्रांत. १०. सुगुणांची खाण. ११. सर्पीण. १२. आत्माराम. १३. चंद्रसा. १४. कथारूप पीयूषधारा वी (प्रसवे). १५. कल्पतरुरूपा. १६. त्यांहीं आपणास भजावें म्हणोन देवी लक्ष्मीतें वरी.

देवीमना मोद दे विश्ववंद्यांघ्रि सेवी निजांकींच घे वीर तो
[1]यामार्धेही सोडिना मानवे कीं सकामा समस्ताहि रामा रतो. ॥ ३

(गीतिवृत्त.)

ज्या त्या [2]दयिताशयनीं नानारूपें धरूनि करि [3]केली, ।
षोडशसहस्रपत्नीवृंदीं[4] सत्स्नेहवृष्टि बरि केली. ॥ ४
प्रासादीं उद्यानीं नगरोपवनीं वनीं नगीं [5]भुवनीं ।
क्रीडा करि प्रियांसीं, वर्णिति वैराग्य [6]आत्मभूभुवनीं. ॥ ५
[7]कांतस्नेहरसभर प्रज्वलित करी, बहु [8]स्मरज्वलना ।
भुलल्या [9]लीलालोकनललिताधरपल्लवासवें ललना. ॥ ६
[10]कोणी [11]कुररीस म्हणे, 'न निजसि रात्रीं, विलाप कां करिसी? ।
वेडे! निद्राभंगीं पाप, निजों दे महेश्वरा हरिसी. ॥ ७
मथिलें कटाक्षबाणें हृदय तुझें [12]कंजलोचने! दिवसा ।
कुररि तरीच व्याकुल हा ताप नव्हे [13]सुधांशुला [14]हिवसा. ॥ ८
गे! [15]चक्रवाकि! आयिक बाइ! करुणरोदनें पुरे चिर हें, ।
रात्रीं रमण दिसेना व्याकुळचित्ता म्हणोनि तूं विरहें. ॥ ९
आम्हीं तैसी दासी तूं प्रभुची काय हो! विशंक बरें ।
[16]अच्युतपदोपभुक्ता माला वांछिसि वहावया [17]कबरें. ॥ १०
रे! सिंधो! कां जागा? निद्रा नाहीं सदा तुला कां गा!? ।
करिशी [19]क्रोशहि, आली जाणो अस्मद्दशा तुझ्या आंगा. ॥ ११
कुचकुंकुमपत्रालि स्रग्भूषा अंगराग [20]संभोगी ।
हरि आमुचें तुझेंहि श्री [21]कौस्तुभचिन्ह हरुनियां [22]भोगी. ॥ १२

---

१. प्रहरार्धेही. २. स्त्रियांच्या शय्येवर. ३. क्रीडा. ४. श्लो० ३-५ पहा. ५. पाण्यांत. 'जीवनं भुवनं वनम्' इत्यमरः. ६. ब्रह्मांडांत. ७. प्रियकराविषयींच्या स्नेहरसाचा पूर. येथें 'स्नेह' शब्द श्लिष्ट आहे. स्नेह=प्रेम, तेल. ८. कामाग्नि. ९. प्रेमावलोकन व सुंदर ओंठ हेच कोणी पल्लव त्यांच्या आसवानें म्हणजे मद्यानें. १०. कोणी एक स्त्री. ११. पक्षिविशेष त्याच्या स्त्रीला. टिटवीला. १२. कमललोचने! १३. सुधा+अंशु=अमृत+कर=चंद्र. १४. शांत होण्याजोगा, निवायाजोगा. १५. श्लो० १६ पहा. १६. श्रीकृष्णाच्या चरणानें उपभोगिलेली. १७. केशांनीं. १८. श्लो० १७ पहा. १९. आक्रोश. २०. विलासी. २१. हें रत्न समुद्रांतून उत्पन्न झालें इतकें ध्यानांत असलें पाहिजे. २२. तुजपासून कौस्तुभ हरून आपण भोगतो.

आम्ही जशा रडों क्षण विरहें, तैसाचि तूंहि बा! रडसी, ।
बहुदाराची मैत्री जळरेखा कां उगाचि आरडसी? ॥ १३
तूं क्षयरोगक्षीण[1] क्षणदेशा[2]! आमुच्या मना गमसी, ।
कृष्णें रहस्य कथिलें, तद्विस्मरणाधिनें बहु श्रमसी. ॥ १४
दयितोक्तविस्मृतीनें आम्हीही पावतोंचि आधींतें, ।
आतां मौन धरुनि किति आठविसी[3]? विसरलासि आधीं तें. ॥ १५
रे! मलयानिल! आम्हीं अप्रिय केलें नसे तुझें लेश, ।
प्रभुदृगिषुभिन्नहृदयीं[4] दे मार[5] क्षार फारसा क्लेश[6]. ॥ १६
मेघा! तूं औदार्यें[7], वर्णें[8], प्रभुमित्र[9] करिसि तद्ध्यान, ।
रडसी, अश्रु विसर्जिसि[10], आम्हांपरि तुजसिही नसे ज्ञान. ॥ १७
कां केलें सख्य जडा[11]? आतां कां रडसि या जनावाणी[12]? ।
याच्या[13] संगीं रमतां डोळ्यांचें तों तुटेचिना पाणी. ॥ १८
बोले प्रियंवदें[14] प्रभु तैसेचि पिकों[15]! तुझेहि हे बोल, ।
अमृतप्रवाह हे मृत वांचेल, करील कोण हो! गोल? ॥ १९
द्यावें काय तुला बा!? प्राणहि अर्पीन, माग जें इष्ट, ।
वद एकदां पुन्हां, जें आतां वदलासि, लागलें मिष्ट. ॥ २०
बा! भूधरा[16]! न बोलसि, डोलसि[17], केवळ अभीष्ट बुद्धिस तें ।
चिंतिसि, ऐसें आम्हां तुझिया ध्यानावरूनियां दिसतें. ॥ २१
बहुधा आम्हीं स्वकुचीं वाहतसों तेंवि तूं स्वशृंगांहीं ।
वाहों वांछिसि विभुपदसारस[18] जें जुष्ट[19] साधु भृंगांहीं. ॥ २२
तरि आमुची अवस्था तैसी होइल तुझीहि, कां भुलसी? ।
आम्हीच कठिणहृदया, तूं क्षणविरहोत्कटज्वरें उलसी. ॥ २३

---

१. यक्ष्मरोगानें पांडुर व दुर्बल झालेला. २. हे चंद्रा. ३. श्लो० १९ पहा. ४. प्रभूच्या कटाक्ष-बाणांनीं भिन्न झालेल्या हृदयावर. ५. मदन. हे मलयानिला! तूं पूर्वोक्त भिन्न हृदयांत मदन उत्पन्न करतोस. ६. क्षतावर क्षार (खारट पदार्थ) घालावा तसा आम्हास फार क्लेश देतो—असा भाव. ७. जलसेचनरूप उदारपणानें. ८. श्याम रंगानें. ९. यादवेंद्राचा दयित. कृष्ण व मेघ समानगुणशीलरूप असल्यामुळें त्यांचें मित्रत्व कल्पिलें आहे. १०. श्लो० २० पहा. ११. जडा=जला. येथें 'डलयोरभेदात्' या नियमानें श्लेष आहे. १२. आम्हाप्रमाणें. १३. प्रभूच्या. १४. प्रियराव. १५. हे कोकिला! (श्लो० २१.) १६. हे पर्वता. १७. हालतही नाहींस. (श्लो० २२.) १८. विभुपदकमल. १९. सेवित.

हे [1]सागरपत्नी हो! ग्रीष्मीं तुमचा पती [2]घनद्वारा ।
आनंदवीत नाहीं स्नेहें वर्षोनियां [3]सुधाधारा. ॥ २४
झालां बहु [4]शुष्करसा [5]पुष्करशोभाविलासबलहीना ।
जैशा आम्हीं कांतप्रणयालोकन न पावतां दीना.' ॥ २५
दैवेंकरून आला हंस प्रमुदारमंडळीपाशीं, ।
मानूनि दूत पतिचा, त्या महिषी बोलती असें त्याशीं, ॥ २६
'हंसा! स्वागत तूझें, ज्ञातीचें प्राप्त हो तुला राज्य, ।
मणिपीठीं बैस सुखें, [6]मुक्ता भक्षूनि पी [7]पय प्राज्य. ॥ २७
वत्सा! **शार्ङ्ग**धराची सांग कथा सत्य ती सुधाधारा, ।
जे [8]शुद्धोभयपक्ष [9]द्विज ते गाताति त्या बुधाधारा. ॥ २८
हंसा! **कं**सारीचा शुद्धात्मा दूत तूं बरें कळलें, ।
झालें निजदासींचें स्मरण प्रभुला, स्वभाग्य हें फळलें. ॥ २९
[10]अजित कुशल आहे कीं? तत्कल्याणेंचि विश्वकल्याण, ।
ज्याच्या भुजप्रतापें रिपुसिंहीं घातलेंचि [11]पल्याण. ॥ ३०
आम्हांप्रति एकांतीं पूर्वी जें बोलिला **ग**दाधर तो ।
[12]चलसौहृद [13]बहुवल्लभ तें स्ववचन काय नायक स्मरतो? ॥ ३१
स्मरुनि मला आणाया पाठविलें, म्हणसि जरि अरे! परिस, ।
रे! क्षुद्राच्या दूता! भेटों जावें, किमर्थ त्या **ह**रिस? ॥ ३२
जरि कामार्थ बहातो, म्हणसी तद्भाषणेंचि बहु गोडें, ।
विश्वास नये आम्हां, त्याच्या बोलांत सत्य बहु थोडें. ॥ ३३

---

१, सागरपत्नी=नदी. २. मेघाच्या योगानें. ३. अमृताच्या धारा. ४. शुष्कजला. ५. अपगत कमलशोभा. ६. मोत्यें. [हंसें मुक्ता नेली–इत्यादि गीति सुप्रसिद्ध आहे.] ७. दूध. ८. शुद्ध शुभ्र किंवा निर्दोष आहेत उभयपक्ष म्ह० दोन बाजूंचे पंख किंवा उभय कुल ज्यांचें असे. ९. द्विज म्ह० पक्षी हंस किंवा ब्राह्मण. 'सुन्दरीवृत्तेन सोदाहरणा **द्वि**जशब्दार्थान्वयः—'द्विजराजशिरोमणेर्भिदां द्विजराजध्वजशालिनश्च यः । कलयेन्मनसापि पात्यतेऽतकभृत्यैः खलु तद्विजावलिः ॥' इति कोशाऽवतंसः. म्हणजे–**द्विज** (विप्र, ब्राह्मण) त्यांचा राजा (चंद्र) हा आहे शिरोमणि (शिरोभूषण) ज्याचें असा महादेव, आणि **द्विज** (अंडजपक्षी) त्यांचा राजा (गरुड) हाच ध्वज (चिन्ह) त्यानें शाली (शोभणारा) असा महाविष्णु ह्या दोघांची भिदा (भेद) जो कोणी (वैष्णवादि) मनानें सुद्धां करितो, त्याची **द्विज** (दंत दांत) त्यांची आवलि (पंक्ति, बत्तीशी) अंतक (यम) त्याचे भृत्य (चाकर) ह्यांनीं खरोखर पाडली जाते. म्हणजे हरिहर हे परस्पर एकरूप आहेत, त्यांचा भेद मानूं नये–हें तात्पर्य. [नामलिंगानुशासन–पृ० १०५.] १०. कृष्ण. ११. खोगीर. १२. अस्थिर प्रीति. १३. ज्याला स्त्रिया फार तो.

वारंवार अनादर साहे, धरि पाय [1]इंदिरा देवी, ।
तें आम्हां पुरवेना, कोण अनादृत सुखेंसिही सेवी? ॥ ३४
आम्ही मानवती कां येऊं? त्यालाचि आण जा, जरि तो ।
इच्छित असेल, येइल, येतां संकोच कांत कां करितो? ॥ ३५
रे! रे! मराल! ये ये पुनरपि तुज सांगणें असे कांहीं, ।
श्रीला घेउनि येइल, तरि त्याचें कार्य या जनीं नाहीं. ॥ ३६
आम्हां सतींस वंचुनि, तीसीं रमतो, न तो भला, खोटा. ।
आम्हींच कुलवतींनीं ऐसा अपराध साहिला मोठा. ॥ ३७
म्हणसी तदेकनिष्ठा श्री, शक्य नसे तिचा क्षण त्याग ।
हंसा! प्रियंवदचि तूं परि आला या त्वदुक्तिचा राग. ॥ ३८
श्रीकृष्णचरणपद्मीं निष्ठा श्रीचीच आमुची नाहीं, ।
आम्हां सर्वांमध्यें अनुरक्ता ती न या तशा कांहीं. ॥ ३९
रे! मुग्धा दुग्धाभा! हंसा! संसार सार यद्दास्यें ।
श्रीचीच परम निष्ठा त्या कृष्णीं वदसि हें कसें आस्यें? ॥ ४०
वर्णावें काय किती? प्रेम प्रभुपदपयोरुडलिनीचें ।
शूरकुलकमलसुरश्रीपतिपादैकभव्यनलिनींचें.' ॥ ४१

## उपसंहार.

(श्लोक.)

कीर्ति श्रीपतिचीच सज्जन सदा सप्रेम आकर्णिती,
सर्वस्तुत्य कवींद्र [12]शौरिचरितें अत्यादरें वर्णिती; ।
गावें नित्य मुकुंदसद्यश यथाबुद्धि त्यजूनि [13]त्रपा,
ऐसें [14]सांगति, पाजिती हितसुधा विद्वत्सभा [15]सुप्रपा. ॥ १
ते आज्ञा स्वशिरीं धरूनि, भगवद्भक्तप्रिया सत्कथा
[16]श्रीरामात्मज साधुशिष्य वदला सोडूनि सर्व व्यथा; ।

१. लक्ष्मी. २. अपमानित. ३. हे हंसा. ४. प्रतारणा करून. ५. मुख्यत्वें कृष्णावर निष्ठा ठेवणारी लक्ष्मी. ६. लक्ष्मीचा. ७. वेड्या. ८. दुग्धासारख्या शुभ्रा (हंसा). ९. हा संसार ज्याच्या दास्यानें गोड. १०. प्रभुपदरूप पयोरुह् (कमल) त्याच्या अलिनी (भ्रमरी) त्यांचें. ११. शूरकुलरूप कमलाचा सूर्य जो श्रीपति त्याचा पाद तेंच मुख्य कल्याण ज्यांचें अशा नलिनी (कमलिनी) स्त्रिया त्यांचें. १२. कृष्णचरितें. १३. लज्जा. १४. येथें कारकदीपक नामक अलंकार आहे. १५. जलशाला. १६. रामाजीपंत पराडकरांचा पुत्र.

हे मानेल निज[1]प्रसादमुखरच्छात्रोक्त साधुव्रजा[2]
जैसें शिक्षित [3]कीरभाषण रुचे, कीं जें वदे स्व[4]प्रजा. ॥ २
प्रेमा कैसा किती हा पटु अपटु असे कीं नसे दंभ गर्व
श्रीमद्विश्वात्मसाक्षी तदनुग जनही जाणती भाव सर्व; ।
जाणे हृष्टा मयूरा घन[5]समय चकोराहि राका[6]ख्यपर्व,
होता साधूपमन्यु[7] प्रणत तरिच दे त्यासि दुग्धाब्धि शर्व. ॥ ३
पद्माक्रांतपदींच '**कृष्णविजय**'[8]ग्रंथांबुजन्मांजली
भावें वंदुनि अर्पिला हरिजनांमध्यें किती जे अली[9], ।
ते याचा रस सेवितीलचि शिरीं वाहेल[10] सन्मंडली
हा स्वस्वामिपदप्रसाद खल तो भीतील जैसा कली. ॥ ४
श्रीकृष्णा! दीनबंधो! स्वजनसुरतरो[11]! पावना! देवदेवा!
जन्मीं जन्मीं स्वलीलाग्रथनकथन हे दे मयूरासि सेवा; ।
साधु श्रोते गुणज्ञ क्षितिवरि मुदितस्वांत नांदोत अन्य
त्वद्भक्तिश्रेष्ठभाग्यें खलहि बुधसभामान्य होऊत धन्य. ॥ ५



०४२४४

१. आपल्याच प्रसादामुळें बोलका झालेला जो शिष्य मयूर त्याचें बोलणें. २. साधुमंडळीला. ३. शुकाचें भाषण. ४. आपलें मूल. ५. वर्षाकाळ. ६. पूर्णिमा रात्रि. ७. पृ० ८८ टीप १२ पहा. ८. कृष्णविजय+ग्रंथ+अंबु+जन्म+अंजली=कृष्णविजय नामक ग्रंथरूपी ही कमलपुष्पांजली. ९. भ्रमर. १०. मान्य करील. ११. स्वभक्तकल्पवृक्षा!